# मराठी वाङ्मयकोश

खंड दुसरा

भाग एक

## मराठी ग्रंथकार (दिवंगत)

(इ.स. १८५८ ते ३० एप्रिल १९६०)

संपादक

डॉ. गो. म. कुलकर्णी

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई

# मराठी वाङ्मयकोश

## खंड दुसरा

### भाग एक

**मराठी ग्रंथकार (दिवंगत)**

(इ. स. १८५८ ते ३० एप्रिल १९६०)


: संपादक :

डॉ. गो. म. कुलकर्णी



महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई

# निवेदन

"मराठी वाङ्मयकोश खंड पहिला" १९७८ साली प्रकाशित झाला.

"मराठी वाङ्मयकोश खंड चौथा" नोव्हेंबर, २००२ मध्ये प्रकाशित झाला. त्यानंतर लगेचच म्हणजे मे, २००३ मध्ये "मराठी वाङ्मयकोश खंड दुसरा, भाग एक" प्रकाशित होत आहे. केवळ वाङ्मयकोशाच्या प्रकाशनाच्या संदर्भातच नव्हे तर एकूणच पुस्तक प्रकाशनाच्या संदर्भात मंडळाने गेल्या दोन वर्षांत लक्षणीय गती घेतलेली आहे.

३१ जानेवारी, २००० अखेर मंडळाच्या महाराष्ट्रातल्या निरनिराळ्या शासकीय मुद्रणालयात एकूण २० हस्तलिखितांची रेंगाळत छपाई सुरू होती. या २० हस्तलिखितांपैकी १९९१ ते १९९३ या काळातली ८ हस्तलिखिते, १९९४ ते १९९६ या काळातली ४ हस्तलिखिते व १९९७ ते २००० या काळातली ८ हस्तलिखिते होती. मंडळाने गेल्या दोन वर्षांत लेखक व मुद्रक यांच्यात सातत्याने समन्वय साधण्याचे तसेच पाठपुरावा करण्याचे धोरण अवलंबिल्याने शासकीय मुद्रणालयांनी उपरोक्त २० हस्तलिखितांपैकी गेल्या दोन वर्षांत १३ हस्तलिखितांची छपाई पूर्ण केली आहे.

गेल्या दोन वर्षांतील या तत्पर सेवेबद्दल शासकीय मुद्रणालये निश्चितच अभिनंदनास पात्र आहेत.

मराठी वाङ्मयकोश खंड दुसरा भाग एकची मुद्रिते तपासण्याचे काम साताऱ्याचे डॉ. शिवाजीराव चव्हाण यांच्यावर सोपविलेले होते. ही मुद्रिते तपासत असताना काही साहित्यिकांच्या परिचयनोंदीचा या वाङ्मयकोशात समावेश नसल्याचे ते आम्हाला वारंवार कळवीत होते. पण या कोशाचे संपादन पूर्ण झालेले असल्यामुळे तसेच या कोशाचे संपादक डॉ. गो. म. कुलकर्णी हे हयात नसल्यामुळे त्यांनी संपादित केलेल्या या नोंदींमध्ये काही बदल करणे औचित्याला धरून झाले नसते. शिवाय या कोशाचे नव्याने संपादन करायचे म्हणजे या कोशाच्या प्रकाशनास विलंब लागणार, हे उघड होते. म्हणून प्राप्त परिस्थितीचा विचार करून आम्ही ते कटाक्षाने टाळले. अर्थात त्यामुळे या कोशामध्ये काही त्रुटी राहिल्या असण्याची शक्यता नाकारता येत नाही.

एक गोष्ट मात्र खरी की, कोणत्याही कोशाच्या नोंदी सर्वसमावेशक व परिपूर्ण नसतात. दुर्दैवाने आजकाल मराठी साहित्यिकदेखील वेगवेगळ्या गटातटात व प्रदेश-पंथात विभागला जात आहे. अशा परिस्थितीत आपण सर्वसमावेशक आहोत, असे कुणी कितीही म्हटले तरी ते मान्य होईलच, असे नाही. त्यामळे हा कोश परिपूर्ण अथवा सर्वसमावेशक आहे, असा आमचा मुळीच दावा नाही. या कोशाचा संपादित मजकूर शक्य तितक्या नेटक्या स्वरूपात पुस्तक रूपाने मराठी वाचकांना उपलब्ध करून देणे एवढेच आमचे काम होते व ते काम आम्ही नेटकेपणाने करण्याचा प्रयत्न केलेला आहे.

दुसऱ्या खंडाच्या भाग दोनच्याही नोंदी लिहून तयार आहेत. त्यांचे संपादन करण्यासाठी मात्र मंडळाने संपादक मंडळ नेमण्याचा नुकताच निर्णय घेतलेला आहे.

या कोशाबाबत वाचकांच्या/अभ्यासकांच्या प्रतिक्रिया मंडळाला प्राप्त होऊ शकल्या तर या खंडाच्या दुसऱ्या आवृत्तीच्या प्रकाशनाच्या वेळी या प्रतिक्रिया आम्हाला मार्गदर्शक होतील.

रा. रं. बोराडे
अध्यक्ष,
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ

मुंबई
दिनांक : ३१ जानेवारी, २००३

# मराठी वाङ्मयकोश

## खंड दुसरा – भाग एक

**अंतरकर, बाळकृष्ण लक्ष्मण : ० विहंगम :** (ज. १ सप्टेंबर, १८६७, ताम्हणमळा, जि. रत्नागिरी – मृ. ४ डिसेंबर, १९६०, अंबरनाथ, जि. ठाणे). संस्कृत व इंग्रजी काव्याचे अनुवादक. शिक्षण चिपळूण व पुणे येथे. सहावी व प्राथमिक शिक्षक ट्रेनिंग पूर्ण. रत्नागिरी जिल्ह्यात प्राथमिक शिक्षक. 'हंस'चे संपादक अनंत अंतरकर ह्यांचे हे वडील.

ह्यांचे महाकवी कालिदासाच्या 'मेघदूत' या काव्याचे *मेघदूतच्छाया* हे मराठी समवृत्त भाषांतर व 'शाकुंतल'चे *सरूप शाकुंतल* (१९२९) हे भाषांतर प्रसिद्ध आहे. *मेघदूतच्छाया* हे 'काव्यरत्नावली' मासिकातून (जाने. फेब्रु. १९०५) प्रथम प्रसिद्ध होऊन नंतर पुस्तकरूपाने (१९३९) प्रसिद्ध झाले. उमरखय्यामच्या रुबायांचे फिट्झेराल्डच्या इंग्रजी अनुवादावरून केलेले भाषांतर, त्यांचे नातू आनंद अंतरकर ह्यांनी १९७१ मध्ये प्रकाशित केले. "आपल्या भाषांतरात काव्याचा प्रसाद आणि भाषांतराचा काटेकोरपणा, ह्या दोहोंचा सुवर्णमध्य टिकविण्याचा त्यांनी प्रयत्न केला आहे;" असा अभिप्राय रुबायांना जोडलेल्या प्रस्तावनेत, श्री. के. क्षीरसागरांनी व्यक्त केला आहे. त्यांची ही भाषांतरे तत्कालीन संस्कृत विद्वानांनी वाखाणली होती.

अंतरकरांची स्वतंत्र स्फुट कविता 'काव्यरत्नावली', 'करमणूक', 'बलवंत' आदी मासिकांतून 'विहंगम' ह्या टोपण नावाने प्रसिद्ध झाली. जुन्या परंपरेच्या वळणाने जाणारी त्यांची कविता प्रासादिक आहे. तसेच 'शालापत्रक', 'विविधज्ञानविस्तार', 'चित्रमयजगत्', 'ज्योत्स्ना', 'हंस' इत्यादी नियतकालिकांतून त्यांचे व्याकरणविषयक आणि संस्कृत साहित्यविषयक अनेक व्यासंगपूर्ण लेख प्रसिद्ध झाले आहेत.

उषा टाकळकर, म. ना. लोही

**अग्निहोत्री (मुळे), वामन श्रीधरशास्त्री :** (ज. १८५७ – मृ. १९५०, संगमनेर). संस्कृत ग्रंथांचे अनुवादक. संस्कृतचे अध्ययन संगमनेर येथे. ३५ व्या वर्षी श्रौताग्निहोत्राची दीक्षा. करवीरपीठाच्या शंकराचार्यांनी त्यांना 'श्रौतस्मार्त कर्ममार्तंड' ही पदवी प्रदान केली.

मनुस्मृती व अन्य स्मृतिग्रंथांतून काढलेल्या उताऱ्यांचा मराठी अनुवादित संग्रह, 'राजधर्मप्रकाश' (१९३०) नावाने प्रकाशित. *श्रीमद्भगवद्गीतामाहात्म्य* (पद्मपुराणाच्या उत्तरखंडाचे १७५ ते १९२ पर्यंतचे अध्याय व त्यांचा मराठी अनुवाद–१९३४), *षोडशसंस्कारादर्श* (ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य ह्या तीन वर्णांना आवश्यक असलेल्या सोळा संस्कारांचे रहस्य व महत्त्व समजावून देण्यासाठी केलेली रचना – १९४१) ही त्यांची अन्य पुस्तके.

गं. दे. खानोलकर, मीनल निसळ

**अधिकारी, सीताराम रघुनाथ :** (ज. १८४८ – मृ. २ ऑक्टोबर, १९२८). नाटक, निबंध, गोष्टी इत्यादींचे लेखक.

हिंदुधर्म, स्वदेश व समाज ह्यांच्याविषयीच्या निष्ठेतून ह्यांनी सारे लेखन केले. *चमत्कारिक स्वप्न* (आर्यलोकहितार्थ अगत्याची सूचना, १८८६), *श्रीसर्वसारदर्पण* (जगात मनुष्याने कसे वागले असता तो थोर व सुखी होईल याविषयी माहिती, १८९९), *आर्यधर्मदृढीकरण* (आपल्या धर्मातील बिघाडांची सुधारणा करण्याचे दृष्टीने काय काय व्यवस्था कराव्या या संदर्भातील लेखन, १९१६) आणि *विचारशिरोमणी* (विविध विषयांवरील निबंध, १९२१) ही ह्यांची पुस्तके. *वसुंधरा व पृथ्वीराज* (१८९१) हे ह्यांचे काल्पनिक नाटक. एतद्देशियांच्या निकृष्ट अवस्थेला कोणती कारणे घडली, याचे चित्रण या नाटकात आढळते. *विक्रम पृथ्वीपर्यटन, भाग १ व २* (१९०८-०९) हा यांचा अद्‌भुतरम्य साहसकथांचा मनोरंजक काल्पनिक संग्रहही प्रसिद्ध आहे.

उषा टाकळकर, मीनल निसळ

**० अनंततनय :** पहा आपटे, दत्तात्रेय अनंत

**० अनंतसुत विठ्ठल :** पहा पिंपळगावकर, विठ्ठल अनंत

**० अभिराग :** पहा भिडे, रामकृष्ण गोपाळ

**अभ्यंकर, गणेश रघुनाथ :** (ज. १८७३, सांगली – मृ. ४ एप्रिल, १९३६, मिरज). चरित्रकार व लेखक. सांगली येथे वकिलीचा व्यवसाय. स्वकालीन संस्थानी राजकारणातील एक तज्ज्ञ. पुण्याच्या लॉ कॉलेजमध्ये घटनाशास्त्राचे अध्यापक. ना. गोपाळ कृष्ण गोखले ह्यांचे अनुयायी. *गोपाळ कृष्ण गोखले ह्यांचे चरित्र* (१९१५) व *राष्ट्रीय सभा* (तिची उत्पत्ती व वाढ – १९१५) ही ह्यांची दोन पुस्तके. नेमस्त पक्षीय असूनही, यांनी जहालांची बाजू मांडताना पुरेसा समतोल राखला आहे. *अबूचा पहाड* (१९१५) या नावाचे एक स्थलवर्णनात्मक पुस्तकही त्यांनी लिहिले आहे. राज्यघटनाविषयक

प्रश्नांवर इंग्रजी नियतकालिकांमधून ह्यांनी विपुल लेखन केल्याचे आढळते. कवयित्री लक्ष्मीबाई अभ्यंकर या यांच्या पत्नी.

पां. वा. गाडगीळ, मीनल निखळ

**अभ्यंकर, महादेव गोविंद :** ० म. गो. : (ज. १८६८ – मृ. १९४२). रामायण-महाभारताच्या आधारे निबंध लिहिणारे लेखक. ह्यांचे सुरुवातीचे काही लेख पुण्याच्या 'केसरी', 'मराठा' इत्यादी नियतकालिकांतून प्रसिद्ध. *रामायणानंतरचे भारत* (१९०१), *वाल्मीकिरामायण* (१९०३), *रामाचे लग्न केव्हा झाले* व *म. गो. चे निवडक लेख* (१९३८) ही त्यांच्या शोधनिबंधांची पुस्तके.

*रामायणानंतरचे भारत* ह्या निबंधात त्यांनी भारत हा रामायणापूर्वीचा ग्रंथ असल्याबद्दलचे काही पाश्चात्य पंडितांनी मांडलेले मत कसे चुकीचे आहे, ते सप्रमाण सिद्ध केले आहे. रामायणाविषयीच्या निबंधांतून, रामायणाच्या अवलोकनात आलेल्या विविध प्रतींवरून उत्तरकांडाची रचना, अर्वाचीन कालातील असल्याचे साधार स्पष्ट केले आहे.

मूळ विषयाचा सखोल व्यासंग व तत्कालीन समाजस्थितीचा सूक्ष्म अभ्यास करून लिहिलेले त्यांचे निबंध वाचनीय व मननीय झाले आहेत.

उषा टाकळकर, वसंत वऱ्हाडपांडे

**अभ्यंकर, वासुदेवशास्त्री महादेव :** (ज. ४ ऑगस्ट, १८६३, सातारा – मृ. १४ ऑक्टोबर, १९४२, पुणे). जुन्या शास्त्रीपरंपरेतील आधुनिक काळातील वैय्याकरणी, वेदान्ती, शास्त्राभ्यासक. भारतीय कीर्तीचे संस्कृत पंडित.

वडील व आजोबा हे ख्यातनाम संस्कृत पंडित. त्यामुळे यांनी वयाच्या विसाव्या वर्षापर्यंत सर्व शास्त्रीपरंपरेचे शिक्षण घरीच पूर्ण केले. मंत्रशास्त्र व फलज्योतिषशास्त्र अभ्यासून थोडे वेदाध्ययनही केले. साताऱ्याहून १८९० साली पुण्यास आगमन. डेक्कन कॉलेज सोसायटीच्या फर्ग्युसन कॉलेजात, संस्कृत विषयाचे शास्त्री म्हणून नियुक्ती (१८९२). १९२८ साली सेवानिवृत्त. १९२१ साली सरकारने त्यांना 'महामहोपाध्याय' ही सन्माननीय पदवी दिली. वयाच्या ७५ व्या वर्षी महाराष्ट्रीय जनतेने त्यांना मानपत्र दिले.

१८९९ साली ब्रह्मसूत्र शांकरभाष्याच्या मराठी भाषांतराची महत्त्वाची कामगिरी बडोद्याच्या महाराजांनी वासुदेवशास्त्री अभ्यंकर व त्यांचे सहकारी प्रा. दिनकर त्र्यंबक चांदोरकर यांच्यावर सोपविली. चांदोरकरांच्या मृत्यूनंतर ते काम त्यांनी एकट्यानेच नेटाने पार पाडले. १९११ साली *शांकर ब्रह्मसूत्राचे मराठी भाषांतर* चार खंडांत प्रसिद्ध झाले. त्यात तीन खंडांत मूळ भाषांतर असून चौथा खंड परिशिष्टात्मक आहे.

त्यानंतरच्या *विशिष्टाद्वैतमत* (१९१५) ह्या मराठी निबंधात मराठी वाचकांसाठी, या मताचे केवळ तीस पृष्ठांत सांगोपांग विवेचन केले आहे. पतंजलीविरचित *व्याकरण महाभाष्याचे मराठी भाषांतर*, हे त्यांचे आयुष्याच्या अखेरच्या काळातील महत्त्वाचे लेखनकार्य. या ग्रंथाचे पहिले दोन भाग १९३८ – ३९ साली प्रसिद्ध झाले होते व उर्वरित ३ ते ६ भागांच्या भाषांतराचे काम त्यांनी पूर्ण करून ठेवलेले होते. ते भाग त्यांचे पुत्र काशिनाथपंत अभ्यंकर यांच्या संपादनाखाली *व्याकरणमहाभाष्य खंड १ ते ७* (१९५१ – ५४) प्रसिद्ध झाले. त्यातील सातवा 'प्रस्तावना खंड' (पृष्ठे ५००) हा काशिनाथपंतांनी परिश्रमपूर्वक सिद्ध केला आहे. हे भाषांतर म्हणजे व्याकरणशास्त्रावर लिहिलेला नवीन ग्रंथच होय. मराठीशिवाय अन्य कोणत्याही देशी किंवा परदेशी भाषेत असे भाषांतर उपलब्ध नाही. याशिवाय *श्रीभाष्यचतुःसूत्री समासोक्ति टीका*, (१९०४), '*सर्वदर्शनसंग्रह*', *दर्शनांकुर टीका* (१९२४), *कुण्डार्क टीका* (१९३१), '*मीमांसान्यायप्रकाश*' *प्रभाटीका* (१९३७) इत्यादी टीकाग्रंथ; *काव्यप्रकाश* (१९११), *पातंजलयोगसूत्र* (भाष्य व टीकेसह) (१९१७), *संस्कारपद्धती* (१९२४), *न्यायकोष* (१९२८) इत्यादी संपादित ग्रंथ; *अद्वैतमोद* (१९१८), *धर्मतत्त्वनिर्णय* (१९२९) अशी त्यांनी अनेकविध स्वरूपाची ग्रंथरचना केली. शास्त्रीपरंपरेतील तपस्वी ज्ञानोपासकांच्या अखेरच्या पिढीतील एक तेजस्वी व्यक्तिमत्त्व म्हणून त्यांचे वर्णन करता येईल.

उषा टाकळकर, के. ए. पोतदार

**० अशोक :** पहा मोरे, नारायण रामचंद्र

**० अश्विनीकुमार :** पहा ठोसर, सदाशिव नारायण

**अष्टपुत्रे, भाऊशास्त्री :** (अंदाजे १८२५ ते १८७५ चा सुमार). संगीतशास्त्रावर पहिला मराठी ग्रंथ रचणारा लेखक.

'सिद्धांतकौमुदी' कर्ते नागोजीभट्ट यांच्या शिष्यपरंपरेतील एक पुणेकर शास्त्री यापलीकडे त्यांची माहिती मिळत नाही. यांचे सर्व उपलब्ध ग्रंथ शिळामुद्रित आहेत. *शृंगाररत्नावली* (भाग १ : १८४९; भाग २ : १८५१) हा पुणे येथे रचलेला स्वतंत्र पद्यग्रंथ व *गायनप्रकाश* (पुणे, १८५०) हे पद्यात्मक सचित्र पुस्तक, ही त्यांची उल्लेखनीय वाङ्मयीन कामगिरी. मुंबई मुक्कामी सदाशिव बजाबा अमरापूरकर यांसह महाभारताच्या विराटपर्वाचे सटीक आर्याबद्ध भाषांतर (१८५२) आणि सदाशिवशास्त्री लेले यांसह चिंतामण बल्लाळ जोशीकृत 'संस्कृत शार्ङ्गधर वैद्यक ग्रंथ याचे मराठी भाषांतर' (१८५४) या ग्रंथांची शुद्धी व संपादन त्यांनी केले. *गायनप्रकाश* हे पुस्तक छोटे, सुटसुटीत व सामान्य जनांसाठी रचलेले आहे. प्राकृत भाषेतील पहिलाच संगीत ग्रंथ म्हणून हा महत्त्वाचा आहे.

शरच्चंद्र विष्णु गोखले, के. ए. पोतदार, डॉ. श्रीरंग संगोराम

**अखोडकर, कृष्णाजी नारायण :** (ज. १८७३ – मृ. ११ एप्रिल, १९३३, दापोली). कादंबरीकार, नाटककार आणि भाषांतरकार. मूळ गाव गोव्यातील अस्नोडे. मॅट्रिकपर्यंत शिक्षण मुंबईत. काही वर्षे एल.आयु.सी.मध्ये नोकरी. नंतर ते लेखनव्यवसायाकडे वळले. इंग्रजी, बंगाली, गुजराती भाषांचे जाणकार. 'ब्युटीज ऑफ मेरी कॉरेली'चे *नीतिसौंदर्य* (१८९९) व विवेकानंदांच्या 'डिव्होशन'चे *भक्ती* या नावाचे रूपांतर (१९०१) ही यांची सुरुवातीची भाषांतरित पुस्तके. त्यांनी *संन्यासी* (१९०२) ही मूळ बंगालीवरून अनुवादित केली.

त्यांनी सुमारे सात-आठ नाटके लिहिली असून *नवजीवन* (१९२१), *संगीत हाच परिणाम* (१९२१), *संगीत दुरंगी दुनिया* (१९२४), *अग्रहार* (१९२६) ही यांची सामाजिक नाटके. *भक्तिप्रभाव* (१९२४) हे दैवी चमत्कारांचा प्रभाव दर्शविणारे नाटक. *कादेरी बाजार* (१९२६), *विलासी कान्ता* (१९२६), *कोजागिरी* (१९२६), *रावसाहेब* (१९३१) या यांच्या कादंबऱ्या. *कोजागिरी* ही मुंबईच्या वेश्याजीवनावर आधारित आहे. प्रसंगांची गतिमानता, उत्कंठा वाढविणारी रचना, स्वभावरेखनाचे कौशल्य ही त्यांच्या कादंबऱ्यांची वैशिष्ट्ये. *तीन आणे माला* या लोकप्रिय कथामालेतूनही त्यांच्या सुमारे पंचवीस कादंबरिका प्रसिद्ध झाल्या आहेत. त्यांपैकी *उसन्या सूनबाई* (१९२५), *अंतरपाट* या बऱ्याच गाजल्या. याशिवाय कुमारांसाठी उपयुक्त असे कथारूप चरित्रलेखनही त्यांनी केले आहे. *नरसिंह मेथा* (१९३१), म. गांधींच्या जीवनावरील *अकरावा अवतार* (१९३०), *भारतीय इतिहासातील वीररत्ने* (१९३०) ही या संदर्भात उल्लेखनीय अशी आणखी काही पुस्तके. बाळबोध शैली आणि प्रसंगानुरूप भाषा यामुळे यांचे चरित्रलेखन वाचनीय झाले आहे.

शुभदा सबनीस, के. ए. पोतदार

**अळतेकर, अनंत सदाशिव :** (ज. ३० ऑगस्ट, १८९८, महाकवे, ता. कागल, जि. कोल्हापूर – मृ. २५ नोव्हेंबर, १९५९). प्राचीन भारतीय इतिहास, शिलालेख, ताम्रपट, नाणी व प्राचीन वाङ्मय यांचे अभ्यासक. मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण कऱ्हाड येथे. पुण्याच्या डेक्कन कॉलेज-मधून बी.ए. (१९१९) व एम्.ए. (१९२२). एम्.ए. परीक्षेत संस्कृतच्या सर्व शिष्यवृत्त्या व पारितोषिके. एल्एल्.बी. बनारस हिंदु विद्यापीठात प्राचीन भारतीय इतिहास व संस्कृती ह्या विषयाचे प्राध्यापक. डी.लिट्. (बनारस हिंदु विद्यापीठ). पाटणा विद्यापीठ, येल विद्यापीठ (अमेरिका), पश्चिम जर्मनीतील विद्यापीठे इत्यादी ठिकाणीही महत्त्वाची कामगिरी. भारतीय नाणक परिषदेच्या ज्ञानपत्रिकेचे संपादन (१९४०–५४).

डॉ. अळतेकरांचे बहुतेक लेखन इंग्रजीत आहे. *गुजरात आणि काठेवाडमधील मुख्य नगरांचा इतिहास* ह्या इंग्रजी निबंधाला मुंबई विद्यापीठाचे सुवर्णपदक मिळाले. *पश्चिम भारतातील ग्रामसंस्थांचा इतिहास* (१९२७) हा त्यांचा आणखी एक सुवर्णपदक विजेता निबंध. *राष्ट्रकूट आणि त्यांचा काळ* हा डी.लिट्.चा प्रबंध. यांनी *प्राचीन भारतीय शिक्षणपद्धती* (१९३४), *बनारसचा इतिहास* (१९३७), *प्राचीन भारतातील स्त्रियांचे सामाजिक स्थान व परिस्थिती* (१९३८), *वाकाटक व तत्पूर्वकालीन राजवंश व तत्कालीन राजकीय - सामाजिक परिस्थिती, वाङ्मय व तत्त्वज्ञान* (१९४६) इत्यादी ग्रंथ आणि अनेक संशोधनात्मक लेख इंग्रजीतून लिहिले. त्यांपैकी *राष्ट्रकूट साम्राज्याचा इतिहास* (१९३४), *प्राचीन भारतीय शिक्षणपद्धती* (१९३५), *शिलाहारांचा इतिहास* (१९३५) व *काशी : प्राचीन व अर्वाचीन* हे ग्रंथ मराठीतून अनुवादित झाले आहेत.

डॉ. अळतेकरांचे बहुतेक ग्रंथ प्राचीन भारतीय इतिहासातील विशिष्ट कालखंडाची सांगोपांग माहिती देणारे असून, संदर्भ ग्रंथ म्हणून ते अतिशय महत्त्वाचे आहेत. *प्राचीन भारतीय शिक्षणपद्धती* या ग्रंथात वेदकालापासून ते इ. स. १२०० पर्यंतच्या कालातील भारतीय शिक्षणपद्धतीविषयीचे साधार व चिकित्सापूर्ण विवेचन आढळते, तर *प्राचीन भारतातील स्त्रियांचे सामाजिक स्थान व परिस्थिती* या ग्रंथातून प्राचीन वाङ्मय, शिलालेख, शिल्पे, प्रवासवृत्ते इत्यादी साधनांच्या आधारे भारतातील स्त्रियांचे शिक्षण, विवाह, घटस्फोट, सतीची चाल, नियोग, स्त्रीधन, स्त्रियांची वेषभूषा इत्यादी विषयांची माहिती मिळते.

वि. म. बेडेकर, के. ए. पोतदार

संदर्भ : (1) वा. वि. मिराशी, 'कै. डॉ. अनंत सदाशिव अळतेकर', 'नवभारत', जानेवारी १९६०; पृ. १०. (२) डॉ. जॉर्ज मोराएस, 'डॉ. अ. स. अळतेकर, जीवन आणि कार्य', भारतीय, इतिहास परिषदेच्या २२ व्या अधिवेशनाचा अहवाल, गोहत्ती, १९५९.

**अळतेकर, पार्श्वनाथ यशवंत :** (ज. १४ सप्टेंबर, १८९८, खारेपाटण, जि. रत्नागिरी – मृ. २२ नोव्हेंबर, १९५९, कोल्हापूर). नट, दिग्दर्शक, नाट्यसंस्थाप्रवर्तक व नाट्यशिक्षक या नात्यांनी विख्यात. शिक्षण बी.ए.पर्यंत. कायद्याच्या अभ्यासासाठी मुंबईस आगमन. १९२४ पासून अनेक मूकपटांत भूमिका व दिग्दर्शन. 'इंपीरिअल', 'सरस्वती सिनेटोन', 'रणजित', 'नटराज फिल्मस्' इ. संस्थांमधून नट, दिग्दर्शक या नात्याने सहभाग. अनेक मराठी, हिंदी, कन्नड तसेच तमिळ बोलपटांचे दिग्दर्शनही त्यांनी केले आहे. रेडिओ स्टॉर्स (१९३२), सर्वोदय कलामंदिर आणि नाट्यमन्वंतर या संस्थांशी अळतेकरांचा संबंध होता. प्रयोगशील नट व सहकारी या नात्याने नाट्यविषयक मौलिक कार्य. नाट्याभिनय व 'व्हाईस कल्चर' यांचे शिक्षण देणारी *नॅशनल थिएटर ॲकॅडमी* (१९३८–४४) या नावाची संस्था त्यांनी कार्यान्वित केलीच, पण नंतर नवनाट्याचे पुरस्कर्ते मामा वरेरकर यांच्या मार्गदर्शनाखाली त्यांनी त्यालाच जोडून 'लिटल् थिएटर' नावाची संस्था काढली. अळतेकर स्वतःला 'रेजिसॉर' म्हणवून घेत. *आंधळ्यांची शाळा*, *रामशास्त्री* या नाटकांतल्या त्यांच्या भूमिका विशेष गाजल्या. 'अभिनयसाधना मंदिर', सोलापूर या संस्थेच्या वतीने भरलेल्या नाट्यसंमेलनाच्या एकोणचाळिसाव्या अधिवेशनाचे (१९५७) ते अध्यक्ष होते. पाश्चात्त्य नाट्यप्रणालीचे मराठी रंगभूमी-वर प्रयोग करण्याचे तसेच अभियन-दिग्दर्शन या प्रांतांत अभिनवता आणण्याचे श्रेय अळतेकरांना आहे.

कमलेश

संदर्भ : सुमंत जोशी– 'नमन नटवरा'.... अळतेकर पार्श्वनाथ यशवंत–इनामदार श्री. दे. (विश्वकोश खंड २).

**अळतेकर, माधव दामोदर :** (ज. १८९०, कळे, कोल्हापूर – मृ. २० ऑगस्ट, १९५९, मुंबई). निबंधकार, वृत्तपत्रकार, चरित्रकार व कादंबरीकार. शालेय व इंटरपर्यंतचे शिक्षण कोल्हापूर येथे. बी.ए. (फर्ग्युसन कॉलेज, पुणे) आणि अर्थशास्त्र व इतिहास विषय घेऊन एम्.ए. (विल्सन कॉलेज, मुंबई – १९१७). 'ज्ञानप्रकाश' या पत्राचे काही काळ उपसंपादक व दैनिक 'इंदुप्रकाशा'त मराठी विभागाचे संपादक (१९१५). याशिवाय अनेक इंग्रजी वृत्तपत्रात लेखन. मुंबईच्या विल्सन कॉलेजात मराठीचे प्राध्यापक (१९२४–५१).

अळतेकरांनी वृत्तपत्रीय लेखनाखेरीज चरित्र, कादंबरी, लघुकथा, निबंध इत्यादी वाङ्मयप्रकारही हाताळले आहेत. *अपराध कोणाचा?* (१९२५), *शांताराम* (१९१९), *मुक्तबंध* (१९२६), *ललिता* (१९४२), *अंतरंग* (१९४३), *निरंकुश* (१९४४) ह्या कादंबऱ्यांतून त्यांनी तत्कालीन समाजाचे व तदनुषंगाने सुशिक्षित तरुणतरुणींच्या प्रगतिवादी अशा आकांक्षांचे चित्रण केले आहे. सामाजिक सुधारणेचा पुरस्कार हा त्यांच्या कादंबऱ्यांचा मुख्य हेतू. *कालिदासाची सृष्टी* (१९३७) ह्या ग्रंथांतून कालिदासाच्या काव्यसौंदर्याबरोबरच त्याने चित्रित केलेली भारतीय संस्कृती व तीतील आदर्शांवर अळतेकरांनी विशेष भर दिला आहे. *नवे मानसशास्त्र आणि नवी नीती* हा नवमतवाद आणि वाङ्मयीन श्लील - अश्लीलवाद यांची चिकित्सा करणारा त्यांचा ग्रंथ (१९३६) *पाने व फुले* (१९३८) ह्या पुस्तकात त्यांनी लिहिलेले निबंध, लघुकथा आणि कविता यांचा समावेश आहे. *उलटलेली पाने* (१९६१) हे त्यांचे आत्मचरित्र (संपा. मनोहर मा. अळतेकर) प्रसिद्ध झाले असून त्यातून त्यांच्या सामाजिक, राजकीय आणि वाङ्मयीन कामगिरीचे आणि त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचे दर्शन घडते.

वरील सर्व ग्रंथांपेक्षाही त्यांचा विशेष गाजलेला ग्रंथ म्हणजे *गोपाळ गणेश आगरकर* हा चरित्रात्मक निबंध (१९३०). आगरकरांवरील दोषारोप साधार खोडून काढून त्यांची मते आणि विचार त्यांच्याच शब्दांत नमूद करण्याचे कार्य अळतेकरांनी या चरित्राद्वारे केले आहे. *श्रीज्ञानदेव* (१९४०) हा त्यांचा ज्ञानदेवविषयक चरित्रग्रंथही उल्लेखनीय आहे.

वि. ह. कुलकर्णी, विमल भालेराव

**अळतेकर, सदाशिव खंडो :** (ज. १८७२, अळते, जि. कोल्हापूर – मृ. १६ एप्रिल, १९३८, काशी). समर्थ वाङ्मयाचे अभ्यासक व समर्थ चरित्रकार. शिक्षण राजाराम हायस्कूल व राजाराम कॉलेज, कोल्हापूर आणि डेक्कन कॉलेज, पुणे. कोल्हापूर व कऱ्हाड येथे वकिली, नंतर असहकाराच्या चळवळीत सहभाग.

अळतेकरांना प्रा. विष्णू गोविंद विजापूरकर यांच्या सहवासात समर्थ वाङ्मयाची गोडी लागली. त्यांनी समर्थांची *सुलभ दासबोध* (१९२३), *समर्थ रत्नसंग्रह* (१९२५), *समर्थांची करुणापर*

*कविता* (१९२६), *मनाचे श्लोक* इत्यादी पाचसहा पुस्तके प्रकाशित केली. अळतेकरांचे ऐतिहासिक दृष्टी ठेवून लिहिलेले विस्तृत असे *श्रीसमर्थ-चरित्र* (१९३३) प्रसिद्ध आहे. यांनी उपलब्ध असलेल्या सर्व प्राचीन व अर्वाचीन साधनसामग्रीचा उपयोग करून हे चरित्र लिहिले आहे. बहुजन समाजाला समर्थचरित्राचे रहस्य समजावे व त्यांनी त्यापासून बोध घ्यावा, हा प्रस्तुत चरित्रलेखनामागील हेतू. समर्थांचे राजकारण, समर्थ रामदास व छत्रपती शिवाजी महाराज, समर्थ संप्रदाय यांसारख्या प्रकरणांत, आवश्यक तेथे, या संदर्भात निर्माण झालेल्या वादांची चर्चा ऐतिहासिक दृष्टिकोणातून केली आहे. ऐतिहासिक दृष्टीने विस्तृत असे समर्थचरित्र लिहिणारे हे पहिले चरित्रकार. प्राचार्य ग. वि. अकोलकर ह्यांनी १९७४ मध्ये प्रस्तुत चरित्रग्रंथाची नवी संपादित आवृत्ती प्रसिद्ध केली.

उषा टाकळकर, विमल भालेराव

**ॲबट, (रेव्ह.) ॲमास** : [ज. १८१० (१८१२) – मृ. २४ एप्रिल, १८८९]. ख्रिस्ती मिशनरी लेखक. १५ ऑक्टोबर, १८३४ ते २७ जानेवारी, १८४७ आणि १५ सप्टेंबर, १८५७ ते ७ एप्रिल, १८६९ या काळात हिंदुस्थानात वास्तव्य. अहमदनगर येथे अमेरिकन मिशनने उच्च शिक्षण देण्यासाठी स्थापन केलेल्या 'सेमिनरी'चे आरंभापासून अधीक्षक. त्यांनी ख्रिस्ती धर्मविषयक व शालोपयोगी अशी काही पुस्तके तयार करून प्रारंभ काळातील मराठी भाषेच्या घडणीस काही अंशी हातभार लावला आहे.

ह्यांची *गणित* भाग १, २, ३ (१८३७) *पदार्थविद्या* (१८२६), *तर्कशास्त्र* (१८४७) ही शिक्षणविषयक पुस्तके विशेष उल्लेखनीय ठरतील. याशिवाय त्यांनी *शहपासी मुलांचे पुस्तक* (१८३७), *काफर मुलगी* (१८४५), *गाण्याचे पुस्तक* (१८४८), *स्त्रियांचे विकार* (१८७२) इत्यादी इतर पुस्तके लिहिली व ती अहमदनगर मिशनने प्रसिद्ध केली.

उषा टाकळकर, के.ए. पोतदार, लता जाधव

**ॲबट, (रेव्ह.) जस्टिन एडवर्ड** : (ज. १८५३–मृ. १९ जून, १९३२). अमेरिकन मराठी मिशनचे ख्रिस्ती मिशनरी. मराठी संतवाङ्मयाचे अभ्यासक व प्रचारक. आपले सगळे आयुष्य त्यांनी ख्रिस्ती मिशनसाठी खर्च केले. त्यांचा जन्म अमेरिकेतील हॅम्पशायर परगण्यातील पोर्ट्सुमथ येथे झाला. ते आपल्या आईवडिलांबरोबर हिंदुस्थानात आले. त्यावेळी त्यांचे वय चार वर्षांचे होते. पुढील काळात त्यांचे कार्यक्षेत्र महाराष्ट्र हेच होते. सुमारे चाळीस वर्षे त्यांनी महाराष्ट्रात काढली. २५ वर्षे ते 'ज्ञानोदय' या ख्रिस्तधर्मप्रसारक इंग्रजी–मराठी साप्ताहिक पत्राचे इंग्रजी विभागाचे संपादक होते.

इ. स. १९१० मध्ये ते मिशनच्या सेवेतून मुक्त झाले. काही दिवस ते अमेरिकेत गेले. नंतर पुन्हा १९२० मध्ये पत्नीसह हिंदुस्थानात आले. महाराष्ट्रातील पवित्र स्थळे आपल्या पत्नीस दाखविण्याचा त्यांचा हेतू होता. पण काही काळातच प्रवासात आजारी पडून त्यांच्या पत्नीचे निधन झाले (२६ जून, १९२१, मिरज).

डच भाषेतील 'डाग् रजिस्टार' नावाच्या डच ईस्ट इंडिया कंपनीच्या प्रचंड पत्रव्यवहारात त्यांना शिवाजी महाराजांविषयी माहिती आढळली. त्याविषयी त्यांनी भा. इ. सं. मंडळास कळविले होते. यांनी लिहिलेला शिवाजीच्या नाण्यांविषयीचा लेख एशियाटिक सोसायटीने प्रसिद्ध केला होता. त्यांना महाराष्ट्र, महाराष्ट्र संतवाङ्मय, महाराष्ट्र इतिहास याबद्दल प्रेम होते.

१९२० मध्ये हिंदुस्थानात आल्यावर त्यांनी 'ज्ञानोदया'तून मराठी वाङ्मयावर लेखमाला सुरू केली. मिसेस ॲबट यासुद्धा मराठी संतांविषयी आस्था ठेवून होत्या. मराठी संतांची ही वाणी मराठी न समजणाऱ्यांसाठी इंग्रजी भाषेतून प्रसिद्ध करण्याचे त्यांनी ठरविले. *पोएट् सेन्टस् ऑफ महाराष्ट्र* या नावाची ती ग्रंथमाला होती. या मालेचा सर्व खर्च ॲबट यांनी केला. या मालेतून पुढील पुस्तके प्रसिद्ध झाली : (१) *भानुदास* (१९२६), (२) *एकनाथ* (१९२७), (३) *भिक्षुगीत* (१९२८), (४) *दासोपंत दिगंबर* (१९२८), (५) *बहिणाबाई* (१९२९), (६) *स्तोत्रमाला, विविध संतांच्या स्तोत्रपर अभंगांचे भाषांतर* (१९२९), (७) *तुकाराम* (१९३०), (८) *रामदास* (१९३२), (९) *भक्तविजय* (खंड–१) व (१०) *भक्तविजय* (खंड–२) (१९३४), (११) *भक्तलीलामृत* (१९३५), (१२) *ज्ञानेश्वर*. या ग्रंथांतून मराठी भक्तिवाङ्मयाचे शब्दशः इंग्रजी भाषांतर व काही ठिकाणी मूळ मराठी उतारेसुद्धा दिलेले आहेत. मराठी संतवाङ्मय सर्वांना उपलब्ध व्हावे, या उदात्त हेतूने त्यांनी हे कार्य केले. यामुळे त्यांना 'महीपतीचा अमेरिकन अवतार' असे संबोधले जाते. *येशूख्रिस्ताचे मरण व पुनरुत्थान* (१९३३), *पवित्र आत्म्याविषयक शुभवर्तमान भाग १ व २* (१९४७) ही यांची आणखी काही पुस्तके.

आपल्या मृत्यूनंतर अग्निसंस्कार केला जावा, आपल्या मृत शरीराची राख आपल्या बागेतील झाडांवर पसरविण्याची त्यांनी योजना केली. महाराष्ट्रातील संतांची स्थळे बघत असताना पायी प्रवास करून व व्रतस्थ राहून ते प्रत्येक ठिकाणी गेले. संतवाङ्मयाचा अभ्यास करीत असतानाच त्यांचे निधन झाले.

लता जाधव

संदर्भ : 'गंगाजळी' – रा. चिं. ढेरे

**ॲलन, (रेव्ह.) डेव्हिड ओ** : (ज. १८०० – मृ. १९ जुलै, १८६३). अमेरिकन ख्रिस्ती धर्मप्रचारक व लेखक. २७ नोव्हेंबर, १८२७ रोजी हिंदुस्थानात आगमन. मिशनऱ्यांनी लिहिलेल्या धार्मिक पुस्तकांचे मुद्रण करणाऱ्या 'बॉम्बे ट्रॅक्ट सोसायटी'चे सेक्रेटरी.

हिंदुस्थानात आल्यानंतर मराठी भाषा शिकून घेऊन बायबलच्या भाषांतराचे काम केले. जुन्या व नव्या करारासह संपूर्ण बायबलचे ह्यांनी केलेले भाषांतर १ मार्च, १८४७ रोजी प्रसिद्ध झाले. ह्याशिवाय *खगोलविद्या* (गार्डन हॉलच्या पुस्तकाची सुधारून वाढविलेली आवृत्ती, १८२९), *उपदेशसार* (१८३०), *शास्त्राचा सारांश* ('उपदेशसारा'ची संक्षिप्त आवृत्ती, १८३४), *तारणारा जो येशू ख्रिस्त याविषयी* (१८३४), *प्रार्थना* (निबंध, १८३४) ही प्रामुख्याने धार्मिक स्वरूपाची पुस्तकेही प्रसिद्ध आहेत.

ग. दे. खानोलकर, रा. बा. बक्षी, लता जाधव

**आंबेकर, बापूजी मार्तंड** : (ज. १८७५, पुणे – मृ. ३० मे, १९३४, पुणे). वृत्तपत्र-लेखक, टीकाकार व संपादक. मूळ गाव वाई. शिक्षण वाई व पुणे येथे. मॅट्रिकनंतर पुढील शिक्षणासाठी बडोद्यास रवाना. प्रतिकूल परिस्थितीमुळे 'सयाजी-विजय' या प्रसिद्ध साप्ताहिकात लेखनाचे काम स्वीकारले. 'वृत्तसार', 'मकरंदमाला' वगैरे नियतकालिकांतूनही त्यांनी लेखन केले. वाई येथील 'मकरंदमाले'तून टोपण नावाने बऱ्याच कादंबऱ्या लिहिल्या. तसेच 'भारतवर्षीय नवरत्नमाले'तील पुष्कळशी चरित्रेही त्यांनी लिहिली.

१९०७ साली पुण्यास आल्यावर नटेश अप्पाजी द्रवीड ह्यांच्या संपादकत्वाखाली निघणाऱ्या 'ज्ञानप्रकाश' या नेमस्त पक्षाच्या मुखपत्राच्या संपादकमंडळात आंबेकरांचा समावेश झाला. 'ज्ञानप्रकाशा'मुळे विविध विषयांवरील शेकडो लेख त्यांनी लिहिले. 'काव्यशास्त्रविनोद' ह्या सदरातील बहुतेक मजकूर त्यांचाच असे. त्यांची लेखनपद्धती मुद्देसूद व जोरदार असे. न. चिं. केळकरांनी लिहिलेले टिळकचरित्र प्रसिद्ध झाल्यावर *टिळक-जीवनरहस्य* (१९२३) ही लेखमाला आंबेकरांनी लिहिली व त्यातून टिळकांचे दोषदर्शन घडविले.

*हरि नारायण आपटे यांचे संक्षिप्त चरित्र* (१९२२) व *हरि नारायण आपटे : काही आठवणी आणि मनोरंजक प्रसंग* (१९३१) ही त्यांची दोन पुस्तकेही उल्लेखनीय आहेत. त्यांची 'पंचतंत्र','हितोपदेश' या ग्रंथातील कथांची सुरस भाषांतरेही प्रसिद्ध आहेत. नेमस्त पक्षातील एक झुंजार मराठी पत्रकार म्हणून त्यांनी केलेले कार्य अत्यंत महत्त्वाचे आहे.

पां. बा. गाडगीळ, सौ. कुंदा केळापुरे

**आंबेडकर, भीमराव रामजी** : ० डॉ. बाबासाहेब आंबेडकर : (ज. १४ एप्रिल, १८९१, महू – परिनिर्वाण ६ डिसेंबर, १९५६). अस्पृश्यांचा नेता म्हणून कार्यास सुरुवात करून भारतीय घटनेचे शिल्पकार आणि बौद्ध धर्माचे अर्वाचीन संजीवक म्हणून विश्वविख्यात झालेले विधिज्ञ, समाजसुधारक, राजकारणपटू, दलितांचे अग्रणी, इतिहाससंशोधक आणि धर्मचिंतक. 'बाबासाहेब' या नावाने प्रसिद्ध. निर्वाणोत्तर भारत सरकारकडून 'भारतरत्न' प्रदान.

रत्नागिरी जिल्ह्यातील आंबवडे हे मूळ गाव. वडील रामजी सपकाळ आणि आई भीमाबाई. वडील ब्रिटिश लष्करात सुभेदार मेजर. महू येथील छावणीत नोकरीला असताना भीमरावांचा जन्म झाला. वयाच्या सहाव्या वर्षीच आईचा मृत्यू. वडील कबीरपंथीय असल्याने लहानपणी भीमरावांवर उत्तम संस्कार झाले आणि विशेषतः संतवाङ्मयाचा आणि धार्मिक ग्रंथांचा परिचय होऊ शकला. निवृत्तीनंतर रामजींनी साताऱ्याला वास्तव्य केल्यामुळे आंबेडकरांचे प्राथमिक शिक्षण साताऱ्याला झाले. माध्यमिक व महाविद्यालयीन शिक्षण त्यांनी मुंबई येथे एल्फिन्स्टन हायस्कुलात व कॉलेजात घेतले; याच काळात रमाबाईंशी विवाह.

शालेय परीक्षेत उत्तम यश मिळविल्याबद्दल कृष्णराव अर्जुन केळूसकर यांनी स्वकृत 'बुद्धचरित्र' विद्यार्थी भीमरावांना बक्षीस दिले. ते वाचून बाबासाहेब बुद्ध आणि त्याच्या धर्माकडे आकृष्ट होऊन, तेव्हापासूनच धर्मचिंतन करू लागले. याच काळात त्यांचा म. जोतीराव फुले यांच्या साहित्याशी आणि सत्यशोधक चळवळीशी परिचय झाला. फुल्यांचे समताविषयक विचार त्यांना मनोमन पटले. बुद्ध, कबीर आणि फुले यांना ते गुरुस्थानी मानू लागले.

दामोदर सावळाराम यंदे आणि केळूसकर यांच्यामार्फत आंबेडकरांचा बडोदा संस्थानचे अधिपती महाराज सयाजीराव गायकवाड यांच्याशी संपर्क आला आणि बडोदे संस्थानची नोकरी व नंतर शिष्यवृत्ती मिळवून ते अमेरिकेतील कोलंबिया विद्यापीठात गेले. तेथे त्यांनी अर्थशास्त्र विषयातील एम्.ए. आणि पीएच्.डी. या पदव्या मिळवल्या. १९१७ साली मायदेशी परत आल्यावर आधी बडोदा संस्थानात आणि मग मुंबईच्या सिडनेहॅम कॉलेजमध्ये प्राध्यापकाची नोकरी केली. १९१९ मध्ये साऊथबरो कमिशनपुढे साक्ष देताना आंबेडकरांचे कर्मवीर विठ्ठल रामजी शिंदे यांच्याशी मतभेद झाले. तेव्हापासूनच अस्पृश्यांच्या मुक्तीचे शिंदेपर्व संपून आंबेडकर पर्वाला सुरुवात झाली, असे म्हणता येईल. आंबेडकरांच्या नव्या नेतृत्वाला करवीर छत्रपती शाहू महाराज यांनी पाठिंबा देऊ केला. १९२० मध्येच अस्पृश्यांच्या चळवळीसाठी आंबेडकरांनी *मूकनायक* हे पाक्षिक सुरू केले. परंतु त्याच वर्षी पुढील शिक्षणासाठी इंग्लंडला प्रस्थान ठेवल्याने त्यांच्या गैरहजेरीत भटकर व घोलप यांना ते पत्र चालू ठेवता आले नाही.

लंडन विद्यापीठाकडून डी.एस्.सी. ही पदवी घेऊन आणि बॅरिस्टर होऊन आंबेडकर १९२४ मध्ये भारतात परतले. एका बाजूला मुंबई उच्च न्यायालयात वकिली आणि दुसरीकडे अस्पृश्यांची चळवळ असा त्यांचा जीवनप्रवास सुरू झाला. याचसाठी त्यांनी *बहिष्कृत हितकारिणी सभे*ची स्थापनाही केली. ठिकठिकाणी परिषदांच्या व्याख्यानांच्या निमित्ताने सर्व महाराष्ट्र ढवळून काढला. अस्पृश्यांना गुलामीत जखडून ठेवणारी गावकीची कामे आणि तदनुषंगिक वतनदारीचा त्याग करून स्वाभिमानाची शिकवण दिली. त्यामुळे अल्पावधीतच अस्पृश्यांचे नेते म्हणून त्यांची प्रसिद्धी झाली. १९२६ मध्ये त्यांची मुंबई इलाख्याच्या विधिमंडळात सदस्य म्हणून नियुक्तीही झाली.

१९२७ मध्ये कुलाबा जिल्ह्यातील महाड येथील चवदार तळ्यातील पाणी पिण्याचा अस्पृश्यांचा हक्क बजावण्यासाठी, त्यांनी केलेला सत्याग्रह सर्व भारतात गाजला. याप्रसंगी केलेले 'मनुस्मृती'चे दहन तर सर्वत्र चर्चेचा विषय ठरले. चळवळीस उठाव मिळावा, या उद्देशाने त्यांनी *बहिष्कृत भारत* हे पाक्षिक सुरू केले. दरम्यान महाराष्ट्रातील ब्राह्मणेतर चळवळीतील नेते अस्पृश्यांच्या प्रश्नाबद्दल पुरेसे क्रियाशील होत नाहीत, हे लक्षात आल्यामुळे आंबेडकर या चळवळीपासून दुरावत गेले. परंतु त्याच वेळी टिळकांचे चिरंजीव श्रीधरपंत यांच्याशी त्यांचे चांगले सख्य झाले. श्रीधरपंत, देवराव नाईक इत्यादींच्या समवेत समाज समता संघाची स्थापना आणि *समता* पाक्षिकाची सुरुवात, या १९२७-२८ च्या घटना आहेत. १९२८ मध्येच मुंबईच्या शासकीय विधी-महाविद्यालयात अर्धवेळ प्राध्यापकी करीत असताना त्यांनी सायमन कमिशनपुढे साक्ष दिली. या कमिशनवर अनेकांनी बहिष्कार टाकलेला असल्यामुळे आंबेडकरांची साक्ष खळबळजनक ठरली. १९३० साली नाशिक येथील काळाराम मंदिरात प्रवेश मिळवण्यासाठी केलेला सत्याग्रहही बराच गाजला. *जनता* हे नवे पत्र त्यांनी सुरू केले.

१९३० मध्ये गोलमेज परिषदेसाठी आंबेडकरांनी इंग्लंडला प्रयाण केले. तेथे त्यांनी अस्पृश्यांची बाजू प्रभावीपणे मांडली व स्वतंत्र मतदारसंघाची मागणी मंजूर करून घेतली. त्यामुळे त्यांचे म. गांधींबरोबर मतभेद झाले. त्यावर महात्माजींनी येरवडा येथील तुरुंगात प्राणांतिक उपोषण सुरू केले. शेवटी आंबेडकरांना त्यांच्याशी इतिहासात *पुणे करार* म्हणून प्रसिद्ध असलेला करार करावा लागला (१९३२).

१९३५ मध्ये आंबेडकरांनी शासकीय विधी-महाविद्यालयाच्या प्राचार्यपदाची सूत्रे हाती घेतली. याच वर्षी त्यांनी आपण हिंदू म्हणून जन्मलो असलो तरी हिंदू धर्मात मरणार नाही, अशा अर्थाची सूचक घोषणा येवला येथे केली. वास्तविक हा सवर्ण सनातन्यांना दिलेला इशाराच होता.

राजकीय हक्क प्राप्त करून घेतल्याशिवाय नुसत्या सामाजिक चळवळीला व्यावहारिक आशय प्राप्त होत नाही, हे आंबेडकर जाणून होते. १९३६ साली त्यांनी स्वतंत्र मजूर पक्षाची स्थापना केली. १९३८ मध्ये प्राचार्यपदाचा राजीनामा देऊन १९३९ मध्ये ते मुंबई विधिमंडळाचे सदस्य म्हणून निवडून आले. १९४२ मध्ये त्यांनी *ऑल इंडिया शेड्यूल्ड कास्ट फेडरेशन*ची स्थापना केली. याच वर्षी व्हाइसरॉयच्या कार्यकारिणीत त्यांची मजूरमंत्री म्हणून नियुक्ती झाली. १९४६ पर्यंत त्यांनी हे खाते सांभाळले. दरम्यान १९४५ मध्ये पीपल्स एज्युकेशन सोसायटीची स्थापना करून ते शैक्षणिक चळवळीतही पडले. १९४६ हे मुंबईच्या सिद्धार्थ कॉलेजचे स्थापना वर्ष आहे. याच वर्षी ते बंगालमधून घटनापरिषदेचे सदस्य म्हणून निवडून आले. १९४७ मध्ये भारत स्वतंत्र झाला तेव्हा ते कायदामंत्री आणि घटनेच्या मसुदा समितीचे अध्यक्ष झाले. भारताची घटना लिहिण्यात आंबेडकरांचा मोठा वाटा आहे. अस्पृश्यता-निवारणाचा कायदा करण्याचे श्रेय त्यांना मिळाले, हे उचितच म्हणावे लागेल.

दरम्यान १९४८ मध्ये बाबासाहेबांनी डॉ. शारदा कबीर यांच्याशी दुसरा विवाह केला. १९५० मध्ये त्यांनी औरंगाबाद येथे मिलिंद महाविद्यालय सुरू केले.

आंबेडकरांनी तयार केलेले हिंदू कोड बिल काँग्रेसश्रेष्ठींना पसंत नसल्यामुळे ते संसदेत मंजूर होऊ शकले नाही. इतरही काही प्रश्नांबद्दल त्यांचे पं. नेहरू प्रभृतींशी मतभेद होऊ लागले, तेव्हा १९५१ मध्ये त्यांनी राजीनामा देऊन मंत्रीपद सोडले.

आपल्या लाखो अनुयायांसह बौद्धधर्माचा स्वीकार ( १४ ऑक्टोबर १९५६ ) ही आंबेडकरांच्या जीवनातील शिखरघटना होय. वास्तविक बौद्ध धर्माविषयीचे त्यांचे आकर्षण जुनेच होते. केळुसकरांच्या बुद्धचरित्राच्या वाचनापासून त्यांनी सुरू केलेला बौद्धधर्माचा अभ्यास आणि एकूणच धर्मांचा तौलनिक अभ्यास कधीच खंडित झाला नाही. धर्मांतराचा विचारही त्यांच्या मनात पूर्वीपासूनच घोळत होता. दिवसेंदिवस तो उत्क्रांत व परिपक्व होत गेला. अगोदर आपल्या दुःस्थितीवरील एक तोडगा म्हणून अस्पृश्यांनी धर्मांतर करावे असे म्हणणारे आंबेडकर, भारताने स्वीकारलेल्या लोकशाही या राजकीय प्रणालीशी सुसंगत असणारा बौद्ध धर्म जातिग्रस्त हिंदूंनीच स्वीकारण्याची गरज आहे, असे म्हणू लागले आणि शेवटच्या टप्प्यात तर पाश्चात्त्य व्यक्तिवादी भांडवलशाही समाजरचना आणि रशिया–चीनमधील समाजवादी परंतु व्यक्तिस्वातंत्र्याचा संकोच करणारी प्रणाली यांना बौद्ध धर्मच पर्याय देऊ शकतो, असे त्यांना वाटू लागले. त्यांनी केलेली बौद्धधर्माची फेरमांडणी या सूत्राला अनुलक्षूनच केलेली असल्याचे दिसून येते.

समाजकारण आणि राजकारण या दोन्ही आघाड्यांवर लढत असताना आंबेडकरांनी केलेला व्यासंग आणि ग्रंथरचना थक्क करणारी आहे. त्यांचे ग्रंथलेखन सरसकट इंग्रजीमध्ये आहे. हे लिखाण (भाषणांसह) प्रसिद्ध करण्याचे कार्य महाराष्ट्र शासनाने हाती घेतलेले असून आतापर्यंत ११-१२ खंड प्रकाशितही झालेले आहेत. अर्थशास्त्र, इतिहास, समाजविज्ञान, भारतविद्या, राज्यशास्त्र असे चौफेर लेखन बाबासाहेबांनी केले. त्यातील विशेषतः जातिसंस्थेविषयक लिखाण हे नावीन्यपूर्ण आणि धक्का देणारे आहे. त्यात *कास्टस् इन इंडिया : देअर मेकॅनिझम, जेनेसिस अँड डेव्हलपमेंट* सारखा शोधनिबंध, *ॲनिहिलेशन ऑफ कास्टस्*, *हू वेअर दि शूद्राज ?*, *दि अनटचेबल्स* इ. पुस्तकांचा समावेश होतो. भारताचा इतिहास लिहिण्याची नवीन दिशा त्यांच्या ग्रंथांमधून सूचित होते. विशेषतः अगोदरच्या काळातील ब्राह्मण आणि क्षत्रिय व नंतरच्या काळातील ब्राह्मण आणि बौद्ध यांच्यामधील संघर्ष हे सूत्र घेऊन त्या अनुरोधाने संशोधन केले तर काही नवी तथ्ये हाती लागतात, हे त्यांनी सिद्ध केलेले आहे. भारताचा इतिहास लिहिणाऱ्यांनी बौद्ध कालखंडाची केलेली घोर उपेक्षा त्यांनी अचूक दाखवून दिलेली आहे. तत्कालीन ज्ञानव्यवहाराच्या आवश्यकतेमुळे आंबेडकरांना इंग्रजीमधून ग्रंथलेखन करावे लागले. परंतु मराठी भाषा बोलणाऱ्या अस्पृश्यांचे प्रश्न घेऊन केलेल्या चळवळीची गरज म्हणून आंबेडकरांनी अनेक मराठी वृत्तपत्रे चालविली व त्यातून मराठी लेखन केले. पत्रकार या नात्याने त्यांनी केलेले मराठी लेखन अत्यंत महत्त्वाचे असून त्याचा स्वतंत्र विचार करणे आवश्यक ठरते.

३१ जानेवारी, १९२० रोजी त्यांनी पांडुरंग भटकरांकरवी सुरू केलेले *मूकनायक* हे आंबेडकरांचे पहिले वृत्तपत्रीय अपत्य होय. या पाक्षिकावर अभिप्राय रत सोडाच परंतु पैसे घेऊन जाहिरात छापण्याचेही 'केसरी'सारख्या तत्कालीन पत्रांनी टाळले, यावरून आंबेडकरांचे कार्य किती बिकट होते हे लक्षात येईल. पूर्ववयात केलेला संतवाङ्मयाचा व्यासंग आणि समकालीन मराठी साहित्याचे वाचन यामुळे, अगदी पहिल्यापासूनच आंबेडकरांची लेखणी प्रौढ आणि भारदस्त वाटते. *मूकनायक*च्या शीर्षस्थानी संत तुकारामांचा 'काम आता करू धरूनिया भीड' या अभंगाचे दोन चरण उद्धृत केलेले होते. पहिल्या अंकातच तरुण आंबेडकरांनी त्या काळी परम प्रतिष्ठा पावलेल्या लोकमान्य टिळकांना सलामी दिलेली आहे. ब्राह्मण आणि ब्राह्मणेतर यांच्याशिवाय बहिष्कृत हा हिंदू समाजातील एक महत्त्वाचा घटक असून, त्याची स्वतंत्रपणे दखल घेण्याची आवश्यकता आंबेडकरांनी हिरीरीने प्रतिपादित केली. या पवित्र्याला मॉंटफर्ड सुधारणांची पार्श्वभूमी होती. *मूकनायक*च्या जन्मानंतर अवघ्या पाचसहा महिन्यांतच आंबेडकरांनी उच्च शिक्षणासाठी परदेशी प्रस्थान ठेवल्याने (जुलै, १९२०) त्यांच्या गैरहजेरीत हे पत्र (१९२३ मध्ये) बंद पडले.

३ एप्रिल, १९२७ रोजी सुरू केलेले *बहिष्कृत भारत* हे आंबेडकरांचे दुसरे पत्र होय. परदेशातून परत आल्यानंतर आंबेडकरांनी अस्पृश्यांचा 'पुनश्च हरि ॐ' केलेला होताच, तो आता त्यांनी वृत्तपत्राचाही केला. महाड येथील चवदार तळ्याच्या सत्याग्रहाची आणि मनुस्मृती दहनाची तत्कालिक पार्श्वभूमी बहिष्कृत भारताला लाभली होती. परंतु त्याआधी १९२४ सालापासून *बहिष्कृत हितकारिणी सभा* कार्यरत होतीच.

*बहिष्कृत भारत*मध्ये 'ज्ञानेश्वरी'मधील तीन ओव्या शीर्षविरुद्ध म्हणून उद्धृत केल्या जात. अनियमितपणे चालणारे हे पाक्षिक पुढे पुरेशा आर्थिक बळाअभावी नोव्हेंबर १९२९ मध्ये बंद पडले तरी त्याआधी त्याने इतिहास घडवला होता, हे विसरता कामा नये. *बहिष्कृत भारत*मधील आंबेडकरांचे अग्रलेख मराठी भाषेवरील लेणी ठरावीत इतके उत्कृष्ट वठले आहेत. जातिसंस्थेच्या आणि अस्पृश्यतेच्या समर्थकांशी आंबेडकरांनी जे बुद्धिनिष्ठ युक्तिवाद केले ते फार महत्त्वाचे आहेत.

*जनता* पत्राचेच *प्रबुद्ध भारत* असे नामांतर ४ फेब्रुवारी १९५६ साली करण्यात आले. १४ ऑक्टोबर, १९५६ चे धर्मांतर डोळ्यापुढे ठेऊनच त्यांनी हे नामांतर केलेले असावे. सारा भारत बौद्ध बनवीन या त्यांच्या घोषणेशीही ते सुसंगतच आहे.

आंबेडकर मराठी भाषेतून स्वतंत्र ग्रंथलेखन करते तर ते मराठीला खचितच भूषणभूत आणि प्रेरक ठरले असते, असे आपण निश्चितपणे म्हणू शकतो.

सदानंद श्रीधर मोरे

संदर्भ : (१) 'डॉ. बाबासाहेब आंबेडकर रायटिंग्ज अँड स्पीचेस', खंड १ – ११/१२, शिक्षण विभाग – महाराष्ट्र शासन. (२) मून, वसंत (संपा.) – "डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे 'बहिष्कृत भारत' व 'मूकनायक'" शिक्षण विभाग, महाराष्ट्र शासन, मुंबई, १९९०. (३) गांजरे, मा. फ. (संपा.), 'डॉ. बाबासाहेब आंबेडकरांची भाषणे', खंड १–७, अशोक प्रकाशन नागपूर. (४) कांबळे, अरुण – 'जनता पत्रातील लेख', पॉप्युलर प्रकाशन आणि मुंबई विद्यापीठ मराठी विभाग, मुंबई १९९२.

**आगटे, वासुदेव नीलकंठ** : (ज. १८९३ – मृ. १४ नोव्हेंबर, १९३७). नाटककार. सातारा येथे वकिलीचा व्यवसाय. यांची *सं. दामाजी* ( १९०५ ), *सं. पुंडलिक*, *सं. गोपीचंद* ह्या प्रारंभीच्या नाटकानंतरची *सं. महानंदा* ( १९१५ ) व *सं. स्त्रीसाम्राज्य* ( १९२४ ) ही नाटके रंगभूमीवर विशेष गाजली. तत्कालीन समाजाची अभिरुची लक्षात घेऊन त्यांनी आपल्या संगीत नाटकांची रचना केली. स्त्रीशिक्षणामुळे पुरुषांच्या परंपरागत स्वातंत्र्याला बंधने पडल्याने स्त्रीसाम्राज्यात पुरुषांची कशी अनुकंपनीय अवस्था होते, याचे विनोदी चित्रण 'सं. स्त्रीसाम्राज्या'त पाहवयाला मिळते. ह्याशिवाय त्यांची *विमुकला सरदार* ( १९२५ ) ही चित्तवेधक रहस्यकथा व *नवकोट नारायण* ( १९३० ) ही कादंबरीही प्रसिद्ध आहे.

उषा टाकळकर, चंद्रकांत कुलकर्णी

**आगरकर, गोपाळ गणेश** : (ज. १४ जुलै, १८५६, टेंभू, जि. सातारा – मृ. १७ जून, १८९५, पुणे). विवेकनिष्ठ राष्ट्रवादी वृत्तीचे निबंधकार. 'केसरी'चे पहिले संपादक (१८८१–८७) व

*सुधारक* पत्राचे संस्थापक व संपादक (१८८६–९५). कट्टे बुद्धिप्रामाण्यवादी व व्यक्तिस्वातंत्र्यवादी. समाजसुधारणेचे महाराष्ट्रातील पहिले पुरस्कर्ते. मूळ गाव आगरी (जि. रत्नागिरी). शालेय शिक्षण कऱ्हाड व अकोला येथे. महाविद्यालयीन शिक्षण पुणे येथे. एम्.ए. (१८८०). शिक्षण बहुतांशी बक्षिसे व शिष्यवृत्तींच्या आधारावर. 'न्यू इंग्लिश स्कूल' (१८८०), 'डेक्कन एज्युकेशन सोसायटी' (१८८४), फर्ग्युसन कॉलेज (१८९५) ह्या पुण्यातील शिक्षण संस्थांच्या उभारणीत सहभाग. प्रारंभी शिक्षक, प्राध्यापक व फर्ग्युसन कॉलेजचे दुसरे प्राचार्य (१८९१–९५). आगरकर व टिळक हे दोघेही पुण्याच्या डेक्कन कॉलेजमध्ये सहाध्यायी होते. विष्णुशास्त्री चिपळूणकरांच्या स्वार्थत्यागी वृत्तीने प्रभावित होऊन हे दोघेही पुढे त्यांचे सहकारी बनले. काही काळानंतर मात्र लो. टिळक व आगरकर यांच्यात मतभेद झाले आणि लो. टिळकांनी प्रखर राष्ट्रवादाचा तर आगरकरांनी मूलगामी सुधारणावादाचा पुरस्कार केला.

आगरकरांनी शाळेत असतानाच लेखनास सुरुवात केली. अकोल्याच्या 'वऱ्हाड - समाचार' या पत्रातून आलेला त्यांचा 'एकत्र हिंदु कुटुंबापासून फायदे - तोटे', हा त्या वेळचा एक बक्षीसपात्र निबंध. चिपळूणकरांच्या पुढाकाराने 'केसरी' व 'मराठा' ही अनुक्रमे मराठी व इंग्रजी वृत्तपत्रे निघाल्यानंतर, 'केसरी'चे पहिले संपादक म्हणून आगरकरांची नियुक्ती झाली. आगरकर व लो. टिळक यांनी कोल्हापूर-संस्थानचे कारभारी बर्वे ह्यांच्यावर केलेल्या टीकेमुळे बर्व्यांनी उभयतांवर फिर्याद दाखल केली. या प्रकरणी या दोघांना शिक्षा होऊन मुंबईच्या डोंगरी येथील तुरुंगात ठेवण्यात आले. *डोंगरीच्या तुरुंगातील आमचे एकशे एक दिवस* (१८८२) हे आगरकरांचे पहिले प्रकाशित पुस्तक आत्मलेखन दृष्ट्याही महत्त्वाचे आहे. त्यांनी शेक्सपियरच्या 'हॅम्लेट' नाटकाचे 'विकार - विलसित' (१८८३) हे रूपांतर त्या तुरुंगवासातच पूर्ण केले. मराठीत शेक्सपियरच्या नाटकांची अनेक भाषांतरे - रूपांतरे झाली. परंतु शेक्सपियरची महत्ता समजून घेण्याच्या दृष्टीने आपल्या या अनुवादाला आगरकरांनी जी प्रस्तावना लिहिली आहे, ती अनन्यसाधारण महत्त्वाची आहे. अनुवाद प्रक्रियेतील समस्यांचाही ऊहापोह या प्रस्तावनेत त्यांनी मर्मज्ञपणे केल्याचे आढळते.

'केसरी' मधील त्यांचे सामाजिक तसेच वाङ्मयीन विषयांवरील निबंधही वाचनीय आहेत. *केसरीतील निवडक निबंध, भाग १–२* (१८८७, १८८८) हा त्यांचा निबंधसंग्रह प्रसिद्ध आहे. 'केसरी' पत्राच्या धोरणावरून चालकांशी मतभेद झाल्यामुळे आगरकरांनी *सुधारक* हे आपले स्वतंत्र वर्तमानपत्र काढले व स्वातंत्र्य - समता - बंधुता या मूल्यत्रयींवर आधारलेल्या, सर्वंकष स्वरूपाच्या सुधारणावादी विचारसरणीला मुक्त अवसर मिळवून दिला.

*सुधारका*तील त्यांच्या निबंधामध्ये स्थूलपणे पुढील प्रकार आढळतात. (१) संशोधनात्मक व ऐतिहासिक स्वरूपाचे निबंध. उदा., 'देवतोत्पत्ती', 'भारतीय कलांचे पुराणत्व'. (२) लोकजीवनातील निरीक्षणावर आधारित उपयुक्ततावादी, सौंदर्यवादी दृष्टीने लिहिलेले निबंध. उदा., 'सोवळ्याची मीमांसा', 'जोडा'. (३) सामाजिकदृष्ट्या मतभेदाच्या विषयांवरील निबंध. उदा., संमतिवयाचे बिल. (४) स्त्रीजीवनाच्या अनेक पैलूंचा सहानुभूतीने विचार करणारे निबंध. 'स्त्रियांचा पेहेराव', 'विवाहनिराकरण अथवा घटस्फोट', 'स्वयंवर', 'स्त्रियांना शिक्षण द्यावे व तेही एकत्र द्यावे'–इ. स्त्रियांच्या व्यक्तित्वाच्या सर्वांगीण विकासाची या लेखनामागील तळमळ जिवंत होती. त्यामुळेच स्त्रियांच्या सुधारणेला अनुकूल वातावरण निर्माण करण्याचे श्रेय या लेखनाला मिळते.

त्यांचे हे लेखन जॉन स्टुअर्ट मिल आणि हर्बर्ट स्पेन्सर ह्यांच्या विचारसरणीचा ठसा असलेले आहे. सर्वंकष बुद्धिप्रामाण्यवाद हे आगरकरांच्या विचारसृष्टीचे आधारभूत तत्त्व होय. त्यामुळे त्यांनी आपल्या समाजाला अंतर्मुख होणे भाग पाडले आणि कालबाह्य व निरर्थक रूढींवर चौफेर हल्ला चढविला. नीतिमत्तेसाठी ईश्वरनिष्ठा आवश्यक असते, असे त्यांना वाटत नव्हते. यातूनच त्यांचा 'अज्ञेयवाद' आकाराला आला. व्यक्तिस्वातंत्र्य हे त्यांनी पुरस्कारिलेले दुसरे मूल्य. त्यांचा व्यक्तिस्वातंत्र्यवाद जीवनाच्या सर्व अंगांना व्यापणारा होता. त्यामुळे त्यात सामाजिक स्वातंत्र्याइतकीच राजकीय व आर्थिक स्वातंत्र्याचीही तळमळ होती. 'मनुष्यतेचे ऐहिक सुखवर्धन' हे त्यांच्या जीवननिष्ठेचे आणखी एक पायाभूत तत्त्व. मात्र त्यांच्या ऐहिक सुखाच्या कल्पनेत आत्मिक व बौद्धिक सुखांचाही समावेश होता. *सुधारक*मधून त्यांची ही जीवनदृष्टी प्रभावीपणे व्यक्त होते.

आपल्या सुधारणाविषयक मतांसाठी त्यांना व्यवहारात मोठ्या संघर्षाला तोंड द्यावे लागले. सरकारकडून संमतिवयाचा कायदा पास करून घेण्याबाबतच्या त्यांच्या भूमिकेमुळे त्यांना सनातन्यांच्या तीव्र रोषास तोंड द्यावे लागले.

त्यांच्या सुधारणावादी बुद्धिप्रामाण्यवादाचा प्रभाव तत्कालीन व तदनंतरच्या कथा-कादंबरी, काव्य, नाटक इ. साहित्यावर पडलेला दिसतो. पाश्चात्त्य विद्या इंग्रजीतून मराठीत आणताना आगरकरांनी बरेच नवीन मराठी पर्याय शब्द तयार करून अभिव्यक्तीच्यादृष्टीने मराठी भाषेला समृद्ध केले. तसेच *वाक्यमीमांसा* (१८८८) हे त्यांचे पुस्तकही मराठीतील या विषयावरील पहिले पुस्तक म्हणून महत्त्वाचे आहे. इंग्रजीच्या संपर्काने मराठी गद्याला जे इंग्रजी वळण येत चालले होते ते लक्षात घेऊन आगरकरांनी त्यात मराठी वाक्यरचनेचा नव्याने अभ्यास केला आहे.

वि. ह. कुलकर्णी, व. कृ. वऱ्हाडपांडे, नीलिमा गुंडी

संदर्भ : (१) 'मा. दा. आळतेकर, गो. ग. आगरकर चरित्रात्मक निबंध,' १९३०, पुनर्मुद्रण १९९३. (२) वि. स. खांडेकर, 'आगरकर-व्यक्ति आणि विचार'– १९३२. (३) वि. बा. आंबेकर, 'निबंध वाङ्मय मराठी वाङ्मयाचा इतिहास' खं. ५, भाग–१ (संपा. रा. श्री. जोग), १९७३.

**आगाशे, गणेश कृष्ण :** (ज. १८६४, कोल्हापूर – मृ. ६ फेब्रुवारी, १९२७, मिरज). ज्ञानेश्वरीचे मर्मज्ञ विवेचक, निबंधकार व नाट्यसमीक्षक या नात्याने हे प्रसिद्ध आहेत. शिक्षण कोल्हापूर व पुणे येथे. बी.ए., एलएल्.बी. काही काळ शिक्षक. नंतर मिरज संस्थानचे दिवाण.

नाटक, संगीत, शिक्षण, इतिहास, अध्यात्म अशा अनेक विषयांत यांना रस होता. वासुदेवशास्त्री खरे यांच्या निधनानंतर मिरजेत खरे स्मारक मंदिर उभारण्यात यांचा पुढाकार होता.

प्रा. विजापूरकर यांच्या 'ग्रंथमाले'ने यांना लेखनासाठी प्रोत्साहन दिले. *कीटकसृष्टी* (इंग्रजी ग्रंथाधारे, १९००), *पाश्चात्त्य राष्ट्रांची सामाजिक उत्क्रांती* (बेंजामिन कोडकृत सोशल इव्होल्यूशनच्या आधारे, १९०१) ही पुस्तके व *काशियात्रा* हा यांचा निबंध 'ग्रंथमाले'तून प्रसिद्ध झाला. ह्याच सुमारास यांचे 'चित्रमयजगता'तून काही कथा, शब्दचित्रे व इतरत्र काही स्फुट लेख प्रसिद्ध झाले. 'रंगभूमी' मासिकातून कोल्हटकरांच्या 'मतिविकार' नाटकावर आणि खाडिलकरांच्या 'विद्याहरणा'वर लिहिलेले यांचे टीकालेख बरेच गाजले. प्रत्यक्ष नाटककारांनीही हे लेख वाचल्यावर आगाशे ह्यांच्या मर्मज्ञतेचे व रसिकतेचे कौतुक केले.

*श्री ज्ञानेश्वरीटीका* हा त्यांचा महत्त्वाचा ग्रंथ. हा ग्रंथ १९२४ ते १९३३ या काळात सहा भागांत प्रकाशित झाला. ग्रंथाचा अर्थ लावून वाचकाला त्याचा स्वेच्छेने आस्वाद घेता यावा, अशा दृष्टीने ज्ञानेश्वरीवर लिहिलेली ही पहिलीच आधुनिक टीका. या ग्रंथाचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे, टीकेला जोडलेला उपसंहार. ज्ञानेश्वरकालीन धार्मिक, सामाजिक व राजकीय परिस्थितीचे विश्लेषण करून

ह्या टीकाग्रंथाच्या निमित्ताने ज्ञानेश्वरीच्या अभ्यासाची एक नवी दिशा दाखविणाऱ्या लेखकांत, आगाशे यांचा सिंहाचा वाटा आहे.

उषा टाकळकर, विमल भालेराव

**आगाशे, गणेश जनार्दन** : ० ग. ज. आ. : (ज. १८५२, पुणे – मृ. १३ जुलै, १९१९, पुणे). कवी, निबंधकार, साहित्यसमीक्षक, माध्यमिक व महाविद्यालयीन शिक्षण पुणे येथे. बी.ए. झाल्यानंतर सरकारी हायस्कूलमध्ये शिक्षक व मुख्याध्यापक. काही दिवसांसाठी पुण्याच्या डेकन कॉलेजमध्ये इंग्रजीचे प्राध्यापक म्हणून नियुक्ती.

त्याच्या *अर्थशास्त्राची मूलतत्त्वे* (मिसेस फॉसेटकृत इंग्रजी ग्रंथाधारे, १८९१) या ग्रंथाला दक्षिणा प्राइझ कमिटीचे २०० रु.चे पारितोषिक मिळाले. यात फॉसेटबाईंच्या पुस्तकातील काही भाग वगळले आहेत, तर हिंदुस्थानास लागू असे काही नवीन भाग घातले आहेत. *बाल-शिक्षण* (फ्रोबेलच्या इंग्रजी ग्रंथाधारे, १८९२), *सुंदरेची संकाल* (गोष्ट, १८९२), *बिरुदावली* (काव्य, १९०२), *महाराष्ट्र वाङ्मयाचे पर्यालोचन* (निबंध, १९०२), *महाराष्ट्र वाङ्मय* (निबंध, १९०३), *राज्यारोहण* (काव्य, १९१२), *बाष्पांजली* (काव्य, १९३६) ही ह्यांची प्रकाशित पुस्तके. *बाष्पांजली* ही आपल्या राजाराम या अकाली मृत झालेल्या मुलास उद्देशून लिहिलेली ३३५ श्लोकांची विलापिका विशेष उल्लेखनीय आहे. यात त्यांच्या मुलाचे गुणवर्णन, स्वतःच्या अंतःकरणातील शोकभावना व व्यथित पत्नीचे सांत्वन आढळते. *बाष्पांजलीत* केवळ शोकच नसून उपनिषदे, गीता इत्यादी तत्त्वदर्शनपर ग्रंथांच्या अध्ययनाने येणारा विवेकही प्रगट झाला आहे. मराठीतील एक उत्कृष्ट करुण विलापिका म्हणून *बाष्पांजली*चा उल्लेख केला जातो. इंग्रजी, मराठी व संस्कृत या तिन्ही भाषांमध्ये ते कविता करीत. त्यांची मराठी कविता जुन्या वळणाची असून 'काव्यरत्नावली' व 'विविधज्ञानविस्तार' मासिकांतून त्यांची काही स्फुट कविता प्रकाशित झाली आहे. एका फ्रेंच ग्रंथाच्या आधारे लिहिलेली ह्यांची *अर्थशास्त्र-वाचन पाठमाला* या शीर्षकाची एक संवादात्मक लेखमाला 'विविध ज्ञानविस्तार'मधून (पुस्तक-२२, २३, २४, २५) प्रकाशित झाली. इंदूर येथे भरलेल्या मराठी साहित्य संमेलनाचे (१९१७) अध्यक्षपद यांनी भूषविले होते.

गं. दे. खानोलकर, विमल भालेराव

**आगासकर, जनार्दन वासुदेव** : ० जनार्दन वासुदेवजी : (ज. नोव्हेंबर, १८१५ – मृ. १८ जुलै, १८९४, मुंबई). 'दर्पण' ह्या पहिल्या मराठी साप्ताहिकाच्या संपादकांपैकी एक.

'द बॉम्बे नेटिव्ह एज्युकेशन सोसायटी'च्या सरकारी शाळेत शिक्षण. दादोबा पांडुरंग, फर्दुनजी नौरोजी, बाळ गंगाधरशास्त्री, भोडोबा कान्होबा ही त्यांची सहाध्यायी मंडळी.

मुंबईच्या सेक्रेटेरिएटमधील पर्शियन डिपार्टमेंटमध्ये ट्रान्सलेटर (१८३५). त्यानंतर रेव्हेन्यू खात्यात चीफ क्लार्क. याचवेळी वकिलीची सनद मिळवली. १८४६ मध्ये सुरत येथे प्रिन्सिपल, सदर अमीन (फर्स्ट क्लास सबॉर्डिनेट जज्ज) म्हणून नेमणूक. पुढे बेळगाव, धुळे, अहमदनगर, पुणे व मुंबई येथे न्यायदानाचे काम. मुंबई हायकोर्टात बदली न्यायमूर्ती म्हणून हंगामी नेमणूक (१६ जून, १८६४). हे पद मिळविणारे आगासकर हे पहिले नेटिव्ह. यांच्या कार्यकुशलतेमुळे त्यावेळेचे हंगामी सर न्यायाधीश जोसेफ अर्नोल्ड यांनी त्यांच्या कायमच्या नेमणुकीसाठी गव्हर्नरकडे शिफारस केली.

मुंबई विद्यापीठाचे फेलो. हायकोर्टाच्या प्लीडर परीक्षेचे परीक्षक. ह्यांनी इंग्रजीतील काही कायदेकानूंचे मराठीत भाषांतर केल्याचे उल्लेख, पण ते कोणत्या ह्याचा नीटसा शोध अद्यापि लागलेला नाही. 'दर्पण' पत्राच्या चालक मंडळातही ते होते. अव्वल इंग्रजी काळातील पहिल्या उच्चशिक्षितांच्या पिढीतील एक महत्त्वाचे व्यक्तिमत्त्व म्हणून जनार्दन वासुदेवजींचे नाव घेतले जाते.

उषा टाकळकर, विमल भालेराव

**० आग्या वेताळ** : पहा जवळकर, दिनकर शंकर

**आचरेकर, गंगाराम भिकाजी** : (ज. १८८५, आचरे, ता. मालवण, जि. रत्नागिरी – मृ. ३ जून, १९३९, पुणे). संगीतशास्त्राचे लेखक. संस्कृत ग्रंथातील स्वरवर्णनांचा अर्वाचीन मताशी मेळ घालू पाहणारा व त्या दृष्टीने बाजाच्या पेटीत सुधारणा करू इच्छिणारा चिकित्सक व्यासंगी, संगीतज्ञ, तंतुवाद्यविशारद.

शालेय शिक्षणानंतर धृपद, ख्याल गायकीचे आणि मृदंग, बीन, सतारीचे शिक्षण. १९०५–०९ राजकुमार कॉलेज, राजकोट येथे संगीतशिक्षण. 'पुणे ट्रेनिंग कॉलेज फॉर मेन'मध्ये संगीतशिक्षक (१९०९–३३). कृ. ब. देवलांच्या स्वरविषयक प्रयोगाधारित सिद्धान्ताने भारतीय संस्कृती व भौतिक विज्ञान यांच्याशी संबद्ध असलेल्या विचारवंतांमध्ये माजलेली खळबळ आणि त्यांचे वाद, या क्षेत्रात लक्ष घालून आचरेकरांनी एक नवीन कल्पना मांडली. प्राचीन ('मार्गी') मूल स्वरसप्तकातील दुसऱ्या क्रमांकाचा वृषभ हा स्वर त्यालाच अर्वाचीन ('देशी') स्वरसप्तकात पहिल्या क्रमांकाचा षड्जनामक स्वर मानले गेले, ही ती कल्पना. या कल्पनेचा त्यांनी बराच पाठपुरावा केला. भारतीय संगीतात अवश्य, अपरिहार्य असे सूक्ष्मांतरभेद बाजाच्या पेटीत उमटावे, यासाठी देवल क्रेमेंटेसची व्यवस्था आपल्या मतानुसार बदलून *श्रुतिमंजूषा* ही वादनसुलभ हातपेटी त्यांनी बनवली (१९२८).

आचरेकरांचे बरेचसे लेखन स्फुटलेखस्वरूपाचे आहे. *शालेय संगीत पद्धती*चे सात भाग (१९२६), *शालोपयोगी प्रार्थनागीत-माला* (१९३१) व *शास्त्रीय संगीत रागपद्धती* (दोन भाग, १९३२) ही त्यांची शैक्षणिक ग्रंथनिर्मिती. त्यांच्या संशोधनाचे सर्व सार *भारतीय संगीत स्वरशास्त्र : प्राचीन शुद्धकाकल्यान्तर मत्सरीकृता मूर्च्छना अर्थात आधुनिक केदार थाट* (गुच्छ १ व २–१९३३) या पुस्तकात आले आहे. (१) *शालेय संगीत पद्धति-पुष्प ७ एकच*, (रागतालासह स्वरमाला), १९२६, पुणे. (२) *शालोपयोगी प्रार्थना-गीतमाला*; १९३१ पु. २. (३) *शास्त्रीय संगीत रागपद्धती : द्वितीय गुच्छ-मत्सरीकृतमूर्च्छना* (प्रचलित केदार थाट) *रागविलक्षण गीतावलि*, १९३३, श्रीगणेश प्रेस, पुणे.

शरच्चंद्र विष्णु गोखले, विमल भालेराव

**आचार्य (कालगावकर), कृष्णाजी विष्णु** : (ज. १८५७, कालगाव, जि. सातारा – मृ. १७ एप्रिल, १९१९, पुणे). बखरी व ऐतिहासिक कागदपत्रांचे संग्राहक. ऐतिहासिक टिपणांचे लेखक. शिक्षण कालगाव, सातारा व पुणे येथे. प्राथमिक शाळेत शिक्षक.

सेवानिवृत्तीनंतर (१९१३) जुन्या ऐतिहासिक कागदपत्रांचे संशोधन व संग्रह करून त्याविषयीचे अनेक लेख यांनी भारत इतिहास संशोधक मंडळाच्या नियतकालिकातून व इतर मासिकांतून प्रसिद्ध केले. द. ब. पारसनीस यांच्या 'भारतवर्ष' व 'इतिहाससंग्रह' ह्या दोन मासिकांतून *जुन्या ऐतिहासिक गोष्टी* (१९००) या सदराखाली त्यांचे बरेच लेख गोष्टीरूपाने प्रसिद्ध झाले. 'काव्येतिहाससंग्रह', 'विविधज्ञानविस्तार' व 'शालापत्रक' यांतूनही काही लेख प्रकाशित.

आचार्यांनी इ. स. १८६५ ते १८८० पर्यंतच्या कालातील आत्मचरित्र प्रकाशित केले आहे (विज्ञावि, पृ. ५०, अं. ९). त्यात त्यांनी आपल्या ऐतिहासिक कागदपत्रांच्या संग्राहक वृत्तीची जोपासना कशी झाली, याचा आढावा घेतला असून ह्या अनुषंगाने आपले शिक्षण, तत्कालिक शैक्षणिक वातावरण इत्यादींचे रेखीव चित्र काढले आहे.

उषा टाकळकर, विमल भालेराव

**आचार्य, बळीराम जनार्दन** : (ज. ३० डिसेंबर, १८८२ – मृ. १७ जुलै, १९५०). अध्यात्मपर पुस्तकांचे कर्ते. वास्तव्य मुंबई येथे. बहुजनसमाजातील धर्मविषयक अनास्था पाहून ग्रंथनिर्मितीची प्रेरणा. *महर्षि याज्ञवल्क्यांची भविष्यवाणी* (१९२१) हे याज्ञवल्क्यांच्या संन्यासगीतेतील ५ व्या अध्यायातील उपदेशाचे सविस्तर विवेचन करणारे पुस्तक, वेदान्तविषयक अध्यात्मविचाराचे सुबोध विवेचन करणारा *मनोविलास* (१९२३) हा ग्रंथ आणि याज्ञवल्क्यांच्या *श्रीसंन्यास गीतेचे* सार्थ व सटीप विवरण करणारा ग्रंथ (१९२५) ही ह्यांची साहित्यनिर्मिती. केळवे-माहीम (जि. ठाणे) येथील सत्पुरुष केशवनाथ महाराज यांचे छोटेसे पारंपरिक चरित्रही त्यांनी लिहिले आहे.

उषा टाकळकर, मीनल निसळ

**आजगावकर, (महाराष्ट्र-भाषाभूषण) जगन्नाथ रघुनाथ** : (ज. १६ ऑगस्ट, १८७९, वराड, ता. मालवण, जि. रत्नागिरी– मृ. २७ ऑगस्ट, १९५५, मुंबई). 'महाराष्ट्र–कविचरित्र'कार. मूळ गाव सावंतवाडी संस्थानातील आजगाव. शिक्षण जेमतेम इंग्रजी पाच इयत्तांपर्यंत. चरितार्थासाठी मुंबई, पुणे, कोल्हापूर अशा ठिकाणी अनेक प्रकारच्या नोकऱ्या. काही काळ पुण्याच्या 'ज्ञानप्रकाशा'त उपसंपादक. नंतर मुंबईस 'इंद्रप्रकाश'च्या संपादकीय विभागात (१९११) नोकरी. *ज्ञानांजन* नावाच्या मासिकाचे चालक. अच्युतराव कोल्हटकरांचे 'संदेश' हे पत्र, तसेच 'सुधाकर' व 'रणगर्जना' ह्या पत्रांचे अप्रकट संपादक म्हणूनही यांनी काही काळ काम केले.

आजगावकरांनी विपुल व विविध प्रकारची ग्रंथरचना केलेली आहे. *कवनकुतूहल* (१९०१) हे काव्य, *प्रणयविकसन* व *प्रणयानंद* ही नाटके (१९१०), *चिमुकल्या गोष्टी* (१९१३) हे बालसाहित्य, *नेपाळवर्णन* (१९०६), *इसापनीती* (१९११–१२), *भरतपूरचा वेढा* (१९०४, १९१९), *भूतविद्येचे चमत्कार* (१९१८) ही यांतली काही रचना. ग्रंथलेखन हाच त्यांचा व्यवसाय होता. *वीरशैव संगीत-भजन* (१९१०), *श्रीहरिभजनामृत* (१९१६), *नित्यपाठ भजनमाला* (१९१९) ह्यासारखी पुस्तकेही यांनी तयार केली. परंतु यांचे महत्त्वाचे साहित्यिक कार्य म्हणजे त्यांनी लिहिलेली *महाराष्ट्र कविचरित्रमाला*. ह्या मालेचा पहिला खंड प्रकाशित झाल्यानंतर (१९०८) सुमारे ३,००० पृष्ठांचे कविचरित्रसाहित्य यांनी एकूण अकरा खंडांत प्रसिद्ध केले. प्रसिद्ध–अप्रसिद्ध अशा सुमारे शे–सवाशे जुन्या मराठी कवींची चरित्रे या मालेतून प्रकाशित झाली आहेत. *महाराष्ट्र संत कवयित्री* (१९३९) हे यांचे पुस्तकही प्रसिद्ध आहे. ही संतचरित्रे लिहिताना त्यांनी परिश्रमपूर्वक माहिती गोळा केली व ज्ञानेश्वर-तुकारामांसारख्या प्रसिद्ध संतांप्रमाणेच हरी नारायण, लिंगनाथ योगी, चिदंबरदास राजाराम, रघुपती महाजन, गणपतराव साधू, ठाकुरदासबावा, दादा नाईक भिडे, नगाजी महाराज, पांडुरंग दादी, नाथभुजंग यांसारख्या सर्वस्वी अप्रसिद्ध व उपेक्षित कवींना प्रकाशात आणले. मराठी वाङ्मयेतिहासाच्या दृष्टीने त्यांचे हे कार्य महत्त्वाचे आहे. त्यांची चरित्रलेखनामागील भूमिका भाविकाची असल्यामुळे संतचरित्रांतील सर्व चमत्कारांचे वर्णन त्यांनी श्रद्धेने केलेले दिसते. चमत्कार ही गोष्ट बुद्धिप्रामाण्यवादी अशा चिकित्सक वाचकांना जरी अविश्वसनीय वाटली तरी साधुसंतांच्या ठिकाणी असलेले हे चमत्कार-सामर्थ्य डॉ. भांडारकर, सर ॲम्ब्रोज फ्रेमिंग इत्यादी विद्वन्मान्य लोकांनी मान्य केले आहे, अशा आशयाचे मत आजगावकरांनी मांडले आहे. संतचरित्रकार महिपतीनंतर प्राचीन कवींची चरित्रे एवढ्या परिश्रमाने व एवढ्या मोठ्या संख्येने लिहिणारे लेखक म्हणून आजगावकरांचे नाव महत्त्वाचे आहे.

द. गो. तुळपुळे, विमल भालेराव

संदर्भ : (१) मु. फ. आजगावकर, 'ज. र. आजगावकर परिचय' वीणा, व. १, अं. ५, १९४५, पृ. ५ (२) चारुशीला गुप्ते, 'संतवाङ्मयाचे रसिक संशोधक आजगावकर (मुलाखत), 'हंस', मार्च १९५४, पृ. १०. (३) प्रभाकर पाध्ये, 'ज. र. आजगावकर,' मनोहर, ऑगस्ट १९३९, पृ. ५.

**आठल्ये, कृष्णाजी नारायण** : (ज. ३ जानेवारी, १८५३, टेंभू, जि. सातारा – मृ. २९ नोव्हेंबर, १९२६, पुणे). कवी, टीकाकार, भाषांतरकार, चरित्रकार व संपादक. शालेय शिक्षण पाचव्या इयत्तेपर्यंत. वडिलांच्या सान्निध्यात वैदिक वाङ्मयाचे शास्त्रांचे अध्ययनही यांनी केले. सातारा जिल्ह्यात पाच वर्षे शिक्षकाची नोकरी. पुढे चित्रकलेच्या शिक्षणासाठी मुंबईस प्रयाण. चित्रकलेचा अभ्यास संपवून बडोद्यास गमन. तेथे बडोद्याचे दिवाण टी. माधवराव यांचा परिचय. पुढे टी. माधवराव यांच्याबरोबर मद्रासला प्रयाण. मलबार-कोचीन येथे त्यांचे बंधू राहत म्हणून त्यांच्याकडे वास्तव्य. तेथे एका कंपनीत भाषाशिक्षक म्हणून नेमणूक. कोचीन येथे असताना *गीवाणपद्यमुक्ताहार* नावाचे पुस्तक लिहून त्यांनी आपल्या ग्रंथलेखनास प्रारंभ केला. त्यांनी *केरळकोकिळ* नावाचे मासिक सुरू केले. मासिक त्यांनी अतिशय लोकप्रिय केले. यामुळे 'केरळकोकिळकार' या नावानेच ते विशेषत्वाने ओळखले जातात.

*केरळकोकिळ* (आरंभवर्ष १८८६ – डिसेंबर, १९०९ शेवट) हे मासिक मलबारमधील कोचीन या गावी असताना त्यांनी चालविले. सामान्य मराठी वाचकांना विविध विषयांची गोडी लावणे, हा या मासिकाचा उद्देश. निष्ठुर व सडेतोड टीकालेख हे *केरळकोकिळ*चे वैशिष्ट्य. 'कलमबहाद्दरांस शेलापागोटे' या सदरातून ते नवशिक्या लेखकांवर परखड टीका करीत. पहिली चार वर्षे कोचीनहून व नंतरची सोळा वर्षे मुंबईहून हे मासिक प्रसिद्ध झाले. 'लोकोत्तर चमत्कार' हे त्यांचे सदरही लोकप्रिय झाले. त्यांच्या कविताही वैशिष्ट्यपूर्ण होत्या. *मुलीचा समाचार* (१९३०), *सासरची पाठवणी* (१९३४), *माहेरचे मूळ* (१९३०), *दांपत्यसुखाचा ओनामा*, *एका नाटक्याचा पश्चात्ताप*, *तुफान* इत्यादी त्यांच्या कवितांतील चित्रमयता रंजक व आकर्षक आहे. त्यांच्या कवितेतील ह्या चित्रमयतेमुळेच शृंगेरी मठाच्या श्रीशंकराचार्यांनी त्यांना 'महाराष्ट्रभाषाचित्रमयूर' ही पदवी दिली होती.

त्यांनी छोटी-मोठी सुमारे चाळीस पुस्तके लिहिली. त्यांतील बरीचशी आधारित किंवा स्वैर अनुवादात्मक आहेत. संस्कृत–इंग्रजीतील काव्ये, नाटके, कादंबऱ्या, तत्त्वज्ञान त्याचप्रमाणे फोटोग्राफी, मोहिनीविद्या, आरोग्य, नजरबंदी इत्यादी विषयही त्यांनी हाताळले आहेत. *शृंगारतिलकादर्श* (कालिदासाच्या 'शृंगारतिलक' काव्याच्या आधारे, १८८४.), *वैराग्यशतकादर्श* (भर्तृहरीकृत १८९६), *आर्याबद्ध श्रीमद्‌भगवद्‌गीता* (१९०८) हे पद्यात्मक अनुवाद. *मधुयामिनी स्वप्न* (शेक्सपियरच्या 'मिडसमर नाइटड्रीम' या नाटकाचे रूपांतर, १८८७), *फाकडे तरवारबहाद्दर* (सर्व्हांटीसच्या 'डॉन किकझोट'चे संक्षिप्त रूपांतर, १९२५), *चीनचा इतिहास* (पिक्चर्स ऑफ चायना ॲण्ड इटस् पीपल, १८९१) ह्या पुस्तकांप्रमाणेच स्वामी विवेकानंदांच्या 'कर्मयोग', 'राजयोग', 'भक्तियोग' ह्या ग्रंथांची भाषांतरेही त्यांनी केली आहेत. त्यांची *श्वेतांबरा* (१९१८) ही स्वतंत्र सामाजिक कादंबरी प्रसिद्ध असून, त्यांच्या *निवडक लेखांचा संग्रह*ही (१९२६) प्रसिद्ध आहे. *आद्य जगद्‌गुरू श्रीमद्‌शंकराचार्य यांचे विस्तृत चरित्र* (१९१०), *समर्थांचे सामर्थ्य* (१९२५), *लोकहितवादी यांचे चरित्र* (१९२६), *विवेकानंद जीवनकथा* (१९२८), *रामकृष्ण परमहंस* (१९२९) हे त्यांनी लिहिलेले चरित्रग्रंथ. त्यांनी काढलेल्या *पुष्पगुच्छ* (१८८०) मासिकातूनही त्यांचे विविध व्यावहारिक विषयांवरील संकीर्ण लेखन प्रसिद्ध झाले आहे.

गं. दे. खानोलकर, विजया डबीर, लता जाधव

**आठल्ये, जनार्दन हरि :** (ज. १८२६, शिपोशी, जि. रत्नागिरी – मृ. १३ एप्रिल, १९००, मुंबई). वृत्तपत्रकार, मुद्रक व प्रकाशक. शिक्षण मॅट्रिकपर्यंत. रत्नागिरीला इंग्रजी शाळेत काही काळ शिक्षक. नंतर तेथेच यांनी १८४८ साली 'जगन्मित्र' हा छापखाना सुरू करून *जगन्मित्र* हे साप्ताहिक १८५३ पासून चालविले.

*न्यायाब्धिसेतु*, भाग १ व २ (१८५५, १८५७), *बालवैद्य* (मूळ इंग्रजीवरून भाषांतरित, १८६१), *बृहत्संहिता* खंड ३ (वराहमिहिर-कृत संस्कृत ग्रंथाचे मराठी भाषांतर, १८७४), *शब्दसिद्धि निबंध* (संस्कृत धातूंवरून मराठी शब्द कसे निर्माण झाले ते दर्शविणारा धातुकोश, १८७१) इत्यादी ग्रंथ त्यांनी आपल्या छापखान्यात छापून प्रकाशित केले.

मंजिरी बेडेकर, डॉ. राम घोडे

**आठल्ये, भैय्यासाहेब :** पहा आठल्ये, श्रीकृष्ण विठ्ठल

**आठल्ये, विष्णु वासुदेव :** (ज. २१ एप्रिल, १८८५, रत्नागिरी – मृ. – २८ ऑगस्ट, १९५९). विविध घराण्यांच्या इतिहासाचे लेखक म्हणून मुख्यत्वे प्रसिद्ध. *आठल्ये घराण्याचा इतिहास*, प्रथम खंड (साधन विभाग, १९३९), द्वितीय खंड (वृत्तान्त विभाग – पूर्वार्ध-उत्तरार्ध १९४८), *कऱ्हाडे ब्राम्हणांचा इतिहास* (१९४७), *प्रबोध, सुधाकर* (भाषांतर, विवरणासह १९६३), *श्रीमद्भगवद्गीतेतील सिद्धी* (प्रबंध, १९५३) इत्यादी पुस्तके यांनी लिहिली. *आठल्ये घराण्याचा इतिहास* या ग्रंथाच्या निमित्ताने त्यांनी महाराष्ट्राच्या सामाजिक, आर्थिक, धार्मिक वगैरे शास्त्रांच्या प्रामाणिक अभ्यासास उपयुक्त अशी साधने उपलब्ध करून दिली आहेत.

गं. दे. खानोलकर, डॉ. राम घोडे

**आठल्ये, श्रीकृष्ण विठ्ठल ऊर्फ भय्यासाहेब :** (ज. १९७२ शिपोशी, जि. रत्नागिरी – मृ. २४ जानेवारी, १८४०, शिपोशी). (इतिहास-समीक्षक व संशोधक-लेखक. प्राथमिक शिक्षण शिपोशी येथे व नंतरचे शिक्षण पुणे व इंदूर येथे. अलाहाबाद विद्यापीठाचे बी.ए. (१८९४). श्रीमंत होळकर यांचे दिवाण म्हणून काही काळ नोकरी.

ह्यांची स्वतंत्र ग्रंथरचना नाही. पण हे जुन्या पिढीतील मराठ्यांच्या इतिहासाचे नामांकित चिकित्सक, इतिहास-समीक्षक होते. ऐतिहासिक विविध वादग्रस्त प्रश्नांवर यांनी सूक्ष्म, मार्मिक, विवेचनात्मक लेख लिहिले. यांचे काही लेख कोल्हापूरच्या 'ग्रंथमाला' मासिकात व १९०० सालापासून 'केसरी' साप्ताहिकात प्रसिद्ध. त्यांच्या काही लेखांची नावे पुढीलप्रमाणे :– *शहाजीचे पाळण्यातील नाव शाहू होते, आदिकवी मुकुंदराज यांचा एक योगपर ग्रंथ, साधुवर्य तुकाराम यांचा समाधि कालनिर्णय, मुत्सद्दी नाना फडणवीस, जंजिऱ्यावरील मराठ्यांची मोहीम व ब्रम्हेंद्रस्वामींची योग्यता, राजवाडे व चिमणाजी दामोदर, मि. किंकेड व पारसनीस यांनी केलेला बाजीराव पेशवे यांजवरील मिथ्यारोप, संताजी घोरपडे कधी मारला गेला?, भानू विरुद्ध पागारकर* इत्यादी. ऐतिहासिक संशोधनाच्या क्षेत्रात काही वादग्रस्त मुद्यांच्या संबंधात ह्यांचा इतिहासाचार्य राजवाडे ह्यांच्याशी तीव्र मतभेद होता. तो त्यांनी अनेक लेखांतून साधार स्पष्ट केला आहे.

गं. दे. खानोलकर, के. ए. पोतदार

**आठवले, नरहर लक्ष्मण ऊर्फ नाना :** (ज. १८९६, पुणे – मृ. १९३८). शैक्षणिक मानसशास्त्र या विषयाचे लेखक. राष्ट्रीय शिक्षण चळवळीतील एक विचारवंत. जन्म पुण्यात. बालपण काठेवाडात मार्वी येथे. शिक्षण गुजरातेत. त्यामुळे गुजराती भाषा व साहित्य यांचा उत्तम परिचय. पुण्याच्या फर्ग्युसन कॉलेजातून बी.ए. १९१७ मध्ये जालियनवाला बागेच्या हत्याकांडाची हकीकत ऐकून त्यांनी आजन्म ब्रह्मचारी राहून देशसेवा करण्याची प्रतिज्ञा केली. सर्व आयुष्य व्रतस्थ वृत्तीने शिक्षणक्षेत्राला वाहिले. प्रथम बारामतीला शिक्षक. १९२० मध्ये प्रो. अण्णासाहेब विजापूरकर यांच्या नवीन समर्थ विद्यालयात व पुढे वर्धा येथे महिला आश्रमात दाखल. वर्धा येथील या महिला-श्रमाचे कालांतराने संचालक.

त्यांचे पहिले पुस्तक *ब्रिटिश राज्यव्यवस्थेचा इतिहास* (१९२१), *आत्महत्या : त्याचा प्रसार प्रतिकार* (१९३३), हा त्यांचा छोटेखानी निबंध. *दुर्वर्तनी मुलांची सुधारणा* (१९३३) आणि *बालकांचा मनोविकास* (१९३९) ही केवळ शैक्षणिक मानसशास्त्राच्या दृष्टिकोनातून लिहिलेली त्यांची दोन पुस्तके, विशेष महत्त्वाची आहेत. *दुर्वर्तनी मुलांची सुधारणा* हे या विषयावरील मराठीतील बहुधा पहिलेच पुस्तक असावे. मुलांच्या दुर्वर्तनाची मानसशास्त्रीय व समाजशास्त्रीय मीमांसा त्यात केली असून, मुले सुधारण्याची दिशा व उपाय सुचविले आहेत. या ग्रंथाच्या उपसंहाराचे प्रकरण प्रा. बा. रा. कोल्टकर यांनी लिहिले आहे. *व्यास विद्याश्रम अर्थात विद्यार्थ्यांचे साम्राज्य* (१९३८) ही त्यांची विद्यार्थ्यांच्या जीवनालाच संपूर्णपणे वाहिलेली पहिलीच कादंबरी होय. याशिवाय *डॉक्टर शरच्चंद्र* ही रॉबर्ट लुई स्टीव्हन्सन यांच्या 'डॉ. जेकिल् ॲण्ड मि. हाइड' या सुप्रसिद्ध नवलकथेचे रूपांतर असलेली कादंबरी व कॅक्स्टनकृत 'रेनॉल्ड व फॉक्स' या गोष्टीच्या आधारे लिहिलेले *राणा कोल्हा* (१९३१) ही त्यांची अन्य पुस्तके.

ग. वि. अकोलकर, के. ए. पोतदार

**आठवले, पार्वतीबाई :** (ज. १८७०, देवरुख, जि. रत्नागिरी – मृ. १० ऑगस्ट, १९५५). बाळकृष्ण केशव जोशी यांची कन्या. आनंदीबाई कर्वे यांच्या धाकट्या भगिनी. पंधराव्या वर्षी वैधव्य. अण्णा व आनंदीबाई कर्वे यांच्या प्रयत्नाने पुण्यास ट्रेनिंग कॉलेजचे शिक्षण व विधवा पुनरुज्जीवनाच्या कार्यात सहभाग. अमेरिकेचा प्रवास. अमेरिकेत हलकी सलकी कामेही केली. हिंगण्याच्या अनाथ-बालिकाश्रमाच्या आजन्मसेविका व प्रचारिका. आश्रमासाठी वर्गणी गोळा करण्यासाठी हिंदुस्थानभर प्रवास. वॉशिंग्टन (अमेरिका) येथे १९१९ साली झालेल्या आंतर-आंतरराष्ट्रीय मजूर परिषदेत हिंदी स्त्री मजुरांच्या प्रतिनिधी म्हणून उपस्थिती. विधवेला सक्तीने देण्यात येणारी संन्यास दीक्षा (केशवपन इ.) त्यांनी पुढे नाकारली.

*माझी कहाणी* (१९२८) हे पार्वतीबाईंनी लिहिलेले आत्मचरित्र असून वैधव्य, केशवपन, हिंदु-विवाहपद्धती, कुटुंबपद्धती, स्त्री स्वातंत्र्य व स्त्रियांच्या संस्था यासंबंधातील आपले विचार त्यांनी त्यात मांडले आहेत. स्त्रीजीवनातील व्याधींना वाचा फोडणाऱ्या एक महत्त्वाच्या लेखिका.

कृष्णाबाई मोटे, सुषमा नगरकर, नीलिमा गुंडी

संदर्भ : 'माझी कहाणी'–प्रस्तावनालेखक प्रो. धोंडो केशव कर्वे, प्रका. गो. म. चिपळूणकर, हिंगणे, १९२८.

**आतार, शिकंदरलाल :** (ज. १२ ऑगस्ट, १८९३ – मृ. १९४२). अनुवादक व लेखक. व्यवसायाने प्राथमिक शिक्षक. सातारा जिल्ह्यात अनेक शाळांतून अध्यापन. *अमेरिकेच्या व्यवसायोन्नतीचा इतिहास* (१९१६) हा जगन्नाथ खन्ना यांच्या हिंदी पुस्तकाचा अनुवाद. *नव्य विज्ञान अथवा आधुनिक शास्त्रीय जगत्* (१९१९) हा प्रा. चारुचंद्र भट्टाचार्य ह्यांच्या बंगाली पुस्तकाचा अनुवाद. *माझा आफ्रिकेचा प्रवास अथवा आफ्रिकेतील काफिरांचा देश* (१९२३) हा प्यारीमोहन सेनगुप्त ह्यांच्या 'प्रवासी' मासिकातील बंगाली लेखमालेचा अनुवाद, ही ह्यांची प्रकाशित पुस्तके. १९२१ साली बडोदे येथे भरलेल्या महाराष्ट्र साहित्य संमेलनात त्यांनी 'मुसलमान आणि मराठी भाषा' हा निबंध वाचून मुसलमान समाजाने मराठी भाषेकडे दुर्लक्ष न करता मुसलमान धर्माचार्य, बादशहा, साहित्य सेवक, शास्त्रशोध

व पुढारी ह्यांनी चरित्रे मराठीत लिहून मराठी साहित्याचे संवर्धन केले पाहिजे. अशी महत्त्वाची सूचना केली होती. मुसलमान धर्मविषयक वाङ्मयाची मराठी वाचकाला परिचय करून देण्याच्या उद्देशाने त्यांनी *कुराण परिचय अथवा कुराणाचे धार्मिक, ऐतिहासिक आणि सामाजिक स्वरूप* (१९२३) ह्या नावाचे एक छोटे पुस्तक प्रसिद्ध केले. अली खलिफाचे पुत्र व महंमद पैगंबराचे नातू हसन-हुसेन ह्यांनी करबलाच्या रणक्षेत्रावर मुराबियाशी जंग करून धारातिर्थी देह ठेवला, ह्या प्रसंगाचे चित्ताकर्षक व हृदयंगम वर्णन करणाऱ्या *रिवायती*चा संग्रह भारत इतिहास संशोधक मंडळाच्या त्रैमासिकातून प्रसिद्ध करून मुसलमानांचे खास जातीय पद्यवाङ्मय त्यांनी प्रकाशात आणले. सांगली–सातारा भागातील मराठ्यांच्या इतिहासाला उपयुक्त अशी बरीच माहितीही गोळा करून टिपणे व छोटे निबंध ते वेळोवेळी प्रसिद्ध करीत. मुसलमान समाज व मराठी समाज यांमध्ये दुवा निर्माण करू इच्छिणारा एक महत्त्वाचा लेखक.

ग. दे. खानोलकर, डॉ. राम घोडे

**आत्रे, त्रिंबक नारायण :** (ज. ५ सप्टेंबर, १८७२, संगमनेर जिल्हा नगर – मृ. फेब्रुवारी, १९३३, अमरावती). ग्रामव्यवस्था व गुन्हेगार जमात या विषयाचे तज्ञ लेखक. मुंबई विद्यापीठाचे बी.ए., एल्एल्.बी. मुंबई सरकारच्या महसूल खात्यात नोकरी.

आत्रे हे समाजशास्त्र विषयाचे चांगलेच जाणकार होते. *गुन्हेगार जाती* (१९११) व *गावगाडा* (१९१५) ही यांची दोन उल्लेखनीय पुस्तके. *गुन्हेगार जाती* हे यांचे पुस्तक एफ्. केनेडी ह्यांच्या 'क्रिमिनल क्लॅसेस इन् द् बॉम्बे प्रेसिडेन्सी' या पुस्तकावर आधारित असून त्यात बंजारी, कैकाडी, मांगगारोडी, रामोशी इत्यादी गुन्हेगार समजलेल्या जमातींविषयीची माहिती आहे. या जमातींची भाषा, चालीरीती, गुन्हे करण्याच्या पद्धती, वेष, संकेत इत्यादींविषयीची माहितीही आत्रे यांनी दिलेली आहे. आत्रे यांचा नोकरीनिमित्त खेड्यापाड्यांतील अठरापगड जातींच्या व धंद्यांच्या लोकांशी निकटचा संबंध येत असे. या संबंधांमुळे व त्यांच्याविषयी वाटणाऱ्या जिव्हाळ्यामुळे त्यांनी ग्रामव्यवस्थेचे जे अवलोकन केले त्यातून *गावगाडा* या पुस्तकाचा जन्म झाला. मराठीतील या प्रकारचे हे अतिशय महत्त्वाचे पुस्तक मानले जाते. ह्या पुस्तकातून ग्रामव्यवस्थेचे व खेड्यापाड्यांतील वर्णव्यवस्थेचे पूर्वीचे व विद्यमान स्वरूप ह्यांचे तुलनात्मक दर्शन त्यांनी घडविले आहे. ह्याशिवाय *सक्तीचे शिक्षण* (१९०८) हा 'विविधज्ञानविस्तारा'तून प्रसिद्ध झालेला त्यांचा निबंधही उल्लेखनीय आहे. परंतु आत्रे मुख्यतः ओळखले जातात, ते त्यांच्या *गावगाडा* या पुस्तकाने. मराठी ग्रामसंस्कृतीचा विविधांगी परिचय करून देण्याच्या दृष्टीने मराठीतील हे एक अनन्यसाधारण पुस्तक गणले जाते. आजही याचे महत्त्व कमी झालेले नाही.

उषा टाकळकर, डॉ. राम घोडे

० **आधुलिक :** पहा भवाळकर, नीलकंठ बळवंत

० **आनंद घनराम :** पहा कुलकर्णी, रामचंद्र विनायक

० **आपटे गुरुजी :** पहा आपटे, पांडुरंग श्रीधर

**आपटे, गोविंद विनायक :** (ज. १८६९-मृ. १९२५, केरी-गोवा). विविध ब्राह्मण घराण्यांचा इतिहास लिहिणारे व क्षेत्रवर्णनपर पुस्तकांचे लेखक. विद्यालयीन शिक्षण मिळाले नाही. तथापि, सार्वजनिक कार्याच्या आवडीतून इतिहास संशोधनास व लेखनास यांनी सुरुवात केली.

*न्यायाचा मासला* (१९०२) हे त्यांचे पुस्तक म्हणजे धर्म, नीती, मद्यपाननिषेध इत्यादी विषयांवरील त्यांची व्याख्याने आक्षेपार्ह ठरवून सरकारने त्यांच्यावर १८९६ साली जो खटला भरला त्या खटल्याची हकीकत होय. या खटल्यात त्यांना दोन वर्षांची शिक्षा झाली. तुरुंगातून सुटल्यावर ते वाई येथे राहू लागले. तेथे ते पंडित भाऊशास्त्री लेले यांच्या 'धर्म' या नियतकालिकाचा प्रचार करीत. 'ब्राह्मण घराण्यांचा सविस्तर व साधार इतिहास' लिहिण्याचा पहिला प्रयत्न आपटे ह्यांनी १९१४ च्या सुमारास केला. 'आपटे', 'बर्वे', 'पटवर्धन' व 'गोखले' घराण्यांचे ह्यांनी लिहिलेले इतिहास ही त्यांची महत्त्वाची कामगिरी. महाराष्ट्राच्या राजकीय व सामाजिक इतिहासाच्या दृष्टीने महत्त्वाचे ठरणारे कुलवृत्तान्त व घराण्यांचे इतिहास लिहिण्याची स्फूर्ती अनेकांना देण्याचे श्रेय आपटे यांच्याकडे जाते. त्यांनी स्वतः *आपटे घराण्याचा इतिहास* (शके १८३६), *बर्वे घराण्याचा इतिहास* (शके १८३८), *संस्थानिक पटवर्धन घराण्याचा इतिहास* (१९१९), *गोखले घराण्याचा इतिहास* (१९०२), हे लिहिले. *निर्मळ क्षेत्रवर्णन व स्थानवर्णन* (१९००), *श्रीक्षेत्र वाईवर्णन* (१९११). ही त्यांची क्षेत्रवर्णनात्मक पुस्तकेही माहितीपूर्ण आहेत.

**वाङ्मय :** (१) निर्मळ क्षेत्रवर्णन व स्थानवर्णन; १९००. (२) श्रीक्षेत्र वाईवर्णन; १९११. (३) आपटे घराण्याचा इतिहास; १९१४. (४) बर्वे घराण्याचा इतिहास; १९१६. (५) संस्थानिक पटवर्धन घराण्याचा इतिहास; १९१९. (६) सर्व हिंदुस्थानातील गोखले व गोखले रास्ते घराण्याचा इतिहास; १९१२. (७) गोविंद विनायक आपटे यांचा खटला उर्फ न्यायाचा मासला; १९०२.

मंजिरी बेडेकर, मीनल निसळ, लता जाधव

**आपटे, गोविंद सदाशिव :** (ज. २६ जुलै, १८७०, सातारा – मृ. २९ नोव्हेंबर, १९३६, उज्जैन). ज्योतिर्गणितज्ञ. एम्.ए., बी.एस्सी. उज्जैनच्या माधव कॉलेजात प्राध्यापक व नंतर प्राचार्य. सेवानिवृत्तीनंतर उज्जैनला वेधशाळेचे सुपरिंटेंडेंट. १८३७ च्या उज्जैन येथे भरलेल्या ज्योतिषसंमेलनाकडून 'गणकचूडामणि' ही पदवी. *पल्गना विवेचन अथवा चहाकाव्य* (१९१९) नावाचे पुस्तक यांनी १९१९ मध्ये लिहिले.

यांनी *पंचांग चिंतामणि* (१९३३) व *सर्वानंद लाघव* (१९३६) असे ग्रंथ लिहिले आहेत. पहिला ग्रंथ हा एक सूक्ष्म सारणी-ग्रंथ असून त्याजवरून एक वर्षाचे पंचांग ७० ते ७५ तासांत तयार करता येते. याच सुमारास त्यांचा *दि इनिशिअल् पॉइंट ऑफ अवर झोडियाक्* हा इंग्रजी ग्रंथही प्रसिद्ध झाला. त्यांनी पंचांग तातडीने तयार करण्यास महत्त्वाच्या ठराव्या अशा *पंचांगचिंतामणि* व *ग्रहचिंतामणि* या दोन सारण्या तयार केल्या.

ग. दे. खानोलकर, डॉ. राम घोडे, लता जाधव

**आपटे, चिंतामण मोरेश्वर :** (अंदाजे, इ. स. १८८० ते १९२०). कादंबरीकार. वडील मोरेश्वर ऊर्फ मोरशास्त्री हे वैदिक असले तरी व्यवसायाने वैद्य होते. चिंतामणरावांना विशेष शिक्षण मिळाले नाही. तथापि त्यांनी स्वकष्टाने ज्ञानार्जन केले. रजिस्ट्रेशन खात्यात शिपाई म्हणून नोकरीस आरंभ केला आणि पुढे ते इन्स्पेक्टरच्या पदापर्यंत पोहोचले. नोकरीच्या काळात त्यांचे लेखन - वाचन सुरू असे.

ह्यांच्या *पुतळाबाई* (१८८९) व *श्यामभट्ट आणि त्याचा शिष्य बटो*, भाग १, २, ३ (१८९३) ह्या दोन कादंबऱ्या विशेष प्रसिद्ध आहेत. *पुतळाबाई* या कादंबरीतून, जुन्या बखरी, इतिहास इत्यादींच्या आधारे स्वधर्मरक्षण व स्वराज्य - स्थापन करणाऱ्या छत्रपती शिवाजी महाराजांच्या तद्विषयक धडपडीचे चित्रण आढळते. *श्यामभट्ट आणि त्याचा शिष्य बटो* ही त्यांची कादंबरी म्हणजे सर्व्हांटिस या स्पॅनिश लेखकाच्या सुप्रसिद्ध 'डॉन क्विक्झोट'च्या धर्तीवर पण स्वतंत्रपणे लिहिलेली कृती होय. फलज्योतिषविषयक समाजाचे वेड घालविणे, हा या कृतीच्या निर्मितीमागील हेतू. सरळ, रंजक शैली व निरागस विनोद यांच्या आधारे लिहिलेली त्यांची ही कृती उल्लेखनीय आहे. याशिवाय *सुमित्र* (१८८७) हे अलेक्झांडर ड्यूमासच्या 'कॅप्टन पॉल'च्या

आधारे लिहिलेले नाटक. *सत्यासत्यविचार* (१८९२), *उत्तम शेतकरी* (१९१४) ही यांची अन्य पुस्तकेही प्रसिद्ध आहेत.

सौ. कुंदा केळापुरे, लता जाधव

**आपटे, दत्तात्रेय अनंत :** ० अनंततनय : (ज. १८७५, वडनेर भोलजी, जि. बुलढाणा – मृ. ११ जून, १९२९, पुणे). जुन्या वळणाचे तथापि आधुनिक कवितेबद्दल आस्था बाळगणारे कवी व काव्यरसिक मूळ गाव जुन्नर. स्कूल-फायनलपर्यंत शिकल्यानंतर खेड (जुन्नर) येथे बारा वर्षे शिक्षक. या काळात खेड येथील सत्पुरुष चंडिराम महाराज यांचे पद्यबद्ध चरित्र लिहून त्यांनी ते प्रसिद्ध केले (१८९९). अनंततनय यांची प्रारंभीची बरीचशी कविता *काव्यरत्नावली*तून व १९२० नंतरची प्रामुख्याने *चित्रमयजगत*मधून प्रसिद्ध झाली आहे.

१९२० साली पुणे मुकामी कवी व काव्यरसिक ह्यांच्यासाठी स्थापन झालेल्या 'श्री महाराष्ट्र शारदामंदिरा'चे ते प्रमुख आधारस्तंभ होते. ह्या संस्थेच्या वतीने नवीन कवितेविषयी समाजात आवड उत्पन्न करणे, कवींच्या काव्यकृती प्रकाशित करणे, कवींची चरित्र-विषयक माहिती मिळवून ती प्रसिद्ध करणे, काव्यग्रंथांचा संग्रह करणे, कविसंमेलने भरविणे, काव्यविषयक चर्चा घडवून आणणे, असे विविध उपक्रम अनंततनय यांनी केले. ना. म. भिडे यांनी तयार केलेल्या 'काव्यचर्चा' (१९२५) ह्या ग्रंथाच्या संपादनातही त्यांचा महत्त्वाचा वाटा होता. विनायकांच्या कवितांचे संपादनही यांनी केले आहे (१९२४). त्यांनी काही संस्कृत काव्यांचा गद्य-पद्य अनुवाद केला असून, काही काव्यग्रंथ संपादित केले आहेत. त्यांची स्वतःची काव्यरचना *हृदयतरंग* (तीन भाग, अनुक्रमे १९१५, १९२०, १९२६) ह्या नावाने प्रसिद्ध आहे. त्यांचा *पुण्याची पर्वती* (पोवाडा – १९२०) प्रसिद्ध आहे. याशिवाय *तिलकविजय* (पूर्वार्ध, १९२८) हे लो. टिळकांचे ओवीबद्ध चरित्र व *झोपाळ्यावरची गीता* (१९१७) ह्या रचनाही उल्लेखनीय आहेत. *शारदा-दूतिका* (१९१३) हे 'मेघदूता'ची कल्पना घेऊन लिहिलेले काहीसे विनोदी असे काव्य असून अर्वाचीन कवींवरील टीका त्यात आढळते. आपल्यावरील टीकेला उत्तर देण्यासाठी ह्या काव्याचा उत्तरार्ध त्यांनी लिहिला (१९१४). *संगीत कालिंदी* (१८९७) हे शेक्सपियरच्या 'टू जंटलमन ऑफ व्हेरोना' वरून रचलेले नाटक व *सनातन धर्माचे स्वरूप* (१९०४), *प्राकृत कविचरित्र* भाग १ व २ (प्राचीन मराठी कवींची चरित्रे, १९०६, १९०७) हे त्यांचे गद्यलेखनही प्रसिद्ध आहे.

डॉ. आपटे यांनी खालील प्रकारचे अन्य काही ग्रंथकार्यही केले आहे. (१) *ऋतुसंहारकाव्य आणि महाराष्ट्रतात्पर्य* (१९०१), (२) *महाराष्ट्र भगवद्गीता*–भाषांतर (१९१४), (३) *श्री एकनाथ महाराज यांच्या अभंगांची* गाथा (१९३०) (संशोधक : द. अ. आपटे)

रा. श्री. जोग, डॉ. राम घोडे, डॉ. नीलिमा गुंडी

**संदर्भ :** मराठी साहित्य समालोचन – वि. सी. सरवटे

**आपटे, दत्तात्रेय विष्णु :** (ज. १३ मार्च, १८८१, हनगंडी-कर्नाटक – मृ. २७ ऑक्टोबर, १९४३, पुणे). पत्रकार, इतिहास संशोधक, ज्योतिर्गणितज्ञ, चतुरस्त्र कार्यकर्ते, विविध भाषांचे जाणकार. शालेय शिक्षण हनगंडी तेरदाळ व जमखंडी येथे. उच्च शिक्षण कोल्हापूर येथील राजाराम कॉलेज व पुण्याच्या फर्ग्युसन कॉलेजमध्ये. गणित हा त्यांचा विशेष आवडीचा विषय. यवतमाळ येथील 'विद्यागृह' ह्या राष्ट्रीय शाळेत त्यांनी बाबासाहेब परांजपे ह्यांच्या प्रेरणेने अध्यापक म्हणून काम केले. यवतमाळ येथे ते 'हरीकिशोर' ह्या साप्ताहिकाचे १९०९ पर्यंत संपादक होते. मुंबईच्या 'राष्ट्रमत'चेही अल्पकाळ संपादक होते (१९०९); १९११ मध्ये गोव्यात प्रजासत्ताकाची घोषणा झाल्यानंतर गोव्यात मराठी शाळा काढण्यात त्यांनी केरीचे (गोवे) दादा वैद्य ह्यांना साह्य केले. इतिहासाचार्य राजवाडे गोमांतकात संशोधन करण्यासाठी आले असताना दत्तोपंत आपटे ह्यांना इतिहास-संशोधनाची दीक्षा मिळाली. त्यासाठी त्यांनी पोर्तुगीज व पारशी भाषांचा अभ्यास केला; व मोडी वाचनाचा सराव केला. १९१५ मध्ये गोवे सोडल्यावर पुण्यास 'चित्रमयजगत्'चे ते काही काळ संपादक होते. सक्रिय राजकारणातून निवृत्त झाल्यानंतर त्यांनी आपले लक्ष इतिहास व गणित ह्या विषयांवर केंद्रित केले.

*दोस्तांची औरंगपट्टणवर मोहिम* (१९११), *महाराष्ट्र इतिहास मंजिरी* (१९२३), *मुधोळ संस्थानच्या घोरपडे घराण्याचा इतिहास* (१९३४) हे त्यांचे संपूर्ण ग्रंथ. त्यात संशोधनपद्धती व इतिहास लेखन यांचा सुरेख समन्वय दिसून येतो. *लोकमान्यांचे स्मरण* हा व इतर अनेक त्यांचे लेख चित्रमयजगतमधून प्रसिद्ध झाले. *शिवकालीन पत्रसंग्रह* भाग १ व २ (१९२९), *शिवाजी निबंधावली* भाग १ व २ (१९२९), *इंग्लिश रेकॉर्डस ऑन शिवाजी* हे साधन ग्रंथ (१९३१) त्यांनी न. चिं. केळकर ह्यांच्या-बरोबर संपादित केले. स. म. दिवेकर संपादित *श्री शिवभारत* (१९२७) ह्या ग्रंथाला त्यांनी २०० पानांची प्रदीर्घ प्रस्तावना लिहिली. त्यांनीच संपादित केलेल्या 'शिवचरित्रप्रदीप' व (१९२५) ह्या ग्रंथात 'शिवाजी महाराजांची खरी जन्मतिथी' हा लेख लिहून शिव-जन्मतिथी २१·१५५१, फाल्गुन वद्य हीच असल्याचे गणिताने सिद्ध केले. 'थोरल्या बाजीरावाच्या ध्येयाची मीमांसा' हा लेख त्यांनी तत्कालीन पत्रे अभ्यासून लिहिला. टॉयन्बी ह्यांच्या 'स्टडी ऑफ हिस्टरी' ह्या दोन खंडांची ओळख त्यांनी साराशरूपाने मराठी वाचकास करून दिली. *महाराष्ट्राचा पत्ररूप इतिहास* हा ग्रंथ रा. वि. ओतुरकरांच्या सहकार्याने सिद्ध केला (१९४१). माधवराव पेशवे, नाना फडणीस, महादजी शिंदे ह्यांचे कर्तृत्व आणि शिवाजी, बाजीराव ह्या व्यक्तिरेखा हे त्यांचे आवडीचे विषय. कुलवृत्तांतास जोडलेल्या त्यांच्या प्रस्तावना समाजशास्त्रदृष्ट्या मोलाच्या आहेत. दत्तोपंत आपटे लेखसंग्रह (१९४५ प्रसिद्ध) ह्यात त्यांचे इतिहास, राजकारण, समाजकारण, ज्योतिष इत्यादी विषयांवरचे लेख संकलित केले आहेत. शिवाजीच्या सांगण्यावरून गणेश दैवज्ञाने पंचांग शुद्ध्यर्थ लिहिलेला 'करणकौस्तुभ' दत्तोपंतांनी सटीक प्रकाशित केला (१९२७). 'लीलावती'ची अस्सल प्रत मिळवून तीतील दुर्बोध स्थळांचे स्पष्टीकरण त्यांनी केले. शंकर बाळकृष्ण दीक्षित ह्यांच्या ज्योतिषविषयक संशोधनावर लेख लिहून भारतीय ज्योतिषशास्त्र कसे स्वयंभू होते ते त्यांनी सप्रमाण सिद्ध केले. लो. टिळकांचे नवे पचांग तयार करण्यात त्यांचा सहभाग होता.

प्रभा पुरोहित, स. मा. गर्गे

**अन्य ग्रंथसंपदा :** (१) *ऐतिहासिक दंतकथा व गोष्टी, भाग १ व २*–१९३६, १९४२. (२) *संशोधकाची छोटी जंत्री*–१९२१. (३) *गोलाध्याय पूर्वार्ध व उत्तरार्ध* (संपादित). (४) *ग्रहगणित भाग १ व २*-१९३९, १९४१. (५) *चंद्रचूडदप्तर–कथा पहिली गंगोबा तात्याची कारकिर्द*–१९२०. (६) *बीजगणित*–१९३०. (७) *मराठ्यांच्या इतिहासाचे साहित्य* (शेजवलकर, सरदेसाई, वाकसकर मिळून संपादित). (८) *लीलावतीतील सार्थेचे* (संपा.) दु. आ. १९४१. (९) *सुवचनानि*–संपा. १९३३.

**आपटे, दाजी नागेश :** (ज. १ एप्रिल, १८८९ – मृ. १८ डिसेंबर, १९५६, बडोदे). साहित्यशास्त्र, नीतिशास्त्र व संस्कृती ह्या विषयांचे लेखक. मूळगाव मालवे, (जि. रत्नागिरी). शिक्षण पुणे येथे. फर्ग्युसन कॉलेज मधून बी.ए. उत्तीर्ण. बॅ. सावरकरांचे सहाध्यायी. अलाहाबाद विद्यापीठाची एलएल.बी. पदवी. बडोदे येथे वकिलीचा व्यवसाय.

सावरकरांच्या प्रेरणेने यांनी *मुरारबाजीचा पोवाडा* (१९०६) लिहिला. ह्यांचा 'नरकातील दरबार' हा औपरोधिक लेख भालाकार भोपटकरांनी आपल्या 'भाला' या साप्ताहिकात प्रसिद्ध केला होता व त्याबद्दल राजद्रोहाच्या आरोपाखाली भोपटकरांना सहा महिन्यांची शिक्षा भोगावी लागली होती. (पहा, आपटेकृत 'आत्मवृत्त', पृ. ७०-७१) आपटे ह्यांना साहित्यशास्त्र, ज्योतिर्गणित, प्राचिन इतिहास, वेदकालनिर्णय पाश्चात्त्य तत्त्वज्ञान, जगातील विविध धर्म इत्यादी विषयांची गोडी असल्याने त्यांचे वाचन-लेखनही ह्याचसंबंधी असे. *सुधारणा व प्रगती* (१९१८) हा ह्यांचा ग्रंथ म्हणजे जे. बी. क्रोझिअर ह्यांच्या 'सिव्हिलायझेशन अँड प्रोग्रेस' ह्या ग्रंथाचा सारात्मक अनुवाद होय. या व्यतिरिक्त *हिंदी-सुमेरी संस्कृती* (१९२८), *नीतीशास्त्रप्रबोध* (१९३३), *सयाजीराव गायकवाड ह्यांचे चरित्र* (१९३६), *आत्मवृत्त* (१९५६) इत्यादी त्यांचे लहान-मोठे पंधरा ग्रंथ प्रसिद्ध आहेत. ह्यांच्या लेखांचे व भाषणाचे *इंद्रधनुष्य* (१९२९) व *साहित्यप्रकाश* (१९४१) हे दोन संग्रह प्रकाशित झाले आहेत. *हिंदी-सुमेरी संस्कृती* हा लहानसा ग्रंथ म्हणजे हिंदी व सुमेरी संस्कृतीच्या आद्य स्थलकालाचे विवेचन करणारा संशोधनात्मक प्रबंध असून त्या दोन्ही संस्कृती मुळात उत्तरध्रुवप्रदेशीय एकाच संस्कृतीच्या शाखा होत, हा विचार ह्यातून मांडला आहे. 'नीतिशास्त्रप्रबोध' हा नीतिशास्त्राचा इतिहास कथन करणारा, विशिष्ट स्वरूपाचा, पहिला मराठी ग्रंथ होय. बडोद्याचे महाराज सयाजीराव गायकवाड (तिसरे) ह्यांच्या १,३०० पृष्ठांच्या त्रिखंडात्मक चरित्रग्रंथात, महाराजांच्या १९३५ पर्यंतच्या जीवनाचा व कारभाराचा वृत्तान्त आढळतो. आपटे यांच्या 'आत्मवृत्ता'तून त्यांच्या काळातील अनेक व्यक्तींच्या व घराण्यांच्या जीवनातील तसेच तत्कालीन समाजातील अनेक स्थित्यंतरांचेही दर्शन घडते. प्रत्यक्ष लेखनाशिवाय महाराष्ट्र साहित्य परिषद, बडोद्याची 'सहविचारणी सभा' इत्यादी साहित्यसंस्थांच्या माध्यमातूनही त्यांनी साहित्याची सेवा केली आहे. पुणे येथे भरलेल्या 'अखिल भारतीय फलज्योतिष' परिषदेचे १९२१ व १९४२ साली ते अध्यक्ष होते. 'ज्योतिषाचार्य' व 'विद्यावाचस्पती' ह्या पदव्या त्यांना लाभल्या होत्या.

गं. दे. खानोलकर, डॉ. राम धोंडे

**आपटे, पांडुरंग श्रीधर** : ० आपटे गुरुजी : (ज. ६ एप्रिल, १८८७, भावनगर – मृ. १९ डिसेंबर, १९५६, पुणे). लेखक, चरित्रकार व अनुवादक. शिक्षण, बी.ए., एलएल्.बी.पर्यंत. राष्ट्रीय शिक्षणाचे पुरस्कर्ते; व महात्मा गांधींचे अनुयायी. येवले येथील राष्ट्रीय शाळेत मुख्याध्यापक.

त्यांची *कुटुंब-रंजन* भाग १-२ (१९४०, ४६), *शिष्टाचार* (१९४५), *स्वराज्य मार्गदर्शक लोकमान्य टिळक* (१९४०), *साने गुरुजी-ओझरते दर्शन* (१९४४), *श्री विद्यानंद स्वामी-महाराज...श्री केशव गोविंदमाहात्म्य* (१९४७), *श्रीकृष्णाची जन्मकथा* (१९४९), *महात्मा गांधीदर्शन* (१९४८), *गांधींची गोष्ट* (१९४९), *भारताचा लाडका मुलगा* (१९४९), *सेनापती बापट दर्शन*, पूर्वार्ध (१९६०) व *आपल्या पूर्वजांचा शोध* (१९४५), *अलौकिक अभियोग* (१९५६) इत्यादी साहित्यसंपदा प्रसिद्ध आहे.

तरुण पिढीला काही मोलाचे मार्गदर्शन करावे, या हेतूने आपटे गुरुजींनी हे लेखन केले. *अलौकिक अभियोग* या पुस्तकातून त्यांनी, वनस्पती, पशु, पक्षी इत्यादींनी मानवाच्या हृदयशून्य वर्तनामुळे त्याच्याविरुद्ध देवाच्या दरबारात फिर्याद केली, तर काय होईल; याचे हलुवार चित्र रेखाटले आहे. उपरोध व नर्म विनोद याद्वारे मानवी प्रवृत्तीवर त्यांनी टीका केली आहे. *आपल्या पूर्वजांचा शोध* हा चार्ल्स डार्विन ह्यांच्या 'डिसेंट ऑफ मॅन' ह्या पुस्तकाचा भावानुवाद करणारा ग्रंथही त्यांनी लिहिला आहे. त्यांचे साहित्य मुख्यतः बोधपर आहे.

मंजिरी बेडेकर, डॉ. राम धोंडे

**आपटे, महादेव चिमणाजी** : (ज. १८४५ – मृ. २२ ऑक्टोबर, १८९४). संस्कृत वाङ्मयाचे संग्राहक, अभ्यासक व प्रकाशक; मराठी भाषांतरकार. शिक्षण बी.ए., एलएल्.बी.पर्यंत. दोन्ही परीक्षांत प्रथम क्रमांकाने उत्तीर्ण. सुरवातीला काही काळ शाळेत शिक्षक. नंतर सरकारतर्फे युनिव्हर्सिटीचे फेलो म्हणून नेमणूक. पुढे हायकोर्टात वकिलीला सुरुवात.

ह्यांनी जवळजवळ लाख, दीड लाख रुपये खर्च करून प्राचीन संस्कृत ग्रंथांच्या संरक्षण-प्रकाशनासाठी पुणे येथे 'आनंदाश्रम' ही संस्था १८८८ मध्ये स्थापन केली. ह्यांनी *मौजेच्या चार घटिका* (१८८१) या नावाने महाकवी कालिदासाच्या 'शाकुंतला'चे भाषांतर केले आहे. याशिवाय *अपकृत्यशास्त्र अथवा टॉर्ट व नुकसानाचे परिणाम* (१८७०) हे इंग्रजीवरून केलेले भाषांतरही प्रसिद्ध आहे. हरि नारायण आपटे ह्यांचे महादेव चिमणाजी चुलते. मृत्यूपूर्वी त्यांनी संन्यास घेऊन 'आनंदसरस्वती' हे नाव धारण केले होते. त्यांनी 'आनंदाश्रम' ह्या संस्थेच्या व्यवस्थापनाचे कार्य हरिभाऊ आपटे यांच्यावर सोपविले होते. हरिभाऊंनी हे कार्य ह्यातभर केले.

मंजिरी बेडेकर, अंजली वऱ्हाडपांडे

**आपटे, वामन शिवराम** : (ज. १८५८ – मृ. ९ ऑगस्ट, १८९२). सावंतवाडी संस्थानातील असोलोपाल (पेटा, बांदा) येथे जन्म. प्राथमिक शिक्षण गावीच झाले. नंतर कोल्हापूर येथे आगमन. घरच्या दारिद्र्यामुळे पुढील शिक्षण कठीण झाले. परंतु त्यावेळी कोल्हापूरच्या राजाराम हायस्कूलचे मुख्याध्यापक व प्रसिद्ध कवी व विचारवंत महादेव मोरेश्वर कुंठे हे होते. त्यांनी आपटे ह्यांची हुषारी पाहून त्यांना शाळेत प्रवेश दिला. आपटे ह्यांच्या शिक्षणाची जबाबदारी स्वतःवर घेतली. वामन शिवराम आपटे यांची संस्कृतात मुळातच गती होती. जगन्नाथ शंकरशेट स्कॉलरशिप त्यांनी मिळवली. पुढील शिक्षण पुण्याच्या डेक्कन कॉलेजमध्ये झाले. संस्कृतबरोबर गणित विषयाचाही त्यांनी अभ्यास केला. ते एम्.ए.पर्यंत शिकले. प्रत्येक परीक्षेत त्यांनी उज्ज्वल यश संपादन केले. सरकारी नोकरीत न पडता आपटे विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी सुरू केलेल्या न्यू. इं. स्कूलमध्ये टिळक, आगरकर प्रभृतींबरोबर सामील झाले. न्यू. इं. स्कूलचे पहिले मुख्याध्यापक होण्याचा मान त्यांना मिळाला. डेक्कन एज्युकेशन सोसायटीच्या प्रवर्तकांपैकी ते एक होते. फर्ग्युसन कॉलेजचे पहिले प्राचार्यपदही आपटे यांनीच भूषविले. १८८२ मध्ये हंटर कमिशनसमोर साक्ष देताना मिशनऱ्यांनी चालविलेल्या शाळांतून बायबल वाचण्याची जी सक्ती होते, ती होऊ नये असे प्रतिपादन त्यांनी केले. मातृभाषांना माध्यमिक व महाविद्यालयीन शिक्षणात महत्त्वाचे स्थान मिळावे असा आग्रह धरला.

आपटे ह्यांचे कर्तृत्व ऐन भरात असताना त्यांच्या अकाली निधनाने महाराष्ट्र एका थोर प्रज्ञावंत शिक्षकाला, विचारवंताला, कार्यकर्त्याला मुकला. त्यांचे ग्रंथलेखन पुढीलप्रमाणे *प्रॅक्टिकल संस्कृत-इंग्रजी शब्दकोश* (१८९०), *इंग्लिश-संस्कृत शब्दकोश* (१८९४), *विद्यार्थ्यांसाठी संस्कृत-इंग्लिश शब्दकोश*, *गाईड टू संस्कृत कांपोझिशन* (१८८१).

संस्कृतच्या विद्यार्थ्यांना त्यांचे हे सर्वच लेखन उपयुक्त असले तरी वा. शि. आपटे हे नाव जे चिरस्थायी झाले, ते मुख्यतः त्यांच्या संस्कृत-इंग्रजी शब्दकोशामुळे. संस्कृतच्या अभ्यासकाच्या दृष्टीने हा कोश म्हणजे एक मौलिक ठेवा आहे. वैदिक आणि विदग्ध संस्कृत वाङ्मय, रामायण, महाभारत, पुराणे, स्मृतिदर्शने, व्याकरण,

काव्यशास्त्र, तंत्र, नाट्यशास्त्र, गणित, ज्योतिष इत्यादींवर विविध शब्दांचा समावेश प्रस्तुत कोशात आहे.

डॉ. व्यं. वि. द्रविड

**आपटे, वासुदेव गोविंद** : [ज. १२ एप्रिल, १८७१, धरणगाव (खानदेश) – मृ. २ फेब्रुवारी, १९३०, पुणे]. 'आनंद' मासिकाचे संस्थापक व संपादक, बंगाली कथा - कादंबऱ्यांचे अनुवादक, निबंधकार व कोशकार. कलकत्ता विद्यापीठाची बी.ए. (१८९६) परीक्षा उत्तीर्ण. त्यानंतर नागपूरच्या हिस्लॉप कॉलेजात एक वर्ष फेलो म्हणून काम. पुण्यास काही काळ शिक्षक. पुणे मुक्कामी त्यांना हरि नारायण आपटे ह्यांच्या सहवासात मराठी भाषा व साहित्याची विशेष गोडी निर्माण झाली.

*अशोक अथवा आर्यावर्तातला पहिला चक्रवर्ती राजा याचे चरित्र* (१८९९) हे त्यांचे पहिले प्रकाशित पुस्तक. ते कोल्हापूरच्या प्रो. विजापूरकर ह्यांच्या 'ग्रंथमाले'तून प्रसिद्ध झाले. त्यानंतर भगवान बुद्ध आणि त्याचा धर्म ह्या विषयावरील *बौद्धपर्व अथवा बौद्धधर्माचा साद्यन्त इतिहास* हा अभ्यासपूर्ण ग्रंथ त्यानी १९०५ साली लिहिला व १९१४ साली तो प्रसिद्ध झाला. काही काळ अलाहाबाद येथील 'मॉडर्न रिव्ह्यू'त मराठी पुस्तकांच्या परीक्षणाचे व ना. गोपाळकृष्ण गोखले त्यांच्या 'ज्ञानप्रकाश'च्या संपादनाचे काम केले. १९०६ साली त्यांनी स्वतःच्या मालकीचे 'आनंद' हे मुलांचे मासिक सुरू केले. 'आनंदा'चे संपादन व ग्रंथलेखन ह्यांच्याबरोबरीने तरुण पिढीला राष्ट्रीय, सामाजिक व धार्मिक गोष्टींचे सम्यक ज्ञान मिळावे ह्या उद्देशाने *विचारसाधना* नावाचे एक लहान मुलांसाठी वर्तमानपत्रही त्यांनी सुरू करून पाहिले. (१९२०) परंतु प्रकृतिअस्वास्थ्यामुळे ते त्यांना बंद करावे लागले. त्यांच्या एकूण लेखनापैकी सुमारे ७५ टक्के लेखन भाषान्तरित, रूपान्तरित व आधारित अशा स्वरूपाचे आहे. लेखन हा व्यवसाय आर्थिक दृष्ट्या त्यांनी यशस्वी करून दाखविला. कोणाचेही मन दुखणार नाही, समाजाची नीतिमत्ता ढासळणार नाही, तरुणांच्या वृत्ती वाईट मार्गाकडे उत्तेजित होणार नाहीत अशा प्रकारचे सात्त्विक व बालबोध वाङ्मय त्यांनी प्रायः रचिले. (त्यांनी सुरू केलेले 'आनंद' हे मुलांचे मासिक अद्यापही चालू आहे.)

त्यांच्या साहित्याचे प्रौढ वाङ्मय व बालवाङ्मय दोन भाग पडतात. पहिल्या विभागात मिसेस हेन्रीवुड, सॅम्युएल लव्हर, बंकिमचंद्र चटोपाध्याय ह्यांच्या कादंबऱ्यांचे अनुवाद; *मराठी भाषेचे संप्रदाय व म्हणी* (१९१०), *लेखनकला आणि लेखनव्यवसाय* (१९२५), *मराठी शब्दरत्नाकार* (१९२२), *मराठी शब्दार्थचंद्रिका* (१९२२), *मराठी बंगाली शिक्षक* (आ. ३, १९२५) ही भाषाभ्यास विषयक; *जैनधर्म* (१९०४), *टापटिपचा संसार* (१९१४), *बालोद्यान पद्धतीचे गृहशिक्षण* (१९१८), *सौंदर्य आणि ललितकला* (१९१९) इत्यादी विविध विषयांवरील चोवीस-पंचवीस पुस्तके व विभागात छोटी छोटी तीस–बत्तीस पुस्तके येतात. सुप्रसिद्ध बंगाली कादंबरीकार बंकिमचंद्र ह्यांचे संपूर्ण कादंबरी-वाङ्मय, त्यातील बंगाली वातावरण, पार्श्वभूमी व पात्रांची नावे कायम ठेवून, वा. गो. आपट्यांनी, चार खंडांतून मराठीत आणले आहे. *वाल्मीकीचा जय* (१९१०), *भट आणि मंडळी पुणे* ही त्यांची कादंबरीही बंगालीचे भाषांतर आहे. *मूर्तिमंत देशाभिमान*, *माणिकबाग* (द्वि. आ. १९१४, तृ. आ. १९२३, मुंबई), आणि *दुःखान्ती सुख* या अनुक्रमे *रिएझी*, *ईस्टलीन* आणि *मिसेस हॅलिबर्टन्स ट्रबल्स* ह्या पाश्चात्त्य कादंबऱ्यांची रूपांतरेही उत्कृष्ट आहेत. बंगाली कथांना मराठी वेष देण्याचे कार्यही त्यांनी केले असून *श्रीहरनाथ ठाकूर यांची अपूर्व पत्रावली*, (खंड १, २ अनुक्रमे १९२४, १९२५) हे अनुवादित पत्रात्मक साहित्यही उल्लेखनीय आहे. *महाभारतातील सोप्या गोष्टी* (आ. ७, १९२६), *नाट्यभारत* (१९२९), *नाट्यरामायण*, *बालभारत* (१९३१), *मनी व मोत्या* (१९१३), *महाराष्ट्राचा बालबोध इतिहास* (१९०७), *मुलांकरिता गोड गाणी*, *एक दिवसाचे सुलतान* यासारखी बालवाचकांच्या दृष्टीने रंजक असूनही उद्बोधक अशी तीस–बत्तीस पुस्तके त्यांनी लिहिली. पुराणे, इतिहास, विविधज्ञानसंग्रह, संतांची व थोरांची चरित्र यांच्याआधारे बाल व कुमार वाचकांसाठी त्यांनी निर्माण केलेले साहित्यही उल्लेखनीय आहे. 'महाराष्ट्र साहित्य परिषदे'चे ते पहिले घटनाकार, एका परीने जनक व संवर्धक म्हणूनही त्यांनी महत्त्वाचे कार्य केले आहे.

गं. दे. खानोलकर, सौ. कैळापुरे, लता जाधव

संदर्भ : गोपीनाथ म. तळवलकर, 'आनंदाचे जनक वासुदेव गोविंद आपटे यांचे चरित्र', पुणे, १९३३.

**आपटे, विष्णु गोपाळ** : (ज. १८ सप्टेंबर, १८५१ – मृ. २० जुलै, १८९९, कोल्हापूर). वैद्यक विषयावरील ग्रंथांचे लेखक. शिक्षण कोल्हापूर व मुंबई येथे. मुंबईहून एल्.एम्. ॲण्ड एस्. ही परीक्षा (१८७८) पहिल्या वर्गात उत्तीर्ण. त्यानंतर कोल्हापूर येथे सरकारी डॉक्टर व दरबारचे असिस्टंट सर्जन.

वृत्ती आध्यात्मिक व लोकहितकारी. पाश्चात्त्य वैद्यकशास्त्राप्रमाणेच आर्य वैद्यकाचाही चांगला अभ्यास. ह्या अभ्यासातूनच त्यांचा *ग्राम-वैद्य अथवा खेड्यातील प्रजा निरोगी राखण्याचा उपाय* (१८८५) हा ग्रंथ लिहिला गेला. *न्यायवैद्यक* (कोल्हापूरच्या 'ग्रंथमाले'तून प्रसिद्ध, १८९४) आणि *प्रसूति-चिकित्सक* ही त्यांची अन्य दोन पुस्तके. याशिवाय त्यांनी इंग्रज सरकारने तयार केलेल्या 'डोमेस्टिक एकॉनॉमी' या ग्रंथाच्या मराठी भाषांतरासाठी भाषांतरकार प्रो. बाळजी प्रभाकर मोडक ह्यांना बरेच साह्य केले.

गं. दे. खानोलकर, रा. बा. बक्षी

**आपटे, हरि नारायण** : (ज. ८ मार्च, १८६४, पारोळे, खानदेश– मृ. ३ मार्च, १९१९, पुणे). युगप्रवर्तक कादंबरीकार, कथालेखक व वाङ्मयविमर्शक. 'हरिभाऊ' या घरगुती नावाने विशेष प्रसिद्ध. शिक्षण आरंभी मुंबईस व नंतर पुणे येथे. मॅट्रिकनंतर त्यांनी महाविद्यालयात प्रवेश केला पण ते पदवी परीक्षेपर्यंत पोहोचू शकले नाहीत. शालेय व महाविद्यालयीन जीवनात विष्णुशास्त्री चिपळूणकर, वामन शिवराम आपटे, लो. टिळक, आगरकर, वासुदेवराव केळकर इत्यादींचा सहवास त्यांना लाभला; त्यातून साहित्याची गोडी उत्पन्न झाली. नामदार गोखले व सुधारकाग्रणी गो. ग. आगरकर यांच्या निकट सहवासाचा लाभही त्यांना झाला होता. १८८६ पासून काही काळ ते पुण्यात शिक्षक होते. कानिटकर आणि मंडळीच्या 'मनोरंजन' मासिकाचे (१८८६) व सर्व्हंटस् ऑफ इंडिया सोसायटीच्या 'ज्ञानप्रकाश' या मुखपत्राचे संपादनही त्यांनी केले (१८८४–९४). चुलते महादेव चिमणाजी आपटे ह्यांच्या 'आनंदाश्रम' ह्या संस्थेचे व्यवस्थापक, *करमणूक* ह्या स्वतः काढलेल्या नियतकालिकाचे (प्रारंभ – विजयादशमी १८९०) संपादक-संचालक होते. अकोला येथे भरलेल्या 'महाराष्ट्र साहित्य संमेलना'चे ते अध्यक्ष होते (१९१२).

वयाच्या चौदाव्या वर्षापासून ते गोष्टी व कविता लिहू लागले. 'नाट्यकथार्णव' मासिकाच्या प्रेरणेने मेडोज टेलरच्या इंग्रजी कादंबऱ्यांची *तारा* व *पांडुरंग हरी* ही मराठी भाषांतरे त्यांनी केली होती. 'बिचारा' या टोपणनावाने 'केसरी'च्या (२९ मार्च, १८८१) अंकात त्यांनी कालिदास व भवभूती यांच्या संबंधात लिहिलेल्या पत्रातून त्यांच्या व्यासंगाचे व समीक्षा दृष्टीचे प्रत्यंतर येते. 'निबंधमाला'कार चिपळूणकर ह्यांच्या अकाली निधनानंतर लगेच (मार्च, १८८२) त्यांनी *शिष्यजनविलाप* ही ८८ श्लोकांची एक विलापिका लिहिली.

तिचा बोलबाला झाला. *निबंधचंद्रिका* (१८८३) मासिकातील ना. बा. कानिटकर यांच्या *शशिकला व रत्नपाल* (भाषांतर : रोमिओ अँड ज्यूलिएट) या नाटकावरील आणि 'हॅम्लेट' नाटकाच्या *वीरसेन* (गोविंदराव कानिटकरकृत) व *विकारविलसित* (आगरकरकृत) रूपांतरांवरील त्यांचे प्रदीर्घ टीकालेखही व्यासंगपूर्ण आहेत.

हरिभाऊंच्या सर्जनशील प्रतिभेचे खरे दर्शन त्यांच्या कादंबरी-वाङ्मयातून विशेषत्वाने प्रकट होते. १८८५-८६ या कालावधीतील *मधली स्थिती* ही यांची पहिली स्वतंत्र कादंबरी, 'पुणे वैभव' मासिकातून *आजकालच्या गोष्टी* ह्या नावाने क्रमशः प्रसिद्ध झाली. तेव्हापासून अखेरपावेतो त्यांनी एकूण एकवीस कादंबऱ्या लिहिल्या. त्यातील दहा सामाजिक व अकरा ऐतिहासिक आहेत. कानिटकर मंडळींच्या 'मनोरंजन' मासिकातून प्रसिद्ध झालेल्या *गणपतराव* व *चाणाक्षपणाचा कळस* या दोन कादंबऱ्या, रूपांतरीत नाटके-प्रहसने काही लहानसहान गोष्टी, निबंध, कविता इत्यादी साहित्य सोडल्यास त्यानंतरच्या सर्व कादंबऱ्या त्यांच्या 'करमणूक' साप्ताहिकातुन प्रकाशित झाल्या आहेत. इंग्रजी भाषेप्रमाणेच फ्रेंच, जर्मन, बंगाली इत्यादी भाषा त्यांना अवगत होत्या. *करमणूक* (१८९०) या साप्ताहिकाद्वारे त्यांनी मराठी मनाची अभिरुची उन्नत करण्यास फार मोठे साहाय्य केले. त्यांनी कथा-कादंबरी या वाङ्मयप्रकारास प्रतिष्ठा प्राप्त करून दिली व सामाजिक सुधारणेसाठी प्रतिकूल असलेल्या वातावरणात लोकांची मने सुधारणाभिमुख करण्यास आपल्या कथाकादंबऱ्यांद्वारा हातभार लावला. कादंबऱ्यांचा उद्देश मनोरंजन हा आहेच, पण त्याबरोबरच समाजाला उद्‌बोध करून त्यास सन्मार्गास लावण्याचे कार्य कादंबऱ्यांच्याद्वारे होणे जरूर आहे, अशी त्यांची धारणा होती.

*पण लक्षात कोण घेतो ?* ही 'करमणूक' मध्ये अगदी प्रारंभी प्रसिद्ध झालेली त्यांची सामाजिक कादंबरी. त्यांच्या कादंबऱ्यांचे प्रकाशन-काल पुढीलप्रमाणे :

**सामाजिक कादंबऱ्या :** (१) *मधली स्थिती* (१८८५–८८). (२) *गणपतराव* (अपूर्ण, १८८६–९२). (३) *पण लक्षात कोण घेतो ?* (१८९०–९२). (४) *यशवंतराव खरे* (१८९२–९५). (५) *मी* (१८९३–९५). (६) *जग हे असे आहे* (१८९७–९९). (७) *भयंकर दिव्य* (१९०१–०३). (८) *आजच* (अपूर्ण, १९०४–०६). (९) *मायेचा बाजार* (१९१०–१२). (१०) *कर्मयोग* (अपूर्ण, १९१३–१७).

**ऐतिहासिक कादंबऱ्या :** (१) *म्हैसूरचा वाघ* (अपूर्ण, अनुवादात्मक, १८९०–९१). (२) *उषःकाल* (१८९५–९७). (३) *केवळ स्वराज्यासाठी* (१८९८–९९). (४) *रूपनगरची राजकन्या* (१९००–०२). (५) *चंद्रगुप्त* (१९०२–०५). (६) *गड आला पण सिंह गेला* (१९०३–०४). (७) *सूर्योदय* (१९०५–०६). (८) *मध्यान्ह* (अपूर्ण, १९०६–०८). (९) *सूर्यग्रहण* (अपूर्ण, १९०८–०९). (१०) *काळकूट* (अपूर्ण, १९०९–११). (११) *वज्राघात* (१९१३–१५).

हरिभाऊंच्या सामाजिक कादंबऱ्यांतून पुण्यातील तत्कालीन पांढरपेशा हिंदुसमाजाचे हुबेहूब चित्रण पहावयास मिळते. "माझ्या कादंबऱ्यांत एकही पात्र असे नाही की जे व्यवहारात मी प्रत्यक्ष पाहिले नाही," असे ते म्हणत असत. सामाजिक व ऐतिहासिक कादंबऱ्यांच्या क्षेत्रात, संख्या व गुणवत्ता या उभयविध गुणांमुळे क्रांती घडवून आणणारे व सुमारे पंचवीस–तीस वर्षे या क्षेत्रात अप्रतिहत लेखणी गाजविणारे पहिले कादंबरीकार हरिभाऊ हेच होत. त्यामुळेच या काल-खंडातील कादंबरीलेखनास 'हरिभाऊंचे युग' असेच संबोधण्यात येते. विधवांच्या दुःस्थितीवर प्रकाश टाकणारी 'पण लक्षात कोण घेतो ?' ही त्यांची कादंबरी सर्वोत्कृष्ट मानली जाते. मराठी कादंबरीकारांत सर्वश्रेष्ठतेचा मान हरिभाऊंना प्राप्त करून देण्यात या कादंबरीचा सिंहाचा वाटा आहे. त्यांच्या सर्वच सामाजिक कादंबऱ्यांतून तत्कालीन नवोदित मध्यमवर्गीय समाजाच्या कौटुंबिक स्थितीगतीचे प्रत्ययकारी चित्रण घडते. 'गणपतराव'मधून त्यांनी स्त्रीशिक्षण, प्रौढविवाह, पुनर्विवाह यांची तरफदारी केलेली दिसते. गो. बा. कानिटकर आणि त्यांच्या पत्नी काशीताई या सुशिक्षित दांपत्याशी हरिभाऊंच्या असलेल्या स्नेहाचा संदर्भ या लेखनामागे जाणवतो. कारण जॉन स्टुअर्ट मिल् यांच्या 'सब्जेक्शन ऑफ विमेन' या प्रबंधाचे 'स्त्रियांची परवशता' हे भाषांतर कानिटकरांनी केलेले होते. त्यामुळे आणि भोवतालच्या समाजाच्या डोळस निरीक्षणामुळे हरिभाऊंच्या सामाजिक कादंबऱ्यांना आपली दिशा सापडली. वस्तुस्थितीदर्शक कादंबऱ्यांचे ते पहिले प्रभावी प्रवर्तक तर खरेच; पण वास्तववादाला ध्येयवादाची जोड देऊन त्यावेळच्या समाजाचे त्यांनी यथार्थ दर्शन घडविले.

'उपःकाल' आणि त्यानंतरच्या नऊ ऐतिहासिक कादंबऱ्यांमुळे त्यांनी ऐतिहासिक कादंबरीचे नवे पर्वच सुरू केले. 'सूर्योदय', 'मध्यान्ह', 'सूर्यग्रहण', 'गड आला, पण सिंह गेला' या त्यांच्या शिवकालाची पार्श्वभूमी घेऊन लिहिलेल्या प्रसिद्ध कादंबऱ्या होत. चंद्रगुप्त मौर्यांच्या प्राचीन कालापासून संभाजी-राजारामाच्या मध्ययुगीन काळापर्यंतचा ऐतिहासिक कथाभाग त्यांच्या कादंबऱ्यांनी व्यापलेला असून प्रत्येक कादंबरीत सुयोग्य अशा ऐतिहासिक वास्तवाची निर्मिती साधलेली आहे. ऐतिहासिक कादंबरीकार म्हणून त्यांनी मिळविलेले स्थानही आजपर्यंत अबाधित आहे. ओघवती भाषा, जिवंत व्यक्तिचित्रणे, सुंदर निसर्गवर्णने अशा गुणांमुळे त्यांच्या कादंबऱ्या यशस्वी झाल्या.

त्यांच्या सामाजिक कादंबऱ्यांमधील अनुभवक्षेत्र पुण्यातील पांढरपेशा समाजापुरते मर्यादित असल्यामुळे डॉ. केतकरांनी त्या कादंबऱ्यांना 'सदाशिवपेठी कादंबऱ्या' असे संबोधिले आहे. परंतु ज्या समाजाची अनुभूती होती त्यावरच लेखन केल्यामुळे त्या कादंबऱ्यांची प्रत्ययकारिता वाढलेली आहे.

त्यांनी अन्यही विपुल साहित्यनिर्मिती केली. त्यांनी लिहिलेल्या नाटक-प्रहसनांपैकी *संत सखू* (१९११), *सती पिंगळा* (१९२१) ही दोन नाटके स्वतंत्र असून *तीन नाटके* व *तीन प्रहसने* (१९१०) रूपांतरित आहेत. *धूर्त विलसित*, *मारून मुटकून वैद्यबुवा* व *जबरीचा विवाह* ही तिन्ही प्रहसने फ्रेंच नाटककार मोलिएर यांच्या प्रहसनांची रूपांतरे असून *जयध्वज* (व्हिक्टर ह्यूगोचे 'हेर्नानी') *श्रुतकीर्तिचरित* (कॉंग्रेव्हचे 'द मोर्निंग ब्राइड') आणि *सुमतिविजय* (शेक्सपिअरचे 'मेझर फॉर मेझर') ही रूपांतरित नाटके आहेत. याशिवाय *मास-कथीच्या नाटककथा* (१९१७) व तीस पस्तीस स्फुट गोष्टीही त्यांनी लिहिल्या. त्यांच्या कथा आपल्या दृष्टीने पाल्हाळिक वाटल्या तरी त्यातील प्रत्ययकारिकत्वामुळे आजही वाचनीय वाटतात. आधुनिक मराठी कथेच्या निर्मितीचा मानही हरिभाऊंकडेच जातो. *घटकाभर करमणूक* व *स्फुट गोष्टी* भाग १ ते ४ (१९१७) मधून त्यांच्या कथा संग्रहित केल्या आहेत. त्यांनी *रवींद्रनाथांच्या गीतांजली*चा चरित्र व काव्यविवेचनासह केलेला गद्य अनुवाद (१९१७) व *विदर्भवाङ्मय* (१९११) ही मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या तेराव्या वार्षिक सभेपुढे दिलेल्या व्याख्यानांची पुस्तिकादेखील प्रसिद्ध आहे. 'आठ स्त्रीरत्ने' या सदराखाली त्यांनी भास्कराचार्यांची लीलावती, राणी दुर्गावती इत्यादी स्त्रियांची दिलेली माहिती बोधप्रद आहे. याशिवाय त्यांनी अनेक पुस्तकांना प्रस्तावना लिहिल्या आहेत. 'केशवसुतांची कविता' व गो. ब. देवल यांचे 'शारदा' नाटक प्रकाशात आणण्याचे श्रेयही हरिभाऊंकडेच जाते. ललित वाङ्मयाला सुशिक्षित समाजात प्रतिष्ठा

मिळवून देण्याचे व वाङ्मयाभिरुचीला इष्ट वळण देण्याचे त्यांचे कार्य अतिशय महत्त्वाचे आहे.

वि. ह. कुलकर्णी, के. ए. पोतदार, निलिमा गुंडी

संदर्भ : (१) वा. मा. आंबेकर, 'हरि नारायण आपटे यांचे संक्षिप्त चरित्र', पुणे, १९२२. (२) वि. बा. आंबेकर, 'हरिभाऊ, काळ आणि कर्तृत्व' नाशिक, १९७२. (३) वेणूबाई पानसे, 'हरि नारायण आपटे : चरित्र व वाङ्मयविवेचन', पुणे, १९३१. (४) संपा. म. ना. अदवंत, 'हरिभाऊ : विविधदर्शन' (अभ्यासकांचे लेख), कोल्हापूर, १९६४. (५) वा. ल. कुळकर्णी, 'हरिभाऊंची सामाजिक कादंबरी', मुंबई, १९७३. (६) ल. म. भिंगारे, 'हरिभाऊ : वाङ्मयविवेचक प्रबंध', कोल्हापूर, १९५६. (७) 'आलोचना', १९६३–६४ (हरि नारायण आपटे विशेषांक). (८) 'वसंत', मार्च, १९६४. (९) विद्याधर पुंडलिक, 'ह. ना. आपटे निवडक वाङ्मय' (साहित्य अकादमी प्रकाशन, १९८९).

**आपटेकर, सालोमन शालोम :** (ज. ३ ऑगस्ट, १८६३ – मृ. २१ मे, १९५७, मुंबई). बेनेइस्रायली नाटककार व कीर्तनसंहिता-लेखक. मूळचे मुंबईचे. मिशनरी शाळेत शिक्षक. सरकारी खात्यात नोकरी.

*एस्तेर राज्ञी चरित्र* (द्वि. आ., १८९५) हे ह्यांचे पहिले पद्यात्मक कीर्तन. अभंग, आर्या, साकी, दिंडी, पदे, अक्षरगणवृत्ते या पद्य प्रकारांतील रचना या कीर्तनात आढळते. *दानिएलचे मानसिक धैर्य* (१८९४), हे अशाच प्रकारचे दुसरे कीर्तन. या कीर्तनरचनेतूनच संगीत नाटके रचण्याची त्यांना प्रेरणा मिळाली. *संगीत दानिएल* (१८९६), *संगीत योसेफ* (१९०६), *गेरापो तीन अंकी, गद्य* (१९२३) ही यांची तीन नाटके प्रसिद्ध आहेत. तत्कालीन मराठी रंगभूमीवरील पौराणिक संगीत नाटकांच्या स्वरूपाची ही नाटके आहेत. ह्या नाटकाचे प्रयोग इस्राएली समाजात १९६० पर्यंत होत राहिले. या नाटकांतून त्यांनी सत्–असत् प्रवृत्तींतील संघर्षाचे चित्रण करून सच्छील वृत्तीला आवाहन केले आहे. नाटकांत पदे भरपूर आहेत. बेनेइस्राएल समाजातील पहिले ज्ञात संगीत नाटककार म्हणून उल्लेखनीय.

रेचल गडकर, मीनल निसळ

**आवटे, त्र्यंबक हरि :** (ज. ४ ऑगस्ट, १८६८ – मृ. १५ जुलै, १९४९). संतवाङ्मयाचे प्रकाशक. प्राथमिक शिक्षण कसेबसे पुरे करून पुण्याच्या आर्यभूषण छापखान्यात जुळाऱ्याची (कंपोझिटर) नोकरी. नंतर केसरी मुद्रणालयात काम. १८९५ पासून स्वतःचा 'इंदिरा छापखाना' काढून ग्रंथप्रकाशनास आरंभ.

पारमार्थिक वृत्तीमुळे वारकरी संतांच्या शिकवणुकीवर गाढ श्रद्धा त्यामुळे धार्मिक ग्रंथप्रकाशनाकडे ओढा. नानामहाराज साखरे संपादित *श्री ज्ञानेश्वरी* (१९०५) हे पहिले प्रकाशन. नामदेव, तुकाराम, निळोबाराय, ज्ञानदेव ह्यांच्या अभंगांच्या गाथाही प्रसिद्ध केल्या. *श्री सकलसंतगाथा* (१९२३) हे त्यांचे महत्त्वाचे प्रकाशन.

गं. दे. खानोलकर, अंजली वऱ्हाडपांडे

**आवासकर, इसहाक शालोम :** (ज. १८५६ – मृ. ८ सप्टेंबर, १९१०, मुंबई). बेनेइस्राएली कीर्तन-संहिता-लेखक. मूळ गाव पनवेल. बालपणीच मुंबईला आगमन. शिक्षण मिशनरी शाळेत. सरकारी खात्यात नोकरी. हिब्रू भाषेवर प्रभुत्व.

ह्यांची *योसेफाख्यान* (द्वि. आ., १९५०) व *एलियाहू हाम्राबीचे आख्यान* (१८९७) ही कीर्तने प्रसिद्ध आहेत. धर्मग्रंथातील उपदेशपर चरित्रावर नवीन आख्याने रचून श्रोत्यांचे ठिकाणी धर्माभिरुची निर्माण करणे हा या कीर्तन-लेखनामागील हेतू. रचना सोपी व रसाळ आहे.

रेचल गडकर, मीनल निसळ

**आष्टमकर, आहारोन (एरन) शिमशोन :** (ज. १८५६, कोरलई–बोरलयी, ता. अलिबाग, जि. कुलाबा – मृ. ४ मार्च, १८९४, पनवेल). बेनेइस्राएली कवी व लेखक. प्राथमिक शिक्षण जन्मगावी, नंतर मुंबईत. ग्रँट मेडिकल कॉलेजमधून डॉक्टरची परीक्षा उत्तीर्ण. त्यानंतर सरकारी नोकरी.

तत्कालीन देशी वृत्तपत्रांतून अनेक विषयांवर यांनी लेख लिहिले. बेनेइस्राएली मंडळीकरिता *तलमूदातील अब्राहाम चरित्र* (१८८१) *दाविदराजाचरित्र* (१८८३), *सद्भक्तवात्सल्य किंवा राज्ञी एस्तेर हिचे आख्यान* (१८९४) ही पद्य कीर्तने लिहिली. *सद्भक्तवात्सल्य* हे ६० पदांचे मोठे कीर्तन आहे. *दुःखिताश्रुमार्जन* (१८८४) हे स्वतंत्र उपदेशपर काव्य, निकटच्या आप्तनिधनामुळे शोकाकुल मानवाच्या सांत्वनासाठी रचले असून, त्याला दक्षिणा प्राईज कमिटीचे बक्षीस मिळाले होते.

रेचल गडकर, मीनल निसळ

**आष्टमकर, बिनयामीन शिमशोन :** (ज. १८४८, कोरलई–बोरलई, ता. अलिबाग, जि. कुलाबा – मृ. १९१०). बेनेइस्राइली कवी आणि लेखक. शिक्षण जन्मगावी व मुंबई येथे. काही काळ 'राबर्टमनी' शाळेत शिक्षक.

ह्यांनी इस्राएली समाजाला धर्मासंबंधी मार्गदर्शन करण्यासाठी अनेक लेख व लहानमोठी पुस्तके लिहिली. हिंदू समाजातील कीर्तन-परंपरेने प्रभावित होऊन 'कीर्तनोत्तेजक मंडळी'ची स्थापन केली. आणि इस्राएली धर्मशास्त्राच्या आधारे अनेक रसाळ कीर्तने रचून, सादर करून स्वसमाजात लोकप्रिय करून दाखवली. *साग्रसंगीत सहनशीलतेचा कळस अथवा दाविदराजाची अमर्याद शांती* (१८९८) हे ह्यांचे पाच अंकी पद्यमय कीर्तनवजा नाटक. ह्या नाटकात ईश्वरभक्त दाविदराजा तालासुरात भजन करताना दाखविला आहे. *इस्राएली धर्मांच्या मुलांसाठी धर्मासंबंधी प्रश्नोत्तरावलि* (१८७७), *पितृभक्ती* (१८८२), *यहुदी धर्मनिष्ठा* (१८८४), *इस्राएलांचा विधि* (१८८७), *इस्राएली धर्मांतील नवलाचे वृत्त* (१८८७), *इस्राएली धर्मोपदेशक* (१८८७), *मोशाच्या शास्त्राचे अधालटत्व* (१८९५) ही त्यांची निबंधवजा छोटी पुस्तके. ह्यांतील काही इंग्रजीवरून व काही हिब्रूवरून भाषांतरलेली आहेत. *मद्यपाननिषेध* (१८८४), *तलमूदातील गोष्टी व म्हणी* (१८८७), *रे. डा. हर्मन आडलर यांचे चरित्र* (१८९४), *इस्राएली कथा-रत्नमाला* ही त्यांची अन्य पुस्तके. 'तेल्वा', 'सत्य प्रकाश', 'ज्ञानदीप' यासारख्या बेनेइस्राएली पत्रकांतून त्यांनी बोधपर व माहितीपूर्ण लेख लिहिले आहेत.

रेचल गडकर, विजया डबीर

० इझीकेल : पहा राजापूरकर, योसेफ येहेजकेल

**उजगरे, भास्कर कृष्ण :** (मनोहर बंधू) (ज. २४ सप्टेंबर, १८८७– मृ. २५ सप्टेंबर, १९३५). मराठीतील ख्रिस्ती वाङ्मयाचे एक प्रमुख प्रवर्तक, कवी व गद्यलेखक. भास्कररावांचा जन्म भांबुर्डा म्हणजे पुण्याच्या सध्याच्या शिवाजीनगर भागात झाला. त्यांचे शिक्षण घोडनदी (शिरूर) येथल्या शाळेत काही वर्षे झाले. तिथेच त्यांना वाचनाची व व्यायामाची गोडी लागली. पुढील शिक्षणासाठी ते अहमदनगरास गेले. विद्यार्थीदशेत असतानाच ते कविता करू लागले होते.

पुढे १९१०-११ साली मिस एमिली बिसल आणि नारायण वामन टिळक 'उपासनासंगीत' या गीतसंग्रहाची जुळवाजुळव करीत असताना, बिसलबाईंनी उजगरे यांच्याकडे काही लेखनाचे काम सोपविले होते. या कामामुळे त्यांचा टिळकांशी जवळचा संबंध आला.

१९१५ मध्ये त्यांनी टिळकांच्या कविता जमवून टिळकांच्या कविता भाग १ ला हे पुस्तक यांनी प्रसिद्ध केले. टिळकांचे अभंग जमवून

टिळकांची कविता भाग २ किंवा *अभंगांजली* हे पुस्तक त्यांनी तयार केले. ते १९२० मध्ये प्रसिद्ध झाले.

भास्कररावांनी मराठी भाषेचा आणि मराठी ख्रिस्ती वाङ्मयाचा चांगला अभ्यास केलेला होता. मनोरंजन, नवयुग, बालबोधमेवा वगैरे नियतकालिकांतून त्यांचे अनेक लेख व कविता प्रसिद्ध झाल्या. ख्रिस्ती भक्तिपद्धती आणि संकल्पना इंग्रजीतून मराठीत भाषांतरित करताना पर्यायी मराठी शब्द निवडण्यात त्यांचा मोठा वाटा होता.

महाराष्ट्र साहित्य परिषदेशी त्यांचा घनिष्ठ संबंध होता. परिषदेच्या कार्यकारिणीत न. चिं. केळकर, डॉ. पां. वा. काणे, द. बा. पोतदार यांसारख्या नामवंत मराठी साहित्यिकांसमवेत भास्कररावही निवडून आले होते. त्यांची चिटणीस पदावर निवडही झाली होती. पण त्यांच्या अकाली निधनामुळे हे पद ते भूषवू शकले नाहीत.

मराठी ख्रिस्ती साहित्यिकांनी एकत्र यावे, स्वतंत्रपणे विचार करून साहित्यसेवा करावी, अशा प्रकारचे विचार नवनिर्मित मराठी ख्रिस्ती समाजात विसाव्या शतकाच्या सुरुवातीपासूनच घोळू लागले होते. त्याला मूर्त स्वरूप रे. उजगरे यांनी दिले.

१९२७ ते १९३३ या कालखंडात त्यांनी नाशिक, मुंबई व निपाणी येथे मराठी ख्रिस्ती साहित्यसंमेलने भरविण्यात पुढाकार घेतला होता. मराठी भाषेची व साहित्याची मराठी ख्रिस्ती समाजाला गोडी लागावी म्हणून त्यांनी खूप परिश्रम घेतले. 'महाराष्ट्रीय ख्रिस्ती साहित्य सेवा मंडळ' स्थापण्यात पुढाकार घेतला. त्यांचे बंधू मनोहर कृष्ण उजगरे या मंडळाचे अध्यक्ष असून स्वतः भास्करराव चिटणीस होते. याच मंडळातर्फे १९२७ मध्ये भरलेल्या पहिल्या संमेलनात वाचण्यात आलेले सहा निबंध 'मराठी ख्रिस्ती वाङ्मयाचा इतिहास, १८१०–१९२७' या शीर्षकाखाली १९३१ मध्ये भास्कररावांनी प्रकाशित केले.

सदानंद नाईक, विद्यागौरी टिळक

वाङ्मय : तरुणोपाय–मुंबई १९२८ महाराष्ट्रीय ख्रिस्ती साहित्याचे सामान्य समालोचन व तत्संबंधी काही संकीर्ण सूचना (निबंध) (मराठी ख्रिस्ती वाङ्मयाचा इतिहास–पृष्ठ १० ते ५१) सासवड–१९३१.

संपादन : *टिळकांची कविता*, पुस्तक पहिले–मुंबई १९१४, आ. २ री १९२६, ३ री १९४०, ४ थी १९५१. *टिळकांची कविता*–पुस्तक दुसरे, मुंबई १९१९, आवृत्ती दुसरी–नाशिक, १९३०, आवृत्ती तिसरी १९५४, आवृत्ती चौथी १९५९.

प्रकाशन : *मराठी ख्रिस्ती वाङ्मयाचा इतिहास*, सासवड, १९३१, चरित्र, चर्चा, अभ्यास. मोरजे गं. ना. *ख्रिस्ती मराठी वाङ्मय*, अहमदनगर, १९८४.

**उदास, यशवंतराव आनंदराव :** (ज. १८४२, ओतूर, जि. पुणे– मृ. ४ मार्च, १८७७, मुंबई). स्थलवर्णनकार. शिक्षण पुणे व मुंबई येथे. बी.ए. नंतर मध्यप्रांत वऱ्हाडच्या शाळा खात्यात नोकरी. काही वर्षे सरकारी खात्यात मराठी भाषांतरकार. क्षयामुळे अकाली मृत्यू.

यांचे *पोमसहाचळेश्वरवर्णन* (१८७९, १८९१) हे स्थलवर्णनपर पुस्तक प्रसिद्ध आहे. स्थलवर्णन, क्षेत्रमाहात्म्य, इतिहासप्रकरण आणि निबंधसार असे या पुस्तकाचे चार विभाग पाडलेले आहेत. ह्यांनी लेथब्रिजच्या इतिहासाचे मराठी भाषांतरही केले होते.

गं. दे. खानोलकर, चंद्रकांत कुलकर्णी

संदर्भ : 'विविधज्ञानविस्तार' मासिक (मे-जून-जुलै, १८७८, पृ. १६७).

**० उदासी :** पहा पाळंदे, नीलकंठ रामकृष्ण

**उपसकर, बावा :** ० पूर्णदास : (ज. १७७८ – मृ. १८७०). संतकवी. उपनाव राजाध्यक्ष. मूळचे सावंतवाडीजवळील उसप येथील–म्हणून उसपकर नावाने परिचित. गोपाळदास-नामक दत्त सांप्रदायिक सत्पुरुषापासून उपदेश व 'पूर्णदास' हे नाव प्राप्त.

या ग्रंथाची रचना पारमार्थिक स्वरूपाची आहे. *ज्ञानघन* (६,००० ओव्या) व *स्वात्मानुभव* हे दोन ग्रंथ यांनी लिहिले. पैकी 'स्वात्मानुभव' हा ग्रंथ उपलब्ध नाही. यांची कविता सोपी व प्रासादिक आहे. यांच्या एकूण कवितांपैकी *पूर्णसार* (गोवे, १८९६) हा ग्रंथ व काही स्फुट कविताच फक्त मुद्रित झाल्याचे आढळते.

उषा टाकळकर, मीनल निखळ

**उपाध्ये, जयकृष्ण केशव :** (ज. ३० मे, १८८३, नागपूर–मृ. १ सप्टेंबर, १९३७, नागपूर). कवी. वास्तव्य नागपूर येथे. बालपणापासून आध्यात्मिकतेकडे ओढा. वयाच्या तेविसाव्या वर्षी हनुमानगड (वर्धा) येथे तीन वर्षे रामनामाचा जप. तीर्थयात्रा करीत देशभ्रमण. पत्नी व मुलगी यांच्या अकाली निधनामुळे प्राप्त झालेले एकाकीपण, वृत्तीला आलेले उदासीनपण. मित्रमंडळीत 'बुवा' या नावाने प्रसिद्ध.

यांनी वयाच्या सोळाव्या वर्षापासून काव्यरचनेला प्रारंभ केला. *पोपटपंची* (१९२९) हा यांच्या स्फुट कवितांचा संग्रह. ह्या संग्रहात १९०९ ते १९२९ या काळातील निवडक ४३ कवितांचा समावेश आहे. विषयांची विविधता व श्लेषयुक्त सफाईदार रचना, हे यांच्या कवितेचे विशेष. शृंगार, विनोद, विडंबन, स्वधर्म व स्वराष्ट्रभक्ती इत्यादी विविध विषयांना त्यांची कविता स्पर्श करते. 'श्रीरामराज्याभिषेक', 'जगन्मोहिनी', 'अहिल्याकृत रामस्तुती', 'द्रौपदीचा धावा' इत्यादी भक्तिभाव प्रगट करणाऱ्या व पत्नी आणि कन्या यांच्या अकाली निधनामुळे झालेले दुःख अत्यंत आर्त गीतातून व्यक्त करणाऱ्या 'बुवां'नी 'आता मला न माझी', 'वहाव्वळपणा', 'कविते, करिन तुला मी ठार', 'चालचलाऊ गीता' (गीतेच्या पहिल्या अध्यायाचे नागपुरी बोलीतील विडंबन), 'बावलट बाळू' यासारख्या विनोदी व विडंबनात्मक कविताही रचल्या आहेत. जयदेवाच्या 'गीतगोविंदा'च्या धर्तीवरील त्यांचे *गीतराघव* हे काव्यही मनोवेधक आहे. *श्रीलोकमान्यचरितामृत* (१९२४) हे लो. टिळकांवरील भक्तिभावनेने रचलेले ओवीबद्ध दीर्घकाव्य. 'जनजागृतिकार', 'राष्ट्रसूत्रधार', 'प्राचीन तत्त्वभास्कर', 'निजजनकल्पतरू' या शब्दांत ते लोकमान्यांचा गौरव करतात. त्यांचे उमरखय्यामच्या *रुबाया व षट्पदी* (१९३२) हे फिट्झजेराल्डच्या काव्याच्या इंग्रजी अनुवादावरून केलेले मंदाक्रांता वृत्तातील रसाळ रूपांतरही वेधक आहे. संग्रहात नसलेल्या त्यांच्या काही कविता 'वागीश्वरी', 'विहंगम' इत्यादी नियतकालिकांतून प्रसिद्ध झाल्या आहेत. नागपूरकडील भागातील कविता गायनाच्या पद्धतीचे आद्यप्रवर्तक म्हणूनही बुवा उपाध्ये प्रसिद्ध होते. कवी राजा बढे हे उपाध्यांचे शिष्य म्हणून ओळखले जातात.

विजया डबीर, द. वि. तेंडुलकर, लता जाधव

संदर्भ : (१) अनेक लेखक : 'ज. के. उपाध्ये व्यक्ती व काव्यपरिचय', 'विहंगम', सप्टेंबर, १९३७, पृ. ६७०–६८३. (२) पाठक, या. मु. 'पोपटपंची' (परीक्षण), 'वागीश्वरी', मार्गशीर्ष, शके १८५१ (१९२९), पृ. १३८-१४४.

**उमरीकर, सदानंदमहाराज ऊर्फ बाबामहाराज :** (ज. १८३८– मृ. १९२४). संतपरंपरेतील आधुनिक काळातील एक कवी. उद्धवचिद्घनांच्या अंबेजोगाई येथील वंशशाखेत जन्म. ह्यांनी बरीच अध्यात्मपर कविता (सुमारे पस्तीस हजार) लिहिली. परंतु त्यांचे *सुंदरविलास दीपिका* व *देशिकलीलामृत* हे दोनच ग्रंथ प्रसिद्ध आहेत (१९३६); 'सुंदरविलास दीपिका' हा सुंदरदास-रचित 'सुंदरविलास' या हिंदी ग्रंथाचा मराठी भावानुवाद आहे. हा ग्रंथ अद्वैततत्त्वज्ञानपर आहे. *देशिकलीलामृत* (रचना, इ. स. १८७४) ग्रंथात कवीने आपले आजे व गुरू बाळकृष्ण ह्यांचे चरित्र वर्णिले आहे.

गं. बि. कविटकर, शीला खामापूरकर

संदर्भ : जोशी चि. नी. – 'मराठवाड्यातील अर्वाचीन वाङ्मय, पद्य-विभाग (सन १८१८-१९३८)'; पुणे, १९३९, पृ. १-१११.

**ऊर्ध्वरेषे, वामन गोपाळ :** (ज. १८९२, मर्दाना, जुने होळकर संस्थान – मृ. १९४१). भासाच्या नाटकांचे अनुवादक-संपादक आणि मराठी पंडिती काव्याचे संपादक. शिक्षण इंदूर येथे. एम्.ए. (संस्कृत), काव्यतीर्थ. होळकर कॉलेज, इंदूर येथे प्रारंभी संस्कृतचे (१९२२-३१) व १९३१ नंतर मराठीचे प्राध्यापक.

प्रा. ऊर्ध्वरेषे ह्यांनी संस्कृत महाकवी भास ह्यांच्या *पंचरात्रम्* (१९२३), *स्वप्नवासवदत्ता* (१९३०) व *मध्यमव्यायोग* (१९३७) या नाटकांच्या मराठी अनुवादासह सटीक आवृत्त्या प्रकाशित केल्या. वामनपंडितकृत *भामाविलास*, *नामसुधा*, *वेणुसुधा* तसेच मोरोपंतांचे *आर्याभारत* इत्यादी मराठी काव्यांच्या सटीक आवृत्त्याही (१९३५-४०) प्रसिद्ध केल्या. *मराठीचे नवे शुद्धलेखन* (१९३७-३८) व रामचंद्रपंत अमात्य-कृत *आज्ञापत्र* (संपादन : १९३७-३८) ही यांची अन्य पुस्तके.

'महाराष्ट्र साहित्य सभा, इंदूर' या संस्थेचे २०–२५ वर्षे सरचिटणीस, उपाध्यक्ष इत्यादी पदांवरून मध्यभारतात मराठी भाषा व साहित्य ह्यांच्या संवर्धनाचेही काम त्यांनी केले. 'माळव–साहित्य' ह्या त्रैमासिकाचे ते एक संपादक होते.

अ. अ. बडोदकर

० **एक ब्राह्मण :** पहा देशमुख, गोपाळ हरि

० **एक हिंदू :** पहा पडवळ, तुकाराम तात्या

**एकबोटे, कृष्णाजी अनंत :** ० सहकारी कृष्ण (ज. १८८६, पुणे–मृ. २३ नोव्हेंबर, १९१६). सामाजिक व ऐतिहासिक कादंबरीकार. शिक्षण मॅट्रिकपर्यंत. त्यानंतर पोलीस खात्यात मुख्य कारकून. सरकारी नोकरीमुळे लेखनासाठी 'सहकारी कृष्ण' हे नाव स्वीकारले.

समाजाला–विशेषतः मध्यमवर्गीय पांढरपेशा समाजाला, वळण लावावे, त्यांना मार्गदर्शन करावे, ह्या हेतून यांनी १९१३ साली 'कुटुंब शिक्षण-माला' काढली; व त्या मालेतून लहानमोठ्या अशा सुमारे पस्तीस सामाजिक कथा कादंबऱ्या प्रसिद्ध केल्या. काही ऐतिहासिक कादंबऱ्याही यांनी लिहिल्या आहेत. पुरुषार्थाची योग्य दिशा धरण्याकरिता, उदात्त ध्येयाची ओळख पटविण्याकरिता, ज्यात मनुष्यमात्राच्या उच्च व नाजूक विचारांचे व विकारांचे प्रदर्शन केले असेल अशा गोष्टी आणि कादंबऱ्या प्रसिद्ध करणे, हे यांच्या मालेचे उद्दिष्ट होते. *ही प्रेमाची मूसकी पुरुषार्थाची मूस* (१९१३), *माझी कहाणी* (१९१३), *हा संसार की नरकवास* (१९१३), *आत्मोद्धार* (१९१३), *देहस्वभाव* (१९१४), *संक्रान्त* (१९१४), *शिकली पण चीज केलं* (१९१४), *हा अपमानाचा मान* (१९१४), *संकट की सौभाग्य* (१९१५), *खुनाचा आरोप* (१९१५), *पैशाचा महिमा* (१९१५) ही त्यांच्या काही कादंबऱ्यांची नावे. मध्यमवर्गीय कुटुंबीय जीवनाचे वास्तव चित्र रेखाटण्याचा त्यांचा प्रयत्न यातून स्पष्ट दिसतो.

मध्यमवर्गीय जीवनातील वेगवेगळे प्रश्न वाचकांच्या समोर मांडण्यासाठी कथानकाची, घटनांची व पात्रांची ते कसोशाने निवड करतात. ही पात्रे व घटनादेखील आपल्या अवतीभवतीच्या परिचित जीवनातील असतात. त्यामुळे तसेच, सरळ आणि परिणामकारक निवेदनशैलीमुळे त्यांच्या कथा-कादंबऱ्या वाचनीय झाल्या आहेत. कलादृष्टीपेक्षा ते उपदेशाला आणि बोधालाच अधिक महत्त्व देत असल्यामुळे त्यांचे साहित्य कलात्मकतेच्या दृष्टीने काहीसे उणे पडते.

सामाजिक कादंबऱ्यांपेक्षाही त्यांच्या ऐतिहासिक कादंबऱ्या अधिक प्रसिद्ध आहेत. *राजकुंवर* (१९१५) ही गणोजी शिर्के ह्याचा राजद्रोह व त्याची पत्नी राजकुंवर हिची स्वामिनिष्ठा ह्यांचा संघर्ष चित्रित करणारी ही कादंबरी आहे आणि *शापित महाराष्ट्र* ही राजाराम ह्यांच्या कारकिर्दीतील प्रमुख घटनांचे चित्रण करणारी ऐतिहासिक कादंबरी आहे. वास्तव घटनांना धक्का न लावता ऐतिहासिक वातावरण निर्माण करण्यात सहकारी कृष्ण यशस्वी झालेले दिसतात. नानासाहेब पेशव्यांच्या काळातील त्रिंबक ह्या पराक्रमी स्वामिभक्ताची कथा सांगणारी *अखेरचा स्वार्थत्यागी देशस्थ* (१९१६) ही त्यांची तिसरी व अखेरची ऐतिहासिक कादंबरी. एक समाजहिताच्या तळमळीचे लेखन करणारा साहित्यिक म्हणून सहकारी कृष्णांची वाङ्मयीन कामगिरी उल्लेखनीय आहे.

म. ना. अदवंत, विजया डबीर

**ओक, जनार्दन विनायक :** (ज. १८९७, पुणे – मृ. २२ एप्रिल, १९१८, पुणे). नियतकालिकाचे संपादक व कोशकार. शिक्षण पुणे येथे. मॅट्रिकच्या परीक्षेत जगन्नाथ शंकरशेट शिष्यवृत्ती. डेक्कन कॉलेजातून एम्.ए. (१९०१). तीन वर्षे फर्ग्युसन महाविद्यालयात प्राध्यापक. नंतर काही वर्षे मध्यप्रांत वऱ्हाडात शिक्षणखात्यात नोकरी. एक वर्ष नागपूर येथील नील सिटी हायस्कूलचे मुख्याध्यापक आणि नंतर प्रो. विष्णू गोविंद विजापूरकर यांनी तळेगाव (दाभाडे) येथे स्थापलेल्या 'समर्थ विद्यालया'त शिक्षक.

१९१२ साली त्यांनी *लोकशिक्षण* नावाचे मासिक पुस्तक व 'लोकशिक्षणमाला' या नावाची एक पुस्तकमाला सुरू केली. या मासिकाचा उद्देश लेखनद्वारा लोकसेवा करणे, सामाजिक, धार्मिक, नैतिक, औद्योगिक, शिक्षणविषयक व शास्त्रीय विषयांवर लेख प्रसिद्ध करून, बहुजनसमाजाला ज्ञानसंपन्न करणे हा होता. डॉ. केतकर, प्रा. वा. म. जोशी, ना. गो. चापेकर, द. वा. पोतदार यांसारखी शिक्षकमंडळी लोकशिक्षण या नावाला साजेसे लेखन या मासिकात करीत. ओकांचे दुसरे महत्त्वाचे कार्य म्हणजे *गीर्वाण लघुकोशा*ची निर्मिती हे होय. समर्थ विद्यालयात रामायण, महाभारत, भागवत, उपनिषदे, भगवद्गीता, मनुस्मृती यांसारखे आर्यसंस्कृतिदर्शक ग्रंथ वाचण्याची विद्यार्थ्यांत क्षमता यावी व या ग्रंथातील संस्कृत भाषेचे चैतन्यमय स्वरूप त्यांच्या दृष्टीस पडावे, या दृष्टीने त्यांनी संस्कृतचे अध्यापन केले. या संस्कृत ग्रंथांचे वाचन करताना मराठी विद्यार्थ्यांस साहाय्य होईल असा *गीर्वाण लघुकोश* (१९१५) त्यांनी तयार केला. संस्कृत ग्रंथाचा अभ्यास करू इच्छिणाऱ्या मराठी भाषिकांच्या दृष्टीने हा कोश अतिशय उपयुक्त आहे.

गं. दे. खानोलकर

**ओक, वामन दाजी :** ० वा. दा. ओ. (ज. १८४५, हेदवी, जि. चिपळूण–मृ. १३ जून, १८९७, नागपूर). कवी, समीक्षक, 'काव्यसंग्रह' मासिकाचे संपादक. रत्नागिरी हायस्कूलमधून मॅट्रिक (१८७०). संस्कृतची पहिली जगन्नाथ शंकरशेट शिष्यवृत्ती. हायस्कूलमध्ये डॉ. भांडारकरांच्या मार्गदर्शनाखाली संस्कृतचा अभ्यास. विल्सन कॉलेजात प्रवेश. पण उच्च शिक्षण अपूर्ण. मुख्याध्यापक या नात्याने अनेक शाळांतून काम.

नागपूर येथे हरिमाधव पंडित ह्यांच्यासारख्या व्यासंगी व संशोधक वृत्तीच्या व्यक्तीशी ओकांचा गाढ स्नेह जमला. ओक नागपूर बाहेर असताना त्यांचा व पंडितांचा परस्परांशी वाङ्मयविषयक पत्रव्यवहार सुरू असे. अशाच प्रकारची मोरोपंतकृत रामायणाच्या संदर्भातील त्यांची पत्ररूप चर्चा 'शालापत्रक' मासिकात (वर्ष दुसरे) 'एक वाचक' व 'दुसरा वाचक' या नावांनी प्रसिद्ध झाली आहे. रा. भि. गुंजीकरानंतर सातव्या वर्षापासून, 'विविधज्ञान विस्तार' मासिकाचे संपादकत्व हरिपंत पंडिताकडे आल्यामुळे वामनरावही या मासिकात लेखन करू लागले. 'विस्ताराच्या' वर्ष ९ व १० मध्ये त्यांनी विष्णुशास्त्री चिपळूणकरांच्या 'संस्कृत कविपंचक' या ग्रंथातील 'कालिदास',

भवभूती, बाणभट्ट, सुबंधू व दंडी ह्या निबंधांची मार्मिक परीक्षणे केली. मात्र 'विस्ताराच्या शिरस्त्यानुसार' लेखाखाली त्यांचे नाव घातलेले नाही. या परीक्षणातून प्रकट होणारा. व्यासंग ओकांच्या सर्वच लिखाणातून जाणवतो. 'भारतवर्षीय प्राचीन ऐतिहासिक कोश' या ग्रंथाच्या 'निबंधमाले'तील (अंक ४२) परीक्षणात विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी महाराष्ट्र कवींच्या काव्यात यावनी शब्दांचा पूर्ण अभाव आढळतो अशा आशयाचे विधान केले होते. त्यांचे हे विधान कसे निराधार आहे ते ओकांनी 'निबंधमाले'त (अंक ५०) एक पत्र लिहून स्पष्ट केले. त्यानंतर चिपळूणकरांनी आपले विधान मागे घेतले.

विष्णुशास्त्र्यांच्या 'मोरोपंतांची कविता' या प्रदीर्घ निबंधात निबंधमालेतून जो सविस्तर व साधार समाचार घेतला, त्यावरूनही ओकांच्या सूक्ष्म, व्यासंगी वृत्तीचे दर्शन घडते. दीर्घकाळ (१८७८-८०) चाललेल्या या वादातून मराठी विद्वानांना ओकांच्या वादकौशल्याचा, स्पष्टवक्तेपणाचा व दृढ व्यासंगाचा चांगला परिचय झाला. परिणामतः निर्णयसागर छापखान्याच्या मालकांनी १८९० साली त्यांना 'काव्य-संग्रहा'चे संपादक म्हणून नियुक्त केले. आपल्या सात वर्षांच्या संपादकीय कारकिर्दीत वामनरावांनी *आनंदतनयकृत कविता संग्रह* (१८९१), *अमृतरायकृत कविता संग्रह* (१८९२), *मुक्तेश्वरकृत महाभारत–आदिपर्व* (१८९३), *सभापर्व* (१८९४), *वनपर्व* (१८९८), *कवि अनंतकृत कवितासंग्रह* (१८९६), *वामन पंडितकृत यथार्थदीपिका, अध्याय १–४* (१८९६), *मोरोपंतकृत महाभारत आदिपर्व* (१८९१), *सभापर्व* (१८९१), *वनपर्व* (१८९२), *विराटपर्व* (१८९६), *उद्योगपर्व* (१८९६), *भीष्मपर्व* (१८९८), *कवि विठ्ठलकृत कवितासंग्रह*, *सोहिरोबानाथ आंबियेकृत सिद्धान्तसंहिता – पूर्वार्ध* (१८९६), *देवनाथ महाराज कृत कवितासंग्रह* (आ. दु. १९०१), *अनेक कविकृत पदे, कटाव, लावण्या वगैरे - पदसंग्रह, भाग १* (१८९४), *भाग २* (१८९६), *अनेक कविकृत लघुकाव्यमाला, भाग १* (१८९५), *भाग २* (१८९६), असे अनेक काव्यग्रंथ अर्थनिर्णायक साहित्यशास्त्राविषयी व अवांतर माहितीने परिपूर्ण अशा टीपा देऊन संपादित केले.

सार्वजनिक काका–गणेश वासुदेव जोशी ह्यांच्यावरील *गणपति-निधन विलाप* (१८८०), *श्रीमन्माधवयुपनिधनवर्णनात्मक पद्यरत्नमाला अथवा थोरले माधवराव पेशवे ह्यांचा मृत्यू* (१८८३) ही त्यांची विलापकाव्ये प्रसिद्ध आहेत.

इतिहास संशोधनाच्या क्षेत्रातही त्यांनी स्पृहणीय कार्य केले आहे. *काशीराव गुप्ते विरचित नागपूरकर भोसल्यांच्या संबंधाचे कागद-पत्र* (१८८९) हे 'काव्येतिहाससंग्रहा' तून प्रसिद्ध झालेले ग्रंथ या दृष्टीने उल्लेखनीय आहेत. *लॉर्ड बेकन यांचे चरित्र* (१८८४) व *बाबा नानक ह्यांचे चरित्र* (१८८९) ही दोन निबंधवजा चरित्रे व *कादंबरीकथासार* (१८८९), *मुद्राराक्षसकथासार* (१८८९), *वासवदत्ताकथासार* (१८८९) ही छोटी कथात्मक पुस्तकेही ह्यांची अन्य वाङ्मयीन कामगिरी.

मराठी वाङ्मयाच्या स्थिती - गतीकडे वामनरावांचे बारीक लक्ष असे. 'महाराष्ट्र ग्रंथोत्तेजन' हा त्यांचा एक विचारप्रवर्तक लेख मार्च १८७८ च्या 'विविधज्ञानविस्तारा'त प्रसिद्ध झाला होता. त्यात त्यांनी एकोणिसाव्या शतकात १८७८ पर्यंत झालेल्या मराठी ग्रंथ-प्रकाशनाच्या उद्योगाचा आढावा घेतला आहे. त्याचप्रमाणे भावी काळातील वाङ्मयविषयक चळवळीचे मार्गदर्शनही केले आहे. ऐतिहासिकदृष्ट्या ते महत्त्वाचे आहे.

विजया डबीर, गं. दे. खानोलकर

संदर्भ : वि. कों. ओक, 'वामन दाजी ओक' ('बालबोध', जुलै १८९७).

**ओक, विनायक कोंडदेव** : (ज. २५ फेब्रुवारी, १८४०, हेदवी, जि. रत्नागिरी - मृ. ९ ऑक्टोबर, १९१४, मुंबई). चरित्रकार, निबंधकार, 'बालबोध' मासिकाचे संपादक. आईवडिलांचा मृत्यू व घरची गरिबी यामुळे शिक्षणाची परवड. पोटासाठी त्यांना अनेक ठिकाणी वणवण करावी लागली. सातारा येथून इंग्रजी तिसरी उत्तीर्ण झाल्यावर त्यांनी स्वपरिश्रमाने इंग्रजीचे ज्ञान संपादन केले. १८६१ पासून त्यांनी शिक्षणखात्यात शिक्षकाची नोकरी केली. १८९५ साली सहाय्यक दुय्यम तपासनीस म्हणून ते सेवानिवृत्त झाले (१८६८–८०). अहमदनगर येथील मराठी शाळेत हेडमास्तर.

ओकांनी वयाच्या ३४-३५ व्या वर्षी लेखनास सुरुवात केली. त्यांची लहानमोठी मिळून सुमारे पासष्ट पुस्तके प्रसिद्ध आहेत. त्यांत चरित्र, निबंध, इतिहास, कथा, कविता, अशा विविध प्रकारच्या पुस्तकांचा समावेश आहे. इंग्रजी निबंधांच्या आधारे लिहिलेले *लघुनिबंधमाला* (१८८६) हे त्यांचे पहिले पुस्तक. निबंधसंग्रहाला दक्षिणा प्राइझ कमिटीचे बक्षीस मिळाले.

त्यांची सोळा पुस्तके चरित्रपर आहेत. त्यातील *जायजी दादाजी* (१८९२) व *दिनकरराव राजवाडे* (१८९७) यांसारख्या स्वकीय अपवाद वगळता त्यांचे इतर चरित्रनायक बाहेरचे आहेत. *पीटर दी ग्रेट ह्यांचे चरित्र* (१८७४), *ड्यूक ऑफ वेलिंग्टन* (१८७६), *वॉरन हेस्टिंग्ज* (१८७९), *आल्फ्रेड दि ग्रेट* (१८८२), *सर टॉमस मन्रो* (१८८६), *एब्राहाम लिंकन* (१८९०) ही उल्लेखनीय पुस्तके. थोर पुरुषांच्या जीवनक्रमातील फक्त अनुकरणीय गोष्टी सांगून बालकांच्या मनावर चांगले संस्कार करणे, हा त्यांचा चरित्र लेखनामागचा उद्देश होता.

मराठी वाचकांची करमणूक साधून त्यांना इतिहासाची गोडी लावावी या भूमिकेतून त्यांनी *हिंदुस्थान कथारस* (१८७१), *शिपायांच्या बंडाचा इतिहास* (१८७४), *फ्रान्स देशातील राज्य-क्रान्तीचा इतिहास* (१८७६) व *इतिहास तरंगिणी* (१८७८) ही पुस्तके लिहिली.

ओकांनी गोष्टींची, निबंधांची त्याचप्रमाणे माहितीपर अशी अनेक पुस्तके लिहिली. त्यांपैकी *मधुमक्षिका* (१८७१) व *मुलांस उत्तम बक्षीस* (१८७९) ही लोकप्रिय झाली होती. *शिरस्तेदार* (१८८१) लाच खाण्यापासून होणाऱ्या दुष्परिणामाचे वेधक वर्णन तीत आढळते.

मुलांकरिता *बालबोध* (१८८१) नावाचे मासिक काढून ओकांनी ते चौतीस वर्षे (१८८१ ते १९१५) चालविले. विविध प्रकारच्या लिखाणाद्वारे मुलांचे रंजन करून त्यांच्या ठिकाणी सद्‌गुणांची वाढ करावी असा त्यांचा प्रयत्न होता. या मासिकातील विविध सदरांतून त्यांनी ४०८ चरित्रे, ४०२ कविता व ४०२ नीतिपर निबंध, ३७१ शास्त्रीय विषयांवरील व ८५० किरकोळ विषयांवरील लेख एवढे विविध प्रकारचे व विपुल लेखन केले. 'बालबोध'चे काम त्यांनी बहुतेक एकहाती ठेवले होते. त्यामुळे त्यांना ते दीर्घकाळ नियमितपणे चालविता आले. या मासिकाने मुलांना ज्ञानदान केले, त्याचप्रमाणे त्यांच्या मनात सदविचारांची पेरणी केली. लहान वाक्ये आणि व्यवहारातील संस्कृत शब्दांचा वापर यामुळे ओकांची भाषा साधी, सरळ व सोपी वाटते. त्यांच्या लिखाणात स्वतंत्र विचारशक्तीचा आढळ होत नसला तरी आकर्षक, आटोपशीर, सुबोध लेखनशैलीमुळे ते रोचक झाले आहे.

कृ. भि. कुळकर्णी, विजया डबीर

संदर्भ : अ. म. जोशी, 'अर्वाचीन मराठीतील आद्य चरित्रकार' (केसरी, १२ ऑक्टोबर, १९७५).

**ओगले, केशव लक्ष्मण :** (ज. १८८२–मृ. १९४८). भाषांतरकार, पत्रकार, संस्कृत साहित्याचे व धर्मशास्त्राचे अभ्यासक. शिक्षण बी.ए. व्यवसाय शिक्षक, संपादक व अनुवादक.

ओगल्यांनी विपुल राजकीय लेखन केले. 'राष्ट्रमत', 'लोकमान्य', 'श्री लोकमान्य' आणि साप्ताहिक 'प्रबोधन' या पत्रांत त्यांनी संपादकीय खात्यात कामे केली.

लो. टिळकांच्या 'आर्क्टिक होम इन द वेदाज' आणि 'द ओरायन' या पुस्तकांची त्यांनी अनुक्रमे *आर्य लोकांचे मूलस्थान अथवा ध्रुवाजवळील आर्यांच्या वस्तीविषयी वेदातील पुरावा* (१९१०) आणि *वेदकालनिर्णय* (आ. २ री, १९२८) ही भाषांतरे केली. ओगल्यांनी महामहोपाध्याय पां. वा. काणे ह्यांच्या संस्कृत साहित्यशास्त्राचा ऐतिहासिक आढावा घेणाऱ्या इंग्रजी निबंधाचा *संस्कृत साहित्यशास्त्राचा इतिहास* (१९३१) हा अनुवाद केला असून, त्यांनी दिलेली 'हिंदुधर्मशास्त्रा'वरील २१ व्याख्याने काळजी-पूर्वक लिहून काढून *धर्मशास्त्रविचार* (१९३५) या पुस्तकाद्वारे ती प्रसिद्ध केली. ओगल्यांचे बरेचसे स्फुट लिखाण 'विविधज्ञानविस्तारा'त प्रसिद्ध झाले आहे. *कविकुलगुरु कालिदास* (१९३४) हे त्यांचे पुस्तक स्वतंत्र असून त्यात त्यांनी कालिदास व त्याचे वाङ्मय यांचा आटोप-शीर पण सर्वांगीण परिचय करून दिला आहे. *लोकमान्य टिळकांची वेदविषयक कामगिरी* (१९२४) हे टिळकांच्या पुस्तकांचे स्वरूपदर्शन व रसग्रहण करणारे निबंधवजा पुस्तकही प्रसिद्ध आहे.

ग. दे. खानोलकर, विजया दबीर

**ओगले, गुरुनाथ प्रभाकर :** (ज. १८८७, बावडा, कोल्हापूर–मृ. १६ ऑक्टोबर, १९४४). शिक्षण कोल्हापूर व मुंबई येथे. मुंबईच्या व्ही. जे. टेक्निकल इन्स्टिट्यूटमधून एल्.एम्.इ. उत्तीर्ण. हिंदुस्थान सरकारची शिष्यवृत्ती घेऊन अमेरिकेत काचनिर्मितीच्या तंत्राचे अध्ययन. 'प्रभाकर कंदील' व अन्य काचसामान-निर्मितीचा उद्योग.

*एडिसनचे चरित्र* (१९३२) व *अमेरिका, भाग १ ला* (१९३२) ही दोन पुस्तके प्रसिद्ध. 'किर्लोस्कर' मासिकातून विविध विषयांवर लेखन.

मंजिरी बेडेकर, मीनल निसळ

**ओगले, प्रभाकर बाळाजी :** (ज. १८५३ – मृ. १८३५). औषधी वनस्पती व वैद्यक विषयांवरील ग्रंथांचे लेखक. काच कारखान्याचे उत्पादक ओगले ह्यांचे जन्मदाते. कोल्हापूर संस्थानात शिक्षक. आर्य-वैद्यकावरील *चिकित्सा प्रभाकर* (१९२६) हा ह्यांचा महत्त्वाचा ग्रंथ. याखेरीज *ज्वर* (१९२५), *तुलसी-प्रताप*, *निंब-प्रभाव* (१९३०), *बाभळीचा उपयोग* (१९३१), *बिल्वमहत्त्व* (१९३१), *सुलभौषधि-प्रभाकर* (१९३२), *करंजोपयोग* (१९३३), *रुईमांदार* (१९३३), ही ह्यांची औषधी-वनस्पतींवरील लहान लहान पुस्तके प्रसिद्ध. यांचे *सामुद्रिकशास्त्र* (१८९०) हे मूळ संस्कृत ग्रंथाचे भाषांतरही प्रसिद्ध आहे.

मंजिरी बेडेकर, मीनल निसळ

**औंधकर, विष्णु हरी :** (ज. १८९४, कोल्हापूर – मृ. १७ डिसेंबर, १९४२). नाटककार, नट व चित्रपट कथालेखक. शिक्षण जेमतेम चार इयत्ता. वयाच्या चौदाव्या वर्षी महाराष्ट्र नाटक मंडळीत प्रवेश. लवकरच नट म्हणून प्रसिद्धी. रंगभूमीवर अनेक स्त्री भूमिका त्यांनी गाजविल्या. समर्थ नाटक मंडळीच्या संस्थापकांपैकी एक.

औंधकरांना नाट्यलेखनाची स्फूर्ती गडकरी व खाडिलकर यांच्या नाटकांमुळे मिळाली. *बेबंदशाही* (१९२४) या पहिल्याच ऐतिहासिक नाटकाने त्यांचे नाव सर्वतोमुखी झाले. या नाटकाची भाषा, पात्रे व संभाजीविषयक दृष्टिकोण यांवर गडकऱ्यांच्या 'राजसंन्यास'चा स्पष्ट प्रभाव दिसून येतो. *आग्र्याहून सुटका* (१९३१) हे त्यांचे दुसरे ऐतिहासिक नाटकही रंगभूमीवर अतिशय लोकप्रिय झाले. *महारथी कर्ण* (१९३४) हे त्यांचे पौराणिक नाटक. *भिपाळ* नावाचे आणखी एक नाटक त्यांनी लिहिले होते. पण ते प्रसिद्ध झाल्याचा निर्देश आढळत नाही.

प्रयोगक्षमता, आवेशपूर्ण व धारदार भाषाशैली आणि संघर्षमय घटनांची नाट्यपूर्ण गुंफण ह्या दृष्टीने बेबंदशाही नाटक चांगले साधले आहे. ह्या प्रभावी ऐतिहासिक नाटकाचे पुढील बहुसंख्य ऐतिहासिक नाटककारांनी अनुकरण केल्याचे आढळते.

*आग्र्याहून सुटका* या नाटकानेही त्यातील नाट्यगुणांमुळे पकड घेतली. ऐतिहासिक वातावरणातील अद्‌भुततेचा, भव्यतेचा वेध घेणारी पिळदार भाषाशैली हे औंधकरांचे मोठे श्रेय.

त्यांचे *महारथी कर्ण* हे कुमारी मातेच्या संततीची समस्या परिणाम-कारकपणे मांडणारे पौराणिक नाटक तत्कालीन पौराणिक नाटकांमध्ये आपल्या वेगळेपणाने उठून दिसते. कर्ण-कुंती यांच्या जीवनातील रहस्यमयतेच्या पार्श्वभूमीवर मातेच्या अंतःकरणाचे भावपूर्ण दर्शन त्यांनी या नाटकात घडविले आहे. अल्पशिक्षित असूनही रंगभूमीवर काम करीत असताना त्यांनी नाट्यलेखनासाठी आवश्यक ती दृष्टी प्राप्त करून घेतली होती.

भीमराव कुलकर्णी, विजया दबीर

**करंदीकर, जनार्दन सखाराम :** [ज. १५ फेब्रुवारी, १८७५, कुंदगोळ (जमखिंडी संस्थान)–मृ. १२ मार्च, १९५९, पुणे ]. टिळक-केळकर कालीन पत्रकार. हिंदुत्वनिष्ठ लेखक. अ. ज. करंदीकरांचे वडील. कुंदगोळ येथे इंग्रजी तीन इयत्ता. १८९७ साली पुण्याच्या फर्ग्युसन कॉलेजमधून बी.ए. उत्तीर्ण. नंतर एल्एल्.बी. झाले. काही काळ शिक्षक म्हणून काम केले. प्रो. विष्णु गोविंद बिजापूरकर यांनी राष्ट्रीय शिक्षणासाठी कोल्हापुरास काढलेल्या समर्थ विद्यालयात ते १९०७–१० पर्यंत होते. १९११ साली 'केसरीत'त प्रथम लेखक व १९१२ नंतर मुख्य उपसंपादक. १९३४ ते १९४६ 'केसरी'चे मुख्य संपादक. १९२७ पासून ते दीर्घ काळ केसरी-मराठा संस्थेचे ट्रस्टीही होते. मुळशी सत्याग्रह (१९२२) आणि १९३०-३१ चा स्वातंत्र्य लढा यात भाग घेतला, सश्रम कारावास भोगला. पत्रकार, ग्रंथकार, संशोधक, सूक्ष्म अभ्यासक, ज्योतिष पंचांग, महाभारत, प्राचीन अर्थशास्त्र यांपासून तो ब्रिटिश अंमलातील हुंडणावळ, जातीय-वाद, ब्रिटिशांची राजनीती इत्यादी विविध प्रश्नांच्या विस्तीर्ण क्षेत्रात त्यांनी सतत ३५ वर्षे मराठीतून वृत्तपत्रीय व ग्रंथात्मक लिखाण केले.

*जगातील क्रांतिकारक लढाया* (१९०७) हा एडवर्ड क्रिसी यांच्या इंग्रजी ग्रंथाचा अनुवाद. या अनुवादित ग्रंथात इसवी सन पूर्व ४९० ते इ. स. १९०५ पर्यंत जगाच्या इतिहासाला कलाटणी देणाऱ्या सोळा युद्धांचा इतिहास आहे. *कौटिलीय अर्थशास्त्र* (१९२७) हे कौटिल्याच्या 'अर्थशास्त्र' या सुप्रसिद्ध संस्कृत ग्रंथाचे, बळवंत रामचंद्र हिरगावकर यांच्या सहकार्याने केलेले भाषांतर होय. *हिंदुत्ववाद* (१९४१), *गीतातत्त्व मंजिरी* (१९४७), *श्रीगणेशोत्सवाची साठ वर्षे* (१९५३), *श्री समर्थ चरित्र* (१९५३), *महाभारत : कथाभाग व शिकवण* (१९५८) हे त्यांचे अन्य प्रमुख ग्रंथ. याशिवाय त्यांचे 'केसरीतील निवडक लेख व निबंध' सहाशेहून अधिक पृष्ठांत व दोन खंडांत प्रसिद्ध झाले आहेत. देशसेवेचे व अभ्यासपूर्वक लोकशिक्षण करण्याचे एक साधन म्हणून ते वृत्तव्यवसायाकडे बघत. हुंडणावळ, सुवर्णनिर्यात, सरकारी बजेटे आदी विषयात ते मर्मज्ञ होते आणि शास्त्रीयतेला धक्का न लागू देता त्या विषयावर ते सुगमतेने लिहीत.

पां. बा. गाडगीळ, के. ए. पोतदार

**करंदीकर, त्र्यंबक गोपाळ :** (ज. १८७८ – मृ. १९४० ). शेती-विषयक शास्त्रीय ग्रंथांचे लेखक. प्रसिद्ध उद्योगपती टाटा ह्यांच्या

मळ्यात हे माळीकाम करीत. दादांनीच त्यांच्या शेती-बागायती शिक्षणाची सोय केली. शेतीविषयक अनुभव घेण्यासाठी दादांच्या सोबत अमेरिकेत गेले. हैद्राबाद, इंदूर, ओरछा आदी संस्थानांतून 'ॲग्रिहॉर्टिकल्चर अधिकारी' म्हणूनही त्यांनी काम केले. भारतातील शेतीविषयक उन्नतीचा ध्यास त्यांना लागल्यामुळे शेतीविषयावरील इंग्रजी ग्रंथांचा त्यांनी सूक्ष्म अभ्यास केला. कॅलिफोर्नियात त्यांनी फळझाडांच्या शास्त्रीय पद्धतीच्या लागवडीचे विशेष अध्ययन केले. त्यांनी मातृभाषेत शेतीची शास्त्रशुद्ध माहिती देणारे ग्रंथ लिहिले. *तुतीपासून रेशीम* (१९१२) हा यांचा पहिला ग्रंथ. नंतर *खत* (१९१७) हे त्यांचे दुसरे पुस्तक. कृषिविद्याशास्त्रावर आठ खंडांचा एक ग्रंथ प्रसिद्ध करण्याची त्यांची योजना होती. पण त्यापैकी ३८० पृष्ठांचा *कृषिविद्या अर्थात बागबागाईत व शेतकीविषयक माहिती : भाग १* (१९३०) हाच फक्त प्रसिद्ध झाला. शेती विषयावरील सुरुवातीच्या काळातील ग्रंथ म्हणून त्याला विशेष महत्त्व आहे.

उषा टाकळकर, के. ए. पोतदार

**करंदीकर, बळवंत जनार्दन :** ० बळवंत ० गंधर्व ० रमाकांत नागावकर : (ज. डिसेंबर, १८५५, धुळे – मृ. १४ ऑक्टोबर, १९०३, धुळे). कवी. शिक्षण धुळे येथे मॅट्रिकपर्यंत. काही काळ 'आर्यावर्त' साप्ताहिक व नंतर 'खानदेशवैभव' पत्राचे संपादक. कवी विनायकांचे हे वडील बंधू. यांचे काही लेख बेळगावच्या 'भारतमित्रा'तून प्रसिद्ध. ह्यांची कविता मुख्यतः 'काव्यरत्नावली' मासिकातून टोपणनावाने प्रसिद्ध झाली. *प्रेमालेख्य* (काव्यरत्नावली, जून १९०१) हे २०३ साक्यांचे खंडकाव्य उल्लेखनीय आहे. विवाहबंधन स्वीकारण्याची इच्छा नसणाऱ्या मालिनीच्या दिव्य प्रीतीची करुणरम्य कहाणी ह्या खंडकाव्यात आहे. *सुवर्णरज* (१९१३) हे पाचशे पन्नास आर्यांचे नीती आणि व्यवहार यासंबंधीची तत्त्वे सांगणारे काव्य. *श्रीबालाजी अथवा व्यंकटेशचरितामृत* (१९१३) हे गिरीच्या व्यंकटेशाचे गद्यचरित्र, संत कवी कुडचीवीर ह्यांच्या ओवीबद्ध 'श्रीव्यंकटेशमाहात्म्या'च्या आधारे लिहिले आहे. 'बळवंत' कवीच्या निवडक कवितांचा एक संग्रह *कादंबिनी* (१९३६) नावाने प्रसिद्ध झाला आहे.

उषा टाकळकर, रा. बा. बक्षी

**करंदीकर, रघुनाथ पांडुरंग ऊर्फ दादासाहेब :** (ज. २१ ऑगस्ट, १८५७, पंढरपूर – मृ. २४ एप्रिल, १९३५, सातारा). पत्रे व दैनंदिनी लेखक. मराठी भाषा व संस्कृती यांचे कडवे अभिमानी. १८८० मध्ये वकिलीची परीक्षा उत्तीर्ण झाल्यावर सातारा येथे हे स्थायिक झाले व येथे त्यांनी वकिली सुरू केली. लोकमान्य टिळक यांचे अत्यंत निष्ठावंत सहकारी व स्नेही. जेथे जात, तेथून ऐतिहासिक साधनांचा संग्रह करून आणीत व तसा संग्रह करण्यास उत्तेजन देत. १९१८ साली लंडनला गेले, तेथून साताऱ्याचे छत्रपती प्रतापसिंह यांचा रेसिडेंटबरोबर झालेला पत्रव्यवहार हुडकून तो नकलून आणला. मेणवली येथील नाना फडणिसांचे दप्तर त्यांच्या वंशजाकडून मिळवून ते प्रसिद्ध करण्यास पारसनीस यांना प्रोत्साहन दिले. मराठी इतिहास व वाङ्मय याबाबत त्यांची आस्था लक्षात घेऊन १९०५ च्या सातारा, मराठी साहित्य संमेलनाच्या तिसऱ्या अधिवेशनाचे अध्यक्षपद त्यांना देण्यात आले. त्यांनी स्वतंत्र मराठी ग्रंथरचना केली नाही.

*विलायतेहून धाडलेली पत्रे* (१९३५), *केदारखंडयात्रा* (पत्रे १९३६), *कै. रघुनाथ पांडुरंग ऊर्फ दादासाहेब करंदीकर यांची दैनंदिनी* (१९६२) हे त्यांच्या निवडक पत्रांचे संग्रह प्रसिद्ध आहेत.

गं. दे. खानोलकर, के. ए. पोतदार

**करंदीकर, विनायक जनार्दन :** ० विनायक ० एक मित्र : (ज. १५ सप्टेंबर, १८७२, धुळे–मृ. ३० मार्च, १९०९, पुणे). राष्ट्रीय वृत्तीची कविता लिहिणारे कवी. आधुनिक कविपंचकांपैकी एक. फायनलपर्यंतचे शिक्षण धुळे येथे. काही काळ पोलिसखात्यात नोकरी. काही काळ मिशनमध्ये शिक्षक. पुढे हीही नोकरी सोडून अनेक ठिकाणी नोकऱ्या. आयुष्याच्या उत्तरार्धात स्थैर्य लाभले नाही. त्यांचा केशवसुतांशी चांगला परिचय होता. त्यांच्या मनात राष्ट्रविषयक ज्वलंत निष्ठा होती. ऐतिहासिक वीर व्यक्तींच्या यशोगाथा गाणारे ते पहिले राष्ट्रीय कवी मानण्यात येतात.

त्यांची कविता *काव्यरत्नावली* 'मनोरंजन', 'करमणूक' या नियतकालिकांतून प्रसिद्ध झाली. कवितासंग्रह मात्र मृत्यूनंतर. कवी अनंततनय (कै. दत्तात्रेय अनंत आपटे) हे त्यांच्या कवितेचे पहिले संपादक. ह्यांनी नियतकालिकांतून विखुरलेल्या विनायकांच्या कविता शोधून व संपादून त्यांचा संग्रह *विनायकांची कविता* या नावाने प्रसिद्ध केला. त्यात विनायकांच्या एकूण ७३ कविता समाविष्ट आहेत. तिसऱ्या आवृत्तीस (पुणे १९४७) वा. ब. पटवर्धनांची प्रस्तावना लाभली आहे. तीत त्यांनी विनायकरावांना 'तत्कालीन जनतेचा वाचस्पती' असे संबोधले आहे. प्रा. म. श्री. पंडितांनी आपल्या विवेचक प्रस्तावनेसह या संग्रहाची चौथी आवृत्ती (१९५४, पुनर्मुद्रण : पाचवी आवृत्ती, १९६०) संपादित केली. त्यात एकूण ८५ कवितांचा समावेश आहे. 'मराठीतील राष्ट्रीय कवितेचे पहिले व श्रेष्ठ उद्गाते' या शब्दांत विनायकांच्या काव्यकर्तृत्वाचा उल्लेख करण्यात येतो. *प्रभावती* या नावाचे एक नाटकही विनायकांनी लिहून १९०८ साली पूर्ण केले होते व श्रीकरुणेश प्रासादिक नाट्यकलाप्रवर्तक संगीत मंडळीने ते रंगभूमीवर आणण्याची सिद्धता केली होती. तथापि ते बहुधा ज्वलंत राष्ट्रवादाचा पुरस्कार करणारे असल्याने त्या मंडळीने त्याचा प्रयोग केला नसावा.

वि. म. कुळकर्णी, के. ए. पोतदार

संदर्भ : (१) ग. त्र्यं. माडखोलकर, 'विनायकांची कविता', 'आधुनिक कविपंचक', प्रका. अ. वि. भट, पुणे, १९२१. (२) मं. वि. राजाध्यक्ष, 'पाच कवी'. (३) रा. श्री. जोग, 'अर्वाचीन मराठी काव्य', मुंबई मराठी साहित्यसंघ, मुंबई, १९४६.

**करंदीकर, शंकर दिनकर :** (ज. ४ मे, १९०२ – मृ. १९ मार्च, १९५७, मुंबई). कथा-कादंबरीकार आणि क्रांतिकारकांच्या इतिहासाचे व हस्तसामुद्रिक या विषयाचे लेखक. शिक्षण मॅट्रिकपर्यंत. गांधीजींच्या साबरमतीच्या सत्याग्रहाश्रमात राजकीय शिक्षण (१९२५-२६). काही वर्षे कॉंग्रेसचे प्रचारक.

ह्यांची *बालहिंद अर्थात देशसेवेचा ओनामा* (राष्ट्रसेवेची तत्त्वे, १९२०), *खादिशास्त्र – भाग १* (मगनलाल गांधी यांच्या पुस्तकाचे भाषांतर) ह्या दोन पुस्तकांप्रमाणेच भारतीय क्रांतिकारकांच्या इतिहासावरील *राजनैतिक कारस्थान अथवा अलिपूर बॉम्ब केसचे रहस्य*, बाबू उपेंद्रनाथ बंदोपाध्यायकृत 'निर्वासितेर आत्मकहानी' या बंगाली पुस्तकावरून (१९२२), *राजनैतिक कारस्थान–प्रथम खंड* (१९२६), *राजनैतिक कारस्थान - द्वितीय खंड* (अर्थात काळ्या पाण्यावरील क्रांतिकारकांची जीवन चरित्रे, १९२८), *अप्रकाशित राजनैतिक इतिहास–द्वितीय खंड* (डॉ. भूपेंद्रनाथ दत्त यांच्या मूळ बंगालीवरून, १९२८) व *देशत्यागाचा इतिहास* (शौकत उस्मानीच्या 'पेशावर टु मास्को' या इंग्रजी आत्मवृत्तपर पुस्तकाच्या आधारे लिहिलेले जीवनचरित्र, १९२९) ही पुस्तके प्रसिद्ध आहेत.

क्रांतिकारकांसंबंधीची ही सारी पुस्तके इंग्रज सरकारकडून जप्त करण्यात आली. *अत्तरदाणी अर्थात् चित्रमय जगतातील अत्यंत मनोरंजक गोष्टी* (१९२७) हा नऊ गोष्टींचा संग्रह, *पतिव्रता सावित्री* (१९२९) ही पौराणिक कादंबरी, *पुष्पराणी* (१९३१, श्री. फणींद्र पाल ह्यांच्या मूळ बंगाली कादंबरीच्या कथानकाच्या आधारे लिहिलेली)

*व नसे सुंदराबाई* (१९४१) ह्या कादंबऱ्याही प्रसिद्ध. *भाग्यरेषा* (१९४२) हा हस्तसामुद्रिक विषयावरील ह्यांचा ग्रंथ विशेष लोकप्रिय झाला.

गं. दे. खानोलकर, अंजली कऱ्हाडपांडे

**करकंबकर, एकनाथ अण्णाजी :** (ज. १८५०, करकंब – मृ. २५ मे, १८८३, इंदूर). कवी; ह्यांचे वडील विद्वान पुराणिक होते. त्यांनीच यांना संस्कृत व ज्योतिष यांचे शिक्षण दिले. १८७५ साली हे मुंबई विद्यापीठाच्या प्रवेश परीक्षेस बसून तीत उत्तीर्ण झाले. इंदूर हायस्कूलमध्ये त्यांनी अखेरपर्यंत शिक्षक म्हणून काम केले. *शिवाजी महाराजांस दादाजी कोंडदेवकृत उपदेश* (१८७०), *थोरले मल्हारराव होळकर सुभेदार* (१८९१) अशी त्यांची दोन काव्ये प्रसिद्ध असून यांना 'दक्षिणाप्राइझ कमिटी'कडून पारितोषिकेही मिळाली होती.

गं. दे. खानोलकर, के. ए. पोतदार

**करकरे, दत्तात्रय बाळकृष्ण :** (ज.     – मृ. ११ डिसेंबर, १९२४, जळगाव). ऐतिहासिक कादंबरीकार व नाटककार; इतिहास-लेखक. मुख्यतः लेखन हाच व्यवसाय. ह्यांचे *पेशवाईचा मध्यकाल* (१९१८) हे ऐतिहासिक गद्य नाटक व राघोबादादाच्या जीवनावरील *अस्तनीतील निखारा* (१९१८) ही ऐतिहासिक कादंबरी प्रसिद्ध आहे. मराठ्यांचा संपूर्ण इतिहास वीस भागांत लिहिण्याची त्यांची योजना होती. त्यांपैकी *मराठ्यांचा इतिहास* – भाग १ ला (१९२१), भाग २ रा (१९२३) व भाग ३ रा (१९२४) हे तीन त्यांच्या हयातीत व भाग ४ था (१९२९) त्यांच्या मृत्यूनंतर प्रकाशित. ह्या भागांत अनुक्रमे विजयानगरच्या राज्यापर्यंतची हिंदुस्थानातील प्राचीन हिंदु राज्ये, मोगल बादशाहीच्या काळापर्यंतची हिंदुस्थानातील प्राचीन मुसलमान राज्ये, दक्षिणेतील मुसलमानी राज्ये आणि मराठ्यांच्या उत्कर्षाचे पूर्वस्वरूप व शहाजीचे चरित्र ह्यांविषयी माहिती आढळते. *हिंदुस्थानातील ब्रिटिश साम्राज्याचा उदय आणि त्याची वाढ* (१९१६) हा सर आल्फ्रेड लायलकृत 'ब्रिटिश डोमिनियन इन इंडिया'च्या आधारे लिहिलेला इतिहासग्रंथही प्रसिद्ध आहे.

गं. दे. खानोलकर, मीनल निसळ

**कर्नाटकी, श्रीनिवास नारायण : ० श्रीनिवास ० एस. एन. के. :** (ज. २८ सप्टेंबर, १८६५, शहापूर, जि. बेळगाव–मृ. १७ जुलै, १९४८). चरित्रकार व निबंधलेखक. मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण बेळगावात. महाविद्यालयीन शिक्षण मुंबईत. सुरुवातीला 'विविधज्ञानविस्तार' मधून अर्थशास्त्र, तत्त्वज्ञान, वेदान्त इत्यादी विषयांवर निबंधलेखन.

कर्नाटकींनी लिहिलेली *डॉ. रामकृष्ण गोपाळ भांडारकर* (१९२७), *न्यायमूर्ती काशिनाथ त्रिंबक तेलंग* (१९२९), *डॉक्टर भाऊ दाजी लाड* (१९३१) आणि *रा. ब. शंकर पांडुरंग दीक्षित* (१९३५) ही चार चरित्रे प्रसिद्ध आहेत. ह्या चरित्रांसाठी लेखकाने परिश्रमपूर्वक माहिती गोळा केली. त्यामुळे त्यांना चरित्रग्रंथांपेक्षाही भावी चरित्रग्रंथासाठी उपयुक्त अशा साधनग्रंथांचे स्वरूप आले आहे. लेखकाने चरित्रग्रंथासाठी (लेखनासाठी) निवडलेल्या व्यक्ती थोर समाजधुरीण आणि विद्याव्यासंगी असल्याने ही चरित्रे लिहून लेखकाने मराठी चरित्र वाङ्मयात मोलाची भर घातली आहे.

मंजिरी बेडेकर, म. ना. लोही

**कर्वे, आनंदीबाई धोंडो :** (ज. १८६४, देवरुख, रत्नागिरी – मृ. ३० नोव्हेंबर, १९५०, पुणे). आनंदीबाई या बाळकृष्ण केशव जोशी यांची कन्या. श्री. जोशी हे त्या काळातील एक पुरोगामी वृत्तीचे गृहस्थ होते. त्या 'बाया' म्हणून ओळखल्या जात. त्या र. धों. कर्वे, भास्कर धोंडो कर्वे यांच्या मातोश्री व डॉ. इरावती कर्वे यांच्या सासूबाई. पंडिता रमाबाईंच्या मुंबईतील 'शारदासदन'च्या ह्या पहिल्या विद्यार्थिनी. वयाच्या चोविसाव्या वर्षी शाळेत दाखल. पुण्याला शारदासदनमध्ये असताना त्यांचा धोंडो केशव कर्वे यांच्याशी परिचय झाला व त्यांनी धोंडो केशव कर्वे ह्यांच्याशी पुनर्विवाह केला.

आनंदीबाई कर्वे यांचे एकमेव पुस्तक म्हणजे त्यांचे आत्मचरित्र *माझे पुराण* (१९४४). उतारवयात लिहिलेल्या या आत्मचरित्रातून लेखिकेने आपल्या गतायुष्याकडे बऱ्याच तटस्थपणे पाहिले आहे. हे आत्मचरित्र बरेच निःसंकोच व प्रांजळपणे लिहिलेले आहे. पुनर्विवाहित म्हणून बायाच्या वाट्याला घरच्यांची व बाहेरच्यांची टीका आली. सामाजिक बहिष्कारही आला. अपमानास्पद वागणूकही मिळाली. ह्या आत्मचरित्रातून गेल्या शतकाच्या अखेरच्या बालविधवांचे जीवन, विसाव्या शतकाच्या आरंभी पुनर्विवाहितेला समाजाकडून मिळणारी वागणूक, ह्यांचे दर्शन घडते. प्रांजळ निवेदनामुळे एक वाङ्मयकृती म्हणूनही ह्या पुस्तकाला महत्त्व प्राप्त झाले आहे. त्यांच्या पुस्तकातून महर्षी कर्वे यांच्या व्यक्तिजीवनावरही काही प्रमाणात प्रकाश पडतो. हा या पुस्तकाचा आणखी एक विशेष.

कृष्णाबाई मोटे, म. ना. लोही

संदर्भ : 'माझे पुराण', संपा. कावेरी कर्वे, प्रकाशन केशव भिकाजी ढवळे, मुंबई आवृत्ती २ – १९५१.

**कर्वे, रघुनाथ धोंडो : ० शारदा ० र. धों. क. :** (ज. १५ जानेवारी, १८८२, मुरुड – मृ. १४ ऑक्टोबर, १९५३, मुंबई). पुरोगामी वृत्तीचे लेखक. 'संततिनियमना'च्या चळवळीचे प्रवर्तक व तत्संबंधित वाङ्मयाचे प्रसारक. *समाजस्वास्थ्य* मासिकाचे संचालक व संपादक.

महर्षि कर्वे यांचे ज्येष्ठ चिरंजीव. मुंबई विद्यापीठाचे एम्.ए. (गणित), गणित विषयातील डॉक्टरेट (पॅरिस). मुंबईच्या विल्सन कॉलेजात गणिताचे प्राध्यापक म्हणून नोकरी करीत असतानाच्या काळात (१९२२–२५) त्यांनी *नैतिकता आणि संततिनियमन* आणि *नैतिकता व गुप्त रोगापासून बचाव* अशा दोन पुस्तिका इंग्रजीत लिहून प्रसिद्ध केल्या. १९२४ साली ह्याच विषयावर 'किर्लोस्करखबर'मध्ये त्यांनी एक लेख लिहिला. हे संततिनियमन विषयक लेखन किंवा प्रचार न करण्याची कॉलेजच्या संचालकांची सूचना मान्य नसल्याने रघुनाथरावांनी राजीनामा दिला.

१९२७ मध्ये जुलै महिन्यात त्यांनी *समाजस्वास्थ्य* नावाचे मासिक सुरू केले व ते पंचवीस वर्षे चालविले. व्यक्तीच्या व समाजाच्या शारीरिक व मानसिक आरोग्याची व त्यासंबंधी उपायाची जी चर्चा करण्यास पत्रकार घाबरत, ती रघुनाथराव ह्या मासिकामधून निर्भीडपणे करीत. ह्यात लैंगिक विषयांना प्राधान्य मिळालेले असे. *समाजस्वास्थ्य* मधील लेखांमुळे सनातनी, तसेच दिखाऊ सुधारक ह्यांचा रोष त्यांना पत्करावा लागला. त्यांच्या मासिकावर, अश्लीलतेच्या आरोपावरून तीन खटले भरण्यात आले. र. धों. कर्वे यांची *संततिनियमन, विचार व आचार* (१९२३), *गुप्त रोगांपासून बचाव* (१९२७), *आधुनिक कामशास्त्र* (१९३४), *गुरुबाजी* (मोलियरच्या 'तार्त्युफ' नाटकाचे रूपांतर, १९३७), *आधुनिक आहारशास्त्र* (१९३८), *वेश्याव्यवसाय* (१९४०), *तेरा गोष्टी* (१९४०), *पॅरिसच्या परी* (१९४६), *न्यायाचा शोध* (चार अंकी नाटक, १९४६) ही पुस्तके आहेत.

बुद्धिप्रामाण्य व सत्यनिष्ठा हे त्यांच्या लेखनाचे विशेष. सत्य तेच स्वीकारणार अन् सत्य तेच सांगणार हा बाणा त्यांनी अखेरपर्यंत बाळगला आणि संततिनियमनाच्या चळवळीचे काम समाजाच्या विरोधाला तोंड देत देत व शारीरिक, मानसिक व आर्थिक झळ सोसून शेवटपर्यंत निष्ठेने चालविले.

गं. दे. खानोलकर, वर्षा रेगे

संदर्भ : 'डॉ. य. दि. फडके, र. धों. कर्वे'.

**कलापि :** पहा ठोंबरे, त्र्यंबक बापूजी

**कल्होळकर, कृष्णाजी बाबाजी** : पहा कुलकर्णी, कृष्णाजी बाबाजी

**कवडी, भिकाजी लक्ष्मण** : (ज. २० फेब्रुवारी, १८९२, बारामती, जि. पुणे–मृ. ११ मार्च, १९६०, पुणे). लेखक व राजकीय कार्यकर्ते. प्राथमिक व माध्यमिक शिक्षण बार्शी व पंढरपूर येथे. स्कूल फायनल-नंतर काही काळ महसूल खात्यात नोकरी. पुढे नोकरी सोडून हाय-कोर्ट प्लीडरची परीक्षा देऊन वकिलीच्या व्यवसायात प्रवेश (१९२३). करमाळे (जि. सोलापूर) येथे वकिली. पुढे राजकारणात सहभाग. यापुढील काळात समाजकार्य आणि देशभक्ती, हेच कवडी यांनी आपले ध्येय ठरविले. १९३० व १९४० च्या वैयक्तिक सत्याग्रहात, १९४२ च्या 'भारत छोडो' आंदोलनात व पुढे गोवा-मुक्ति-आंदोलनात सहभाग. फावल्या वेळात काही स्फुट लेखन.

मात्र पुस्तकरूपाने त्यांची खालील दोनच पुस्तके लोकांसमोर आली : (१) *भीमशंकर महात्म्य* (१९२६)– स्कंद पुराणातील सह्याद्रि खंडातील 'भीमशंकर महात्म्य' या पुस्तकाचा प्राकृत अनुवाद. (२) *बालमोहन* (१९४७)– म. गांधी आपल्या एकादश व्रतांची माहिती विद्यार्थ्यांना करून देत आहेत, अशी कल्पना करून प्रस्तुत पुस्तकाची मांडणी केली आहे.

श्रीमती शामला कवडी, नरेश कवडी

**कवी आनंद** : पहा बरवे, विनायक लक्ष्मण

**कँडी, टॉमस** : (ज. १३ डिसेंबर, १८०४, इंग्लंड–मृ. २६ फेब्रुवारी, १८७७, महाबळेश्वर). कोशकार, कायद्याच्या पुस्तकाचे मराठी अनु-वादक व प्रमाण मराठी भाषा सिद्ध करणारे शिक्षणतज्ज्ञ व शालेय पुस्तकाचे लेखक.

ऑक्सफर्ड विद्यापीठाच्या मॅग्डेलेन कॉलेजमध्ये शिक्षण घेतल्यानंतर लष्करात प्रवेश. बोर्थविक मिलखाईस्ट यांच्या हाताखाली ओरिएन्टल इन्स्टिट्यूशनमध्ये हिंदुस्थानी भाषेचा अभ्यास. तसेच हेलिबरी कॉलेज-मध्ये प्रा. ईस्टविक यांच्याकडे मराठी भाषेचा अभ्यास. पुढे ईस्ट इंडिया कंपनीच्या लष्करात नोकरी मिळवून १८२२ साली ते मुंबईस आले. १८२६ मध्ये मोल्सवर्थच्या विनंतीवरून कँडी-बंधूंची टॉमस आणि जॉर्ज–मराठी–इंग्रजी कोश तयार करण्यासाठी मोकळीक झाली. मराठी भाषा व वाङ्मय यांच्याशी अशा प्रकारे आलेला निकटचा संबंध त्याने आमरण टिकविला. १८३७ साली पुणे पाठशाळेचा प्रमुख व मराठी शाळांचा तपासनीस म्हणून नेमणूक झाली. वीस वर्षे त्यांनी हे काम केले. १८४० ते १८४७ त्यांनी *इंग्रजी-मराठी कोश* तयार केला. प्रथमावृत्ती १८४७ मध्ये व सुधारून वाढविलेली दुसरी आवृत्ती १८७३ मध्ये प्रसिद्ध झाली. १८५१ मध्ये पुणे पाठशाळा व इंग्रजी शाळा एकत्र करण्यात आली. तीत ते प्राचार्य होते. १८४७ मध्ये 'मराठी ट्रान्सलेटर ॲण्ड रेफरी' म्हणून ते काम पाहू लागले. या १८४७ ते १८७६ काळात त्यांनी काही शालेय पुस्तके लिहिली व इतरांनी लिहिलेली तपासली.

मराठीत चांगली भाषांतरे व्हावीत, म्हणून त्यांचे काही नियम यांनी तयार केले. भाषांतर करताना मुळातील सर्व विचार व्याकरणशुद्ध मराठीत कसे आणावेत, शब्दशः भाषांतर का टाळावे, परकीय शब्द मराठीत कोणत्या पद्धतीने लिहावेत, अनोळखी शब्दांबद्दल टीपा कोठे व कशा द्याव्यात, शास्त्रीय पारिभाषिक शब्द कसे तयार करावेत, दोन भिन्न भाषांतील शब्दांचे समास कसे टाळावेत इ. मार्गदर्शक सूचना यांनी भाषांतरकर्त्यांना दिलेल्या आढळतात. कँडीला इंग्रजी व मराठी भाषा मार्मिकपणे कळतात म्हणून सरकारने त्यांच्याकडून 'इंडियन पिनल कोड', ' 'सिव्हिल प्रोसीजर कोड' व 'क्रिमिनल प्रोसीजर कोड' यांची भाषांतरे करवून घेतली (मराठी भाषांतरे). प्रमाण भाषा सिद्ध करण्याच्या दृष्टीने त्यांनी बहुमोल प्रयत्न केले. मराठी वाक्यरचनेतील शैथिल्य व अनियमितपणा काढून टाकून भाषेला बंदिस्तपणा आणण्याचे श्रेय मे. कँडीला दिले जाते. मराठी भाषेच्या लेखनात विरामचिन्हे वापरण्याची पद्धतीही यांनीच सुरू केली. कँडींचे व्याकरणविषयक नियम तत्कालीन भाऊ महाजन, रामचंद्र भिकाजी गुंजीकर, दादोबा पांडुरंग या विद्वानांना आवडले नाहीत. पण या नियमांनुसार त्यांनी *नीतिज्ञानाची परिभाषा* (१८४८), *विराम चिन्हांची परिभाषा* (१८५०), *शाळांतील मुलांकरिता क्रमिक पुस्तके* (एक ते सहा) अशी अनेक पुस्तके लिहिली. तसेच ख्रिस्ती धर्मप्रसारार्थ उपयोगी पडतील, अशीही पुस्तके त्यांनी लिहिली. अव्वल इंग्रजी अंमलातील मराठी गद्यग्रंथांची भाषिक घडण हे कँडींच्या परिश्रमाचे फळ होय.

कृ. भि. कुलकर्णी, के. ए. पोतदार

**काटदरे, माधव केशव** : (ज. ३ डिसेंबर, १८९२ – मृ. ३ सप्टेंबर, १९५८). राष्ट्रीय वृत्तीचे कवी. कोकणातील शीर (जि. रत्नागिरी) हे त्यांचे मूळ गाव. रत्नागिरी येथील सरकारी हायस्कूलमधून स्कूलफायनलची परीक्षा उत्तीर्ण. मुंबईच्या कस्टम खात्यात नोकरी. सेवानिवृत्तीनंतर चिपळूण येथे वास्तव्य.

कवी माधवांच्या कविता 'खेळगडी', 'चित्रमयजगत्', 'नवयुग' इत्यादी मासिकांतून प्रसिद्ध होत असत. 'नवयुग' मासिकाच्या काव्यविभागाचे काही काळ ते संपादकही होते. त्यांचे *धुपारतील फुले* (१९१५) व *फेकलेली फुले* (१९२१) हे काव्यसंग्रह 'खेळगडी' तर्फे प्रकाशित झाले आहेत. *धुपारतील फुले* मध्ये त्यांच्या पत्नी सौ. रमाबाई (माधवांगना) यांच्या आठ कविताही समाविष्ट आहेत. *कवि माधव यांची कविता* (१९३५) व *गीतमाधव* (१९५३) हे त्यांच्या कवितांचे आणखी काही संग्रह.

पारतंत्र्यकाळात इतिहासातील ऊर्जस्वल घटनांकडे स्वाभिमान जागृतीच्या दृष्टीने पाहण्याची जी वृत्ती कवी विनायकांच्या कवितांमध्ये प्रगट झाली होती, तिचा प्रभाव काटदरे यांच्यावरही होता. त्या कालखंडात दु. आ. तिवारी, स्वातंत्र्यशाहीर गोविंद, स्वातंत्र्य-वीर सावरकर या राष्ट्रीय वृत्तीच्या कवींमध्ये माधवांचेही नाव ठळकपणे येते.

त्यांच्या इतर अनेक कवितांमधील विषयांची निवड व काव्यदृष्टी काहीशी पंडिती थाटाची असून त्यांत बोधवादाकडे कल आहे. माधवांनी ऋग्वेदातील अनेक सूक्तांचे भाषांतरही केले आहे. क्वचित 'चहा-गीत', 'तात्या पंतोजी' अशा विनोदी ढंगाच्या कविताही त्यांनी लिहिल्या आहेत.

इतिहासाचा गाढ व्यासंग हा कवी माधवांच्या व्यक्तिमत्त्वाचा एक महत्त्वाचा पैलू होय. विशेषतः वैदिककाल, गुप्तकाल व मराठेशाही या कालखंडातील ऐतिहासिक घटनांविषयीचे त्यांचे चिकित्सक वृत्तीचे लेख 'मनोरंजन', 'ज्योत्स्ना', 'रत्नाकर', 'नवजीवन' इत्यादी मासिकांतून प्रसिद्ध झालेले आहेत.

त्यांनी बालसाहित्यनिर्मितीही विपुल प्रमाणात केली असून त्यात ऐतिहासिक कथा, परिकथा, इत्यादींचा समावेश आहे.

संदर्भ : 'अर्वाचीन मराठी वाङ्मयसेवक' (पंचम खंड), गं. दे. खानोलकर, व्हीनस प्रकाशन, पुणे, १९६२, पृष्ठ १३९–१५५.

उषा टाकळकर, कुंदा केळापुरे, डॉ. नीलिमा गुंडी

**कांबळे, शिवराम जानबा** : (ज. १८७५–मृ. शक उपलब्ध होऊ शकले नाही). यांचे वडील मूळचे भांबुर्डे गावचे वतनदार महार. पुढे त्यांनी गावकीचा धंदा सोडून पुणे गाठले. इथे एका युरोपियन अधिकाऱ्याकडे त्यांनी नोकरी स्वीकारली. युरोपियन अधिकाऱ्याकडील नोकरीने त्यांची जातिभेद, गावकी इ. त्रस्त करणाऱ्या घटनांपासून मुक्ती झाली. शिवराम जानबा कांबळे अल्पवयातच वडिलांबरोबर नोकरी करू लागले व आपली ज्ञानविषयक लालसाही त्यांनी पूर्ण केली.

आपल्या ओळखीच्या एका गृहस्थाकडे जानबा कांबळे यांनी आपल्या मुलास शिकायला ठेवले. त्यांना वाचनाची खूप आवड होती. बाबा पद्मनजी, जोतिबा फुले यांच्या ग्रंथांचा त्यांच्या मनावर योग्य तोच परिणाम झाला. त्याचप्रमाणे गोपाळबाबा वलंगकरांच्या अस्पृश्यते-विषयीच्या विनंतिपत्रांनी तर ते कमालीचे थरथरू लागले. आपल्या समाजबांधवांना जागृत करण्यासाठी व त्यांच्या उन्नतीसाठी त्यांनी १ ऑगस्ट, १९०४ रोजी 'श्री शंकर प्रासादिक सोमवंशीय हितचिंतक मित्रसमाजा'ची स्थापना केली. १८९२ मध्ये महार पलटणी रद्द केल्या गेल्या, त्याचप्रमाणे लष्करभरतीही बंद झाली. त्याविरुद्ध गोपाळबाबा वलंगकरांनी आवाज उठविला होता; पण त्यांना फारसे यश लाभले नाही. लष्करभरती थांबल्याने अस्पृश्यांची शिक्षणाच्या क्षेत्रातही पीछेहाट होऊ लागली.

सवर्णांची मने दुखावण्यापेक्षा अस्पृश्यांना सरकारी शाळेत प्रवेश न देणे, हेच इंग्रज सरकारलाही योग्य वाटले. याविषयी जनमत जागृत करण्यासाठी १९०४ मध्ये शिवराम जानबा कांबळे यांनी पुरंदर तालुक्यातील सासवड येथे ५१ गावांतील महारांची सभा भरविली. त्यावेळी एक अर्ज तयार करण्यात आला. खालच्या दर्जाच्या सरकारी नोकरीत प्रवेश मिळावा, सरकारी शाळेत प्रवेश मिळावा, पोलिसात चाकरी मिळावी, सैन्यात नोकरी मिळावी या मागण्या त्यात करण्यात आल्या व १,५८८ लोकांनी त्यावर सह्या केल्या. इंग्रज सरकारकडे संघटितपणे केलेला महारांचा तो पहिलाच अर्ज होता. पण सरकारने त्या अर्जाची दखल घेतली नाही.

पण तरीही शिवराम जानबा हरले नाहीत. आपले मत व आपले विचार ते 'मराठा', 'दीनबंधू', 'डेली टेलिग्राफ ॲण्ड डेक्कन हेराल्ड', 'पुना ऑब्जर्व्हर' यातून मांडू लागले. *सूचीपत्र* (१९०३) हे त्यांचे पुस्तक निघाले. या पुस्तकाचा हेतू जनजागृती. त्यांनी *सोमवंशीय मित्र* या नावाचे वृत्तपत्र सुरू केले होते. ते तीन वर्षे चालले.

नोव्हेंबर १९१० मध्ये पुन्हा जानबांनी लष्कर भरतीच्या प्रश्नावरून इंग्रज सरकारकडे अर्ज केला. त्याची पोच मिळाली. पण परिणाम मात्र तत्काळ दिसला नाही. नंतर पहिल्या महायुद्धाच्या सुमारास काही महारांना लष्करात घेतले व काहींना इतर खात्यात नोकऱ्याही मिळाल्या.

१९२९ साली पर्वतीमंदिर प्रवेशाच्या वेळी ते न डगमगता हजर होते. अस्पृश्यतानिवारणासाठी व समानता लाभावी म्हणून त्यांनी अखेरपर्यंत कार्य केले.

लता जाधव

० **काणे, गणेश रामकृष्ण** : पहा हवालदार, गणेश रामकृष्ण

**काणेकर, पुरुषोत्तम गोपाळ** : ० शारदाश्रमवासी : (१४ जानेवारी, १८८१ – मृ. २६ सप्टेंबर, १९५२, मुंबई). वृत्तपत्रलेखक व नाट्य-स्मृतिकार. शिक्षण मॅट्रिकपर्यंत. सुधारणावादी मतांच्या प्रभावाने राज-कारण व समाजकारणात सहभाग. प्रथम १८९९ च्या सुमारास बडोद्याच्या 'सयाजी विजय' पत्रातून 'शारदाश्रमवासी' ह्या टोपण-नावाने व पुढे 'मनोरंजन', 'नवयुग', 'उत्थान', 'विविधवृत्त' इत्यादी नियतकालिकांतून त्यांनी लेखन केले. 'इंदुप्रकाश', 'ज्ञान-प्रकाश' पत्रांचे काही काळ संपादन केले. डॉ. आंबेडकरांशी त्यांचे निकट स्नेहसंबंध असल्याने त्यांच्या 'जनता', 'जागृति' ह्या नियतकालिकां-तूनही लेखन केले. 'सोशल सर्व्हिस लीग'च्या इंग्रजी त्रैमासिकाचे ते संपादक होते. त्यांचे प्रासंगिक लेखन 'सर्व्हन्टस् ऑफ इंडिया' व 'क्रांतिकाल' या पत्रांतून प्रसिद्ध.

यांनी बंगालमधील बालविधवांच्या करुण स्थितीवर *सुधा* (१९११) ही कादंबरी, रमेशचंद्र दत्त ह्यांच्या 'द लेक ऑफ द पाम्स्'वरून भाषांतरित केली. *रशिया* (१९४२) ही ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी-प्रकाशनासाठी लिहिलेली पुस्तिका. *माझ्या काही नाट्यस्मृती* (१९४४) हे त्यांच्या नाट्यविषयक आठवणींचे पुस्तक मराठी नाट्ये-तिहासाच्या दृष्टीने उपयुक्त आहे. 'शारदाश्रमवासी' या टोपण नावाने त्यांनी काही कविताही लिहिल्या.

पां. बा. गावडी, कुंदा केळापुरे

**काथवटे, आबाजी विष्णू** : (ज. १८५४, वाई – मृ. १७ जानेवारी, १९०७, ठाणे). अध्यापनशास्त्र या विषयाचे लेखक व संस्कृत ग्रंथांचे संपादक. पुण्याच्या डेक्कन कॉलेजमधून बी.ए. पदवी. सरकारी शिक्षण खात्यात नोकरी. काही काळ अहमदाबाद येथील गुजरात कॉलेजात व नंतर डॉ. भांडारकरांच्या निवृत्तीनंतर डेक्कन कॉलेजात संस्कृतचे प्राध्यापक. फाउलर ह्यांच्या इंग्रजी ग्रंथाच्या आधारे ह्यांनी मराठीत *शिक्षण व अध्यापन* (१९००) हे पुस्तक लिहिले. 'कीर्ति-कौमुदी', 'अथर्ववेद-उत्तरभाग', 'द्व्याश्रम कोश' हे ह्यांनी संपादित केलेले संस्कृत ग्रंथ. बरीच वर्षे हे 'डेक्कन व्हर्न्याक्युलर सोसायटी'चे ग्रंथ परीक्षकही होते.

गं. दे. खानोलकर, रा. बा. बर्वे

**काथवटे, मनोहर विष्णू** : (ज. १८५५, वाई – मृ. २० फेब्रुवारी, १९३७). इतिहासलेखक व चरित्रलेखक. शिक्षण पुणे व सातारा येथे. बी.ए., एलएल्.बी. (मुंबई विद्यापीठ). न्यायखात्यात नोकरी. *कार्थेज* (१८९३) हे श्रीमंत सयाजीराव गायकवाड ह्यांच्या आश्रया-खाली राष्ट्रकथामालेतील पुस्तक. *अजमेर स्थलवर्णन* (पं. हरविलास सारडाकृत पुस्तकाच्या आधारे, १९१५), *भरतखंडाचा प्राचीन इतिहास–खिस्तपूर्व ६०० ते इ. स. १२०० (१९१७)*, *पारशांचा इतिहास* (१९२१), *हजरत खलीफा उमर ह्यांचे संक्षिप्त चरित्र* (१९३०), *खलीफा अबूबकरचे संक्षिप्त चरित्र* (१९३०), *सुधारणा, उद्भव व उपाय* (एडवर्ड कार्पेंटर ह्यांच्या 'सिव्हिलायझेशन, इट्स् कॉज ॲण्ड क्युअर'चे रूपांतर, १९३३), *वाईचे काथवटे घराण्याची माहिती* (१९३६) ही ह्यांची प्रकाशित पुस्तके. *पारशांचा इतिहास* हा त्यांचा स्वतंत्रपणे अभ्यास व शोध करून लिहिलेला ग्रंथ विशेष महत्त्वाचा आहे.

गं. दे. खानोलकर, अंजली वाऱ्हाडपांडे

**कानडे, रामचंद्र गोविंद** : (ज. ४ मे, १९००, भोर, सं. भोर – मृ. ५ सप्टेंबर, १९४१). मराठी नियतकालिकांच्या इतिहासाचे लेखक व चरित्रकार. प्राथमिक व दुय्यम शिक्षण भोर येथे. पुण्याच्या टिळक महाराष्ट्र विद्यापीठाचे 'वाङ्मयविशारद'. काही काळ मुंबईच्या 'लोकमान्य' व पुण्याच्या 'ज्ञानप्रकाश' या दैनिकांच्या संपादकीय विभागात नोकरी.

ह्यांनी *प्रो. विष्णु गोविंद विजापूरकर यांचे चरित्र* (१९२८) लिहिले आहे. कानडे यांचा 'गुरुवर्य' विजापूरकरांवर किती भक्ती जडली होती, ह्याचा प्रत्यय त्यांच्या या चरित्रावरून येतो. बंगाली भाषेचा अभ्यास करून यांनी *रवींद्रनाथ टागोर* (१९२८) व *शास्त्रज्ञ सर जगदीशचंद्र बसु* (१९३७) यांचीही चरित्रे लिहिली आहेत. कानडे ह्यांच्या चरित्रग्रंथांपेक्षाही त्यांनी लिहिलेला *मराठी नियत-कालिकांचा इतिहास* (१९३८) हा सचित्र व सटीक ग्रंथ अत्यंत महत्त्वाचा आहे. वृत्तव्यवसायात काम करीत असता मराठी नियत-कालिकांच्या इतिहासाचे दुर्मिळ साहित्य मोठ्या कष्टाने जमा करून तिच्या आधारे त्यांनी हा ग्रंथ लिहिला. या विषयावरचा इतका विस्तृत असा हा पहिलाच ग्रंथ होय. ब्रिटिश राजवटीत भारतात मुद्रणकला अवतरली तेथपासून त्यांनी या इतिहासलेखनास सुरुवात केली. मासिक, साप्ताहिक यांसारखी नियतकालिके व वृत्तपत्रे यांचा वेगवेगळा

इतिहास त्यांनी वेगवेगळ्या प्रकरणांतून दिला आहे. १८३२ ते १८९२ या काळातील नियतकालिकांतील उतारे, अगदी जुन्या वृत्तपत्रांची व जुन्या-नव्या पत्रकारांची छायाचित्रे व पत्रकारांची संक्षिप्त चरित्रे या ग्रंथात आढळतात.

प्रा. बा. पाडगोळ, सुलभा हेर्लेकर

**कानिटकर, काशीताई गोविंदराव :** (ज. २० जानेवारी, १८६१, अष्टे, जि. सातारा–मृ. ३० जानेवारी, १९४८, पुणे). चरित्रलेखिका व कथा-कादंबरीकार. गोविंदराव कानिटकरांच्या पत्नी. सुशिक्षित सुधारक पतीच्या सहवासामुळे संस्कृत, मराठी व इंग्रजी साहित्याचा परिचय काशीबाईंना घडला. तसेच कुटुंबाचे स्नेही कादंबरीकार हरिभाऊ आपटे यांच्या प्रोत्साहनामुळे लेखनाची प्रवृत्ती निर्माण झाली.

स्थूलमानाने १८८५ ते १९३० हा काशीबाईंच्या लेखनाचा कालखंड. *रंगराव* (१९०३) ही काशीबाईंची पहिली कादंबरी. १८८५ च्या सुमारास 'मनोरंजन' आणि 'निबंधचंद्रिका' या मासिकांतून या कादंबरीची अनेक प्रकरणे प्रसिद्ध झाली होती. *पालखीचा गोंडा* (१९२८) ही त्यांची दुसरी कादंबरी, १९१३ साली 'नवयुग' मासिकातून क्रमशः प्रसिद्ध होत होती. *रंगराव* या कादंबरीत त्यांच्या पिढीतील स्त्री-पुरुषांच्या जीवनाची वास्तव चित्रे व त्यांची जीवनस्वप्ने रेखाटली आहेत. बालविवाह, सासुरवास, वैधव्य अशा घटनांच्या सभोवतालचे एकत्र कुटुंबातील सुखदुःखाचे चित्रण जसे या कादंबरीत आहे, तसेच शिकलेल्या स्त्री-पुरुषांची प्रेमविवाहाची, प्रौढ विवाहाची अद्याप दूरवर असलेली स्वप्ने प्रत्यक्षात उतरली असल्याचेही दर्शविले आहे. उत्तम स्वभावचित्रे व घरगुती भाषा ही या कादंबरीची विशेष उल्लेखनीय बाजू. 'प्रस्तुत कृती ही, अलीकडील स्त्री-शिक्षणाचे अत्यंत मधुर फुल होय', या शब्दांत तत्कालीन समीक्षकांनी *रंगराव* या कादंबरीचा गौरव केला आहे. *पालखीचा गोंडा* (१९२८) ही काशीबाईंची दुसरी कादंबरी १९१३ साली 'नवयुग' मासिकातून ते मासिक बंद होईपर्यंत, क्रमशः प्रसिद्ध होत होती. एका लहान ब्राह्मण मुलीचे एका छोट्या संस्थानातील वेड्या पुत्राशी झालेले दुःखद लग्न, तिच्या थोरल्या भावाच्या व सुबुद्ध राजमातेच्या सहकार्याने सामाजिक दृष्ट्या कसे यशस्वी होते, ते या कादंबरीत दाखविले आहे.

काशीबाईंचे स्फुट कथालेखन 'मनोरंजन', 'निबंधचंद्रिका', 'विविधज्ञानविस्तार', 'नवयुग', 'करमणूक' इत्यादी मासिक–साप्ताहिकांतून प्रसिद्ध झाले आहे. *चांदण्यातील गप्पा* (१९२१) या संग्रहात त्यांच्या काही कथा समाविष्ट असून *शिळोप्याच्या गोष्टी*-सारख्या अनेक कथा असंग्रहित आहेत. या कथा म्हणजे लहान आकाराच्या कादंबऱ्याच म्हणता येतील. हरि नारायण आपटे हे काशीताईंना बहीण मानत. आपट्यांच्या कथा-कादंबरी लेखनाचा ठसा काशीताईंच्याही लेखनावर उमटलेला दिसतो. पुस्तक परीक्षणात्मक व व्यक्तिपरिचयात्मक स्वरूपाचे काही स्फुटलेखनही काशीबाईंनी केलेले आहे. *हरिभाऊंची पत्रे* (१९२९) हे संपादित पुस्तक हरिभाऊ व कानिटकर दांपत्य यांच्या वाङ्मयप्रेमातून त्यांच्या परस्परांत उत्पन्न झालेल्या जिव्हाळ्याच्या संबंधाचे उत्तम दर्शन घडविते.

कथा-कादंबरीपेक्षाही त्यांचे विशेष महत्त्वाचे पुस्तक म्हणजे त्यांनी लिहिलेले *डॉ. आनंदीबाई जोशी यांचे चरित्र* (१८८९) हे होय. हे काशीबाईंचे पहिले पुस्तक. डॉ. आनंदीबाई जोशी ह्यांच्या मृत्यूनंतर लगेचच त्यांच्या आयुष्यासंबंधीची अधिकृत माहिती आप्त–स्वकीयांकडून मिळवून व आनंदीबाईंची पत्रे संपादून लिहिलेले हे चरित्र अतिशय विश्वसनीय झाले आहे. स्त्रीसुलभ सहजसुंदर भाषा आणि वेधक वर्णनशैलीमुळे ते चटकदार वाटते. मराठी चरित्रवाङ्मयात या चरित्रामुळे मोलाची भर पडली आहे. आपल्या काळाची हकीकत सांगणारे त्यांचे आत्मचरित्रही (१९७९) प्रकाशित झाले आहे.

सरोजिनी वैद्य, सुलभा हेर्लेकर

संदर्भ : सरोजिनी वैद्य, 'श्रीमती काशीबाई कानिटकर: आत्मचरित्र आणि चरित्र (१८६१-१९४१)', पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, १९८०.

**कानिटकर, गोविंद वासुदेव :** (ज. ९ जानेवारी, १८५४, पुणे–मृ. ४ जून, १९१८, पुणे). कवी, भाषांतरकार; सुरुवातीचे शिक्षण पुण्यास व उच्च शिक्षण मुंबईच्या विल्सन कॉलेजात. बी.ए. (१८७६), एलएल.बी.; मुंबई हायकोर्टात तीन वर्षे वकिली. नंतर सरकारी न्यायालयात मुन्सफ. त्यांच्यासाठी 'रावसाहेब' हे संबोधन अनेकदा उपयोजिलेले दिसते. पुण्यास भरलेल्या मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष (१९०६).

काशिताई कानिटकर या सुप्रसिद्ध लेखिकेचे पती. हरिभाऊ आपटे यांचे जिवलग मित्र. प्रसिद्ध नाटककार नारायण बापूजी कानिटकर हेही गोविंदरावांच्या कुटुंबियांपैकी एक. चित्रकला व संगीत या कलांचे शौकी. कॉलेजमध्ये असताना ह्यांनी 'दक्षिणाप्राईझ कमेटी' ह्या जाहिरातीवरून बक्षिसाकरिता *श्रीमंत नारायणराव पेशवे यांचा वध* (१८७८), *अकबरबादशाह* (१८७९) आदी दीर्घकाव्ये लिहिली. त्यांपैकी पहिल्या दोन काव्यांस बक्षिसे मिळाली. त्यांचे *संमोहलहरी* (१९००) हे दीर्घकाव्य विशेष प्रसिद्ध आहे. कानिटकरकालीन बऱ्याच सुशिक्षितांच्या मनात निर्माण झालेल्या अज्ञेयवादाच्या छटा प्रस्तुत काव्यात आढळत असल्यामुळे हे काव्य त्या काळी लोकप्रिय ठरले. ह्यांच्या स्फुट कवितांचा *कविकूजन* (१९३३) हा संग्रह त्यांच्या कन्येने, इचलकरंजीचे अधिपती बाबासाहेब घोरपडे ह्यांच्या स्नुषेने, श्रीमती अनुताई घोरपडे यांनी प्रसिद्ध केला.

शारदाप्रसादनमंडळ, पुणे १९०९ शी संबंधित.

काव्यरचनेखेरीज ह्यांचे अन्य लेखन भाषांतर स्वरूपाचे आहे. *भट्ट मोक्षमुल्लरकृत धर्मविषयक व्याख्याने* (१८८३) हे मॅक्समुल्लरच्या 'ओरिजिन ॲण्ड ग्रोथ ऑफ रिलिजन'चे भाषांतर, *स्त्रियांची परवशता* (१९०२) हे जॉन स्टुअर्ट मिलच्या 'सब्जेक्शन ऑफ वुइमेन'चे भाषांतर, *वीरसेन किंवा विचित्रपुरीचा राजपुत्र* (१८८३) हा शेक्सपिअरच्या 'हॅम्लेट' नाटकाचा अनुवाद, याशिवाय शेक्सपिअरच्या 'टायमन ऑफ अथेन्स', 'कोरिओलेनस' व 'मर्चंट ऑफ व्हेनिस' ह्या तीन नाटकांची भाषांतरे केल्याचा उल्लेख *कविकूजन* या संग्रहाच्या प्रारंभी त्यांच्या कन्येने लिहिलेल्या 'अल्पचरित्रा'त आढळतो.

*संमोहलहरी* हे स्वतंत्र काव्य बऱ्याच वरच्या दर्जाचे असून, रवींद्रनाथ ठाकूरांच्या 'गीतांजली'चा गद्य अनुवाद 'नवयुग' (१९१३) मासिकात प्रसिद्ध झाला आहे. पुढे पुण्याच्या आर्. व्ही. फडतरे यांनी *गीतांजली* पुस्तकरूपाने प्रसिद्ध केली आहे. हे पुस्तक त्यांच्या अखेरच्या काळातील उत्कृष्ट अनुवाद म्हणून निर्देशिता येईल.

गं. दे. खानोलकर, सुलभा हेर्लेकर

संदर्भ : सरोजिनी वैद्य, 'त्रिदल', 'संक्रमण', श्रीविद्या प्रकाशन, पुणे, १९८५.

**कानिटकर, नारायण बापूजी :** (ज. १८५२, पुणे–मृ. २५ जुलै, १८९७). कवी, नाटककार. प्राथमिक शिक्षण पुणे येथे. मुंबईच्या एल्फिन्स्टन हायस्कूलमधून मॅट्रिक (१८६८). वकिलीची परीक्षा देऊन पुणे येथे वकिलीचा व्यवसाय.

*अजविलाप* (श्री. गो. बा. कानिटकरांच्या सहकार्याने, १८७२) ही काव्यरचना आणि *दिवाणी काम चालविण्याचे शेतीविषयीचा कायदा* (१८७७) ही ह्यांची दोन पुस्तके प्रसिद्ध झाली असली तरी, त्यांची खरी वाङ्मयीन कामगिरी नाट्यक्षेत्रातच झालेली आहे.

*शशिकला व रत्नपाल* (१८८२, शेक्सपिअरच्या 'रोमिओ ॲंड ज्यूलिएट' या मूळ शोकांतिकेचा आनंदपर्यवसायी शेवट केलेला अनुवाद), *प्रतापराव चंद्रानना* (१८८३, केनिल्वर्थच्या एका कादंबरीच्या आधारे), *शिवाजी* (१८८९), *बाजीराव मस्तानी* (१८९२), *बाजी देशपांडे* (१८९४), *प्रतापगडचा मोहरा* (१८९६) ह्या अनुवादित व ऐतिहासिक स्वरूपाच्या नाटकांप्रमाणेच त्यांच्या काळातील परिस्थितीचे नाट्यरूप दिग्दर्शन करणारी किंवा तत्संबंधीचा तत्कालीन सुधारकांचा दृष्टिकोण व्यक्त करणारी काही सामाजिक नाटकेही यांनी लिहिली आहेत. *मल्हारराव गायकवाड यांचे नाटक* (१८७४), *संमती कायद्याचे नाटक* (१८९२), *न्यायविजय* (१८९२) ही नाटके या दृष्टीने उल्लेखनीय आहेत. त्यांचे सर्वांत गाजलेले नाटक म्हणजे *तरुणीशिक्षणनाटिका* (१८८६) हे होय. स्त्रीशिक्षणाच्या संभाव्य दुष्परिणामांचे भडक चित्रण करणाऱ्या ह्या नाटकातून तत्कालीन परंपराप्रिय सनातनी आणि स्वैरवृत्तीचे सुधारक ह्यांच्यातील संघर्षाचे चित्रण आढळते. प्रत्ययकारी प्रसंगचित्रण व चटकदार संवादलेखन ही त्यांच्या नाटकांची वैशिष्ट्ये. 'राणा भीमदेवी' थाटाच्या ऐतिहासिक नाटकांच्या काळात घरगुती संवादयोजना असलेली ऐतिहासिक नाटके लिहून कानिटकरांनी आपले वेगळेपण स्पष्ट केले. वर्तमान काळातील लक्षणीय घटनांना रंगभूमीवर साकार करणारे मराठीतील पहिले नाटककार, असा कानिटकरांचा उल्लेख केला जातो.

मु. श्री. कानडे, सुलभा हेर्लेकर, मृणालिनी शहा

संदर्भ : (१) गं. दे. खानोलकर, 'अर्वाचीन मराठी वाङ्मयसेवक, प्रथम खंड, भाग पहिला, मुंबई १९५२ (दु. आ.). (२) शं. बा. मुजुमदार, 'महाराष्ट्रीय नाटककार यांची चरित्रे', भाग पहिला, पुणे (कालोल्लेख नाही.)

**कामत, रामचंद्र कृष्ण ऊर्फ अण्णा :** (ज. १५ एप्रिल, १८७२, चंदगड, जि. बेळगाव–मृ. ७ फेब्रुवारी, १९६०, माशेल, गोवे). परमार्थ विषयावरील पुस्तकांचे लेखक. स्वग्रामी मिळाले तेवढे मराठी, इंग्रजी व संस्कृत भाषांचे शिक्षण घेऊन यांनी काही काळ बेळगावातील छापखान्यात मुद्रिते तपासण्याचे काम केले.

ह्यांनी परमार्थविषयक लहान-मोठी काही पुस्तके लिहिली. त्यांपैकी उल्लेखनीय म्हणजे *नामजपाचे महत्त्व* (१९३०) व *नामचिंतामणी* (१९३५) ही दोन नामयोगविषयक पुस्तके. याशिवाय *श्रीगुरुचरित्र* व *सार्थ एकनाथी भागवत* हे दोन ग्रंथ त्यांनी संपादित केले. ह्या दोन्ही ग्रंथांच्या संहिता परिश्रमपूर्वक शुद्ध करून त्यांनी प्रकाशित केल्या आहेत.

गं. दे. खानोलकर, म. ना. लोही

**कारखानीस, दत्तप्रसन्न नारायण :** (ज. १७ ऑगस्ट, १९०८, चाळीसगाव – मृ. १५ फेब्रुवारी, १९८६). कवी. दादर (मुंबई) येथील 'इंडियन एज्युकेशन सोसायटी'त अध्यापक. ह्यांचा *क्षितिजावर* (१९३५) हा कवितासंग्रह प्रसिद्ध आहे. सुमारे पन्नासहून अधिक कविता ह्या संग्रहात समाविष्ट आहेत. 'निराशेचे टोले खाऊन पेटलेल्या चित्तातून उडालेल्या ठिणग्या म्हणजे कविता' ही आपली काव्यविषयक धारणा त्यांनी 'काव्यगान' या कवितेतून व्यक्त केली आहे. गेयता, रचनेचे सौष्ठव व उदात्त कल्पनाविलास हे त्यांच्या कवितेचे वैशिष्ट्य. सामाजिक अन्यायाची चीडही ते क्वचित व्यक्त करतात. 'गोड अबोला', 'कोंबडा', 'जगाचा न्याय', 'कालाय तस्मै नमः' इत्यादी त्यांच्या कविता उल्लेखनीय वाटतात. 'स्वगृहिणी' सारखी विडंबनात्मक कविताही त्यांनी लिहिलेली आढळते.

द. वि. तेंडूलकर, म. ना. लोही

**कालगावकर, कृष्णाजी विष्णु :** पहा आचार्य, कृष्णाजी विष्णु

**कालेलकर, गोविंद मंगेश :** (ज. १६ मे, १८७४, वेंगुर्ले, जि. रत्नागिरी – मृ. फेब्रुवारी, १९४५, बडोदे). लोकजीवन व लोकसाहित्य या विषयांचे लेखक. शिक्षण सावंतवाडी हायस्कूल व बडोदा कॉलेजात. मुंबई सरकारच्या 'एथ्नॉग्राफिकल डिपार्टमेंट'मध्ये नोकरी.

कालेलकरांनी *मुंबई इलाख्यातील जाती* (१९२८) आणि *लौकिक दंतकथा* (१९३४) ही दोन पुस्तके एन्थोवेनच्या अनुक्रमे 'ट्राइब्स ॲन्ड कास्टस् ऑफ बॉम्बे' व 'दि फोकलोअर ऑफ बॉम्बे' ह्या पुस्तकांच्या आधारे लिहिली आहेत. पहिल्या पुस्तकात मुंबई इलाख्यात आढळणाऱ्या सर्व जाती व त्यांचे पोटभेद, त्यांची उत्पत्ती, चालीरीती, आहार, उद्योग यासंबंधी माहिती दिली असून, दुसऱ्या पुस्तकात मनुष्यसमाजाच्या समजुती व चालीरीती ह्यांचा समावेश आहे. *लौकिक दंतकथा* हे लोकसाहित्य ह्या विषयावरील पहिलेच मराठी पुस्तक असल्याने ते महत्त्वाचे आहे.

गं. दे. खानोलकर, म. ना. लोही

**कावडीबाबा :** पहा पिंपळगावकर, विठ्ठल अनंत

**काळदंड :** पहा सोमण, कृष्णाजी लक्ष्मण

**काळे, मोरेश्वर गोपाळ :** (ज. २१ मे, १८९४, कवाड, ता. भिवंडी – मृ. १६ जानेवारी, १९६०). प्रवासवर्णनकार. शिक्षण मॅट्रिक, ट्रेन्ड शिक्षक. सुरुवातीला प्राथमिक शिक्षक व नंतर विमा एजन्ट.

यांची *माझा काश्मीरचा प्रवास* (१९३०), *आमची म्हैसूरची सफर* (१९३१) व *माझ्या हिमालयातील यात्रा* (१९३३) ही तीन पुस्तके प्रसिद्ध झाली आहेत. लेखकाच्या प्रवासाचा सविस्तर वृत्तान्त कथन करणारी ही वस्तुनिष्ठ प्रवासवर्णने जिव्हाळ्याच्या निवेदनशैलीमुळे वेधक, खुमासदार व प्रत्ययकारी उतरली आहेत. हौशी लोकांना प्रवासाकरिता मार्गाचे आराखडे, नकाशे व उपयुक्त माहिती पुरवून लेखकाने प्रस्तुत पुस्तकाद्वारे मार्गदर्शनही केले आहे.

उषा टाकळकर, म. ना. लोही

**काळे, यादव माधव :** (ज. १८८१, लोणार, ता. मेहेकर, जि. बुलढाणा – मृ. ११ मार्च, १९४३, बुलढाणा). इतिहाससंशोधक व लेखक. शिक्षण लोणार, मेहेकर व अकोला येथे. मॅट्रिक (१८९८). काही काळ विदर्भात शिक्षक. नंतर बी.ए., एल्‌एल्‌.बी. झाल्यावर मेहेकर व बुलढाणा येथे वकिली. मध्यप्रांत विधिमंडळाचे सभासद (१९२४-३७) व अध्यक्ष (१९२६). विदर्भ साहित्यसंघाच्या दुसऱ्या अधिवेशनाचे अध्यक्ष (अमरावती १९२४).

ह्यांचे *लोणारवर्णन* (१९०३), *वऱ्हाडचा इतिहास* (भाग १–१९०५, भाग २ – १९२४), *गोंडलोकांचा इतिहास* (१९२७), *नागपूर प्रांताचा इतिहास* (१९३४) हे स्वतंत्र संशोधनात्मक ग्रंथ आणि *ऐतिहासिक पत्रव्यवहार*, *नागपूरकर भोसल्यांची बखर*, *श्रीधरकृत महिम्नस्तोत्र* व जगन्नाथकृत *शशिसेना काव्य* हे संपादित ग्रंथ महत्त्वाचे आहेत. *मध्यप्रांत वऱ्हाडचा इतिहास* या विषयावरील व्याख्यानांची पुस्तिकाही (१९३८, नागपूर विद्यापीठ) प्रसिद्ध आहे. *वऱ्हाडचा इतिहास* या ग्रंथात इ. स. पूर्व ४०० पासून आंग्लकालखंडापर्यंतच्या राजांच्या वंशावळी, राज्यक्रांत्या, राजकीय, सामाजिक व औद्योगिक परिस्थिती, वऱ्हाडी बोली व वाङ्मय यांची विस्तृत माहिती आढळते. *नागपूर प्रांताचा इतिहास* हा विशेष महत्त्वाचा ग्रंथ. ह्याचीच दुसरी सुधारित आवृत्ती *नागपूरकर भोसल्यांचा इतिहास* (१९७९) नावाने प्रकाशित झाली. वाकाटकांच्या इतिहासाचा पहिला शोध लावण्याचे श्रेय काळे यांच्याकडे जाते.

याशिवाय 'आप्पासाहेब भोसले', 'मालोजींचा मृत्युशक', कळंब येथील 'बुऱ्हाण निजामशहा' यासारखे ग्रंथनिविष्ट न झालेले त्यांचे संशोधनात्मक लेखही उल्लेखनीय आहेत.

राम शेवाळकर, जयंतकुमार बंड

**काळे, वामन गोविंद :** (ज. १० एप्रिल, १८७६, सांगली – मृ. २७ जानेवारी, १९४६, पुणे). अर्थशास्त्रज्ञ, लेखक व अनुवादकर्ते. शिक्षण एम्‌.ए.पर्यंत, न्यू इंग्लिश स्कूल व फर्ग्युसन महाविद्यालय, पुणे येथे.

फर्ग्युसन महाविद्यालयात अर्थशास्त्र व इतिहासाचे प्राध्यापक (१९०५–३२). 'कौन्सिल ऑफ स्टेट' (१९२१–२३), हिंदुस्थान सरकारचे 'जकात मंडळ' (१९२३–२५) इत्यादी संस्थांचे सभासद. *अर्थ* (१९३५) ह्या साप्ताहिकाचे संस्थापक-संपादक. 'इंडियन जर्नल ऑफ इकॉनॉमिक्स कॉन्फरन्स'च्या बाराव्या अधिवेशनाचे अध्यक्ष (म्हैसूर, १९२९). अनेक सहकारी बँकांच्या व संस्थांच्या स्थापनेत आणि संचालनात महत्त्वाचा सहभाग.

अर्थशास्त्रावरील अनेक इंग्रजी ग्रंथांबरोबरच *अर्थशास्त्र* (१९२७), *भारतीय अर्थशास्त्र* (१९२९), *हिंदुस्थानची रिझर्व बँक* (१९३५), *व्यापारी उलाढाली* (१९३५), *बँका आणि त्यांचे व्यवहार* (१९३४) आणि *सहकार* (१९४१) हे त्यांचे मराठी ग्रंथ प्रसिद्ध झाले आहेत. मराठीत अर्थशास्त्रविषयक ज्ञान प्रसृत होण्याच्या दृष्टीने काळे यांचे लेखन महत्त्वाचे आहे.

प्रा. काळे यांनी भारताच्या आर्थिक इतिहासाच्या क्षेत्रात महत्त्वपूर्ण संशोधनात्मक लेखन केले आहे. *शिवकालीन चलनाविषयी चर्चा* (जून १९३१), *कोंढणपूर येथील शंभर वर्षांपूर्वीचे चलन* (जून १९३२), *पुण्यातील सराफीच्या शके १६७२ च्या वहीचे पान* (मार्च १९३६), *शंभर वर्षांपूर्वीच्या काही हुंड्या* (सप्टेंबर १९३६), *उत्तर मराठेशाहीतील सराफी धंदा* (एप्रिल १९३८) इत्यादी लेख भारत इतिहास संशोधक मंडळाच्या त्रैमासिकात प्रसिद्ध.

प्रा. काळे यांच्या इतर लिखाणापैकी 'मासिक मनोरंजन'मधील *संशोधन-समाज समाचार* ही विनोदी लेखमाला, बेन जॉन्सनच्या 'सायलेंट वूमन'वर आधारित *विक्षिप्तराव* हे प्रहसन (१९०८) आणि चार्लस् डिकन्सच्या 'पिकविक् पेपर्स'चे रूपांतर उल्लेखनीय.

रमेश पानसे, जयंतकुमार बंड

**काळे, विश्वनाथ रामचंद्र** : (ज. १८२३ – मृ. १८८८). संगीत-प्रचारक, संगीतविषयक वाङ्मयाचे कर्ते. वकिलीचे शिक्षण पूर्ण. बडोद्याला वकिली. 'मुंबई गायनसमाजा'चे क्रियाशील कार्यकर्ते. *गायनाब्धिसेतु* (१८७७) आणि *संगीतदर्पण* (१८८३) ह्या अत्यल्प काळ चाललेल्या शिळामुद्रित मासिकांचे संस्थापक-संपादक.

*तंतुवाद्य–सतार शिकण्याचे पुस्तक* (१८७२) (सूर्याजी सदाशिव महात्मे यांच्या सहकार्याने); *तंतुगानप्रवेश–सतारीत चिजा वाजविण्याचे पुस्तक* (१८७३), *मृदंगवादन सचित्र* (१८८०) ही त्यांची संगीतविषयक पुस्तके प्रसिद्ध आहेत. ही पुस्तके आज दुर्मिळ झाली आहेत.

साधनांची अनुपलब्धता व काळे ह्यांचा काळ लक्षात घेता त्यांचे लेखन उल्लेखनीय वाटते.

शरदचंद्र विष्णु गोखले, जयंतकुमार बंड

**काळे, विष्णु लक्ष्मण** : (ज. १८५७, शहापूर, जि. बेळगाव–मृ. १९३९). कादंबरीकार, नाटककार व चरित्रलेखक. शिक्षण मॅट्रिकपर्यंत. बेळगाव येथे मिशन हायस्कूलमध्ये शिक्षक. *जिंजीवास अथवा छत्रपती राजाराम महाराज* (१८९३), *अस्तोदय अथवा फिरून चढाई–भाग १ ला* या दोन ऐतिहासिक कादंबऱ्या, *वृंदा नाटक अथवा मराठ्यांच्या स्वामिभक्तीची कमाल* (१९०४) हे थोरल्या राजाराम महाराजांच्या जिंजी येथील आयुष्यावरील नाटक, *धोंडजी वाघ आणि बापू गोखल्यांची प्रतिज्ञा* (१९१६) ही दोन अंकी नाट्यमय निर्मिती. ह्या ललित पुस्तकांशिवाय यांनी *व्याकरणमंजरी अथवा ग्रंथावरून व्याकरण करण्याची पद्धती* (१८९५), *सहबोधरत्नमाला* (१८९६) हा बोधपर निबंध व *ब्रम्हेंद्रस्वामी चरित्र* ही पुस्तके लिहिली आहेत.

मंजिरी बेडेकर, मीनल निसळ

**काळेले, अनंत सीताराम** : (ज. १८७१–मृ. २४ नोव्हेंबर, १९३०). कोशकार. शिक्षण एम्.ए. इंदूर येथे हायकोर्ट वकील व सबजज्ज. मराठीत वीस खंडांचा एक विस्तृत कोश 'राजकोश' ह्या नावाने तयार करावा, अशी ह्यांची योजना होती. या शब्दकोशात इंग्रजी-मराठी; इंग्रजी-इंग्रजी आणि मराठी-मराठी अशा चारही कोशांची विषयवारीने एकत्रित रचना करण्याची योजना होती. परंतु प्रस्तुत कोशाचे फक्त दोनच भाग (१९२७, १९३०) प्रसिद्ध झाले आहेत. ह्यातील इंग्रजी शब्दांची रचना अर्थानुरोधाने व विषयाप्रमाणे केली असून ईश्वर, धर्म व लोक असे तीन मुख्य विषय व त्यांचे अनेक पोटविभाग त्यात येतात. प्रत्येक विषयातील शब्दरचनेचे भाग व्याकरणातील रीतीप्रमाणे नामे, विशेषणे, क्रियापदे, भाषासंप्रदाय ह्या सदराखाली दिले आहेत. ह्या कोशाचे खास वैशिष्ट्य म्हणजे त्यात समानार्थक जास्तीत जास्त शब्द एके ठिकाणी ग्रथित केल्यामुळे हवा तो शब्द अगदी सहज सापडतो. मात्र कोशकर्त्यांच्या आकस्मिक मृत्यूमुळे हा कोश पूर्ण होऊ शकला नाही.

उषा टाकळकर, मीनल निसळ

**किंजवडेकर, वामनशास्त्री** : (ज. १८८९ – मृ. १६ ऑक्टोबर, १९३९). मीमांसा-विषयक लेखक. मूळ गाव गोवा प्रांतातील पेडणे. संस्कृत शिक्षण व व्याकरण, न्याय, वेदान्त इत्यादी शास्त्रांचे अध्ययन. मीमांसा-शिरोमणी व सरस्वती-भूषण या पदव्या प्राप्त.

मीमांसेवरील लेखनास १९१३ साली प्रारंभ. पुढे लो. टिळकांच्या आश्रयाने राहून अनेक ग्रंथ प्रकाशित केले. 'मीमांसा विद्यालय' या संस्थेची उभारणी त्यांनी केली.

ग. वि. कविटकर, रा. बा. बक्षी

**किन्नरे, कृष्णाजी गोविंद** : (ज. १८६९–मृ. १६ जानेवारी, १९५२). आरोग्यविषयक व शालोपयोगी ग्रंथांचे कर्ते. न्यू इंग्लिश स्कूल, पुणे येथे शिक्षक (१९०४–२७). *काव्यदोहन* पहिली आवृत्ती (१९०७), दुसरी आवृत्ती (१९२०), *काव्यमोहन* (१९२७), *काव्यामोद* (१९१४) ही यांची प्राचीन, अर्वाचीन मराठी कवितेतील वेच्यांची संकलने होत. *वाचनपाठ*, *वानरांचा देव*, *समर्थांचे बालबोध चरित्र*, *मुलांचा श्रीकृष्ण*, *श्रीरामकृष्ण कथामाला*, *मुलींची द्रौपदी*, *मुलींची सीता*, *रामकृष्णवाक्यसुधा* (१९१५) (गॉस्पेल ऑफ श्रीरामकृष्ण ह्या ग्रंथाधारे), *श्रीरामकृष्णांचा उपदेश* (अनुवाद) इत्यादी अनेक पुस्तके शालेय विद्यार्थ्यांवर सुसंस्कार करण्यासाठी यांनी लिहिली. याशिवाय *लंघनचिकित्सा* (१९२०), *मिताहार माहात्म्य* (१९२२), *शरीरसंगोपनशास्त्र* (१९४६), *प्रकृतिदर्शन* ह्या आरोग्य-विषयक ग्रंथांची रचना त्यांनी केली. 'चित्रमयजगत्' मासिकाचे हे प्रारंभापासूनचे लेखक होते.

ग. वि. कविटकर, जयंतकुमार बंड

**किरात** : पहा टिकेकर, रामचंद्र विनायक

**किरात** : पहा सोमण, कृष्णाजी लक्ष्मण

**किर्लोस्कर, आनंदीबाई शंकर** : (ज. १९०५, टिलाटी, जि. सोलापूर–मृ. १७ सप्टेंबर, १९४२, किर्लोस्करवाडी). *स्त्री* मासिकाच्या संपादिका. शांताबाई किर्लोस्कर यांच्या मातोश्री. 'किर्लोस्कर' मासिकाचे शं. वा. किर्लोस्कर यांच्या पत्नी व कथालेखिका, नाटककार व संपादिका. अध्यापिकेचे शिक्षण पूर्ण. किर्लोस्करवाडीतील प्राथमिक शाळेत शिक्षिका. 'स्त्री' मासिकाच्या संपादनात महत्त्वाचा सहभाग.

*प्रतिबिंब* (१९४१), *ज्योती* (१९४४) व *अंतरंग* (१९४६) हे त्यांचे तीन कथासंग्रह प्रसिद्ध आहेत. स्त्रियांच्या व्यथा, वेदना, दुःख, समस्या यांना वाचा फोडणे हा या लेखनामागील हेतू. समाजातील लब्धप्रतिष्ठितता, रूढिप्रियता, स्त्रियांविषयीची अनुदार दृष्टी यांमुळे होणारी स्त्रियांची कुचंबणा, विधवांच्या आणि मोलमजुरी करणाऱ्या

स्त्रियांच्या मनाचा होणारा कोंडमारा त्यांनी आपल्या कथांतून चित्रित केला आहे. स्त्रियांच्या अंतरंगातील दुःखे त्यांनी हळुवारपणे रेखाटली आहेत. तंत्राचे भान ठेवल्यामुळे त्यांच्या कथा आटोपशीर आणि नीटनेटक्या उतरल्या आहेत.

*नव्या वाटा* (१९४१) हे त्यांचे पुरुषपात्रविरहित नाटक. परित्यक्ता, प्रौढ कुमारिका, विधवा यांच्या जीवनविकसनार्थ नव्या वाटा दाखविण्याचा प्रयत्न या नाटकात आहे. विवाहपद्धतीतील दोष नाहीसे करून स्त्रीजीवन सुखदायक करण्यासाठी नव्या वाटा चोखाळणे आवश्यक असल्याचे प्रतिपादन त्यांनी प्रस्तुत नाटकात केले आहे.

आनंदीबाईंनी काही श्रुतिकाही लिहिल्या आहेत.

शांता किर्लोस्कर, जयंतकुमार बंड

**किर्लोस्कर, बळवंत पांडुरंग तथा अण्णासाहेब किर्लोस्कर :** (ज. ३१ मार्च, १८४३, गुर्लहासूर, जि. धारवाड – मृ. २ नोव्हेंबर, १८८५, गुर्लहासूर). मराठी संगीत रंगभूमीचे शिल्पकार. पहिले संगीत नाटककार, नट, गायक, संगीतज्ञ, नाट्यशिक्षक व कवी. किर्लोस्करांचे मूळ घराणे विद्वान शास्त्री – पंडितांचे. गुर्लहासूर येथे कानडी भाषा व संस्कृतीचा प्रभाव असल्याने वयाच्या बाराव्या वर्षापर्यंत कानडी व मराठी ह्या भाषांचा घरीच अभ्यास. १८५४ पासून कोल्हापूर येथे दोन वर्षे शिक्षण. त्यानंतर मुलकीची परीक्षा देण्याकरिता धारवाडला चार वर्षे वास्तव्य. १८६३ पासून पुणे येथील विश्रामबागवाड्यातील शाळेत शिक्षण. १८६६ साली गुर्लहासूरला पुनश्च परत. धारवाडला वकिलीची परीक्षा देण्याचा अयशस्वी प्रयत्न. शिक्षणासाठी पुण्याला असताना अण्णासाहेबांना नाटकाचा छंद लागला. नाटकाच्या नादापायी अण्णासाहेबांनी अनेक नोकऱ्या बदलल्या. सहाध्यायी व गुणी घरंदाज मुलांना घेऊन स्वतःची नाटकमंडळी स्थापन केली. *विक्रमचरित्र* व *एल्फिन्स्टन बाजीराव फार्स* ह्या स्वलिखित नाटकांचे प्रयोग केले. परंतु ही नाटकमंडळी फारशी तग धरू शकली नाही. बेळगावला शिक्षक असताना त्यांनी 'भरतशास्त्रोत्तेजक मंडळा'ची स्थापना करून संस्कृत 'शाकुंतल', 'विक्रमचरित्र', 'मल्हाररावाचे नाटक' इत्यादी नाटकांचे प्रयोग करून दाखवले. त्याचवेळी त्यांनी *शांकरदिग्विजय* (१९७४) हे नाटक लिहिले. १८६७ साली दक्षिणा प्राईझ कमिटीच्या स्पर्धेसाठी अण्णासाहेबांनी शिवाजी महाराजांवर ५०० आर्यांचे एक दीर्घकाव्य रचले. याखेरीज *किरातार्जुनीय*, *समुद्रमंथन*, *विक्रमचरित्र*, *एल्फिन्स्टन बाजीराव फार्स*, *श्रीकृष्णपारिजातक*, *हरिश्चंद्र* इत्यादी अडतीस आख्याने व नाट्यकाव्ये रचली. *अल्लाउद्दिनाची चितूरगडावर स्वारी* (१८६७ ते १८७०) हे गद्य नाटकही त्यांनी लिहिले. मात्र ज्या नाटकांनी मराठी रंगभूमीचा चेहरामोहरा संपूर्ण बदलला आणि रंगभूमीवर क्रांती केली, अशी अण्णासाहेबांची संगीत नाटके फक्त तीनच. *संगीत शाकुंतल* (१८८०), *संगीत सौभद्र* (१८८२) आणि *रामराज्यवियोग* (अपूर्ण – १८८४).

अण्णासाहेबांनी तत्कालीन नाटकमंडळ्यांसाठी आख्याने आणि नाट्यपदांची रचना केली. येथेच त्यांनी सर्वप्रथम 'विष्णुदासी परंपरे'ला छेद दिला. त्यांच्या आख्यानांत आणि नाट्यकाव्यांत कथानकापेक्षा व्यक्तिरेखा अधिक महत्त्वाच्या आहेत. त्यांनी स्वभावलेखनावर अधिक भर दिला आहे. त्यातील पदे केवळ सूत्रधाराने म्हणावयाची नसून ती निरनिराळ्या पात्रांनी म्हणावयाची आहेत. अशा रीतीने मराठी नाट्यरचनेतील सूत्रधाराचे पारंपरिक महत्त्व अण्णासाहेबांनी संपुष्टात आणले. "इंग्रजीत जसे 'ऑपेरा' असतात तशा प्रकारचे शाकुंतलचे संगीतबद्ध रूपांतर किर्लोस्करांनी केले आणि मराठी नाटकांत आजपर्यंत फारसा उपयोगात नसलेला रागबद्ध संगीताचा प्रकार प्रचारात आणिला" असा उल्लेख *शाकुंतल* नाटकाच्या पहिल्या आवृत्तीच्या प्रस्तावनेत आढळतो. संगीत नाटकाच्या रूपाने अण्णासाहेबांनी महाराष्ट्राला एका उच्च पातळीवरील सांस्कृतिक आनंदाचे माध्यम उपलब्ध करून दिले. हे त्यांचे सर्वाधिक महत्त्वाचे कार्य आहे.

सदानंदस्वामींनी रचलेल्या 'शंकर विजय' या संस्कृत ग्रंथाचा आधार घेऊन किर्लोस्करांनी *शांकरदिग्विजय* (१८७४) हे नाटक लिहिले. या नाटकाचे केंद्र श्रीमद् शंकराचार्यांनी बौद्ध धर्माचा पाडाव करून, वैदिक धर्माची प्रतिष्ठापना कशी केली हे आहे. हे नाटक सुसूत्र, कथावस्तु, रेखीव व्यक्तिदर्शन व प्रवेशांची कलात्मक योजना वगैरे गुणांनी युक्त आहे. त्या काळच्या पौराणिक पद्धतीने लिहिलेले असे जरी हे नाटक असले, तरी यात पदे नाहीत.

अण्णासाहेबांचे नाट्यलेखन उत्क्रांत होत गेलेले आहे. परंपरागत पौराणिक नाटकांचा बारकाईने अभ्यास करीत असतानाच, नाट्यकला आणि तंत्र याविषयी ते चिंतन करीत होते. त्यातूनच त्यांना नवीन नवीन प्रयोग करण्याची प्रेरणा मिळाली. विष्णुदासी परंपरेतील पौराणिक नाटकांबरोबरच संस्कृत आणि शेक्सपिअरची रूपांतरित नाटकेही त्या काळात होत होती. नाटकासंबंधीच्या त्यांच्या लोकविलक्षण नादाच्या ओघात किर्लोस्करांनी एकदा 'इंद्रसभा' या नावाची फारसी संगीतिका पाहिली. यातूनच स्फूर्ती घेऊन त्यांनी महाकवी कालिदासाच्या *शाकुंतल* या नाटकाचा मराठी अनुवाद तयार केला. विशेषकरून त्यातील श्लोकांच्या जागी पदे रचली आणि गद्यपद्यमिश्रित नाटकाचा एक नवाच प्रकार मराठी रसिकांना सादर केला. त्या नाटकाला मिळालेले अपूर्व यश आणि अफाट लोकप्रियता पाहून त्यांनी १८८० साली 'किर्लोस्कर नाटकमंडळी'ची स्थापना केली.

*संगीत शाकुंतल* नंतर अण्णासाहेबांनी महाभारतातील सुभद्राहरणाची कथा आणि तद्विषयक मोरोपंतांचे 'कृष्णविजया'तील आख्यान यांच्या आधारे *संगीत सौभद्र*ची रचना केली. सुसंघटित कथानक, आकर्षक विलोभनीय स्वभावचित्रे, पात्रांचा व प्रसंगाचा मितव्यय, खुसखुशीत, आटोपशीर, चटकदार, अकृत्रिम, कथानकाला गती देणारे संवाद, रसवैचित्र्य, सुंदर काव्यकल्पना, मधुर आणि प्रसंगविशेषी काव्यमय, प्रासादिक, नाट्यपूर्ण व कथेशी एकरूप झालेली विपुल पदे, रसाविर्भाव आणि व्यक्तिदर्शन यांचा सुरेख समतोल या गुणवैशिष्ट्यांमुळे समृद्ध असणारे *संगीत सौभद्र* हे नाटक एक अजोड कलाकृती म्हणून मान्यता पावलेले आहे. आजही या नाटकाची मोहिनी कमी झालेली नाही.

अण्णासाहेबांचे तिसरे नाटक *रामराज्यवियोग* (प्रथम प्रयोग, २० ऑक्टोबर, १८८४, पुणे येथे) हे रामायणातील कथानकावर बेतलेले आहे. अण्णासाहेबांच्या अकाली मृत्यूमुळे ते अपूर्ण राहिले.

अण्णासाहेब किर्लोस्कर हे स्वतः उत्कृष्ट नट व नाट्यशिक्षकही होते. आपल्या कुशल संघटन कौशल्याने, अभिजात रसिकतेने आणि कल्पकतेने त्यांनी नट, नाटक आणि रंगभूमी ह्यांना ज्याप्रमाणे स्थैर्य प्राप्त करून दिले त्याचप्रमाणे त्यांनी एकंदर नाट्यविषयाला प्रतिष्ठा प्राप्त करून दिली. विष्णुदासी परंपरेतील पौराणिक रंगभूमीचा त्यांनी कायापालट घडवून आणला. पूर्वीच्या नाटकातील ओबडधोबड आणि अव्यवस्थितपणा काढून टाकून मराठी नाटकाच्या अंतर्बाह्य स्वरूपात कलात्मक सौंदर्याची भर घातली.

अण्णासाहेबांनी पौराणिक नाटकमंडळ्या आणि कीर्तनकार ह्यांना आख्याने, पदे रचून दिली. त्यांच्या संगीत रचनेत नव्या-जुन्या प्रवृत्तींचे मिश्रण होते. कानडी, उत्तर हिंदुस्थानी व मराठी गाण्याच्या आणि मराठी लावण्यांच्या त्यांना अवगत झालेल्या चालींचा त्यांनी आपल्या पदांकरिता कुशलतेने उपयोग करून घेतला. त्यामुळे मराठी नाटक समाजाच्या सर्वच थरांपर्यंत पोहोचले.

मोहिनी वर्दे, जयंतकुमार बंड, कमलेश

संदर्भ : (१) अप्पाजी विष्णु कुलकर्णी, 'मराठी रंगभूमी'. (२) यशवंत गंगाधर केळे; नरहर काशीनाथ धारपुरे, 'समग्र किर्लोस्कर'. संपादक–काळे, के. नारायण. (३) कुलकर्णी, बा. ल.; दळवी, वा. रा. 'मराठी रंगभूमी – मराठी नाटक'. (४) शं. बा. मुजुमदार – 'अण्णासाहेब किर्लोस्कर यांचे चरित्र'. (५) डॉ. व. दि. कुलकर्णी – 'संगीत सौभद्र : घटना आणि स्वरूप'. (६) व. शां देसाई, 'किर्लोस्कर आणि देवल'. (७) कृ. बा. मराठे, 'मराठी रंगभूमीचा पूर्वरंग'.

**किर्लोस्कर, वासुदेव काशिनाथ :** (ज. १८६३ – मृ. १९४९). बुद्धिप्रामाण्यवादी व वैज्ञानिक दृष्टीचे सुधारणावादी निबंधकार. 'किर्लोस्कर' मासिकाचे 'शं. वा. कि.' ह्यांचे वडील. व्यवसायाने डॉक्टर. वास्तव्य सोलापूर येथे.

ह्यांनी 'किर्लोस्कर' व 'स्त्री' मासिकांतून अनुक्रमे *अस्पृश्यता हक्कुठार अर्थात डॉ. भीमराव रामजी आंबेडकर यांस लिहिलेली पाच अनावृत्त पत्रे* (१९३६) व *विवाहसंस्थेचा इतिहास* (१९३७) ह्या दोन लेखमाला लिहिल्या व पुढे ह्याच पुस्तकरूपाने प्रसिद्ध झाल्या. पहिल्या लेखमालेत किर्लोस्करांनी असे प्रतिपादन केले की, आधुनिक भौतिक शास्त्राच्या युगात सर्व जुने धर्म निरुपयोगी असून डॉ. आंबेडकरांनी शुद्ध भौतिकवादी दृष्टिकोणाचा नवा धर्म स्थापावा; दुसरी लेखमाला एंगेल्सच्या 'फॅमिली, प्रायव्हेट प्रॉपर्टी ॲण्ड स्टेट' ह्या ग्रंथाच्या आधारे लिहिली आहे.

पां. बा. गाडगीळ, म. ना. लोही

**कीर्तने, नीलकंठ जनार्दन :** (ज. १८४४–मृ. ७ मार्च, १८९६). मराठ्यांच्या इतिहास साधनांचे अव्वल इंग्रजीतील आद्य संशोधक, संपादक, मराठा इतिहासाचे टीकाकार व शेक्सपियरच्या नाटकाचे अनुवादक. शिक्षण बी.ए. व्यवसाय प्रथम इंदूर राज्यात शिक्षक. त्यानंतर देवास, जावरा आणि मंगरूळ (सौराष्ट्र) ह्या संस्थानांत राजकुमारांचे शिक्षक. 'रावबहादूर' ह्या पदवीने सन्मानित.

डेक्कन कॉलेजात शिकत असताना त्यांनी ग्रँट डफच्या 'हिस्ट्री ऑफ मराठाज' (१८२६) ह्या तत्कालीन प्रमाणभूत ग्रंथाच्या डेव्हिड केपनकृत 'मराठ्यांची बखर' ह्या मराठी भाषांतरावर पुणे कॉलेजातील एक विद्यार्थी ह्या नावाने 'पूना यंग मेन्स असोसिएशन'च्या सभेत *मराठी इतिहासाविषयी निरूपण* (१८६८) ह्या ५४ पृष्ठांच्या निबंधाद्वारे खरपूस टीका केली. तो निबंध 'इंदुप्रकाश' ह्या पत्रात प्रसिद्ध झाला. डफच्या 'मराठी बखरी'वरील कीर्तन्यांचे आक्षेप व टीका ही केवळ डफवरील 'पहिली मराठी टीका' म्हणूनच नव्हे तर मराठी इतिहास, तद्विषयक संशोधन व लेखन ह्यांची प्रेरणा व स्वरूप व्यक्त करणारी आहे. त्यांनी संपादित केलेल्या मल्हार रामराव चिटणीसांच्या *शिवाजी महाराजांचे सप्तप्रकरणात्मक चरित्र* (१८८२) या बखरीच्या प्रस्तावनेत व्यक्त केलेले इतिहाससंशोधन विषयक विचार मननीय आहेत. आंग्लशिक्षित नवीन विद्वानांमध्ये मराठ्यांच्या इतिहासाबद्दल अज्ञान, अनास्था व पूर्वग्रह आहेत आणि भारतीय संस्थानिक, सरदार इत्यादीही इतिहासाची साधने, त्यांचे प्रकाशन याविषयी उदासीन आहेत, याविषयी त्यांनी खेद व्यक्त केला आहे.

कीर्तन्यांच्या उपर्युक्त दोन निबंधांनी मराठी इतिहाससंशोधन लेखनास नवी दिशा दाखवली. त्या निबंधांमुळे 'डफचे युग' आणि त्याच्या ग्रंथाचे प्रामाण्य संपुष्टात येऊन इतिहासाच्या यथार्थ मूल्यमापनास व पुनर्विचारास चालना मिळाली.

कीर्तन्यांचे शेक्सपियरच्या 'टेंपेस्ट' नाटकाचे भाषांतरही (१८७५) प्रसिद्ध आहे. तसेच *सांप्रत प्रचारातील हिंदुधर्म आणि अर्वाचीन इष्ट सुधारणासंबंधी त्यांची योग्यता* हे पुस्तक लिहून आपल्या धार्मिक सुधारणावादी मतांचे दर्शन घडवले. त्यांचे संशोधनपर लेख 'इंडियन ॲंटिक्वेरी'मध्ये प्रसिद्ध होत. नयचंद्रसुरीचे 'हम्मीरवध' या ऐतिहासिक संस्कृत महाकाव्याचे संपादन त्यांनी केले असून त्याला उत्कृष्ट इंग्रजी प्रस्तावना जोडली आहे.

श्री. ग. मोडे, म. ना. लोही

**कीर्तने, विनायक जनार्दन :** (ज. २० ऑगस्ट, १८४०, राजूर, ता. जुन्नर, जि. पुणे–मृ. १९ डिसेंबर, १८९१, पुणे). नाटककार. १८५९ साली प्रथमच बाहेर पडलेल्या मॅट्रिकच्या पहिल्या तुकडीतील विद्यार्थी. १८६२ साली कॉलेज सोडून धुळे, कारवार येथे शिक्षक. नंतर इंदूर संस्थानात विद्याखात्यात नोकरी, इंदूरच्या युवराजाचे शिक्षक. (१८७१). काही काळ होळकरांचे दिवाण.

कीर्तन्यांनी 'मराठी ज्ञानप्रसारक सभे'पुढे मॅट्रिकच्या वर्गात असताना 'इंग्लंडातील सोळाव्या शतकातील राज्यक्रांती' व १८६० साली 'हिंदुस्थानातील प्राचीन विद्या' हा निबंध वाचला. १८६१ साली 'थोरले माधवराव पेशवे याजवर नाटक' या सभेपुढे वाचले. *थोरले माधवराव पेशवे* (१८६१) हे मराठीतील स्वतंत्र–पहिले, ऐतिहासिक आणि शेक्सपियरच्या धर्तीचे शोकान्त नाटक. हे लिहिण्याचा मान कीर्तने यांचेकडे जातो. ह्या नाटकाला ग्रँट डफच्या 'मराठ्यांच्या इतिहासा'तील माहितीचा मुख्य आधार आहे. ऐतिहासिक व्यक्तीमधला 'माणूस' 'इनर मॅन' चितारण्याचा कीर्तन्यांचा हा प्रयत्न मराठीत तसा सर्वस्वी नवा होता. माधवरावांच्या मृत्यूने आणि रमाबाईच्या सहगमनाने या नाटकाच्या शोकान्ताला एक वेगळे भावनात्मक परिमाण प्राप्त होते. या नाटकाच्याद्वारा शेक्सपियरच्या नाट्यलेखनपद्धतीचा मराठीला प्रथम परिचय झाला. ऐतिहासिक कथाभाग, नाट्यवस्तूची अंक-प्रवेशातील विभागणी, संगीताचा अभाव आणि शोकान्त शेवट हे या नाटकाचे विशेष. ह्या नाटकात पद्यमय नांदी – मंगलाचरण भरतवाक्य नाहीत. मराठी रंगभूमीवर हे नाटक बरेच गाजले.

*जयपाळ* (१८६५) हे त्यांचे दुसरे नाटक. इचलकरंजीकर नाटकमंडळीने ते रंगभूमीवर आणले. प्रस्तुत 'कल्पनारम्य' नाटक बायबलच्या जुन्या करारातील कथेच्या आधारे लिहिले आहे. ह्या कथेला मराठी पेहेराव चढविताना त्यांनी मूळ कथेला वेढणारे धार्मिक वातावरण टाळले आहे. ते गद्य असून शेक्सपियरच्या पद्धतीचे काही विशेष दर्शविणारे आहे. जयपाळ व प्रभावती ह्यांतील पतिपत्नीसंबंधाचे सरस चित्रण हा या नाटकाचा एक उल्लेखनीय विशेष. नाटकाच्या शेवटच्या प्रवेशात सूत्रधार व विदूषक यांच्याद्वारे नाट्यसंगीतावर केलेली टीकाही लक्षणीय आहे. त्या काळातील अतिरेकी संगीत योजनेवरील कीर्तन्यांचे हे भाष्य मार्मिक वाटते.

तुकोजीराव होळकरांच्या आज्ञेने माल्कमच्या ग्रंथाचे *मध्य हिंदुस्थानचा इतिहास* (१८७१) हे भाषांतर त्यांनी केले. त्यांनी लिहिलेली *चाळीस वर्षांमागचे पुणे* ही कादंबरी अपुरीच राहिली. १८८७ मध्ये तिचे ४० भाग 'ज्ञानप्रकाशा'तून प्रसिद्ध झाले होते. *मथुरा* ही १८८२ साली लिहायला घेतलेली कादंबरीही अपूर्णच राहिली.

म. ना. लोही, अरविंद वामन कुलकर्णी

संदर्भ : (१) सुमंत जोशी, 'पहिल्या बुकिश नाटकाचे लेखक', लोकसत्ता–३० डिसेंबर, १९७०. (२) चंद्रकांत घांडे, 'मराठीचे पहिले स्वतंत्र नाटककार' (मराठा, ४ मे, १९६९).

**कीर्तिकर, रामराव बाळकृष्ण :** (ज. १८७२ – मृ. २६ डिसेंबर, १९४३). कवी, नाटककार व संपादक. इंग्रजी व संस्कृत वाङ्मयाचे अभ्यासक. ह्यांचे *गीताराधन* (१८५१), *भक्तिसुधा* (१८७२), *तुफान* (१८९३), *नाटकी गंगू*, *संगीत पुंडलिक* (१९०४), *सतिसावित्रीचरित्र* (१९०४), *नूरजहान आणि जहांगीर* (१९११), *संगीत सतिसावित्री* (१९३३) हे लेखन प्रसिद्ध आहे. *गीताराधन*

हे काव्य केवळ मराठी जाणणाऱ्यांसाठी, गीतेचे मूळ श्लोक मुखोद्गत करण्यास उपयुक्त व्हावे या हेतूने रचले असून, *सतिसावित्री* हे बोधप्रद काव्य महाभारताच्या वनपर्वातील सावित्री आख्यानाच्या आधारे रचले आहे. या काव्यास डेक्कन व्हर्नाक्युलर ट्रान्सलेशन सोसायटीचे बक्षीस मिळाले होते. *नाटकी गंगू*, *मोळी रमा* या त्यांच्या लोकप्रिय कथा. *संगीत श्रीपुंडलिक* हे पुंडलिक चरित्रावर नाटक उपलब्ध नसल्याने मुद्दाम लिहिलेले व *तुफान* हे शेक्सपियरच्या 'टेंपेस्ट'च्या आधारे लिहिलेले नाटक. *नूरजहान आणि जहांगीर* ही ऐतिहासिक कादंबरी. निर्जन अरण्यात जन्मलेली सौंदर्यवती नूरजहान महत्त्वाकांक्षी स्वभावामुळे दिल्लीचे तख्त समर्थपणे सांभाळून प्रजेचे पुत्रवत पालन कशी करते हे या कादंबरीत स्पष्ट केले आहे. ह्यांचे *संगीत अभिनव शाकुंतल* हे ऑपेराबजा नाटक व त्यातील पदे तत्कालीन जनतेत विशेष प्रिय होती. 'मुंबई वैभव', 'आराम', 'जगद्‌वृत्त' या पत्रांचे ते संपादक होते असाही उल्लेख आढळतो.

मंजिरी बेडेकर, म. ना. लोही

**कुंटे, अण्णा मोरेश्वर :** (ज. २ सप्टेंबर, १८४५, माहुली, जि. सातारा–मृ. १५ जुलै, १८९६). वैद्यकशास्त्राचे अभ्यासक व लेखक. 'ज्ञानेश्वरी' व 'अमृतानुभव' ह्या ग्रंथांचे चिकित्सक संपादक. 'राजा शिवाजी'कर्ते महादेव मोरेश्वर कुंटे ह्यांचे हे धाकटे बंधू. बी.ए. (१८६६) व एम्.डी. (१८७४) ह्या पदव्या प्राप्त.

*वाग्भट* हा त्यांचा सुप्रसिद्ध ग्रंथ (१८८०). आर्यवैद्यकाचे कुंटे यांचे सखोल अध्ययन ह्या ग्रंथातून प्रगट होते. *स्त्रीरोगविज्ञान* (१८८१) हा ग्रंथही महत्त्वाचा आहे.

मराठी संतसाहित्याच्या अभ्यासकांच्या दृष्टीने ह्यांनी केलेले 'ज्ञानेश्वरी' व 'अमृतानुभव' ह्या ग्रंथांचे चिकित्सक संपादन (१८८८) मोलाचे आहे.

मंजिरी बेडेकर, चंद्रकांत कुलकर्णी

**कुंटे, महादेव मोरेश्वर :** (ज. २९ नोव्हेंबर, १८३५, माहुली, जि. सातारा–मृ. ८ ऑक्टोबर, १८८८). कवी आणि भारतीय विद्याविशारद (इन्डॉलॉजिस्ट). मुंबईहून १८६४ साली बी.ए. मुंबई सरकारच्या शिक्षणखात्यात नोकरी. अण्णा मोरेश्वर कुंटे यांचे ज्येष्ठ बंधू.

*राजा शिवाजी* (भाग १ ते ६ : १८६९–७२) ह्या महाकाव्यामुळे ते महाराष्ट्राला कवी म्हणून परिचित झाले. इंग्रजीतील 'हिरॉइक एपिक'च्या धर्तीवर हे महाकाव्य रचलेले आहे. या काव्याला लिहिलेली त्यांची प्रस्तावना इंग्रजीत असली तरी मराठी काव्यविषयक समीक्षेच्या इतिहासात तिला महत्त्वाचे स्थान आहे. *राजा शिवाजी* लिहिण्यापूर्वी त्यांनी कोल्हापूरचे राजाराम महाराज यांच्या निधनानिमित्त *राजाराम* (१८७०) नावाची ४२० ओव्यांची एक विलापिका लिहिली होती. *मन* (१८७२) हे त्यांचे २५५ श्लोकांचे काव्य. ह्या काव्यातून मानवी मनाचे विश्लेषण करण्याचा प्रयत्न आढळतो. त्यांच्या सर्वच काव्याचे वैशिष्ट्य म्हणजे त्यांची निर्भेळ मराठी वळणाची अवघड भाषा. त्या भाषेमुळेच विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी 'मयूराचा पिच्छभार उतरवणारा एक महाकवी' अशी त्यांची कुचेष्टा केली. परिणामी १८७८ साली कुंट्यांनी 'ऋषी' या नावाने ७७० ओळींचे काव्य इंग्रजीतून लिहिले. काव्यातून ऋग्वेदातील ऋचांच्या आधारे आर्यांच्या जीवनाचे दर्शन घडवण्याचा त्यांनी प्रयत्न केला. अनेक इंग्रजी विद्वानांनी ह्या काव्याची प्रशंसा केली. त्यांच्या भारतीय वाङ्मयाच्या खोल, व्यापक व चिकित्सापूर्वक अभ्यासाचा प्रत्यय त्यांनी मासिक पुस्तकाच्या रूपात प्रसिद्ध केलेल्या *षड्दर्शन चिंतनिका* (१८७७ ते १८८२) ह्या २,७७५ पृष्ठांच्या बृहद ग्रंथावरून येतो. ह्या ग्रंथात सहा दर्शनांपैकी 'पूर्वमीमांसा', 'उत्तरमीमांसा' आणि 'योग' ह्या तीन दर्शनांचाच समावेश आहे. ह्यात मूळ संस्कृत सूत्रांचे मराठी व इंग्रजीत भाषांतर व टीपा आहेत. *व्हिसिसिट्यूड्स ऑफ आर्यन सिव्हिलिझेशन इन इंडिया* (१८८०) ह्या त्यांच्या ग्रंथाला १८७८ साली इटलीत फ्लॉरेन्स येथे भरलेल्या 'इंटरनॅशनल ओरिएन्टलिस्टस कॉंग्रेस'तर्फे पारितोषिक देण्यात आले होते.

गं. दे. खानोलकर, म. ना. लोही

संदर्भ : (१) भारपुरे, न. का. 'कुंटे स्मृति-प्रबंध', पुणे, १९६५. (२) कुळकर्णी, द. भि., 'महाकवी कुंटे : नवे आकलन', नवभारत, ऑगस्ट १९६८.

**कुरुंदवाडकर, गणपत हरिहर ऊर्फ बापूसाहेब :** ० पटवर्धन, ग. ह. : (ज. १८३८, कुरुंदवाड–मृ. २९ जुलै, १८९९). कवी. कुरुंदवाड संस्थानच्या धाकट्या पातीचे अधिपती. संस्कृत व प्राचीन मराठी कवितेचे व्यासंगी. ह्यांची *गंगावर्णन आर्या* (१८७४), *गणेशपुराण आर्या*, *प्रथमार्ध* (१८७५) व *उत्तरार्ध* (१८८४), *भट्टवंशकाव्य* (१८९३) ही काव्ये प्रसिद्ध आहेत. *गंगावर्णन आर्या* ह्या काव्यातून पापविमोचनी गंगेचे लौकिक दृष्टीने केलेले चित्रण आढळते. हिमालय व गंगा यांच्या संबंधावर व पौराणिक मतांवर त्यांचा विशेष भर दिसतो. *गणेशपुराण आर्या* हे काव्य म्हणजे संस्कृत गणेशपुराणाचा मराठी सारांश होय. *भट्टवंशकाव्य* रघुवंशाच्या धर्तीवर रचले असून पेशव्यांच्या घराण्याचे काव्यमय वर्णन या सर्गबद्ध काव्यात केले आहे. यातील युद्धप्रसंगवर्णने उठावदार वाटतात. कुरुंदवाडकरांच्या एकूण रचनेवर मोरोपंतकवींचा प्रभाव पडल्याचे स्पष्ट दिसते. *पंचवटीस्थलनिर्णय* हा एक चर्चात्मक निबंधही त्यांनी लिहिला असून, पंचवटीच्या संबंधात वामन दाजी ओक ह्यांच्याशी झालेल्या त्यांच्या वादाचा तपशील या निबंधात आहे. ओकांच्या मते पंचवटी गोदावरीच्या मुखाजवळ असून कुरुंदवाडकर नाशिक-पंचवटीच्या पक्षाचे पुरस्कर्ते होते.

मंजिरी बेडेकर, म. ना. लोही

**कुलकर्णी, आप्पाजी विष्णू :** (ज. १८६९ – मृ. २५ फेब्रुवारी, १९४२). नियतकालिकांचे संपादक व लेखक. शिक्षण मॅट्रिकपर्यंत. लो. टिळकांचे लेखनिक (१८९८-९९). *ग्रंथरत्नाकार* नावाचे मासिक चालविले. पुढे 'जगत्‌हितेच्छू' व 'व्यापारी' ह्या पत्रांचे काही काळ संचालक.

कुलकर्णी प्रसिद्ध आहेत ते *मराठी रंगभूमी* (१९०३) ह्या पुस्तकामुळे. १८४३ ते १९०३ पर्यंतच्या साठ वर्षांतील रंगभूमीचा संगतवार इतिहास सांगण्याचा मराठीतील हा पहिलाच प्रयत्न. महाराष्ट्रात खेळ करीत फिरणाऱ्या तत्कालीन बहुतेक सर्व नाटकमंडळ्यांचे खेळ जवळजवळ वीस–पंचवीस वर्षे स्वतः पाहून, त्याचप्रमाणे नाटककार व नाटकमंडळ्यांचे चालक ह्यांच्याकडून माहिती मिळवून हा इतिहास त्यांनी लिहिला आहे. अभ्यासकांच्या दृष्टीने एक महत्त्वाचा संदर्भग्रंथ म्हणून त्याचे मोल विशेष आहे.

*लो. टिळक यांची गेली आठ वर्षे : १९००–१९०८* (१९०९) हे त्यांचे दुसरे महत्त्वाचे पुस्तक. लोकमान्यांचे लेखनिक या नात्याने घडलेल्या सहवासातून जे दर्शन त्यांना घडते, त्याच्या व अन्य संबंधितांच्या जवळून मिळालेल्या माहितीच्या आधारे हे पुस्तक लिहिले आहे. ४४४ पृष्ठांचा हा ग्रंथ टिळकांच्या चरित्र-लेखकास अस्सल चरित्रविषयक साहित्य म्हणून उपयुक्त ठरला आहे. ह्याशिवाय *वेळ आणि त्याचा सदुपयोग* (१८९५), *निबंधावली* भाग १ व २ (ॲडम्सच्या 'बिझिनेस हॅबिट्स'च्या १८९८,९९), *मौजच मौज* (अनुवादित गोष्टी, १८९६), *मराठी रंगभूमीची किल्ली* (१९०४) ही त्यांची अन्य पुस्तकेही प्रसिद्ध आहेत.

गं. दे. खानोलकर, म. ना. लोही

**कुलकर्णी (कल्लोळकर), कृष्णाजी बाबाजी** : (ज. ५ ऑक्टोबर, १८८०, कल्लोळ, ता. चिकोडी, जि. बेळगाव–मृ. १८ नोव्हेंबर, १९५४). कवी. शालेय शिक्षण कल्लोळ व मिरज येथे. मॅट्रिक (१९०१). शिक्षकाचा व्यवसाय.

त्यांची कविता जुन्या वळणाची, परंतु सुबोध आहे. 'दिंडी' हा त्यांचा आवडता छन्द. 'काव्यरत्नावली', 'चित्रमयजगत्', 'नवयुग', 'मनोरंजन', 'करमणूक' इ. त्या काळातील प्रमुख मासिकांतून त्यांची रचना प्रसिद्ध झाली. त्यांनी सुमारे २०० स्फुट कविता, ५ – ६ संस्कृत कविता, काही मनोरंजक गोष्टी व निबंध लिहिले. काही कवितांत 'पंचतंत्रा'तील तात्पर्यकथाही गुंफल्या. पारखीशास्त्रींच्या संस्कृत कूटांच्या धर्तीवरील 'भावगुप्तपद्या'तील प्रश्नांना समर्पक उत्तर देणाऱ्याही कविता त्यांनी रचल्या.

त्यांच्या मृत्यूनंतर *कल्लोलिनी* (१९५५) हा त्यांचा कवितासंग्रह प्रसिद्ध झाला.

उषा टाकळकर, लीना रस्तोगी

**कुलकर्णी (कुंभोजकर), गणेश विठ्ठल** : ० व्यतिपात : (ज. १८८९, कोल्हापूर – मृ. मे, १९२१, सांगली). 'उद्यान' मासिकाचे एक पुरोगामी वृत्तीचे लेखक, संपादक, कादंबरीकार. कोल्हापूर येथून काही राजकीय कारणासाठी त्यांना हद्दपार व्हावे लागल्यामुळे त्यांना हायस्कूलच्या पलीकडे अधिक शिक्षण घेता आले नाही. पुढे काही काळ ते इंदोरला होते व नंतर त्यांनी छत्रे सर्कशीबरोबर काही काळ भ्रमण केले. पुढे ते मुंबई येथे स्थायिक झाले. मुंबईच्या वास्तव्यात त्यांनी आपल्या वाङ्मयीन कार्यास विशेषत्वाने आरंभ केला. त्यांच्या मनावर गोपाळ गणेश आगरकर यांच्या शिकवणुकीचे विशेष संस्कार होते. १ जानेवारी, १९१० रोजी त्यांनी आपल्या 'उद्यान' या मासिकाला प्रारंभ केला. हे मासिक लोकप्रिय झाल्यामुळे त्यांनी १९१३ साली 'नवयुग' नावाचे दुसरे मासिक सुरू केले. पुढे १९१६ मध्ये 'सहस्रकर' नावाचे साप्ताहिक सुरू केले. १९१५-१६ नंतर त्यांचे लक्ष कादंबरीलेखनाकडे विशेषत्वाने वळले. त्यांच्या कादंबऱ्या लोकांना आवडल्या. त्यांच्या *कर्मसंन्यास* या कादंबरीस वा. म. जोशी यांची प्रस्तावना लाभली आहे. त्यांच्या कादंबरीलेखनाची नावे व क्रम पुढीलप्रमाणे : (१) *चंद्रचूड* १९१५, (२) *सोनेरी खंजीर*, (३) *कर्मसंन्यास* १९१७, (४) *हा संशयाचा प्रताप* १९१८, (५) *जन्मठेप* १९१८.

*कुसुंबा*, *आनंदमहाल*, *बहिष्कृत*, *स्वराज्याचा डोलारा* व *संगीत प्रबोध* या नावाचे नाटकही त्यांनी लिहिले आहे; पण आज हे लेखन उपलब्ध नाही.

कुंभोजकर, वसंत व्यं.

**कुलकर्णी, दत्तात्रय माधव** : (ज. १८८७–मृ. १९४७). क्षेत्रवर्णनकार आणि अनुवादक. तुळजापूरकर येथे वकिलीचा व्यवसाय. *महाराष्ट्राची कुलस्वामिनी अर्थात श्री तुळजाभवानी* (१९२०) हा ग्रंथ विशेष प्रसिद्ध. या पुस्तकाला पुणे येथील डेक्कन व्हर्नाक्युलर ट्रान्सलेशन सोसायटीचे आणि इंदूर संस्थानाचे पारितोषिक मिळाले. तुळजापूर क्षेत्राचा सांगोपांग इतिहास अस्सल कागदपत्रांच्या व परिश्रमपूर्वक मिळविलेल्या माहितीच्या आधारे प्रस्तुत ग्रंथात दिला आहे.

*विभा* (१९१४) आणि *राजर्षि* (१९१६) या यांच्या दोन कादंबऱ्या. या कादंबऱ्या रविंद्रनाथ टागोरांच्या मूळ बंगाली कादंबऱ्यांची रूपांतरे आहेत. *आयेषा* (१९१४, बंगाली) व *सौंदर्योपासक मालती* (१९१७ : हिंदी) अशी दोन भाषांतरे सहकार्याने प्रसिद्ध केली आहेत.

उषा टाकळकर, म. ना. लोही

**कुलकर्णी, दत्तात्रय रामचंद्र** : ० बाळेकुंद्रीकर श्रीपंत महाराज : (ज. ३ सप्टेंबर, १८५५, ता. हुकेरी, जि. बेळगाव–मृ. १६ ऑक्टोबर, १९०५). अवधूत संप्रदायी ब्रह्मवेत्ते व कवी. शिक्षण लंडन मिशन स्कूल, बेळगाव येथे. तेथेच शिक्षक म्हणून नोकरी. विद्यार्थीदशेतच श्रीबालमुकुंद उर्फ बालावधूत या पूर्णाद्वैती सिद्ध पुरुषाकडून अवधूत मार्गाची दीक्षा (१८७५).

श्रुतिप्रतिपादित 'एकमेवाद्वितीयम् ब्रह्म' या अद्वैत तत्त्वाचा बोध करून देणे, हे या संप्रदायाचे मुख्य उद्दिष्ट साध्य करण्यासाठी श्रीपंत महाराजांनी आयुष्यभर लेखन, प्रवचन, भजन याद्वारे कार्य केले. ह्यांचे सर्व लेखन *श्रीदत्तप्रेमलहरी पुष्पमाला* ह्या नावाने आठ खंडांतून प्रसिद्ध झाले आहे. (१९२५ ते १९३१). पदे, अभंग, आरत्या, अष्टके, धावे ही स्फुटरचना व उपदेशपर प्रवचने, परमानुभवप्रकाश, आत्मज्योती, अनुभववल्ली, गीतासार इत्यादी ग्रंथ व पत्रे ह्यांचा ह्या खंडात समावेश झालेला आहे.

ग. वि. कविटकर

**कुलकर्णी, नारायण विनायक** : ० गोविंदसुत : (ज. २४ जुले, १८९२, सुरळी, जि. सातारा–मृ. १२ जानेवारी, १९४८). नाटककार, चित्रपट कथालेखक व 'महाराष्ट्र कुटुंबमाले'चे संयोजक.

खाडिलकरांच्या नाट्यकृतींनी प्रभावित केल्याने *सा*ग्र*संगीत पार्थप्रतिज्ञा* (१९१७) हे पौराणिक नाटक लिहिले व 'नाट्यकला प्रसारक मंडळी'ने ते रंगभूमीवर आणले. *उदयकाल* (१९१८) हे दुसरे नाटकही लोकप्रिय ठरले. 'लोकमान्य नाटकमंडळी'साठी १९१९ साली लिहिलेल्या *माईसाहेब* (१९२२) या नाटकाने तर यशाचा उच्चांक गाठला; व ते *माईसाहेब* कर्ते म्हणून ओळखले जाऊ लागले. याखेरीज त्यांनी *डाव जिंकला* (१९२२, शाहू नगरवासी मंडळी) व *संत कान्होपात्रा* (१९३१, गंधर्व नाटकमंडळी) ह्या पौराणिक नाटकांशिवाय त्यांनी *क्षमेची क्षमा* (१९३२), *तिकडची शोभा* (१९३३), *मंगलभुवन* (१९३४), *संगीत नवीन कल्पना* (१९४२), *मानला तर देव* (१९४६) इत्यादी सामाजिक नाटकेही लिहिली. या नाटकांतून त्यांनी काही सामाजिक प्रश्नांना हात घातला असला तरी ती खेळकर, विनोदी स्वरूपाची आहेत.

१९२५ साली त्यांनी 'महाराष्ट्र कुटुंबमाला' ही कौटुंबिक कादंबऱ्यांची प्रकाशन संस्था काढली. तीतून त्यांनी स्वतःच्या व इतरांच्या अनेक कादंबऱ्या प्रकाशित केल्या. ह्या कादंबऱ्या प्रामुख्याने कौटुंबिक स्वरूपाच्या असल्या तरी १९२५ च्या सुमारास लिहिलेल्या *मजूर*, *कसे दिवस जातील ?*, *माणिक* इत्यादी कादंबऱ्यातून त्यांनी गिरणीकामगार, मजूर, गोदी कामगार इत्यादींचे दुर्लक्षित जीवन चित्रित केले आहे.

*माझ्या गोष्टी भाग - १* (१९३४), *माझ्या गोष्टी भाग - २* (१९३७), *भाग - ३* (१९४६) हे त्यांचे कथासंग्रह, आटोपशीरपणा व रेखीव स्वभावचित्रण यामुळे यातील कथा आकर्षक झाल्या आहेत.

'अयोध्येचा राजा', 'कर्ण', 'मायाबाजार', 'मायामच्छिंद्र', 'मेनका' व 'कान्होपात्रा' ह्या चित्रपटांचे कथालेखनही त्यांनी केले. केवळ लेखनावर उपजीविका असणाऱ्या मराठी लेखकांत कुलकर्णी यांचे नाव उल्लेखनीय आहे.

भीमराव कुलकर्णी, लीना रस्तोगी

**कुलकर्णी, रामचंद्र विनायक** : ० आनंदघनराम : (ज. सप्टेंबर, १८६५, तासगाव, जि. सांगली–मृ. २८ ऑक्टोबर, १९४५). अध्यात्म, मंत्रविद्या, मोहिनीविद्या, योगविद्या, वैद्यक इ. विषयांवरील पुस्तकांचे लेखक.

दोनतीन वर्षे सरकारी नोकरी. धाकट्या भावाकडे कुलकर्णीपण सोपवून पुढचे आयुष्य विद्यासाधन, लेखन व लोकसेवा यात खर्च

केले. मंत्र, वैद्यक, स्वप्न, शकुन, इ. विद्या ते शिकले आणि त्यांचा उपयोग त्यांनी लोककल्याणासाठी केला. आपले विचार बहुजनांपर्यंत पोहोचविण्यासाठी जवळपास २५ वर्षे 'चंडांशु' नावाचे साप्ताहिक चालविले.

त्यांची एकूण छोटीछोटी ३८ पुस्तके प्रसिद्ध झाली. *मानसशक्ति परिचय* (१९१९), *संकल्पसामर्थ्य* (१९२६), *पिशाच* (अतिशय शास्त्रीय पद्धतीने केलेला अभ्यास, १९१२), *मोहिनीविद्या* (१९१०), *स्वप्नमीमांसा*, *साधे परमार्थ साधन* अर्थात 'श्रीमद्‌भगवद्‌गीते'च्या पंधराव्या अध्यायाचे सार, विवेचन व स्पष्टीकरण, *उपासनाशास्त्र* भाग १, २, ३, *सूर्यविज्ञान*, *ॐकारस्वरूप*, *भगवद्‌गीतेतील सिद्धांत व अभ्यास* ही त्यांतील काही पुस्तके.

ग. दे. खानोलकर, स्वाती शहाणे

**कुलकर्णी (रेठरेकर), श्रीधर कृष्ण : ० पठ्ठे बापूराव :** (ज. ११ नोव्हेंबर, १८६६, हरणाक्ष रेठरे, ता. वाळवे, जि. सातारा – मृ. २२ डिसेंबर, १९४५, पुणे). जुनी लावणी-पोवाड्याची परंपरा आधुनिक काळात चालविणारे एक शाहीर. चौथीपर्यंतचे शिक्षण जन्मगावी. मराठी सातवी व इंग्रजी पाचवीपर्यंतचे शिक्षण औंध येथे. प्रारंभी हे स्वतःचे नाव न देता तमासगिरांना कवने करून देत. पुढे महार-मांग जमा करून त्यांनी स्वतः आपल्या गावातच फड उभा केला. पवळाबाई नावाच्या नाचणारिणीला जिंकून फडात आणले. तिचा अधिकृत स्वीकार केला. त्यांचे फड मुंबई, पुणे, बडोदा येथे फार गाजले.

'दीन लक्ष आम्ही केली लावणी' असे बापूराव म्हणत. त्यांच्या रचनेपैकी काही कवने बी. एम्. जितीकर यांनी *सुप्रसिद्ध कवी श्रीधर कृष्ण उर्फ पठ्ठे बापूराव कुलकर्णी यांच्या ढोलकीवरील लावण्या भाग १* (१९४२) हे नाव देऊन प्रसिद्ध केल्या आहेत. 'गणगौळण', 'भेदिक', 'अध्यात्मपर', 'छकडी', 'शृंगारिक', 'वर्णनात्मक सवाल-जवाब', 'बगाच्या लावण्या', 'देशभक्तीपर लावण्या' इ. त्यांच्या लावण्या, प्रसिद्ध आहेत. मीठा राणी, रजपूत, रंगेला जवान हे त्यांचे गाजलेले वग. 'कलगी तुरा' पक्षी ते कलगीवाले होते. त्यांच्या अध्यात्मपर भेदिक लावण्यांची संख्या मोठी आहे. याशिवाय वासुदेव, गोंधळी, पोतराज, वाघ्या-मुरळी अशा रचनाही त्यांनी केल्या. बापूरावांची रचना सहजस्फूर्त असून नादमधुर व अर्थवाही आहे.

आप्पासाहेब इनामदार, मदन पां. कुलकर्णी

**कुळकर्णी, दामोदर माधव : ० माधवसुत :** (ज. १९ सप्टेंबर, १८८८, हुपरी, जि. कोल्हापूर – मृ. १९ फेब्रुवारी, १९२२, कोल्हापूर). कवी. शिक्षण मॅट्रिकपर्यंत मुंबईस रेल्वे खात्यात नोकरी १९१३ ते १६ त्या काळात मुंबईत असताना कविवर्य रेंदाळकरांशी स्नेहसंबंध.

माधवसुतांची उपलब्ध एकूण कविता १२५-३० पृष्ठे भरेल. प्रसिद्धी-विषयी उदासीन असल्यामुळे कवितांची हेळसांड. काही कविता 'करमणूक' पत्रात प्रसिद्ध. उरलेल्या बऱ्याच कविता त्यांच्या मृत्यूनंतर स्नेह्यांनी 'माधवसुत' या नावाने 'काव्यरत्नावली' व 'मनोरंजन' मासिकांतून प्रसिद्ध केल्या. 'आत्मनिवेदन', 'कचदेवयानी', 'ध्रुवचरित्र', 'एक गुलाबकलिका' ही मोठी प्रकरणे असून इतर कविता छोट्या आहेत. स्फुट कविता आत्मभाव व्यक्त करणाऱ्या असून काहींतून निराशेने खचलेल्या कविमनाचे आर्त उद्‌गार प्रगट झाले आहेत. जुन्या संस्कृत, मराठी व नव्या इंग्रजी कवितेचा ठसा त्यांच्या कवितेवर उमटलेला दिसून येतो.

उषा टाकळकर, म. ना. लोही

**कुळकर्णी, पांडुरंग ज्ञानेश्वर : ० पांडुरंग शर्मा :** (ज. २३ जुलै, १८८८ – मृ. १३ जानेवारी, १९५७). ज्ञानेश्वर वाङ्मयाचे भाष्यकार. आळंदीजवळच्या 'चऱ्होली'चे राहणारे. काशीस वेदाध्ययन व 'पंडित' उपाधी. मॅट्रिक उत्तीर्ण. ह्यांनी 'पांडुरंगशर्मा' ह्या टोपण-नावाने १९२१-२३ ह्या काळात 'चित्रमयजगत'मध्ये अनेक लेख लिहून ज्ञानदेवांच्या तत्त्वज्ञानाविषयी नवीन मौलिक दृष्टिकोण मांडला. 'ज्ञानेश्वर महाराज व इतर तत्त्ववेत्ते' (१९२१) ही त्यांची लेखमाला फारच गाजली.

ह्यांची *चांगदेवपासष्टी* (१९५५) ही सटीप व संस्कृत अनुवादयुक्त पुस्तिका प्रसिद्ध आहे. 'ज्ञानेश्वरीचा अभ्यास' ही त्यांची लेखमाला महाराष्ट्राच्या मार्च १९५६ ते फेब्रुवारी १९५७ या अंकांत छापली गेली. तसेच इतिहासाचार्य राजवाडे व शं. वा. दांडेकर यांच्या ज्ञानेश्वरीप्रतींतील चुकीच्या पाठांचे व अर्थांचे विवरण करणारी *ज्ञानेशीय वाङ्मयाची करुण कहाणी* (१९५६) ही पुस्तिकाही प्रसिद्ध केली.

ज्ञानेश्वराचे वाङ्मय रहस्योद्‌ग्राही दृष्टीने आत्मसात करून आपले विचार त्यांनी स्वतंत्रपणे मांडले आहेत. मृत्यूपूर्वी पंधरा दिवस अगोदर त्यांनी पुण्याच्या 'भारत इतिहास मंडळा'त 'ज्ञानेश्वरांच्या चरित्राचा पुनर्विचार' हा निबंध वाचला होता.

लीना रस्तोगी, मा. प. बहिरट

**कुळकर्णी, बाळकृष्ण रामचंद्र :** (ज. २३ जून, १८७३, नांदगाव, जंजिरा – मृ. १९०७). कथालेखक. ठाणे येथे इंग्रजी शिक्षण. मुंबई येथे टपालखात्यात नोकरी. मासिक 'मनोरंजना'तून ह्याच्या अनेक गोष्टी व स्फुट लेख प्रसिद्ध. सतीशचंद्र चक्रवर्तीच्या 'राय परिवार' या बंगाली कादंबरीच्या आधारे लिहिलेली *सरस्वती* (१९०१), तसेच अन्य बंगाली कादंबरीच्या आधारे लिहिलेली *परिणामी हेच* (१९०७) ह्या दोन सामाजिक कादंबऱ्या व *सोमेश्वरशास्त्र्यांचे पुराण* हे ह्यांचे साहित्य मासिक 'मनोरंजना' द्वारेच प्रसिद्ध झाले आहे.

मंजिरी बेडेकर, चंद्रकांत कुळकर्णी

**कुळकर्णी, भगवान रघुनाथ : ० बी. रघुनाथ ० फुलारी :** (ज. १५ ऑगस्ट, १९१३, सातवणे, जि. परभणी – मृ. ७ सप्टेंबर, १९५३). मराठवाड्यातील एक अग्रगण्य कथालेखक, कादंबरीकार व कवी. शिक्षण सातवणे व हैद्राबाद येथे. मॅट्रिक (१९३०). परभणी येथे बांधकाम. खात्यात कनिष्ठ कारकून म्हणून नोकरी. हैदराबाद येथून निघणाऱ्या 'राजहंस' (संपा. र. मु. जोशी) मासिकाच्या पहिल्याच अंकात (मे १९३०) ह्यांची एक कविता 'फुलारी' या टोपण नावाने प्रसिद्ध झाली.

*आलाप आणि विलाप* (१९४१) व *पुन्हा नभाच्या लाल कडा* (१९६०) हे त्यांचे दोन काव्यसंग्रह (पुन्हा नभाच्या लाल कडा मृत्यूनंतर प्रसिद्ध). 'बी रघुनाथां'च्या कवितेवर तांब्यांच्या भाव-कवितेचे संस्कार झालेले जाणवतात.

कवीपेक्षाही कथालेखक म्हणून ते अधिक प्रसिद्ध आहेत. *साकी* (१९४०), *फकिराची कांबळी* (१९४८), *छागला* (१९५१), *आकाश* (१९५५), *काळी राधा* (१९५६) हे त्यांचे पाच कथासंग्रह. ह्यातील निवडक कथांचा एक संग्रह, प्रा. भगवंत देशमुख ह्यांच्या विवेचक प्रस्तावनेसह *मिटलेले आकाश* (१९६५) ह्या नावाने प्रसिद्ध झाला. बी. रघुनाथांनी आपल्या कथांमधून जे जीवनदर्शन घडविले आहे ते अत्यंत वास्तव आहे. निजाम राजवटीतील सामान्य माणूस, सत्ता-धाऱ्यांकडून त्याची केली गेलेली ससेहोलपट, त्याच्या भोवतालचे दारिद्र्य, धार्मिक द्वेषाचे तणाव आणि ह्या सर्वांमुळे कवडीमोल ठरणारे मानवी जिणे, ह्यांचे प्रत्ययकारक चित्र बी. रघुनाथांच्या कथालेखनांतून उभे राहते. सरकारी सत्तास्थानांवर बसून सामान्यांचे शोषण करणारी नोकरशाही वरिष्ठांच्या हुकुमांसाठी आपले जीवन हवे तसे वाकविणारे कनिष्ठ मध्यमवर्गीय परंपरागत मूल्यांना चिकटून बसणारे वतनदार आणि वरच्या वर्गांनी हवा तसा उपयोग करून संस्कृतिशून्य करून

ठेवलेला तळाचा वर्ग, असे समाजातील विविध स्तर बी. रघुनाथांच्या कथांत सहजतेने येतात. त्यांच्या कथा घटनाप्रधान असल्या तरी वास्तवदर्शी आहेत.

*ओढ* (१९३८), *हिरवे गुलाब* (१९४३), *बापू वडके* (१९४४), *उत्पात* (१९४५), *म्हणे लढाई संपली* (१९४५), *जगाला कळलं पाहिजे* (१९४९) आणि *आडगावचे चौधरी* ह्या त्यांच्या कादंबऱ्या व *अलकेचा प्रवासी* हा लघुनिबंध संग्रहही प्रसिद्ध झालेला आहे.

हरिश्चंद्र थोरात, स्वाती शहाणे

**० के. व्ही. लक्ष्मणराव :** पहा लक्ष्मणराव, कोमाराजू वेंकटेश

**० के. स. रि. :** पहा रिसबूड, केशव सदाशिव

**केणे, आत्माराम कृष्ण ऊर्फ ज्ञानेश्वरीबोवा श्रीगोंदेकर :** (ज. ३० मार्च, १८५२ – समाधी १६ मार्च, १९२४). ज्ञानेश्वरांच्या 'अनुभवामृता'च्या 'अमृतवाहिनी' नामक टीकेचे निरूपणकार. हे आपल्या कीर्तन–प्रवचनांतून 'अनुभवामृता'वर सोपपत्तिक व साधारण निरूपण करीत. त्यामुळे रामचंद्र बळवंत डोंगरे ह्यांनी ज्ञानेश्वरीबोवांना प्रस्तुत ग्रंथावर विस्तृत टीका लिहिण्याची विनंती केली व ते शक्य न झाल्याने ज्ञानेश्वरीबोवांनी काढलेल्या ग्रंथाच्या अर्थसंगतीच्या ओवीवर टिपणांच्या आधारे स्वतः डोंगरे ह्यांनीच 'अनुभवामृता'तील प्रतिपादित विषयाचे स्पष्टीकरण करून *अमृतवाहिनी* (१९२०) हा टीकाग्रंथ तयार केला.

उषा टाकळकर

**केतकर, व्यंकटेश बापूजी :** (ज. १२ जानेवारी, १८५४, नरगुंद, कर्नाटक – मृ. ३ ऑगस्ट, १९३०). ज्योतिषशास्त्रविषयक लेखक. मॅट्रिक. असिस्टंट डेप्युटी एज्युकेशनल इन्स्पेक्टर या पदावरून निवृत्त. ज्योतिषशास्त्रविषयक बारा ग्रंथ आणि तेहतीस संशोधनात्मक लेख प्रसिद्ध आहेत. ह्यांनी १८९२ मध्ये पंचांगोपयोगी करणग्रंथ प्रथम मराठीत लिहून, नंतर *ज्योतिर्गणितम्* (१८९८) नावाने त्याचे संस्कृतातही रूपांतर केले. त्यांचा संस्कृत श्लोकबद्ध *केतकीग्रह-गणितम्* (१८९९) हा ग्रंथ पंचांगकर्त्यांना मार्गदर्शक ठरणारा आहे. *वैजयंती पंचांग-गणितम्* (१९००) यात शास्त्रशुद्ध पंचांगासाठी सारण्या दिलेल्या आहेत. *केतकी परिशिष्ट* (१९१६), *सौरार्य ब्राह्मण-तिथिगणितम्* (१९२७), *भूमंडलीय ग्रहगणितम्* (१९३०), *इंडियन ॲण्ड फॉरिन क्रोनॉलॉजी* (१९२३), *ग्रहगणित* (१९१४), *नक्षत्र-विज्ञान* (१९१६), *गोलद्वय प्रश्नविमर्श* (१९१८) व *केतकी परिमलभाष्य* (१९३०) इत्यादी संस्कृत-इंग्रजी-मराठी ग्रंथ त्यांनी लिहिले.

केतकरांनी सन १८९९ मध्ये शुद्ध पंचांग म्हणून *केतकी पंचांग* काढले. पाश्चात्त्यांनीही केतकरांच्या ज्योतिषकार्यासंबंधी गौरव केला आहे.

गो. म कुलकर्णी, मदन कुळकर्णी

**केतकर, श्रीधर व्यंकटेश (गोविंदपौत्र) :** (ज. २ फेब्रुवारी, १८८४, रायपूर, म. प्र. – मृ. १० एप्रिल, १९३७, पुणे). ज्ञानकोशकार, समाजशास्त्रज्ञ, कादंबरीकार व चतुरस्र लेखक. माध्यमिक शिक्षण अमरावतीच्या हायस्कूलमध्ये व महाविद्यालयीन शिक्षण मुंबईच्या विल्सन कॉलेजमध्ये. अमेरिकेच्या वास्तव्यात तेथील बी.ए., एम्.ए. व पीएच्.डी. ह्या पदव्या संपादित.

अमेरिकेला जाण्यापूर्वी *महाराष्ट्र वाग्विलास* हे मासिक काढले. *दि हिस्टरी ऑफ कास्ट इन इंडिया* (प्रथम खंड–१९०९) ह्या पीएच्.डी.च्या आपल्या प्रबंधात यांनी जातिसंस्थेच्या दृष्टीने 'मनुस्मृती'ची छाननी केली आहे. १९११-१२ या काळातील इंग्लंडमधील वास्तव्यात *दि हिस्टरी ऑफ कास्ट इन इंडिया* (द्वितीय खंड) व *ॲन एसे ऑन हिंदुइझम–इटस् फॉर्मेशन ॲंड फ्यूचर* (१९११) हे त्यांचे ग्रंथ प्रसिद्ध झाले. त्यात हिंदू समाजाच्या घडणीचा उलगडा करून त्याच्या भवितव्याचा विचार त्यांनी मांडला आहे. १९१३-१४ या कालखंडात कलकत्ता विद्यापीठात प्राध्यापक असताना *इंडियन इकॉनॉमिक्स* व *हिंदू लॉ* ही पुस्तके त्यांनी लिहिली. यांपैकी पहिल्या पुस्तकात हिंदुस्थानची आर्थिक स्थिती आर्थिकेतर गोष्टींवर कशी व किती अवलंबून आहे, हे त्यांनी स्पष्ट केले, तर दुसऱ्या पुस्तकात 'कायदा' व स्मृतिकारांनी उपदेशिलेला 'धर्म' यांतील भेद दाखवून हिंदू कायद्याच्या इतिहासाची रूपरेषा तयार केली.

'महाराष्ट्रीय ज्ञानकोश' या प्रचंड प्रकल्पाचे यशस्वी निर्माते म्हणून ते विशेष परिचित आहेत. प्रस्तुत ज्ञानकोशाचे 'प्रस्तावना खंड', 'शरीरखंड' व 'पुरवणी खंड' असे तीन भाग असून ह्यात एकूण २३ उपखंड आहेत. 'प्रस्तावना खंडा'त 'हिंदुस्थान आणि जग', 'वेदविद्या', 'बुद्धपूर्व जग', 'बुद्धोत्तरजग' व 'विज्ञानेतिहास' हे पाच विषय समाविष्ट होतात. ज्ञानकोशाचा 'पुरवणी खंड' म्हणजे 'हिंदुस्थान खंड' असून त्यात 'हिंदुस्थानविषयक गॅझेटियर' वजा माहिती दिली आहे. परंपरागत ज्ञान व भविष्यकालीन स्थिती, पाश्चात्त्य आणि पौर्वात्य संस्कृती यांचे एकत्रीकरण करणे आणि समाजाचे कार्यक्षेत्र विस्तृत करण्यास मदत करणे, ही ज्ञानकोशामागची त्यांची भूमिका होती. त्यांच्या कोशकार्यात साहाय्य करण्यासाठी भारतात आलेल्या मिस् ईडिथ कोहन ह्यांच्याशी त्यांचे १९१९ साली लग्न झाले.

सूचीखंड वगळता ज्ञानकोशाचे सर्व कार्य १९१६ ते १९२७ या काळात पूर्ण झाले. सूचीखंड १९२९ साली पूर्ण झाला. ज्ञानकोशाचे प्रकाशन त्यांनी स्वतःच्या हिंमतीवर भाग भांडवल उभारून 'लिमिटेड मंडळी' उभी करून तिच्यामार्फत केले. ज्ञानकोशानंतर ज्ञानकोशलेखनाच्या अनुभवावर आधारित असे *माझे बारा वर्षांचे काम ऊर्फ ज्ञानकोशमंडळाचा इतिहास* हे पुस्तक केतकरांनी लिहिले (१९२७). ज्ञानकोशाच्या अनुषंगाने त्यांनी *मराठी वाङ्मय सूची* (१९१९) तयार केली. १९२४ मध्ये *विद्यासेवक* हे मासिक सुरू केले. त्यातून केतकरांनी लिहिलेले *निःशस्त्रांचे राजकारण* ही लेखमाला, तीन कादंबऱ्या, *महाराष्ट्रीयांचे काव्यपरीक्षण* (१९२८) आणि *वीसत्ता पराभव* हे नाटक असे साहित्य प्रसिद्ध झाले. ज्ञानकोशाचा संपादकवर्ग टिकून राहावा म्हणून त्यांनी 'पुणे समाचार' (१९२७) हे दैनिकही सुरू केले. पण ते लवकरच बंद पडले.

केतकरांना १९२६ साली दुसऱ्या शारदोपासक संमेलनाच्या अध्यक्षपदाचा मान मिळाला. त्यावेळी त्यांनी पहिल्या शारदोपासक संमेलनाचे अध्यक्ष वि. का. राजवाडे यांनी 'मराठी भाषा मुमूर्षू आहे' असे जे भाकित केले होते, त्याचा प्रतिवाद करून त्यांनी 'भ्रष्ट होणे म्हणजे नष्ट होणे नव्हे' असा सिद्धान्त मांडला.

ज्ञानकोशानंतरही अखेरपर्यंत केतकर वाङ्मयकार्यातच निमग्न होते. १९२९ ते १९३७ या काळात (१) कादंबऱ्या आणि महाकाव्य, (२) इतिहासप्रबंध, (३) संपादित संग्रह ग्रंथ, (४) समाजशास्त्रीय व राजकीय प्रबंध, आणि (५) स्फुट लेखन याप्रकारची वाङ्मयनिर्मिती त्यांनी केली. त्यांनी एकूण सात कादंबऱ्या लिहिल्या. *आंगिरसाचे सत्र* हे अपूर्ण महाकाव्य लिहिले. प्राचीन महाराष्ट्राच्या इतिहासावरील 'आदिपर्व', 'शातवाहनपर्व, भाग १, २ व ३' आणि 'कायस्थ प्रभूंचा सामाजिक इतिहास' हे पाच संशोधनपर प्रबंध आहेत. *भारतीय समाजशास्त्र* हा समाजशास्त्रीय व *व्हिक्टोरियस इंडिया* हा राजकीय ग्रंथ आहे. गुजराती ज्ञानकोशाचे सहा भाग, हिंदी ज्ञानकोशाचा एक भाग व *महायुद्धोत्तर जग* ह्या ग्रंथाचे चार भाग असे सुमारे अकरा संपादित संग्रह ग्रंथ आहेत. केतकरांची असामान्य निर्माणशक्ती व कार्यशक्ती या उपक्रमातून प्रत्ययास येते.

वैचारिक क्षेत्रात केतकर मूलतः व मुख्यतः समाजशास्त्रज्ञ होते. हिंदू समाजाच्या घडणीची संकल्पना त्यांच्या समाजशास्त्रीय विचारात

केंद्रस्थानी होती. हिंदुसमाजातील जाती, वर्णांमधून उत्पन्न न होता वेगवेगळ्या महावंशांच्या ज्या अलग टोळ्या हिंदुस्थानात राहात त्यांतून उत्पन्न झाल्या असे त्यांचे मत होते. भांडणामुळे ह्या टोळ्यांनी परस्परांत लग्ने न करता आपापसात केली आणि टोळ्यांच्या जाती बनल्या. पावित्र्याच्या कल्पनांनी जातीत उच्चनीच भाव वाढला आणि बाल विवाहाच्या पद्धतीने त्या दृढमूल झाल्या. ब्राह्मणांसारखे मूळचे वर्ण जातिरूप पावले, तसेच संप्रदाय व उद्यम यांच्याही जाती निर्माण झाल्या; पण ही प्रक्रिया गौण होती. मुख्यतः हजारो टोळ्यांमुळेच हल्लीचा जातिनिबद्ध संयुक्त समाज निर्माण झाला. ख्रिश्चन, मुसलमान हे पारमार्थिक विचारांवर आधारित संप्रदाय आहेत, तर हिंदू समाज ब्राह्मण–महारादी जातींचा व शीख महानुभावादी संप्रदायांचा एक सामाजिक संघ आहे, ही त्यांची धारणा होती.

१९०९ साली केतकरांनी जगदैक्याचे भाकित केले होते. मानवसमूह दूर जाण्याचा जगाच्या इतिहासातला कालखंड संपला आहे, हे लक्षात घेऊन केतकरांनी हिंदू समाजाच्या सुधारणेचा कार्यक्रम तयार केला. हिंदू समाजाचे रूपांतर हिंदी राष्ट्रात केले पाहिजे; जाती-पंथ ह्यांच्या संघाचे उच्चाटन करायला हवे. प्रौढविवाह, प्रेमविवाह, आंतरजातीय विवाह, धर्मसंप्रदायांविषयी औपनिषदिक समत्वबुद्धी, विषमतावर्धक पावित्र्यकल्पनेचा त्याग, वगैरे उपायांनी ते साधता येईल. त्यासाठी भाषावार प्रांतरचना, देशी भाषेतून राज्यकारभार व देशी भाषांतून शिक्षण देणारी विद्यापीठे उपयुक्त ठरतील असा त्यांना विश्वास वाटत होता.

केतकरांच्या कादंबऱ्या वैशिष्ट्यपूर्ण आहेत. *गोंडवनातील प्रियंवदा* (१९२६), *परागंदा* (१९२६), *आशावादी* (१९२७), *गावसासू* (१९३०), *ब्राह्मणकन्या* (१९३०), *विचक्षा* (१९३७) व *भटक्या* (अपूर्ण – १९३८) या सात कादंबऱ्यांत त्यांनी आपले समाजनिरीक्षण व समाजविषयक मुक्तचिंतन नोंदवले आहे. महाराष्ट्रीय समाजाप्रमाणेच अमेरिकेत – इंग्लंडमध्ये तात्पुरते वास्तव्य करणाऱ्या भारतीय समाजाची अनेकविध चित्रे, त्यांच्या कादंबऱ्यात आढळतात. ख्रिस्ती, बेने इस्राएल, पार्शी ह्यांसारखे अल्पसंख्यांकसमूह आणि वेश्या, रखेल्या, अकुलीन प्रजा ह्यांचे दर्शन त्यांच्या कादंबऱ्यातून घडते. डॉ. केतकरांच्या या कादंबऱ्यांमुळे मराठी कादंबरीचे समाजविश्व तर विस्तीर्ण झालेच पण वर्णनात्मक समाजशास्त्रालाही महत्त्वाची साधनसामुग्री मिळाली. समाजवर्णनाच्या अनुषंगानेच केतकरांनी समाजसुधारणेचे अनेक मूलग्राही, धाडसी, लोकविलक्षण, प्रक्षोभक विचार प्रकट केले. मात्र त्यांच्या कादंबऱ्यांतील पात्रांचा कलात्मक परिपोष करण्याकडे त्यांनी विशेष लक्ष दिलेले नाही. त्यांची पात्रे एक सारखीच भाषा बोलतात. माणसांच्या कामभावना, स्वार्थ व सामाजिक उच्चतेच्या आकांक्षा ह्यांचे स्वरूप ते आवर्जून स्पष्ट करतात. पात्रपरिपोषाप्रमाणेच कथानकांची मांडणी, हे केतकरांच्या कादंबऱ्यांचे दुबळे अंग होते. कथांचे वातावरण वास्तव, पण कथा मात्र अस्ताव्यस्त वाढलेल्या असतात. कथांची बांधेसूद गुंफण व उत्कंठावर्धक मांडणी यांकडे ते विशेष लक्ष देत नाहीत.

त्यांची स्फुट कविता उघड्याबागड्या पण प्रामाणिक आत्मनिवेदनामुळे लक्ष वेधून घेते. *आंगिरसाचे सत्र* ह्या अपुऱ्या महाकाव्यात प्राचीन काळातील यज्ञसंस्थेचे चित्रण त्यांनी केले आहे. आणि *स्त्रीसत्ता पराभव* ह्या अपुऱ्या नाटकात उत्तर कुरूतील स्त्री-वैराज्याची हकीगत त्यांनी सांगितली आहे. कादंबऱ्यांप्रमाणेच त्यांचे महाकाव्य आणि नाटक ही त्यांच्या समाजशास्त्राच्या चिंतनावरच आधारलेली आहेत.

केतकरांचे इतिहासचिंतनही त्यांच्या समाजशास्त्रीय विचाराइतकेच महत्त्वाचे आहे. त्यातही त्यांचे वैदिक संशोधन हे श्रेष्ठ मानावे लागेल. *महाराष्ट्रीयांचे काव्यपरीक्षण आणि डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर ह्यांचे वाङ्मयविषयक लेख* (१९७४) या पुस्तकातून त्यांचा मध्ययुगीन मराठी साहित्याबाबतचा विचार प्रकट झाला आहे.

राजकीय विचारवंत म्हणून केतकरांची ख्याती कधी नव्हतीच. पण *निःशस्त्रांचे राजकारण* ह्या पुस्तकात एक उद्बोधक राजकीय प्रणाली त्यांनी मांडली आहे. म. गांधींच्या असहकारितेच्या चळवळीमुळे त्यांच्या ह्या विचारसणीला चालना मिळाली. इंग्लंडने भारताला स्वराज्य देण्यात इंग्लंडचे काही नुकसान नाही. पण इंग्लंड जर ते देत नसेल तर इंग्लंडवर दडपण आणण्यासाठी करबंदीची चळवळ पद्धतशीर कशी करावी ह्यासंबंधीचा एक कार्यक्रम त्यांनी *निःशस्त्रांचे राजकारण* या पुस्तकात दिला आहे.

महाराष्ट्रातील म. मो. कुंटे, राजारामशास्त्री भागवत, इतिहासाचार्य राजवाडे वगैरे मनस्वी विद्वानांची परंपरा केतकरांनी समृद्ध केली.

द. न. गोखले, सुनंदा कविमंडन, कल्याण काळे

संदर्भ : (१) डॉ. द. न. गोखले, 'डॉ. केतकर'. (२) दुर्गा भागवत, 'केतकरी कादंबरी'. (३) शीलवती केतकर 'मीच हे सांगितलं पाहिजे'. (४) य. दि. फडके (संपा.), 'केतकर लेखसंग्रह'. (५) 'लोकशिक्षण', मे, जून – १९३७.

**केपन, डेव्हिड :** (ज. १६ ऑगस्ट, १७९३, मुंबई – मृ. १७ डिसेंबर, १८६९). भाषांतरकार. वडील जॉन केपन ईस्ट इंडिया कंपनीच्या लष्करी खात्यात नोकर. शिक्षण इंग्लंडमध्ये. कंपनी सरकारच्या लष्करात नोकरी, जनरलच्या हुद्यापर्यंत प्रगती. १८१० ते १८१७ पर्यंत मुंबई–कोकण भागात वास्तव्य.

ह्यांनी बाबा साने ह्यांच्या साह्याने ग्रांट डफ ह्यांच्या 'हिस्ट्री ऑफ द मराठाज्' ह्या इंग्रजी इतिहास-ग्रंथाचे मराठीत भाषांतर केले आहे. *बखर मराठ्यांची* (१८२९) हे ते भाषांतर. देशातील लोकांना सर्व विषयांचे सामान्यज्ञान व्हावे, या हेतूने शास्त्रीय विषयावर एक पुस्तक ह्याने लिहिले होते. या पुस्तकावर कँडी, बाळशास्त्री, महंमद इब्राहिम मखबा, हरी केशवजी ह्यांनी आपापले अनुकूल अभिप्राय दिले आहेत. *बखर मराठ्यांची* हे पुस्तक शिळाछापावर छापले असून त्याची पृष्ठसंख्या ४+२९+४२७ एवढी आहे. ही बखर लिहिण्याचे कारण देताना केपन लिहितो, "बाजीराव असता, आल्पिष्टन साहेबाच्या हाताखाली कारभार चालविणारा कप्तान ग्रांट साहेब पुण्यास होता. तो पुढे बाजीराव गेल्यावर साताऱ्यास नेमिला. तो तेथे असता त्याच्या मनात आले की, महाराष्ट्र लोक इतक्या योग्यतेस कसे चढले, ते समजावयास त्या लोकांचे वृत्त ध्यानात आणिले पाहिजे. तेणेकरून विलायतेतीलही लोकांसही विदित होईल, म्हणोन त्याणे (डफने) बहुत जागचे पुरातन लेख जमा केले ...' त्या सर्व विस्तारातील सारांश निवडून, आपले बरोबर घेऊन विलायतेस गेला आणि तेथे इंग्रजी भाषेत त्याची बखर लिहून छापिली; तिची तीन बुके झाली."

या पुस्तकाची दुसरी आवृत्ती दोन भागांत सन १८४७ मध्ये पुणे पाठशाळेने छापून प्रसिद्ध केली.

उषा टाकळकर, रा. बा. बक्षी

संदर्भ : श्री. म. पिंगे, 'युरोपियनांचा मराठीचा अभ्यास व सेवा', मुंबई १९६०.

**केमकर, वामनशास्त्री एकनाथ :** ० क्षीरसागर, वामन एकनाथ : (ज. १८५४ – मृ. ऑगस्ट, १८९९). भाषांतरकार. सोलापूर जिल्ह्यातील केम येथील रहिवासी. संस्कृत–पंडित. मराठी ट्रेनिंग कॉलेज, पुणे येथे संस्कृतचे अध्यापक.

ह्यांनी *वृत्तचित्र* व *अलंकारविकास* (१८८०) ह्या छंदशास्त्रविषयक संस्कृत ग्रंथांची मराठीत भाषांतरे केली. *वृत्तमणिमाला* (१८८७) हा मराठीतील त्यांचा वृत्तविषयक स्वतंत्र ग्रंथ. ह्या ग्रंथाची पाच प्रकरणे असून संज्ञा, समवृत्ते, अर्धसमवृत्ते, विषमवृत्ते, मात्रा, वैतालीक वृत्ते ह्यांचा क्रमशः विचार केला आहे. *शिशुपालवध* (१८८१) हे ह्यांचे गद्यपद्यात्मक पौराणिक नाटक. *निबंधावली* (१८८८) मध्ये

'श्रमावाचून सुख मिळत नाही', 'शास्त्राध्ययनाचे महत्त्व' आणि 'वेदान्त' असे तीन निबंध समाविष्ट. 'कीर्तनतरंगिणी' ह्या ग्रंथाच्या संपादनातही केमकरशास्त्र्यांनी साह्य केले होते.

उषा टाककर

**केरकर, सोनाबाई चिमाजी :** (ज. ९ नोव्हेंबर, १८८० – मृ. १७ जुलै, १८९५, मुंबई). नाटककार; गोमंतकातील कलावंत समाजातील कुटुंबात जन्म. शिक्षण मुंबईच्या मिशन शाळेत.

ह्यांनी *संगीत छत्रपती संभाजी* (१८९६) हे नाटक लिहिलेले आहे (पृ. ६५१). त्याच सुमारास रंगभूमीवर गाजत असलेले 'संगीत संभाजी' (१८९१) हे आत्माराम मोरेश्वर पाठारे ह्यांचे नाटक पाहून सोनाबाईंना आपले नाटक लिहिण्याची प्रेरणा मिळाली असावी असे दिसते.

उषा टाककर

संदर्भ : जोशी सुमंत, 'नमन नटवरा', दादर, मुंबई, १९७१; पृ. ३१.

**केलवाड, मीनप्पा व्यंकप्पा :** ० गोविंदशर्मा : (ज. १८६३, कृष्णापूर, हैदराबाद–मृ. १९२०, हैदराबाद). संगीत-लिपिकार. संगीत लेखन पद्धतीला आधुनिक वळण देणारे संगीतज्ञ. मूळचे रायपूरजवळील कनकगिरी येथील. शिक्षण बडोद्याला. योगीश्वर वामनबुवाजवळची 'मनुष्य-गुणधर्म-विज्ञानशास्त्र' म्हणजे माणसाचे मस्तक तपासून त्याचा योग्य लक्षणे जाणण्याची फ्रेनॉलजीसारखी विद्या त्यांना लाभली. आजोबा व गुरु यांचे संगीतप्रेमही मीनप्पांमध्ये उतरले. बडोद्याचे गायक-वादक मौलाबक्ष घिस्सेखाँकडे ते प्रथम गायन व कंठदोष निर्माण झाल्यानंतर वादन शिकले.

म्हैसूरच्या महाराजाच्या संगीत कचेरीचे ते अभ्यागत सल्लागार होते. त्यांची दीर्घकाळची रोजनिशी उद्‌बोधक आहे. त्यांच्या हस्तलिखित लेखनापैकी *गांधर्वोपनिषद्–भाग १ : मूलाधार* (१९०७) हे मीनप्पांचे एकच पुस्तक छापले गेले असून, त्यात 'गायनाचार्यमाला' ह्या संगीतज्ञांच्या चित्रांचा समूहही घातला गेला. 'मूलाधार'चे मुख्य महत्त्व म्हणजे त्यातील स्वरलयताल बारकाईने दाखविणारी संगीतलिपी. ही संगीतलिपी काटेकोर असूनही क्लिष्टतेमुळे मागे पडली. पण संगीतलिपीकरणाचा हा पहिला प्रयत्न म्हणून त्याचे महत्त्व फार होते. मौलाबक्षांनी याच लिपीवरून स्फूर्ती घेतली होती असे मीनप्पांनी आपल्या रोजनिशीत नमूद करून ठेवले आहे.

शरच्चंद्र वि. गोखले, मदन पां. कुलकर्णी

**० केवलानंद सरस्वती :** पहा मराठे, नारायणशास्त्री

**० केशवसुत :** पहा दामले, कृष्णाजी केशव

**० केशवसुत :** पहा बेहेरे, नारायण केशव

**केसकर, बलभीम भगवंत :** (ज. १८८०, पुरंदावडे, जि. सोलापूर – मृ. ४ जून, १९५१, मुंबई). चरित्रकार, निबंधलेखक व संकलित लेखनसंग्रहाचे संपादक, शिक्षण मॅट्रिकपर्यंत. तारखात्यात नोकरी (१९०१).

भारतातील एकेश्वरी पंथाचे (ब्राह्मोसमाजाचे) आद्य संस्थापक *राजा राममोहन राय* (१९१५) ह्यांचे एक विस्तृत चरित्र त्यांनी लिहिले आहे. तसेच प्रार्थनासमाज मंदिरातील एकेश्वरीय नेत्यांची व्याख्याने व प्रवचने लहान लहान पाच खंडांत त्यांनी प्रसिद्ध केली. प्रारंभीच्या काळात ते 'इंदुप्रकाश', 'सुबोधपत्रिका', 'ज्ञानप्रकाश', 'जगत्–वृत्त' ह्या पत्रांतून प्रार्थना समाजाच्या तत्त्वप्रणालीचा परिचय करून देणारे छोटे-छोटे लेख लिहीत. त्यातून *विठ्ठल रामजी शिंदे यांचे लेख, व्याख्याने, उपदेश* (१९१२) व *संसार व धर्मसाधन* (१९३५) (द्वा. गो. वैद्य यांचे धर्मपर लेख व व्याख्याने) ही दोन संपादने निर्माण झाली. या शिवाय *आदर्श कुलस्वामिनी* (१९४८–सहलेखक) सोहोनी; *डॉ. काशीबाई नवरंगे* (१९४८), *वामनबापू फाटे[?]कर* (१९४३) अशी प्रार्थनासमाजीय व्यक्तींची चरित्रेही त्यांनी लिहिली आहेत.

नंदिनी लोटलीकर, सुनंदा कविमंडन

**केहीमकर, शालोम शमोएल :** (ज. १८१७ – मृ. १४ जून, १८९३). बेने इस्राएली लेखक. शिक्षण अमेरिकन मिशन स्कूल येथे. पुढे तेथेच शिक्षक. बेने इस्राएल प्रार्थनामंदिरात हे हिब्रूविषयक मार्गदर्शन करीत.

ह्यांचे *सेफेरादिम : भाग १* (१८५९) हे पुस्तक प्रसिद्ध आहे. इस्राएल मंडळींची नित्य-त्रैकालिक भजनपद्धती प्रगट करणारे प्रार्थना-पुस्तक असे ह्याचे स्वरूप आहे. घरात व प्रार्थना मंदिरात रोज म्हणावयाच्या प्रार्थना हिब्रूत असून त्याचा मराठी अर्थ या पुस्तकात दिलेला आहे. *आमचा गुरु मोशे याने दिल्हेले शास्त्र वाचण्याची रीत व त्याचे स्वर्गारोहण* (१८६५) हे ह्यांचे दुसरे पुस्तक धर्मविषयक असून, यांनी ते एलिया वालटकर ह्यांच्या सहकार्याने हिब्रूवरून मराठीत भाषांतरित केले आहे.

रेचल गडकर

**केहीमकर, हाईम शमोएल :** (ज. १८३०, अलिबाग – मृ. ९ ऑक्टोबर, १९०८, मुंबई). बेने इस्राएली ज्ञातीच्या इतिहासाचे लेखक. प्राथमिक शिक्षण अलिबाग व माध्यमिक शिक्षण मुंबईच्या रॉबर्ट मनी हायस्कूलमध्ये. सरकारी मिलिटरी बोर्डात नोकरी. मुंबईतील पहिल्या इस्राएली हायस्कूलचे संस्थापक.

त्यांनी हिब्रू भाषेतील प्रार्थना व गीते संक्षिप्त करून त्यांना धर्माख्यानांसही वाव राहील असे रूप दिले. *सेफेरादिम* (इस्राएलांची नित्यत्रैकालिक भजनपद्धती) हे पुस्तक प्रसिद्ध केले. तसेच उपासनेच्या दिवशी उपयोगी पडावे म्हणून युरोप-अमेरिकेतील यहुदी लेखकांच्या धर्मव्याख्यानांचे मराठी भाषांतर केले. 'मोकाट' या ज्यू ग्रंथकाराच्या ग्रंथातील काही उपयुक्त लेख मराठीत रूपांतरित केले. आपल्या मुलाने चालविलेल्या 'इस्राएल' ह्या वृत्तपत्रातून त्यांनी काही लेख प्रसिद्ध केले. *खिश्चन हिस्ट्री* (अप्रकाशित) हा जुन्या कराराचा साररूप ग्रंथ त्यांनी लिहिला.

*बेने इस्राएलांचा इतिहास* हे मराठीतील लहानसे पुस्तक व *द हिस्ट्री ऑफ द बेने इस्राएल ऑफ इंडिया* हा मोठा ग्रंथ इंग्रजीत लिहून, त्यांतील आपल्या ज्ञातीची पूर्वपीठिका त्यांनी साधार स्पष्ट केली. त्यातून त्यांची शोधक बुद्धी प्रत्ययास येते. १८९७ साली लिहिलेला हा ग्रंथ १९३७ मध्ये प्रसिद्ध झाला.

रेचल गडकर, सुनंदा कविमंडन

**केळकर, गणेश केशव :** (ज. १८६४ – मृ. १९४२). शेतीविषयक ग्रंथांचे लेखक. शिक्षण कासारवेल व बेळगाव या ठिकाणी. पुण्याच्या सायन्स कॉलेजमध्ये शेतकीविषयक अभ्यासक्रम पूर्ण केला. शेतकी खात्यात नोकरी. 'डेप्युटी डायरेक्टर ऑफ ॲग्रिकल्चर' या पदावरून १९१६ मध्ये निवृत्त. १९२० ते १९२३ ह्या काळात गोवा सरकारचे शेती-अधिकारी.

*जमीन, मशागत व शेतकीची आउते* (१९१२) हे व अशीच अन्य आठ-नऊ पुस्तके लिहिली. डॉ. केतकरांच्या 'ज्ञानकोशा'तील शेतकीविषयक विभागांचे संपादक व त्या विषयाचे लेखक म्हणूनही त्यांनी कार्य केले आहे.

हरिश्चंद्र थोरात

**केळकर, गणेश हरि :** (ज. १८८७ कुरुंदवाड – मृ. १९४७). मराठी निबंधकार, व्याकरणकार व काव्यसंहिता संपादक. मुंबई विद्यापीठाचे एम्.ए. (१९१२). केंब्रिज येथे 'मॉडर्न लँग्वेजेस'मध्ये ट्रायपॉस मिळवून एम्.ए. (१९१५). फर्ग्युसन कॉलेजात इंग्रजीचे प्राध्यापक. निवृत्त (१९३२).

ह्यांनी *लोकहितवादी : सरदार गोपाळराव हरि देशमुख* (१९२३), *शेक्सपियर व तत्कालीन इंग्रजी रंगभूमी* (१९३२), *मराठी व्याकरणाची मूलतत्त्वे* (१९३७), *लेखन कलेची मूलतत्त्वे व निबंधलेखन* (रा. ह. केळकर यांच्या साहाय्याने १९३०), *तुकारामांच्या अभंगांची चर्चा-भाग १, २* (संपादन व प्रकाशन, १९२७) अशी काही पुस्तके लिहिली. त्यांतील पहिली व शेवटची दोन पुस्तके विशेष महत्त्वपूर्ण आहेत. *शेक्सपियर व तत्कालीन इंग्रजी रंगभूमी* ह्या त्यांच्या पुस्तकाच्या पहिल्या भागात इंग्रजी नाट्यकलेचा उदय व विकास यासंबंधीची माहिती असून, दुसऱ्या मुख्य भागात शेक्सपियरचे चरित्र व नाटकाविषयी विवेचन आले आहे. शेक्सपियर व त्याची नाट्यसृष्टी ह्यांचा इंग्रजीतून पूर्ण परिचय करून घेणे ज्यांना शक्य नाही, त्यांच्यासाठी हे पुस्तक उपयुक्त ठरेल.

*तुकारामांच्या अभंगांची चर्चा* हे पुस्तक तुकारामांच्या अभंगांचा अभ्यास करणाऱ्यांना बहुमोलाचे वाटावे असे आहे. साडेसातशे अभंगांची चर्चा या पुस्तकाच्या दोन भागांत आलेली आहे.

गं. दे. खानोलकर, सुनंदा कविमंडन

**केळकर, दामोदर गणेश** : (ज. १८५४ – मृ. १८९६). ग्रहज्योतिष विषयाचे लेखक. एम.ए.पर्यंत शिक्षण. काही काळ पुण्याच्या डेकन कॉलेजात दक्षिणा-फेलो. त्यानंतर शिक्षण खात्यात नोकरी. त्यांचे आकाशातील ताऱ्यांची आणि नक्षत्रांची माहिती देणारे *आकाशातील देखावे* (१८९१) हे पुस्तक प्रसिद्ध आहे. या पुस्तकात दिलेल्या नकाशांच्या मदतीने ताऱ्यांची सुलभ रीतीने माहिती करून घेता येते. असे एकंदर बारा नकाशे मुंबई अक्षांशानुसार तयार करण्यात आलेले आहेत. आकाशातील ताऱ्यांची व नक्षत्रांची माहिती करून देणारे मराठीतील पहिलेच पुस्तक म्हणून सदर पुस्तकाचे विशेष महत्त्व आहे.

उषा टाकळकर, ज. रा. कस्तुरे

**केळकर, नरसिंह चिंतामण** : ० अनामिक ० आत्मानंद : (ज. २४ ऑगस्ट, १८७२, मोडनिंब, मिरज संस्थान – मृ. १४ ऑक्टोबर, १९४८ पुणे). 'केसरी' व 'मराठा' यांचे संपादक. निबंधलेखक, नाटककार चरित्रकार, कादंबरीकार. सव्यसाची स्वरूपाची प्रसादगुणयुक्त लेखन-शैली. ते 'साहित्यसम्राट' या नावानेही परिचित. प्राथमिक व माध्यमिक शिक्षण मिरज येथे व उच्च शिक्षण पुणे येथे. बी.ए. (१८९१), एलएल.बी. (१८९३). काही काळ सातारा येथे वकिली. पुढे लो. टिळकांचे 'केसरी'तील सहकारी. स्वराज्य पक्षातर्फे मध्यवर्ती कायदेमंडळाचे काही वर्षे क्रियाशील सभासद. स्वकालीन राजकारणाच्या क्षेत्रातही ते अग्रगण्य होते. त्यांना त्यांच्या हयातीत अनेक मानसन्मान मिळाले.

लो. टिळकांना १८९७ साली राजद्रोहाच्या आरोपावरून शिक्षा झाली, तेव्हा न. चिं. केळकरांची 'केसरी' व 'मराठा' या साप्ताहिकांचे संपादक म्हणून नेमणूक झाली. तुरुंगातून सुटल्यानंतर 'केसरी'चे संपादकत्व लो. टिळकांनी आपणाकडे परत घेतले पण 'मराठा'चे संपादकत्व केळकरांकडेच कायम ठेवले. पुढे लो. टिळकांचे मृत्यूनंतर ते पुन्हा 'केसरी'चे संपादक झाले. 'केसरी'च्या संपादनाच्या जबाबदारीतून ते जरी १९३७ साली मुक्त झाले, तरी जानेवारी १९३५ मध्ये केसरी-मराठा संस्थेच्या वतीने प्रसिद्ध होणाऱ्या 'सह्याद्री' मासिकाचे ते नंतरही संचालन करीत होते. त्याच्यासाठी लेखही लिहित. *कावळा व डाफी* (१९४०) ही ह्यांची कादंबरी व *माझा जन्मभरचा एक उद्योग* (१९४२) हे आठवणीवजा वाङ्मयीन प्रकरण प्रथम सह्याद्रीतूनच प्रकाशित झाले.

केळकरांनी काव्य, कथा, कादंबरी, नाटक, निबंध, चरित्र, आत्मचरित्र, इतिहास, तत्त्वज्ञान, राजकारण, शिक्षण, प्रवासवर्णन, धर्मशास्त्र, समाजशास्त्र, ग्रंथसमीक्षा, साहित्यविचार इत्यादी निरनिराळ्या विभागात मोडणारे ग्रंथलेखन व स्फुट लेखन मोठ्या प्रमाणावर केले आहे. यातील बराच मोठा भाग *समग्र केळकर वाङ्मय* (१९३८) या नावाने एकूण बारा खंडांत प्रकाशित झाला आहे. *नवलपूरचा संस्थानिक* (१९३४) ही त्यांची पहिली कादंबरी. *गतगोष्टी* (आत्मचरित्र, १९३९), *कावळा व डाफी* (कादंबरी, १९४०), *झाशीची झाशीवाली* (चरित्र, १९४०), *कोकणचा पोर* (कादंबरी, १९४२), *जगाची रीत* (कादंबरी, १९४३), *विचार ब्रिपी* (अपूर्ण १९४३) अशी त्यांची पुस्तके त्यानंतर प्रकाशित झाली आहेत. व्यासंग, तर्क, विवेक, अभिजात विनोदबुद्धी, मनातील विचार सुसंगतपणे व सुगम भाषेत मांडण्याची पद्धती इत्यादिकांची जोड मिळाल्यामुळे त्यांचे लेखन समाजाच्या सर्व थरांतील लोकांना प्रिय झाले आहे. केळकरांच्या प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांची संख्या त्या त्या साहित्यप्रकारानुसार पुढीलप्रमाणे आहे : आत्मचरित्र–२, इतिहास–४, कथासंग्रह–२, कवितासंग्रह – २, कादंबरी–८, चरित्र – ४, नाटक – ११, प्रबंधनिबंध–५, तत्त्वज्ञान–४, राजकारण–९, लेखभाषणे इ. संग्रह–६.

मराठीभाषेप्रमाणे इंग्रजीभाषेतही केळकरांनी लेखन केले आहे. त्यांची प्रमुख इंग्रजी पुस्तके पुढीलप्रमाणे : (१) *लाइफ ॲण्ड टाइम ऑफ लो. टिळक* (१९२८), (२) *लँडमार्क्स इन लोकमान्याज लाइफ* (१९२४), (३) *प्लेझर्स ॲण्ड प्रिव्हिलेजेस ऑफ दि पेन* (१९२९), (४) *स्पीचेस ॲण्ड ॲड्रेसेस*, (५) *कंटेम्प्ट ऑफ कोर्ट केस* (१९२४), (६) *टिळक ट्रायल* (१९०८) सरकारजमा, (७) *केस फॉर इंडियन होमरूल* (१९१७), (८) *पासिंग फेज ऑफ पॉलिटिकल्स* (१९२५), (९) *रिपोर्ट ऑफ माय वर्क ॲट दि फर्ट राउंडटेबल कॉन्फरन्स* (१९३३).

केळकरांनी लिहिलेल्या मराठी पुस्तकांपैकी *आयर्लंडचा इतिहास* (१९०९), *मराठे व इंग्रज* (१९१८), *तिरंगी नवमतवाद* (१९३७), *केळकरकृत लेखसंग्रह* (१९१५), *समग्र केळकर वाङ्मयाचे केसरी खंड, पातोहर खंड, साहित्य खंड, संस्कृति खंड* (१९३८), तसेच *तोतयाचे बंड* (१९१३), *कृष्णार्जुनयुद्ध* (१९१५) ही नाटके, *लो. टिळक यांचे चरित्र : तीन भाग* (१९२३), *गतगोष्टी* (१९३९), *हास्य विनोद मीमांसा* (१९३७) ही पुस्तके विशेष प्रसिद्ध आहेत.

वृत्तपत्रीय संपादक ही त्यांची व्यावसायिक भूमिका त्यांच्या निबंधलेखनातील कर्तृत्वाला अत्यंत उपकारक ठरली. विषयांची विविधता, सतत नवनवीन माहिती ग्रहण करण्याची व तिची संदर्भानुसार वापर करण्याची योजकता आणि सुबोध व आकर्षक शैली यांमुळे त्यांचे निबंधलेखन ज्ञानप्रद असूनही रंजक झाले आहे. 'दिल्लीचा बादशाही दरबार', 'ज्ञानाची सदावर्ते' यांसारख्या अनेक निबंधांतून त्यांच्या बहुश्रुतपणाचे, उपमाप्रचुर व विनोदमधुर रंजक शैलीचे दर्शन घडते. प्रतिपाद्य विषय रोचक व रंजक उपमा-दृष्टांतांनी फुलवीत असताना त्यावर केलेला मंद विनोदाचा शिडकावा, हे त्यांच्या निबंधलेखन पद्धतीचे हृद्य वैशिष्ट्य आहे.

नाट्यक्षेत्रातील त्यांची कामगिरीही महत्त्वाची आहे. *नवरदेवांची जोडगोळी* (१८९८), *कृष्णार्जुनयुद्ध* (१९१५), *वीर विडंबन* (१९१९) व *पतीची निवड* (१९५०) ही त्यांची खेळकर स्वरूपाची नाटके. *नवरदेवांची जोडगोळी* (१८९८) हे शेरिडनच्या 'द्र रायव्हल्स' या नाटकाचे रूपांतर होय. ज्योतिरिंद्रनाथ टागोर यांच्या 'सरोजिनी' या बंगाली नाटकावरून त्यांनी *सरोजिनी* (१९०१) हे रूपांतरित नाटक लिहिले. *तोतयाचे बंड* (१९१३) हे त्यांचे सर्वाधिक गाजलेले व सर्वोत्कृष्ट नाटक. *चंद्रगुप्त* (१९१३) आणि *अमात्यमाधव* (१९१५) ही नाटकेही वैशिष्ट्यपूर्ण आहेत. *पतीची*

*भिवड* (१९५०) हे त्यांच्या मृत्यूनंतर प्रसिद्ध झालेले विनोदी प्रहसन सामाजिक स्वरूपाचे आहे.

केळकरांचे चरित्रलेखनही मराठी चरित्रवाङ्मयात उठून दिसते. त्यांचे *त्रिखंडात्मक टिळकचरित्र* (१९२३, १९२८) घडलेला इतिहास संगतवार सांगण्याच्या दृष्टीने लिहिलेले आहे. *गॅरिबाल्डी या इटलीच्या स्वातंत्र्यसेनानीचे चरित्र* (१९०१) व *फ्रान्सची झाशीवाली* (१९४०) हे जोन ऑफ आर्कचे चरित्रही उल्लेखनीय आहे.

त्यांनी दिलेली वाङ्मयविषयक भाषणे, ग्रंथांना लिहिलेल्या प्रस्तावना, साहित्य समीक्षणे, वाङ्मयनिर्मितीच्या संदर्भात त्यांनी केलेली अनेक प्रश्नांची चर्चा यांना वाङ्मयीन दृष्टीने महत्त्वपूर्ण स्थान आहे. बडोदा (१९२१) येथील मराठी साहित्य संमेलनाचे ते अध्यक्ष होते. या संमेलनात त्यांनी काव्यानंदमीमांसेतील 'सविकल्प समाधी'चा सुप्रसिद्ध सिद्धांत मांडला. ज्ञानेश्वरांच्या साहित्याचा परिचय करून देण्यासाठी त्यांनी *ज्ञानेश्वरीसर्वस्व* (१९४६) हे पुस्तकही लिहिले आहे.

वैचारिक क्षेत्रात केळकर 'सुवर्णमध्या'चे पुरस्कर्ते म्हणूनही प्रसिद्ध आहेत, परिचित आहेत.

गं. दे. खानोलकर, ज. रा. कस्तुरे

**संदर्भ :** (१) न. चिं. केळकर, 'गतगोष्टी अर्थात माझी जीवनयात्रा' (आत्मचरित्र), पुणे, १९३९. (२) केळकर-वाढदिवस-मंडळ, पुणे. (३) 'केळकर चरित्र' व 'वाङ्मयविषयक अनेक लेखकांचे लेख', पुणे, १९७२. (४) वा. ल. कुलकर्णी, 'न. चिं. केळकर वाङ्मयदर्शन', मुंबई, १९७३.

नीलिमा गुंडी

**केळकर, वासुदेव बाळकृष्ण :** (ज. १८६०, सातारा–मृ. १८९५, पुणे). नाटककार. १८८१ साली एल्फिन्स्टन कॉलेजातून बी.ए. काही काळ न्यू इंग्लिश स्कूल येथे शिक्षक आणि १८८५ पासून पुण्याच्या फर्ग्युसन कॉलेजमध्ये इंग्रजीचे मुख्य प्राध्यापक. अध्यापनाबरोबरच 'केसरी'त 'मराठा' या साप्ताहिकात संपादकीय विभागात काम. नाट्यवाङ्मयाला वाहिलेल्या 'नाट्यकथार्णव' या मासिकाच्या संपादनाची जबाबदारीही काही काळ यांनी सांभाळली.

नटवर्य गणपतराव जोशी यांच्या 'शाहूनगरवासी' नाटक मंडळीशी १८९१ पासून त्यांचा संबंध आला. त्यावेळी त्यांनी शेक्सपिअरच्या 'टेमिंग ऑफ दि श्रू' या नाटकाचे *त्राटिका* (नाट्यकथार्णव, १८९२) या नावाने रूपांतर करून ते स्वतःच बसवून घेतले. हे रूपांतर करताना मराठी वातावरणाला पोषक असे अनेक फेरफार त्यांनी मूळ नाटकात केले. या नाटकातील विनोदाचा प्रभाव पुढील मराठी विनोदी नाटकांवर पडलेला दिसून येतो. शेक्सपिअरच्या 'हॅम्लेट' या नाटकाचे गो. ग. आगरकर यांनी 'विकार विलसित' या नावाने मराठी रूपांतर केले होते. त्यात केळकरांनी प्रायोगिक दृष्टीने काही बदल करून 'शाहूनगरवासी' मंडळीकडून रंगभूमीवर आणले (१८९३). या नाटकातील हॅम्लेटच्या भूमिकेने मराठी नाट्यक्षेत्रात एक नवा इतिहास निर्माण केला. याच वर्षी शेक्सपिअरच्या 'अँटनी अँण्ड क्लिओपॅट्रा' या नाटकाचे *वीरमणी आणि शृंगार सुंदरी* (१८९३) या नावाने रूपांतर करून प्रथम ते 'नाट्यकथार्णव' मासिकात छापून प्रसिद्ध केले व नंतर रंगभूमीवरही आणले. १८९२ मध्ये त्यांनी एका इंग्रजी नाटकाच्या आधारे *लटपटा पध्या* हे तीन अंकी प्रहसन लिहून ते 'नाट्यकथार्णवा'तून प्रकाशित केले.

ज्या काळात किर्लोस्करांच्या संगीत नाटकांचा प्रेक्षकांच्या मनावर फार मोठा प्रभाव पडलेला होता, त्या काळात गणपतराव जोशींसारख्या अभिनयकुशल नटाला हाताशी धरून व उचित मार्गदर्शन करून श्री. केळकर यांनी संगीत नाटकांप्रमाणेच गद्य नाटकही कलात्मक आणि परिणाम करणारे होऊ शकते, हे दाखवून दिले.

गं. दे. खानोलकर, ज. रा. कस्तुरे

**केळकर, विश्वनाथ विनायक :** (ज. १८९०–मृ. ५ फेब्रुवारी, १९५०, नागपूर). राष्ट्रीय वृत्तीचे लेखक. शिक्षण बी.ए., एलएल.बी. नागपूर येथे वकिलीचा व्यवसाय. स्वा. सावरकरांचे वैचारिक अनुयायी. हिंदुमहासभेचे सक्रिय कार्यकर्ते.

*महात्मा परिचय* (१९१२) हे केळकरांचे पहिले पुस्तक. विवेकानंदांनी कथन केलेल्या जगातील थोर महात्म्यांच्या संक्षिप्त चरित्रांचा अनुवाद या पुस्तकात आहे. *करुणा* (१९२१) ही यांची कादंबरी म्हणजे प्रसिद्ध वंग साहित्यिक राखालदास बंदोपाध्याय ह्यांच्या मूळ 'करुणा' या कादंबरीचे भाषांतर होय. गोविंदगुप्त व स्कंदगुप्त ह्या धुरंधर सेनानायकांनी हुणांच्या परचक्राशी दिलेली रोमहर्षक झुंज आणि आर्यावर्ताच्या रक्षणासाठी असंख्य वीरांनी केलेले बलिदान हा प्रस्तुत कादंबरीचा विषय आहे. याशिवाय 'बॅरिस्टर विनायकराव सावरकर यांजबद्दल सरकारने चालविलेला अन्याय' ही पुस्तिका व स्वा. सावरकरांनी पोर्टब्लेअरमधील तुरुंगाच्या अंधारकोठडीतून पाठविलेल्या पत्रांचे *अंदमानच्या अंधेरीतून* (१९२४) हे भाषांतर व संपादन, ही केळकरांची अन्य वाङ्मयीन कामगिरी.

हरिश्चंद्र थोरात, स्वाती शहाणे

**केळकर, सदाशिव पांडुरंग :** (ज. १८४८, चाकण, जि. पुणे–मृ. २० डिसेंबर, १९०६, मुंबई). निबंधलेखक, *ज्ञानदीप* (१८८४–९२) मासिकाचे संस्थापक व पत्रकार. शिक्षण मॅट्रिकपर्यंत. गिरण्यांतून विव्हिंग मास्टर म्हणून काम.

प्रार्थनासमाजाच्या 'सुबोधपत्रिका' ह्या मुखपत्रातून त्यांनी धर्म, समाज, उद्योग इत्यादी विषयांवर वैचारिक लेख लिहिले. *ज्ञानदीप* ह्या स्वतःच्या मासिकातूनही धार्मिक, सामाजिक, वैद्यक, यंत्रविषयक इ. विषयांवरील उद्बोधक लेखन प्रसिद्ध केले. *कामगार*, *कामगार व हितोपदेश* अशी पत्रेही काही काळ चालविली. *मूर्तिपूजा आवश्यक आहे काय?* (१८९९) व *ग्रंथप्रामाण्य* (१९१५) या दोन ग्रंथांतून त्यांनी प्रार्थनासमाजाच्या धर्मसिद्धान्तांचे मंडन केले आहे. देशाच्या हितासाठी समाजाच्या राजकीय, सामाजिक, औद्योगिक, धार्मिक इत्यादी सर्वच गोष्टींना सारखेच महत्त्व देण्यावर त्यांचा भर होता व हीच भूमिका त्यांच्या व्याख्यानांमागे व लेखनामागे होती.

उषा टाकळकर, स्वाती शहाणे

**केळूसकर, कृष्णराव अर्जुन :** (ज. २० ऑगस्ट, १८६०, केळूस, ता. वेंगुर्ले–मृ. १४ ऑक्टोबर, १९३४, मुंबई). मराठीमधील महत्त्वाचे चरित्रकार, भाषांतरकार, वक्ते, विचारवंत, सुधारक आणि सामाजिक कार्यकर्ते. ब्राह्मणेतर चळवळीचे आधारस्तंभ; चरितार्थासाठी बराच काळ शिक्षकाची नोकरी. विद्वत्ता व व्यासंग यातून मिळालेल्या अधिकारामुळे 'गुरुवर्य' असा उल्लेख. गरीब मराठा शेतकरी कुटुंबात जन्मलेल्या कृष्णरावांनी अडचणींना तोंड देत जरुरीपुरते (मॅट्रिक) शिक्षण घेतले आणि ते नोकरी करू लागले. विद्यार्थीदशेत आणि नोकरी करीत असतानाही केळूसकरांनी विविध विषयांवर सूक्ष्म आणि चौफेर वाचन केले. त्यातून ते निरीश्वरवादी आणि नीतिवादी बनले.

केळूसकरांच्या लेखनाची सुरुवात त्यांना शाळेत नोकरी मिळवून देणारे ज्यू सद्गृहस्थ हाईम केहिमकर यांच्या प्रेरणेतून झाली. त्यांच्यासाठी केळूसकरांनी 'जुन्या करारा'च्या इंग्रजी संक्षेपाचे मराठी भाषांतर केले. पुढे हाईमसाहेबांनी सुरू केलेले 'इस्राएल' नावाचे साप्ताहिक पत्रही केळूसकरांनी चालविले. त्यातून ते 'ज्युईश क्रॉनिकल' नावाच्या लंडनमधून निघणाऱ्या साप्ताहिकातील उपयुक्त मजकुराचे मराठी भाषांतर करीत. प्रसंगी स्वतंत्र लेखही लिहीत. हीचा त्यांच्या वाङ्मयसेवेची सुरुवात. याच काळात रा. ब. नारायण मेघाजी लोखंडे या ब्राह्मणेतर नेत्याने चालविलेल्या 'दीनबंधु' पत्रामधूनही केळूसकर लिहू

लागले. तसेच ब्राह्मणशाही विरुद्ध त्यांनी केलेल्या भाषणांचे वृत्तांतही छापून येऊन त्यांची प्रसिद्धीही बरीच झाली.

प्रार्थनासमाजाचे एक कार्यकर्ते मोरो विठ्ठल वाळवेकर यांच्या हाती समाजाच्या 'सुबोधपत्रिका' या पत्राची व्यवस्था आल्यावर केळूसकरांनी त्याच्यातूनही लिखाण केले. वाळवेकरांच्याच 'सुबोधप्रकाश' या पत्रातून केळूसकरांनी टॉम पेनच्या 'Rights of Man' या विख्यात ग्रंथाचे मराठी भाषांतर क्रमशः प्रसिद्ध केले. बडोदा-महाराज सयाजीराव यांच्या आश्रयाने इंग्रजीतून प्रसिद्ध झालेल्या 'राष्ट्रकथा' मालेतील (The Story of Nation Series) बारा ग्रंथांपैकी 'फ्रान्सच्या जुन्या इतिहासा'चे भाषांतर करण्याची कामगिरी खुद्द महाराजांनी केळूसकरांकडे सोपविली. ती त्यांनी इतक्या चांगल्या रीतीने पार पाडली की त्याचे भाषांतर बारा भाषांतरांमध्ये सर्वोत्कृष्ट ठरले (१८९३).

१८९३ मध्येच लक्ष्मण पांडुरंग नागवेकर यांनी 'आध्यात्मिक ज्ञानरत्नावली' नामक मासिक कृष्णरावांच्या संपादकत्वाखाली सुरू केले. त्यातून क्रमशः प्रसिद्ध झालेली तुकाराम महाराज आणि गौतमबुद्ध यांची चरित्रे अनुक्रमे १८९६ आणि १८९८ साली *तुकारामबावांचे चरित्र* आणि *गौतमबुद्धाचे चरित्र* या नावांनी ग्रंथरूपाने प्रसिद्ध झाली. तुकाराम चरित्रास न्या. रानड्यांच्या शिफारशीवरून 'दक्षिणा प्राइज कमिटी'चे बक्षीस मिळाले. दरम्यान सयाजीराव महाराजांच्या इच्छेनुसार केळूसकरांनी *सेनेका व एपिक्टेटस् यांची बोधवचने* ही प्रसिद्ध केली होती (१८९७). केळूसकरांच्या बुद्धचरित्रामुळे धर्मानंद कोसंबी, डॉ. आनंदराव नायर सारख्यांची बौद्धधर्माकडे प्रवृत्ती झाली.

बडोदा सरकारनेच केळूसकरांकडे उपनिषदांच्या मराठी रूपांतराचे काम सोपविले. सात उपनिषदांच्या रूपांतराचे काम त्यांनी १८९९ मध्ये पूर्ण केले. हे भाषांतर त्यांनी विशेषतः शांकरभाष्याला अनुसरून केले.

'आध्यात्मिक ज्ञानरत्नावली'तूनच पुढे *श्रीमद्भगवद्गीता : सान्वयपदबोध सार्थ आणि सटीक* हा कृष्णरावांचा क्रमशः प्रसिद्ध झालेला ग्रंथ, १९०२ मध्ये पुस्तकरूपाने प्रसिद्ध होऊन बाहेर पडला. ग्रंथाच्या शेवटी त्यांनी गीतेचे 'रहस्य' सांगण्याचाही प्रयत्न केलेला आहे. या ग्रंथाची दुसरी आवृत्ती १९३० मध्ये दामोदर सावळाराम यंदे यांनी काढली.

केळूसकरांची सर्वांत महत्त्वाची कामगिरी म्हणजे शिवचरित्राचे लेखन ही होय. १९०७ मध्ये हे चरित्र *क्षत्रियकुलावतंस छत्रपति शिवाजी महाराज यांचे चरित्र* या नावाने प्रथम प्रकाशित झाले. मराठीमधील समग्र व साधार असे हे पहिलेच शिवचरित्र म्हणावे लागते. त्यात केळूसकरांमधील इतिहाससंशोधकही दिसून येतो. विशेषतः समर्थ रामदास आणि दादाजी कोंडदेव यांच्या शिवछत्रपतींबरोबर असलेल्या कथित गुरुशिष्यसंबंधाबद्दलच्या रूढ समजुतींना केळूसकरांनी धक्का दिल्यामुळे हा ग्रंथ वादग्रस्त झाला. त्याच्या अनेक मराठी आवृत्त्या तर निघाल्याच पण गुजराती, हिंदी आदी भाषांमध्ये भाषांतरेही झाली. त्याचे इंग्रजी भाषांतर प्रा. नीलकंठ ताकारखाव यांनी 'The Life of Shivaji Maharaj', या नावाने प्रसिद्ध केले (१९२१).

चरित्रकार या नात्याने केळुसकरांचे स्थान वादातीत आहे. तुकाराम, बुद्ध, शिवाजी यांच्यासारख्या ऐतिहासिक विभूतींच्या चरित्रांबरोबरच त्यांनी अर्वाचीन आणि समकालीन परंतु एरव्ही दुर्लक्षित झालेल्या थोर व्यक्तींची चरित्रे लिहिली. *रामचंद्र विठोबा धामणस्कर* (१९०२), *एल्लाप्पा बाळाराम* (१९१४), *गुणाजीराव घुले*, *जनाबाई रोकडे*, *माधवराव रोकडे*, *स्वामी गोविंद जनार्दन बोरकर* यांच्या चरित्रांचा त्यात समावेश होतो. *म्यूर मॅकन्झीचे* चरित्रही त्यांनी लिहिले.

आपल्या वाङ्मयसेवेची सुरुवातच 'इस्राएल' पत्राच्या संपादकत्वाने करणाऱ्या केळूसकरांना, पुढे 'जगद्वृत्त' या साप्ताहिकाचे संपादन करण्याची संधी (१९०७) मिळाली. या साप्ताहिकामधून त्यांनी समाजसुधारणा, अर्थकारण यांच्याबद्दल तर लिहिलेच, परंतु त्यांनी त्यांच्या आवडत्या नीतिशास्त्र या विषयावरील *नीतिबोधमाला*ही चालविली. पुढे ही माला त्यांनी एकूण चार सुमनांत (१९१४ व १९१६) पुस्तकरूपाने प्रकाशित केली. ही चारी पुस्तके त्यांनी श्रीमंत सयाजीरावांना अर्पण केली. विशेष म्हणजे याद्वारे ते मुलांचे मनोरंजनातून नीतिशिक्षण करू शकले. अशा प्रकारे केळूसकरांनी बालवाङ्मयही हताळले. नीतिप्रसारक सभेच्या 'नित्युपदेशक' या मासिकात त्यांनी लिखाण केलेले होतेच.

आरंभी ह्यूमसाहेबांसाठी ज्यूंच्या जुन्या कराराच्या संक्षेपाचे मराठी भाषांतर करणाऱ्या केळूसकरांना पुढे ब्रिटिश बायबल सोसायटीच्या मुंबई शाखेच्यावतीने बायबलचे मराठी भाषांतर करण्याचे काम करावे लागले. ते त्यांनी फारच चांगल्या रीतीने पूर्ण करून सोसायटीची प्रशंसा पदरात पाडली.

केळूसकरांच्या कार्याची दखल मुंबईकरांनी घेतली याचा येथे उल्लेख करायला हवा. ६ ऑक्टोबर, १९३४ रोजी भरलेल्या पहिल्या मुंबई मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदी त्यांची नियुक्ती झाली.

मुंबईतील विशेषतः ब्राह्मणेतर चळवळीशी संबद्ध असलेल्या अनेक सामाजिक संस्थांशी केळूसकरांचा संबंध होता. परंतु त्यांच्यावर कोणीही जातीयवादाचा आरोप करू शकणार नाही, इतकी त्यांची दृष्टी व्यापक होती. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या पूर्ववयात केळूसकरांनी त्यांना अनेक बाबतीत मदत केलेली आहे.

कीर धनंजय, सदानंद मोरे

○ कोणीतरी : पहा रहाळकर, नरहर शंकर

**कोरेकल, यशवंत सदाशिव** : (१२ डिसेंबर, १८८५, हैद्राबाद–मृ. १९५०). कवी व लेखक. कोरेकलांचे उर्दू व हिंदीवर प्रभुत्व होते. यांनी प्रारंभी उर्दूत व नंतर मराठीत काव्यलेखन केले. त्यांचे तीन काव्यसंग्रह प्रसिद्ध आहेत. *काव्यकुसुमकलिका : प्रथम उद्भव* (१९३३), *द्वितीय उद्भव : पुष्पपाकळ्या* (१९३४) व *तृतीय उद्भव : सुमन-सौरभ* (१९३६). त्यांच्या कविता ईश्वरविषयक, अध्यात्मप्रवण व गूढ, उपदेशपर असून अद्वैत वेदान्ताचा प्रभाव त्यावर जाणवतो. एकूण रचना जुन्या धर्तीची व विविध वृत्तांतील आहे.

*विचारवैभव* (१९३८) हा वेदोपनिषदांतील अद्वैततत्त्वासंबंधी विषयाचे परिशीलन करणारा ग्रंथ, *कौस्तुभकिरण* (१९३९) हा लघुकथा व लघुनिबंध यांचा संग्रह आणि *यशोविलास* (सुमारे १९३९-४०) हा, त्यांचे वाङ्मयविषयक विचार, व्याख्याने व परीक्षणे यांचे संकलन करणारा ग्रंथ ही त्यांची अन्य साहित्यनिर्मिती. त्यांच्या लेखनात नीती व सदाचार-संवर्धनाला सर्वाधिक महत्त्व दिलेले आढळते.

उषा टाकळकर, वीना रस्तोगी

**कोलेंकर, दाऊद रेऊबेन** : (ज. १८५८–मृ. ३ नोव्हेंबर, १९१७). बेने–इस्राएली लेखक. हिब्रु व मराठीवर कोलेंकरांचे प्रभुत्व होते. मुंबईच्या अमेरिकन मिशन स्कूलमध्ये शिक्षण. त्यानंतर वडिलांच्या 'सत्यप्रकाश' ह्या पहिल्या इस्राएली नियतकालिकाच्या संपादनात साहाय्य. 'तेरुवा' (१८७८–७९) ह्या नियतकालिकाचे ते बेंजामिन अष्टमकरांसोबत उपसंपादक. त्यांचे लेखन मुख्यतः 'धर्म' या विषयासंबंधी आहे.

*इस्राएली सुंतेचा विधी* (१८९३), *शास्त्राध्ययन माला* (१८९४) (इस्राएली धर्मग्रंथ एकाच वर्षात पढण्याविषयी मार्गदर्शन),

*धर्माचरणव्याख्यान* (१८९४)–(शास्त्राज्ञापालन हेच धर्माचरण असे प्रतिपादन), *पवित्रशास्त्रनियममाला* (१८९६) – ('राम्बी मोझेस मेमोनायडस'च्या मूळ हिब्रूवरून भाषांतरित, शास्त्रातील ६१३ नियम), *ईश्वरी नामोच्चार* (१८९६) – (मूर्तिपूजेचे खंडन व नामस्मरणाची थोरवी). *बेने इस्राएल लोकांची सुधारणा* (१९०९) – (स्त्री शिक्षणाद्वारे समाजसुधारणेचे प्रतिपादन) हे त्यांचे ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

रेचल गडकर, लीला रस्तोगी

**कोल्हटकर, अच्युत बळवंत :** (ज. १ ऑगस्ट, १८७९, वाई – मृ. १५ जून, १९३१, मुंबई). महाराष्ट्रातील एक लोकोत्तर, सव्यसाची, बहुरंगी, बहुढंगी लेखक. पत्रकार, निबंधलेखक, नाटककार आणि कादंबरीकार. वडिलांचे नाव वामनराव, परंतु आईच्या मृत्यूनंतर आपले संगोपन करणाऱ्या चुलत्याचे नाव –बळवंत– हे अच्युतरावांनी पितृस्थानी लावले. मॅट्रिक (१८९४). एलएल.बी. (१९०४). नंतर नागपूर येथे काही काळ वकिली. 'देशसेवक' (नागपूर, १९०६) व *संदेश* (स्थापना – १९१२) इत्यादी वृत्तपत्रांचे संपादक.

विद्यार्थीदशेपासूनच लो. टिळकांच्या 'केसरी'तील लेखनाचे आणि राष्ट्रीय वृत्तीचे त्यांच्यावर संस्कार झाले होते. 'देशसेवक'चे संपादकत्व स्वीकारल्यानंतर १९०८ साली सरकारी अवकृपेमुळे त्यांना दीड वर्षांचा कारावास भोगावा लागला. त्यानंतर मद्रासकडे अज्ञातवासात राहून बी. विश्वनाथन् या टोपण नावाने त्यांनी 'मनोरंजन'मध्ये लेखन केले. १९१२ साली मुंबईला येताच त्यांनी आपले सुप्रसिद्ध *संदेश* हे वृत्तपत्र सुरू केले व आपल्या चतुरस्र, लवचिक, चटकदार लेखनशैलीने मराठी वृत्तपत्रांच्या इतिहासात एका नवीन पर्वाचा आरंभ झाला. तोपर्यंतच्या काळात उच्च मध्यमवर्गीय वातावरणात वावरणाऱ्या वृत्तपत्रसृष्टीला त्यांनी बहुजनाभिमुख केले. आपल्या कल्पक मांडणीतून समाजात वृत्तपत्रवाचनाची गोडी निर्माण केली. पुढील काळात लोकप्रिय झालेल्या चटकदार निबंधशैलीला प्रवर्तित करण्यात व ही शैली प्रिय करण्यात अच्युतराव कोल्हटकरांचा फार मोठा वाटा आहे. हलक्याफुलक्या लेखनशैलीप्रमाणेच गंभीर, गहिऱ्या, काव्यात्म शैलीकरिताही ते प्रसिद्ध आहेत. १९१८ साली सरकारने जबर जामीन मागितल्यामुळे *संदेश* बंद करावा लागला. *संदेश*प्रमाणेच *मेसेज* हे इंग्रजी वृत्तपत्र आणि *संजय*, *चाबुकस्वार* इत्यादी अनेक मराठी वृत्तपत्रेही त्यांनी काही काळ चालविली. 'इंदुप्रकाश' या पत्राचे संपादनही त्यांनी काही काळ (१९२१) केले. तथापि, *संदेश*कार म्हणून त्यांना मिळालेली लोकप्रियता अबाधित राहिली.

'संदेशचा फुलबाग', 'संदेश दरबारचा पदवीदान समारंभ', 'संदेश आर्ट गॅलरी', 'चहा, चिवडा आणि चिरूट' यांसारखी चित्तवेधक सदरे देण्याची, मोठ्या अक्षरांचे मथळे देण्याची प्रथा प्रथम *संदेश*ने पाडली. तत्पूर्वीच्या मराठी वृत्तपत्रातील मजकूर गंभीरपणे लिहिला जाई. अच्युतरावांनी त्यात रंजकता आणली. 'नाटकमंडळ्यांचे गॅझेट', 'बेटा गुलाबच्या कानगोष्टी', 'वत्सला वहिनींची पत्रे' इत्यादी मथळ्याखाली प्रसिद्ध होणाऱ्या मजकुरामुळे *संदेश*मध्ये वैचित्र्य आणले. चुरचुरीत बातमीपत्रे व थोरामोठ्यांच्या लहानमोठ्या हालचालींची माहिती खुसखुशीत पद्धतीने देण्याची पद्धती मराठी वृत्तपत्रसृष्टीत *संदेश*मुळे सुरू झाली व सर्वसामान्य वाचकांना त्याने वृत्तपत्रवाचनाची चटक लावली. 'वाचनीय' व 'मननीय' वृत्तपत्र त्यांच्या वेधक शैलीमुळे रंजक झाले.

मराठी वृत्तपत्रसृष्टीत आपल्या नेमकेपणाचा ठसा उमटविणाऱ्या कोल्हटकरांचे निबंधलेखनही तसेच वैशिष्ट्यपूर्ण व वेगळे आहे. स्वातंत्र्यप्राप्ती, धर्मप्रीती आणि स्वदेशप्रीती यांतून त्यांचे सर्वच लेखन स्फुरलेले आहे. वर्ण्य विषयाचे वा व्यक्तीचे हुबेहूब वर्णन करण्याचे त्यांचे कौशल्य अजोड होते. कल्पकता, सरसता, मार्मिकता, रसिकता, सहृदयता व गुणग्राहकता अशा विविध गुणांचा संगम त्यांच्या निबंधलेखनातून आढळतो. कोल्हटकर हे वृत्तीने राजकारणी असल्याने त्यांच्या अनेक निबंधांतून प्रतिस्पर्ध्यांवर टीका केलेली आढळते व ही टीका करताना चेष्टा, उपहास, उपरोध इत्यादींचाही वापर ते करतात. त्यामुळे या पत्रांतून प्रतिपक्षावर केलेली त्यांची टीका अत्यंत वाचनीय झाली आहे.

नाटक व कथा-कादंबरी हे साहित्यप्रकारही त्यांनी हाताळले आहेत. त्यांनी स्वतःच 'नारिंगी निशाण मंडळी' (१९१८) ही एक नाट्यसंस्था उभारून त्या संस्थेसाठी नाटके लिहून त्यात स्वतः अनेक भूमिकाही केल्या. *स्वामी विवेकानंद* (१९१४), *नारिंगी निशाण* (१९१७), *सौख्यसोपान*, *मस्तानी* (१९२६), *ताई तेलीण*, *बट्ट्याबोळ*, *चांदबिबी*, *देवी अहिल्या*, *तिने काय सांगितले !* *नूतन चंद्र* ही दहा व *इरश मेलं पुणे* हे एक अपूर्ण, ही त्यांची नाटके. *इंग्रजांचा पराभव* (१९२६), *लोकमान्यांच्या समाधीपुढे* (भाग १, १९२६) या पूर्ण व *साधु की सैतान*, *चोरून चुंबन*, *नर्सची करुण कहाणी* या अपूर्ण कादंबऱ्या; *पहिली रात्र*, *दुसरी रात्र*, *विस्कटलेली वेणी*, *रंगीला रसूल*, *गुलाबी विधवा* (१९३०) इत्यादी कथा प्रसिद्ध आहेत. *पहिली रात्र*, *दुसरी रात्र*, *गुलाबी विधवा*, *चोरून चुंबन* इत्यादी शीर्षकांवरून ही पुस्तके जरी रंगेल व चावट वाटण्यासारखी असली तरी ती तशी नसून, स्वाभिमान व देशाभिमान शिकविणाऱ्या उदात्त तत्त्वांचे आविष्करण त्यांनी या पुस्तकांद्वारे केले आहे. 'उषा' मासिकातील त्यांची पुस्तक परीक्षणे, 'मराठी काव्याची प्रभात' यांसारखे शाहिरी वाङ्मयावरील निबंध, त्याचप्रमाणे वडील वामनराव कोल्हटकर ह्यांच्यावरील लेख हेही अन्य उल्लेखनीय साहित्य. त्यांच्या विविध लेखांचा संग्रह, 'अच्युतराव कोल्हटकर स्मारक ग्रंथ', भाग १, २ व ३ (१९३३-३४) या नावाने त्यांचे शिष्य अनंत हरि गद्रे ह्यांनी प्रसिद्ध केला आहे.

वि. ह. कुलकर्णी, म. ना. लोही

**संदर्भ :** प्रा. वि. ह. कुलकर्णी, 'अ. ब. कोल्हटकर व्यक्ती आणि वाङ्मय'.

**० कोल्हटकर, गजानन त्र्यंबक :** पहा देसाई, गजानन त्र्यंबक

**कोल्हटकर, चिंतामण गणेश :** (ज. १२ मार्च, १८९१, सातारा – मृ. २३ नोव्हेंबर, १९५९, मुंबई). नट, नाट्यदिग्दर्शक, नाट्यस्मृतिलेखक. चिंतामणरावांचे ९ वी पर्यंतचे शिक्षण साताऱ्याच्या 'न्यू इंग्लिश स्कूल'मध्ये झाले. त्याच सुमारास 'शाहूनगरवासी' मंडळीची नाटके पाहून गणपतराव जोशींच्या अभिनयाने ते प्रभावित झाले व त्यांच्याचसारखे व्हायचे म्हणून, शालेय शिक्षण सोडून ते नाट्यकलेकडे वळले. १७ ऑगस्ट, १९११ रोजी त्यांना 'महाराष्ट्र नाटक मंडळी'त प्रवेश मिळाला. त्याच वेळी त्यांचा परिचय राम गणेश गडकऱ्यांशी झाला व त्यांनी गडकऱ्यांचे शिष्यत्व पत्करले. किर्लोस्कर नाटक मंडळीत मा. दीनानाथ आणि कोल्हटकर हे प्रमुख नट होते.

तात्यासाहेब परांजपे, दीनानाथ मंगेशकर, दिनकर ढेरे, कृष्णराव कोल्हापुरे आदींच्या सहकार्याने त्यांनी १९१८ मध्ये 'बलवंत संगीत मंडळी' स्थापिली व १९३३ पर्यंत ती चालविली. 'भावबंधना'तील 'धनःश्याम'च्या भूमिकेने त्यांना 'पट्टीचा अभिनयकुशल प्रभावी नट' म्हणून अलोट प्रसिद्धी मिळवून दिली.

पुढे १९३३–३४ नंतर त्यांनी 'संगीत मंडळी'चे रूपांतर 'बलवंत पिक्चर्स'मध्ये केले पण त्यात ते अपयशी ठरले. तरीही, खचून न जाता ते परत नाट्यदिग्दर्शनाकडे वळले.

अहमदनगर (१९४६) व कोल्हापूर (१९४९) येथे भरलेल्या मराठी नाट्यसंमेलनाचे ते अध्यक्ष होते. अभिनयकुशल चिंतामणराव हे नाट्यशास्त्र व नाट्यवाङ्मयाचे मार्मिक अभ्यासक व चिकित्सकही होते. त्यांच्या *बहुरूपी* (१९५७) ह्या आत्मचरित्रातून ह्याचा प्रत्यय

घेतो. प्रस्तुत चरित्रातून स्वतःच्या जीवनकथेबरोबरच, ज्या नाटकी जगात ते दीर्घकाळ वावरले, त्याचेही यथार्थ दर्शन 'स्व'ला दूर ठेवून त्यांनी अत्यंत मार्मिकपणे व प्रामाणिकपणे घडविले आहे. त्यांच्या या ग्रंथाला साहित्य अकादमीचे पारितोषिक मिळाले.

गं. दे. खानोलकर, लीना रस्तोगी

संदर्भ : विश्वस्थ शारदा–खंड दुसरा-मराठी रंगभूमी.

**कोल्हटकर, महादेवशास्त्री गोविंद :** (ज. १८२२ – मृ. १८६५). नाटककार व ग्रंथकार. ह्यांचे मूळ गाव नेवरे (जि. रत्नागिरी). पुणे पाठशाळेत ज्योतिष-व्याकरणादी शास्त्राध्ययन झाल्यावर, सरकारी शिष्यवृत्तीवर ते पाच वर्षे कँडीसाहेबांच्या हाताखाली राहिले. तेथेच इंग्रजी शिकून ते विद्याखात्यात डेप्युटी इन्स्पेक्टर झाले. १८६१ साली मराठीचे प्रोफेसर म्हणून नेमणूक.

*कोलंबसाचा वृत्तांत* (१८४९), (रॉबर्टसनच्या पुस्तकावर आधारित); चेंबर्सच्या ग्रंथावरून लिहिलेले *पदार्थविज्ञानशास्त्र* (१८६१); *ऑथेल्लो* (शेक्सपियरच्या नाटकाचा अनुवाद (१८६७, नवीन आवृत्ती १९६२); नव्या शिक्षणक्रमासाठी इंग्रजी धर्तीवर लिहिलेली चुटकेवजा कवितांची *प्राकृत कवितेचे पहिले पुस्तक* व *मराठी कवितेचे दुसरे पुस्तक* ही पुस्तके आणि ज्ञानप्रसारक सभेतर्फे पदार्थविज्ञानावर त्यांनी दिलेली व 'ज्ञान प्रसारक' मासिकातून क्रमशः प्रसिद्ध झालेली सहा व्याख्याने ही त्यांची ग्रंथसंपदा.

त्यांचे *ऑथेल्लो* हे इंग्रजीतून मराठीत भाषांतरित झालेले पहिले नाटक. त्यांना 'ग्रंथकार' म्हणून मान्यता ह्या नाटकामुळेच मिळाली. कोल्हटकरांच्या या भाषांतराच्या उत्कृष्टपणाविषयी विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी 'भाषांतर' या निबंधात चांगले उद्‌गार काढले आहेत. मराठी वाचकांना शेक्सपियरची प्रथम ओळख कोल्हटकरांच्या भाषांतरामुळेच झाली.

उषा टाकळकर, लीना रस्तोगी

**कोल्हटकर, यशवंत व्यंकटेश :** (ज. १८७३ – मृ. ४ ऑगस्ट, १९३७). अध्यात्म व तत्त्वज्ञानपर ग्रंथांचे लेखक. शिक्षण : बी.ए., एल्‌एल्.बी. व्यवसाय : प्रथम शिक्षक व नंतर सांगली संस्थानात नोकरी. तेथेच न्यायाधीश म्हणून नियुक्ती. कोल्हटकर हे शब्द प्रामाण्यवादी, निवृत्तीमार्गी दत्तसंप्रदायी होते.

*गीतार्थ अथवा रहस्यखण्डन* (१९१६) हा त्यांचा पहिला ग्रंथ. लोकमान्यांच्या गीतारहस्यातील प्रवृत्तिमार्गाचा पुरस्कार व शंकराचार्य-प्रणीत निवृत्तिमार्गाचे खण्डन ह्या गोष्टी न पटल्यामुळे, हा ग्रंथ निर्माण झाला. *श्रीमद्‌भागवतदर्शन अथवा श्रीमद्‌भागवताचा उपसंहार* (१९२१) या ग्रंथाला ह. भ. प. पांगारकर ह्यांची प्रस्तावना लाभली असून धर्मग्रंथाकडे चिकित्सक दृष्टीने न पाहता भाविकतेने पाहवे असे त्यांनी प्रतिपादिले आहे. *ऋग्वेदातील गूढविद्या* (१९३५) हे वेदमूर्ती किंजवडेकरांनी कुरुंदवाडी केलेल्या यज्ञाच्या निमित्ताने कोल्हटकरांनी कुरुंदवाड येथे दिलेल्या सहा व्याख्यानांचे संकलन होय. *श्री निरंजन रघुनाथांचे ग्रंथ* (१९३५) ह्या ग्रंथात श्री निरंजन रघुनाथ (इ. स. १७८२ – १८५५) ह्या दत्तसांप्रदायी साक्षात्कारी सत्पुरुषाचे आध्यात्मिक गद्यपद्य लेखन संग्रहित केले आहे.

याशिवाय, 'विश्ववृत्त', 'रत्नाकर' आदी तत्कालीन मासिकांतूनही त्यांचे अनेक लेख प्रसिद्ध झाले. त्यांच्या लेखनाचा प्रारंभ, पाश्चात्त्य व पौर्वात्य दर्शनाच्या तौलनिक अभ्यासावर आधारित 'विद्याभ्यास' नामक लेखाद्वारे झाला होता.

प्र. नी. नवरे, लीना रस्तोगी

**कोल्हटकर, श्रीपाद कृष्ण :** (ज. २९ जून, १८७१, नागपूर – मृ. १ जून, १९३४, पुणे). कवी, नाटककार, विनोदी लेखक, निबंधकार, साहित्यसमीक्षक आणि भारतीय ज्योतिर्गणिताचे अभ्यासक व विवेचक. प्र. श्री. कोल्हटकरांचे वडील. प्राथमिक व दुय्यम शिक्षण अकोला येथे व महाविद्यालयीन शिक्षण पुणे येथे. १८८८ मध्ये मॅट्रिक. बी.ए. १८९१ मध्ये. एल्‌एल्.बी. (१८९७) मुंबई येथे. १८९८ पासून अकोला, तेल्हारा, खामगाव येथे वकिलीचा व्यवसाय.

साहित्य, संगीत आणि सुधारकप्रणाली यांचा वारसा श्रीकृष्णांना चुलत आजोबा (महादेवशास्त्री कोल्हटकर) व चुलते (वामनराव कोल्हटकर) यांच्याकडून मिळाला. शारीरिक व्यंगावर (वयाच्या दहाव्या वर्षी अर्धांगवायूचा आलेला झटका) मात करण्यासाठी मानसिक संपन्नता निर्माण करण्याची उत्पन्न झालेली ईर्ष्या, त्यावेळचे सुप्रसिद्ध नाटककार शंकर मोरो रानडे यांच्या स्वतंत्र व अनुवादित नाटकांचे वाचन, 'निबंधमाला' इत्यादींचे वाचन, सहाध्यायी न. चिं. केळकरांचा सहवास, शाकुंतल-सौभद्राचे पाहिलेले प्रयोग, या सर्वांतून त्यांचे नाट्यप्रेम तर वाढीस लागलेच, पण आपण नाटककार व्हावे, या महत्त्वाकांक्षेने त्यांच्या मनात घर केले.

*वीरतनय* (१८९८), *मूकनायक* (१९०१), *गुप्तमंजूष* (१९०१), *मतिविकार* (१९०७), *प्रेमशोधन* (१९११), *वधूपरीक्षा* (गद्य १९१४, संगीत–१९२८), *सहचारिणी* (१९१८), *जन्मरहस्य* (१९१८), *परिवर्तन* (१९२३), *शिवपाविव्य* (१९२४), *श्रमसाफल्य* (१९२९), *मायाविवाह* (१९४६–युगवाणी मासिकातून प्रसिद्ध) ही श्रीपाद कृष्णांची नाट्यसंपदा. यांतील *शिवपाविव्य* हे इतिहास-विषयावर लिहिलेले नाटक वगळता, इतर सर्व नाटके सामाजिक किंवा काल्पनिक विषयावर आधारलेली आहेत. कोल्हटकरपूर्व काळात किर्लोस्कर–देवल यांची अमदानी होती. पण त्यांची नाटके पौराणिक थाटाची होती. कोल्हटकरपूर्व काळातील नाटकावर संस्कृतचा पगडा होता. तर कोल्हटकरांवर शेक्सपियर, मोलियर, मुंबईची पारशी–उर्दू रंगभूमी यांचा प्रभाव होता. त्यांच्या नाटकांचे कथाभाग स्वयंकल्पित होते. श्रीपाद कृष्णांनी मराठी नाट्यसृष्टीला स्वतंत्र व रहस्यपूर्ण कथानके, कोटिबाज विनोद आणि उर्दू–गुजराती नाट्यमंडळांच्या धर्तीचे संगीत यांची जोड मिळवून दिली. मात्र यांतील काही नाटके प्रायोगिकदृष्ट्या अयशस्वी ठरली.

नाट्यक्षेत्राच्या तुलनेने टीकेच्या क्षेत्रातील श्रीपाद कृष्णांची कामगिरी विशेष लक्षणीय आहे. 'विक्रमशशिकला' नाटकाच्या परीक्षणापासून जवळजवळ ३८ वर्षे त्यांनी वेगवेगळ्या स्वरूपाचे निबंधलेखन केले. या काळातील (१८९२ ते १९३०) यांच्या लेखांचा संग्रह *श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांचा लेखसंग्रह* (प्र. आ. १९३२, द्वि. आ. दोन खंडांत १९७२) प्रसिद्ध झाला आहे. या निबंधांची संख्या पन्नास इतकी आहे. त्यापैकी समीक्षणात्मक लेखांची संख्या २३ आहे. 'कोल्हटकर लेखसंग्रहा'तील त्यांचे लेख, त्यांची विद्वत्ता, त्यांचा व्यासंग आणि त्यांची साहित्यविषयक प्रश्नासंबंधींची आस्था याचे चांगले दर्शन घडवितात. साधे ग्रंथपरीक्षण करीत असतानाही कोल्हटकरांचा कल साहित्यसिद्धान्ताची मांडणी करण्याकडे होता. वाङ्मयतत्त्वमीमांसक व वाङ्मयसमीक्षक या दोन्ही भूमिका त्यांनी यशस्वीपणे पार पाडलेल्या दिसतात. आधुनिक टीकाशास्त्राची पायाभरणी करण्याचे श्रेय श्रीपाद कृष्णांकडेच जाते.

मराठी साहित्यात विनोदाचे स्वतंत्र दालन उघडण्याचा मानही श्रीपाद कृष्णांकडे जातो. त्यांचे वेळोवेळी प्रसिद्ध झालेले विनोदी लेख *सुदाम्याचे पोहे* (१९१०) या नावाने संग्रहित झाले आहेत. श्रीपाद कृष्णांना मराठी साहित्यातील विनोदप्रचुर स्फुटलेखांचे आचार्यपद प्राप्त झाले, ते या पुस्तकामुळे. पुरोगामी आधुनिक दृष्टिकोन, कल्पकता कोटिबाजपणा या गुणविशेषांमुळे रा. ग. गडकरी, भा. वि. वरेरकर, ग. त्र्यं. माडखोलकर, वि. स. खांडेकर तसेच गं. दे. खानोलकर यांसारखी अव्वल दर्जाची लेखक मंडळी त्यांना गुरुस्थानी मानीत.

या विनोदी लेखांमागील कोल्हटकरांचा हेतू मनोरंजनाबरोबरच समाजाला स्वतःचे अंतर्बाह्य रूप पाहावयास मिळावे, हिंदुसमाजातील धार्मिक रूढींवर विदारक प्रकाश टाकता यावा व लोकांना आत्मपरीक्षणास प्रवृत्त करावे हा होता. या सर्व विनोदी लेखांत अतिशयोक्तीचा कल्पकतेने केलेला वापर, तीक्ष्ण निरीक्षणशक्ती, असामान्य भाषाप्रभुत्व इ. गुण दिसून येतात. सुदामा, बंडूनाना, पांडूतात्या ही लक्षणीय पात्रे त्यांनी निर्माण केली व त्यांना निरनिराळ्या समाजव्यवहारातून हिंडवून आणले. १९२२ साली 'अरविंद' मासिकात प्रसिद्ध झालेला 'धर्मान्तर' हा या विनोदी लेखमालेतील शेवटचा लेख.

टीका, नाट्य, विनोद या क्षेत्रांप्रमाणेच कविता, कथा, कादंबरी, आत्मवृत्त, ज्योतिषशास्त्र या क्षेत्रांतही त्यांनी लक्षणीय लेखन केले. *भारतीय ज्योतिर्गणित* (१९१३) हा त्यांचा ग्रंथ ज्योतिषशास्त्रावरील महत्त्वपूर्ण ग्रंथ मानला जातो. या ग्रंथामुळेच त्यांना सांगलीच्या पंचांगसंमेलनाच्या अध्यक्षपदी (१९२०) लोकमान्य टिळकांनी निवडले. या आपल्या ग्रंथात त्यांनी भारतीय ज्योतिर्गणिताच्या गौरवाबरोबरच त्यातील न्यूनही दाखवले. प्राचीन भारतीय ज्योतिर्गणित आर्वाचीन पाश्चिमात्य गणिताच्या आधारे मांडून ते स्पष्ट, सुबोधपणे समजावून देण्याचे कार्य त्यांनी केले.

*गीतोपायन* (१९२४) हा त्यांचा सोळा कवितांचा एक चिमुकला संग्रह. त्यांचे 'महाराष्ट्रगीत' हे अतिशय लोकप्रिय ठरले. श्रीपाद कृष्णांच्या *चार लघुकथा* (१९३१) उल्लेखनीय आहेत. 'गाणारे यंत्र', 'पति हाच स्त्रीचा अलंकार', 'संपादिका' आणि 'गरीब बिचारे पाडस' या त्यांच्या चार कथा. *दुटप्पी की दुहेरी* (१९२५) ही स्वभावरेखन व मनोविश्लेषणावर भर देणारी त्यांची कादंबरी. राजकीय प्रश्नांची चर्चा हा या कादंबरीचा महत्त्वाचा विशेष. *श्यामसुंदर* ही कादंबरी (१९३५) त्यांनी अस्पृश्योद्धाराच्या विषयावर लिहिली. कोल्हटकरांचे आत्मचरित्र–*आत्मवृत्त* (१९३५) हे कोल्हटकरांचे व्यक्तिमत्त्व व त्यांच्या नाटकांचे जन्मरहस्य समजून घेण्याच्या दृष्टीने उपयुक्त वाटते.

१९१७ साली मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय आणि १९१८ मध्ये ठाणे मराठी ग्रंथसंग्रहालय या संस्थांनी आपल्या वार्षिक समारंभाचे अध्यक्षपद देऊन श्रीपाद कृष्णांचा गौरव केला. द्वितीय मराठी कविसंमेलन (पुणे, मे १९२२), विदर्भ साहित्य संमेलन (अमरावती, १९२३) आणि महाराष्ट्र साहित्यसंमेलन (पुणे, १९२७) यांचे अध्यक्षपदही यांनी भूषविले होते.

गं. दे. खानोलकर, के. ए. पोतदार, कमलेश

संदर्भ : (१) नाटककार कोल्हटकर–द. रा. गोमकाळे. (२) श्रीपाद कृष्ण : वाङ्मयदर्शन–वा. ल. कुळकर्णी. (३) श्रीपाद कृष्ण कोल्हटकर–व्यक्तिदर्शन : ग. त्र्यं. माडखोलकर. (४) 'युगवाणी' (श्रीपाद कृष्ण कोल्हटकर विशेषांक), जून १९७०. (५) 'आलोचना' (श्रीपाद कृष्ण कोल्हटकर विशेषांक), नोव्हें. डिसें. १९७१. (६) महाराष्ट्र साहित्य पत्रिका (विशेषांक), जुलै, सप्टेंबर १९७१. (७) 'श्रीपादांची कलावती वाणी'–गो. म. कुलकर्णी (सादपडसाद). (८) साहित्यसिंह–गं. दे. खानोलकर. (९) श्रीपाद कृष्ण कोल्हटकर, मनोहर लक्ष्मण वराडपांडे. (१०) बहुरूपी–चिंतामणराव कोल्हटकर.

० **कोल्हापूरकर :** पहा शाहू, छत्रपती
० **कोंडिराम :** पहा वळंगकर, गोपाळबाबा

**कोसंबी, धर्मानंद दामोदर :** (ज. ९ ऑक्टोबर, १८७६, सांसबाळ, गोवे–मृ. ४ जून, १९४७, सेवाग्राम). बौद्धधर्म व तत्त्वज्ञान या विषयांचे आंतरराष्ट्रीय कीर्तीचे लेखक. पुणे, ग्वाल्हेर आणि काशी येथे संस्कृताध्ययन केल्यानंतर सीलोन येथे भिक्षुवृत्तीने राहून संस्कृत, पालिभाषा व बौद्ध वाङ्मयाचे अध्ययन. कलकत्ता व पुणे येथे काही काळ पालीचे प्राध्यापक. गुजरात विद्यापीठाच्या पुरातत्त्व मंदिरात 'पालिभाषाचार्य' म्हणून अध्ययन, संशोधन व अध्यापन.

प्रा. कोसंबी ह्यांच्या व्यक्तिमत्त्वाच्या विकासात व कार्यात बुद्धजीवन, बौद्धधर्मतत्त्वज्ञान, मार्क्सवादी विचारप्रवाह आणि गांधीप्रणीत अहिंसा, सत्याग्रह व अपरिग्रह यांचे अपूर्व रसायन दिसून येते. *बुद्ध, धर्म आणि संघ* (१९१०) हा त्यांचा पहिला छोटासा ग्रंथ. या पुस्तकातून, त्यांच्या व्यक्तिमत्त्वातील भाविकता, श्रद्धावृत्ती यांच्या बरोबरीने त्यांचा बुद्धिवादी व चिकित्सक संशोधकीय दृष्टिकोन प्रकट झाल्याचे आढळते. *बुद्धलीला सारसंग्रह* (१९१४) हा त्यांचा त्रिखंडात्मक ग्रंथ. प्रथम खंडात जातक कथांच्या आधारे बुद्धाचे पूर्वजन्मातील चरित्र, दुसऱ्या खंडात बुद्धाचे समग्र चरित्र आणि तिसऱ्या खंडात त्यांच्या उपदेशाचे दिग्दर्शन आलेले आहे. *भगवान बुद्ध* (१९४०) हा त्यांचा बुद्धचरित्रपर ग्रंथ. त्यातून त्यांनी तत्कालीन सामाजिक, धार्मिक व राजकीय इतिहासावरही प्रकाश टाकला आहे. *बौद्ध संघाचा परिचय* (१९२६) हा विनयपिटक व त्रिपिटक यांच्या अट्ठकथांवर आधारित असा ग्रंथ असून तोही त्रिखंडात्मक आहे. समाधिमार्ग (१९२५) या ग्रंथात बुद्धाने पुरस्कारिलेल्या अष्टांगिक मध्यम मार्गाचे विवेचन बुद्धघोषविरचित 'विसुद्धिमग्ग' या पालिग्रंथाच्या आधारे केले आहे. *सुत्तनिपाताचे भाषांतर* (१९५५) ह्या ग्रंथात मूळ संहिता, शुद्धपाठ, इतर पाठभेद स्पष्टीकरणात्मक टीका यांचा समावेश आढळतो. *पार्श्वनाथाचा चातुर्यामधर्म* (१९४७) या ग्रंथात पार्श्वनाथाने प्रवर्तित केलेल्या चातुर्यामधर्मांचा उद्गम व विकास यांचे, तसेच, जैन, बौद्ध हिंदु आदी सर्व धर्मांचे गुणदोषविवरणपूर्वक विवेचन आलेले आहे. *हिंदी संस्कृति आणि अहिंसा* (१९३५) या पंचखंडात्मक पुस्तकात भारतीय संस्कृतीच्या संदर्भात समाजवाद, गांधीवाद व बुद्ध तत्त्वज्ञान यांचा समन्वय साधणारे नव्या मानवधर्मांचे स्वतःचे सामाजिक तत्त्वज्ञान त्यांनी मांडले आहे. भारतीय संस्कृतीचा व्यापक आढावा घेणारे व मूलग्राही विवेचन करणारे पुस्तक म्हणून हे महत्त्वाचे आहे. *बोधिसत्त्व* (१९४७) हे नाटक व *निवेदन* (१९२४) 'हे १९११ पर्यंत' या काळापर्यंतचे आत्मचरित्र प्रसिद्ध आहे. पूर्वायुष्यातील घटना, मनावरील संस्कार यांचे अंतर्मुख वृत्तीने व प्रांजळपणे केलेले निवेदन असे या आत्मचरित्राचे स्वरूप आहे.

श्री. गं. मोडे, के. ए. पोतदार

संदर्भ : (१) बा. द. सातोस्कर, 'बौद्ध पंडित धर्मानंद कोसंबी', गोमंतक २९–६–६९. (२) नरहर कुरुंदकर, 'प्रो. कोसंबी आणि भगवद्गीता', 'मराठवाडा', (दिवाळी) १९६८. (३) मधुकर कासारे, 'धर्मानन्द कोसंबी' अस्मितादर्श, आक्टो., नोव्हें., डिसें. १९७६.

**खरे, काशिनाथ त्र्यंबक :** (ज. १८३०–मृ. २८ सप्टेंबर, १८९८). वृत्तपत्रीय लेखक व ग्रंथकार. पुण्यातील 'सार्वजनिक सभा' या सुप्रसिद्ध संस्थेतील एक महत्त्वाचे कार्यकर्ते. 'सार्वजनिक काका' वासुदेव गणेश जोशी ह्यांचे सहकारी.

ह्यांचे लेख 'सुधारक' व 'ज्ञानप्रकाश' या वृत्तपत्रातून प्रसिद्ध झाले आहेत. *स्थानिक स्वराज्य, संक्षिप्त माहिती* (१८८२), *हिंदुस्थानातील शेतकऱ्यांची स्थिती व शेतकीची कामे* (१८८२), *धकहृत्कला विवेचन* (१८८७), *मध्यप्रदेशाची संक्षिप्त माहिती* (१८९१), *हिंदु आणि मुसलमानांत होणारे तंटे व ते बंद करण्याविषयी विनंती* (निबंध, १८९५) या पुस्तक–पुस्तिकांचे लेखक, स्वातंत्र्यपूर्वकालातील समाजाभिमुख वृत्तीचे एक महत्त्वाचे लेखक.

उषा टाकळकर, अंजली कुलकर्णी

**खरे, गणेश सखाराम :** (ज. २१ ऑगस्ट, १८५४, गुर्लहोसूर, कर्नाटक.–मृ. १० नोव्हेंबर, १९२२, पुणे). शिवकालीन जंत्रीचे कर्ते, गणितज्ञ व ज्योतिर्विद. १८७७ साली ओव्हरसीयरची परीक्षा प्रथम क्रमांकाने उत्तीर्ण, इंजिनिअरिंग खात्यात नोकरी.

ह्यांची इंजिनिअर लोकांना उपयोगी पडणारी *अर्थ वर्क टेबल्स*ची-दोन पुस्तके आणि 'कालजचा तलाव' व 'खानदेशातील बंधारे' हे संशोधनपर लेख प्रसिद्ध आहेत. शं. बा. दीक्षित यांच्या 'ज्योतिर्विलास अथवा रात्रीची दोन घटका मौज' या पुस्तकातील नक्षत्रपट खऱ्यांनी तयार केला. कृष्णाजी बल्लाळ देवल यांच्या संगीतशास्त्रावरील सर्व निबंधातील गणितविषयक चर्चा व श्रुतीविषयक योजना खऱ्यांनी तयार केल्या. गणिताच्या व्यासंगामुळेच इतिहाससंशोधकांना उपयुक्त ठरणाऱ्या दीडशे वर्षांच्या शिवकालीन जंत्रीचे काम त्यांनी वयाची साठी उलटल्यावर पूर्ण केले. त्यापैकी नव्याण्णव वर्षांची जंत्री (शके १५५१ ते शके १६४९) पुण्याच्या भारत इतिहास संशोधक मंडळाने *खरे जंत्री अथवा शिवकालीन संपूर्ण शकावली* (१९२३) या नावाने प्रसिद्ध केली. यापूर्वी प्रभाकर मोडक यांनी शके १६५० पासूनची अलिकडची जंत्री तयार केली होती. तत्पूर्वीच्या शिवकालीन प्रसंगांचा कालनिर्णय करण्याचे कोणतेही साधन अभ्यासकांना उपलब्ध नव्हते. खऱ्यांच्या जंत्रीमुळे एक काटेकोर व सुलभ असे कालनिर्णयाचे साधन अभ्यासकांना लाभले. गणेश देवज्ञांचा 'तिथिचिंतामणी', केरुनाना छत्रे यांचे 'ग्रहसाधनांचे कोष्टक', ज्योतिर्गणितविषयक ग्रंथ आदींच्या साह्याने खऱ्यांनी या जंत्रीत घटकापळांची नोंद केली आहे. वेळोवेळी पिल्ले जंत्रीशी ताडून ती पक्की केली आहे. या जंत्रीची रचना सोपी व सरळ असल्याने सर्वसामान्य वाचकाला कोणतेही गणिती हिशेब करावे लागत नाहीत. शके १५५१ ते १६४९ पर्यंतच्या ९९ वर्षांच्या तिथी (घटका–पळांसह) मुसलमानी व इंग्रजी महिने व तारखा यात दिल्या आहेत. ही जंत्री शालिवाहन शकानुवर्ती असली तरी शकाबरोबर इसवी सन, सुहूरसन, राजशक, जुलुसी सन, फसली सन यांचेही आकडे जाड ठशात पृष्ठाच्या शिरोभागी छापले आहेत.

उषा टाकळकर, सुशीला पाटील

**खरे, गोविंद नारायण : ० दर्भ :** (ज. १८७३ – मृ. २९ नोव्हेंबर, १९४१). कथालेखक. आरंभी सदर्न मराठा रेल्वेत स्टेशन मास्तर. मिरज येथे वास्तव्य. 'दर्भ' या टोपण नावाने 'करमणूक', 'लोकमित्र', 'रत्नाकर', 'चित्रमयजगत्' या नियतकालिकांतून ह्यांनी कथा लिहिल्या. *आंधळ्याची काठी, आत्मघात, घडीचा पंखा* (१९१५), *महाभारताची नायिका सती द्रौपदी* (१९१५), *दंभकथा* (१९३५) ही यांची पुस्तके प्रसिद्ध. यांच्या कथांतून तत्कालीन देशकालपरिस्थिती, इंग्रजी राज्य, भारतीय समाज व राजकारण यासंबंधीचे विचार व्यक्त झाले आहेत. कथा लिहिताना स्वसंस्कृतीविषयी स्वाभिमान निर्माण करून राष्ट्रीय वृत्तीची दीक्षा द्यावी, या बोधवादी दृष्टीने त्यांनी इतिहासाचा आणि पुराणांचा आधार घेतला. त्यांच्या अनेक कथा म्हणूनच प्रतीकात्मक झाल्या आहेत. तत्कालीन वाङ्मयात क्वचित दिसणारा विनोद खऱ्यांच्या कथांतून बऱ्याचदा दिसतो. तत्पूर्वीच्या अद्भुतरम्य वातावरणातून मराठी कथा बाहेर पडत असल्याच्या खुणा खऱ्यांच्या कथांतून आढळतात.

हरिश्चंद्र बोरात, सुशीला पाटील

**खरे, वासुदेव वामनशास्त्री :** (ज. ५ ऑगस्ट, १८५८, गुहागर, जि. रत्नागिरी – मृ. ११ जून, १९२४). कवी, नाटककार व इतिहास संशोधक, शिक्षण : सातारा व पुणे येथे. मिरज हायस्कूलमध्ये अध्यापक. लहानपणीच मोरोपंत, वामनपंडित, मुक्तेश्वर या प्राकृत कवींची कविता यांनी मुखोद्गत केली. ते स्वतः काव्यरचना करीत. कौमुदी, तर्कसंग्रह, काव्ये यांचा अभ्यास व 'मनोरमा', 'शब्दरत्न' या व्याकरणग्रंथांचे अध्ययन. १८७६ च्या दुष्काळात 'महाराष्ट्र मित्र' या साप्ताहिकाचे सर्व संपादकीय लेख व्यवस्थापक बाळिंबे यांनी खऱ्यांकडून लिहून घेतले.

१८८१ ते १८९१ या दहा वर्षांच्या काळात तेव्हाच्या 'आर्यमित्र', 'निबंधचंद्र', 'काव्यरत्नावली' या नियतकालिकांतून शास्त्रीबुवांचे लेख, कविता, परीक्षणे प्रसिद्ध झाली. कोल्हापूरच्या राजाराम कॉलेजातील विद्यार्थ्यांसाठी *गुणोत्कर्ष* (१८८४) हे ऐतिहासिक गद्य नाटक त्यांनी लिहिले व ते अतिशय लोकप्रिय ठरले. दोन वर्षांत त्याच्या तीन आवृत्त्या निघाल्या. *समुद्रकाव्य* (१८८४), *यशवंतराय महाकाव्य* (१८८८) ही यांची दोन काव्ये. *यशवंतराय* ह्या काव्यात १७२६ श्लोक असून त्यांतून सन १७३५ ते १७५७ या कालातील हिंदुसमाजाच्या लोकस्थितीचे दर्शन घडते. याखेरीज अन्य स्फुट कविताही त्यांनी लिहिल्या आहेत. *यशवंतराय*च्या प्रस्तावनेत त्यांनी आपली काव्यविषयक कल्पना स्पष्ट केली आहे. निर्यमक काव्याचा त्यांनी पुरस्कार केला.

मिरज येथे स्थायिक होऊन त्यांनी पटवर्धनी दप्तराचे संशोधन केले. या दप्तरात अनेक इतिहासप्रसिद्ध पुरुषांची पत्रे आहेत. त्यांचा पहिला इतिहासविषयक ग्रंथ *नाना फडणविसांचे चरित्र* (१८९२) हा होय. हे चरित्र लिहिले जात असता मळे संस्थानच्या जुन्या दप्तराची माहिती त्यांना मिळाली. या दप्तराचे व पटवर्धनांच्या दप्तराचे त्यांनी सखोल संशोधन केले. यानंतर मिरज, कुरुंदवाड, इचलकरंजी वगैरे संस्थानांच्या दप्तरांचा त्यांनी शोध घेतला. ऐतिहासिक कागदपत्रांच्या संशोधनातून सिद्ध झालेले निवडक हजारो ऐतिहासिक लेख त्यांच्या संग्रही होते. ते लेख प्रसिद्ध करण्याकरता त्यांनी १८९७ मध्ये *ऐतिहासिक लेखसंग्रह* नावाचे मासिक सुरू केले पण तीन वर्षांनंतर पुरेशा वर्गणीदारांच्या अभावी ते बंद पडले. पुढे हे ऐतिहासिक लेख १८९७ ते १९२४ पर्यंत त्यांनी विस्तृत प्रस्तावनासह एकूण १२ खंडात प्रसिद्ध केले. त्याशिवाय *अधिकार योग* (१९०८), *हरिवंशाची बखर* (१९०९), *इचलकरंजी संस्थानाचा इतिहास* (१९१३), *मालोजी व शहाजी* (१९२०), *मिरज प्रकरण*, *हैदर अल्लीवरील तिसरी स्वारी* अशी ऐतिहासिक पुस्तके त्यांनी प्रसिद्ध केली. न. चिं. केळकरांच्या 'मराठे व इंग्रज' (१९१८) या ग्रंथात त्यांनी लिहिलेला उपोद्घातही प्रसिद्ध आहे.

इतिहास संशोधनाच्या कामातील विरंगुळा म्हणून तसेच अर्थ उत्पादनाचा एक मार्ग म्हणून त्यांनी काही नाटके लिहिली. *तारामंडळ* (१९१४), *सं. चित्रवंचना–सं. कृष्ण कांचन* (१९१७), *शिवसंभव* (१९१९), *उग्रमंगल* (१९२२), *सं. देशकंटक* (१९३०) ही त्यांची नाटके प्रसिद्ध आहेत. ह्यातील *शिवसंभव* नाटक अतिशय लोकप्रिय ठरले होते. शुद्ध ऐतिहासिक स्वरूपाचे हे एकच नाटक असून इतर नाटकांत ऐतिहासिकतेचा आभास उत्पन्न करण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांतील संविधानके बहुतांशी कल्पनारम्य स्वरूपाची आहेत. त्यांनी ही नाटके लिहिताना मुख्यतः संस्कृत नाट्यरचनापद्धतीचे अनुकरण केले आहे. ही सर्वच नाटके रंगभूमीवर थोड्याफार अंशाने यशस्वी ठरली.

उषा टाकळकर, सुशीला पाटील

संदर्भ : भट, दा. मो. प्रसिद्ध इतिहाससंशोधक, गुरुवर्य, वासुदेव वामनशास्त्री खरे चरित्र व ग्रंथपरिचय पूर्वार्ध व उत्तरार्ध, पुणे, १९२९.

**खांबेटे, महादेव लक्ष्मण :** (ज. १८८६ – मृ. ४ मार्च, १९४७). रत्नविषयक ग्रंथांचे कर्ते. काही काळ जळगाव येथे वकिली. नंतर जवाहिराचा व्यापार. *मौक्तिक प्रकाश अथवा मोत्यांविषयी सर्व काही* (१९२५), *रत्नप्रदीप*, खंड १ (१९३१), खंड २ (१९३६) हे विस्तृत माहितीपर ग्रंथ आणि या तिन्ही ग्रंथातील माहिती संक्षेपाने देणारा *लघुरत्नपरीक्षा* (१९४१) हा ग्रंथ ही यांची साहित्यनिर्मिती. *मौक्तिक प्रकाश* व *रत्नप्रदीप* हे मराठीतले रत्नपरीक्षा विषयावरील बहुमोल ग्रंथ आहेत. या विषयावर पूर्वी एवढे विस्ताराने व शास्त्रीय

दृष्टीने लेखन झाले नव्हते. ग्रंथाची भाषा सोपी, सरळ व स्पष्टार्थ व्यक्त करणारी आहे.

उषा टाकळकर, राम थोडे

**खाडिलकर, (नाट्याचार्य) कृष्णाजी प्रभाकर ऊर्फ काकासाहेब :** (ज. २३ नोव्हेंबर, १८७२, सांगली – मृ. २६ ऑगस्ट, १९४८, मुंबई). नाटककार. वृत्तपत्रकार व आध्यात्मिक विषयाचे अधिकारी लेखक. मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण सांगली येथे. महाविद्यालयीन शिक्षण पुण्यास. बी.ए. (१८९२). दोन वर्षे सांगली येथे शिक्षक. पुढे कायद्याचे अभ्यासासाठी मुंबई येथे काही काळ वास्तव्य.

मराठी रंगभूमीचे सौंदर्य आणि सामर्थ्य अधिक वाढविणारे नाटककार म्हणून काकासाहेब खाडिलकर विशेष प्रसिद्ध आहेत. हॅम्लेट व ऑथेल्लो या दोन नाटकांच्या अवलोकनानंतर या दोन नाटकांतल्या हॅम्लेट व अयागो ह्या भूमिका एकाच नाटकात आणण्याची कल्पना त्यांना सुचली व त्यानुसार १८९३ साली *सवाई माधवराव यांचा मृत्यू* हे आपले पहिले नाटक त्यांनी लिहिले. त्यामधील सवाई माधवराव हॅम्लेटवरून आणि केशवशास्त्री अयागोवरून घेतलेला आहे. त्यांचे हे नाटक नंतर १८९५ मध्ये 'विविधज्ञानविस्तारा'त प्रसिद्ध झाले. ह्याच सुमारास प्रिं. गोळे ह्यांच्या 'ब्राह्मण आणि त्यांची विद्या' या ग्रंथावरील अभिप्रायाचे चार लेख व 'गौतमबुद्धा'वरील लेख हे त्यांचे साहित्य 'विस्तारा'तून प्रसिद्ध झाले. प्रिं. गोळे ह्यांच्या ग्रंथावरील परीक्षणलेखातून प्रकट होणाऱ्या खाडिलकरांच्या उज्ज्वल राष्ट्रवादी विचारांनी प्रभावित होऊन, लो. टिळकांनी खाडिलकरांना बोलावून घेतले आणि 'राष्ट्रीय महोत्सवाची आवश्यकता' या विषयावर त्यांच्याकडून लेख लिहवून घेऊन तो १ सप्टेंबर १८९६ च्या 'केसरी'त अग्रलेख म्हणून प्रसिद्ध केला. 'केसरी'सारख्या राष्ट्रीय बाण्याच्या वृत्तपत्राशी खाडिलकरांचा यामुळे जो संबंध जडला तो, १९१० ते १९१५ हा काळ सोडल्यास, टिळकांच्या मृत्यूपर्यंत कायम राहिला.

खाडिलकर हे वृत्तीने जहाल राष्ट्रवादी होते. त्यांनी 'केसरी'तून लिहिलेल्या कित्येक लेखांतून त्यांची ही वृत्ती प्रकट झाली आहे. यामुळेच 'बॉम्बगोळ्याचे रहस्य' यांसारखे अनेक कडक लेख त्यांनी लिहिले. खाडिलकरांच्या यांपैकीच्या दोन लेखांबद्दल टिळकांवर राजद्रोहाचा खटला भरण्यात येऊन त्यांना सहा वर्षे काळ्या पाण्याची सजा झाली. टिळक मंडालेच्या तुरुंगवासात असताना, 'केसरी'चे संपादकत्व अल्पकाळ खाडिलकरांकडे देण्यात आले होते. १९१० ते १९१५ या काळात 'केसरी'पासून दूर गेलेल्या खाडिलकरांचा टिळक सुटून परत येताच पुन्हा 'केसरी'शी संबंध जुळला व १९१८ मध्ये टिळक व न. चिं. केळकर विलायतेत गेल्यामुळे टिळक परत येईपर्यंत 'केसरी'चे संपादकपद खाडिलकरांनी सांभाळले.

'केसरी' प्रमाणेच खाडिलकरांनी अन्य वृत्तपत्रांतूनही लेखन केले. १९१४ साली सुरू झालेल्या पहिल्या महायुद्धावरील 'चित्रमयजगत' मधून प्रसिद्ध झालेली त्यांची लेखमाला वाचकांना विशेष आवडली. टिळकांच्या मृत्यूनंतर त्यांनी मुंबईच्या 'लोकमान्य' पत्राचे संपादकत्व काही काळ स्वीकारले होते. १९२३ मध्ये त्यांनी स्वतःचे 'नवाकाळ' हे वृत्तपत्र काढले व ते भरभराटीस आणले. 'नवाकाळ'चे संपादक असताना १९२९ साली त्यांना राजद्रोहाच्या आरोपावरून एक वर्षाचा तुरुंगवास भोगावा लागला. १९३३ ते ३५ या काळात त्यांनी वैदिक वाङ्मयाचा सूक्ष्म अभ्यास केला. उपनिषदांवर प्रवचने दिली. ती पुढे पुस्तकरूपाने प्रसिद्ध झाली आहेत. एक क्रांतिकारक मनोवृत्तीचा जहाल राष्ट्रवादी पत्रकार म्हणून खाडिलकरांनी केलेली कामगिरी महत्त्वाची आहे.

वृत्तपत्रकार म्हणून लोकजागृतीचे कार्य करीत असतानाही त्यांचे मूळ नाट्यप्रेम मंदावले नव्हते किंबहुना राजकारणातूनही त्यांना नाट्यलेखनाची प्रेरणा मिळत होती. कर्झनशाहीचा जुलमी धुमाकूळ पाहूनच त्यांना महाभारतातील सैरंध्रीसारख्या अगतिक व असहाय साध्वीचा छळ करणाऱ्या उन्मत्त कीचकाचे स्मरण झाले व *कीचकवध* (१९०७) या तेजस्वी नाटकाची त्यांनी निर्मिती केली. या नाटकाचा जनमनावर एवढा प्रभाव पडला की ब्रिटिश सत्तेला या नाटकावर बंदी आणावी लागली. १९२६ मध्ये ही बंदी उठली. कालांतराने त्यांच्या मनावर गांधीवादाचा प्रभाव पडला आणि त्याचेही पडसाद त्यांच्या उत्तरकालातील *सावित्री*, *मेनका* आदि नाटकांमधून उमटले. खाडिलकर हे 'पहिल्याने नाटककार' असल्यामुळेच नित्याच्या व्यवसायात मग्न असतानाही त्यांची नाट्यदृष्टी सतेज राहिली.

खाडिलकरांनी एकुण पंधरा नाटके लिहिली. यातील आठ नाटके संगीत असून सात गद्य नाटके आहेत. यांतील दोन ऐतिहासिक, एक व्याजेतिहासिक (कल्पनारम्य) आणि नऊ पौराणिक नाटके आहेत. त्यांची नावे अशी – (१) *सवाई माधवरावांचा मृत्यू* (१८९३), (२) *कांचनगडची मोहना* (१८९८), (३) *कीचकवध* (१९०७), (४) *बायकांचे बंड* (१९०७, मूळ स्वरूप गद्य, १९३५ मध्ये त्याला संगीत स्वरूप देण्यात आले.), (५) *भाऊबंदकी* (१९०९), (६) *प्रेमध्वज* (१९१०, सर वॉल्टर स्कॉटच्या 'टॅलिस्मन' या कादंबरीतील ध्वजनाशाच्या कथानकावर आधारित), (७) *संगीत मानापमान* (१९११), (८) *संगीत विद्याहरण* (१९१३), (९) *सत्त्वपरीक्षा* (१९१४), (१०) *संगीत स्वयंवर* (१९१६), (११) *संगीत द्रौपदी* (१९२०), (१२) *संगीत मेनका* (१९२६), (१३) *सवतीमत्सर* (१९२७), (१४) *संगीत सावित्री* (१९३३) आणि (१५) *संगीत त्रिदंडी संन्यास* (१९३६).

खाडिलकरांची बहुतांश नाटके पौराणिक स्वरूपाची असली तरी ती केवळ रंजनात्मक नाहीत. त्यांच्या ध्येयवादी नाट्यदृष्टीचे दर्शन याही नाटकांमधून घडते. उदात्त आणि ध्येयदर्शी जीवनाचा आदर्श लोकांपुढे उभा करण्यासाठी, त्यांनी आपल्या नाटकांतून पौराणिक कथांचा उपयोग करून घेतला. समाजोन्नतीला साह्यभूत होतील अशी व्यापक आणि उदात्त तत्त्वे पौराणिक नाटकांतून त्यांनी गुंफलेली असल्यामुळे त्या तत्त्वांच्या प्रचाराला एक प्रकारची प्रतिष्ठा व भव्यता आपोआप प्राप्त होऊन त्यांची प्रभावक्षमता वाढली. क्वचित काही नाटकांतून त्यांनी प्रचलित राजकारणातील व समाजकारणातील ज्वलंत प्रश्नांचेही संसूचन मोठ्या मार्मिकपणे केले.

*संगीत मानापमान* हे खाडिलकरांचे पहिले संगीत नाटक. ह्या व त्यानंतरच्या *विद्याहरण* व *स्वयंवर* ह्या दोन संगीत नाटकांनी खाडिलकरांना संगीत नाटककार म्हणून लोकमान्यता मिळाली. मराठी नाट्यसृष्टीत 'गंधर्वयुगा'चा उदय झाला. बालगंधर्वांसारख्या लोकप्रिय गायकाच्या कंठातून बाहेर पडलेली खाडिलकरांची अनेक पदे विलक्षण लोकप्रिय ठरली. त्यांची नाटके गद्य असोत वा संगीत, ध्येयात्मकता हे त्यांचे वैशिष्ट्य आहे. पौराणिक व ऐतिहासिक व्यक्तिरेखांतून शाश्वत मानवी मनोवृत्तीचे जिवंत चित्रण ते करतात. कलापूर्ण व तंत्रशुद्ध रचना हा त्यांच्या नाटकांचा दुसरा महत्त्वाचा विशेष. परंपरेने चालत आलेल्या पौराणिक नाटकांना केवळ रंजनाच्या पातळीपुरतेच मर्यादित न ठेवता त्यांनी त्या नाटकांना उज्ज्वल व उदात्त ध्येयवादाची बैठक दिली आणि ते करताना नाटकाच्या कलात्मकतेची हानी होणार नाही असे रचनाचातुर्य प्रकट केले. गद्य नाटकासाठी शेक्सपियरचे आणि संगीत नाटकासाठी परंपरागत संस्कृत नाट्यरचनेचे अशी दोन्ही नाट्यतंत्रे त्यांनी समर्थपणे योजिली आहेत.

खाडिलकरांनी उत्तरायुष्यात भारतीय अध्यात्मग्रंथांचे सूक्ष्म अध्ययन केले व प्रवचने दिली. ही प्रवचने (१) 'खाडिलकरांचा रुद्र', (२) 'खाडिलकरांचे संध्यावंदन व पुरुषसूक्त, (३) 'खाडिलकरांचे

ऐतरेय व ईशावास्योपनिषद्', (४) 'खाडिलकरांचे तैत्तरीयोपनिषद्', (५) 'खाडिलकरांची ॐकाराची उपासना' व (६) 'खाडिलकरांचा याज्ञवल्क्यमैत्रेयी संवाद व त्रिसुपर्णांची शिकवणूक' या नावाने प्रसिद्ध आहेत. तत्त्वज्ञान आणि नित्य व्यवहार यांचा समन्वय साधण्याची त्यांची वृत्ती या प्रवचनांतूनही प्रकट झाली आहे.

पत्रकार व प्रवचनकार म्हणून खाडिलकरांनी केलेल्या कार्यापेक्षाही उच्च राष्ट्रीय आकांक्षा व्यक्त करण्याच्या व राष्ट्रीय सद्‌गुणांचे शिक्षण समाजाला देण्याच्या उदात्त हेतूने त्यांनी जी नाट्यसृष्टी निर्माण केली ती अत्यंत श्रेष्ठ दर्जाची आहे. त्यांच्या या कार्यामुळेच पुण्याच्या नाट्यसंमेलनाचे (१९१७) व नागपूर येथील महाराष्ट्र साहित्य संमेलनाचे (१९३३) अध्यक्षपद त्यांना मिळाले होते.

उषा टाकळकर, वसंत वऱ्हाडपांडे, अरविंद वामन कुलकर्णी

संदर्भ : (१) ना. सी. फडके, 'खाडिलकरांच्या नाट्यकृती', (२) व. शां. देसाई, 'खाडिलकरांची नाट्यसृष्टी'. (३) वा. ल. कुलकर्णी, 'नाटककार खाडिलकर : एक अभ्यास'. (४) गंगाधर गाडगीळ, 'खाडिलकरांची तीन नाटके'. (५) 'लोकराज्य', १६ नोव्हेंबर १९७३.

**खानापूरकर, विनायक पांडुरंग** : (ज. १८५८ – मृ. १ ऑक्टोबर, १९१९). ज्योतिर्विद. संस्कृतभाषा, व्याकरण, ज्योतिष या विषयांचे पारंपरिक व पाश्चात्त्य अशा दोन्ही पद्धतींनी अध्ययन. पुणे येथील वेदशास्त्रोत्तेजक सभेच्या भारतीय ज्योतिष व संस्कृत या विषयांच्या परीक्षा १८७५ मध्ये उत्तीर्ण. खानापूरकरांनी संस्कृतातील गणित व ज्योतिष मराठीत आणले. खानापूरकरांच्या *श्रीभास्कराचार्यकृत लीलावती सोपपत्तिक भाषांतर* (१८९७) या ग्रंथात अंकांची बेरीज, वजाबाकी, गुणाकार, भागाकार, वर्ग, वर्गमूळ, घन, घनमूळ, व्यवहारी अपूर्णांक, गणितश्रेणी, भूमितीश्रेणी, क्षेत्रफळ इत्यादी विषय आले आहेत. *श्रीभास्कराचार्यकृत बीजगणिताचे सोपपत्तिक भाषांतर* (१९१३) या ग्रंथात वर्गप्रकृती, एकवर्णसमीकरण, अनेकवर्णसमीकरण इत्यादी प्रश्न चर्चिले आहेत. *गोलाध्याय–पूर्वार्ध : अध्याय १ ते ८* (१९१३) या ग्रंथात बाराव्या शतकातील खगोलशास्त्रविषयक प्रश्नांचा विचार केला आहे. चौथा *श्रीभास्कराचार्यकृत गणिताध्यायाचे सोपपत्तिक भाषांतर* (१९१३) हा ग्रंथ सर्वांत महत्त्वाचा होय. यात चंद्रग्रहण, सूर्यग्रहण, ग्रहांचे नित्योदय, नित्यास्त वगैरे खगोलशास्त्रविषयक माहिती आहे. खानापूरकरांनी वरील चार ग्रंथांद्वारे संस्कृतातील 'सिद्धान्त शिरोमणी' हा ग्रंथ मराठीत आणला. या ग्रंथांचा प्रकाशनकाल जरी १८९७–१९१३ हा असला तरी त्यांचा लेखनकाल १८९२ ते १९०० हा आहे. त्यांचा पाचवा ग्रंथ *श्रीभास्कराचार्यकृत गोलाध्याय उत्तरार्धाचे सोपपत्तिक भाषांतर* मात्र अप्रकाशित आहे.

भास्कराचार्यांच्या 'सिद्धान्तशिरोमणी' या ग्रंथात अनेक ठिकाणी सिद्धान्त दिले आहेत, पण त्यांच्या उपपत्त्या दिलेल्या नाहीत. खानापूरकरांनी आपल्या भाषांतरात गणितविषयक सिद्धान्ताबरोबर त्यांची उपपत्तीही दिली. पौर्वात्य ग्रह गणितातील भेद काढून टाकण्याचा त्यांनी प्रयत्न केला. खानापूरकरांच्या या ग्रंथावर न्या. रानडे, लो. टिळक, शंकर बाळकृष्ण दीक्षित यांसारख्या तत्कालीन विद्वानांनी अनुकूल अभिप्राय दिला आहे.

याखेरीज *वधूवरपत्रिकासंमेलन* (१९०७), *सूर्यसिद्धान्ताचे सोपपत्तिक भाषांतर*, *भुजज्यादि षट्कोत्पत्ती (पूर्वार्ध व उत्तरार्ध)*, *भौमपिषेक*, *ग्रहवेध*, *तिथी चिंतामणी*चे भाषांतर ही त्यांची मराठीत लिहिलेली अन्य पुस्तके. *वैनायकीय द्वादशाध्यायी*, *कुंडसार*, *अर्धकाण्ड*, *युक्लिडच्या दोन पुस्तकांतील सिद्धान्तांच्या प्रतिज्ञांचा वृत्तबद्ध संस्कृत अनुवाद*, *सिद्धान्तसार* ही त्यांची संस्कृत पुस्तके आहेत.

प्र. नी. नवरे, सुशीला पाटील

**खापर्डे, गणेश श्रीकृष्ण (दादासाहेब)** : (ज. २७ ऑगस्ट, १९५४, हिंगोली – मृ. १ जुलै, १९३८, अमरावती). राष्ट्रीय वृत्तीचे वऱ्हाडातील प्रसिद्ध वकील. नामांकित वक्ते, नाट्यरसिक. लो. टिळकांचे एक निकटवर्ती अनुयायी. कडवे राष्ट्रवादी. विविध भाषाकोविद. औदार्याकरिता प्रसिद्ध. खापर्डे यांनी स्वकालात विविध क्षेत्रांत जरी कर्तृत्व गाजविले असले तरी त्यांची ग्रंथनिर्मिती तशी फारच थोडी आहे.

त्यांनी लिहिलेले एकमेव पुस्तक म्हणजे *उपासनी वाक्सुधा* (१९३६).

बा. ब. खापर्डे

**खिस्ती, हरी रामचंद्र** : (ज. ९ फेब्रुवारी, १८२० – मृ. – ११ जानेवारी, १८६४). हरिपंतांचे घराणे मूळचे अहमदनगरचे. पण कामानिमित्त त्यांचे वडील सहकुटुंब पुण्यास आले होते. येथेच हरिपंतांचा जन्म झाला. ते दीड वर्षांचे असतानाच त्यांचे वडील वारले. चौथ्या वर्षी त्यांची मुंज झाली आणि सहा वर्षांचे असताना त्यांचा विवाह झाला. त्यावेळी वधूचे वय होते अवघे अडीच वर्षांचे. या बालविवाहात या गरीब कुटुंबाचा बराच खर्च झाला आणि त्रास सहन करावा लागला. हरिपंत शाळेत जाऊ लागले होते, पण घरच्या गरिबीमुळे त्यांना शिक्षणाबरोबरच कामही करावे लागले.

नवागत मिशनरींना मराठी शिकवणारे 'पंडीत' म्हणूनही हरिपंत काम करीत. त्यामुळे खिस्ती लोकांशी आणि त्यांच्या ग्रंथांशीही त्यांचा जवळचा संबंध येत गेला. पुढे १८३९ मध्ये धर्मांतर करून ते खिस्ती झाले.

हरिपंतांना संस्कृत व इंग्रजी भाषांचे चांगले ज्ञान होते. या दोहो भाषांतून त्यांनी काही पुस्तकांची मराठीत भाषांतरे केली आहेत. तसेच काही स्वतंत्र पुस्तकेही लिहिली आहेत. बायबलचे मराठी भाषांतर तपासण्याच्या कामात त्यांनी बहुमोल मदत केली. त्यांना कवितेची गोडी असून ते स्वतः चांगले कवी होते. बायबलचे ओवीबद्ध भाषांतर करायचा त्यांचा मानस होता. त्याचा उपोद्‌घात म्हणून त्यांनी १०६ ओव्या लिहिल्या. त्यावरून त्यांची साधी, सुबोध आणि भक्तिरसपूर्ण रचना प्रत्ययास येते. हे ओवीबद्ध खिस्तचरित्र पूर्ण झाले असते तर मराठी खिस्ती वाङ्मयात मोलाची भर पडली असती.

भास्कर जाधव

वाङ्मय : (१) महमदाचा वृत्तान्त, मुंबई, १८५३ (इंग्रजीतून भाषांतर). (२) मतपरीक्षा, भाग १ ला, मुंबई १८५६ (संस्कृतातून भाषांतर). (३) उद्धारमहिमा (काव्य), मुंबई, १८७५. स्वतंत्र चरित्र, चर्चा, अभ्यास. (४) सुवृत्तप्रसार (मासिक) मे १९६३, पृ. ४–६.

० **गंधर्व** : पहा करंदीकर, बळवंत जनार्दन

० **गजानन** : पहा सावर्डेकर, बाळकृष्ण वामन

**गडकरी, राम गणेश** : ० गोविंदाग्रज ० बाळकराम ० सवाई, नाटकी : (ज. २६ मे, १८८५, गणदेवी, नवसारी-गुजरात, – मृ. २३ जानेवारी, १९१९, सावनेर, विदर्भ). कवी, विनोदी लेखक आणि नाटककार म्हणून विशेष प्रसिद्ध. आठव्या वर्षीच वडिलांचे निधन झाल्याने पुढील सहा-सात वर्षे नवसारी-कर्जत या ठिकाणी काढून १९०० साली त्यांच्या मातोश्रींनी पुण्यात बिऱ्हाड केले. १९०४ मध्ये ते प्रवेशपरीक्षा (मॅट्रिक) उत्तीर्ण झाले आणि फर्ग्युसन कॉलेजात दाखल झाले. पण वाचनवेड्या स्वभावामुळे औपचारिक शिक्षण घेण्यात त्यांना रस वाटेनासा झाला. तेथून ते 'किर्लोस्कर नाटक कंपनी'त अल्पवयीन नटांना शिकवणारे 'मास्तर' म्हणून नोकरीस लागले (१९०६). येथे त्यांची श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांशी ओळख झाली आणि गडकऱ्यांनी त्यांना आपले लेखनगुरू मानले.

गडकऱ्यांनी 'गोविंदाग्रज' ह्या टोपणनावाने १९०९ पासून कविता-लेखन सुरू केले. 'अल्लड प्रेमास' ही त्यांची पहिली कविता 'मनोरंजन' या त्या काळच्या प्रतिष्ठित मासिकात १९०९ साली प्रसिद्ध झाली. ते स्वतःला केशवसुतांचे 'सच्चे चेले' म्हणवत. केशवसुतांच्या स्मरणार्थ त्यांनी 'तुतारीमंडळ' स्थापन करण्यात पुढाकार घेतला. तथापि गोविंदाग्रजांचा पिंड केशवसुतांपेक्षा भिन्न होता. *वाग्वैजयंती* (१९२१) हा त्यांच्या कवितांचा एकमेव संग्रह. यात त्यांच्या सुमारे दीडशे कविता (१९०९ ते १९१८ ह्या काळातल्या) आहेत. विलक्षण कल्पनाशक्ती, अत्युत्कट भावना आणि त्यांना पेलणारी समर्थ शब्दकथा ह्यांनी गोविंदाग्रजांच्या कवितेला तिचे एक खास रूप दिले आहे. गोविंदाग्रजांनी तात्त्विक, गूढगुंजनात्मक, आध्यात्मिक, सामाजिक अशा विविध विषयांवर कविता लिहिली असली, तरी प्रीतीचा – विशेषतः विफल प्रीतीचा – प्रभावी आविष्कार त्यांच्या अनेक कवितांतून त्यांनी घडविला आहे. प्रेमभावना ही या कवितांमध्ये प्रामुख्याने येते. यामुळेच 'गोविंदाग्रज' हे 'प्रेमाचे शाहीर' म्हणून ओळखले जातात.

कोल्हटकर आणि खाडिलकर यांचा वाङ्मयीन ऋणानुबंध घेऊन गडकऱ्यांनी मराठी नाट्यक्षेत्रात प्रवेश केला. वयाच्या सहाव्या वर्षीच त्यांनी *सुरसुंदरी* नावाचे नाटक अवघ्या तीन दिवसांत लिहून काढल्याचे सांगण्यात येते. १९११ मध्ये लिहिलेले *प्रेमसंन्यास* हे त्यांचे रंगभूमीवर आलेले पहिले नाटक. ते १९१२ मध्ये रंगभूमीवर आले. त्यापूर्वी त्यांनी दोन नाटके लिहिली होती. किर्लोस्कर नाटक मंडळींच्या 'रंगभूमी' मासिकात त्यांनी *वेड्यांचा बाजार* हे प्रहसन दोन अंक लिहून अपूर्ण सोडले होते. त्यानंतर *गर्वनिर्वाण* हे प्रल्हादाच्या कथेवरील नाटक 'किर्लोस्कर' कंपनीसाठी लिहिले. पण नाशिकला कलेक्टर जॅक्सनची हत्या झाली व *गर्वनिर्वाण*मधील राजकीय रंग त्रासदायक होईल असे वाटल्याने त्याचे हस्तलिखित गहाळ करण्यात आले. दुसरे नाटक *पुण्यप्रभाव* (१९१९). त्याचा प्रयोग १ जुलै, १९१६ रोजी किर्लोस्कर नाटक मंडळीने केला. *राजसंन्यास* (अपूर्ण), *एकच प्याला* (१९१९) आणि *भावबंधन* (१९२०) ही नाटके त्यांच्या हयातीत रंगभूमीवर येऊ शकली नाहीत. *भावबंधन*चा शेवटचा प्रवेश त्यांनी मृत्युपूर्वी काही तास आधी लिहून पूर्ण केला.

कवितेप्रमाणेच गडकऱ्यांच्या नाटकांतूनही त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचे प्रतिबिंब वारंवार दिसते. उण्यापुऱ्या ३४ वर्षांच्या आयुष्यात आणि विशेषतः शेवटच्या सात-आठ वर्षांत त्यांनी जी वाङ्मयनिर्मिती केली, तिने त्यांचे नाव चिरस्थायी होऊन गेले. 'गोकुळ', 'धुंडिराज', 'घनःश्याम', 'कामण्णा', 'तळीराम', 'सिंधू', 'गीता' यासारखी मराठी रंगभूमीवर अजरामर झालेली पात्रे आणि प्रसंगनिष्ठ, स्वभावनिष्ठ आणि शाब्दिक विनोद – त्याचे प्रभावी आविष्करण यामुळे ही नाटके आजही रंगभूमीवर यशस्वी ठरतात.

गडकऱ्यांचे असामान्य भाषाप्रभुत्व हा त्यांच्या नाटकाचा लक्षणीय विशेष. त्यांची भाषा प्रतीक-प्रतिमांची सढळ योजना करते व त्यामुळे ती काव्यात्म होते. ती लयबद्ध, प्रासयुक्त व प्रभावी आहे. अनेकदा उक्तींना सुभाषितांचे रूप येते. आत्यंतिकता हा त्यांच्या नाट्यलेखन शैलीचा विशेष आहे.

'रंगभूमी' मासिकात प्रसिद्ध झालेले दोन अंकी अपूर्ण *वेड्यांचा बाजार* यात प्रहसनपरता आणि हास्यपरता आणि हास्योत्पादक पात्रांचे रंजक नमुने आहेत. या प्रकारच्या प्रहसनपरतेचे पुढे खूपच अनुकरण झाले.

'बाळकराम' या टोपण नावाने गडकरी यांनी स्वतंत्र विनोदी लेखनही केले आहे. *रिकामपणाची कामगिरी* (संपूर्ण बाळकराम) १९२१ साली प्रसिद्ध झाले. विडंबन व अतिशयोक्तीबरोबरच त्यामागचे दडलेले कारुण्य हे लक्षणीय आहे.

गडकऱ्यांच्या काही अप्रकाशित राहिलेल्या स्फुट लेखनाचा शोधही डॉ. भीमराव कुलकर्णी यांनी त्यांच्या प्रकाशित वाङ्मयाबरोबरच, परिश्रमपूर्वक घेतला आहे. (संपूर्ण गडकरी भाग १, २ व ३–संपादक व प्रस्तावना डॉ. भीमराव कुलकर्णी – अनुक्रमे १९८४, १९८४, १९८५).

कमलेश

संदर्भ : (१) 'गडकऱ्यांची नाट्यसृष्टी' – वसंत शांताराम देसाई. (२) 'गडकऱ्यांचा विनोद' – शि. गो. भावे, (३) 'गडकरी–व्यक्ती व वाङ्मय', – वि. स. खांडेकर. (४) 'नाटककार गडकरी' – डॉ. रा. शं. वाळिंबे. (५) 'गडकऱ्यांची संसार नाटके' – प्रा. त्र्यं. वि. सरदेशमुख. (६) 'अंधारयात्रा' – प्रा. त्र्यं. वि. सरदेशमुख. (७) 'शोध प्रतिभावंताचा' – श्री. माधव गडकरी. (८) 'संपूर्ण गडकरी' – (प्रस्तावना) संपा. आचार्य अत्रे. (९) 'संपूर्ण गडकरी' – (प्रस्तावना) संपा. डॉ. भीमराव कुलकर्णी.

० **गणपत पिराजी :** पहा पंडित (वसईकर), गणपत पिराजी

० **गणेशभट्ट :** पहा बोडस, राजारामशास्त्री

**गद्रे, नारायण कृष्ण :** (ज. ७ मार्च, १८७०, वाई – मृ. १४ जुलै, १९३३, वाई). इतिहासतज्ञ, चरित्रलेखक, ऐतिहासिक कादंबरीकार व 'सरस्वती मंदिर' या नियतकालिकाचे संपादक.

प्राथमिक व माध्यमिक शिक्षण वाई, मुंबई व पुणे येथे. मुंबईस हवामान खात्यात नोकरी. १८९२ साली *संगीत अक्षविपाक* नाटक लिहिले असले, तरी मराठी वाङ्मयक्षेत्रात त्यांचे जे महत्त्व मानले जाते ते *महाराष्ट्र महोदयाचा पूर्वरंग* (१९०५) या ग्रंथाचे कर्ते म्हणून. या ग्रंथात महाराष्ट्रातील शिवकालीन स्वराज्याच्या उदयाची पार्श्वभूमी त्यापूर्वीच्या विजयनगरच्या साम्राज्याच्या अस्तात अंशतः सापडू शकेल असे सूचित केले आहे. शिवजन्मतिथी, तुकारामकालीन दुष्काळ, बाजीराव जन्मशक अशा विषयावर संशोधनात्मक लेखनही त्यांनी केले आहे. *भा. श्री. ग. जिनसीवाले* (१९०३) आणि *विष्णुपंत छत्रे* (१९०६) यांची चरित्रे यांनी लिहिली आहेत. यांची *प्याद्याचा फर्जी अथवा भोसले घराण्याचा अभ्युदय* (१८८९) ही मालोजी भोसले यांच्या जीवनावरील ऐतिहासिक कादंबरी प्रसिद्ध आहे. त्याशिवाय त्यांच्या *बाप्पारावळ चक्रवर्ती* (१९००), *मनूच फिरला* (१९०६) ह्या कादंबऱ्याही प्रकाशित झाल्या. 'विविधज्ञान-विस्तारा'तील 'गेल्या पंचवीस वर्षांतील कादंबऱ्या'चा परामर्श घेणारे त्यांचे समीक्षणात्मक लेखनही उल्लेखनीय वाटते.

'मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय' (१८९८) ही संस्था स्थापना करण्यात यांनी पुढाकार घेतला होता.

'सरस्वती मंदिर' हे नियतकालिक (प्रथम षण्मासिक, नंतर त्रैमासिक आणि शेवटी द्वैमासिक) त्यांनी बा. दा. मुंडले यांच्या संपादकीय सहकार्याने १९०१ ते १९०८ पर्यंत चालविले. त्यामधूनच त्यांचे बहुतेक ग्रंथरूप व स्फुट लेखात्मक वैचारिक वाङ्मय प्रसिद्ध झाले आहे.

श्रीधर गंगाधर मोडे, राम घोडे

**गर्गे, शंकर काशिनाथ :** ० नाट्यच्छटाकार दिवाकर : (ज. १८ जानेवारी, १८८९ – मृ. १ ऑक्टोबर, १९३१). 'नाट्यछटा'कार. पुण्याच्या नूतन मराठी विद्यालयातून स्कूल फायनलची परीक्षा उत्तीर्ण. पुढे त्याच शाळेत इंग्रजी विषयाचे शिक्षक. इंग्रजी व मराठी वाङ्मय वाचनाचा छंद. १९१०–११ पासून लेखनाला प्रारंभ. प्रथम 'यॉर्कशायर ट्रॅजिडी', 'फ्रॉऊस्ट' इत्यादी काही इंग्रजी नाटकांचे अनुवाद त्यांनी केले. परंतु त्यांचे हे लिखाण प्रसिद्ध झालेले नाही. १९११ पासून ते नाट्यप्रसंग लिहू लागले व १९१३ साली 'केसरी'तून 'नाट्यछटा' या शीर्षकाखाली दोन नाट्यप्रसंग प्रसिद्ध केले. त्यानंतर करमणूक, मनोरंजन, उद्यान, ज्ञानप्रकाश, रत्नाकर आदी नियतकालिकांतून

त्यांच्या एकावन नाट्यछटा प्रसिद्ध झाल्या. १९११ ते १९२९ या अठरा वर्षांच्या काळातील ह्या नाट्यछटा, जीवनानुभवातील नाट्यात्मकतेचे विविध प्रकारे आविष्कारण करतात. यांच्या 'नाट्यछटां'चा संग्रह प्रो. रा. कृ. लागू ह्यांनी *नाट्यछटा* ह्याच नावाने संपादित (द्वि. आ. १९३९) करून प्रसिद्ध केला आहे. या प्रकारचे लेखन करावे, ही कल्पना आपणास ब्राऊनिंगच्या 'ड्रॅमॅटिक मोनोलॉग'वरून सुचली, असे यांनी म्हटलेले असले, तरी त्या दोघांच्या जीवनानुभवाचे स्वरूप वेगळे आहे.

नाट्यछटेव्यतिरिक्त दिवाकरांनी केलेली इतर वाङ्मयीन कामगिरीही महत्त्वाची आहे. 'मसालेदार ताजा चिवडा', 'अहो! मला वाचता येतंय', 'आले कोठून', 'गेले कोठे', अशा काही छोट्या भावपूर्ण सुंदर कथा, 'प्रवासी', 'निजलेले मूल', 'भर चौकात' असे साध्या शब्दांतून–प्रसंगांतून जीवनविषयक खोल आशय सुचविणारे नाट्यप्रवेश आणि कारकुनासारख्या सामान्य माणसाच्या वास्तविक आयुष्याचे स्वाभाविक स्वरूपात चित्रण करणारे तीन अंकी *कारकून* नाटक इत्यादी साहित्य वाङ्मयीन दृष्टीने नाट्यछटेइतकेच लक्षणीय आहे. त्यांचे हे सर्व लेखन *संपूर्ण दिवाकर* (१९३३) या ग्रंथनामाखाली प्रसिद्ध झाले आहे. सामान्य माणसाच्या मर्यादित विश्वातील क्षणोक्षणींची वैचारिक, भावनिक खळबळ साधेपणाने पण संयतपणे अभिव्यक्त करणे, हे दिवाकरांच्या लेखनप्रवृत्तीचे वैशिष्ट्य आहे.

१९१० ते १९३० हा दिवाकरांचा लेखनकाळ. हा काळ नाट्यक्षेत्रात खाडिलकर, कोल्हटकर, गडकरी ह्यांच्या रंगभूमीवरील वैभवाचा तर काव्यक्षेत्रात रविकिरण मंडळातील कवींच्या सुबोध कवितेच्या मासिकांतून व कविसंमेलनांतून झालेल्या प्रसाराचा काळ आहे. ह्या सर्व कोल्हटकर–गडकरी आणि रविकिरण मंडळातील मान्यवर समकालिनांच्या विश्वात दिवाकरांची लहानशी साहित्यसृष्टी तिच्या सच्च्या व आगळ्या स्वरूपामुळे महत्त्वाची असून मराठी साहित्यातील अगदी आजच्या प्रवाहात दिसणाऱ्या कलाविषयक संकल्पनेशी तिचे नाते आहे. दिवाकरांनी लिहिलेली केशवसुतविषयक टिपणेही महत्त्वाची आहेत.

सरोजनी वैद्य, राम पोंडे

संदर्भ : (१) 'प्रस्तावना' – 'दिवाकरांच्या नाट्यछटा'.–संपा. रा. कृ. लागू. (२) वा. ल. कुळकर्णी, 'दिवाकरांच्या वाङ्मयाचे स्वरूप', 'ज्योत्स्ना', ऑक्टोबर १९३७ (३) सरोजिनी वैद्य, 'नाट्यछटाकार दिवाकर–एक आत्मसंवाद', 'केसरी', ४ ऑक्टोबर १९८१.

**गर्दे, खंडो कृष्ण : ० बाबा गर्दे :** (ज. २ डिसेंबर, १८४८, गुर्लहासूर, जि. बेळगाव – मृ. १३ ऑगस्ट, १९२६, पुणे). कन्नड आणि मराठी या दोन्ही भाषांतील सव्यसाची लेखक. शिक्षण स्कूल-फायनलपर्यंत. वडील शांकरवेदान्ती असल्यामुळे बाबांना वेदान्ताची गोडी लहानपणापासूनच लागली. काही काळ. यांनी शाळा-तपासनीस म्हणूनही काम केले आहे.

बाबांनी सिद्धारूढ स्वामींच्या सांगण्यावरून विद्यारण्यांच्या संस्कृत पंचदशीचे आरंभी कन्नडमध्ये व नंतर मराठीत गद्यपद्यात्मक भाषांतर केले. यांची बहुतांश रचना पद्यबद्ध आहे. वेदान्ताची ओळख सर्वसामान्यांना व्हावी या प्रेरणेतून मुख्यतः वेदान्तावरील संस्कृत ग्रंथांच्या आधारे यांनी आपली ग्रंथनिर्मिती केली. गीतेतील आणि वेदान्तविषयक तत्त्वज्ञान सोपे करून सांगण्याकरिता वेगवेगळ्या चालींवरची रागदारीतील पदांची रचना यांनी केली. *गीतासूत्रशतपदी* (१८७०) हे भगवद्‌गीतेचे तात्पर्य कथन करणारे शंभर पदांचे काव्य. गीतेच्या अध्यायातील विषयानुक्रमानुसार प्रत्येक अध्यायाचे तात्पर्य काढून ते सिद्ध केले आहे. *श्रीगीतपंचदशी किंवा वेदान्तशतक* (आ. २ री, १८९४) हे विद्यारण्यांच्या संस्कृत पंचदशीतील वेदान्त सोप्या रीतीने समजावून सांगणारे पद्यात्मक काव्य. *स्फुट शतपदी* (१९२७) व *संगीत चूडालाख्यान* (१९३७) हे यांचे अन्य पदरूप ग्रंथ. पहिल्या पुस्तकात भक्ती, ज्ञान, वैराग्य ह्या विषयांवरील अध्यात्मपर स्फुट पदे असून, दुसऱ्यात योगवासिष्ठातील राजा शिखिध्वज व त्याची आत्मज्ञानी राणी ह्यांच्या कथेवर आधारलेली पदे आहेत. हे काव्य बाबांच्या मृत्यूमुळे अपूर्ण राहिले होते, ते नागपूरचे कवी कृष्णाजी गोविंद ताम्हणकर ह्यांनी पूर्ण केले. वरील पद्यग्रंथांखेरीज *विजनपुरी* (१८८४) गोल्डस्मिथच्या 'डेझर्टेड व्हिलेज' या दीर्घकाव्याचे दिंडी छंदातील १७० कडव्यांचे भाषांतरही प्रसिद्ध आहे.

*विद्यारण्यकृत सार्थ पंचदशी* (१८९५), *लघुवासुदेवमनन* (१९१०), *ब्रह्मसिद्धान्तमाला* (१९१०) हे यांचे वेदान्त विषयावरील गद्य ग्रंथही प्रसिद्ध आहेत.

उषा टाकळकर, राम पोंडे

**गर्दे, गणेश कृष्ण :** (ज. १८५५ – मृ. २ जुलै, १९१६). वैद्यक विषयक ग्रंथांचे भाषांतरकार व कवी. माध्यमिक शिक्षण बेळगावी व पुढील शिक्षण मुंबईच्या ग्रँट मेडिकल कॉलेजात. वैद्यकीय व्यवसाय पुणे येथे.

ह्यांनी 'सार्थ वाग्भट' (अष्टांगहृदय व त्याचे मराठी भाषांतर) भाग १–२ (१८९० - १८९१) व 'सार्थ माधवनिदान' (१९०४) ह्या वैद्यकावरील संस्कृत ग्रंथांचे मराठीत भाषांतर केले. ह्या दोनही ग्रंथांना जोडलेल्या उपोद्‌घातात त्यांनी आर्यवैद्यकाचे मोठ्या चिकित्सेने पर्यालोचन केले आहे. *माधवनिदान* या ग्रंथात इंग्रजी पद्धतीप्रमाणे अनेक रोगांची निदाने दिलेली असून शरीर व इंद्रियविज्ञान यावरील एक निबंधही ग्रंथास जोडला आहे. त्यांचे हे ग्रंथ आयुर्वेदाच्या अभ्यासक्रमात प्रमाण मानले जातात.

त्यांना काव्यरचनेचाही छंद होता. *सटीप ईशगुणादर्श* (१९१९), *सार्थ व समश्लोकी शिवमहिम्न* व *उपमन्युकृत शिवस्तोत्र* (१९०५) ही त्यांची संस्कृतवरून भाषांतरित केलेली काव्ये. ह्या काव्यावरून त्यांची काव्यशक्ती, भाषाप्रभुत्व व निर्दोष छंदरचना ह्यांचा प्रत्यय येतो.

उषा टाकळकर, राम पोंडे

**गव्हाणकर, राघोबा जनार्दन : ० राघोबा जनार्दन :** (ज. १८१५ – मृ. १८९७). *दिग्दर्शन* ह्या आद्य मराठी मासिकाचे पहिले संपादक व प्रकाशक. मुंबईतील एतद्देशियांसाठी स्थापन झालेल्या 'नेटिव्ह जनरल लायब्ररी' ह्या संस्थेचे जनक. मिलिटरी पे-ऑफीसमध्ये हेडक्लार्क. बेळगाव येथे 'हुजुर डेप्युटी कलेक्टर' व 'मॅजिस्ट्रेट' (१८४९–६८).

१८३७ साली इंग्रजी भाषा शिकणाऱ्या एतद्देशियांच्या उपयोगाकरिता त्यांनी *मरे ह्यांच्या इंग्रजी व्याकरणाचा संक्षेप* असे एक पुस्तक प्रसिद्ध केले. १८४० च्या मे मध्ये *दिग्दर्शन* चा पहिला अंक त्यांनी प्रसिद्ध केला. '*दिग्दर्शन* म्हणजे मराठी भाषेत सर्व विषयांचा संग्रह', असेच त्या मासिकाचे ब्रीदवाक्य होते. आधुनिक पाश्चात्त्य ज्ञानाचा स्वभाषीयांना परिचय घडावा व त्यांना एक नवी दृष्टी प्राप्त व्हावी हा त्यांचा *दिग्दर्शन* काढण्यामागील हेतू होता. १८३४ मध्ये त्यांनी ते भाऊ महाजनांना विकले व दोन वर्षांनी ते बंद पडले. तसेच त्यांनी ७ जून, १८४५ रोजी 'नेटिव्ह जनरल लायब्ररी' मुंबईत स्थापन केली. हेच मुंबईमधील पहिलेवहिले सार्वजनिक ग्रंथालय.

इंग्रजी राज्यकर्त्यांच्या शिक्षणप्रसाराच्या धोरणामुळे व इंग्रजी भाषेच्या नजिकच्या संपर्कामुळे एकोणिसाव्या शतकाच्या प्रथमार्धात स्वदेशोन्नतीचा विचार करणाऱ्या ज्या काही थोड्या व्यक्ती त्या काळी होत्या, त्यांपैकी ते एक होते. त्या वेळी ज्ञानसाधन, ज्ञानोपार्जन ह्यांचे जे एक नवे पर्व भारतात सुरू झाले, त्या प्रारंभकाळातील मराठी भाषिकांच्या वृत्ति-प्रवृत्तींना काही ध्येयदृष्टीने आकार देऊ इच्छिणाऱ्या

मोजक्या शिल्पकारांपैकी एक म्हणून राघोबा जनार्दन ह्यांचा उल्लेख करावा लागेल.

उषा टाकळकर, राम घोडे

**गाईकवाड, सीताराम रामचंद्र :** (ज. १८५९, बापर्डे, ता. देवगड, जि. रत्नागिरी – मृ. १८९७). शिक्षण मॅट्रिकपर्यंत. ह्यांचा रसायनशास्त्राचा चांगला अभ्यास होता. यांचा इतर विषयांचा व्यासंगही चांगलाच होता. त्यांनी बरेच ग्रंथ लिहिले आहेत.

*कुणकेश्वर माहात्म्य* (१८८३) हे त्यांचे पहिले स्थलवर्णनात्मक पुस्तक. त्यानंतर यांची *विजापूरवर्णन* (१८८४), *पुणे शहरवर्णन* (भाग १ – १८८६ व भाग २ – १८८८) आणि *जेजुरी वर्णन* (१८८७), अशी आणखी काही स्थलवर्णने लिहिली आहेत. *विजापुरातील प्राचीन इमारती* (१८८७) असेही एक पुस्तक यांनी तयार केले आहे. *असीरिया* (१८९४) हा त्यांचा भाषांतरित ऐतिहासिक ग्रंथ, 'स्टोरी ऑफ नेशन्स' ह्या इंग्रजी ग्रंथाधारे तयार केला असून, तो बडोद्याच्या सयाजीराव महाराजांच्या उत्तेजनाने सुरू झालेल्या राष्ट्रकथामालेतून प्रसिद्ध झाला. या ग्रंथरचनेशिवाय *बाळंतीण व बाळ यांचे संगोपन* (१८८८) हा आरोग्यविषयक ग्रंथ ह्यांनी सर्वसामान्यांच्या अडचणींचा विचार करून तयार केला आहे. त्यांनी निरंजनकविकृत 'चिद्बोध रामायण', *बालकांड* (१८८६) हा एक काव्यग्रंथही संपादिला आहे. पण त्यांची विशेष प्रसिद्धी आहे, ती स्थलवर्णनकार या नात्याने.

उषा टाकळकर, राम घोडे

**गाडगीळ, कृष्णाजी परशुराम :** (ज. १५ जून, १८४७ – मृ. मे १८९४). नाटककार व अनुवादक. शिष्यवृत्यांवर बी.ए.पर्यंतचे शिक्षण पुरे केले. आधी शाळाखात्यात व नंतर न्यायखात्यात नोकरी.

*फटफजितीचा कळस* (१८७४) हे एक अंकी नाटक. संवादलेखनातील कौशल्य व यथोचित वातावरणनिर्मिती, यामुळे परिणामकारक ठरले. 'वेषविभ्रम नाटक' (शेक्सपियरच्या ट्वेल्फथ नाईट'च्या आधारे, १८९१), *संसारसुख*–'प्लेझर्स ऑफ लाईफ' वरून (१८९३), *सिसेरोचे निबंध*, *समाजघटना* हे त्यांचे अन्य लेखन. यांनी इंग्रजीतूनही लेखन केले असून काही कविताही लिहिल्या आहेत. (नेटिव्ह ओपिनियन, १४ मे, १८६४).

उषा टाकळकर

**गायकवाड, संपतराव काशिराव :** (ज. १६ मे, १८६४, कवळणे, खानदेश – मृ. १९३४). प्रवासवर्णनकार. श्रीमंत सयाजीराव गायकवाडांचे बंधू. बडोदा संस्थानात महत्त्वाची पदे भूषविली. ऑक्सफर्ड कॉलेजची 'बॅरिस्टर ॲटलॉ'ची पदवी. बडोद्याच्या श्रीसयाजी पुस्तकालयाचे संस्थापक.

त्यांची *स्वातंत्र्य* (१९०७), *विवाहाच्या ऐतिहासिक पद्धती* (१९०८) ही व्याख्याने व मराठी, गुजराती, हिंदीतील प्राचीन काव्यवेच्यांचे *भजनकुसुममाला* (१९२०), *भजनसुधासार* (१९२३) हे संग्रह पुस्तकरूपाने प्रकाशित झाले आहेत. शिवाय *नेपाळचा प्रवास* (१९२८), *माझी तीर्थयात्रा* (१९३३) ही उपयुक्त प्रवासवर्णने प्रकाशित झाली आहेत. आफ्रिकेतील अनुभव *आफ्रिकेतील शिकार* या ग्रंथात वर्णिले आहेत.

हरिश्चंद्र थोरात, कुंदा केळापुरे

**गुंजीकर, गणपत भिकाजी : ० गणेश भिकाजी :** [ज. १८५१, गुंजी (जिल्हा बेळगाव)–मृ. ५ सप्टेंबर, १८९५]. चरित्रलेखक, भाषांतरकार व अनुवादक. ह्यांचे बहुतेक साहित्य भाषांतरित आहे. *स्वपराक्रम* (स्माइल्सच्या 'सेल्फहेल्प'च्या प्रथम भागाचे भाषांतर), *दानत* (स्माइल्सच्या 'कॅरेक्टर'च्या प्रथम भागाचे भाषांतर), *बालविवाह* (फिसनबाईंच्या व्याख्यानाचे भाषांतर), *जुल्या बहिणी* (१८९२), *करण घायेला* (१८९९) (नंदशंकर तुळजाशंकर ह्यांच्या 'करण घेलो' या गुजराथी पुस्तकाचा अनुवाद), *महाराणी व्हिक्टोरिया यांचे चरित्र* (१८९७), *कुटुंबवत्सल* (आत्मकथन) अशी ह्यांची पुस्तके प्रसिद्ध आहेत.

*जुल्या बहिणी* या पुस्तकात औरंगजेबाची कडवी, क्रूर वृत्ती आणि त्याचाच पुत्र महंमदाचे पितृवात्सल्य यांचे दर्शन घडते. *महाराणी व्हिक्टोरिया* ह्या चरित्रात तिच्या जन्मापासून ते राजपुत्र व्हिक्टरच्या मृत्यूपर्यंतची माहिती असून, राणीच्या विविध गुणावगुणांवर प्रकाश टाकीत टाकीत तत्कालीन इंग्लंडचे व हिंदुस्थानचे चित्र रेखाटले आहे. *करण घायेला* या पुस्तकातून आपल्या प्राचीन राजकीय घराण्याबद्दलचा अभिमान व्यक्त होतो.

मंजिरी बेडेकर, कुंदा केळापुरे

**गुंजीकर, रामचंद्र भिकाजी :** (ज. १० एप्रिल, १८४३, जांबोटी, जिल्हा बेळगाव – मृ. १८ जून, १९०१, मुंबई). 'विविधज्ञानविस्तार' मासिकाचे आद्य संपादक. मराठीतील 'मोचनगड' या पहिल्या ऐतिहासिक कादंबरीचे जनक; मराठी लघुलिपीचे आद्य उत्पादक. प्राथमिक शिक्षण जांबोटी व बेळगाव येथे. मुंबईच्या एल्फिन्स्टन हायस्कूलमधून मॅट्रिक (१८६४) व त्याच हायस्कूलमध्ये शिक्षक (१८६७). १८८८ साली हुबळी ॲंग्लोव्हर्नाक्युलर शाळेत हेडमास्तर व १८९२ साली बेळगाव जिल्ह्याचे असिस्टंट डेप्युटी एज्युकेशनल इन्स्पेक्टर.

कॉलेजात असताना 'मित्रोदय' या वृत्तपत्रातून (१८६६) ते लेख लिहू लागले. इंग्लंडमधील 'एडिंबरो रिव्ह्यू' व 'कार्टर्ली रिव्ह्यू' या नियतकालिकांच्या धर्तीवर मराठीत मासिक निघावे या विचाराने जुलै १८६७ मध्ये 'विविधज्ञानविस्तारा'ची स्थापना झाली. त्याचे गुंजीकर हे पहिले संपादक. पण सरकारी नोकरीमुळे त्यांचे नाव अंकावर छापण्यात आले नव्हते. पहिल्या अंकात संपादकांनी या मासिकाचे स्वरूप पुढीलप्रमाणे स्पष्ट केले आहे : "याच्या परिमाणानुसार त्यात नानाविध विषयांचा संग्रह केला जाईल. शास्त्रीय विषय, देशज्ञान, विख्यात पुरुषांची चरित्रे, नवीन पुस्तकांचे गुणावगुणविवेचन, नीतिवादाचे निबंध इत्यादी अनेक विषयांचा संग्रह करणार आहो." गुंजीकरांना मराठी, संस्कृत व इंग्रजीबरोबरच गुजराती, कानडी व बंगाली याही भाषा अवगत होत्या. त्यामुळे या वाचनाच्या बळावर ते अनेक नावीन्यपूर्ण व विविध माहितीपूर्ण सदरे सजवू शकले. पहिली सात वर्षे (१८६७–७४) त्यांनी सातत्याने व परिश्रमपूर्वक संपादन केले. अनेक व्यासंगी विद्वानांचे सहकार्य मिळवून उच्च दर्जाचे ज्ञानप्रसारक नियतकालिक असा लौकिक त्यांनी 'वि. ज्ञा. वि.'ला मिळवून दिला. त्यांनी त्यात लिहिलेल्या लेखांतील काही निवडक लेख, *संकलित लेख, प्रथम खंड* (१९४२) यात आले आहेत. 'मराठी भाषा', मराठी भाषेचे कोश', 'देशभाषांची दुर्दशा', 'आपल्या भाषेची स्थिती', 'आपल्या भाषेचे पुढे काय होणार?', 'मराठी कविता', 'काव्यविचार', 'व्याकरणविचार' आदी त्यांतील लेख पाहिले म्हणजे त्यांचे सखोल विचार व तळमळ लक्षात येते. त्यांच्या चार स्नेह्यांनी मुंबईत सुरू केलेल्या (१० ऑक्टोबर, १८७१) 'दंभहादक' या मासिकासाठीही यांनी काही लेखन केले आहे.

नियतकालिकांसाठी चालणाऱ्या लेखनाबरोबरच त्यांचे स्वतंत्र ग्रंथलेखनही चालू असे. त्यांचे ग्रंथ पुढीलप्रमाणे : *मोचनगड* (ऐतिहासिक कादंबरी, १८७१), *गोदावरी* (अपूर्ण), *अभिज्ञान शाकुंतल* (भाषांतर, १८७०), *रोमकेतुविजया* (शेक्सपिअरच्या 'रोमियो व ज्युलिएट'चे भाषांतर १८७२), *विद्यावृद्धीच्या कामी आमची अनास्था* (व्याख्यान, १८८७), *सरस्वती मंडळ* (१८८४), *भ्रमनिरास* (१८८४), *सौभाग्यरत्नमाला* (१८८६), *कौमुदी महोत्सव*,

*भाग-१* (भट्टोजी दीक्षित यांच्या 'सिद्धान्त कौमुदी' या संस्कृत व्याकरण ग्रंथाचे भाषांतर, खंड १, २, ३ – १८७७; ४, ५–१८७८; ६ – १८७९), *सुबोधचंद्रिका* (भगवद्गीतेवरील मराठी टीका– १८८४), 'रामचंद्रिका', *कलडपरिज्ञान* (१८९५), *आपली लिपी किंवा अचिलरेने लिहिण्याची युक्ती* (१८७८), त्यांचे भाषा, व्याकरण, लिपि आदींसंबंधी 'रामचंद्र भिकाजी गुंजीकर : संकलित लेख' संपा. अ. का. प्रियोळकर, ह्या ग्रंथात संकलित केले आहेत. भाषा, व्याकरण, लिपि सुधारणा, लेखनशुद्धी हे यांच्या चिंतनाचे विषय होते. वाङ्मय क्षेत्रात वावरणाऱ्या अनेक समकालिनांना व उत्तरकालिनांना त्यांच्या लेखांनी विचारप्रवृत्त व कार्यप्रवृत्त केले. *मोचनगड*च्या रूपाने गुंजीकरांनी ऐतिहासिक कादंबरीचा एक उत्कृष्ट आदर्श निर्माण केला आहे. मराठीतील पहिली ऐतिहासिक कादंबरी म्हणून ती विशेष उल्लेखनीय आहे. शिवाजीच्या उदयकाळातील मराठ्यांचे जीवन व तत्कालीन वातावरण यांचे जिवंत चित्रण या कादंबरीत आढळते. *गोदावरी* पोर्तुगीजांच्या इतिहासाशी संबंधित अशी कादंबरी; पण ती पूर्ण होऊ शकली नाही.

ग. दे. खानोलकर, के. ए. पोतदार

संदर्भ : प्रस्तावना, 'रा. भि. गुंजीकर यांचे संकलित लेख' – संपा. अ. का. प्रियोळकर.

**गुणे, गंगाधरशास्त्री गोपाळ :** (ज. ७ मे, १८८२, अरवी, नगर – मृ. २० फेब्रुवारी, १९५१, पुणे). वैद्यकशास्त्रावरील ग्रंथांचे कर्ते. आयुर्वेदाश्रम फार्मसी लि. या कारखान्याचे संचालक व सुप्रसिद्ध वैद्य. १९१७ साली नगर येथे 'आयुर्वेद विद्यालया'ची स्थापना. १९१६ पासून 'भिषग्विलास' या वैद्यक शास्त्रावरील मासिकाचे तीन तपे संपादन. शंकराचार्यांकडून 'वैद्यपंचानन' या पदवीने गौरव. अखिल भारतीय आयुर्वेद महामंडळाचे अध्यक्ष (१९३८).

गुणेशास्त्री ह्यांनी *इन्फ्लुएन्झा अथवा घातकप्रचार ज्वर* (१९१९), *आयुर्वेदीय औषधि गुणधर्मशास्त्र* भाग १ ते ५ (१९२७ ते १९३४), *आयुर्वेदकलानिधी* (सहाय्यक-कवडे, कृष्णशास्त्री, आ. ५ वी १९३०), *सहस्रार व नाडीचक्रे* (१९३४), *आंत्रिक सन्निपात* (आ. २–१९३६), *आयुर्वेदीय चिकित्साप्रबोध* (१९५०), *दंडकज्वर, विषूचिका* आणि कै. का. रा. करंदीकर यांच्या *औषधीसंग्रह* नामक ग्रंथात 'रसगुणादी' वर एक विस्तृत उपोद्घात असे ग्रंथलेखन केले आहे. 'भिषग्विलास' मासिकातून २१ लेखांद्वारे *माझ्या आठवणी* (१९४२ ते १९४४) प्रसिद्ध केल्या.

*औषधिगुणधर्मशास्त्र* या ग्रंथात आयुर्वेदातील सिद्धौषधे व संयुक्त कल्प इत्यादी माहिती आहे. *आयुर्वेदकलानिधी* यात प्राचीन व अर्वाचीन ग्रंथांच्या साह्याने औषधिगुणधर्म व शारीरिक चिकित्सा दिलेली आहे. *चिकित्सा प्रबोध* या ग्रंथात पथ्यापथ्य व साध्यासुध्या वनस्पतींचा उपयोग याचे विवेचन आहे.

नंदिनी लोटलीकर, कुंदा केळापुरे

**गुणे, पांडुरंग दामोदर :** (ज. २० मे, १८८४, राहुरी, जिल्हा अहमदनगर – मृ. २५ नोव्हेंबर, १९२२). भाषावैज्ञानिक. शिक्षण अहमदनगर व मुंबई येथे. एम्.ए. १९०८ साली फर्ग्युसन कॉलेज, पुणे येथे संस्कृतचे प्राध्यापक. काही काळ सांगलीच्या विलिंग्डन कॉलेजमध्ये बदली. जर्मनीतील लाय्प्त्सिम विद्यापीठाची पीएच.डी. संपादन. भांडारकर प्राच्यविद्या संशोधन मंदिराच्या स्थापनेत (१९१६) पुढाकार.

डॉ. गुणे ह्यांचे मराठीतील लेखन पुढीलप्रमाणे. *जर्मनीतील लोकशिक्षण* (पुणे, १९१६, काही भाग 'ज्ञानप्रकाश'मधून १९११– १२ साली प्रकाशित). *मराठी कवितेच्या पूर्वीच्या व हल्लीच्या स्थितीविषयी तुलनात्मक प्रासंगिक विचार* (महाराष्ट्र साहित्य पत्रिका जुनी १ : ५, ६ – समावेश : विविध ज्ञानविस्तार, मे - जून, १९१४), *माझा युरोपचा प्रवास* (सचित्र, मुंबई १९१५); *कविमैत्री* (मनोरंजन, एप्रिल १९१५, शिलर व ग्योथे हे जर्मन कवी); *मराठी भाषेचा कालनिर्णय* (भारत इतिहास संशोधन मंडळ संमेलन वृत्त ६, १९२०); *अपभ्रंश भाषेतील वाङ्मय* (भा. इ. सं. मं. संमेलन वृत्त ७, १९२१) *फुलगुरु चिं. वि. वैद्य व मराठी भाषेची उत्पत्ती* [वि. ज्ञा. वि., जुलै, सप्टेंबर, ऑक्टोबर १९२२, पुरवणी : ऑक्टोबर १९२२; पुनर्मुद्रित; *मराठी भाषेची उत्पत्ती* (वैद्य-गुणे वाद), मुंबई-१९६८].

गुण्यांच्या भाषा वैज्ञानिक लेखनपद्धतीवर त्यांच्या जर्मनीतील अध्ययनाचा प्रभाव पडलेला आहे. ऐतिहासिक अंगावर त्यांचा विशेष भर दिसतो. त्यांचे प्रवासवर्णन मूलतः खाजगी पत्रांच्या स्वरूपाचे असल्याने त्यात सहजता व अकृत्रिमता आढळते. आधुनिक मराठी कवितेने घेतलेल्या नव्या वळणाचे त्यांनी स्वागत केले आहे. यांचा *ॲन इंट्रोडक्शन टू कम्पॅरिटिव्ह फिलॉलॉजी* (पुणे, १९१८) हा भाषाशास्त्रावरील इंग्रजी ग्रंथ, अत्यंत महत्त्वाचा आहे. 'ऐतिहासिक भाषाविज्ञान' हा विषय विद्यापीठीय अभ्यासक्रमात स्थिर करण्यास डॉ. गुण्यांच्या व्याख्यानांनी (मुंबई विद्यापीठ, १९१७-१८) विशेष साह्य झाले.

अशोक रा. केळकर; अ. अ. बडोदकर

**गुप्ते, नारायण मुरलीधर :** ० बी : (ज. १ जून, १८७२, मलकापूर, विदर्भ – मृ. ३० ऑगस्ट, १९४७, छिंदवाडा, म. प्रदेश). कवी, शिक्षण मॅट्रिकपर्यंत. जिल्हा न्यायाधीशाचे कचेरीत कारकून. वाशीम, मूर्तिजापूर, अकोला ह्या शहरी दीर्घकाळ वास्तव्य. १९२९ साली सेवानिवृत्त.

ह्यांची सर्व कविता 'बी' (Bee) या टोपण नावाने प्रसिद्ध झाली. *प्रणय-पत्रिका* ही पहिली प्रकाशित कविता. ती ह. ना. आपटे यांच्या 'करमणूक' पत्रात (१४ सप्टेंबर १८९१) प्रसिद्ध झाली. एका स्त्रीने परगावी गेलेल्या पतीला उद्देशून पाठविलेले वृत्तात्मक पत्र असे या कवितेचे स्वरूप आहे. त्यानंतर जवळजवळ वीस वर्षे त्यांची कविता कुठेही प्रसिद्ध झाली नाही. परंतु मासिक मनोरंजनात (जुलै १९११) त्यांची प्रतिभेच्या अलौकिक स्वरूपाचे वर्णन करणारी *वेडगाणे* ही कविता प्रसिद्ध होताच 'बी' कवींनी गोविंदाग्रज, ना. वा. टिळक यांच्यासारख्या कवींचे व रसिकांचे लक्ष वेधून घेतले आणि त्यानंतरच्या *चाफा, फुलांची ओंजळ, पिंगा, माझी कन्या* इत्यादी कवितांमुळे एक चिंतनशील तत्त्वज्ञ कवी म्हणून ते सर्वश्रुत झाले. त्यांच्या बहुसंख्य कविता 'मासिक मनोरंजन' मधून व काही 'चित्रमयजगत', 'करमणूक', 'विविधज्ञानविस्तार', 'महाराष्ट्र साहित्य पत्रिका', 'प्रतिभा', 'युगवाणी' ह्या नियतकालिकांतून प्रसिद्ध झाल्या. *फुलांची ओंजळ* (१९३४) हा त्यांच्या केवळ ३८ कवितांचा संग्रह. याच्याच दुसऱ्या आवृत्तीत (१९४७) जोडलेला *पिकले पान* हा त्यानंतरच्या ११ कवितांचा स्वतंत्र विभाग लक्षात घेतल्यास 'बी' कवींच्या एकूण उपलब्ध कवितांची संख्या ५० च्या आतच भरते. मात्र एवढ्या कमी कविता लिहूनही त्यांनी आधुनिक मराठी कवींत आपले स्वतंत्र असे स्थान आपल्या काव्यगुणांनीच निर्माण केले आहे. आचार्य अत्रे ह्यांनी 'फुलांची ओंजळ' या संग्रहाला लिहिलेल्या विवेचक प्रस्तावनेत "ते नावाने जरी 'बी' असले तरी त्यांचे कर्तृत्व 'ए-वन' दर्जाचे आहे" असे उद्‌गार काढून 'बी' हे केवळ पोएट नसून पोएट आणि फिलॉसफर आहेत" अशा शब्दांत त्यांचा गौरव केला आहे.

'बी' ची वैचारिक कविताही वैशिष्ट्यपूर्ण आहे. त्यांची ही वैचारिकता तत्त्वगर्भ व सर्व प्रकारच्या मानवी स्वातंत्र्याचा पुरस्कार करणारी आहे.

त्यांनी दीपण नावाने राजकीय स्वरूपाचे गद्यलेखनही केले आहे; मात्र ते स्वतंत्रपणे प्रकाशित झालेले नाही. त्यांच्या कवितेचे बाह्य रूप बरेचदा पंडिती काव्याला जवळचे वाटले, तरी प्रगतिवादी विचारांचे आविष्करण करणारी त्यांची कविता अंतरंगाने आधुनिक ठरते.

गं. दे. खानोलकर, व. कृ. वऱ्हाडपांडे

संदर्भ : (१) 'बी' कवी, 'फुलांची ओंजळ', 'प्रस्तावना' प्रस्तावनाकार आचार्य अत्रे. (२) मुक्ता केणेकर, 'बी' : चरित्र व काव्यचर्चा. (३) 'युगवाणी'-फेब्रुवारी १९४६. (४) वा. ल. कुलकर्णी, 'मराठी कविता : जुनी आणि नवी'; 'बी कवींची कविता'.

**गुप्ते, बाळकृष्ण आत्माराम ऊर्फ भाईसाहेब :** (ज. ८ जानेवारी, १८५१, भिवंडी, जि. ठाणे – मृ. ८ मार्च, १९२५, कलकत्ता). हिंदुस्थानातील शास्त्रसंबंधित व्यवहारोपयोगी ग्रंथांचे लेखक. प्राथमिक शिक्षण ठाणे येथे. इंग्रजी शिक्षण मुंबईस. इंग्रजी राज्यात व होळकरशाहीत अनेक महत्त्वाच्या व जबाबदारीच्या हुद्यांवर त्यांनी काम केले.

ह्यांनी कृषिशास्त्र, देशी कारागिरी (हुन्नर), आरोग्य, इतिहास, भूमिती अशा विविध विषयांवर सुमारे पस्तीस–चाळीस लहानमोठी पुस्तके लिहिली. *कृषिकर्मान्तर्गत रसायनशास्त्र व भूगर्भशास्त्र* (१८७९), *जूट व विलायती अंबाडी* (१८७९), *हिंदुस्थानातील लोकमत* (ली वार्नर यांच्या निबंधाचे भाषांतर–१८८०), *देशी हुन्नर अथवा हिंदुस्थान देशातील कारागिरीचे वर्णन* (१८८९), *दारू पिणे* (१८९०), *पश्चिम हिंदुस्थानातील हुन्नर* (१८९१), *दुष्काळ निवारण* (दु. आ. १८९१), *होळकरशाहीतील पोवाडे* (संपादन : १८९३), *कर्तव्य अथवा शिल्पकलोपयोगी भूमिती* (१८९६), *जीवन्तिक* (घर व शरीर यांची स्वच्छता-१९०४), *जुन्यात जुने मोडी लेख व त्यांचे जनकत्व* (१९०६), *स्मरणशक्तीची वृद्धि* (१९०६), *जातमाई जैन* (१९०७), *नोटस् ऑन ग्रँट डफस् हिस्ट्री ऑफ मराठाज्* (१९१२), *पिवेचा पिना* (१९१५) ही त्यांची लहानमोठी पुस्तके. *कृषिकर्मान्तर्गत रसायनशास्त्र* हे त्या कालखंडातील या विषयावरील बहुधा पहिलेच पुस्तक असावे. *देशी हुन्नर* या ग्रंथात भारतीय कारागिरी, कलाकुसर याविषयीच्या वस्तू व वस्तुविषयक शास्त्रीय माहिती देण्यात आलेली आहे.

नवयुग, विविधज्ञानविस्तार, महाराष्ट्र साहित्य, सरस्वती प्रकाश, शेतकरी इत्यादी तत्कालीन नियतकालिकांतून उपरोक्त विषयांपैकी काही विषयांवर त्यांनी स्फुट लेखन केलेले आहे. स्कूल ऑफ आर्ट येथील म्युझिअमचा कॅटलॉग, व्हिक्टोरिया व ऑल्बर्ट म्युझियम येथील कॅटलॉग यांची रचना त्यांनीच केली आहे. ते १८८१-८२ साली 'कायस्थ प्रभूंच्या इतिहासाची साधने' हे मासिक चालवीत होते.

नंदिनी खोटलीकर, के. ए. पोतदार

**गुप्ते, यशवंत राजाराम :** (ज. १६ सप्टेंबर, १८८१ – मृ. ११ मार्च, १९५९). चरित्रकार व स्थलवनर्णपर पुस्तकांचे लेखक. इतिहाससंशोधक. शिक्षण बी.ए., एम्.आर्.ए.एस्. (लंडन). शासनाच्या पुराणवस्तु खात्यात अधिकारी.

*कऱ्हाड* (स्थलवर्णन, प्राचीन अवशेष इत्यादी, १९२९, दु. आ.), *आमची परळीची* (सज्जनगडची) *यात्रा* (१९२८), *घारापुरीची लेणी* (१९४२), *सरदार सखाराम हरि गुप्ते* (चरित्र, १९४५), *खेड* (१९४६) ही यांची नवी माहिती देणारी पुस्तके. चरित्रग्रंथासह निबंधवजा पुस्तिका त्यांनी लिहिल्या. सरदार सखाराम हरि गुप्ते ह्यांच्या चरित्रग्रंथाद्वारा पेशवाईकडे पाहण्याचा एक वेगळा दृष्टिकोण मिळू शकतो.

हरिश्चंद्र थोरात, कुंदा केळापुरे

**गुरुजी, कृष्णाजी बाबाजी :** (ज. ३१ जुलै, १८४७, सातारा – मृ. १९ नोव्हेंबर, १९२२, महाडजवळील सरवली). चतुरस्त्र लेखक व पत्रकार. प्राथमिक शिक्षण सातारा येथे. स्वावलंबनाने इंग्रजी भाषेचे ज्ञान मिळवून काही काळ मुंबई सरकारच्या लोककर्म विभागात नोकरी. स्वाभिमानासाठी सरकारी नोकरीचा त्याग. लो. टिळक हे आराध्यदैवत, तर समर्थ रामदास हे आध्यात्मिक गुरू.

गुरुजींच्या *भवानी तलवार* या काव्यावर ब्रिटिश सरकारने जप्ती आणली होती. त्यांनी लिहिलेली पुस्तके पुढीलप्रमाणे *राष्ट्रीय सभा* (१८८९), *भीष्मचरित्र* (१८९०), *मारुतीचरित्र* (१८९०), *अभिमन्युचरित्र* (१८९१), *श्री मध्वाचार्य यांचे लघुचरित्र* (१८९८), *लो. बाळ गंगाधर टिळक यांचे पन्नास वर्षांचे चरित्र* (भाग १ – १९०६), *श्री गणेशोत्सव* (१९०१), *गोरक्षण का केले पाहिजे?* (१९०८), *नाटकाची स्थित्यंतरे* (प्रथम प्रसिद्धी – 'रंगभूमि', नोव्हेंबर, डिसेंबर १९११ व जानेवारी, मे, जून १९१२; प. आ.–१९१३, दु. आ.–१९७५), *चिरली अथवा योगायोग चमत्कार* (१९०२), *गंगू* (सामाजिक गोष्ट), *संगतिपरिणाम* (नाटक, क्रमशः प्रसिद्ध – 'रंगभूमी' जानेवारी ते ऑगस्ट १९१३), *निश्चयाची बांगडी व निश्चयाची पगडी*, *घागरगडचा सुभेदार* (नाटक, १९१५), *त्रिगुणात्मक गोसंगोपन* (१९२२), याशिवाय 'रंगभूमी' मासिकांतून त्यांचे बरेच स्फुटलेखन प्रसिद्ध झाले आहे.

गं. दे. खानोलकर, कुंदा केळापुरे

**गुर्जर, मुकुंद बाळकृष्ण :** (ज. १८६७ – मृ. २० जानेवारी, १९००). भारतीय राजकारणसंबंधीच्या पहिल्या अनुवादित मराठी ग्रंथाचे कर्ते. मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या आद्य संस्थापकांपैकी एक.

भाऊ महाजन ह्यांच्या 'प्रभाकर' पत्राचे (१८४१ – ५८) पुनरुज्जीवन त्यांनी केले. भारतीय परिस्थितीची मीमांसा करणाऱ्या वेगवेगळ्या विद्वानांच्या लेखांचा 'इंडियन पॉलिटिक्स' हा ग्रंथ *हिंदुस्थानची राजनीति* (१९०१) ह्या नावाने मराठीत भाषांतरित करीत असतानाच त्यांचे अकाली निधन झाले. भाषांतराचे उर्वरित काम नंतर र. ग. लिमये आणि श्री. नी. चापेकर ह्यांनी पूर्ण केले.

हरिश्चंद्र थोरात, कुंदा केळापुरे

**गुर्जर, सीताराम बाबाजी :** (ज. १८५१ – मृ. १ एप्रिल, १९४०). नाटककार व कादंबरीलेखक. अव्वल इंग्रजी काळातील मराठी वाङ्मयाच्या पहिल्या पिढीतील लेखक. *अश्वधाटी प्रबोधिका* (१८७८), *उदार दामोदर* (१८८०), *संगीत रत्नावली नाटिका* (१८८२) आणि *सीता* (१८८९) ही पुस्तके यांच्या नावावर प्रसिद्ध झालेली आढळतात.

*अश्वधाटी प्रबोधिका* म्हणजे पंडितराज जगन्नाथाच्या 'अश्वधाटी' या काव्यावरील पद्यात्मक साकी वृत्तातील भाष्य आहे. *उदार दामोदर* हे सात अंकी नाटक 'भक्तिविजय' व 'दामाजीपंताची रसाद' या आधारे संत दामाजीच्या जीवन-चरित्रावर लिहिले आहे. नाटकमंडळी 'दामाजीपंताचा फार्स' करीत. किर्लोस्करपूर्व काळातील नाटकाचे स्वरूप त्यातून कळते. *संगीत रत्नावली नाटिका* हा श्रीहर्षाच्या 'रत्नावली'चा अनुवाद आहे. मात्र तो शब्दशः नाही. *सीता* म्हणजे रामभार्या सीता, हिच्या जीवनावरील आधारलेली एक पौराणिक कादंबरी.

हरिश्चंद्र थोरात, कुंदा केळापुरे

**० गुलाबराव सीताराम :** पहा सुकथनकर, भालचंद्र

**गोखले, अवंतिकाबाई :** (ज. १७ सप्टेंबर, १८८२ – मृ. २६ मार्च, १९४९). चरित्रलेखिका. वयाच्या नवव्या वर्षी लग्न. त्यानंतर श्वसुरांच्या प्रोत्साहनाने घरीच इंग्रजी भाषेचे शिक्षण. इचलकरंजीच्या राणीसाहेबांबरोबर इंग्लंडला जाण्याची संधी प्राप्त. मुंबईस हिंद महिला समाजाच्या संस्थापिका.

महात्मा गांधींच्या आमंत्रणावरून अवंतिकाबाई बिहारमध्ये जाऊन चंपारण्यातील चळवळीत सहभागी झाल्या. तेथे गांधीजींच्या सान्निध्याचा त्यांना लाभ झाला. *महात्मा गांधी यांचे चरित्र* (१९१८) हे

ह्यांचे पुस्तक लो. टिळकांच्या प्रस्तावनेसह प्रसिद्ध झाले. चरित्राखेरीज गांधीजींचा विशेष परिचय, लेख व व्याख्याने ह्यात समाविष्ट आहेत. महात्माजींचे कार्य प्रत्यक्ष पाहिल्यामुळे व त्यांच्या जीवनक्रमाची प्रत्यक्ष माहिती मिळाल्यामुळे हे चरित्र चांगले उतरले आहे. महात्माजींच्या बालपणापासून तर खेडा व चंपारण जिल्ह्यातील त्यांच्या कार्यापर्यंतचा भाग या चरित्रात आढळतो. गांधीयुगाच्या आरंभकाळात महाराष्ट्राला गांधीजीवनाचा व विचारांचा प्रत्ययपूर्ण परिचय करून देण्याचे दृष्टीने अवंतिकाबाईंचे हे चरित्र लक्षणीय आहे.

पां. बा. गाडगीळ, रा. बा. बक्षी

**गोखले, केशव गोविंद :** (ज. १६ सप्टेंबर, १८९६–मृ. २९ मे, १९५२). साम्यवादी राजकारणविषयक लेखन करणारे ग्रंथकार व लघुचरित्रलेखक. प्रभावी वक्ते. शिक्षण बी.ए. पर्यंत. बेळगाव येथे वकिली. काँग्रेसच्या चळवळीत आठ वेळा कारावास (१९२१–४४). मुंबई कायदेमंडळाचे काही काळ सदस्य.

*आर्यावर्तातील तेजस्वी रत्ने* (१९३३) हे यांचे पहिले पुस्तक. जयरामदास दौलतराम, दरबार गोपाळदास, कुमारप्पा बंधू, बलवंतराय ठाकूर इत्यादी देशभक्तांची संक्षिप्त चरित्रे या पुस्तकात आहेत. *सोव्हिएट रशियाचा सर्वांगीण सर्वोदय* (१९४९) हा सुमारे तीन हजार पृष्ठांचा सप्त खंडात्मक ग्रंथ संकलनात्मक स्वरूपाचा आहे. १९१७ ते १९४७ ह्या कालखंडातील रशियन राष्ट्रजीवनाचे वर्णन या ग्रंथात आढळते. *नवचीन* (१९५३) हा क्रांतिकाळातील चीनचे चित्रण करणारा ग्रंथही माहितीपूर्ण आहे.

हरिश्चंद्र थोरात, रा. बा. बक्षी

**गोखले, गंगाधर विश्वनाथ ऊर्फ नानासाहेब :** (ज. २१ डिसेंबर, १८८९, कोल्हापूर–मृ. १ ऑक्टोबर, १९६०, पुणे). नाटककार. मॅट्रिकपर्यंत शिक्षण. १९२३ मध्ये पत्रव्यवसायात प्रवेश. 'अरुणोदय नाटक मंडळी'चे (१९२९–३७) संस्थापक. गोखले यांनी सुमारे वीस-पंचवीस नाटके लिहिली. *सं. प्राणप्रतिष्ठा* (१९२८) हे पहिले नाटक. स्वराज्याचे तोरण बांधण्याच्या ऐतिहासिक घटनेवरील ह्या नाटकाचे प्रयोग बालमोहन मंडळी करीत असे. सद्वर्तनी व दुर्वर्तनी विद्यार्थ्यांच्या विरोधावर आधारलेले *सं. विद्यार्थी* (१९३१), फॅशनच्या आहारी गेलेल्या तरुणीबरोबरच नव्या-जुन्याचा समन्वय साधणाऱ्या तरुणीचे जीवनचित्रण करणारे *कॉलेज कुमारी* (१९३५) आणि एका प्रथितयश साहित्यिकाच्या, कलेच्या व पुरोगामीपणाच्या नावावर चालणाऱ्या, निंद्य व ढोंगी व्यवहाराचे चित्र रेखाटणारे *नवे राज्य* (१९४३) यासारख्या सामाजिक नाटकांप्रमाणेच *सैरंध्री* (१९३५) हे पौराणिक व उत्तर पेशवाईतील शाहीर अनंतफंदी ह्यांच्या जीवनावरील *अनंतफंदी* (१९५७) हे नाटक प्रसिद्ध आहे. त्यांच्या नाटकांचे एकूण स्वरूप पारंपरिक आहे.

शुभदा सबनीस, अंजली वऱ्हाडपांडे

**गोखले, विष्णु भिकाजी :** ० विष्णुबाबा ब्रह्मचारी : (ज. २० जुलै, १८२५, शिरवली, जि. ठाणे – मृ. १७ फेब्रुवारी, १८७१, मुंबई). वेदोक्त धर्माचे प्रचारक व ख्रिस्तीमताचे खंडनकर्ते लेखक. अव्वल इंग्रजी आमदानीत जन्म. इंग्रज सरकारच्या कस्टम खात्यात नोकरी. वयाच्या विसाव्या वर्षी ईश्वरसाक्षात्कार व नंतर आत्मज्ञान प्राप्तीसाठी मंत्रोपदेश. वेदोक्त धर्माच्या प्रसारासाठी आमरण भ्रमंती.

*वेदोक्त धर्मप्रकाश* (१८५९) हा ह्यांचा सुप्रसिद्ध ग्रंथ. ह्यांनी ख्रिस्ती धर्माच्या 'जुन्या' व 'नव्या' करारांचा सूक्ष्म अभ्यास केला असल्याने ख्रिश्चन धर्मप्रचारकांच्या प्रचारातील विसंगती ते साधार दाखवीत. ख्रिस्ती धर्मशास्त्र हे परमेश्वर प्रणीत नसून मनुष्यप्रणीत आहे व म्हणून ते अपूर्ण विचारांचे आहे असे ते सिद्ध करीत. ख्रिस्ती धर्ममताचे खंडन करीत असतानाच ते ज्या मानवी धर्माचे मंडन करीत त्याला ते 'वेदप्रतिपाद्यधर्म', 'वेदोक्तधर्म', 'वैदिक धर्म' म्हणत व त्याचे मूळ वेदग्रंथात आहे असे सांगत. *वेदोक्त धर्मप्रकाश* या ग्रंथात त्यांनी हे सारे विचार चोवीस प्रकरणांतून नमूद केले आहेत.

वरील ग्रंथाशिवाय *भावार्थ सिंधू* (१८५६) हा यांचा ओवीबद्ध पंचप्रकरणी ग्रंथ प्रसिद्ध असून 'मनुष्यजाती असे एक। हेच ज्ञान सम्यक' ही त्यातली भूमिका आहे. *राजनीती* (१८५९) हा राजकारणविषयक मते व्यक्त करणारा निबंध ('वेदोक्त धर्मप्रकाश'च्या प्रथमावृत्तीत १५ वे प्रकरण म्हणून समाविष्ट) व *सुखदायक राज्यप्रकरणी निबंध* (१८६७) हा स्वतंत्र पुस्तिकारूपाने प्रसिद्ध झालेला निबंध प्रसिद्ध आहे. हे दोन्ही निबंध मुंबईच्या 'मराठी संशोधन मंडळा'ने 'विष्णुबुवा ब्रह्मचारी ह्यांचे राजनीतिविषयक निबंध, (१९७५) या नावाने प्रसिद्ध केले. या दोन्ही निबंधातील विचार अत्यंत पुरोगामी व क्रांतिकारक आहेत. *चतुःश्लोकी भागवत* (१८६७), *सहजस्थितीचा निबंध* (१८६८), *गीतेवरील सेतुबंधनी टीका* (मृत्यूनंतर प्रकाशित-१८९०) यासारखी लहानमोठी पुस्तकेही त्यांनी लिहिली. त्यांनी ख्रिस्तीधर्मप्रचारकांशी ठाकुरद्वार (मुंबई) येथील समुद्रकिनाऱ्यावर सुमारे वीस सभांतून जाहीर वादविवाद केला होता. हा वादविवाद बोएन या पाद्र्याने 'समुद्रकिनारीचा वादविवाद' (१८७२) ह्या शीर्षकाखाली पुस्तकरूपाने प्रसिद्ध केला.

गं. दे. खानोलकर, रा. बा. बक्षी

**गोखले, शंकरशास्त्री रघुनाथशास्त्री :** (ज. २२ मार्च, १८५७, गावखडी, ता. राजापूर – मृ. २१ ऑक्टोबर, १९०४, कोल्हापूर). ग्रंथकार, पत्रकार व नाटककार. शालेय शिक्षण पाच इयत्तापर्यंत. त्यानंतर वैद्यकाचा अभ्यास. काही काळ वैद्यकीचा व्यवसाय. त्यानंतर 'विद्याविलास' हा कोल्हापुरातील पहिला टाइपाचा कारखाना यांनी काढला (१८८५). पुढे *विद्याविलास* हे आरंभी मासिक व नंतर साप्ताहिक द्विसाप्ताहिक स्वरूपाचे नियतकालिकही काढले. *तत्त्वप्रकाशक* (१८९२) हे वेद, वेदांगे व उपांगे ह्यातील मंत्र, ऋचा, मंत्रद्रष्टे व ऋचांचा थोडक्यात सारांश देणारे मासिक यांनी वर्षभर चालविले. *हेमाद्री* (वैद्यविद्याविषयक); *वैद्यवर्ग वाग्भट* (१८९१), *संसर्गजन्य व्याधिक अथवा गर्मीचे विकार* (१८९५), *संगीत रासोत्सव* (पौराणिक नाटक, १८९७), *आर्यांच्या चोदा विद्या* (इतिहास, १९०४), *प्रल्हादचरित्र* ही यांची पुस्तकेही प्रसिद्ध आहेत.

गं. दे. खानोलकर, रा. बा. बक्षी

**गोगटे, गणेश वामन :** ० लीला : (ज. १८७४, गोळप, जिल्हा रत्नागिरी – मृ. १९२९). स्वामी विवेकानंदांच्या समग्र ग्रंथांचे भाषांतरकार, चरित्रकार व कथालेखक. शिक्षण पुणे येथे. मॅट्रिकनंतर काही काळ मुंबई येथे वैद्यकीय शिक्षण, नंतर ते सोडून घड्याळ दुरुस्ती व लेखन हा व्यवसाय.

'राष्ट्रमत', 'मनोरंजन' ह्या नियतकालिकांतून ह्यांचे लेखन प्रसिद्ध झाले आहे. वेदान्त विषयाच्या आवडीमुळे यांनी स्वामी विवेकानंदांच्या समग्र इंग्रजी ग्रंथांचे मराठीत भाषांतर केले. ह्या अनुवादाचे तेरा खंड प्रसिद्ध झाले आहेत. पहिला खंड १९१२ मध्ये प्रकाशित झाला. शिकॅगो येथील जागतिक धर्मपरिषदेतील विवेकानंदांच्या सुप्रसिद्ध व्याख्यानापासून (११ सप्टेंबर, १८९६) तर त्यांच्या मृत्यूपर्यंतच्या (४ जुलै, १९०६) काळातील व्याख्याने, लेख, पत्रे, उपदेश इत्यादी त्यांच्या साहित्याचा समावेश या समग्र ग्रंथात झाला आहे. हा अनुवाद आशयनिष्ठ आहे आणि रसाळही. यातील काही भाग *कर्मयोग* (१९६२), *पातंजल योगसूत्रे* (१९६२), *राजयोग* या नावांनी स्वतंत्र पुस्तकरूपानेही प्रकाशित झाला आहे.

ह्यांनी 'लीला' या टोपणनावाने 'मासिक मनोरंजन' मधून बऱ्याच लघुकथा व रहस्यकथा लिहिल्या. १९०० साली 'बाबुराव पंडित' हे नाव

देऊन शेरलॉक होम्स ही व्यक्तिरेखा मराठीत आणली. भारतगौरव-ग्रंथमालेतून त्यांची अनेक पुस्तके प्रसिद्ध झाली. *कौंट टॉलस्टॉय चरित्र खंड १-५*, *केसरची प्रभावळ*, *प्रिन्स बिस्मार्क*, *ज्ञानदीप* इत्यादी पुस्तके या संदर्भात उल्लेखनीय आहेत. स्वामी विवेकानंदांच्या विचारांचा महाराष्ट्राला परिचय करून देण्याच्या बाबतीत यांचा महत्त्वाचा वाटा आहे.

उषा टाकळकर, मीनल निसळ

**गोडबोले, कृष्णाजी पांडुरंग** : (ज. १ सप्टेंबर, १८३१, वाई – मृ. २२ नोव्हेंबर, १८८६, पुणे). व्याकरणकार, गणित आणि ज्योतिःशास्त्र ह्या विषयांचे लेखक. मराठी, संस्कृत व इंग्रजी शिक्षण पुण्याच्या विश्रामबाग पाठशाळेत. वडिलांच्या सान्निध्यात गणित विषयाची आवड व अध्ययन. विविध शिक्षणसंस्थांत अध्यापक. सिंधी व फार्शी भाषांचे जाणकार.

ह्यांची *ग्रहलाघव* (१८५६, १८७३), *ज्योतिःशास्त्र* (१८६२), *मराठी भाषेचे नवीन व्याकरण* (१९६७), *युक्लिडची पहिली चार पुस्तके* (१८७४), *बालसंगोपन* (१८८०), *सिंधी भाषेतील अंकगणित सिंधी भाषेचे निरुपण*, अशी काही छोटेखानी पुस्तके लिहिली. ह्यांपैकी *ग्रहलाघव* हे गणेश दैवज्ञाच्या संस्कृत करणग्रंथाचे भाषांतर असून ते वामन कृष्ण जोशी (गद्रे) ह्यांच्या सहकार्याने तयार केले. *ज्योतिःशास्त्र* हे चेंबर्सच्या इंग्रजी पुस्तकाच्या आधारे लिहिले आहे. *मराठी भाषेचे नवीन व्याकरण* हे त्यांचे सर्वात महत्त्वाचे पुस्तक 'दक्षिणा प्रैझ कमिटींच्या जाहीर सूचनेवरून (१८६३) त्यांनी लिहिले. ह्याच्या तीन आवृत्त्या (१८६७, १८७४, १८९५) प्रसिद्ध झाल्या. मराठी गद्यात व विशेषतः पद्यात येणाऱ्या संस्कृत आणि अन्य साधित शब्दांचे विवेचन बऱ्याच प्रमाणात केले आहे. प्रत्येक नवीन आवृत्तीत त्यांनी माहितीची अधिकाधिक भर घातलेली दिसते. ऐतिहासिक दृष्टी, स्वतंत्र विचारसरणी, अनेक भाषांचा तुलनात्मक विचार, संस्कृत व प्राकृत भाषांच्या संदर्भात मराठी प्रत्ययांची उपपत्ती शोधण्याचा प्रयत्न, वाक्यविचार व व्युत्पत्तिविचार इत्यादींमुळे गोडबोले यांचा हा व्याकरण ग्रंथ महत्त्वाचा ठरला आहे. वेदांचे प्राचीनत्व दर्शविणारा इंग्रजी लेख थियॉसॉफिस्ट मासिकात (१८८२) प्रसिद्ध झाला असून ज्योतिर्गणिताच्या आधारे वेदकाल शकपूर्व ३० हजार वर्षे जुना आहे असे त्यात म्हटले आहे.

गं. दे. खानोलकर, रा. बा. बक्षी

**गोडबोले, कृष्णाजी बल्लाळ** : (ज. १८४९ – मृ. ७ नोव्हेंबर, १९३८, मुंबई). चरित्रकार व अनुवादक. प्राथमिक, माध्यमिक शिक्षण रत्नागिरी येथे. मॅट्रिक (१८६७) वडिलांच्या आकस्मिक मृत्यूमुळे कॉलेज सोडून कुरुंदवाड संस्थानात (धाकटी पाती) नोकरी.

ह्यांची *अनाथ पांडुरंग* (१८८८, १९१३), *हिंदुस्थानातील राजेरजवाड्यांचा इतिहास* (१८९२), *रॉबिनहुडचे चरित्र* (१९०३), *माउंट स्टुअर्ट एल्फिन्स्टनचे चरित्र* (पूर्वार्ध १९११; उत्तरार्ध १९१२), *ड्युप्लीचे चरित्र* (१९१५) ही पुस्तके प्रसिद्ध आहेत.

*अनाथ पांडुरंग* हे पुस्तक म्हणजे विल्यम ब्राऊन हॉक्ले (१७९२–१८६०) ह्याने लिहिलेल्या 'पांडुरंग हरी' (१८२६) ह्या इंग्रजी कादंबरीचा अनुवाद होय. ह्या कादंबरीत दुसऱ्या बाजीराव पेशव्यांच्या कारकिर्दीच्या शेवटच्या दिवसांचे वर्णन आहे. राज्यातील सर्वत्र माजलेल्या गोंधळाच्या व अनागोंदीच्या अवस्थेचे वास्तव शब्दचित्र या कादंबरीत पहावयास मिळते. भाषांतर सुबोध, सरळ व स्वाभाविक असून तिला दक्षिणा प्राईज कमिटीचे ३०० रुपयांचे बक्षीस मिळाले होते. एल्फिन्स्टन व ड्युप्ले या अनुक्रमे इंग्रज व फ्रेंच मुत्सद्यांची चरित्रे गोडबोल्यांनी लिहिली आहेत. एल्फिन्स्टनचे चरित्र बरेच विस्तृत म्हणजे ६६० पृष्ठांचे आहे. रोजनिशा, अस्सल कागदपत्रे व अधिकृत ग्रंथ यांचा काळजीपूर्वक अभ्यास करून ते लिहिले गेलेले आहेत. एल्फिन्स्टन हा महाराष्ट्राचा हितकर्ता होता, या भक्तिभावनेने लिहिलेल्या या चरित्राची शैली अत्यंत आकर्षक आहे. हिंदुस्थानास फ्रान्सने आपल्या अमलाखाली आणावा असे विचार मांडणारा ड्युप्ली (१६९१–१७६४) हा पहिला युरोपियन मुत्सद्दी. ह्याचे गोडबोल्यांनी लिहिलेले चरित्र हे वृत्तान्तवजा असले तरी बोधप्रद आहे. *हिंदुस्थानातील एतद्देशीय विद्यमान राज्ये, संस्थाने व जहागिरी यांचा इतिहास*, पूर्वार्ध (१८९२) हा त्यांचा ग्रंथ म्हणजे कर्नल मॅलेसनच्या 'ॲन हिस्टॉरिकल स्केच ऑफ दि नेटिव्ह स्टेट्स् ऑफ इंडिया' या ग्रंथाचा अनुवाद होय.

गं. दे. खानोलकर, रा. बा. बक्षी

**संदर्भ** : रघुवंश काव्यावर प्राकृत पद्यात्मक टीका, १९२५. मुंबई इलाख्याचे प्रसिद्ध गव्हर्नर मा. मौंट स्टुअर्ट एल्फिन्स्टनसाहेब यांचे चरित्र – पूर्वार्ध १९११, उत्तरार्ध १९१२.
Col. Meadows Taylor कृत Pandurang Hari च्या आधारे कुरुंदवाड, भाऊनाना १८८८, २ री आवृत्ती, गोवर्धन, पुणे, दुर्मिळ.

**गोडबोले, परशुराम बल्लाळ** : (ज. १७९९, वाई – मृ. ३ सप्टेंबर, १८७४, पुणे). कवी, काव्यसंकलक व संस्कृत नाटकांचे भाषांतरकार. वाई येथे अध्ययन. मुंबईच्या नेटिव्ह एज्युकेशन सोसायटीत सहाय्यक म्हणून काम. काही काल पुण्याच्या कलेक्टर कचेरीत व नंतर पुणे पाठशाळेच्या छापखान्यात सुपरिंटेंडेंट. १८४७ पासून मराठी ट्रान्सलेटर व रेफरी असलेल्या मेजर कँडीकडे साहाय्यक पंडित म्हणून नियुक्ती.

परशुराम तात्या मुंबईस असताना नेटिव्ह एज्युकेशन सोसायटीतर्फे 'महाराष्ट्र भाषेचा कोश' तयार करण्यासाठी नेमलेल्या विद्वान मंडळीत त्यांची निवड झाली होती. मोल्सवर्थचा मराठी-इंग्रजी कोश व डॉ. स्टीव्हनसनचे मराठी व्याकरण तयार करण्यात तात्यांनी मदत केली. मे. कँडीचे मदतनीस पंडित म्हणून काम करताना मराठी पुस्तकांच्या तपासणीचे व शिक्षण खात्याचा वार्षिक अहवाल लिहिण्यात मदत करण्याचे काम ते करीत. मेजर कँडीच्या मते त्या काळातील अनेक विद्वानांत तात्या हे भाषांतर करण्यात अधिक कुशल होते.

तात्यांनी पुढील सहा संस्कृत नाटकांची मराठीत भाषांतरे केली :– (१) *वेणीसंहार* (१८५७); (२) *उत्तर रामचरित्र* (१८५९), (३) *शाकुंतल* (१८६१), (४) *मृच्छकटिक* (१८६२), (५) *नागानंद* (१८६५) व (६) *पार्वती-परिणय*. मराठीची जुनी परंपरा व प्रकृती लक्षात घेऊन त्यांनी ही भाषांतरे केली; व संस्कृत भाषेची प्रौढी, शब्दसौंदर्य आणि अर्थगौरव हे त्यांनी मराठीत आणले. भाषांतर करताना गद्याच्या ठिकाणी गद्य व पद्याच्या ठिकाणी पद्ये यांची योजना केली. मात्र ही पद्ये करताना मराठी प्रकृतीला धरून ओवी, अभंग, साकी, दिंडी, लावणी, कटाव अशा लोकपरिचित मराठी छंदांचा व गेय पदांचा त्यांनी वापर केला. ते चांगले कवीही होते व तत्कालीन मराठी क्रमिक पुस्तकांतील नव्या कविता बहुतेक त्यांच्याच होत्या. *मराठ्यांच्या इतिहासावर लहान मुलांकरिता सोपी कविता* (१८६४), *बालबोधामृत* (१८७४), *गंगामहात्म्य* हे पद्यग्रंथ त्यांनी रचले असून *वृत्तदर्पण* (१८६०) हे छंदविषयक छोटे पुस्तक व *केकादर्श* (१८६७) ही मोरोपंतांच्या श्लोक केकावलीवरील तात्यांची गद्यटीका महत्त्वपूर्ण आहे. ते प्राचीन मराठी कवितेचे व्यासंगी होते व 'सर्वसंग्रह' कार माधव चंद्रोबा डुकले यांच्या जुन्या मराठी काव्यसंपादनाच्या कार्यात तात्यांचे त्यांना फार मोठे साह्य लाभले होते. विष्णुशास्त्री चिपळूणकर व इतिहासाचार्य राजवाडे ह्यांनीही तात्यांचे हे ऋण मान्य केले आहे.

तात्यांचे सर्वात महत्त्वाचे कार्य म्हणजे 'महाराष्ट्र भाषेतील कवितांचे वेचे' त्यांनी *नवनीत* (१८५४) ह्या नावाने संकलित करून मराठी

रसिकांना सादर केले हे होय. मुकुंदराज, ज्ञानेश्वरादी संतांपासून तर देवनाथ-राम जोशीपर्यंतच्या कवींची काव्ये, तसेच हिंदुस्थानी भाषेतील काही पदे व दोहरे, संस्कृतमधील काही काव्ये, आरत्या इत्यादींचा समावेश या *नवनीतात* असून काही कवींची त्रोटक चरित्रेही त्याला जोडली आहेत. इंग्रजी आमदानीतील नवशिक्षितांची वाङ्मयीन अभिरुची वाढविण्याचे कार्य या ग्रंथाने केले. तांत्यांच्या हयातीतच ह्याच्या आठ आवृत्त्या निघाल्या होत्या. ह्याची शेवटची शतसांवत्सरिक १८ वी आवृत्ती १९५७ साली प्रसिद्ध झाली. *नवनीत*, भाग २रा (१८६३) हा ग्रंथही त्यांनी तयार केला होता.

कृ. भि. कुलकर्णी, व. कृ. वऱ्हाडपांडे

संदर्भ : व. दि. कुलकर्णी, 'परशुरामतात्या गोडबोले;' 'नवनीतकार,' 'अर्वाचीन मराठी सारस्वतकार.'

**गोडबोले, रघुनाथ भास्कर :** (ज. १८२०, वाई–मृ. जुलै १८८७). कोशकार. प्राचीन मराठी कवितेचे अभ्यासक व संपादक. पुणे येथे इंग्रजी भाषेचे शिक्षण. काही वर्षे लष्करात कारकुनी. नंतर शाळाखात्यात शिक्षक.

ह्यांनी *हंसकोश* (१८६३), *मराठी भाषेचा नवीन कोश* (१८७०), *भारतवर्षीय प्राचीन ऐतिहासिक कोश* (१८७६), *श्री ज्ञानेश्वरी परिभाषा* (१८७७) व *भरतखंडाचा अर्वाचीन कोश* (१८८१) हे पाच कोश तयार केले असून *विवेकसिंधू* (१८७५) व *ज्ञानदेवगाथा* ह्या काव्यग्रंथांचे संपादनही ह्यांनी केले आहे.

'हंसकोशा'त मराठी कवितांतील कठीण व निवडक अशा दुर्बोध शब्दांचा सुबोध अर्थ दिलेला आहे. याच्या पहिल्या भागात कवीचे वर्णन, कवितांमधील वेचे, कवितांमधील प्रत्यय, अव्यये, गुणविशेषणे व क्रियाविशेषणे, क्रियापदे व शब्दांचे रूपांतर नियम दिले असून दुसऱ्या भागात शब्दार्थ कोश आहे. एकूण शब्दसंख्या सात हजारांवर आहे. 'मराठी भाषेचा नवीन कोश' हा त्यांनी मुंबई सरकारच्या विद्याखात्याच्या हुकूमांवरून रचलेला सुटसुटीत असा कोश आहे. 'भारतवर्षीय प्राचीन ऐतिहासिक कोशा'त भरतवर्षात पूर्वी होऊन गेलेल्या प्रख्यात स्त्री-पुरुषादी व्यक्ती, तसेच नद्या पर्वतादी स्थाने, राजधान्या इत्यादींची वर्णक्रमानुसार माहिती आढळते. ठिकठिकाणी पुराणांचे, स्थलांच्या आकड्यांसहित आधार दिलेले आहेत. मराठी भाषेतील अशा रीतीचा हा पहिलाच कोश होय. पौराणिक व्यक्तिचित्रे, स्थळे व घटना ह्या बाबतीत हा कोश विश्वसनीय आहे. 'भरतखंडाचा अर्वाचीन कोश' ह्यात युधिष्ठिर शकाच्या आरंभापासून आजपावेतो भारतात होऊन गेलेल्या नामांकित पुरुषांची चरित्रे, विश्वसनीय पद्धतीने व शकमितीवार दिली आहेत. 'श्रीज्ञानेश्वरी परिभाषा' हा ग्रंथ रावजी श्रीधर गोंधळेकर ह्यांनी १८७७ साली प्रसिद्ध केलेल्या 'ज्ञानेश्वरी' सोबत देण्यासाठी तयार करण्यात आला. ज्ञानेश्वरीतील कठीण शब्दांचा अर्थ समजण्यास व त्यातील काव्यसौंदर्याचे आकलन करण्यास प्रस्तुत कोश अत्यंत उपयुक्त असल्याचा अभिप्राय विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी दिलेला आहे.

गं. दे. खानोलकर, रा. बा. बक्षी

**गोडबोले, रावजी बल्लाळ :** (अंदाजे एकोणिसाव्या शतकाचा चतुर्थ पाद व विसाव्या शतकाचा प्रथम पाद). आद्य शंकराचार्यांच्या ग्रंथांचे अनुवादक. औंध येथील हायस्कूलचे बराच काळ मुख्याध्यापक व पुण्याच्या ब्रह्मर्षी अण्णासाहेब पटवर्धनांचे शिष्य.

ह्यांनी श्रीशंकराचार्यांच्या *प्रबोधसुधाकर* व *वेदान्तकेसरी* या ग्रंथांचा पद्यानुवाद (अनुक्रमे १९१६ व १९१७) केला आहे. हा अनुवाद आर्याबद्ध असून शक्य तितका मूलानुसारी आहे. लो. टिळकांच्या काळातील 'स्वराज्याच्या मोहिमां'स उद्देशून लिहिलेले *नृपभिक्षुगीत* (१९१७) हे स्वतंत्र प्रबोधनपर काव्यही प्रसिद्ध आहे.

गं. दे. खानोलकर, अंजली कुलकर्णी

**गोडबोले, रावजीशास्त्री सदाशिवशास्त्री :** (ज. १८३४, वाई –मृ. ८ सप्टेंबर, १८९१, पुणे). भाषांतरकार व व्याकरणकार. मूळचे वाईचे. व्यवसाय भिक्षुकीचा. चरितार्थासाठी पुण्यास आगमन. तेथे विश्रामबाग वाड्यातील पाठशाळेत अध्ययन. काही काळ इंग्रजी अधिकाऱ्यांस मराठी शिकविण्याचे काम. नंतर सरकारी शाळाखात्यात नोकरी. 'दक्षिणा प्राइझ कमिटी'चे चिटणीस म्हणून पंचवीस वर्षे काम. त्यानंतर 'मराठी ट्रान्स्लेटर' म्हणून नेमणूक.

*महाराष्ट्र देशाचा संक्षिप्त इतिहास* (१८७६) हे पाठ्यपुस्तक व *हिंदुस्थानातील लोकांचा संक्षिप्त इतिहास* (१८८५) व *रॉबिन्सन क्रुसो ह्याचे चरित्र* (भाग १ ला, १८७१) ही अनुक्रमे हंटर व डानियल डीफो यांच्या इंग्रजी पुस्तकांची भाषांतरे प्रसिद्ध असून, *मराठी भाषेचे मध्यम व्याकरण* (१८९७) हे यांचे स्वतंत्र पुस्तक आहे. नारायणशास्त्री साठे व नारायण धोंडदेव जोशी ह्या दोघांच्या मदतीने रावजीशास्त्र्यांनी हे पुस्तक लिहिले. 'मराठी ट्रान्स्लेटर'च्या पदावरून शालोपयोगी मराठी पुस्तके स्वतः लिहिणे व लिहवून घेणे, ती छापविणे इत्यादी कामेही यांनी केली.

गं. दे. खानोलकर, अंजली कुलकर्णी

**गोडसे (वरसईकर), विष्णु बाळकृष्ण :** ० गोडसे भटजी : (ज. १८२७, वरसई, ता. पेण, जि. कुलाबा – मृ. १९०१). प्रवासवृत्त - लेखक. याज्ञिकी जाणणारे भिक्षुक. द्रव्यार्जनासाठी १८५७ च्या मार्चमध्ये उत्तर हिंदुस्थानात यांनी प्रयाण केले. परंतु १८५७ च्या क्रांतियुद्धात काही काळ अडकून पडल्याने ते अडीच वर्षांनी जन्मगावी परतले.

*माझा प्रवास अथवा १८५७ सालच्या बंडाची हकीकत* (१९०७) हे ह्यांचे प्रवासवर्णन प्रसिद्ध आहे. गोडसे उत्तर हिंदुस्थानात प्रवासात असताना, अठराशे सत्तावनच्या धुमश्चक्रीचे स्वरूप त्यांना जवळून पाहता आले. झाशी येथे राणी लक्ष्मीबाईच्या आश्रयालाही ते राहिले होते. ह्यासंबंधीचे आपले अनुभव त्यांनी १८८४ च्या सुमारास लिहून काढले. इतिहासकार चिं. वि. वैद्यांना ह्या लिखाणाच्या वह्या उपलब्ध झाल्यावर, त्यांनी आवश्यक ते संपादकीय संस्कार व बदल करून हा प्रवासवृत्तान्त (१९०७ साली) प्रसिद्ध केला. ह्याची दुसरी आवृत्ती (१९४८) प्रा. न. र. फाटकांच्या प्रस्तावनेसह प्रसिद्ध झाली. म. म. दत्तो वामन पोतदार यांनी गोडसे भटजींच्या मूळ हस्तलिखितास तंतोतंत अनुसरणारी चौथी आवृत्ती (१९६६) प्रसिद्ध केली. मराठीतील आद्य प्रवासवर्णन म्हणून हा वृत्तांत महत्त्वाचा आहे. शिवाय १८५७ च्या युद्धाचे एका एतद्देशियाचे प्रत्यक्षानुभवाच्या आधारे केलेले वर्णन म्हणूनही तो मोलाचा आहे. तत्कालीन समाजस्थितीचे वास्तव दर्शनही या पुस्तकातून चांगले घडते. या प्रवासवर्णनाची शैलीही लक्षणीय आहे.

हरिश्चंद्र थोरात, मीनल निसळ

**गोरे, नीळकंठशास्त्री शिवरामशास्त्री (नेहमिया गोरे) गोऱ्हे :** (ज. ८ फेब्रुवारी, १८२५–मृ. २९ ऑक्टोबर, १८९५). हिंदुधर्माचा त्याग करून अँग्लिकन चर्चद्वारा खिस्ती धर्मात गेलेला पहिला व्युत्पन्न महाराष्ट्रीय ब्राह्मण. मूळ घराणे चित्तपावन. पेशवाईच्या अस्तानंतर व दुसरे बाजीराव पेशवे ब्रह्मावर्ती स्थिरावल्यानंतर, जी महाराष्ट्रीय कुटुंबे उत्तर भारतात चरितार्थासाठी गेली त्यांतील एक कुटुंब दिनकरराव गोरे यांचे. बांद संस्थानचे दिवाण म्हणून चाकरीस लागले. १८२६ मध्ये वयाच्या सत्तराव्या वर्षी त्यांचे निधन झाले. त्यांना चार मुलगे. शिवराम हा थोरला. या शिवरामपंतांचा नीळकंठ हा मुलगा. जन्म ८ फेब्रुवारी, १८२५ रोजी नीळकंठाच्या जन्माच्या वेळी कुटुंब काशी येथे स्थानांतरित झाले होते. शिवरामशास्त्री यांचा वेद, उपनिषदे, पुराणे इत्यादींचा व्यासंग होता. व्यवसाय शास्त्री-पुराणिकांचा. आनुवंशिक

विद्वता प्राप्त करून हाच वडिलोपार्जित व्यवसाय करून नीळकंठ गोरेंनी आयुष्याची वाटचाल प्रारंभिली. काशीच्या रस्त्यावर ख्रिस्ती धर्मप्रचारक त्यांना आढळले. त्यांना हिंदुधर्मसंबंधातील विपरीत प्रतिपादनाने राग येऊन नीळकंठ बनारसच्या मिशनमध्ये वाद घालण्यासाठी गेले (१८४६). पुढे ख्रिस्ती धर्माबद्दल आस्था निर्माण झाल्याने ते १८४८ मध्ये ख्रिस्ती झाले.

ख्रिस्ती धर्मात प्रवेश केल्यानंतरची पन्नास वर्षे व्यतीत करणारे नेहमिया गोरे यांचे पुढील चरित्रही रोमांचकारी आहे. त्यांनी दोन वेळा इंग्लंडला भेट दिली. ख्रिस्ती झालेला शीखांचा पोरसवदा राजा दुलिपसिंग यांचा ज्येष्ठ सोबती म्हणून ते जून १८५० मध्ये प्रथम इंग्लंडला गेले. राणी व्हिक्टोरियाने नेहेमियांना भेटीस बोलाविले. त्याचप्रमाणे शानविपासू गोन्हे यांनी ऑक्सफर्ड विद्यापीठात मॅक्समुल्लर या जर्मन पंडिताची भेट घेतली. 'चिप्स फ्रॉम जर्मन वर्कशॉप' या मॅक्समुल्लरच्या ग्रंथात या भेटीचे वर्णन आहे.

उत्तर आयुष्यात १८७६ मध्ये नेहमिया यांनी पुनः इंग्लंडला भेट दिली. आता फादर गोन्हे म्हणून ते ख्याती पावले. १८७७ साली ख्रिस्तीधर्म प्रचारासाठी त्यांची पंचहौद मिशनमध्ये पुण्याला नेमणूक झाली. ग्रंथलेखन व ख्रिस्तीधर्म प्रचार हेच आता त्यांचे जीवनकार्य बनले. त्यावेळी इंग्लंडात असलेल्या 'पंडिता रमाबाई' यांचे पत्रद्वारा शंका निरसन करून त्यांना ख्रिस्तीधर्म स्वीकारण्यास अनुकूल करण्यात गोरे यांचा हात असल्याचे,पंडिता रमाबाईंनी आपल्या आत्मनिवेदनात म्हटलेले आहे.

१८८६ पासून फादर गोन्हे देहू-आळंदी-पंढरपूर येथे धर्मप्रचारार्थ जाऊ लागले. 'तुकाराम' हे हिंदु समाजाच्या सर्व श्रमजीवी थरात पसरलेले असल्याने, ते धर्मप्रसाराच्या आड येणार हे ओळखून नेहमिया यांनी तुकारामांच्या अभंगांचा विशेष अभ्यास करून *तुकारामांचे धर्मविषयक ज्ञान* (१८९२) हे पुस्तक लिहिले. या पुस्तकात तुकाराम हे पक्के वेदान्ती असल्याचे त्यांनी स्पष्ट केले.

नेहमिया गोरे यांनी मराठी, इंग्रजी व हिंदी भाषेत मिळून एकूण सुमारे चौदा पुस्तके व वीस-बावीस पुस्तिका लिहिल्या. त्यांची प्रमुख मराठी पुस्तके अशी–(१) *ख्रिस्तिधर्म ईश्वरदत्त आहे यास काही प्रमाण आहे काय?* (पृ. २००), १८८३, पुणे. (२) *ख्रिस्ती प्रार्थनापुस्तकातील बदलाची मीमांसा* (पृ. १६०), १८८३. (३) *प्रार्थनासमाजाचा धर्म स्वबुद्धिकल्पित असल्याने मनुष्यांच्या उपयोगी पडणार नाही.* (पृ. ११), १८८४. (४) *येने इस्रायलींना उपदेश* (पृ. ३२), १८८४. (५) *पवित्र शुभवर्तमानाच्या असाध्य असण्याची प्रमाणे व त्यावरील आक्षेपनिवारण*, मुंबई (पृ. ९७), १८९७. (६) *तुकारामांचे धर्मविषयी ज्ञान*, मुंबई (पृ. १००), १८९२. (७) *ख्रिस्ती धर्माची सत्यता*, मुंबई, १९११.

हिंदी पुस्तकात हिंदुधर्माच्या सहा दर्शनांवर टीका असलेला *षड्दर्शन दर्पण* (पृ. ३५०) १८६०, हा त्यांचा ग्रंथ महत्त्वाचा मानला जातो.

वयाच्या सत्तराव्या वर्षी २९ ऑक्टोबर,१८९५ या दिवशी मुंबईला उमरखाडीच्या मिशनमध्ये पहाटे नीळकंठशास्त्री (नेहमिया) गोन्हे ख्रिस्तवासी झाले.

वि. ग. कानिटकर, भास्करराव जाधव

**गोन्हे, चंद्रशेखर शिवराम :** ० चंद्रशेखर : (ज. २९ जानेवारी, १८७१, नाशिक–मृ. १७ मार्च, १९३७). अभिजात पंडिती वळणाचे आधुनिक कवी. शिक्षण नासिक, बडोदे व पुणे येथे. प्रवेशपरीक्षा अनुत्तीर्ण. व्यवसाय–बडोदे संस्थानात नोकरी. संस्कृत, मराठी आणि इंग्रजीचा गाढ व्यासंग. मुंबई उपनगर साहित्य संमेलनातील कविसंमेलनाचे अध्यक्ष (१९२९). बडोदा संस्थानचे राजकवी (१९३२–३७).

*अर्वाचीन कविता* (पूर्वार्ध) (१९०३) (ग्रंथप्रसारक मंडळी बडोदातर्फे प्रकाशित) चे संपादन यांनी केले असून त्यात २५ कवींच्या रचना व चरित्र समाविष्ट आहे. कवी दत्त, द. कों. घाटे यांचे साहाय्य लाभले होते.

चंद्रशेखरांची 'कोकिळ' ही गाजलेली पहिली कविता. ती पुण्याच्या 'करमणूक' साप्ताहिकात १८ मे, १८९५ मध्ये प्रथम प्रसिद्ध झाली. त्यांच्या कवितांचा *चंद्रिका* (१९३२) हा संग्रह प्रसिद्ध असून याच संग्रहातील हा निवडक पस्तीस व अन्य तीन अशा अडतीस कवितांचा संग्रह *कुंजकूजन* (१९६३) या नावाने प्रसिद्ध झाला.

चंद्रशेखरांचे काव्यलेखन केशवसुतांपासून रविकिरण मंडळापर्यंतच्या तीन तपाहून अधिक अशा प्रदीर्घ कालखंडात झाले. पण त्यांच्या कवितेची एकंदर प्रकृती आधुनिक कवितेपेक्षा अभिजात पंडिती कवितेशी अधिक मिळतीजुळती आहे. त्यांची कविता आत्मनिष्ठ असण्यापेक्षा ती अधिकतर प्रमाणात वस्तुनिष्ठ आहे. त्यांच्या काव्याचा आशय व अविष्कारपद्धती यात विशुद्ध अभिजातवादाचे दर्शन होते. ओज, माधुर्य व प्रसाद या गुणांच्या दृष्टीने केलेली शब्दांची अचूक निवड, संस्कृतप्रचुर व नादमधुर अशी निर्दोष व सुडौल वृत्तरचना, व्याकरणशुद्ध भाषा, यमक-अनुप्रासांचा सहज विलास, ही ह्यांच्या कवितेची वैशिष्ट्ये. त्यांच्या काव्याची बैठक चिंतनशील व विचारप्रधान आहे. ह्या सर्व वैशिष्ट्यांचा उत्कर्ष त्यांच्या अपूर्ण परंतु अपूर्व अशा 'गोदागौरव' या दीर्घ काव्यातून झालेला दिसतो.

चंद्रशेखरांनी अनेक इंग्रजी कवितांची भाषांतरे व रूपांतरे केली. 'काय हो चमत्कार' हे 'Suffolk Miracle' नावाच्या एका करुण रसात्मक काव्याचे रमणीय रूपांतर असून ते मराठी काव्यसृष्टीत अजोड मानले जाते. 'चिंतोपंत उदास' ही मिल्टनच्या अनुक्रमे 'L' elegro आणि 'I'-'Panseroso' या इंग्रजी कवितांची रूपांतरेही उत्कृष्ट आहेत. चंद्रशेखरांच्या अनुवादकौशल्याची ग्वाही ह्या रूपांतरांवरून मिळते. मिल्टनच्या कवितेतील पौराणिक दाखल्यांना व निर्देशांना समांतर असलेले आपल्या पुराणातील दाखले व निर्देश हे या रूपांतरित कवितांचे खास वैशिष्ट्य आहे. 'स्वदेशप्रीती', 'चैतन्यदूत', 'वनवासाची सुखे', 'धनगर व तत्त्ववेत्ता', अशा कितीतरी अनुवादित पण स्वतंत्र वाटाव्यात अशा त्यांच्या कविता आहेत.

*उघडं गुपित* (१९३३) व *किस्मतपूरचा जहागीरदार* (१९३६) ही त्यांची दोन स्वतंत्र खंडकाव्ये. *उघडं गुपित* हे ग्रामीण जीवनावर आधारित व ग्रामीण संवादाचा वापर करण्यात आलेले खंडकाव्य असून, *किस्मतपूरचा जहागीदार* हे श्रीमंत सयाजीराव गायकवाड यांच्या सुवर्णमहोत्सवानिमित्त लिहिलेले प्रासंगिक खंडकाव्य आहे. *सोमनाथ* नावाचे आणखी एक खंडकाव्य त्यांनी लिहावयास घेतले, पण ते अपूर्णच राहिले. चंद्रशेखरांची रचना पल्लेदार आहे. वृत्तयोजना निर्दोष व आशयाला पोषक अशी आहे. 'उद्देशिका' (उदा. तारातरंग, रंगराव हर्षे, चिंतोपंत उदास), 'विलापिका' (उदा. दत्तवियोग), 'नाट्यकाव्य' (उदा. काय हो चमत्कार) *कथाकाव्य* (उदा. किस्मतपूरचा जहागीरदार, उघडं गुपित) अशा विविध काव्यप्रकारांतील रचना त्यांनी केल्या आहेत. संस्कृत अभिजात काव्यपरंपरेत मुरलेल्या चंद्रशेखरांनी *उघडं गुपित* या कथाकाव्यात ग्रामीण बोलीचा वापर करावा यावरून त्यांची समकालीन आधुनिक काव्यप्रवाहाशी समरस होण्याची वृत्ती दिसते. माधवराव पटवर्धन, वि. द. घाटे आणि ग. त्र्यं. माडखोलकर या रविकिरण मंडळातील

कवींशी चंद्रशेखरांचे स्नेहाचे संबंध होते आणि या कवींना चंद्रशेखरांच्या कवितेविषयी आत्मीयता होती.

म. ना. लोही, नीलिमा गुंडी

संदर्भ : (१) घाटे, वि. द. 'कविराज चंद्रशेखर', 'काही म्हातारे व एक म्हातारी', रविकिरण मंडळ, मुंबई, पृ. १०४–११३ (२) पटवर्धन मा. त्र्यं. 'कै. राजकवि चंद्रशेखर', 'लोकशिक्षण', एप्रिल १९३७, पृ. ७४९–७५५. (३) 'चंद्रिका' या काव्यसंग्रहाला ग. त्र्यं. माडखोलकर यांनी लिहिलेली प्रस्तावना.

० गोविंदपौत्र : पहा केतकर, श्रीधर व्यंकटेश
० गोविंदशर्मा : पहा केळवाड, मीनप्पा व्यंकप्पा
० गोविंदसुत : पहा कुलकर्णी, नारायण विनायक
० गोविंदसुत : पहा चिंचाळकर, परशराम गोविंद
० गोविंदाग्रज : पहा गडकरी, राम गणेश
० गोस्वामी, पृथ्वीगीर हरिगीर : पहा पृथ्वीगीर हरिगीर

**गोळे, महादेव शिवराम :** (ज. १८ फेब्रुवारी, १८५९, मर्दे, .जि सातारा – मृ. ८ डिसेंबर, १९०६, नासिक). धर्मविषयक ग्रंथांचे कर्ते. शिक्षण मराठी व इंग्रजी पाचव्या इयत्तेपर्यंतचे घरीच झाले. मॅट्रिक १८७७) झाल्यानंतर डेक्कन कॉलेज, पुणे या संस्थेतून संस्कृत व तत्त्वज्ञान हे विषय घेऊन बी.ए. कॉलेजमध्ये दक्षिणा फेलो म्हणून नियुक्ती. कॉलेजमध्ये 'पदार्थविज्ञान' हा विषय शिकविता यावा म्हणून त्या विषयात एम्.ए. (१८८४). 'डेक्कन एज्युकेशन सोसायटी'चे एक आजीव सभासद. सोसायटीच्या फर्ग्युसन कॉलेजात 'पदार्थविज्ञान' विषयाचे प्राध्यापक. प्राचार्य गो. ग. आगरकरांच्या मृत्यूनंतर फर्ग्युसन कॉलेजचे प्राचार्य (१८९५–१९०२).

प्रि. गोळे ह्यांनी *हवा* (सोपपत्तिक व सप्रयोग दिलेली व्याख्याने, (१८९१), *शाळेचा अभिमान व कुटुंबाचा अभिमान* (आयुष्यातील कर्तव्याविषयी विद्यार्थ्यांना उपदेश, १८९४), *मराठी सातवे पुस्तक अथवा शास्त्रीय विविध विषयांचा संग्रह* (१८९६), *ब्यूबॉनिक प्लेग व त्यासंबंधी लोकांचे कर्तव्य* (१८९७) अशी काही व्यवहारोपयोगी विषयांवर पुस्तके लिहिली असली, तरी *ब्राम्हण आणि त्यांची विद्या* (१८९५) व *हिंदुधर्म आणि सुधारणा* (१८९८) या दोन ग्रंथांमुळेच त्यांना ग्रंथकार म्हणून मान्यता मिळाली. समाजाच्या उन्नतीविषयीच्या तीव्र तळमळीतून या ग्रंथांची निर्मिती झाली आहे. तत्कालीन पांढरपेशा वर्गाच्या प्रवृत्तीची चिकित्सा करून एकूण समाजाच्या भवितव्याची सडेतोड चर्चा प्रस्तुत ग्रंथांतून आढळते. स्वकालीन आधुनिक सुधारणावादाचे एकेरीपण स्पष्ट करणे आणि हिंदुधर्मातील काही परंपरांचे मर्म विशद करणे, ही त्यांच्या ग्रंथलेखनाची प्रमुख प्रयोजने.

गं. दे. खानोलकर, व. कृ. वऱ्हाडपांडे

**ग्रिअर्सन, (सर) जॉर्ज एब्रहॅम :** (ज. ७ जानेवारी, १८५१ – मृ. ८ मार्च, १९४१). ब्रिटिश राजवटीतील सनदी अधिकारी, भारतीय भाषांचे अभ्यासक व भारतीय भाषा सर्वेक्षण योजनेचे सूत्रधार.

भारतात बिहार येथे सनदी अधिकारी म्हणून १८७३ साली काम सुरू केले. भारतातील अनेक प्राचीन व अर्वाचीन भाषांचे व लिप्यांचे त्यांना ज्ञान होते. १९०१ च्या जनगणनेत भारतातील भाषांची प्राथमिक पाहणी केल्यानंतर 'लिंग्विस्टिक सर्व्हे ऑफ इंडिया' (भारतीय भाषा-सर्वेक्षण) हे खाते त्यांच्याकडे सोपविण्यात आले व त्या सर्वेक्षणाचे फलित म्हणून १९२८ पर्यंत त्यांनी केलेल्या भाषिक – अभ्यासाचे अनेक खंड प्रकाशित झाले. काही खंडांच्या बाबतीत स्टेन कोनो या डॅनिश भाषा वैज्ञानिकाचे साह्य डॉ. ग्रिअर्सन ह्यांना झाले असले तरी त्या सर्वेक्षणाचे मुख्य श्रेय त्यांनाच द्यावे लागते. त्यांच्या या कार्याबद्दल त्यांना अनेक विद्वत्सभांकडून सन्मान करण्यात आला.

अनेक प्राकृत, अर्वाचीन इंडो-आर्यन भाषांतील जुन्या ग्रंथांचे संपादन; मैथिली, काश्मिरीसारख्या अनेक भाषांचा व्याकरणिक अभ्यास व *बिहार पीझंट लाइफ* (१८८५) हे लोकजीवनावरील पुस्तक ही डॉ. ग्रिअर्सन ह्यांची कामगिरी महत्त्वाची असली, तरी भारतीय भाषा सर्वेक्षणाशी त्यांचे नाव अभिन्नत्वाने जोडले आहे. एवढ्या मोठ्या प्रमाणावर पद्धतशीरपणाने केलेले हे जगातील एकमेव भाषा सर्वेक्षण आहे. भारतातील भाषिक अभ्यासाला त्यामुळे योग्य अशी नवी दिशा मिळाली. भारतातील जनसामान्यांच्या व उपेक्षित जमातींच्या भाषांच्या अभ्यासाकडे त्यामुळे भारतातील भाषा-अभ्यासकांचे प्रथमच लक्ष वेधले गेले. मराठी भाषेच्या बोलींचे नमुने गोळा करून त्यांचा अभ्यास करणे आणि अहिराणी, कोकणी ह्यांचे मराठीशी नाते निश्चित करण्याचा पद्धतशीर प्रयत्न करणे ह्या कार्याला सुरुवात करण्याचा मान ग्रिअर्सन व स्टेन कोनो ह्यांना द्यावा लागतो. बोली-समूह किंवा भाषा ह्याविषयीची सर्वसाधारण माहिती, भाषिक जनगणना, नकाशे, बोलींचे नमुने, संक्षिप्त व्याकरण, निवडक शब्द-संग्रह, स्थानिक लिपींबद्दल माहिती आणि संदर्भसूची एवढी सामग्री ह्या खंडांतून मिळते. मराठी भाषेच्या अभ्यासकांना विशेष उपयुक्त असे त्यांचे लेखन पुढीलप्रमाणे

'On the Stress Accent in the Modern Indo-Aryan Varnaculars', IRAS (1895); 'Linguistic Survey of India', II volumes in 20 parts (Calcutta, 1903–28; Vol. 7, with Sten Konow, Indo-Aryan, Southern Group, Specimens of the Marathi Language, 1905); 'Spontaneous Nasalization in the Indo-Aryan Languages', JRAS (1922); 'On the Modern Indo-Aryan Vernaculars', Indian antiquary (1931–33, Suppl. in book form), Bombay, 1934.

अशोक रा. केळकर, म. ना. लोही

**घरत, रामजी लक्ष्मण :** (ज. २३ जून, १८५५ – मृ. १३ जानेवारी, १९४९). 'विवेक-चूडामणि' (१९१४) ह्या ग्रंथाचे भाषांतरकार. श्रीमत् परमहंस श्रीजीवन्मुक्तस्वामी (उरण, जि. कुलाबा) ह्यांचे शिष्य. आद्य शंकराचार्यांनी रचलेल्या 'विवेक-चूडामणि' ह्या ५८२ श्लोकांच्या संस्कृत ग्रंथात वेदान्ताचे सार ग्रथित करण्यात आले असून तो गुरुशिष्यसंवादरूपाने लिहिलेला आहे. रामजी घरत यांनी या ग्रंथाचे भाषांतर केले आहे. प्रथम संस्कृत श्लोक, नंतर पदच्छेद. प्रत्येक पदावर मराठी भाषांतराच्या जुळणीकरता अन्वयांक देऊन त्याखाली सरळ मराठी अर्थ अशी ह्यांची रचना आहे. मूळ संस्कृत ग्रंथाचे स्वरूप धर्मविषयक व तात्त्विक असूनही भाषांतर सुबोध व सहजगम्य झाले आहे.

उषा टाकळकर, मीनल निसळ

**घाटे, दत्तात्रय कोंडो : ० दत्त :** (ज. २७ जून, १८७५, अहमदनगर-मृ. १३ मार्च, १८९९, बडोदे). कवी, चंद्रशेखरांचे समकालीन व मित्र. वि. द. घाटे यांचे वडील. शालेय व विद्यालयीन शिक्षण अहमदनगर येथील मिशन हायस्कूलमध्ये. महाविद्यालयीन शिक्षण विल्सन कॉलेज, मुंबई व खिश्चन कॉलेज, इंदूर या ठिकाणी. कैलकत्ता विद्यापीठातून बी.ए. ही पदवी. पुण्यातील नूतन मराठी विद्यालयात काही काळ शिक्षक म्हणून नोकरी (१८९२).

कवी दत्त हे केशवसुतांनी प्रवर्तित केलेल्या आधुनिक मराठी कवितेचे एक प्रवक्ते होते. ह्यांची कविता 'काव्यरत्नावली', 'मनोरंजन', 'सुविचार समागम', 'बालबोध मेवा', 'करमणूक' इत्यादी नियतकालिकांतून प्रसिद्ध झाली. यांच्या एकूण एकावन्न कविता आज उपलब्ध आहेत. त्यांपैकी ४८ कवितांचा *दत्तांची कविता* हा संग्रह (१९२२) दत्तांचे पुत्र वि. द. घाटे ह्यांनी प्रसिद्ध केला. *नवे पान* (१९६७) ह्या डॉ. मा. गो. देशमुख संपादित संग्रहात मात्र त्यांच्या

उपलब्ध सर्व कविता संकलित केल्या आहेत. त्यांच्या बहुसंख्य कवितांचा रचनाकाल १८९७ व १८९८ हा आहे.

दत्तांनी प्रेम, निसर्ग, राष्ट्र इत्यादी विषयांवर कविता लिहिल्या आहेत. काही इंग्रजी कवितांचाही त्यांनी अनुवाद केला आहे. तथापि या सर्व कवितांत त्यांची करुण व वत्सल गीते अत्यंत हृदयस्पर्शी आहेत. 'विश्वामित्रीच्या काठी' ही त्यांची अत्यंत सुंदर निसर्गकविता आणि मराठीतील पहिली सौंदर्यलक्ष्मी हुरहूर (Romantic longing) व्यक्त करणारी कविता म्हणून उल्लेखनीय आहे. त्यांच्या कवितेचे स्वरूप प्रामुख्याने गीतिकाव्याचे (Lyrical Poetry) आहे. दत्त हे स्वतःच गायन-वादनकलेत कुशल असल्याने त्यांच्या कवितांत सहजपणे अंतर्गत संगीत अवतरले आहे. समकालिनांच्या तुलनेने भावगीत कवितेचे तरल सौंदर्य दत्तांच्या कवितेतून अधिक प्रमाणात प्रकट होते.

प्रत्यक्ष कवितालेखनाव्यतिरिक्त दत्तांचे अन्य वाङ्मयीन कर्तृत्व आहे, त्याचा उल्लेख करणे आवश्यक आहे. कवी दत्तांनी अर्वाचीन मराठी कवितांचा एक प्रातिनिधिक संग्रह तयार करण्याचा संकल्प केला होता. पण दत्तांच्या अपघाती निधनाने तो पूर्ण होऊ शकला नाही. तो त्यांचे मित्र कवी चंद्रशेखर यांनी पुढे पूर्ण केला (१९०३). त्यांनी 'मेघदूता'स नाट्यरूप दिले होते असे कळते. किर्लोस्कर नाटक मंडळीकरिता त्यांनी 'उत्तररामचरित' मराठीत बसविण्यास सुरुवात केली होती. इंग्रजी व संस्कृत काव्य-नाटकांचा त्यांचा अभ्यास होता. या अभ्यासाचा प्रभाव त्यांच्या कवितेवरही पडलेला दिसून येतो. उत्कट भावना, कमनीय कल्पना, समर्पक शब्दयोजना व निर्दोष पद्यरचना यांचा सुंदर समन्वय त्यांच्या कवितेत झालेला दिसतो.

कृ. बा. मराठे, व. कृ. वऱ्हाडपांडे

संदर्भ : (१) हिंगणेकर, गो. रा. 'दत्तांची कविता' (काव्यचर्चा). (२) पेंढारकर, य. दि. 'दत्तांची कविता' (काव्यचर्चा). (३) बेहेरे, ना. के. 'दत्तांची कविता', ('मनोरंजन', जून १९२२). (४) पटवर्धन, मा. त्र्यं ; घाटे, दत्तात्रय कोंडो 'अर्वाचीन मराठी वाङ्मय सेवक', शके १८५३, प्रथम खंड. (५) पंडित, भ. श्री. 'कवि दत्त', (सत्यकथा, सप्टेंबर १९५३). (६) पंडित, भ. श्री. 'मनोलेखनिक कवी दत्त', 'आधुनिक मराठी कविता', १९६८. (७) पंडित, भ. श्री. 'दत्त', 'आधुनिक कवितेचे प्रणेते', भाग २, १९७१. (८) मराठे, कृ. बा. 'कवी दत्त आणि त्यांची कविता', ('हेमंत', जुलै १९६१). (९) देशपांडे, अ. ना. 'आधुनिक मराठी वाङ्मयाचा इतिहास', भाग पहिला, १९५४. (१०) देशमुख, मा. गो. 'नवे पान', १९६७, या संग्रहाची प्रस्तावना.

**घारपुरे, पुरुषोत्तम गणेश** : ० अण्णा घारपुरे : (ज. १८४३ – मृ. १९२०). संगीत-विषयावरील ग्रंथकार. मूळ गाव मळण (ता. गुहागर, जि. रत्नागिरी). तीन पिढ्यांपूर्वीपासून पुणे येथे वास्तव्य. वडील व्युत्पन्न शास्त्री व उत्तम संगीतज्ञ. काही काळ मुलकी खात्यात नोकरी. परंतु ती सोडून यांनी आमरण संगीतकार्यास वाहून घेतले. ते उत्तम बीनकार, सतारिये व मृदंग-तबला वादक होते.

घारपुरे यांनी *तालादर्श* (१८९५) या ग्रंथात संगीतशास्त्रातील तालांची शास्त्रशुद्ध माहिती देऊन, मृदंग व तबला ह्यांची रचना व वादनक्रिया याविषयी विवेचन केले आहे. *स्वरशास्त्र* (१८८०), सोमनाथकृत *रागविबोधाचा प्रथमविवेक* (१८८१), *नारदी शिक्षा* (१८८२), *संगीत दर्पण* (१८८५) हे जुने हस्तलिखित संस्कृत ग्रंथ संशोधून त्यांनी मुद्रित केले. *ध्रुपदे इत्यादी चिजांचा संग्रह* (१८८४), *सतारीचे पुस्तक* (पहिले, १८८६, दुसरे–पहिला भाग १८८८, दुसरा भाग १८८९) ही पुस्तके व *तानसेनकृत संगीतसार व रागमाला* (१८८३) हे हिंदी ग्रंथही त्यांनी लिहिले. *संगीत मीमांसक* हे सोळा पृष्ठांचे मासिकही त्यांनी (जानेवारी १८८६ ते डिसेंबर १८९०) एक हाती चालविले होते.

डॉ. शरच्चंद्र वि. गोखले, मीनल निसळ

**घारपुरे, श्रीकृष्ण सदाशिव** : ० प्रज्ञानेश्वरयति : (ज. १८६१ – मृ. ). धर्मविषयक लेखन करणारे ग्रंथकार. शिक्षण बी.ए. सरकारी विद्याखात्यात शिक्षक. *श्रीसनातन मानवधर्मरहस्य* (१९१६) हा २८ अध्यायांचा ओवीबद्ध ग्रंथ असून *सनातनधर्माची मूलतत्त्वे* (१९१८) हा गद्यग्रंथ आहे. अखिल मानवजातीच्या हितासाठी धर्मरहस्य कथन करण्याचा प्रयत्न या दोन्ही ग्रंथांतून केला आहे. *जन्मांतर चिकित्सा व शारीर अध्यात्म* (१९३२), *ईशावास्योपनिषद्रहस्य* (ऋषींस अभिप्रेत अर्थ उद्धृत करण्याचा प्रयत्न) (१९३५), *सनातन वैदिक धर्माचे ऐतिहासिक स्वरूप अर्थात मूळचा कृतयुगीन खरा धर्म व पुढे मनुष्याचा ऱ्हास होऊन बनलेला खोटा धर्म ह्यांचे सोपपत्तिक विवेचन* (१९३९), *भुते व पिशाच्चे आणि त्यांचे अस्तित्व व नास्तित्व* (१९४०) ही त्यांची अन्य काही उल्लेखनीय पुस्तके. *स्यूतसीविक* (१९११), हा टॉमस कार्लाईल ह्यांच्या 'सार्टार रिसार्टस्' (१८३१) ह्या इंग्रजीतील अध्यात्मासारखे गहन विचार प्रकट करणाऱ्या ग्रंथाचे सुबोध भाषांतर त्यांनी केले आहे.

उषा टाकळकर, मीनल निसळ

**घुले, (विद्याभूषण) कृष्णशास्त्री भाऊशास्त्री** : (ज. १८७३ – मृ. १९५४). वेदोपनिषदादी संस्कृत ग्रंथांचे अभ्यासक; संशोधक व समीक्षक. संस्कृत व्याकरण, वेदान्त-मीमांसादि दर्शनशास्त्र, धर्मशास्त्र इत्यादींचे पंडित. महामहोपाध्याय. 'वेदान्तकेसरी' असा श्रीशंकराचार्यांकडून गौरव.

मूळ घराणे दक्षिणेकडचे. नागपूरच्या रघुजीराजे भोसले ह्यांनी काशीवरून नागपूरला कृष्णशास्त्र्यांच्या पणजोबांना आणले. कृष्णशास्त्र्यांचे आधुनिक शिक्षण नागपूरच्या मॉरिस कॉलेजमध्ये झाले. *पतितोद्धार मीमांसा* हा संस्कृत ग्रंथ विद्यार्थीदशेतच प्रसिद्ध झाला. *ऋग्वेदाचे मराठी भाषांतर* हे मासिक १९०४ मध्ये काढले. त्यातून ऋग्वेदातील पहिल्या ९१ सूक्तांचे मराठी भाषांतर त्यांनी प्रसिद्ध केले. *हौत्रध्वान्तदिवाकरः* (अग्निहोमाबाबत 'जो अज्ञानांधकार माजला आहे त्याचा नाश करणारा सूर्य') हा त्यांचा ग्रंथ आहिताग्नि बाबाजी दीक्षित यांच्या मराठी अनुवादासह प्रसिद्ध झाला. नागपूरहून निघणाऱ्या 'वागीश्वरी' मासिकाच्या संपादक-मंडळात ते काही काळ होते व त्यांचे बरेच अभ्यासपूर्ण लेख 'वागीश्वरी'तून प्रसिद्ध झाले आहेत. 'गाथासप्तशतीचा काळ', 'हिंदूंची असगोत्र विवाहपद्धती', महादेवाचे 'मूळ रूप' इत्यादी लेखांचा या संदर्भात उल्लेख करता येईल. भवाळकर-नेने संपादित 'श्रीचक्रधर सिद्धान्त सूत्रे' या ग्रंथाच्या 'वागीश्वरी'तून प्रसिद्ध झालेल्या घुलेशास्त्र्यांच्या परीक्षणलेखाद्वारे, घुलेशास्त्री व सुप्रसिद्ध महानुभाव विद्वान श्री. बाळकृष्णशास्त्री ह्यांच्यातील 'श्रीचक्रधर हे ज्ञानेश्वरांच्या आधीचे की नंतरचे', या प्रश्नासंबंधीचा वादविवाद कृष्णशास्त्र्यांच्या व्यासंगशीलतेचा निदर्शक म्हणून उल्लेखनीय आहे, (पहा– 'वागीश्वरी' वर्ष ३, अंक ३-४ व 'वागीश्वरी' फेब्रुवारी, एप्रिल जून व जुलै १९३४) पृथ्वीगीर हरिगीर यांच्या 'गोसावी व त्यांचा संप्रदाय' या ग्रंथाची प्रस्तावना, त्याचप्रमाणे 'वसिष्ठ व विश्वामित्र', 'दिति व अदिति', 'ऋग्वेदातील सरस्वती नदी' यांसारखे कृष्णशास्त्र्यांचे लेखही अभ्यासपूर्ण आहेत. त्यांचे अनेक स्फुटलेख नागपूरचे साप्ताहिक 'धर्मवीर' व 'विहंगम', 'विविधज्ञानविस्तार' यांसारख्या नियतकालिकांतूनही प्रसिद्ध झाले आहेत. त्यांच्या निवडक अकरा लेखांचा संग्रह *म. म. कृष्णशास्त्री घुले लेखसंग्रह-वैदिक खंड* (१९४९) म. म. बाळशास्त्री हरदास ह्यांनी संपादित व प्रकाशित केला आहे. या लेखसंग्रहाच्या आरंभी 'कृष्णशास्त्रींचे घराणे : व्यक्ती व वाङ्मय' असा परिचयात्मक लेख बाळशास्त्र्यांनी दिला आहे.

वि. म. बेडेकर, व. कृ. वऱ्हाडपांडे

संदर्भ : (१) हरदास, वीणा 'महामहोपाध्याय साहित्याचार्य बाळशास्त्री हरदास यांचे चरित्र', भाग १ ला, १९७२, पृ. १०६–१०९. (२) बऱ्हाडपांडे, वसंत, 'वागीश्वरीचा वीणाझंकार', 'युगवाणी', ऑगस्ट-नोव्हेंबर १९८०, पृ. १५९–१६२.

**घोरपडे, नारायणराव गोविंदराव तथा बाबासाहेब : ० इचलकरंजीकर :** (ज. २५ नोव्हेंबर, १८७०, करकंब, जि. सोलापूर – मृ. २१ ऑक्टोबर, १९४३, मिरज). प्रवासवर्णनकार व अनुवादक. मूळ नाव गोपाळ लक्ष्मण जोशी. इचलकरंजीकर सरदार घोरपडे ह्यांचेकडे दत्तक गेले. इचलकरंजी जहागिरीचे अधिपती. महाविद्यालयीन शिक्षण कोल्हापूर व मुंबई येथे.

द्रव्याभावी व्यासंगी लेखकांचे ग्रंथ अप्रकाशित राहू नयेत यासाठी त्यांनी कायम स्वरूपाचा निधी निर्माण करून, "इचलकरंजी ग्रंथमाला" निर्माण केली. *पर्णे* (भाषांतर, १९१३), *आयर्लंडातील थोड्या सहकारी पेढ्यांचे तात्त्विक निरीक्षण* (भाषांतर, १९१३), *सचित्र भारत–प्रवासवर्णन* (१९१२) यांसारखे काही ग्रंथ ह्यांनी लिहिले आहेत.

ग. दे. खानोलकर, रा. बा. बक्षी

० **चंद्रशेखर :** पहा गोऱ्हे, चंद्रशेखर शिवराम

**चंद्रात्रेय, लक्ष्मण नारायणशास्त्री :** (ज. १८५२ – मृ. १९२०). शुक्ल यजुर्वेदाचे भाषांतरकार. सटाणे (जि. नाशिक) येथील रहिवासी. व्याकरणाचार्य वडिलांजवळ संस्कृतचे अध्ययन. शालेय शिक्षण मराठी सहावी (व्ह. फा.) त्यानंतर मामलेदार कचेरीत नोकरी.

यज्ञसंस्थेचा तपशीलवार विचार करणाऱ्या 'यजुर्वेदा'च्या शुक्ल शाखेच्या वाजसनेय संहितेचे 'मंत्र, अन्वय, शब्दार्थ, अर्थ, भावार्थ, विनियोग, व्याकरण प्रतिवादक टीपा' अशा स्वरूपात पूर्ण भाषांतर ह्यांनी केले होते; त्यातले पहिले पाच अध्याय (एकूण अध्याय ४०) *वेदपुष्प* (१९२१) नावाने प्रसिद्ध आहेत. ह्यांनी चारीधाम तीर्थयात्रा केल्यानंतर त्या यात्रेचे वर्णन करणारे संस्कृत काव्यही लिहिले आहे.

उषा टाकळकर, मीनल निसळ

० **चकोर :** पहा लाड, पुरुषोत्तम मंगेश

**चापेकर, श्रीकृष्ण नीलकंठ : ० श्रीकृष्ण :** (ज. ३ ऑगस्ट, १८७७, अंमळनेर – मृ. १७ डिसेंबर, १९४२). प्रसिद्ध नट नानासाहेब चापेकर यांचे बंधू. कवी. शिक्षण पुणे येथे. मुंबई विद्यापीठाचे मराठी विषयातील पहिले एम्.ए. (१९०३), एलएल्.बी. (१९१३). काही काळ मुंबई येथे शिक्षक. एलिचपूर येथे आठ वर्षे वकिली व १९२१ पासून पुणे येथे मराठीचे प्राध्यापक. ज्येष्ठ समीक्षक. यांनी श्रीकृष्ण या टोपण नावाने काव्यलेखन केले. *सुवर्णचंपक* (१९२८) व *एकावली* (१९३३) हे यांचे कवितासंग्रह प्रसिद्ध आहेत. *एकावली* या संग्रहातील सर्व कविता एकश्लोकी आहेत, हे त्यांचे वैशिष्ट्य. *काव्यचर्चा* (संपादक : ना. म. भिडे, १९२५) ह्या काव्यसमीक्षाविषयक ग्रंथात त्यांचा रसव्यवस्थेवरील एक महत्त्वाचा लेख प्रसिद्ध झालेला आहे. गोवर्धनराम-कृत 'सरस्वतीचंद्र' या प्रसिद्ध गुजराती कादंबरीचा *गुणसुंदरी* (१९०३) हा चापेकरांनी केलेला अनुवादही प्रसिद्ध आहे. आधुनिक मराठी कवितेचे जुन्या पिढीतील एक महत्त्वाचे समीक्षक.

रा. श्री. जोग, रा. बा. बक्षी

**चिंचाळकर, परशराम गोविंद : ० गोविंदसुत ० महाराष्ट्रीय** (ज. १ डिसेंबर, १८६२, साखर्डे, जि. रत्नागिरी – मृ. ८ जानेवारी, १९३४). आध्यात्मिक ग्रंथांचे लेखक. शिक्षण चिपळूण येथे, मराठी सहावीपर्यंत. नगर येथे मुलकी खात्यात नोकरी. १९१६ साली निवृत्त. निवृत्तीनंतर वेदान्ताच्या अभ्यासास विशेष चालना.

ह्यांचे *परमार्थ विचारमाला* (१९१३), *रहस्यनिरीक्षण* (१९१७), *आत्मानुसंधान* (१९२०) व *आधिभौतिक सुधारणा व आध्यात्मिक धारणा* (१९२६) हे ग्रंथ प्रसिद्ध आहेत. *परमार्थ विचारमालेतून* त्यांचे पागारकरांच्या 'मुमुक्षु' पत्रातून प्रसिद्ध झालेले अध्यात्म, वेदान्त, भक्ती, वैराग्य इत्यादी विषयांवरील विचार एकत्रित करण्यात आले आहेत. *रहस्यनिरीक्षण* हा लो. टिळकांच्या 'गीतारहस्या'वरील टीका ग्रंथ होय. हा ग्रंथही 'मुमुक्षु' मधूनच प्रसिद्ध झाला होता.

ग. वि. कवितकर, मीनल निसळ

**चिंतामणिपेठकर, पांडुरंग व्यंकटेश :** (ज. १८५१ – मृ. १८७९). कवी. शिक्षण मॅट्रिकपर्यंत. यांनी डेप्युटी एज्युकेशनल इन्स्पेक्टर म्हणून काम केले. ह्यांचे *गंगावर्णन* हे एकमेव काव्य प्रसिद्ध आहे. दक्षिणा प्रैज कमिटीने हा काव्यविषय जाहीर केला होता व त्या निमित्ताने *गंगावर्णना* (१८७४) ह्या काव्याची रचना चिंतामणिपेठकरांनी केली. गंगेच्या उगमाचे, तिच्या तीरावरील प्राचीन व अर्वाचीन काळातील प्रसिद्ध प्रदेशांचे, तिच्या काठावरील पवित्र क्षेत्रे व जुनी, संपन्न शहरे यांचे व तिच्या मार्गातील मनोहर सृष्टिसौंदर्याचे वर्णन या काव्यात आढळते. हे काव्य काही इंग्रजी कवींच्या व बऱ्याच अंशी संस्कृत कवींच्या धाटणीवर रचले आहे. गंगेकडे पारलौकिक दृष्टीने न पाहता ऐहिक दृष्टीने पाहावे, तिच्या संबंधातील पौराणिक कथा व दंतकथा ह्यांचे संदर्भ बाजूला सारावे, संस्कृत शब्दांचा व अलंकारांचा अतिरेक टाळावा, एवढेच नव्हे तर यमकांचे व छंदांचे साहाय्यसुद्धा आवश्यक मानू नये, ही चिंतामणिपेठकरांची काव्यलेखनामागील भूमिका होती. मात्र वृत्तबद्धता, यमकयोजनेतील दक्षता, प्रचाराबाहेरील संस्कृत शब्दांचा वापर, समासबहुलता इत्यादी संस्कृतातील पंडिती कवितेचे वळण यांनाही पूर्णपणे टाळता आलेले दिसत नाही. ओजस्वी भाषा, प्रगल्भ विचार, शार्दूलविक्रीडितासारखे धीरगंभीर वृत्त व सृष्टि-सौंदर्याची प्रत्ययकारी वर्णने, यामुळे हे काव्य परिणामकारक झाले आहे. दक्षिणा प्रैज कमिटीचे चिटणीस शंकर पांडुरंग पंडित व 'निबंधमाला'कार विष्णुशास्त्री चिपळूणकर ह्यांनीही *गंगावर्णना* ह्या काव्याची प्रशंसा केली आहे. प्रस्तुत काव्याला 'दक्षिणा प्रैज कमिटी'चे बक्षीस मिळाले होते. निसर्गविषयक आधुनिक दृष्टी व परंपराप्राप्त धारणा यांचे मनोज्ञ मीलन प्रस्तुत काव्यात आढळते.

कृ. व. निकुंब, व. कृ. बऱ्हाडपांडे

० **चिकित्सक :** पहा लाड, पुरुषोत्तम मंगेश

**चिटणीस, गजानन यशवंत :** (ज. १० सप्टेंबर, १९०० – मृ. २२ ऑगस्ट, १९४९, मुंबई). कादंबरीकार, नाटककार व पत्रकार. उच्च शिक्षण सेंट झेविअर कॉलेज, मुंबई व सिटी कॉलेज, कलकत्ता या ठिकाणी. ऑक्सफर्ड विद्यापीठाची डॉक्टरेट. वयाच्या अठरा-एकोणिसाव्या वर्षी ब्राह्मो समाजाच्या 'सुबोध पत्रिका' या मुखपत्राच्या इंग्रजी विभागाचे संपादक. ब्राह्मो समाजाचे प्रचारकार्य–जपान–अमेरिकेत भ्रमण. काही काळ 'चित्रा' ह्या मराठी साप्ताहिकाचे संपादन. कॉम्रेड मानवेंद्रनाथ रॉय ह्यांच्याशी आलेल्या संबंधामुळे कामगार क्षेत्रात व राजकारणात कार्य. कालांतराने गांधीवादाकडे आकृष्ट. *कुसुम* (१९४७), *विजू* (१९४७), *स्वामीजी*, *कुंदा*, *मांडवलदार* व *दिदी* अशा सहा कादंबऱ्या यांनी लिहिल्या आहेत. एक चांगली कादंबरी म्हणून मर्ढेकरांनी *कुसुम*चा उल्लेख केला असून *विजू*मध्ये स्वतंत्र व आधुनिक तरुणीच्या कर्तृत्वशक्तीचे चित्रण आढळते. *नवा पाईक* (१९५१) ह्या नाटकातून त्यांनी स्वतःच्याच राजकीय प्रवासाचे चित्र रेखाटले आहे. त्यातील अगोदर साम्यवादी असून नंतर गांधीवादाकडे झुकलेला तत्त्वनिष्ठ संपादक म्हणजे डॉ. चिटणीस हेच होत. *माझ्या आठवणी* (१९५५) हा त्यांच्या आत्मचरित्रात्मक आठवणींचा संग्रहही उल्लेखनीय आहे. वैयक्तिक जीवनापेक्षा सामाजिक जीवनातील घटनांना अधिक प्राधान्य त्यांनी या आठवणीतून दिलेले दिसते.

हरिश्चंद्र थोरात, मीनल निसळ

**चिटणीस, मल्हार खंडेराव :** (ज. १८६० – मृ. १९०८). कवी व ग्रंथकार. शिक्षण, बी.ए.,एलएल.बी. अमरावती येथे वकील. *अंतराळातील चमत्कार* (१८९६) व *नवकुसुममाला : स्फुट कविता* (१९०७) ही ह्यांची पुस्तके प्रसिद्ध आहेत. पहिला ग्रंथ ज्योतिर्विद्याविषयक असून सूर्य, चंद्र, तारे इत्यादी मानवाला अंतरिक्षात रोज दिसणाऱ्या दृश्यांची ज्योतिषशास्त्राधारे सुबोध माहिती दिली आहे. माहितीच्या सुगमतेसाठी काही आकृत्या व चित्रेही दिलेली आहेत. 'नवकुसुममाले' चिटणिसांची काही अनुवादित (इंग्रजी-संस्कृतवरून) व काही स्वतंत्र स्फुट काव्ये समाविष्ट केली गेलेली असून ती वृत्तबद्ध, नीतिपर व स्वदेशाभिमानाला पोषक अशी आहेत. 'विविधज्ञानविस्तार' व 'काव्यरत्नावली' या नियतकालिकांतून त्यांची कविता प्रथम प्रकाशात आली.

उषा टाकळकर, अंजली वऱ्हाडपांडे

**चितळे (भाजेकर), महादेव बाळकृष्ण :** (ज. १८४७ – मृ. १८९२). नाटककार. पुण्याच्या डेक्कन कॉलेजमधून बी.ए. नंतर काही काळ शिक्षकाचा व्यवसाय. इंदूर येथे वकिली. इंदूर संस्थानात खाजगी कारभारी व न्यायाधीश म्हणून नोकरी.

पुणे मुक्कामी 'ज्ञानचक्षु' या वृत्तपत्रात लेखन करीत. इंदूर येथेही 'वृत्तलहरी' (स्थापन १८७५) ह्या साप्ताहिकाचे संपादन त्यांनी केले. ह्यांचे *मनोरमा* (१८७१) हे एकमेव नाटक प्रसिद्ध आहे. मराठी नाट्यपरंपरेतील एक महत्त्वाचा टप्पा म्हणून हे नाटक महत्त्वाचे आहे. स्त्रिया व त्यांचे हक्क, बालविवाह, पुनर्विवाह विधवांची दयनीय परिस्थिती इत्यादी सामाजिक समस्यांचे पुरोगामी दृष्टीने चित्रण करणारे पहिले मराठी नाटक म्हणून 'मनोरमा' महत्त्वपूर्ण ठरते. सामाजिक समस्या चित्रित करणारे पहिले स्वतंत्र नाटक म्हणूनही त्याला एक ऐतिहासिक महत्त्व आहे. साधी घरगुती भाषा व नाट्यानुकूल प्रसंग हे ह्या नाटकाचे उल्लेखनीय विशेष.

हरिश्चंद्र थोरात, मीनल निसळ

**चितळे, विष्णु सीताराम :** (ज. १० मार्च, १९००, बावधन, जिल्हा सातारा – मृ. २३ डिसेंबर, १९५३, मुंबई). इतिहासलेखक. शिक्षण, एम.ए., बी.टी; टी.डी. (लंडन). मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण सातारा येथे. फर्ग्युसन कॉलेजमधून बी.ए. इतिहासविषयाचे अध्यापक.

*ब्रिटिशांचा इतिहास* (१९३९), *हिंदुस्थानचा अभिनव इतिहास* (१९४२), *नवभारताचा सांस्कृतिक इतिहास* (१९५१) ही यांची पुस्तके प्रसिद्ध आहेत. 'ऐतिहासिक वंशावळी' तयार करण्यासाठी रियासतकार गो. स. सरदेसाई ह्यांना त्यांनी साह्य केले. *पेठे-दप्तर-भाग – १* (१९४८) व *पेठे-दप्तर-भाग – २* (१९५०) हे ऐतिहासिक पत्रांचे दोन संग्रहही ह्यांनी भारत इतिहास संशोधन मंडळाद्वारे संपादित व प्रकाशित केले. ह्यांच्या काही स्फुट लेखांचा संग्रह *इतिहास-संचार* (१९६३) ह्या नावाने प्रसिद्ध आहे. इतिहास हा मानवी समाजजीवनाचा वाहता प्रवाह असल्यामुळे विद्यार्थ्यांचे चारित्र्य घडविण्यात त्याचा महत्त्वाचा वाटा असतो, ही चितळ्यांची इतिहासलेखनामागील भूमिका आहे.

हरिश्चंद्र थोरात, मीनल निसळ

**चितळे, शंकर दामोदर :** ( ज. – मृ. १३ मे, १९५९). इतिहासलेखक व पत्रकार. शिक्षण, एम.ए.,बी.टी. दैनिक 'सकाळ'चे सह-संपादक. प्रताप कॉलेज, अमळनेर व महाराष्ट्र विद्यालय, पुणे या संस्थांत इतिहासाचे अध्यापक.

*इतिहास कसा शिकवावा* (१९४१) हा अध्यापन कलेच्या दृष्टिकोनातून शास्त्रीय पद्धतीने विवेचन करणारा ग्रंथ. *आमचा महाराष्ट्र देश* (१९४४), *अर्वाचीन भारतीयांच्या कथा* (१९४५) या पुस्तकांतून त्यांनी कथात्मक पद्धतीने व रसाळ रीतीने इतिहासलेखन केले आहे. 'हिंदुस्तानचा साधनरूप इतिहास' हा प्राध्यापक रा. बि. ओतुरकरांच्या सहकार्याने संपादित केलेला त्यांचा ग्रंथही उल्लेखनीय आहे. *हिंदी हीच आमची राष्ट्रभाषा* (१९४७) ह्या पुस्तकातून त्यांनी हिंदीचा पुरस्कार केला आहे.

हरिश्चंद्र थोरात, मीनल निसळ

**चित्रे, परशुराम दिनकर :** (ज. १ मे, १८८१ – मृ. १४ फेब्रुवारी, १९५०). संतसाहित्य विवेचक. शिक्षण मुंबई येथे. एल्फिन्स्टन कॉलेजमधून बी.ए. त्यानंतर आर्यन एज्युकेशन सोसायटीच्या आर्यन शाळेत शिक्षक. विवेकानंदांचे साहित्य व संतचरित्रे ह्यांचे सखोल अध्ययन.

*भक्तिगीता* (१९२८) हे भगवद्‌गीतेतील भक्तियोगपर श्लोकांवरील विश्लेषणात्मक टीका करणारे सटीप पुस्तक, *'तुकाराम महाराजांचा दिव्य संदेश* (१९३०) हे तुकारामांच्या निवडक अभंगांतील विचारांचा परामर्श घेणारे पुस्तक व *श्री निवृत्ति–ज्ञानदेवांचा जयजयकार* (१९५२) हा निवृत्ती व ज्ञानेश्वर यांच्या जीवनकार्याचे मूल्यमापन करणारा व ज्ञानेश्वरांच्या तत्त्वज्ञानाचा आणि शिकवणुकीचा सामाजिक अन्वयार्थ स्पष्ट करणारा ग्रंथ, ही चित्र्यांची साहित्यनिर्मिती. *आपली उपनयन संस्था* (१९३१) या पुस्तकातून त्यांनी उपनयन संस्थेचे मूळ स्वरूप शोधण्याचा प्रयत्न केला आहे. प्राचीन आर्यांची व्यापक अर्थ असणारी उपनयन संस्था, आता केवळ यज्ञोपवीत धारण करण्यापुरतीच सीमित झाली असल्याने तिचा त्याग करणे श्रेयस्कर; असे मत त्यांनी या पुस्तकात मांडले आहे.

हरिश्चंद्र थोरात, मा. पां. कुलकर्णी

**चिपळूणकर, कृष्णशास्त्री हरी :** (ज. १८२४, पुणे – मृ. २० मे, १८७८, पुणे). अव्वल इंग्रजी राजवटीतील चतुरस्त्र लेखक. भाषांतरकार, व्याकरणकार व संपादक. विष्णुशास्त्री चिपळूणकरांचे वडील. शिक्षण पुणे येथे. वेदाध्ययन घरी व न्याय, अलंकार, धर्म ह्या शास्त्रांचे पुणे-पाठशाळेत अध्ययन. कृष्णशास्त्र्यांच्या बुद्धिमत्तेमुळे 'बृहस्पती' ही पदवी त्यांना विद्यार्थीदशेतच त्यांच्या गुरुजनांनी बहाल केली होती. पुढे इंग्रजी पाठशाळेत इंग्रजी भाषेत व अर्थशास्त्रादी विषयात प्राविण्य. १८५२ साली 'ट्रान्सलेशन एक्झिबिशनर म्हणून इंग्रज सरकारकडून नेमणूक. पुना कॉलेजमध्ये (स्थापना १९५१) मराठीचे असिस्टंट प्रोफेसर. 'दक्षिणा प्रैज कमिटी'चे सेक्रटरी, पुना ट्रेनिंग कॉलेजचे पहिले प्राचार्य (१८६५), 'रिपोर्टर ऑन दि नेटिव्ह प्रेस' ह्या पदावर दहा वर्षे काम (१८६८–७८).

मराठी वाङ्मयनिर्मितीच्या प्रारंभकाळातील एक शैलीकार व चतुरस्त्र लेखक म्हणून कृष्णशास्त्री ख्यातनाम आहेत. ख्रिस्ती मिशनऱ्यांच्या वाढत्या धर्मप्रसाराला आळा घालण्यासाठी पुण्यातील हिंदू धर्माभिमान्यांनी 'विचारलहरी' (स्थापना – जुलै १८५२) हे पाक्षिक पत्र काढले. कृष्णशास्त्री हे त्याचे संपादक होते. 'विचारलहरी' तील प्रखर टीकेमुळे ख्रिस्ती मिशनऱ्यांचा व पर्यायाने सरकारचा कृष्णशास्त्र्यांवर रोष झाला व त्यांना काही दिवसांसाठी कामावरून दूर करण्यात आले होते. ट्रेनिंग कॉलेजचे प्राचार्य असताना १८६५ पासून ते 'मराठी शालापत्रका'चे संपादन करीत. ह्या संपादन कामात त्यांना विष्णुशास्त्री चिपळूणकर ह्यांचेही साह्य मिळत असे. या 'शालापत्रका'तूनच त्यांचे मराठी व्याकरणावरील पंचवीस निबंध प्रसिद्ध झाले. हेच निबंध पुढे *मराठी व्याकरणावरील निबंध* (१८९३) ह्या नावाने पुस्तकरूपात प्रसिद्ध झाले. ट्रेनिंग कॉलेजात दादोबा पांडुरंग ह्यांचा मराठी भाषेच्या व्याकरणावरील ग्रंथ शिकवीत असताना, कृष्णशास्त्र्यांना त्यात ज्या उणिवा आढळल्या त्या दूर करण्यासाठी त्यांनी हे निबंध लिहिले होते. *'अरबी भाषेतील सुरस व चमत्कारिक गोष्टी*, भाग १ ते ५ (१८६१ – ६५) हे त्यांचे 'अरेबियन नाईट्स्'चे भाषांतर महाराष्ट्रीय जनतेला कथात्मक वाङ्मयाची गोडी लावणारे व सुबोध, शुद्ध, सरस आणि चटकदार

भाषापद्धतीचा अप्रतिम आदर्श निर्माण करणारे म्हणून अत्यंत महत्त्वाचे मानले जाते. *रासेलस* (१८७३) हे डॉ. जॉन्सनच्या इंग्रजी पुस्तकाचे भाषांतरही असेच उत्कृष्ट झाले आहे. वरील पुस्तकांखेरीज *साक्रेतिसाचा इतिहास* ( रोलिनच्या ग्रंथावरून, १८५२ ), *अर्थशास्त्र परिभाषा* (जॉन स्टुअर्ट मिल-कृत इंग्रजी पुस्तकावरून, १८५५), *संस्कृत भाषेचे लहान व्याकरण* (१८५९), *अनेकविद्या मूलतत्त्व संग्रह* (इंग्रजी ग्रंथांच्या आधारे, निरनिराळ्या विषयांवरील शास्त्रीय माहिती देणारे पुस्तक, १८६१), हे गद्यग्रंथ प्रसिद्ध आहेत. 'महाकवी कालिदासाच्या मेघदूता'चे कृष्णशास्त्री-कृत भाषांतर व जगन्नाथ पण्डिताच्या 'करुणाविलापा'चे *विरह विलाप* हे रूपांतरही सरस आहे. जगन्नाथ पंडिताच्या मूळ कल्पनारम्य काव्याला कृष्णशास्त्र्यांनी भावरम्य रूप दिले आहे. 'सुभाषितशार्ङ्गधरा'च्या आधारे त्यांनी लिहिलेल्या 'अन्योक्ती' अप्रतिम ठरल्या आहेत. त्यांची ही कविता *पद्यरत्नावली* (१८६५) या संग्रहात एकत्रित करण्यात आली आहे. कृष्णशास्त्र्यांचे साहित्य म्हणजे इंग्रजी-संस्कृत भाषांतील वाङ्मय मराठीत कसे आणावे याचा आदर्श वस्तुपाठच आहे, असे म्हणावे लागेल.

गं. दे. खानोलकर, म. ना. लोही

**चिपळूणकर, कृष्णाजी महादेव :** (ज. २९ मार्च, १८८१ – मृ. २३ मार्च, १९५९). कादंबरीकार. शिक्षण बी.ए., एलूएल्. बी. (१९१९). काही काळ शिक्षक व पुढे वकील. एक वर्षभर (१९१८– –१९) 'महाराष्ट्र ज्ञानकोशमंडळा'त काम.

चिपळूणकरांनी *व्रतपालन* (१९३७) ही एका इंग्रजी कादंबरीवर आधारलेली आणि *निर्मला* (१९२२) व *दोष कोणाचा!* (१९२३) ह्या दोन स्वतंत्र अशा एकूण तीन सामाजिक कादंबऱ्या लिहिल्या. चार्लस् डिकन्सच्या 'टेल ऑफ टू सिटीज' ह्या प्रसिद्ध कादंबरीचे *पापाचे प्रायश्चित्त* (१९१९) ह्या नावाने त्यांनी केलेले रूपांतरही प्रसिद्ध आहे. त्यांच्या कादंबऱ्यांतून तत्कालीन समाजसुधारणाविषयक चळवळीमुळे, विशेषतः स्त्रीशिक्षण, प्रौढविवाह व विधवाविवाह ह्या विषयीच्या जागृतीमुळे, समाजावर होणाऱ्या परिणामाचा ऊहापोह आढळतो. त्यांच्या पहिल्या तिन्ही कादंबऱ्यांतून योगायोग व चमत्कृती यांचा भरपूर वापर केलेला आहे.

हरिश्चंद्र थोरात, म. पां. कुलकर्णी

**चिपळूणकर, गोपाळ महादेव :** (ज. १७ नोव्हेंबर, १८८४ – मृ. २० डिसेंबर, १९२९). आरोग्य, स्त्रीशिक्षण इत्यादी विषयांचे लेखक. अमेरिकेतील एम्. ए. पदवी. त्यानंतर हिंगणे येथील अनाथ-बालिकाश्रमाचे व महिला विद्यापीठाचे आजन्म सेवक.

ह्यांचे स्त्रीशिक्षणविषयक लेख 'मासिक मनोरंजन', 'चित्रमयजगत्' 'यशवंत' वगैरे नियतकालिकांतून प्रसिद्ध झाले. *आरोग्य आणि व्यायाम अथवा औषधावाचून निरोगी कसे रहावे!* (आवृ. २ री १९२६; ह्याच पुस्तकास नंतर त्यांनी 'आरोग्यमार्गप्रदीप' हे नाव दिले); *स्त्रीजीवनावर प्रकाश अथवा स्त्रीशिक्षणाचा शास्त्रीय पाया*, *सार्वत्रिक शिक्षण व मोफत वाचनालये* (१९१७), *शुद्धलेखनाचा राजमार्ग* (१९२७) ही यांची पुस्तकेही प्रसिद्ध आहेत.

नंदिनी लोटलीकर, म. पां. कुलकर्णी

**चिपळूणकर, लक्ष्मण कृष्ण :** (ज. १२ जानेवारी, १८५३ – मृ. २ मे, १९००). चरित्रकार व इतिहास ग्रंथलेखक. कृष्णशास्त्री चिपळूणकरांचे चिरंजीव. विष्णुशास्त्री चिपळूणकरांचे धाकटे बंधू. बी.ए. (१८७५). वऱ्हाडात सरकारी शाळा खात्यात नोकरी.

ह्यांची *विष्णुशास्त्री चिपळूणकर ह्यांचे चरित्र* (१८९४) व *महाराष्ट्राचा इतिहास* ही दोन पुस्तके प्रसिद्ध आहेत. विष्णुशास्त्री चिपळूणकरांचे विश्वसनीय जीवनवृत्त कथन करणारा त्यांचा हा विस्तृत चरित्रग्रंथ तपशिलाच्या दृष्टीने अत्यंत महत्त्वाचा आहे. *महाराष्ट्राचा इतिहास* हा ग्रंथ १८९४ पासून प्रकरणशः 'ग्रंथमाले'तून प्रसिद्ध झाला होता. ह्या ग्रंथात अलाउद्दिन खिलजीच्या स्वारीनंतर महाराष्ट्रात मुसलमानी सत्ता प्रस्थापित झाली; त्या काळापासून ते इ. स. १७०७ पर्यंतच्या काळातील मराठ्यांचा इतिहास, तत्कालीन उपलब्ध ऐतिहासिक साधनांच्या आधारे, विस्तारपूर्वक व चित्तवेधक शैलीत लिहिला आहे.

उषा ढाकळकर, मदन कुलकर्णी

**चिपळूणकर, विष्णु कृष्ण :** ० विष्णुशास्त्री : (ज. २० मे, १८५०, पुणे – मृ. १७ मार्च, १८८२, पुणे). 'निबंधमाला'कार व स्वाभिमानी राष्ट्रवादी वृत्तीचे निबंधलेखक. कृष्णशास्त्री चिपळूणकरांचे चिरंजीव. शिक्षण पुणे येथे. पूना कॉलेजमधून बी.ए. (१८७२). पूना हायस्कूल-मध्ये शिक्षक (१८७३ ते १८७९). सरकारी नोकरीतील बदलीमुळे काही काळ रत्नागिरी येथे वास्तव्य (१८७७–१८७९). 'न्यू इंग्लिश स्कूल'चे संस्थापक (१ जानेवारी, १८८०). *निबंधमाला* (१८७४) व *काव्येतिहाससंग्रह* (१८७८) ह्या मासिक पुस्तकांचे व टिळक-आगरकरांच्या साहाय्याने काढलेल्या 'केसरी' व 'मराठा' ह्या अनुक्रमे, मराठी व इंग्रजी वृत्तपत्रांचे निर्माते. 'चित्रशाळा' (१८७७) ह्या संस्थेचे संस्थापक. 'मराठी भाषेचे शिवाजी'. इंग्रज राजवटीत सरकारी नोकरीचे पाश तोडून स्वदेश, स्वधर्म, स्वभाषा यांची स्वार्थ-त्यागपूर्वक सेवा करण्याची दीक्षा महाराष्ट्राला चिपळूणकरांनी दिली.

विष्णुशास्त्री हे मराठी गद्यवाङ्मयाच्या आधुनिक युगाचे प्रवर्तक म्हणून प्रसिद्ध आहेत. त्यांची विद्वत्ता व रसिकता त्यांच्या वडिलांच्या –कृष्णशास्त्री यांच्या–सहवासात आकाराला आली. कृष्णशास्त्री हे अत्यंत बुद्धिमान आणि उत्कृष्ट लेखक होते. त्यांच्यामुळे विष्णुशास्त्री यांना व्यासंगाची प्रेरणा मिळाली. विष्णुशास्त्री यांनी इतिहास, अर्थ-शास्त्र, तर्कशास्त्र, नीतिशास्त्र, या विषयांचा तसेच इंग्रजी, मराठी व संस्कृत या भाषांमधील उत्तमोत्तम ग्रंथांचा सखोल अभ्यास केला. बी.ए. होण्यापूर्वीच ते वडिलांच्या 'शालापत्रक' मासिकाचे काम पाहत होते. त्यांच्या 'रासेलस' ह्या कादंबरीच्या भाषांतराचे अर्धे राहिलेले काम विष्णुशास्त्रींनी यशस्वीरीत्या पूर्ण केले होते. 'शाला-पत्रका'तून त्यांनी कालिदास, भवभूती, बाण, सुबंधु व दंडी या संस्कृत कवींवर पाच स्वतंत्र लेख लिहिले. कवींसंबंधी उपलब्ध माहिती, काव्य-कृतींचे रहस्योद्ग्राही विवरण आणि योग्य तेथे काव्यकृतींतील मार्मिक उताऱ्यांची योजना, अशा पद्धतीने त्यांत विवेचन आहे. त्यांचे हे लेख *संस्कृत कविपंचक* (१८९१) मध्ये पुढे ग्रंथरूप पावले. पाश्चात्त्य समीक्षा पद्धतीचा अवलंब करून, शोधपूर्वक व चिकित्सक दृष्टीने लिहिलेला हा मराठीतील पहिला विस्तृत टीकाग्रंथ होय. विष्णु-शास्त्र्यांनी 'शालापत्रका'तून सरकारी धोरण व मिशनरी यांवर केलेल्या टीकेमुळे 'शालापत्रक' बंद पडले (१८७५). पण त्यापूर्वीच त्यांनी आपल्या स्वतंत्र विचारांना मुक्तपणे प्रगट करण्यासाठी *निबंध-माला* (प्रथमांक, २५ जानेवारी, १८७४) सुरू केली होती. तिचे सात वर्षांचे एकंदर ८४ अंक निघाले.

'निबंधमाले'च्या रूपाने मराठी साहित्यात एका नव्या युगाचा प्रारंभ झाला. 'निबंधमाला' हे मासिकपत्र असले तरी ते संपूर्णपणे एकट्याकी लिहिलेले असे. या मासिकातून चिपळूणकरांनी निबंध, समीक्षा व चरित्र या तीन प्रकारांतील लेखन केले. तसेच *विनोद आणि सहदा-ख्यायिका* (१९०१ मध्ये पुस्तकरूप), 'भाषापरिज्ञान', 'अर्थसादृश्य' अशा सदरांखाली त्यांनी रंजक व उद्बोधक लेखन करून, नियत-कालिकांतील लेखनात कलात्मक सौंदर्य आणण्याचा प्रयत्न केला. त्यांनी जणू मराठी भाषेतील संपूर्ण आविष्कारसामर्थ्य यातून प्रभावीपणे प्रगट केले आणि निबंध या वाङ्मयप्रकाराला घाटदारपणा प्राप्त करून

दिला. विस्तृत निबंध, सावेश मतप्रतिपादन, पल्लेदार वाक्यरचना, मराठी-संस्कृत श्रुतयोजनांचा मार्मिक उपयोग, प्रौढ, सालंकृत, संस्कृतप्रचुर रचनाशैली, लेखाच्या शिरोभागी अवतरणांची योजना, उपरोधप्रचुर भाषाशैली, चतुर युक्तिवाद अशा अनेक बाबींमुळे त्यांचे लेखन प्रभावी ठरले. 'मराठी भाषेची सांप्रतची स्थिती', 'इतिहास', 'वक्तृत्व', 'आमच्या देशाची स्थिती' इत्यादी त्यांचे निबंध या दृष्टीने उद्बोधक आहेत. हिंदी जनतेच्या मनातील न्यूनगंड दूर करून राष्ट्रीय अहंकार उद्दीपित करण्याचा त्यांचा हेतू यातून यशस्वीपणे पार पडला. त्यासाठी त्यांनी वेळोवेळी प्राचीन भारतीय परंपरेचा गौरवशाली इतिहास वाचकांच्या मनात जागता ठेवला. त्यांच्या या गुणांवर लुब्ध होऊनच लो. बाळ गंगाधर टिळक व सुधारकाग्रणी गो. ग. आगरकर हे चिपळूणकरांच्या राष्ट्रकार्यात सहभागी झाले व केसरी-मराठा संस्था यांची स्थापना यातूनच झाली.

चिपळूणकरांनी आपल्या निबंधांतून इंग्रजांच्या राजनीतीचे वास्तव स्वरूप स्पष्ट करून, त्यांच्यामुळे या देशाचे कल्याण होणार असल्याचा तत्कालीन सुशिक्षितांचा भ्रम दूर केला. तसेच भारतीय समाजाच्या काही दोषांवर परखडपणे टीकाही केली.

'डॉ. जॉन्सन' हा त्यांचा निबंध म्हणजे पाश्चात्त्य चरित्रलेखनपद्धतीचा अवलंब करून लिहिलेले चरित्र होय. त्यांच्या निबंधांमध्ये भाषाविषयक, सामाजिक, राजकीय, चर्चात्मक, परमतखंडनपर अशा इतर अनेक प्रकारांचाही समावेश आहे. 'केसरी'मधूनही त्यांचे लेख प्रसिद्ध झाले आहेत. त्यांचा लेखनसंभार लक्षात घेता 'मराठी गद्याचे जनक' हा त्यांचा गौरव सार्थ ठरतो.

पु. ग. सहस्रबुद्धे

संदर्भ : (१) 'निबंधमाला भा. १ व भा. २', प्रका. कृष्णराव मांडे, १८८२. (२) वि. बा. आंबेकर, 'निबंधवाङ्मय', 'मराठी वाङ्मयाचा इतिहास' खंड. ५, भा. १ (संपा. रा. श्री. जोग), १९७३. (३) भा. यं. माडखोलकर, 'विष्णू कृष्ण चिपळूणकर – काल आणि कर्तृत्व', १९५४.

**चिपळूणकर, विष्णु गोविंद** : (ज. १० जून, १८६२, पुणे – मृ. ३१ ऑक्टोबर, १९१६). शिकारविषयक व अन्य पुस्तकांचे लेखक. यांनी बडोदा येथे वैद्यकीचा अभ्यास करून वैद्यकाचा व्यवसाय केला. प्राचीन मराठी वाङ्मयाचाही ह्यांचा विशेष अभ्यास होता. शिकारीची त्यांना विशेष आवड होती.

*हिंदुस्थानातील सर्प : भाग १* (१८९३), *शारीर शिक्षण* (१८९३), *कृष्णसार (काळवीट) अथवा हरणाची शिकार* (१८९७), *मृगया कुतूहल* (१९०७) व *वनवराहघात अथवा रानडुकरांची शिकार* (१९०८) ही ह्यांची उल्लेखनीय पुस्तके. *हिंदुस्थानातील सर्प* हा सर्पांविषयी व सर्पदंश व विषबाधा यासंबंधी माहिती देणारा ग्रंथ असून, त्याच्या दुसऱ्या भागात सर्पांची चित्रे, त्यांना ओळखण्याच्या खुणा व त्यांची गुणवैशिष्ट्ये दिली आहेत. मात्र हा दुसरा भाग प्रकाशित झाल्याची नोंद आढळत नाही. *मृगया कुतूहल* ग्रंथात बडोदा–नरेश श्रीमंत सयाजी महाराज ह्यांच्या बापाच्या पहिल्या शिकारी विषयीची प्रत्यक्षावलोकनातून दिलेली माहिती आली आहे. *मराठी भाषेची लेखनपद्धती* (१९०४) हे त्यांचे आणखी एक पुस्तक. शिवचरित्रावर आधारित दोन व संभाजी चरित्रावरील एक अशी तीन ऐतिहासिक नाटकेही ह्यांनी लिहिल्याची माहिती मिळते.

गो. म. कुलकर्णी

० **चेतोहर** : पहा पाटणकर, परशुराम नारायण

**चोणकर, रामकृष्ण माधव** : ० हरी माधव समर्थ : (ज. ६ फेब्रुवारी, १८७१ – मृ. १२ ऑक्टोबर, १९२९, मुंबई). कवी व लेखक. शिक्षण मॅट्रिकपर्यंत. संस्कृतमधील पुष्कळशा सुभाषितांचे तसेच संस्कृत महिम्नाचे ह्यांनी मराठीत भाषांतर केले. ह्याशिवाय परदेशीयांना भारतीय संस्कृतीचा बोध व्हावा याकरिता षोडश *संस्कार*, *सत्यनारायणाची पूजा* इत्यादी पुस्तके त्यांनी इंग्रजीतून प्रसिद्ध केली.

ह्यांची स्फुट कविता 'विविधज्ञानविस्तार', 'काव्य-रत्नावली', 'मनोरंजन', 'लोकसेवक' व 'नवयुग' अशा अनेक नियतकालिकांतून प्रसिद्ध झाली आहे. त्यांच्या कवितेने प्राचीन परंपरेचे अनुकरण केलेले आढळते.

*मोरोपंतांची केकावली* (१९१५) हे निवडक वेच्यांचे (टीपा व सुभाषितांसह) एक पुस्तक, आणि प्राचीन मराठी कवितेच्या वेच्यांचे काही संग्रह त्यांच्या नावावर आहेत.

'इंदुप्रकाश, टाईम्स', 'बॉम्बे गॅझेट' व 'क्रॉनिकल' ह्या वृत्तपत्रांतून त्यांचे काही चर्चात्मक लेखही प्रसिद्ध आहेत.

उषा टाकळकर, मदन कुलकर्णी

**चोभे, (डॉ.) भिकाजी अमृत** : (ज. १३ जुलै, १८३५ – मृ. १९ ऑक्टोबर, १९१९, पुणे). शारीर व इंद्रिय – विज्ञानशास्त्रावरील ग्रंथांचे कर्ते. ग्रँट मेडिकल कॉलेजचे 'जी. जी. एम. सी.' पदवीधर व मुंबई विद्यापीठाचे फेलो. व्यवसायाने डॉक्टर.

चोभे यांचे *मानुषशारीरशास्त्र : ॲनाटॉमी* (१८६३–१८७२) व *मानुष इंद्रियविज्ञानशास्त्र : फिजिऑलॉजी* (१८६५) हे इंग्रजी ग्रंथांवरून तयार केलेले ग्रंथ आहेत. यांत इंग्रजीला पर्यायी मराठी शब्द योजले असले तरी शेवटी उपयुक्ततेच्या दृष्टीने इंग्रजी शब्द तसेच ठेवले आहेत. ग्रंथाच्या शेवटी इंग्रजी व लॅटिन शब्दांची अर्थासहित सूची दिली आहे.

नंदिनी लोटलीकर, मदन कुलकर्णी

**चौगुले, रामजी गणोजी** : ० रामजी गणोजी : (ज. १८१६ – मृ. १९६०). 'रसायनशास्त्र' व 'स्त्री' विषयक ग्रंथांचे कर्ते. मुंबईत वैद्यकीय व्यवसाय करणाऱ्या डॉ. चौगुल्यांनी विद्याव्यासंग फारसा नसतानाही अनुभव व बहुश्रुतपणा ह्यांच्या बळावर पुस्तके लिहिली. *नारायणबोध* (१८६०), *बोधकथासुत* (भाग २), *रसायनशास्त्र अथवा कुबेरनिधी* (भाग ३, १८५९) आणि *स्त्रीचरित्र* (१८५४) हे गद्यग्रंथ लिहिले. *नारायणबोध* हे त्यांनी स्वतःच्या नारायण नावाच्या मुलासाठी लिहिलेले बोधपर गोष्टींचे पुस्तक आहे. *स्त्रीचरित्र* हा ग्रंथ फार प्रसिद्ध असून याचे एकंदर चार भाग निघाले. *विदग्ध-स्त्रीचरित्र* (१८७१) व *मनोरंजक सुशिक्षित स्त्रीचरित्र, भाग २* (१८७२-७३) इत्यादी स्त्रीचरित्रात्मक कथाग्रंथही त्यांनी लिहिले. फारशी गोष्टींचे फाजील अनुकरण करणाऱ्या स्त्रियांना दुर्वर्तनापासून परावृत्त करण्यासाठी त्या काळी प्रसिद्ध होत असलेल्या, स्त्रीचरित्रपर पुस्तकांत डॉ. चौगुले ह्यांची पुस्तके उत्कृष्ट आहेत.

हरिश्चंद्र थोरात, मदन कुलकर्णी

संदर्भ : सरदार गं. बा. 'अर्वाचीन मराठी गद्याची पूर्वपीठिका'.

**चौधरी, बहिणाबाई नथूजी** : (ज. १८८०, असोदे, जिल्हा जळगाव – मृ. ३ डिसेंबर, १९५१, जळगाव). कवयित्री. शिक्षण नाही. वयाच्या तेराव्या वर्षी विवाह होऊन जळगावच्या इनामदार चौधरी घराण्यात गृहिणी म्हणून प्रवेश. पतिनिधनानंतर अपार कष्ट व दारिद्र्याचे चटके सहन करीत, बहिणाबाईंनी पाचसहा अपत्यांचे संगोपन केले. कवी सोपानदेव चौधरी हे बहिणाबाईंचे पुत्र.

कवितेचे जन्मजात देणे बहिणाबाईंना लाभले होते. *बहिणाबाईंची गाणी* (१९५२, १९६९, १९७७) हा त्यांचा कवितासंग्रह. घरी व शेतात नाना प्रकारची कामे करीत असताना त्यांना कविता स्फुरत. जुन्या परंपरागत ओवी छंदाचे रूप घेऊन बहिणाबाईंचा जीवनानुभव सहजपणे त्यांच्या कवितांतून प्रगट होतो. त्या निरक्षर असल्या तरी कथाकीर्तनाच्या संस्कारामुळे बहुश्रुत झाल्या होत्या. जिवंत जीवनानुभव व चिंतनशील काव्यदृष्टी यासोबतच ओघवती, भावगर्भ व

चित्रमयी शब्दकळा त्यांना लाभली होती. त्यांच्या कवितेतील प्रतिमा कृषिजीवनातून अनुभवसिद्धतेने आत्मसात केलेल्या आहेत. कोणत्याही पूर्वगामी कवितेचा प्रभाव नसल्याने त्यांची कविता अस्सल जीवनानुभूती प्रगट करणारी वाटते. खानदेशी ग्रामीण बोलीतील माधुर्य, जीवनातील सुखदुःखाचे गहिरे रंग, आशावादाचा आणि सौम्य उपदेशाचा ध्वनी, ह्यांमुळे बहिणाबाईंच्या कवितेला वेगळेच पृथगात्म सौंदर्य लाभले आहे.

त्यांच्या अर्थगर्भ कवितेमधून मानवी जीवनाकडे पाहण्याचे एक अत्यंत अर्थपूर्ण व विवेकी असे, सुजाण तत्त्वज्ञान प्रगट झालेले आहे. लक्ष्मीबाई टिळकांच्या 'स्मृतिचित्रां'प्रमाणेच *बहिणाबाईंची गाणी* ही मराठी साहित्याचा एक बहुमोल अलंकार ठरला आहे.

अनुराधा पोतदार, अंजली कुलकर्णी

संदर्भ : (१) आचार्य अत्रे व सोपानदेव चौधरी, 'बहिणाबाईंची गाणी (प्रस्तावना)'. (२) सरिता पदकी, 'बहिणाबाईंची गाणी', समाजप्रबोधन पत्रिका, मार्च-एप्रिल १९७१. (३) रुद्रवाणी (निसर्गकन्या बहिणाबाई चौधरी विशेषांक), १५ डिसेंबर, १९८१.

**छत्रे, केरो लक्ष्मण** : (ज. १६ मे, १८२४, नागाव – मृ. १९ मार्च, १८८४, पुणे). ज्योतिषशास्त्र व सृष्टिशास्त्रविषयक ग्रंथांचे कर्ते. कृष्णशास्त्री चिपळूणकरांपूर्वी 'शालापत्रक' मासिकाचे संपादक (१८६३). शिक्षण मुंबईस, एल्फिन्स्टन कॉलेजात. एल्फिन्स्टन इन्स्टिट्यूटमधील प्रारंभीच्या विद्यार्थ्यांपैकी एक. सिद्धपदार्थविज्ञान, रसायनशास्त्र व ज्योतिष या विषयांत प्राविण्य. पुणे कॉलेजात सृष्टीविज्ञान व गणिताचे असिस्टंट प्रोफेसर (१८५१), इंग्रजी शाळेचे मुख्याध्यापक (१८६०), पुणे ट्रेनिंग कॉलेजचे सुपरिंटेंडेंट (१८६२) व एल्फिन्स्टन कॉलेजात गणिताचे प्राध्यापक (१८६५). त्यानंतर डेक्कन कॉलेजमध्ये प्राध्यापक व शेवटी प्राचार्य. केरोपंत हे नामांकित गणितज्ञ म्हणून विख्यात होते. त्यांच्या मृत्यूनंतर 'इंडियन क्रॉनिकल', 'अमृतबझार पत्रिका' यांसारख्या महाराष्ट्राबाहेरील वर्तमानपत्रांनी त्यांच्यावर लेख लिहिले. ते सर्व लेख 'द प्रेस ऑन द लाईफ ॲण्ड डुईंग्ज ऑफ द लेट आर. बी. प्रोफेसर के. एल. छत्रे' (१८८४), नामक पुस्तिकेत एकत्रित केलेले आहेत.

रसायनशास्त्र, ज्योतिषशास्त्र, सिद्धपदार्थविज्ञान, वातावरण, वायुधर्म इत्यादी विषयांवर ह्यांनी दिलेली व्याख्याने *पदार्थविज्ञान शास्त्रांतील कित्येक विषयांवर व्याख्याने* (१८५२) या नावाने प्रसिद्ध आहेत. त्यांनी *पदार्थविज्ञानशास्त्र* (१८५५) हे एक लहानसे पुस्तकही स्वल्प किंमतीत प्रसिद्ध केले. युरोपखंडातील मोठमोठाले गणकांचे ग्रंथ व प्रत्यक्ष वेध यावरून *ग्रहसाधनांची कोष्टके* (१८६०), हा ग्रंथ प्रसिद्ध केला. 'मराठी ज्ञानप्रसारका'त ज्योतिःशास्त्रासंबंधी दोन-तीन लेख प्रसिद्ध. याशिवाय शालेय अभ्यासक्रमासाठी *अंकगणित – उत्पत्ति व उदाहरणे* (१८६१), *भूमापन* (गणितभाग) (१८६३), *पदार्थविज्ञान* (१८७९) ही पुस्तके त्यांनी लिहिली. *हवा प्रकरण* (१८५१) व *कुश्मनिर्णय* (१८९६) ही दोन पुस्तकेही त्यांच्या नावावर आढळतात. *ग्रहसाधनाची कोष्टके* आणि *पंचांग कोष्टके* (१८६१) ह्या त्यांच्या पुस्तकांनी पूर्वापार चालत आलेल्या कालगणनेला मोठा धक्का दिला. सरदार आबासाहेब पटवर्धन यांच्या सहाय्यामुळे केरूनानांनी तयार केलेले पंचांग, १८६५ पासून *पटवर्धनी पंचांग* म्हणून ओळखले जाऊ लागले. त्यानंतर 'टिळक पंचांग' पुढे आले तरी *पटवर्धनी पंचांगाहून* ते फारसे वेगळे नव्हते. १९०४ पासून सामुदायिक प्रयत्नातून अस्तित्वात आलेले 'टिळक पंचांग', म्हणजे केरूनानांनी प्रारंभ करून दिलेल्या पंचांग सुधारणा कार्याचे प्रगतरूपच होय.

कृ. मि. कुलकर्णी, मदन कुलकर्णी

**छत्रे, गोवर्धन लक्ष्मण** : (ज. १८३०, नागाव, जि. कुलाबा – मृ. २५ मे, १८६४). संगीत-लिपिकार. व्याकरण-अलंकार-छंद इत्यादींच्या अध्ययनासोबत ज्योतिष व गायनवादन यांचा अभ्यास. प्रो. केरो लक्ष्मण ह्या धाकट्या बंधूंच्या सहवासात इंग्रजीचे शिक्षण. मुंबई येथे स्थायिक झाल्यानंतर मुलींसाठी सुरू करण्यात आलेल्या शाळांतून संगीतशिक्षण देता यावे, यासाठी यांनी दोन वह्या तयार केल्या. एकीत गीतांचे लिपीकरण करण्याची पद्धती सोदाहरण दिली असून, दुसरीत त्या पद्धतीनुसार काही स्त्रीगीते लिहिली आहेत. ह्या वह्या १८६४ साली *गीतलिपी* व *स्त्रीगीत* ह्या नावांनी प्रसिद्ध झाल्या. 'द स्ट्यूडंट्स लिटररी ॲण्ड सायंटिफिक सोसायटी'च्या शाळांत त्यांचा उपयोग केला जाई. *स्त्रीगीतां*तून त्या काळी स्त्रीसमाजात गायिली जाणारी गीतेच रागदारीत लिपिबद्ध केली आहेत.

*गीतलिपी* हा या स्वरूपाचा पहिला ग्रंथ होय. ह्यामध्ये नादाचे उच्चनीचत्व प्रमाण साधले असून, नादांमधील परस्पर ऱ्हस्वदीर्घत्व जागजागी किती व कशी येतात हे शक्यतो दाखविण्याचा येथे प्रथमच प्रयत्न केला आहे. *लावण्या, रागदारीच्या आणि साध्या, भाग १ ला* (१८४८), *देवाचे भजन करण्याची गीते* (१८४९) व *लेकरांची गायने* (१८६१), ही यांची अन्य पुस्तके शिळामुद्रित आहेत.

डॉ. शरच्चंद्र विष्णु गोखले, रा. बा. बक्षी

**छत्रे, वीरेश्वर सदाशिव ऊर्फ तात्या** : ० दामोदर कवी : (ज. अंदाजे १८१५ – मृ. १८८९). पत्रकार, नाटककार व लेखक. शिक्षण मुंबईतील 'एल्फिन्स्टन इंग्लिश स्कूल'मध्ये. मुंबईतील 'ज्ञानसिंधु' ह्या शिळाछापखान्याचे *ज्ञानसिंधु* साप्ताहिकाचे चालक (१८४२), पुण्यात *मित्रोदय* साप्ताहिक (१८४४) काढले. *नारायणराव पेशवे ह्यांचे नाटक* (१८७०), *संगीत दमयंती स्वयंवर नाटक* (१८८८), काही फार्स व गोष्टी ह्यांचे लेखन यांनी केले. ह्यांनी संकलित केलेल्या जुन्या म्हणी, कथा, कहाण्या, संस्कृत सुभाषिते ह्यांचे *फडुंकपट्टी* (१८४२), *कामनाकल्पवृक्ष* (१८८८), *सार्थसुभाषित संग्रह* (१८९०) हे संग्रह प्रसिद्ध आहेत. ते शीघ्रकवी होते. 'दामोदर' कवी ह्या नावाने 'चेऊलवाडीकर नाटक मंडळी'स लागणाऱ्या कविता ते लिहून देत असत. *ज्ञानबोधक* (१८५९), *सुज्ञानबोधक* (१८६९), *ज्ञानविनोद* इत्यादी अनेक नियतकालिके ह्यांनी काढली होती.

डॉ. शरच्चंद्र विष्णु गोखले, रा. बा. बक्षी

**छापखाने, केशव रामचंद्र** : (ज. २७ नोव्हेंबर, १८७५ – मृ. १३ फेब्रुवारी, १९४०, सांगली). मूळ आडनाव 'कानिटकर'. परंतु छापखान्यांचे खापरपणजोबा (केशवरावांचे आजोबा) 'गंगाधर रामचंद्र. यांचेपासून 'छापखाने' हेच आडनाव पुढे रूढ झाले. शिक्षण–एम्.ए., एल्एल्.बी. राजाराम कॉलेज, कोल्हापूर व तदनंतर 'डेक्कन कॉलेज' पुणे येथे. सर्व शिक्षण शिष्यवृत्त्या व स्वकष्टार्जनाने. एल्एल्. बी. नंतर सांगलीस वकिलीचा व्यवसाय. या क्षेत्रात ते अतिशय यशस्वी झाले. लो. टिळकांचे एक निकटचे स्नेही म्हणूनही यांनी लौकिक मिळविला. छापखाने हे एक नामांकित वक्तेही होते. ज्ञानेश्वरीचे गाढे व्यासंगी होते.

डॉ. ॲनी बेझंट यांच्याशी निकट संपर्क आल्यामुळे थिऑसाफीच्या अंतर्वर्तुळात प्रवेश. सांगलीत 'थिऑसॉफिकल् लॉज'चे संस्थापक–अध्यक्ष.

नाट्यसंमेलनाचे अध्यक्ष (१९०८) नाट्यलेखन, नाटक पाहणे, दिग्दर्शक, नाटकांच्या तालमी घेणे, यांचाही यांना छंद होता. शास्त्रीय संगीताचे उत्कृष्ट जाणकार.

लेखन : (१) *जे. कृष्णमूर्ती संदेश परिचय* (१९३४) (१९८७ ते ९० च्या दरम्यान कोणीतरी याची दुसरी आवृत्ती प्रसिद्ध केली आहे, असे समजते.) ग्रंथाचा विषय : कृष्णमूर्तींचे तत्त्वज्ञान व भगवद्गीता यांचा समन्वय हा आहे.

(२) *स्वाध्याय ज्ञानेश्वरी* –(राजाराम कॉलेजमधील व्याख्यानमालेसाठी केलेली ज्ञानेश्वरीवरील टिपणे मुद्रित स्वरूपात. १९३३-३४).

(३) *यक्षसंदेश* –मुद्रित केले पण अधिकृत प्रकाशन केले नाही.

*मोहनतारा नाटक* Romeo and Jewliet चे रूपांतर–पुढे नावारूपास आलेले नट रामभाऊ गोखले, नानबा गोखले, एक स्त्रीपार्टी नट कानिटकर, यांनी नव्याने स्थापन केलेल्या कंपनीसाठी 'सामाजिक नाटक मंडळी' लिहिले (१९०८). प्रकाशन १९१६. या नाटकाचे अनेक यशस्वी प्रयोग झाले. प्रकाशनकाल : १९०६ ते १९०८. पहिला प्रयोग १९०६. प्रकाशन १९०८.

केशवराव छापखाने यांचे *मोहनतारा* हे रूपांतरित नाटक १९०८ च्या सुरुवातीचे आहे. 'रोमिओ अँड ज्युलिएट' या नाटकाची यापूर्वी तीन रूपांतरे झाली असली, तरी छापखान्यांचे रूपांतर सर्वांत अधिक चांगले आहे, असा गौरव करून रंगभूमिकारांनी परांजप्यांच्या बाबतीत केलेली तक्रार पुन्हा केली आहे. कर्तबगार, सिद्धहस्त लेखकांनी रूपांतरे करीत न बसता, आपल्या प्रतिभेने स्वतंत्र नाटकें लिहावीच असा रंगभूमिकारांचा सारखा आग्रह आहे. पृष्ठ–६५ (संदर्भ) 'मराठी नाट्य समीक्षा—'

रा. शं. वाळिंबे, कि. रा. छापखाने

**० जगन्मित्र : पहा टिळक, नारायण वामन**

**जटार, रामराव कृष्णराव :** (ज. १८५९ – मृ. ९ सप्टेंबर, १९३९) वेदान्तविषयक ग्रंथकार. ग्वाल्हेर संस्थानाच्या सरदार घराण्यात जन्म. बालपणापासून परमार्थमार्गाकडे कल.

*अव्यक्तबोध* (१८९६) आणि *स्वानंदसाम्राज्य* (पूर्वखंड १८९८, उत्तरखंड १९०२) हे स्वतंत्रपणे लिहिलेले वेदान्तविषयक ग्रंथ प्रसिद्ध. प्राचीन भारतीय तत्त्वज्ञानाच्या व्यासंगाने काही पाश्चात्त्य विद्वानांच्या विविध मतांचा परामर्ष घेऊन, हे ग्रंथ लिहिण्यात आले. *अव्यक्तबोध* या ग्रंथात पुरुष, प्रकृती, नाम, रूप, कारण, श्रुती आणि उपसंहार या प्रकरणांतून आलेल्या विषयांचाच विस्तार *स्वानंदसाम्राज्य* (पूर्वखंड), या ग्रंथाच्या ब्रह्म, माया, ईश्वर, सृष्टी आणि जीव या पाच प्रकरणांत आला आहे. ब्रह्मानंदप्रदेश, मायाप्रदेश, ईशानंदप्रदेश, सृष्ट्यानंदप्रदेश व जीवानंदप्रदेश यांतून अनुक्रमे ब्रह्मस्वरूपवर्णन, मायेचे विलक्षण रूप, ईश्वरसृष्टीची उत्पत्ती, स्थिती व लय आणि 'अहं' (मी) चे स्वरूप ह्यांचे व उत्तरखंडातील 'साधकानंदप्रदेश' व 'कर्मानंदप्रदेश' यांत साधक व कर्म यांचे स्वरूप; 'रूपानंदप्रदेशा'त तपाचे स्वरूप व साधने, 'भक्त्यानंदप्रदेशा'त भक्तीचे स्वरूप व 'ज्ञानानंदप्रदेशा'त अज्ञानस्वरूप, आत्मानुभूती व मुक्ती या विषयांचे विवेचन आढळते. समाजाला धर्मोन्नतीच्या व आत्मोन्नतीच्या मार्गाकडे वळविण्याच्या हेतूने प्रस्तुत ग्रंथांची निर्मिती झाली आहे.

नंदिनी लोटलीकर, मीनल निसळ

**० जनार्दन वासुदेवजी :** पहा आगासकर, जनार्दन वासुदेव

**जवळकर, दिनकरराव शंकरराव :** (ज. १८९८ – मृ. ३ मे, १९३२). ब्राह्मणेतर सत्यशोधक चळवळीचे कार्यकर्ते, पत्रकार, प्रक्षोभक वक्ते आणि लेखक. पुणे जिल्ह्यातील चोरांची आळंदी येथे पाटलांच्या कुटुंबात जन्म. शिक्षण मॅट्रिकपर्यंत. ब्राह्मणेतर चळवळीत प्रवेश करण्यापूर्वी लो. टिळकांचे मराठा अनुयायी, नारायणराव गुंजाळ यांच्या परिवारात वावर. पुढे जेधे बंधूंच्या सहवासाने ब्राह्मणेतर चळवळीत उडी.

हिंदूमधील आंतरजातीय विवाहांना कायदेशीर मान्यता मिळावी म्हणून मांडण्यात आलेल्या, पटेल बिलाची (१९१८) तरफदारी करणारे *प्रणय प्रभाव* हे नाटक जवळकरांनी लिहिले. पण त्याच्यावर बंदी आल्याने त्याचे प्रयोगही होऊ शकले नाहीत वा ते प्रसिद्धही होऊ शकले नाही. परंतु त्यावरून जवळकरांच्या लेखणीमधील स्फोटकता व दाहकता लक्षात आल्याने, छत्रपती शाहू महाराजांनी त्यांना कोल्हापूर येथे नेऊन 'तरुण मराठा' नावाचे पत्र चालवायला दिले. या पत्रातील जवळकरांचे लेखन अन्य ब्राह्मणेतर जनांनाही रुचू आणि पचू नये इतके स्वैर आणि बेलगाम होते. त्यामुळे दीनमित्रकार मुकुंदराव पाटलांसारख्यांनाही त्याचा निषेध करावा लागला. इतकेच नव्हे तर स्वतः शाहू छत्रपतींना जवळकरांनी कोल्हापूर सोडून जावे असा आदेश द्यावा लागला, तेव्हा अखेर त्यांनी कोल्हापूर सोडले.

कोल्हापूर सोडून जवळकर अखेर पुण्यात दाखल झाले. तेथे टिळकपक्षियांच्या सार्वजनिक गणेशोत्सवातील मेळ्यातील प्रचाराला तशाच प्रकारे उत्तर देण्यासाठी, जेधे प्रभृतींनी काढलेल्या 'छत्रपती पद्य संग्रह' ही मेळ्यातील गाण्यांची पुस्तिका जवळकरांनी प्रकाशित केली. त्यात त्यांच्याबरोबरच केशवराव जेधे यांनी रचलेली गाणीही समाविष्ट आहेत. या मेळ्याने पुण्यातील टिळकपक्षीय नेतृत्वाला आव्हान देऊन, त्याची मिरासदारी संपुष्टात आणली.

याच काळात पुण्यात शिवस्मारकाच्या निमित्ताने ब्राह्मणेतरांच्या अंतर्गत एक नवाच वाद उपस्थित झाला. संकल्पित शिवस्मारक समितीत ब्राह्मणांचा समावेश असू नये, अशी भूमिका जेधे–जवळकर इ. तरुणांनी घेतली. ब्राह्मणांचा समावेश मान्य असलेल्या शिंदे सरकारांच्या पक्षात मराठा समाजातील प्रतिष्ठित व बुजुर्ग मंडळी होती. जवळकरांनी 'आग्या वेताळ' या टोपणनावाने *श्री. शिवस्मारक पुराण* नामक सतरा अध्यायांची पोथी लिहून, सरकार पक्षाचा विदारक उपहास केला (१९२३). या संदर्भातील तरुण मंडळींची भूमिका मांडण्यासाठी केशवराव जेधे यांनी 'श्री शिवस्मारक' नावाचे साप्ताहिकही (१९२३-२४) आठ महिने चालविले. त्याचे अंक उपलब्ध होत नसले तरी त्यातील बरेचसे लिखाण जवळकरांचे असणार हे उघड आहे.

दरम्यान पुण्यातील गणेशोत्सवात दोन्ही पक्षांच्या मेळ्यांनी एकमेकांवर केलेल्या अभिरुचीहीन टीकेमुळे पुण्यातील वातावरण दूषित होत होते. मारामाऱ्या, कोर्टकचेऱ्या यांनाही ऊत आला होता. याच सुमारास रामचंद्र नारायण लाड काढीत असलेल्या 'मजूर' या पत्रातूनही जवळकर लिहीत असत. 'मजूर'मध्ये प्रकाशित झालेल्या लेखनाबद्दल लाडांना बिनशर्त माफी मागावी लागली. तथापि छत्रपती पद्यसंग्रहातील मजकुराबद्दल लोकमान्यांचे चिरंजीव श्रीधरपंत यांनी भरलेल्या खटल्यामुळे लाड-जवळकरांना प्रत्येकी पन्नास रुपये दंडाची शिक्षा भोगावी लागली. लाड हे त्या पुस्तिकेचे मुद्रक होते.

१९२४ मध्ये पुणे नगरपालिकेच्या वतीने लो. टिळक आणि विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचे पुतळे पुण्यात उभारण्यात आले होते. तेव्हा नगरपालिकेचे सदस्य असलेल्या केशवराव जेध्यांनी १९२५ मध्ये महात्मा जोतिराव फुल्यांचा पुतळा उभारण्याचा ठराव मांडला. बहुमताअभावी तो फेटाळला गेला, परंतु त्या निमित्ताने पुण्यात मोठे वादंग झाले. टिळकपक्षीयांनी फुल्यांना तर ब्राह्मणेतरांनी टिळकांना शिव्या घालणे नित्याचे झाले. 'मजूर'मधून जवळकर तर 'संग्राम'मधून गणपतराव नलवडे यांच्या लेखण्यांना जणू ऊत आला. जवळकरांनी टिळक आणि त्यांचे अनुयायी यांच्यावर बेफाम हल्ला चढवणारी *देशाचे दुष्मन* ही पुस्तिका लिहिली. ती जेध्यांनी लाडांच्या छापखान्यात छापून प्रसिद्ध केली (१९२५). जवळकरांच्या जहाल शैलीमुळे महाराष्ट्रात या पुस्तिकेने चांगलीच खळबळ माजविली. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचे पुतणे कृष्ण महादेव चिपळूणकर यांनी याबाबत बदनामीचा खटला दाखल केला. त्यात खालच्या कोर्टाने जवळकर, लाड, जेधे व बागडे यांना फर्मावलेली शिक्षा, डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या कायदापटुत्वामुळे उच्च न्यायालयात रद्द झाली. तरीही *जाहीर सवाल नं. १*, *मर्द हो ! नाके कापून घ्या* आणि

*१९५० सालची ब्राह्मण परिषद* या तीन पुस्तिकाबद्दल, खुद्द पोलिस खात्यानेच भरलेल्या खटल्यामुळे जवळकरांना दंड व कैद अशी दुहेरी शिक्षा भोगावी लागली.

ब्राह्मणेतर पक्षाचे काम करताना जेधे-जवळकर हे भास्करराव जाधवांबरोबर होते. परंतु हळुहळु भास्कररावांच्या सरकारधार्जिणेपणा लक्षात आल्याने जेधे त्यांच्यापासून दुरावू लागले. जवळकर मात्र भास्कररावांना धरून राहिले. १९२८ मध्ये मुंबई येथे भास्कररावांच्या आश्रयाने *कैवारी* नावाचे पत्र जवळकरांनी सुरू केले. सायमन कमिशनवर बहिष्कार घालायचा की नाही या प्रश्नावर ब्राह्मणेतरांमध्ये फूट पडली. जेधे बहिष्कारवादी झाले आणि भास्कररावांची साथ न सोडता आल्याने जवळकरांनी जेध्यांशी फारकत घेतली. भास्करराव अबकारी खात्याचे मंत्री असल्याने त्यांनी त्याकाळात मूळ धरू पहात असलेल्या, डांगे-निमकर प्रभृतींच्या गिरणी कामगार चळवळीतील ब्राह्मणेतरांमध्ये फूट पाडण्यासाठी 'कैवारी'चा उपयोग करून घेतला. कर्मवीर वि. रा. शिंदे यांच्यामुळे जेधे वेगाने म. गांधींच्या काँग्रेसकडे खेचत जात असताना, जवळकर मात्र भास्कररावांना चिकटून होते. परिणामतः त्यांना ब्राह्मणेतर पक्षातर्फे इंग्लंडचा दौरा करण्याची संधी मिळाली (नोव्हेंबर १९२९).

जवळकरांच्या विलायत वारीचा परिणाम मात्र भास्कररावांच्या अपेक्षेच्या उलट झाला. तेथील परिस्थिती पाहून परतलेले जवळकर गांधींना पाठिंबा देऊ लागले. इतकेच नव्हे तर शेतकरी कामगारांच्या म्हणजे समाजवादी राज्याच्या भाषेत बोलू लागले. जानेवारी १९३१ मध्ये बंदी हुकूम मोडून त्यांनी केलेल्या भाषणाबद्दल सव्वा वर्षाची सक्तमजुरी झाली. परंतु मार्च १९३१ मध्ये झालेल्या गांधी–आयर्विन समेटामुळे ते लवकरच म्हणजे दीड महिन्यात सुटले. मे १९३१ मध्ये आपल्या नव्या डाव्या धोरणाचा प्रचार करणारे *तेज* नावाचे नवे साप्ताहिक त्यांनी सुरू केले. ते चारपाच महिने चालले.

आपल्या क्रांतिकारी डाव्या विचारांची सुसंगत मांडणी करण्यासाठी जवळकरांनी *क्रांतीचे रणशिंग* नावाचे पुस्तक लिहायला घेतले. परंतु ते अपुरे असतानाच जवळकर रक्तक्षयाने अकाली मरण पावले (३ मे, १९३२).

जहाल, चटकदार, प्रक्षोभक आणि विचारांपेक्षा भावनांना आवाहन करणारे लेखन जवळकर करीत. चळवळीची गरज म्हणूनच त्याकडे पाहिले पाहिजे.

संदर्भ : फडके, य. दी. 'दिनकरराव जवळकर समग्र वाङ्मय', महात्मा जोतिराव फुले समता प्रतिष्ठान, पुणे, १९८४.

मोरे, सदानंद श्रीधर

० **जातिहृदय** : पहा सावरकर, नारायण दामोदर

**जाधव, भास्करराव विठोजीराव** : (ज. १७ जून, १८६७, नागाव, जि. कुलाबा–मृ. २६ जून, १९५०, कोल्हापूर). शिक्षण, एम.ए. (१८९५), एलएल्.बी. (१८९७) पर्यंत. कोल्हापूर संस्थानात उच्च अधिकारी. १९२३ नंतर मुंबई राज्यात शिक्षणमंत्री. सत्यशोधकसमाजाचे एक आधारस्तंभ.

ह्यांचे स्फुटलेखन 'ज्ञानमंदिर', 'समाजस्वास्थ्य', 'महाराष्ट्र शारदा', 'किर्लोस्कर' इत्यादी नियतकालिकांतून प्रसिद्ध झाले. *रामायणावरील नवा प्रकाश* (१९५१) हा ह्यांचा महत्त्वाचा ग्रंथ. यात शेती व क्षत्रियत्व यांचा एकरूप संबंध प्राचीन असून, दक्षिणेतील द्रविड व उत्तरेतील आर्य ह्यांचे प्राचीन काळीच बेमालूम मिश्रण झाले, असे मत ह्यांनी प्रगट केले आहे. मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या वार्षिक समारंभाच्या अध्यक्ष पदावरून १९३१ साली त्यांनी केलेले भाषण *मराठे आणि त्यांची भाषा* (१९३२) या पुस्तकाच्या रूपाने प्रसिद्ध आहे. या भाषणात भास्कररावांनी मराठी जातीसंबंधीचे आपले सांस्कृतिक व मानववंशशास्त्रीय संशोधन प्रगट केले आहे. मराठी भाषेची उत्पत्ती व मराठीचे शुद्धलेखन ह्यासंबंधीचे त्यांचे विचार मननीय व महत्त्वाचे आहेत. 'दीनबंधु' या पत्राचे संपादनही (१९०२–१९०३) त्यांनी केले. राजकारण, समाजकारण आणि संशोधन या तीनही क्षेत्रांत त्यांना रस होता.

रा. म. जाधव, म. ना. जोशी

**जामदार, यादव शंकर** : (ज. १८७१–मृ. १५ जानेवारी, १९४९). तुलसीरामायणाचे भाषांतरकार व तुलसीरामायणाचे चिकित्सक अभ्यासक. सरकारी न्यायखात्यात काही काळ मुन्सफ, नंतर सबजज्ज. वास्तव्य नागपूर येथे.

ह्यांचे *श्रीरामचरितमानस अथवा तुलसीरामायण* (मराठी भाषांतरासहित, १९१३) व *श्रीमानसहंस अथवा तुलसीरामायण रहस्य* (१९२६) हे दोन ग्रंथ प्रसिद्ध आहेत. हिंदीतील एका सर्वमान्य काव्यग्रंथाचा मराठी वाचकांना प्रथम परिचय करून देण्याचे कार्य ह्या ग्रंथांनी केले. तुलसीरामायणाचे हे भाषांतर शब्दशः केले असून, सामान्यतः सुबोध आहे. सुरुवातीला तुलसीदासाचे चरित्र आणि शेवटी कठीण हिंदी शब्दांचा कोश व व्यक्तिस्थलविषयक सूची आढळते. श्रीमानसहंस अथवा *तुलसीरामायणरहस्य* ह्या दुसऱ्या ग्रंथातल्या काव्याची अभ्यासकाच्या भूमिकेतून चिकित्सा केली आहे. कविपरिचय व कांडानुसार काव्यसमालोचन ह्या पहिल्या दोन प्रकरणांत काव्याचा काल, उद्देश, कविविषयक माहिती व लोकशिक्षणाबद्दलची त्यांची भूमिका स्पष्ट करून, अध्यात्म व वाल्मीकी रामायण आणि तुलसी रामायण ह्यांतील व्यक्तिरेखांचा तुलनात्मक विचार केला आहे.

उषा टाकळकर, रा. बा. बक्षी

**जालवणकर, नारायण बोवा** : (ज. १७९३, जालवण, झाशी–मृ. १० जुलै, १८६८). संतकवी. वास्तव्य मध्यप्रदेशातील झाशी भागात. बालपणापासून वैराग्यवृत्ती. वयाच्या दहाव्या वर्षी विवाह. परंतु गृहत्याग करून मथुरेस हठयोग, ध्यानोपासना इत्यादींचा अभ्यास. त्यानंतर मनःशांतीसाठी दत्तोपासना.

ह्यांची ग्रंथरचना अध्यात्मपर आहे. *सप्तसागर* हा ह्यांचा ग्रंथ. *ज्ञानसागर* (१९३१), *विज्ञानसागर* (१९३३), *कैवल्यसागर* (१९३१), *आनंदसागर* (१९०४), *शांतिसागर* (१८८५), *करुणासागर* (१९०४) व *बोधसागर* (१९३०) अशा सात प्रकरणांतून मनुष्याचे कर्तव्य, कर्म व ज्ञानादी साधनांपेक्षा श्रेष्ठ असे भक्तिमहात्म्य, सद्गुरूपदेश, आत्मस्वरूपबोध, शांत पुरुषाची लक्षणे इत्यादी विषयांची चर्चा या ग्रंथात आहे. प्रत्येक प्रकरण स्वतंत्र पुस्तकरूपाने प्रसिद्ध झाले असून *करुणासागर* हे सर्वांत मोठे आहे. याशिवाय *गुरुपादुकाष्टक*, *चिद्रत्नमाला*, *बोधाष्टक*, *दत्ताष्टक*, *निर्वाणपंचक*, *सुविचारमाला* इत्यादी स्फुट प्रकरणात्मक रचनाही प्रकाशित झाली आहे. ह्यांनी पदे व अभंग यांचीही रचना केली असून ती साधी, सुलभ व मधुर आहेत.

ग. वि. कवितकर, शीतल निसळ

**जावडेकर (आचार्य), शंकर दत्तात्रेय** : (ज. २६ सप्टेंबर, १८९४, मलकापूर–मृ. १० डिसेंबर, १९५५, पुणे). विचारवंत, राज्यशास्त्र विषयाचे ग्रंथकर्ते व संपादक. आचार्य जावडेकर या नावाने प्रसिद्ध. माध्यमिक शिक्षण पुणे येथे. मुंबईच्या विल्सन कॉलेजमधून बी.ए. (१९१७), एम्.ए. साठी तयारी व अभ्यास करीत असतानाच गांधीजींच्या असहकार चळवळीत भाग. १९२३ ते १९२६ पर्यंत इस्लामपूरजवळच्या पेठ या खेड्यात अस्पृश्य विद्यार्थ्यांसाठी 'महात्मा बोर्डिंग हाऊस' हे वसतिगृह चालविले.

पुण्याच्या टिळक महाविद्यालयात इतिहास, अर्थशास्त्र व राज्यशास्त्र ह्या विषयांचे अध्यापक (१९२६). काही काळ 'नवशक्ती' (मुंबई),

'लोकशक्ती' (पुणे) या दैनिकाचे व 'साधना' साप्ताहिकाचे संपादक. १९४८ साली शंकरराव देवांनी काढलेल्या 'नवभारत' ह्या मासिकाच्या संपादकमंडळाचे सदस्य. मुंबई व उपनगर साहित्य संमेलनाचे (१९४१) व पुण्यास भरलेल्या महाराष्ट्र साहित्य संमेलनाचे (१९४९) अध्यक्ष.

जावडेकरांनी विपुल ग्रंथलेखन केले. *राज्यशास्त्रमीमांसा*, (१९३४), *आधुनिक भारत* (१९३८), *आधुनिक राज्यमीमांसा* (१९४२), *गांधीजीवनरहस्य* (१९४९), *विश्वकुटुंबवाद* (१९२९), *शास्त्रीय समाजवाद* (१९३९), *लोकशाही* (१९४१), *पुरोगामी साहित्य* (१९४१), *गांधीवाद* (१९४२), *लो. टिळक व म. गांधी* (१९४६) हे त्यांचे महत्त्वाचे ग्रंथ. ह्या लेखनाच्या निमित्ताने मराठी भाषेशी सुसंगत आणि स्पष्टार्थपूर्ण अशी समाजशास्त्रीय परिभाषेची निर्मितीही त्यांच्याकडून घडली.

त्यांचे बरेचसे लेखन शंकरराव देवांचे 'स्वराज्य' व जांभेकरांचे 'लोकशिक्षण' त्याचप्रमाणे 'चित्रमयजगत्', विविधज्ञानविस्तार', 'नवभारत' इत्यादी नियतकालिकांतून प्रसिद्ध झाले आहे. 'लोकशिक्षणा'तील 'स्वराज्य, स्वातंत्र्य व स्वयंनिर्णय', बोल्शेव्हिक 'राज्यक्रांती', ह्या लेखमाला फार गाजल्या. 'बोल्शेव्हिक राज्यक्रांती' ह्या लेखमालेतून त्यांनी मार्क्सवादाचा आध्यात्मिकतेला विरोध नाही, असे प्रतिपादन केले आहे. गांधीवाद व मार्क्सवाद ह्यांचा समन्वय साधून, कार्य करण्याची एक नवी दृष्टी त्यांनी आपल्या संपादित नियतकालिकांतून व लेखनातून दिली. प्रारंभीच्या काळातील त्यांचे *महाराष्ट्रातील राष्ट्रीय पक्षाची उत्क्रांती*, *हिंदी राजकारणाचे स्वरूप* व *राजनीतिशास्त्रपरिचय* (१९२६) हे तीन लहानमोठे ग्रंथही उल्लेखनीय आहेत.

आचार्य जावडेकरांचे सर्व लेखन बुद्धिवादी विचारवंताच्या भूमिकेवरून झाले आहे. *पुरोगामी साहित्यातून* (१९४१) त्यांनी खरी आध्यात्मिकता ही प्रगमनशील समाजशास्त्रीय दृष्टीशी कशी सुसंगत आहे आणि आत्मप्रेरणेतून व कर्तव्यप्रेरणेतून स्फुरणारे साहित्य हेच कसे पुरोगामी साहित्य आहे, हे आपल्या व्यासंगातील विवेचकतेच्या साह्याने आध्यात्मिक क्रांतिकारकाच्या भूमिकेवरून पटवून देण्याचा प्रयत्न केला आहे.

संस्कृत व मराठी साहित्यातील रसव्यवस्थेच्या संदर्भातही त्यांनी असेच सर्वस्वी नवे विचार प्रकट केले आहेत. महाराष्ट्र साहित्य संमेलनाच्या ३२ व्या अधिवेशनाच्या अध्यक्षपदावरून दिलेल्या भाषणात त्यांनी 'क्रांति' नामक नवीन रसाचा पुरस्कार केला आहे.

वाङ्मयक्षेत्रातील आचार्य जावडेकरांची सर्वाधिक महत्त्वाची कामगिरी म्हणजे त्यांनी लिहिलेला *आधुनिक भारत* हा मौल्यवान ग्रंथ.

गं. दे. खानोलकर, म. बा. लोही

**जोग, गणेश शिवराम :** ० नाना जोग : (ज. ८ सप्टेंबर, १८९९ – मृ. १ मे, १९५८, नागपूर). नाटककार. शिक्षण : मॅट्रिक. वडिलांच्या मृत्यूमुळे मॅट्रिकनंतर सरकारी नोकरी पत्करावी लागली. १९४२ साली नोकरीचा राजीनामा देऊन ते सामाजिक कार्याकडे वळले. विदर्भ साहित्य संघाच्या धनवटे रंगमंदिराची निर्मिती त्यांच्या परिश्रमातून झाली.

नाना जोग हे साम्यवादाने प्रभावित झाले होते. त्याची छाया त्यांच्या नाट्यलेखनावर आहे. *चित्रशाळा* (१९४८) आणि *सोन्याचे देव* (१९४९) ही दोन्ही नाटके प्रत्यक्षपणे साम्यवादाचा पुरस्कार करतात; तर *भारती* (१९५२) हे मनोविश्लेषणात्मक नाटक असून *तीन अंकी हॅम्लेट* (१९५७) हे अनुवादित नाटक आहे. समाजातील प्रखर वास्तवतादर्शन, विषयाची अचूक समज व नाट्यपूर्ण विश्लेषण, ही त्यांच्या नाटकांची वैशिष्ट्ये प्रचलित समाजव्यवस्थेचे विदारक निदान व तिच्या दोषांचे अर्थव्यवस्थामूलक कारण त्यांच्या नाटकांतून प्रत्ययास येते.

मुक्तछंदात्मक अनुवाद हे त्यांच्या *तीन अंकी हॅम्लेट* ह्या नाट्यकृतीचे वैशिष्ट्ये. शेक्सपियरच्या नाटकातील 'ब्लँकव्हर्स'साठी मुक्तछंदाचा वापर करण्याचा नाना जोगांचा प्रयत्न, हा पहिला व म्हणून महत्त्वाचा आहे.

नाना जोगांनी उमेदवारीच्या काळात 'मासिक मनोरंजना'तून काव्यलेखन केले होते. ते उत्कृष्ट नाट्यदिग्दर्शक व संगीतकलेचे मर्मज्ञ होते.

राम शेवाळकर, म. ना. लोही

**जोग, विष्णु नरसिंह :** (ज. १४ सप्टेंबर, १८६७ – मृ. ५ फेब्रुवारी, १९२०). वारकरीसंप्रदायाचे धुरीण, आळंदी येथील वारकरी शिक्षणसंस्थेचे संस्थापक, कीर्तनकार, प्रवचनकार आणि लेखक. पुण्यातील सुखवस्तू व प्रतिष्ठित अशा जोग नामक कोकणस्थ ब्राह्मण कुळात जन्म. आईचे नाव सरस्वती. तीन ज्येष्ठ बंधूंपैकी पांडोबा महाराज हे प्रसिद्ध मल्ल असून, नगरकर तालमीचे वस्ताद होते. स्वतः विष्णुबोवांनाही मल्लविद्येचा लहानपणापासूनच नाद होता. पांडोबाप्रमाणेच तेही अविवाहित राहिले व नगरकर तालमीचे वस्तादपण त्यांनी केले. लौकिक शिक्षण फारसे नाही. परंतु पूर्ववयात काही योगसाधना केली. बालपणी पांडोबामहाराजांच्या बरोबर आळंदीला ज्ञानेश्वर महाराजांच्या समाधीच्या दर्शनास जात. पुढे त्याचे रूपांतर जणू छंदात झाले. ज्ञानेश्वरांच्या समाधीवर ठेवलेली माळ आपल्या हातानेच आपल्या गळ्यात घालून जोगमहाराज वारकरी बनले. भजन, पंढरीची वारी, ज्ञानेश्वरी व तुकारामगाथा यांची पारायणे, असा आयुष्यक्रम व्यतीत केला. आपण ज्ञानदेवांच्याच आदेशाने कीर्तनप्रवचने करू लागलो, असे त्यांनी स्वतःच एकदा सांगितले होते. कीर्तनप्रवचने करून वारकरी संप्रदायाचा प्रचार करण्याचे त्यांनी जणू जीवनव्रतच घेतले. अत्यंत निःस्पृह असलेले जोगमहाराज लोकमान्य टिळकांचे स्नेही व चाहते होते. ते स्वदेशी वापरीत व टिळकांना यथाशक्ती मदत करीत.

जोगमहाराजांपूर्वीची वारकरी कीर्तनाची धाटणी ही सरळ, साधी होती. जोगांनी तिला पंडिती पद्धतीच्या पूर्वपक्ष–उत्तरपक्षाची जोड दिली. त्यामुळे विशेषतः नवशिक्षित ब्राह्मण तरुण वारकरी संप्रदायाकडे आकर्षित झाले. प्राचार्य शं. वा. तथा मामासाहेब दांडेकर हे यांपैकीच एक. अर्थात बोवांच्या शिष्यवर्गात विविध जातिजमातींचे लोक होते, हेही लक्षात ठेवले पाहिजे.

संत तुकाराममहाराजांच्या अभंगांचा अर्थ लावून सार्थ गाथासिद्ध करण्याचे महत्त्वाचे काम जोगमहाराजांनी केले (इ. स. १९०१, प्रकाशक त्र्यंबक हरि आवटे). हीच तुकोबांच्या गाथेची पहिली सार्थ आवृत्ती होय. या गाथेचा गुजरातीमध्ये अनुवादही झाला.

सार्थ तुकारामगाथेप्रमाणे जोगांनी *सार्थ अमृतानुभव*ही प्रसिद्ध केला (इ. स. १९०५). हा ग्रंथ त्यांनी नानामहाराज साखरे यांच्याकडे केलेल्या श्रवणाच्या अनुषंगाने लिहिला होता. परंतु पुढे त्यांच्या प्रतिपादनातील मायावादाचा जोगमहाराजांनी त्याग करून, 'चिद्विलासवादा'ला धरून अमृतानुभवाचा अर्थ लावला.

याशिवाय जोग महाराजांनी *निळोबांचा व ज्ञानेश्वर महाराजांचा वर्गीकृत गाथा* (१९०७), *सार्थ हरिपाठ व चांगदेव पासष्टी*, *एकनाथी भागवतगाता*दी सहा ग्रंथ (१९११), *वेदान्तविचार* (१९१५) आणि महिपतीकृत *ज्ञानेश्वरीतील वेचे (सार्थ)* (१९१७) असे अन्य ग्रंथही लिहिले.

जोगमहाराज स्पष्टवक्ते आणि निर्भीड होते. कीर्तनप्रवचनांनी त्यांनी महाराष्ट्र ढवळून काढला. त्यातूनच त्यांना महानुभाव सांप्रदायिकांनी

भरलेल्या खटल्याला तोंड द्यावे लागले. हा खटला त्या काळात (१९०७) महाराष्ट्रात चांगलाच खळबळजनक ठरला. वारकरी संप्रदायाचा, प्रवाह राष्ट्रीय चळवळीला जोडण्याचा प्रयत्न करणारे जोगमहाराज, तेव्हाच्या अन्य वारकरी पुढाऱ्यांपेक्षा उठून दिसतात. त्यांच्या या कामगिरीची स्वतः लोकमान्य टिळकांनी 'केसरी'तून लिहिलेल्या मृत्युलेखातून प्रशंसा केली होती (१० फेब्रुवारी, १९२०).

प्राचार्य शं. वा. दांडेकर यांनी लिहिलेल्या 'वै. जोगमहाराज चरित्रा'त महाराजांची काही कीर्तने संक्षिप्तरूपात समाविष्ट केलेली आहेत. स्वतः दांडेकर, बंकटस्वामी, मारुतीबुवा गुरव, लक्ष्मणबुवा इगतपुरीकर इ. जोगांच्या शिष्यांनी व स्वतः केलेली प्रकाशित व अप्रकाशित कीर्तने आणि प्रवचने जोगांच्याच मूळ कीर्तनांचे विस्तार आहेत. आजही याच परंपरेत आळंदीच्या वारकरी शिक्षणसंस्थेत प्रशिक्षित झालेले हजारो विद्यार्थी, महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यात जोगांच्याच विचारांचा प्रचार करताना दिसतात.

सदानंद मोरे

**जोशी, अण्णा मार्तंड** : (ज. १८४८ – मृ. मार्च, १८९८). नाटककार. व्यवसाय : मुंबईच्या सरकारी छापखान्यात कारकून. ह्यांची *सौभाग्यरमा अथवा वैधव्य दुःख-विमोचन* (१८८४), *संगीत सावित्री* (१८८७) व *शिवछत्रपतिविजय* (१८९२) ही तीन नाटके प्रसिद्ध आहेत. ह्या नाटकांखेरीज उत्तररामचरित्र आणि मृच्छकटिक ह्या नाटकांतील काही पदरचनाही त्यांनी केली आहे.

अण्णांचे नाट्यलेखन संख्येच्या दृष्टीने अल्प असले तरी ऐतिहासिक दृष्ट्या मराठी रंगभूमीच्या व नाट्यवाङ्मयाच्या वाटचालीत त्यांना महत्त्वाचे स्थान आहे. त्यांच्या नाटकांत सुधारणावादाचा व देशभक्तीचा पुरस्कार आढळतो. *सौभाग्यरमा* नाटकाच्या मुंबईतील प्रयोगांनी सनातनी मंडळी खवळली होती. *संगीत सावित्री*तून त्यांनी स्त्रीशिक्षण आणि पुनर्विवाह यांचा पाठपुरावा केला. *शिवछत्रपतिविजय* हे नाटक तर सरकारने आक्षेपार्ह ठरवून जप्त केले होते.

नव्या सामाजिक सुधारणांचे प्रातिनिधिक दर्शन घडवणारे नाटककार म्हणून अण्णा जोशींचे स्थान महत्त्वाचे आहे.

मु. श्री. कानडे, म. ना. लोही

**० जोशी, एकनाथ अण्णाजी** : पहा करकंबकर, एकनाथ अण्णाजी

**जोशी, गोविंद बाबाजी** : (ज. १८२१ – मृ. १ मे, १९०६). आद्य हिंदू मिशनरी. शालेय शिक्षण अल्पकाळ, वसईला मराठी शाळेत. त्यानंतर घरीच वाचन-लेखनाकडे लक्ष केंद्रित.

ते विचाराने सुधारक होते. विधवाविवाहाला त्यांची सहानुभूती होती. *हिंदू लोकांस विनंति* (१८८५) व *वृद्धपणी लग्न करण्यापासून अनर्थ* (१९०१), या दोन पुस्तकांच्याद्वारा त्यांनी लोकांना बालविवाह व वृद्धांचे विवाह यापासून होणाऱ्या अनर्थांची कल्पना दिली.

देशातील अडाणी जनतेला तिच्या दुःखाची आणि हक्कांची जाणीव करून देऊन सुस्थितीचा मार्ग दाखवून देण्यासाठी, ख्रिस्ती मिशनऱ्यांप्रमाणे अनेक प्रांतांतून प्रवास करून त्यांनी स्वदेशी, देशाभिमान, सत्य, नीती, परोपकार इत्यादी विषयांवर भाषणे दिली. प्रवासात भेट दिलेल्या स्थळांविषयी ऐतिहासिक, सामाजिक, धार्मिक माहिती जमवून ती त्यांनी पुस्तकरूपाने प्रसिद्ध केली. *रायगड किल्ल्याचे वर्णन* (छत्रपती शिवाजी महाराजांची कारकीर्द आणि महाराजांचे समाधीचे जीर्णोद्धाराविषयी प्रार्थना, १८८५), *थोडासा प्रवास* (पुणे ते गोवा, १८९१), *लाहोरचा प्रवास* (प्रवासाची व सामाजिक परिषदेची हकीकत, १८९५), *गेल्या तीस वर्षांपूर्वीचे लोक व त्यांच्या समजुती अथवा माझे प्रवासाची हकीकत* (रोजनिशी) ही त्यांची पुस्तके. त्यांनी लिहिलेल्या प्रवासवर्णनात १८८७ सालचे कॉंग्रेसचे मद्रास येथील अधिवेशन, १८९४ सालचे लाहोरचे अधिवेशन व १८९८ सालची राष्ट्रीय सामाजिक परिषद, यांची माहिती दिलेली आढळते. त्यांची 'रोजनिशी' म्हणजे शंभर वर्षांपूर्वीचा समाज कसा होता याचे प्रत्यक्ष चित्रच होय.

कृ. भि. कुलकर्णी, म. ना. लोही

**जोशी, चिंतामण नीलकंठ** : [ज. १० सप्टेंबर, १८८०, चौल (कुलाबा – आजचा रायगड तालुका) येथे – मृ. १६ जून, १९४८, पुणे]. एम.ए. (मराठी). उस्मानिया विद्यापीठातील मराठीचे पहिले प्राध्यापक. निबंधकार व प्राचीन मराठीचे (कवितेचे) संशोधक. जोशी यांचे वडील नीलकंठशास्त्री जोशी व्युत्पन्न शास्त्री व पंडित होते. अव्वल इंग्रजी काळात पुण्यात स्थापन झालेल्या संस्कृत कॉलेजात ते काही काळ प्राध्यापक होते. सेवानिवृत्तिनंतर ते चौल येथे स्थायिक झाले.

चिं. नी. जोशी यांचे प्राथमिक शिक्षण चौल येथेच झाले. माध्यमिक व उच्च शिक्षण मुंबईस चुलत्याकडे. बहुतेक सर्व माध्यमिक व उच्च शिक्षण विल्सन हायस्कूल व कॉलेजमध्ये. प्रसिद्ध पंडित महामहोपाध्याय पां. वा. काणे हे चिं. नी. जोशींचे आरंभापासूनचे सहाध्यायी. शिक्षण संपल्यावर चिं. नी. जोशी यांनी मुंबई येथील स्कॉटिश मिशनच्या एका शाळेत काही काळ शिक्षकाची नोकरी केली. काही काळ पुणे येथील 'ट्रेनिंग कॉलेज फॉर मेन' या संस्थेत ते उपप्राचार्यही होते. पुढे १९१९ साली हैदराबादेस उस्मानिया विद्यापीठाची स्थापना झाल्यावर उस्मानिया विद्यापीठात मराठी व संस्कृतचे प्राध्यापक या नात्याने रुजू झाले. या विद्यापीठात काम करीत असतानाच वातावरण प्रतिकूल असूनही हैदराबाद येथे, मराठी साहित्य व संस्कृती या संबंधीची आस्था वृद्धिंगत करण्यास त्यांनी फार मोठा पुढाकार घेतल्याचे आढळते.

(१) *निरंजनमाधवाच्या स्तोत्रसंग्रहावरील टीकात्मक निबंध* (१९३५), (२) *मराठवाड्यातील अर्वाचीन मराठी वाङ्मय* (१९३९) आणि (३) *श्रीधर-चरित्र आणि काव्यविवेचन* (१९५१) हे त्यांचे प्रमुख ग्रंथलेखन. श्रीधरावरील त्यांचा ग्रंथ त्यांच्या मृत्यूनंतर प्रसिद्ध झाला. श्रीधरकवींच्या अभ्यासाच्या दृष्टीने तो महत्त्वाचा ग्रंथ मानला जातो. जोशी यांनी विविध विषयांवर बरेच स्फुट लेखन केले आहे. पण अद्यापि ते यथोचितपणे संग्रहित व्हावयाचे आहे.

संदर्भ : 'मराठी स्वाध्याय संशोधनपत्रिका', उस्मानिया विद्यापीठ, अंक १७, १७९१.

गं. दे. खानोलकर, म. ना. लोही, गो. म. कुलकर्णी

**जोशी, नागेश कृ.** : (ज. १६ सप्टेंबर, १९१५ – मृ. ११ मे, १९५८). नट व नाटककार. १९३० साली 'बालमोहन' नाटकमंडळीत प्रवेश. विनोदी नट म्हणून प्रसिद्धी. १९४३ साली 'कलाविकास' या नाट्यसंस्थेची स्थापना.

मराठी रंगभूमीच्या पडत्या काळात तिला सावरू पाहणाऱ्यांच्या यादीत व्यावसायिक नाटककार म्हणून, नागेश जोशी यांचा आवर्जून उल्लेख करावा लागेल. स्वतःच्या 'कलाविकास' या नाट्यसंस्थेसाठी त्यांनी नाट्यलेखन केले. *देवमाणूस* (१९४५) हे रंगभूमीवर यशस्वी ठरलेले त्यांचे नाटक. ते इतके गाजले की दहा वर्षांत पुस्तकाच्या नऊ आवृत्त्या निघाल्या. सामान्य प्रेक्षकाला आवडेल व प्रभावित करील अशा कौटुंबिक वातावरणाचा वापर, दोन मनांचे द्वंद्व, सुष्टदुष्ट प्रवृत्तींचा संघर्ष हे नाट्याचे विशेष *देवमाणूस*मध्ये आढळतात.

ह्याशिवाय *फुलपाखरे*, *मैलाचा दगड*, *विजय* आणि *अंतरपाट* (प्रकाशन वर्षे अनुक्रमे १९४०, १९४६, १९४६, १९५२) ही नाटके त्यांनी लिहिली. प्रेक्षकांच्या मनावर अधिक ताण पडणार नाही असे संविधानक, काहीसे भावडे अतिरंजन, सुष्ट-दुष्ट अशा दोन गटांत विभागल्या जाणाऱ्या व्यक्तिरेखा, सुलभ संवाद, ढोबळ प्रसंगचित्रण

इत्यादी विशेषांच्या आधारावर त्यांनी नाट्यलेखनाचा प्रपंच केला आणि समकालीन सर्वसाधारण मराठी प्रेक्षकांच्या अभिरुचीला तो मानवला.

अरविंद वामन कुलकर्णी, म. ना. लोही

**जोशी, पुरुषोत्तम बाळकृष्ण :** (ज. ५ मार्च, १८५६, मुंबई – मृ. २६ मार्च, १९२९, मुंबई). कवी व इतिहाससंशोधक. प्राथमिक शिक्षण केळवे (जि. ठाणे) येथे. इंग्रजी शिक्षण मुंबईस. मॅट्रिक (१८७५) नंतर कस्टम्स् खात्यात नोकरी.

कस्टम्समध्ये जेम्स कॅम्बेल हे विद्याभिलाषी इंग्रज अधिकारी होते. त्यांची मुंबई इलाख्याच्या गॅझेटियरसाठी मुख्य संपादक म्हणून नेमणूक होताच, त्यांनी जोशी ह्यांना सहाय्यक म्हणून निवडले. गॅझेटियरसाठी संशोधनपर लेखन करतानाच इतिहास - संशोधन व 'ॲन्थ्रॉपॉलॉजी' ह्या विषयांवर त्यांनी निबंध प्रकाशित केले. 'टाइम्स ऑफ इंडिया'त ह्यांचे हिंदुधर्म व इतिहास या विषयांवरील अनेक लेख प्रसिद्ध झाले आहेत.

त्यांच्या कविता व मराठी लेख 'मासिक मनोरंजन', 'चित्रमयजगत', 'विविधज्ञानविस्तार', 'नवयुग' इत्यादींतून प्रकाशित झाले. *मुक्तावली* (१८७३) *पद्यसुधा* (१८८२), *समाधिशतावली युवराजनिधन काव्य* (१९०९), *काव्यरत्न पहिले* (१९१६) ही त्यांच्या स्फुट कवितांची पुस्तके. त्यांचा कल सामान्यतः दीर्घ काव्यरचनेकडे होता, असे दिसते. राष्ट्रीय सद्‌गुण व स्वदेशप्रीती यांच्या संवर्धनाचा हेतू बाळगून ह्यांनी बरीच काव्ये लिहिली आहेत.

*उत्तर कोंकणाचा प्राचीन इतिहास* (१९२६) हा त्यांचा ग्रंथ संशोधनपूर्ण आहे. डॉ. केतकरांच्या 'ज्ञानकोश'साठी त्यांनी तो लिहिला. ह्या ग्रंथाच्या प्रस्तावनेतून 'महिकावतीच्या बखरी'ला इतिहासाचार्य राजवाडे ह्यांनी लिहिलेल्या प्रस्तावनेतील अनेक विधाने, जोशींनी साधार खोडून काढली आहेत.

ह्यांच्या वाङ्मयसेवेबद्दल ह्यांना मुंबईच्या रॉयल एशियाटिक सोसायटीचे 'कॅम्बेल सुवर्णपदक' मिळाले होते.

उषा टाकळकर, मीनल निसळ

**जोशी, बापू पुरुषोत्तम :** (ज. २५ मे, १८३५ टोके, जि. नगर – मृ. १२ मे, १९२१). इंग्रजी कायदाग्रंथांचे भाषांतरकार. शिक्षण फारसे झाले नाही. सुरुवातीला सासवड येथे मराठी शाळेत शिक्षक. नंतर शाळाखात्यात कारकून. वकिलीची परीक्षा उत्तीर्ण (१८६७). कालांतराने डेप्युटी कलेक्टर. ह्यांनी क्रिमिनल प्रोसीजर कोड, पिनल कोड, सिव्हिल प्रोसीजर कोड ह्यांची मराठीत भाषांतरे केली. *हिंदुस्थानचा भूगोल* (१८६१) हे शिळाछापावरील पुस्तक (दुसरी आवृत्ती १८७१) प्रसिद्ध झाले आहे.

उषा टाकळकर, मीनल निसळ

**जोशी, बाळकृष्ण सीताराम :** (ज. १८७१, मुरुड-जंजिरा, जि. कुलाबा – मृ. २५ मे, १९११, मुरुड). कवी. शिक्षण मराठी सहावी व ट्रेनिंग. मुरुड येथे मराठी शाळेत मुख्याध्यापक. ह्यांनी वर्णनात्मक, बोधपर व कथात्मक अशी अनेक स्फुट काव्ये लिहिली, त्यांतील काही 'काव्यरत्नावली', 'खेळगडी', 'मनोरंजन' ह्या नियतकालिकांतून प्रसिद्ध झाली. भगवद्‌गीतेचे साकीबद्ध भाषांतर व गणेशपुराणाचे काव्यबद्ध सार, ही ह्यांची अन्य निर्मिती ह्यांची. कविता जुन्या वळणाची असली तरी क्वचित अर्वाचीन काळाचे संस्कार प्रगट करणारी आहे. ह्यांच्या लहान मुलांकरिता लिहिलेल्या काही उपदेशपर गोष्टी 'खेळगडी' मासिकातून प्रसिद्ध झाल्या आहेत.

उषा टाकळकर, मीनल निसळ

**जोशी, महादेव नारायण ऊर्फ माधवराव जोशी :** (ज. ७ जानेवारी, १८८५, पुणे – मृ. १६ ऑक्टोबर, १९४८). नाटककार. मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण वऱ्हाडात. १९११ साली पुण्यास आले. काही महिने लष्करी हिशेबखात्यात नोकरी. रंगभूमिच्या आकर्षणामुळे नोकरी सोडून ते नाट्यलेखनाकडे वळले. १९४४ साली जळगाव येथे झालेल्या महाराष्ट्र नाट्यसंमेलनाचे अध्यक्ष.

जोशींनी आपल्या नाट्यविषयक कारकीर्दीची सुरुवात *कर्णार्जुन* (१९१०) व *कृष्णविजय* (१९११) ह्या पौराणिक नाटकांनी केली. त्यासाठी जुन्या पंडित कवींची कविता व तत्कालीन पौराणिक नाटके यांचा त्यांनी कसून अभ्यास केला. तरीही ती नाटके रंगभूमीवर यशस्वी ठरली नाहीत. राधाकृष्णाच्या कथा प्रसंगावरील *मनोरंजन* (१९१६) व *पुनर्जन्म ऊर्फ सावित्री* (१९३१) ही त्यांची अन्य पौराणिक नाटके. *सं. विनोद* (१९१४) हे त्यांचे प्रहसनवजा नाटक मात्र, उतावळ्या सुधारकांची थट्टा करणारे सामाजिक कथानक, विनोदी प्रसंग, वैचित्र्याने नटलेले चटकदार संवाद, खाडिलकरांच्या पदांची विडंबने ह्यामुळे खूप गाजले. 'माता दिसली समरी रखडत', 'या नवनवल मधु लाडवा', 'गजकर्ण खाजविता मजा आला', इत्यादी विडंबनांनी प्रेक्षकवर्ग खूष होत असे.

*स्थानिक स्वराज्य अथवा सचित्र म्युनिसिपालिटी* (१९२५), हे माधवरावांचे विशेष गाजलेले नाटक. ही सुखात्मिका जितकी वास्तववादी तितकीच मनोरंजक आहे. तथाकथित लोकशाहीचे प्रतिनिधी म्हणून म्युनिसिपालिटीत निवडून गेलेले बेजबाबदार सदस्य कसा गैरकारभार करतात, याचे विडंबनचित्र ह्या नाटकातून रेखाटले आहे.

*वऱ्हाडचा पाटील* (१९२८) व *गिरणीवाला अथवा मालक-मजूर* (१९२९) ही त्यांची मनोरंजनाबरोबरच सामाजिक उद्बोधन करणारी नाटके. *वऱ्हाडचा पाटील* ह्या नाटकात लबाड गावकऱ्यांच्या तावडीत सापडलेल्या भोळ्या पाटलाचे चित्रण केले आहे. त्यांचे गाजलेले शेवटचे नाटक *उधार-उसनवार* (१९४६). ह्याशिवाय ह्यांची काही हास्यप्रधान नाटके अशी : *स. हास्यतरंग* (१९२१), *सं. आनंद* (१९२३), *सं. विश्ववैचित्र्य* (१९३२), *सं. वशीकरण* (१९३२), *पैसाच पैसा* (१९३५), *प्रो. शहाणे* (१९३६), *मोराचा नाच* (१९३८). यांतील काही नाटकांमधून त्यांनी नव्या धर्तीच्या एकांकप्रवेशी रचनातंत्राचाही वापर केलेला आढळतो.

माधवराव जोशांच्या नाटकांतील संविधानके बरीच विमुक्त व स्वभावचित्रे ठरीव ठशाची असतात. बोलभाषेशी नाते राखणारे संवाद व प्रासादिक पद्यरचना, ही त्यांची वैशिष्ट्ये. त्यांच्या बहुतेक नाटकांतील प्रमुख रस हास्य आणि मुख्य साधन उपहास. त्यामुळेच समाजातील सर्व थरांतील प्रेक्षकांना त्यांची नाटके आस्वाद्य झाली.

स. गं. मालशे, म. ना. लोही

**जोशी, महादेव मल्हार :** ० स्वामी सच्चिदानंद : (ज. १८७३– मृ. १६ एप्रिल, १९२८, पुणे). वाङ्मय, धर्म व तत्त्वज्ञान या विषयांचे लेखक. शिक्षण पुणे येथे. मॅट्रिक (१८९०), एम्.ए. (१८९७). संस्कृतची जगन्नाथ शंकरशेट शिष्यवृत्ती व अनेक पारितोषके. वामन मल्हार व ना. म. जोशी यांचे ज्येष्ठ बंधू. अहमदनगर येथे मुख्याध्यापक. जुनागड व पुणे येथे संस्कृतचे प्राध्यापक.

प्रो. जोशी हे संस्कृतचे अभ्यासक व वेदान्त विषयाचे गाढे पंडित होते. *आधुनिक सुशिक्षितांचा वेदान्त* ही केसरीतून १९१५ साली आलेली लेखमाला, पुढे १९३६ मध्ये पुस्तकरूपाने प्रकाशित. 'मनोरंजन', 'नवयुग', 'धर्मजागृती' इत्यादी मासिकांतून वाङ्मय, धर्म व तत्त्वज्ञान या विषयांवर 'स्वामी सच्चिदानंदांचे विचार' या शीर्षकाखाली लिहिलेले त्यांचे लेखही मार्मिक व विचारप्रेरक आहेत. हे लेख *स्वामी सच्चिदानंदांचे विचार* (१९३६) या पुस्तकात समाविष्ट झाले आहेत.

अवधूत महादेव जोशी, रा. बा बक्षी

संदर्भ : अ. म. जोशी, 'वडिलांचे सेवेसी', प्रकाशक अ. म. जोशी, पुणे, १९६०.

**जोशी, मोरेश्वर रामचंद्र** : (ज. २२ ऑगस्ट, १८८७, बोदुर्णी, खानदेश – मृ. ५ ऑक्टोबर, १९५६). इतिहासविषयक लेखक. धुळे येथील राजवाडे संशोधन मंडळाचे सदस्य.

*पोस्टाच्या तिकीटाची कुळकथा* (१९४६), *अहिल्याबाई होळकर* (१९४५), *स्वामिनिष्ठ संट्रो बलाढ्य* (१९५१), *ऐतिहासिक आख्यायिका* ही ह्यांची पुस्तके. इंदूरच्या किबे घराण्याचे संस्थापक व प्रसिद्ध मुत्सद्दी विठ्ठल महादेव किबे ऊर्फ तात्या जोग ह्यांच्या चरित्र-साधनांचा *तात्या जोगांच्या चरित्राची साधने* (मराठ्यांच्या इतिहासाची साधने : खंड २७. प्रकाशक : राजवाडे संशोधन मंडळ, १९५१), हा त्यांचा संपादित ग्रंथ महत्त्वाचा आहे.

हरिश्चंद्र थोरात, अंजली कुलकर्णी

**जोशी, रघुनाथ गणेश** : ० पद्मविहारी : (ज. १९०८–मृ. २२ सप्टेंबर, १९५४). अनुवादक व 'सुलभ राष्ट्रीय ग्रंथमाले'चे संचालक. ह्यांनी केलेले खलील जिब्रान ह्या जगप्रसिद्ध अरबी लेखकाच्या 'प्रॉफेट' व 'वॉन्डरर' या ग्रंथांचे अनुक्रमे *जीवन-दर्शन* (१९४१) आणि *प्रवासी* (१९४८) हे अनुवाद प्रसिद्ध आहेत. जिब्रानच्या जीवन-विषयक तत्त्वचिंतनपर लेखनाचा स्वैरानुवाद या भावानुवाद न करता, त्यांनी लेखकाच्या अर्थाचे प्रामाणिक प्रतिबिंब अनुवादात उतरेल अशी काळजी घेतली आहे. जोशींनी 'पद्मविहारी' ह्या टोपण नावाने 'लोकशिक्षण' मासिकातून काही कवितालेखनही केले आहे.

हरिश्चंद्र थोरात, रा. बा. बक्षी

**जोशी, (रावसाहेब) रघुबेल लुकस** : (ज. २ मार्च, १८७५, शरणपूर, नाशिक–मृ. ४ ऑगस्ट, १९५८, विकाराबाद, द. हैदराबाद). ख्रिस्ती-मराठी कवी. माध्यमिक शिक्षण मुंबई व कॉलेज शिक्षण हैदराबाद येथे. इंटर आर्टस्. टपालखात्यात नोकरी. 'रावसाहेब' ही सरकारकडून पदवी.

रे. टिळकांच्या सहवासामुळे वयाच्या सत्तरीनंतर काव्यनिर्मितीची प्रेरणा. *अद्भुत हंसयुद्ध* ही त्यांची पहिलीच रचना दीर्घकाव्यात्मक आहे. ओवी हा छंद ते प्रभावीपणे वापरीत. वरील दीर्घ कविता व अन्य ५७ स्फुट कविता, ह्यांचा संग्रह *रावसाहेबांच्या कविता* (१९६१, प्रकाशक : मराठवाडा साहित्य परिषद) ह्या नावाने प्रसिद्ध झाला आहे. महाराष्ट्र साहित्य परिषद व मराठवाडा साहित्य परिषद ह्या संस्थांच्या कार्यात ते उत्साहाने भाग घेत. प्राचीन मराठी संतकाव्याचे खोल संस्कार त्यांच्या मनावर झाले होते. तेच त्यांच्या रचनेवरही आढळून येतात. रे. टिळकांना ते आपले स्फूर्तिदाते मानीत.

गं. दे. खानोलकर, रा. बा. बक्षी

**जोशी, रामचंद्र भिकाजी** : (ज. २२ जून, १८५६–मृ. ७ सप्टेंबर, १९२७). व्याकरणकार, भाषाभ्यासक व वाङ्मयेतिहासकार. मुंबई विद्यापीठाचे प्रीव्हिअसपर्यंत शिक्षण. त्यानंतर पुण्याच्या न्यू इंग्लिश स्कूल-मध्ये शिक्षक. यांनी *निबंध-चंद्रिका* मासिक विष्णुशास्त्र्यांविषयीच्या आदराचे प्रतीक म्हणून ३-४ वर्षे निबंधमालेच्या धर्तीवर चालविले होते.

रा. भि. जोशी ह्यांनी *शिशुबोध*, *बालबोध*, *मराठी शब्दसिद्धी*, *सुलभ अलंकार* इत्यादी शालोपयोगी व्याकरण व भाषाविषयक पुस्तके लिहिली असली, तरी *प्रौढबोध व्याकरण* (१८८९) व *मराठी भाषेची घटना* (१९१८) ह्या दोन ग्रंथांचे कर्ते म्हणून ते विशेष प्रसिद्ध आहेत. ह्यांचे *प्रौढबोध व्याकरण* १८८९ साली प्रथम प्रकाशित झाले आणि १९२५ पर्यंत त्याच्या सुधारून वाढविलेल्या अशा एकंदर सात आवृत्त्या निघाल्या. ह्या पुस्तकाची तिसरी आवृत्ती त्यांनी इंग्रजीत काढली असून ह्या आवृत्तीत मराठी वृत्ते व अलंकार ह्यांवर दोन अधिक प्रकरणे दिली आहेत.

मराठी व्याकरणाच्या इतिहासामध्ये जोश्यांचे *प्रौढबोध व्याकरण* हा महत्त्वाचा टप्पा आहे. कारण ह्यांनी आपले व्याकरण, उपपत्तीच्या व ऐतिहासिक दृष्टीने सर्वस्वी संस्कृत व्याकरणाच्या पायावर रचलेले असून, रचना मात्र इंग्रजी व्याकरणानुसार केली आहे. प्रस्तुत व्याकरणाचे भाषेची व विवेचनातील सुबोधता हे आणखी आगळे वैशिष्ट्य आहे.

*मराठी भाषेची घटना* (प्र. आ. १९१८, द्वि. आ. १९२३) हा रा. भि. जोशींचा ग्रंथ *प्रौढबोध व्याकरणा*पेक्षाही अधिक मौलिक स्वरूपाचा आहे. मराठीचे भाषाशास्त्र व वाङ्मयेतिहास ह्या ज्ञानशाखा प्राथमिक अवस्थेत असतानाच्या काळातील, मराठीचे ऐतिहासिक भाषाशास्त्र व वाङ्मयेतिहास लेखनाचा हा पहिला वैशिष्ट्यपूर्ण प्रयत्न होय.

दादोबा पांडुरंग, कृष्णशास्त्री चिपळूणकर ह्यांच्यानंतर मराठीच्या व्याकरणविषयक ग्रंथांत महत्त्वाची भर टाकणारे लेखक म्हणून रा. भि. जोशी यांचे स्थान महत्त्वाचे आहे.

श्री. रं. मोडे, डॉ. राम घोडे

**जोशी, लक्ष्मण नारायण** : (ज. ५ मार्च, १८७३, पुणे – मृ. १ जुलै, १९४७, पुणे). ऐतिहासिक आख्यायिकांचे संग्राहक, लेखक, ग्रंथसंपादक व पत्रकार. शिक्षण पुणे येथे. मॅट्रिकनंतर काही दिवस मुंबईस पशुवैद्यक महाविद्यालयात अध्ययन.

मुंबईत असताना 'इंदुप्रकाश' व 'गुराखी' ह्या पत्रांतून ते लेखन करीत. १८९९ साली पुण्यास रँड व आयर्स्ट ह्यांचे जे खून झाले, त्याविषयी जोशींनी 'गुराखी'त लेख लिहिले, त्यामुळे राजद्रोहाच्या आरोपाखाली त्यांना सहा महिन्यांची सजा भोगावी लागली. त्यानंतर त्यांनी शिक्षण सोडून लेखन हाच व्यवसाय स्वीकारला. निरनिराळ्या एकवीस विषयांवर त्यांनी लहान-मोठी अशी सुमारे दीडशेहून अधिक पुस्तके लिहिली. तींत *जीवनाथ विरचित भावकुतूहल* (१९२१), ह्या पुस्तकात ऋग्वेदादी संहिता, धर्मसिंधू, अध्यात्मरामायण, स्तोत्रे वगैरेंची सटीप भाषांतरे आहेत; *कपिध्वज* (किंग जॉन), *डाकिनी विलास* (मॅकबेथ), *नटसम्राट गणपतराव जोशी* (१९२३), *एकनाथ* (१९२९), *तुकाराम* (१९२९), *ज्ञानेश्वर* (१९२९), *नामदेव* (१९३०), *बाजीराव* (१९३५), *महाराणा प्रतापसिंह* (१९२२) इत्यादींची चरित्रे उल्लेखनीय आहेत. पं. सातवळेकरांच्या वैदिक वाङ्मय प्रकाशनाच्या कार्यात ह्यांनी संपादकीय साह्य केले. 'ऋग्वेदा'चे कविताबद्ध रूपांतर व 'अथर्ववेदा'चे अन्वयासहित भाषांतर हे जोशींचे कार्यही उल्लेखनीय आहे.

*सचित्र ब्रह्मयोग विद्याशिक्षण* (१९२१), *श्रीकाशिनाथोपाध्याय विरचित धर्मसिंधू* (मराठी भाषांतरासह, १९२५), *महिला जीवन म्हणजेच गृहिणीकर्तव्य* (१८८६), *टेलिपथी इन्स्ट्रक्टर–मानसिक संदेश–शिक्षक* (१९२०), *लोकमान्यांचा स्वर्गीय संदेश* (१९२१), *राष्ट्रीय इंग्रजी शिक्षक, भाग १, २, ३* (१९३५–पाचवी आवृत्ती), *सार्थ छंदोबद्ध पुरुषसूक्त* (१९३४); यांनी सुमारे अकरा कादंबऱ्या लिहिल्या आहेत. त्यापैकी ही *सारी भाऊबंदकी* (१९०२) ही एक आहे.

गं. दे. खानोलकर, रा. बा. बक्षी

**जोशी, वामन गोपाळ** : ० जोशी, वीर वामनराव : (ज. २१ मार्च, १८८१ – मृ. ३ जून, १९५६). नाटककार व पत्रकार. मॅट्रिक (१८९९). देशाच्या स्वातंत्र्यचळवळीत सहभाग. लो. टिळक व म. गांधी ह्यांचे अनुयायी. मुंबईच्या 'राष्ट्रमत' (१९०९) दैनिकाचे अल्पकाळ उपसंपादक व अमरावतीहून प्रकाशित होणाऱ्या *स्वतंत्र हिंदुस्थान* या स्वतः काढलेल्या साप्ताहिकाचे सात वर्षे संपादक.

वीर वामनराव स्वातंत्र्याकांक्षी व राष्ट्रवादी वृत्तीचे होते. त्यांची नाटके त्याच वृत्तीतून निर्माण झाली आहेत. *राक्षसी महत्त्वाकांक्षा* (१९१४), हे त्यांचे पहिले नाटक. ते त्यांनी केशवराव भोसले यांच्या

नाट्यसंस्थेसाठी लिहून दिले. ह्या संगीत नाटकाने तत्कालीन प्रेक्षकांच्या मनाची विलक्षण पकड घेतली. नाटकाची मध्यवर्ती कल्पना आपण 'खुबसूरत बला' या पारसी नाटकातून उचलली असल्याचे निवेदन जोशी यांनी केले आहे. ह्याचा पहिला प्रयोग मुंबई मुकामी २० सप्टेंबर, १९१३ रोजी झाला. त्यानंतर १२ वर्षांनी त्यांनी *सूडाचा संदेश* हे नाटक लिहिले. तथापि हे नाटक रंगभूमीवर आणणाऱ्या 'बलवंत संगीत नाटक मंडळी'च्या सूचनेवरून त्याचे *रणदुंदुभी* (१९२७), असे नामकरण करण्यात आले. 'परवशता' या विषयावर आधारलेले हे नाटक अतिशय लोकप्रिय ठरले. या नाटकातील चाली स्वतंत्र असून, त्या रामकृष्णबुवा वझे या प्रसिद्ध गायकाकडून मिळविलेल्या होत्या. अर्थात प्रस्तुत नाटकाच्या यशाचे श्रेय नाटकातील संगीताप्रमाणेच वामनरावांच्या ओजस्वी लेखणीलाही द्यावे लागते. *धर्मसिंहासन* (१९२९) हे त्यांचे तिसरे नाटक 'नाट्यकला प्रसारक मंडळी'ने १९ जुलै, १९२९ रोजी अमरावतीच्या रंगभूमीवर आणले. राजपदाची प्राप्ती जन्मावर अवलंबून ठेवावयाची, का लोकमानसावर? हा विषय त्यांनी या नाटकात हाताळला आहे.

त्यांची ही तिन्ही नाटके उदात्त तत्त्वविशेषांच्या प्रचाराकरिता लिहिलेली असून कल्पनारम्य स्वरूपाची आहेत. तथापि नाट्यपूर्ण आहेत.

*झोटींग पादशाही* व *शीलसंन्यास* (१९५७) ही वामनरावांची अखेरची नाटके. त्यांपैकी *झोटींगशाही पादशाही* हे प्रयोगरूपाने रंगभूमीवर आले; पण पुस्तकरूपाने ते नाट्यवाङ्मयात दाखल झाले नाही. त्याउलट *शीलसंन्यास* हे पुस्तकरूपाने प्रकाशात आले; परंतु प्रयोगरूपाने रंगभूमीवर येण्याचे भाग्य त्याला लाभले नाही. *झोटींग पादशाही* हे नाटक शेक्सपिअरच्या 'मेझर फॉर मेझर' या नाटकाच्या आधारे लिहिलेले असून, समाजातील वासनातिरेकाचे निर्मूलन करण्यासाठी नायकिणीचा वर्ग समाजाच्या स्थैर्यासाठी आवश्यक आहे, हा विचार त्यात मांडला आहे. *शीलसंन्यास* हे नाटक वामनरावांनी 'मॉरिस-मेटरलिंक्' या फ्रेंच नाटककाराच्या 'मोना व्हॅना' या नाटकातील मध्यवर्ती कल्पनेवर आधारले आहे. मात्र मध्यवर्ती कल्पना परकीय असली तरी वामनरावांनी आपल्या स्वतंत्र प्रकृतिधर्मास अनुसरून तिची वेगळीच उभारणी केली आहे.

या पाच नाटकांव्यतिरिक्त वामनरावांनी आणखी काही नाटकांचा संकल्प सोडल्याचा त्यांच्या प्रसिद्ध झालेल्या नाटकांच्या मुखपृष्ठावरून अंदाज लागतो. कर्णवधाच्या कथानकावर एक पाच अंकी नाटक १९१० साली लिहिल्याचा व ते खाडिलकरांना वाचून दाखविल्याचा उल्लेख आढळतो. मात्र या नाटकाचे पुढे काय झाले याचा सुगावा लागत नाही.

म. भा. नाडकर्णी, राम घोडे

**जोशी, वामन मल्हार :** ० उद्‌बाहु वामन ० वा. म. जो. : (ज. २१ जानेवारी, १८८२, तळे, जि. कुलाबा – मृ. २० जुलै, १९४३, मुंबई). कादंबरीकार, तत्त्वचिंतक व समीक्षक. महादेव मल्हार व ना. म. जोशी यांचे बंधू. माध्यमिक व उच्च शिक्षण पुणे येथे. मुंबई विद्यापीठातून काही काळ प्रो. विजापूरकर ह्यांच्या तळेगाव-दाभाडे येथील 'समर्थ विद्यालय' ह्या राष्ट्रीय शिक्षणाच्या शाळेत (१९०६–०८) अध्यापक व त्यांनी काढलेल्या 'विश्ववृत्त' मासिकाचे (जुलै १९०७ ते मार्च १९०८) संपादक. त्या मासिकातील एका लेखाच्या निमित्ताने राजद्रोहाचा आरोप व तीन वर्षे सक्तमजुरीची शिक्षा. १९११ साली सुटका. काही काळ केसरी–मराठा संस्थेच्या 'मराठा' या इंग्रजी साप्ताहिकात व अच्युतराव कोल्हटकरांच्या 'मेसेज्' या पत्रात उपसंपादक म्हणून काम. १९१८ पासून हिंगणे येथील 'भारतीय महिला विद्यापीठा'त मराठी वाङ्मय व मानसशास्त्र ह्या विषयांचे अध्यापन.

तत्त्वप्रधान व विचारगर्भ कादंबऱ्या लिहिणारे लेखक म्हणून वा. म. जोशी प्रसिद्ध आहेत. *सॉक्रेटिसाचे संवाद* (१९१५) हे गोल्डन ट्रेझरी सिरीजमधील 'सॉक्रेटिक डायलॉग्ज'वरून तयार केलेले पुस्तक आणि *रागिणी अथवा काव्यशास्त्रविनोद* ही कादंबरी (१९१५) ही त्यांची सुरुवातीची ग्रंथनिर्मिती. *रागिणी*मुळे तत्त्वचिंतनात्मक कादंबरीकार म्हणून ते ख्यातनाम झाले व मराठीतील 'तत्त्वचिंतनात्मक कादंबरी'चे जनक ठरले. १९१३ ते १९१७ या काळात वरील पुस्तकांशिवाय त्यांची *द जिस्ट ऑफ गीतारहस्य*, *नवपुष्पकरंडक*, *आश्रमहरिणी*, *आधुनिक जिज्ञासूंच्या शंका* (प्रो. म. म. जोशी ह्यांच्या 'आधुनिक सुशिक्षितांचा वेदान्त' ह्या पुस्तकाला जोडलेली पुरवणी) ही पुस्तके प्रसिद्ध झाली. *रागिणी*नंतर *आश्रमहरिणी* (१९१६), *नलिनी* (१९१९), *सुशिलेचा देव* (१९३०), *इंदू काळे व सरला भोळे* (१९३५) ह्या त्यांच्या कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या. ह्या सगळ्याच कादंबऱ्यांतून वामनरावांचे तत्त्वचिंतक मन प्रगट होते. *आश्रमहरिणी* ही पौराणिक थाटाची पण द्विपतित्वाचा प्रश्न उभा करणारी म्हणून विद्यमान सामाजिक आशय प्रगट करणारी कादंबरी. 'एनॉक आर्डन' ह्या खंडकाव्यावरून सुचलेली. त्यासाठी धौम्य-मुनी नारदांना आपली कथा सांगत आहेत, अशी भूमिका घेऊन, वामनरावांनी ही कादंबरी लिहिली. मराठीतील एक उत्कृष्ट लघुकादंबरी म्हणून ती उल्लेखनीय आहे. *नलिनी* ही राजकीय थाटाची कादंबरी आहे. देश विपरीत परिस्थितीत असला म्हणजे सर्व गुणांची माती होते, हे या कादंबरीचे सार आहे. एका कर्तबगार, समजूतदार व ध्येयनिष्ठ अशा स्त्रीचा आदर्श *सुशिलेचा देव* या कादंबरीच्या माध्यमातून प्रगट होतो. परिस्थिती व विचारशक्ती यांच्या साहाय्याने देव, धर्म, नीती, समाजरचना इत्यादींच्या संदर्भात नायिका सुशीला हिच्या मनाचा विकास, 'ध्येय हाच देव' मानण्याइतपत कसा झाला, याचे रेखीव चित्रण या कादंबरीत आढळते. निवेदन, आत्मवृत्त आणि पत्रव्यवहार या तीन माध्यमांच्या द्वारे या कादंबरीच्या कथानकाची मांडणी केली आहे. *इंदू काळे व सरला भोळे* ही पूर्णतः पत्रात्मक कादंबरी असून, तीत कला व नीती या वादाची कलात्मक चर्चा आढळते. 'कलेची तहान भागविण्याकरिता नीतीच्या रक्ताचा घोट घेणे बरोबर नाही' हे तत्त्व या कादंबरीतून ते मांडतात. वामनरावांच्या या सर्व कादंबऱ्या प्रामुख्याने नायिकाप्रधान आहेत. बुद्धिगम्य विनोद, मार्मिक कोटिक्रम, वादकुशलतेने रंगलेले संवाद, तर्कनिष्ठ विचारसरणी, तत्त्वजिज्ञासा, सत्यशोधनाची तळमळ व वृत्तीचा प्रांजळपणा ही वा. म. जोशी ह्यांच्या कादंबरीची बलस्थाने आहेत. त्यांच्या काळातील राजकीय, सामाजिक घटनांचे पडसादही त्यांच्या कादंबऱ्यांतून प्रगट झाले आहेत. *नवपुष्पकरंडक* (१९१६) हा त्यांचा कथासंग्रहही वैशिष्ट्यपूर्ण असून, त्यातील 'दोन स्वदेशींचा लढा', 'चारित्र्य क्रांती', 'बायकांना उजव्या डोळ्याने दिसत नाही' यासारख्या कथा उल्लेखनीय आहेत. *विस्तवाशी खेळ* (१९३७) हे त्यांचे नाटकही प्रसिद्ध आहे. कलेच्या रचनाशिल्पापेक्षा आशयाला ते लेखनात अधिक महत्त्व देतात.

ललित साहित्याइतकेच त्यांचे तात्त्विक व समीक्षणात्मक लेखनही मौलिक स्वरूपाचे आहे. *नीतिशास्त्र प्रवेश* (१९१९) हा त्यांचा तात्त्विक ग्रंथ. *विचारविलास* (१९२७), *विचारसौंदर्य* (१९४०), *विचारलहरी* (१९४२) व *विचारविहार* हे त्यांच्या वाङ्मयीन व वैचारिक निबंधांचा समावेश असलेले स्फुट लेखसंग्रह. त्यांची चिंतनशील व सत्यशोधक वृत्ती या संग्रहांतील निबंधांतून व लेखांतून व्यक्त होते. सत्य, सौजन्य व सौंदर्य ह्यांच्या सुसंवादमय उपासनेद्वारा मानवाला उन्नतर जीवन साध्य करून घेता येईल, ही त्यांची श्रद्धा व त्यांच्या सर्व साहित्याचा मूलाधार आहे. त्यांचे समीक्षणात्मक लेखही

वैशिष्ट्यपूर्ण आहेत. त्यांत त्यांनी अनेक वाङ्मयीन व कला-नीति-विषयक प्रश्नांची मार्मिक चर्चा केली आहे. डॉ. केतकरांच्या कादंबऱ्यांवरील त्यांचा लेख किंवा मर्ढेकरांच्या 'वाङ्मयीन महात्मता' (१९४१) या पुस्तकाला लिहिलेली प्रस्तावना, ह्यांचाही उत्कृष्ट वाङ्मयीन लेखन म्हणून उल्लेख केला पाहिजे. *स्मृतिलहरी* (१९४२) हा त्यांच्या आत्मपर ललितलेखांचा संग्रह उत्कृष्ट असून, *नीतिशास्त्रप्रवेश* (१९१९) हा ग्रंथही तात्त्विक विषयावरील उत्कृष्ट ग्रंथ आहे. १९३० मध्ये मडगाव येथे भरलेल्या साहित्यसंमेलनाचे ते अध्यक्ष होते. 'महाराष्ट्र साहित्य परिषदे'च्या कार्यातही त्यांचा सक्रिय सहभाग होता. त्या काळच्या तरुण लेखकवर्गाला वा. म. जोशी हे आधारवडासारखे होते.

संदर्भ : (१) वा. ल. कुलकर्णी, 'वामन मल्हार वाङ्मयदर्शन', १९४४. (२) विलास खोले, 'वा म जोशी : जीवनदृष्टी आणि साहित्यविचार'. (३) प्रभाकर पाध्ये, 'वामन मल्हार आणि विचारसौंदर्य'.

ग. दे. खानोलकर, राम घोडे

**जोशी, वामन रामचंद्र :** (ज. १८७४ – मृ. ६ नोव्हेंबर, १९३४, मुंबई). राष्ट्रीय-धार्मिक विषयांचे लेखक. मुंबई विद्यापीठाचे बी.ए. 'आर्यन एज्युकेशन सोसायटी'चे एक संस्थापक.

धर्म, शिक्षण, भारतीय संस्कृती, तत्त्वज्ञान इत्यादी विषयांवरील ह्यांचे स्फुटलेख वृत्तपत्रे व मासिके ह्यांतून प्रसिद्ध झाले आहेत. *स्वदेशाभिमान संजीवन*, *सनातन आर्यधर्म-ग्रंथ* (१९००), *राष्ट्रीय प्रार्थना पुस्तक* (स्तोत्रे, १९०३), *राष्ट्रीय सनातन धर्मपुस्तक* (हिंदुधर्मांची तत्त्वे, १९०४), *पद्यप्रबंध* (राष्ट्रहितोपयोगी स्फुट कविता, १९०५) इत्यादी पुस्तके प्रकाशित.

ग. दे. खानोलकर

**जोशी, वासुदेव विष्णु :** (ज. १८६७ – मृ. २ जानेवारी, १९४०, सातारा). ऐतिहासिक कागदपत्रांचे संशोधक व संग्राहक. साताऱ्याच्या 'वेस्टर्न इंडिया इन्शुअरन्स कंपनी'चे एक संस्थापक.

सातारकर छत्रपतींचे दप्तर तपासण्याची संधी ह्यांना मिळाली. ऐतिहासिक कागदपत्रे शोधून काढून व त्यांची संगती लावून त्यांचे नेटके संपादन करण्याकडे ह्यांचे विशेष लक्ष होते. अशी शेकडो कागदपत्रे ह्यांनी मिळविली व भारत इतिहास संशोधन मंडळ, राजवाडे संशोधन मंदिर व पारसनीस म्यूझियम ह्यांचेकडे सोपविली.

ग. दे. खानोलकर

**० जोशी, वीर वामनराव :** पहा जोशी, वामन गोपाळ

**जोशी, शंकर दत्तात्रेय :** ० वसंतविहार : (ज. १८८८ – मृ. जून १९४३). कवी. वास्तव्य मुंबई येथे. दादरच्या कविमित्रमंडळाचे क्रियाशील सभासद. ह्यांची स्फुट कविता विपुल असून तीतील काही तत्कालीन नियतकालिकांतून प्रकाशित झाली आहे.

'राष्ट्रवैभवकाव्यमाले'साठी ह्यांनी *जनाचे श्लोक* (१९२०), *जालियनवाला* (१९२०), *केवळ स्वराज्यासाठी* (१९२१), *स्वराज्य बोध* (१९२४), *आर्यभूमीचा अमीर* (१९२५), *नरवीर नेताजी पालकर* (१९२६), *पंजाबचा सिंह लाला लजपतराय* (१९२८), ही लहानमोठी राष्ट्रीय व ऐतिहासिक काव्ये लिहिली. *महिषासुर मंथन* (१९२४), *संजय प्रबोधन* (१९२५), *पापाची शिकार* (१९२९) व *मानिनी* इत्यादी काव्यही राष्ट्रप्रीतीच्या भावनेतून निर्माण झाली. संस्कृतातील 'शृंगारशतक' व 'गीतगोविंद' ह्या काव्यांचा *गीतगोविंद व शृंगारशतपदी* (१९२३) हा संगीतात्मक अनुवाद व *रुद्रमाला* (१९२२) हे शिवस्तवनाच्या रूपाने परमेश्वराची आळवणी करणारे यांचे अनेकवृत्तात्मक काव्यही प्रसिद्ध आहेत.

उषा टाकळकर, अंजली कुलकर्णी

**जोशी, शंकर परशुराम :** (ज. १८८०, भोपण, खानदेश – मृ. १६ फेब्रुवारी, १९४९). नाटककार व कवी. शिक्षण धुळे व पुणे येथे. बी.ए., एलएल्.बी. काही काळ शिरपूर (खानदेश) येथे वकिली. शिरपूर तालुका काँग्रेस कमिटीचे अध्यक्ष. पुण्यातील वास्तव्यात (१९३७–४२) अध्यात्ममार्गाचा अभ्यास. १९४३ पासून मुंबई येथे वास्तव्य. ह्यांची *चिचिन-लीला* (१९१६), *मायेचा पूत* (१९२१), *खडाष्टक* (१९२७), *तो आणि ती* (१९३९), *छत्रपती*, *लग्न साम्राज्य* ही नाटके प्रसिद्ध असून, *खडाष्टक* हे नाटक विलक्षण गाजले. *पौर्णिमा* (१९०५), *विधवांचे गाऱ्हाणे* (१९०९) ही काव्ये आणि *शिवाजी कोण* (१९४६) व *जिनानच्या नीतिकथा* (भाषांतर– १९६९) ही पुस्तके, हे त्यांचे अन्य प्रकाशित साहित्य. *पौर्णिमा* व *विधवांचे गाऱ्हाणे* ही काव्ये त्यांनी कॉलेजमध्ये असताना लिहिली. *पौर्णिमा* हे शृंगाररसात्मक दीर्घकाव्य असून, नदी ही एक विरहिणी आहे अशी कल्पना करून रचलेले आहे. संस्कृत प्रचुरता व पंडिती रचना हे त्याचे वैशिष्ट्य. *विधवांचे गाऱ्हाणे* हे काव्य 'विधवाविवाह कायद्याच्या १९०९ सालच्या वार्षिक सभेच्या दिवसाकरिता' लिहिले. विधवांनी आपल्या मदतीसाठी देवाला केलेले आवाहन आणि तो काही कारणाने येत नसावा म्हणून केलेल्या कल्पना, असे या काव्याचे स्वरूप असून, भावनेपेक्षा वैचारिकतेवर अधिक भर दिलेला दिसतो.

नाटककार या नात्याने त्यांनी केलेली कामगिरी मात्र अधिक महत्त्वाची आहे. *चिचिन-लीला*, *मायेचा पूत* व *खडाष्टक* ही त्यांची नाटके 'महाराष्ट्र नाटक मंडळी'ने रंगभूमीवर आणली. यातील *चिचिन-लीला* हे नाटक बरेच गाजले; पण *खडाष्टक*ने विलक्षण लोकप्रियता मिळविली. स्त्रीविषयक सुधारणांविषयीचा गैरसमज दूर करण्याचा प्रयत्न, *चिचिन-लीला* या नाटकात केलेला असून दत्तकाच्या प्रथेमुळे निर्माण होणारा स्वार्थ व हिंस्रता याचा प्रश्न *मायेचा पूत* मधून हाताळलेला आहे. *खडाष्टक* नाटकातून मात्र जोशींनी कोणत्याही सामाजिक प्रश्नाला स्पर्श केला नाही. काही कारण नसताना शाब्दिक भांडणाची प्रवृत्ती असलेल्या, चिकटे व करकरे या कुटुंबातील व्यक्ती एकत्र आल्यामुळे उत्पन्न होणाऱ्या मजेशीर व हास्यस्फोटक घटनांची मालिका, असे प्रहसनात्मक स्वरूप या नाटकाला लाभले आहे. आधुनिक मराठी नाट्यसृष्टीतील एक उल्लेखनीय विनोदी नाटक म्हणून *खडाष्टक*चा सार्थ लौकिक आहे.

अरविंद वामन कुलकर्णी, राम घोडे

**जोशी, शंकर पुरुषोत्तम :** (ज. ९ मार्च, १८९४, पाली, जि. कुलाबा – मृ. २० सप्टेंबर, १९४३). इतिहास संशोधक. व्हर्नाक्युलर फायनलपर्यंतचे शिक्षण पाली व महाड येथे. औंध येथे इंग्रजी शिक्षण. १९१४ च्या युद्धाच्या वेळी पुरवठा खात्यात नोकरी. त्या निमित्ताने केट्टा, अरबस्तान, पर्शिया येथे गमन. अरबी, पुश्तु, रशियन भाषांचे जाणकार. काही काळ शिक्षक.

*भाऊंच्या वीरकथा* (१९३४), *मराठ्यांच्या सत्तेचा उत्तरेकडील विस्तार* (१९३६), *शीखांचा स्फूर्तिदायक इतिहास* (१९३८), *पंजाबातील नामदेव* (१९३९), *राजस्थान-महाराष्ट्र संघर्ष* (१९४३), ही त्यांची पुस्तके प्रसिद्ध आहेत. मराठ्यांनी महाराष्ट्राबाहेर जाऊन जे कर्तृत्व गाजवले, त्याची फारशी चिकित्सा झालेली नाही, हे ध्यानात घेऊन जोशींनी आपल्या साहित्यातून मराठ्यांच्या महाराष्ट्राबाहेरील राजकारणावर विशेष भर दिला आहे. *मराठ्यांच्या सत्तेचा उत्तरेकडील विस्तार* हा शिंद्यांच्या उत्तरेकडील पराक्रमावर व राजकारणावर प्रकाश टाकणारा ग्रंथ असून, *राजस्थान–महाराष्ट्र संघर्ष* या ग्रंथात उत्तरेकडे मुलुखगिरी करणारे मराठे सरदार व राजस्थानमधील फुटीर वृत्तीचे संस्थानिक ह्यांच्यामधील संबंधांची चिकित्सा आढळते. मराठीत शीखांचा इतिहास पहिल्यानेच सांगणारा *शीखांचा स्फूर्तिदायक इतिहास* हा ग्रंथ; त्याचप्रमाणे *पंजाबातील नामदेव* ह्या ग्रंथातून मराठीत अभंगरचना करणारे नामदेव आणि

पंजाबातील नामदेव एकच आहेत, हे सिद्ध करणारा व पंजाबामधील नामदेवांच्या कार्याचे नेमके चित्र उभे करणारा ग्रंथही महत्त्वपूर्ण आहे. *भक्तराज श्री नामदेवजी* हा नामदेवावरील हिंदी ग्रंथही त्यांनी लिहिला आहे.

हरिश्चंद्र थोरात, मीनल निसळ

**झळकीकर, भीमाचार्य :** (ज. १८३७–मृ. १० मे, १९०६). प्राचीन दर्शनशास्त्रविषयक लेखक. मुंबई येथील एल्फिन्स्टन कॉलेजमध्ये शास्त्री. भीमाचार्यांचे मुख्य दोन ग्रंथ (१) *न्यायकोश* आणि (२) *न्यायभारती*. पहिला *न्यायकोश* संस्कृत आहे. दुसरा ग्रंथ 'न्यायसिद्धान्तमुक्तावली' चा मराठी सटीप अनुवाद आहे.

*न्यायकोश* (पहिली आवृत्ती-१८८४, सुधारित आवृत्ती-१८९३) हा ग्रंथ अशा प्रकारच्या कोशवाङ्मयात अग्रगण्य असा आहे. तो त्यांनी पाश्चात्त्य संस्कृत पंडित डॉ. बुल्हर व डॉ. कीलहार्न यांच्या आग्रहाने व प्रोत्साहनाने लिहिला. सर्व दर्शनांत न्यायदर्शन (वैशेषिकदर्शन धरून) समजण्यात अत्यंत कठीण समजले जाते. या न्यायदर्शनाचे पारमार्थिक शब्द इतर दर्शनांच्या मूळ व भाष्यात्मिक ग्रंथांतून सहरसहा येत असतात. वेबरसारख्या पंडितानेही ह्या कोशाची स्तुती केली आहे. पहिल्या आवृत्तीची पृष्ठसंख्या २६७ असून, दुसऱ्या सुधारित आवृत्तीची पृष्ठसंख्या १०५० एवढी आहे.

महानैयायिक विश्वनाथ-पंचानन भट्टाचार्य यांनी न्यायदर्शनातील संपूर्ण विषयांचे भांडार असा जो '*न्यायसिद्धांतमुक्तावली*' हा ग्रंथ रचला होता; त्याचा भीमाचार्यांनी *न्यायभारती* ह्या नावाने दोन भागांत (पहिला भाग १८८२; दुसरा भाग १८८४) सुबोध मराठी अनुवाद केला. अनुवादाखाली तद्विषयसंबद्ध इतर टीकांच्या आधारे विस्तृत टीपा दिलेल्या आहेत. 'फ्री चर्च कॉलेज'चे प्रोफेसर श्रीधर गणेश जिनसीवाले यांनी, मूळ "न्यायसिद्धांतमुक्तावली' हा ग्रंथ भीमाचार्यांच्या *न्यायभारती*मुळे कोणाही शास्त्र्याच्या मदतीशिवाय समजण्याइतका सुलभ झाला आहे" अशी या ग्रंथाची प्रशंसा केली आहे.

वि. म. वेडेकर, राम घोडे

**टाकळकर, केशव दादाजीशास्त्री :** (ज. १८६३, टाकळी, नाशिक–मृ. १९४९, टाकळी). संस्कृतभाषाभिज्ञ व व्याकरण-पंडित; प्रवचनकार व ग्रंथकार. प्राथमिक शिक्षण विंचूर येथे. त्यानंतर नाशिक येथे वे. शा. सं. कठोरकरशास्त्री ह्यांच्याजवळ संस्कृतचे अध्ययन. काही काळ बडोदे संस्थानात नोकरी. श्रीमंत सयाजीराव गायकवाड ह्यांच्याकडून 'वैयाकरण' ही उपाधी प्राप्त. त्यानंतर त्र्यंबकेश्वर येथील पाठशाळेत प्राध्यापक व येवले येथील संस्कृत पाठशाळेत पंधरा वर्षे अध्यापकाचे कार्य करून टाकळी येथे प्रयाण. १९३८ मध्ये संन्यासाश्रमाचा स्वीकार.

विद्यारण्यस्वामींच्या 'जीवन्मुक्तिविवेक' ह्या ग्रंथाचे ह्यांनी केलेले मराठी भाषांतर (१९१४) प्रसिद्ध आहे.

ग. दे. खानोलकर

**टाकी, मंगेश रामचंद्र :** ० श्रीदादाभाई : (ज. २२ जुलै, १८८३, कारवार–मृ. १ मार्च, १९५३, जोगेश्वरी, मुंबई). अध्यात्म, तत्त्वज्ञान व संतसाहित्यावर लेखन करणारे लेखक.

माध्यमिक शिक्षण मुंबईत. घराण्यातच अध्यात्म, भक्ती व परमार्थ यांची परंपरा. *श्रीकृष्णाचे सद्गुरु श्रीदुर्वास* (१९३८), या आपल्या ग्रंथात श्रीकृष्णाचे लौकिक गुरू सांदिपनी असले, तरी ब्रह्मपरोक्षज्ञानाचे सद्गुरु श्रीदुर्वास होते, असा सिद्धान्त त्यांनी संशोधनपूर्वक मांडला. *श्रीतुकाराम महाराजांचे सदेह वैकुंठगमन* (१९५०), या ग्रंथात यांनी त्यांचे निर्याणकाळातील अभंग आणि स्वतःचे योगविषयक ज्ञान यांच्या समन्वयाने तुकारामांनी आपला देह 'आपोनारायण' म्हणजे जलमय केला, असे मत मांडले. प्रत्यक्ष योगानुभावामुळेच *समाधीचे विविध प्रकार* (१९५२), हा ग्रंथ त्यांनी लिहिला. *आचार्यचतुष्टय* (१९४०), या ग्रंथात अद्वैत, विशिष्टाद्वैत, द्वैत आणि शुद्धाद्वैत या तत्त्वज्ञानमार्गांचा व मूळ आचार्यांचा त्यांनी परिचय करून दिला. *प्रारब्ध कर्माचे सांगोपांग विवेचन* (१९५२), या ग्रंथात त्यांनी भारतीय तत्त्वज्ञानातील कर्मसिद्धान्ताचे सुलभ विवेचन केले. याशिवाय त्यांनी *श्रीनारायण महाराज जालवणकरांचे संक्षिप्त चरित्र* (१९३१) आणि *श्रीतुकाराममहाराज आणि श्रीशिवछत्रपतींचे वैराग्य*(१९३४), हे ललितासाठी तयार केलेले नाटकही लिहिले. सुलभ आविष्कार, सप्रमाण मांडणी, रसपूर्णता, चिकित्सकता बुद्धी या गुणांनी यांचे वाङ्मय मंडित झालेले आहे.

हरिश्चंद्र थोरात, के. ए. पोतदार

**टाकी, रामचंद्र शंकर :** ० श्रीभाई : (ज. १ ऑगस्ट, १८५७–मृ. १४ ऑक्टोबर, १९३५, मुंबई). अध्यात्म व तत्त्वज्ञानविषयक लेखन करणारे लेखक.

मुंबईच्या एल्फिन्स्टन कॉलेजमधून बी.ए. काही दिवस शिक्षक. पुढे बढती मिळून डेप्युटी एज्युकेशनल इन्स्पेक्टर. घराण्यात वंशपरंपरेने अध्यात्म, भक्ती व परमार्थ यांची ओढ. यामुळे यांची ग्रंथसंपदा परमार्थविवेचनपूर्ण झाली आहे. *पुरुषार्थदीपिका* or Supreme goal of life (1918), हा ७०० पृष्ठांचा त्यांचा पहिला ग्रंथ, मोक्षप्राप्तीच्या साधनांचा ऊहापोह करणारा आहे. त्यावरून श्रुती-स्मृती व संतवाङ्मय यांचा, त्यांचा सखोल व्यासंग दिसून येतो. *लघुबोध* (१९२१) मध्ये *पुरुषार्थदीपिके*चा सारांश दिलेला आहे. *श्रीज्ञानेश्वरमहाराज अथवा सद्भक्तिविजय* (१९२७), या ग्रंथांत 'ज्ञानेश्वरांचे चरित्र आणि तत्त्वज्ञान' यावरील त्यांच्या रसाळ प्रवचनांचा संग्रह आहे. इंग्रजीत त्यांनी *प्रेमासुधा* (१९२२), हा भक्तिमार्गविवेचक आणि *ऑन द सॉंग ऑफ द गॉड ऑफ गॉड्स* (१९२३), हा गीतेचा सामग्र्याने परामर्श घेणारा ग्रंथ लिहिला आहे.

हरिश्चंद्र थोरात, के. ए. पोतदार

**टिकेकर, रामचंद्र विनायक :** ० किरात ० धनुर्धारी ० राघवानंद : (ज. १८६२ – मृ. ११ ऑक्टोबर, १९०७). इतिहास व ऐतिहासिक चरित्रांचे लेखक, पत्रकार; कादंबरीकार; व्यापार-उदिम, शेतकरी, अर्थशास्त्र आदि विविध विषयांचा खोल अभ्यास करून त्यांचा परामर्श घेणारे निबंधलेखक.

शालेय शिक्षण धारवाड येथे. प्रतिकूल परिस्थितीमुळे इंग्रजी सहावीपर्यंतच शिक्षण. 'सदर्न मराठा रेल्वे'च्या धारवाड येथील कार्यालयात कारकुनी. नंतर नोकरी सोडून लेखन हाच व्यवसाय. प्रारंभी 'किरात' या टोपण नावाने वर्तमानपत्रांतून, नंतर 'केसरी'तून 'धनुर्धारी' या टोपणनावाने लेख प्रसिद्ध.

इतिहास आणि ऐतिहासिक व्यक्ती हा यांचा आवडीचा विषय. *जवानमर्द बाळाजी बाजीराव* भाग १–२ (१८९१-९२), *जवानमर्द मराठेगडी* भाग १-२ (१८९३), या पुस्तकांतून मराठे शाहीतील वीर पुरुषांची ओळख त्यांनी ओजस्वी शैलीत करून दिली. *अहिल्याबाई होळकरीण* (१८९५), *उमाबाई दाभाडे*, *आपल्या देशाचा लहानसा इतिहास* (१८९३), *आर्यधर्माचा इतिहास* अशीही काही पुस्तके त्यांनी लिहिली. इतिहासासंबंधी पराकाष्ठेचे औदासीन्य असलेल्या त्या काळी स्वदेशाभिमान जागृत व्हावा, यासाठी त्यांनी हे लेखन केले.

अर्थशास्त्र, व्यापार, उद्योगधंदे, गळिताची धान्ये, कापूस या क्षेत्रांत मराठी माणूस उद्यमशील बनावा, यासाठी *पैसा कसा मिळेल?* (१८९२), *उपाशी महाराष्ट्राला उद्योग* (१९०३), *आमची गळिताची धान्ये* अशी पुस्तके त्यांनी लिहिली. विविध ग्रंथ, ब्रेक्टिस्, नकाशे व आकडेवारी यांची मदत घेऊन ते आपले म्हणणे सप्रमाण

मांडीत. *हिंदुस्थानचे व्यापारी सूत्रांन* (१८९७), हा त्यांचा मोठा ग्रंथ. मराठी भाषेच्या संदर्भात अभिनव व पहिला.

त्यांनी लिहिलेल्या एकूण तीन कादंबऱ्यांपैकी *पाईकर भटजी* (१८९८), ही अत्यंत लोकप्रिय झाली. ती गोल्डस्मिथच्या 'विकार ऑफ वेकफिल्ड'चे अंशतः रूपांतर आहे. खूप साध्या व घरगुती भाषेत लिहिलेल्या या कादंबरीत व्यक्तिचित्रणाचे उत्कृष्ट नमुने पहावयास मिळतात. सत्प्रवृत्त भिक्षुकाचे व त्याच्या कुटुंबाचे चित्रण तीत आहे. इंग्रजी शिक्षण, ख्रिस्ती धर्म, परकीय सत्ता या गोष्टींनी सुरू झालेल्या संस्कृतिसंक्रमणामुळे भटजींच्या भावविश्वाला मिळालेल्या धक्क्याचे चित्रण तीत आहे. *पिराजी पाटील* (१९०३), या त्यांच्या दुसऱ्या कादंबरीत, गावरहाटी नष्ट होत आहे व सरकारी नोकरशाहीचा लाचखोर कारभार यामुळे उद्ध्वस्त होणाऱ्या शेतकऱ्याच्या जीवनाचे खिन्न करणारे चित्र रेखाटले आहे. आजच्या ग्रामीण साहित्याचे पितृपद या कादंबरीस देण्यास हरकत नाही. प्रथमपुरुषी निवेदनामुळे या दोन्ही कादंबऱ्या वाचकांना सहज आकृष्ट करतात.

ख्रिस्ती धर्मप्रचारकाविरुद्ध मत मांडण्यासाठी त्यांनी *स्वधर्मात मरण बरे; पण परधर्मांचे नाव नको* (१९०४), *मरेन पण ख्रिस्ती होणार नाही*, ही पुस्तके लिहिली. इंदूरचे अधिपती शिवाजीराव होळकर यांच्याविरुद्ध चाललेल्या निंद्य प्रचाराला त्यांनी संशोधनपूर्वक उत्तर, *इंदूर प्रकरणाची दुसरी आणि खरी बाजू* (१८९६), या पुस्तकातून दिलेले आहे.

'जीवनांच्या विविध क्षेत्रांतील ज्ञान करून देऊन समाजाला जागृत करणे आणि त्यायोगे स्वराष्ट्राचा उत्कर्ष साधणे' हेच त्यांच्या लेखन प्रपंचामागचे सूत्र होय. समाजाविषयीची त्यांची कळकळ उच्चवर्णीय व मध्यमवर्गीय यांच्या पुरतीच मर्यादित नव्हती.

हरिश्चंद्र थोरात, के. ए. पोतदार

**टिपणीस, गोविंद गोपाळ** : (ज. २४ मे, १८६७, महाड, जि. कुलाबा – मृ. १८ नोव्हेंबर, १९२५, महाड). कवी व विविध विषयांवरील ग्रंथकार.

मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण पुण्याच्या न्यू इंग्लिश स्कूलमध्ये. 'काव्यरत्नावली'च्या प्रारंभीच्या सहा-सात अंकांतून त्यांची काही कविता प्रसिद्ध झाली. तीत त्यांची कालिदासाच्या 'ऋतुसंहार' या संस्कृत काव्याचे भाषांतर व इतर स्फुट काव्ये प्रसिद्ध झाल्याचे आढळते. कवितेचे वळण जुने आणि भाषा संस्कृतप्रचुर आहे. यांनी विविध विषयांवर ग्रंथलेखन केले. *बेंजामिन फ्रँकलीन यांचे चरित्र* (१८९६, जॉन एस. टी. ॲबट यांच्या इंग्रजी चरित्राचे भाषांतर) *सॉक्रेटीस आणि त्याचे विचार* (१९१५) व *कौटिलीय अर्थशास्त्रप्रदीप* (१९२३), ही यांची महत्त्वाची पुस्तके. याशिवाय *रायगडाची माहितीपुस्तिका* (१८९६), *महाराष्ट्रातील दुष्काळ* (१९०५), *कुल आणि शील* (१९१६), असेही यांचे काही लेखन आहे. महाराष्ट्र-वेद-ग्रंथमाला या नावाने *तुकाराम* (१९१४), *एकनाथ* (१९१५) व *ज्ञानेश्वर* (१९२५) या तीन संतकवींच्या कवितेचे वेचे यांनी तयार केले. *कौटिलीय अर्थशास्त्रप्रदीप* हा यांचा ग्रंथ. मूळ ग्रंथ सूत्ररूप व त्या सूत्रावरील भाष्य असा असून, त्यांनी केलेले भाषांतर मार्मिक आहे. प्रस्तावना व उपसंहार वाचल्यावर टिपणीस यांचे अवलोकन किती सूक्ष्म आहे, ते कळून येते.

उषा टाकळकर, के. ए. पोतदार

**टिपणीस, यशवंत नारायण तथा अप्पासाहेब** : (ज. ३ डिसेंबर, १८७६ – मृ. २५ मार्च, १९४३). नट व नाटककार. शिक्षण पुणे येथे. नंतर महाड येथे शिंपी-व्यवसाय. बंधू माधवराव टिपणीस व इतरांच्या सहकार्याने 'महाडकर नाटक मंडळी'ची १९०४ साली स्थापना केली. हीच पुढे 'महाराष्ट्र नाटक मंडळी' म्हणून प्रसिद्ध. १९१२ साली स्वतःची 'भारत नाटक मंडळी' काढली.

ह्यांनी पौराणिक, ऐतिहासिक व सामाजिक अशी तिन्ही प्रकारची नाटके लिहिली आहेत. *मत्स्यगंधा* (१९१३), *राधामाधव* (१९१४), *जरासंध* (१९१६) व *नारद* ही पौराणिक नाटके. राजा शंतनू, त्याचा प्रेमविषय झालेली मत्स्यगंधा व त्या दोघांचा विवाह व्हावा यासाठीच आजन्म ब्रह्मचर्य पालनाची प्रतिज्ञा करणारा शंतनुपुत्र भीष्म, यांची कथा *मत्स्यगंधेत* आढळते. शंतनू व भीष्म यांच्या अंतःकरणातील भावनिक द्वंद्व टिपणीसांनी चांगले दाखविले आहे. *राधामाधव* ह्या नाटकात श्रीकृष्ण व राधा यांच्यातील निरागस व नाजूक प्रीतीचे चित्रण केले आहे. *चंद्रग्रहण* (१९१८), *छत्रशिवाजी* (१९२५), *शिक्काकट्यार* (१९२७), *शिवाजीला शह* (१९३३) व *दख्खनचा दिवा* (१९३६) ही त्यांची ऐतिहासिक नाटके. घटना-प्राधान्य हा ह्या नाटकांचा विशेष आहे. *कमला* (१९११), *राजरंजन* (१९२५), *आशा-निराशा* (१९२३), *स्वस्तिक बँक* (१९३२) ही त्यांची कल्पनारम्य सामाजिक नाटके. यातील *आशा-निराशा*, *राजरंजन* यांसारख्या नाटकांतून असहकारितेसारख्या राष्ट्रीय आंदोलनाचे काही पडसाद उमटलेले दिसतात. *कमला* हे नाटक मेरी कॉरेलीच्या 'थेल्मा'वरून त्यांनी रचले आहे. रंगभूमीशी नट या नात्याने टिपणीसांचा घनिष्ट संबंध होता व कंकभट (कीचकवध), राघोबा (भाऊबंदकी), प्रतापराव (कांचनगडची मोहना), नाना फडणवीस (तोतयाचे बंड) इत्यादी त्यांच्या भूमिका गाजल्या होत्या. त्यामुळेच यशस्वी प्रयोगाला आवश्यक त्या गोष्टींची सांगड घालून, त्यांनी आपली नाटके रचली आहेत. त्यातही ऐतिहासिक नाटककार म्हणून त्यांना विशेष प्रसिद्धी लाभली. योगायोग, वेषांतरे, अघटित घटना ह्यांना त्यांच्या नाटकांत विशेष स्थान आहे. १९३० नंतर मराठी रंगभूमीला लागणारी ओहोटी थांबविण्याचे श्रेय काही प्रमाणात य. ना. टिपणीस ह्यांच्याकडे जाते. १९२१ साली पुण्यात भरलेल्या नाट्यसंमेलनाचे अध्यक्ष म्हणून त्यांची निवड झाली होती.

अरविंद वामन कुलकर्णी, के. ए. पोतदार

**टिळक, गंगाधर रामचंद्र** : (ज. १८२० – मृ. १८७२). व्याकरण, इतिहास व गणित या विषयांचे लेखक. प्राथमिक शिक्षण दाभोळ येथे व काही इंग्रजी शिक्षण पुण्यास. सरकारी शिक्षणखात्यात शिक्षक व नंतर डेप्युटी एज्युकेशन इन्स्पेक्टर.

गंगाधरपंत हे लोकमान्य टिळक यांचे वडील. गणित व संस्कृत ह्या विषयांचा ह्यांचा विशेष व्यासंग होता. ह्यांनी *लघुव्याकरण* (दु. आ. १८५९), *त्रिकोणमिती*, *इंग्लंडचा इतिहास* अशी काही विद्यार्थ्यांसाठी उपयुक्त असलेली पुस्तके लिहिली. *लघुव्याकरणाच्या* सहा आवृत्त्या निघाल्या होत्या.

अ. अ. वडोदकर

**टिळक, (रे.) नारायण वामन** : ० जगन्मित्र ० : (ज. ६ डिसेंबर, १८६१, करजगाव, जि. रत्नागिरी – मृ. ९ मे, १९१९, मुंबई). 'फुलामुलांचे कवी'. लक्ष्मीबाई टिळक यांचे पती. देवदत्त नारायण टिळक यांचे वडील. शिक्षण चार इयत्तांपर्यंतचे कल्याण येथे व पुढील थोडे नाशकास. १८८० मध्ये शिक्षणास पूर्णविराम. किशोरावस्था ओलांडण्यापूर्वीच टिळकांना ओवी, अभंग, साकी, दिंडी इत्यादी छंदांत रचना करण्याची घरच्या संस्कारांतूनच प्रेरणा मिळाली. गणेशशास्त्री लेले ह्यांचेजवळ शास्त्रीय पद्धतीने संस्कृतचे अध्ययन व कालिदासादी अभिजात संस्कृत कवींच्या साहित्याचा परिचय. इंग्रजी, मराठी साहित्याचा व्यासंग. १८७९ मध्ये मनूताई गोखले (लक्ष्मीबाई टिळक) हिच्याशी विवाह. १९०० साली टिळकांनी ख्रिस्ती धर्म स्वीकारला

कालांतराने लक्ष्मीबाई टिळकांनीही खिस्ती धर्माचा स्वीकार केला. नागपूरच्या वास्तव्यात *काव्यकुसुमांजलि* (१८८९) आणि *ऋषी* (१८९३) ही मासिके टिळकांनी काढली.

टिळकांनी गद्य व पद्य अशी दोन्ही प्रकारची रचना केली असली तरी कवी म्हणूनच ते विशेष प्रसिद्ध आहेत. त्यांच्या कवितांचा *टिळकांची कविता* पुस्तक पहिले (१९१४), हा संग्रह भा. कृ. उजगरे यांनी संपादित करून प्रसिद्ध केला. टिळक हे मनाने श्रद्धाशील होते. त्यांच्या मनाची ठेवण आरंभापासूनच धर्मोपदेशकाची व नीतिशिक्षकाची होती. *घड्याळ काय म्हणते!* व *मुलांस योग्य बक्षीस* ही त्यांची आरंभीची रचना ह्याच भूमिकेतून निर्माण झाली आहे. 'जगन्मित्र' या टोपणनावाने त्यांच्या स्फुट कविता प्रसिद्ध झाल्या आहेत. टिळक हे 'फुलामुलांचे कवी' म्हणूनही प्रसिद्ध आहेत. त्यांचे काव्य प्रसन्न व प्रसादगुणाने युक्त आहे.

ते उत्कृष्ट भावकवी होते. 'पाखरा येशिल का परतून', 'माझ्या जन्मभूमीचे नाव', 'पुरे जाणतो मीच माझे बळ' यांसारख्या उत्कृष्ट भावकविता त्यांनी लिहिल्या आहेत. काव्य व तत्त्वज्ञान यांचा सुंदर मेळ त्यांच्या कवितेतून आढळतो. *वनवासी फूल*, *बापाचे अश्रू*, *माझी भार्या*, *सुशीला* यांसारखी खंडकाव्ये व दीर्घकाव्ये, त्याचप्रमाणे '*कारण मी वेडा नुसता*', '*ओघळा झालो तर*', '*बोंबाबोंब*' यांसारख्या स्फुट कविता या दृष्टीने उल्लेखनीय वाटतात.

त्यांची प्रेमकविताही वैशिष्ट्यपूर्ण आहे. त्यांचा स्त्रीविषयक दृष्टिकोण पतिपत्नीतील सेव्यसेवकभाव नाकारून सख्यभावाचा पुरस्कार करतो. त्यांच्या प्रेमकवितेला निष्ठेचे अधिष्ठान असल्याने ती सोज्वळ व उदात्त वाटते. टिळक हे आधुनिक कवी असले तरी जुन्या वळणाच्या अभिजाततावादी मराठी कवितेचा प्रभाव त्यांच्यावर पडला होता.

वरील काव्यांखेरीज *ख्रिस्तायन* हे ख्रिस्तचरित्रासंबंधीचे महाकाव्याचा घाट असलेले ओवी छंदातील अकरा अध्यायांचे अपूर्ण काव्य (१९२१), *अभंगांजली* (द्वि. आ. १९३०) आणि *भजनसंग्रह* ही भक्तिपर रचनाही प्रसिद्ध आहे. ख्रिस्ताचे तत्त्वज्ञान अंगी बाणवून घेऊन ख्रिस्ताशी एकरूप होण्याविषयीची तळमळ त्यांच्या अभंगांतून प्रकट होते. सहजता व भावनेची उत्कटता ही या अभंगांची वैशिष्ट्ये. मराठीभाषी ख्रिश्चनांची मते इंग्रजीकडून मराठीकडे वळविण्याचे आणि त्यांच्या मराठी भाषेला सुबोध व सरस वळण लावण्याचे महत्त्वाचे कार्य टिळकांच्या या कवितेने केले आहे. ख्रिस्तीधर्म स्वीकारूनही त्यांचे मातृभाषेवरील व मराठी भाषेवरील प्रेम तिळमात्रही कमी झाले नाही. 'धर्मांतर म्हणजे देशांतर नव्हे' या त्यांच्या उत्कट श्रद्धेमुळे बऱ्याच महाराष्ट्रीय ख्रिस्ती मंडळींना स्वदेश व स्वभाषा यांच्याविषयी आस्था निर्माण झाली. मराठी ख्रिस्ती मिशनऱ्यांच्या सोयीसाठी तयार केलेल्या उपासना संगीताला अधिक सौष्ठवपूर्ण करण्याचे श्रेयही रे. टिळकांकडे जाते. हे कार्य त्यांनी १९१२ साली पूर्ण केले. सेवा करण्याची प्रेरणा रे. टिळकांनी दिली. 'बालबोध मेवा' या मुलांसाठी चालविल्या गेलेल्या नियतकालिकालाही यांचे मोठे योगदान आहे. लक्ष्मीबाई टिळकांच्या 'स्मृतिचित्रां'चा केंद्रबिंदू नारायण वामन टिळक हेच आहेत.

बालकवी ठोंबरे यांचे लालनपालन करण्यात टिळक दंपतीचा फार मोठा वाटा आहे.

कृ. ब. निकुम्ब; व. कृ. वऱ्हाडपांडे; विद्यागौरी टिळक

**टिळक, (लोकमान्य) बाळ गंगाधर** : (ज. २३ जुलै, १८५६, रत्नागिरी – मृ. १ ऑगस्ट, १९२०, मुंबई). थोर देशभक्त, पत्रकार, निबंधकार, भगवद्गीतेचे विवेचक आणि प्राच्य विद्यापंडित. प्रचलित पंचांगपद्धतीत शास्त्रीयदृष्ट्या सुधारणा करू इच्छिणाऱ्यांचे अग्रणी. काही काळ गोपाळ गणेश आगरकरांचे सहकारी. डेक्कन एज्युकेशन सोसायटी व फर्ग्युसन कॉलेज या संस्थांच्या संस्थापकांपैकी एक. झुंजार राष्ट्रवादी. अनेक देशसेवकांचे स्फूर्तिस्थान. प्राथमिक शिक्षण घरी. त्यानंतर पुण्यास इंग्रजी शिक्षण. मॅट्रिक (१८७२). महाविद्यालयीन शिक्षण पुणे व मुंबई येथे. बी.ए. (१८७६), एलएल.बी. (१८७९). विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी काढलेल्या 'न्यू इंग्लिश स्कूल'मध्ये काही काळ शिक्षक. 'केसरी' व 'मराठा' ह्या अनुक्रमे मराठी व इंग्रजी वृत्तपत्रांचे संपादक व कालांतराने मालक (१८९१).

'केसरी' या राष्ट्रवादी वृत्तपत्राचे संपादक, निबंधकार व *गीतारहस्य* या ग्रंथाचे कर्ते या नात्यांनी मराठी वाचकांना लो. टिळक परिचित आहेत. विष्णुशास्त्री चिपळूणकरांपासून प्रेरणा घेऊन इंग्रजी राजवटीविषयी समाजमनात असंतोष निर्माण करण्याचे कार्य 'केसरी' द्वारे टिळकांनी प्रभावीपणे चालू ठेवले. 'केसरी'तील त्यांच्या लेखांचे एकूण चार खंड प्रकाशित झाले असून, त्यातील तीनचतुर्थांश लेख राजकीय विषयांवरील आणि उरलेले लेख समाज, धर्म, तत्त्वज्ञान, चरित्र, भाषा, संशोधन, शिक्षण, आर्थिक प्रश्न इत्यादी विविध विषयांवरील आहेत. *स्त्रीशिक्षणाची दिशा*, *खरे विद्यापीठ कोणते?*, *अज्ञेयवाद*, *पंचांगशोधन*, *पुनिव्हार्सिटया ऊर्फ सरकारी हमालखाने*, *हिंदुत्व व सुधारणा*, *महाराष्ट्र भाषेची वाढ* यांसारख्या निबंधांप्रमाणेच *शेतकऱ्यांचा कायदा*, *राजद्रोह*, *इंग्रजी राज्यात आम्हांस फायदा काय झाला?*, *रोमन पातशाही आणि इंग्रजी राज्य*, *हिंदुस्थानची देना*, *शिवजयंतीचा उत्सव*, *श्री गजाननाचा राष्ट्रीय उत्सव*, *दुष्काळ*, *राज्य करणे म्हणजे सूड उगविणे नव्हे*, *हिंदुस्थानचे दारिद्र्य*, *सुशिक्षितांची कर्तव्ये* इत्यादी त्यांचे निबंध रचनेचा काटेकोरपणा व मुद्देसूद विवेचन या दृष्टींनी उल्लेखनीय आहेत.

मंडाले येथील तुरुंगवासाच्या काळात (१९०८–१४) लिहिला गेलेला व *गीतारहस्य* या नावाने सुप्रसिद्ध असलेला *श्रीमद्भगवद्गीता रहस्य अथवा कर्मयोगशास्त्र* (१९१५), हा श्रीमद्भगवद्गीतेवरील टिळकांचा भाष्यग्रंथ महत्त्वाचा असून 'गीता हे ब्रह्मविद्यामूलक भक्तिसहचारी नीतिशास्त्र होय' हे प्रमेय त्यांनी प्रस्तुत ग्रंथातून साधार विशद केले आहे. टिळकांचे सखोल पांडित्य या ग्रंथावरून दिसून येते. श्रीशंकराचार्यांनी लावलेला गीतेचा संन्यासपर अर्थ अमान्य करून टिळकांनी तिचा कर्मयोगपर अर्थ लावला आहे. *खाल्डियन व भारतीय वेद* (मूळ : 'खाल्डियन ॲण्ड इंडियन वेदाज्'–१९१७), *सांडलेली साख्यकारिका* आणि *वेदांगज्योतिष* (१९१४) या किरकोळ निबंधांशिवाय त्यांचे *वेदकालनिर्णय* (१९०८) व *आर्यलोकांचे मूलस्थान* (१९१०) ही मूळ इंग्रजीत लिहिलेल्या अनुक्रमे *ओरायन* (१८९३) व *आर्क्टिक् होम इन वेदाज्* (१९०३) या ग्रंथांची (के. ल. ओगले ह्यांनी केलेली) भाषांतरे प्रसिद्ध आहेत. वेद काल निश्चित करणे हा *ओरायन*चा विषय. टिळकांनी ज्योतिःशास्त्राच्या आधारे ऋग्वेदाचा काळ इ. स. पू. ४००० वर्षे असल्याचे दाखवून देऊन वैदिक संस्कृती ही ईजिप्शियन, चिनी किंवा खाल्डियन संस्कृती पेक्षाही अधिक प्राचीन आहे, हे या ग्रंथाद्वारे दाखवून दिले. दुसऱ्या ग्रंथात आर्यांचे वसतिस्थान उत्तर ध्रुवाजवळ होते हा सिद्धान्त मांडला आहे. ह्याखेरीज *वैदिक क्रॉनॉलॉजी* (वैदिक कालगणना) नावाचा एक (अपूर्ण) ग्रंथही त्यांनी लिहिला. टिळकांचे हे सर्व ग्रंथ, त्याचप्रमाणे 'केसरी' पत्रातील त्यांचे लेख 'केसरी प्रकाशना'ने प्रसिद्ध केलेल्या 'समग्र लोकमान्य टिळक' (१९७४), ह्या सप्तखंडात्मक ग्रंथात समाविष्ट केले आहेत.

गं. दे. खानोलकर, के. ए. पोतदार

संदर्भ : 'लो. टिळकांचे चरित्र', न. चि. केळकर

**टिळक, लक्ष्मीबाई नारायण :** (ज. १८६८ – मृ. २४ फेब्रुवारी, १९३६). कवयित्री आणि आठवणी लेखिका. रे. नारायण वामन टिळक यांच्या पत्नी व देवदत्त नारायण टिळक यांच्या मातोश्री. माहेरचे नाव मनकर्णिका नारायण गोखले. सुप्रसिद्ध कवी रेव्ह. नारायण वामन टिळक यांच्याशी १८८१ च्या सुमारास यांचा विवाह. निरक्षर लक्ष्मीबाईंना टिळकांनी लिहिणे, वाचणे शिकविले. १८९५ साली टिळक ख्रिस्ती झाले. यामुळे लक्ष्मीबाईंची मनःस्थिती विचित्र झाली. कालांतराने म्हणजे १९०० साली लक्ष्मीबाईंनी ख्रिस्तीधर्म स्वीकारल्यामुळे रे. टिळकांच्या सहवासात त्या आल्या. १९१९ साली रेव्ह. टिळकांचा मृत्यू झाल्यानंतर त्या मुंबई, कराची व नाशिक ह्या ठिकाणी क्वचित काही व्यवसाय व सेवाकार्य करीत होत्या. १९३४ साली नागपूर येथे भरलेल्या ख्रिस्ती साहित्य संमेलनाच्या त्या अध्यक्ष होत्या.

१८९४ मध्ये लक्ष्मीबाईंच्या काव्यलेखनास प्रारंभ झाला. *म्हणे जातो सोडून नाथ माझा* ही यांची पहिली कविता. लक्ष्मीबाईंच्या स्फुट काव्याचा *भरली घागर* (१९५१) हा संग्रह, देवदत्त ना. टिळक यांनी प्रसिद्ध केला. ह्या संग्रहातील कविता बहुतांशी प्रासंगिक स्वरूपाच्या आहेत. घरगुती प्रसंग, अनलंकृत भाषा आणि आत्मपरतेतून झालेली अभिव्यक्ती, यामुळे ह्या कविता परिणामकारक वाटतात. टिळकांनी अपूर्ण ठेवलेल्या *ख्रिस्तायन* या महाकाव्यात जवळजवळ पासष्ट अध्यायांची भर घालून लक्ष्मीबाईंनी शहात्तर अध्यायांचे ते काव्य पूर्ण केले (डिसेंबर १९३८). ही कवितेच्या क्षेत्रातील त्यांची मोठीच कामगिरी होय.

१९३० साली लक्ष्मीबाईंनी रेव्ह. टिळकांचे 'जसे घडले तसे चरित्र लिहिण्याच्या हेतूने *स्मृतिचित्रे* लिहावयास घेतली. त्यांच्या हयातीत स्मृतिचित्रांचे तीन भाग लिहून झाले व १५ डिसेंबर, १९३५ ह्या दिवशी त्याचे प्रकाशन झाले. पहिला व दुसरा भाग १९३४ साली लिहिला. त्या निमित्ताने लक्ष्मीबाईंचा नाशिककरांनी जाहीर सत्कार केला. भाग चौथा १९३६ साली प्रसिद्ध झाला. लक्ष्मीबाईंच्या स्मृतिचित्रांचा गौरव मराठी वाङ्मयाच्या इतिहासात विविध प्रकारे झालेला आहे. त्यांत व्यक्त झालेला सामाजिक इतिहास, टिळक पति-पत्नींनी पाहिलेली विविध प्रकृतींची लहानमोठी माणसे, त्यांच्या स्वभावातून आकाराला येणारे हलके फुलके वा करुण-गंभीर नाट्य आणि त्याचा मिष्किलपणाने वेध घेणाऱ्या लक्ष्मीबाई हे स्मृतिचित्रांचे विशेष आहेत. हे आत्मचरित्र त्यांनी विलक्षण अलिप्ततेने लिहिले आहे. मराठीतल्या सर्वोत्तम ग्रंथांत या आत्मचरित्राची निर्विवादपणे गणना होते. बालकवी ठोंबरे यांच्या लालनपालनात टिळक दांपत्याचा फार मोठा वाटा आहे.

सरोजिनी वैद्य, म. ना. लोही

**टिळक, श्रीधर बळवंत :** (ज. १८९६ – मृ. २५ मे, १९२८, पुणे). कवी व लेखक. लो. बाळ गंगाधर टिळकांचे पुत्र, जयंतराव टिळकांचे वडील. ह्यांनी कॉलेजशिक्षण घेत असताना व नंतर नियतकालिकांतून लिहिलेल्या इंग्रजी-मराठी लेखांचा व काही कवितांचा *माझा व्यासंग* (१९२८) हा संग्रह प्रसिद्ध आहे. राजकीय व सामाजिक सुधारणा एकाचवेळी घडून येणे आवश्यक आहे, असे यांचे मत होते. ह्यांनी १९२८ साली रेल्वेखाली उडी घेऊन आत्महत्या केली.

पां. बा. गाडगीळ

**टेंबे, (डॉ.) भास्कर महादेव :** (ज. १८७० – मृ. जुलै, १९४४). आरोग्य व संरक्षण या विषयांचे लेखक. व्यवसायाने डॉक्टर. एल्. आर्. सी. पी. अँड एस्. (एडिंबरो), एल्. एफ्. पी. अँड एस्. (ग्लासगो) ह्या वैद्यकशास्त्रातील उच्च पदव्या प्राप्त. इंदूरच्या राजघराण्याचे कुटुंब चिकित्सक. नंतर यवतमाळ (विदर्भ) येथे वैद्यक व्यवसाय. ह्यांची *आरोग्यशास्त्र* (१९१७), *शिशुसंवर्धन* (१९३६), *मातृपद* (१९२७), *विद्यार्थी व त्यांचे आरोग्य* (१९२८), *चाळिशी उलटल्यावर* (१९२९), *अन्न आणि शरीर* (१९३५) ही पुस्तके प्रसिद्ध आहेत. वेगवेगळ्या वयोगटातील स्त्रीपुरुषांनी आपले आरोग्य कसे सांभाळावे, ह्याबद्दलचे शास्त्रीय पण सुलभ विवेचन या पुस्तकांतून आढळते. *हिंदुस्थाना तू कुठे* (१९४०), ह्या ग्रंथात त्यांनी जगातील निरनिराळ्या देशांच्या शस्त्रसामर्थ्याचा व त्या तुलनेने ब्रिटिश हिंदुस्थानच्या दुबळ्या शस्त्रसामर्थ्याचा विचार केला आहे व हे दुबळेपण घालविण्यासाठी लष्कराचे हिंदीकरण करून राष्ट्रीय सैन्य उभे करण्याचा मार्ग त्यांनी सुचविला आहे. *हिंदुस्थानचा सागर विक्रम* (१९४३), या ग्रंथातून प्राचीन व ऐतिहासिक काळातील भारताच्या सागरी सामर्थ्याची, विविध उदाहरणांद्वारे माहिती दिलेली आहे. भारतीयांच्या सागरी सामर्थ्याविषयी लिहिला गेलेला हा पहिलाच मराठी ग्रंथ होय.

वसंत वऱ्हाडपांडे, हरिश्चंद्र थोरात

**टेंबे, वासुदेव गणेश : ० टेंबे स्वामी ० वासुदेवानंद सरस्वती :** (ज. १३ ऑगस्ट, १८५५, माणगाव, ता. सावंतवाडी, जिल्हा रत्नागिरी – मृ. २४ जुन, १९१४, गरुडेश्वर, बडोदा, गुजरात). दत्तसंप्रदायी साक्षात्कारी पुरुष. वेदोक्तधर्म, त्याचे आचार व दत्तोपासना ह्या विषयांवर संस्कृत-मराठी रचना करणारे कवी व लेखक. पत्नीच्या मृत्यूनंतर उज्जयिनीच्या नारायणानंद सरस्वतींकडून संन्यासदीक्षा व 'वासुदेवानंद सरस्वती' या नावाचा स्वीकार. भारतभ्रमण करीत असताना सुमारे साडेपाच हजार पृष्ठे भरतील एवढे लेखन यांनी केले. *श्रीदत्तलीलामृताब्धिसार* (१९०३), *दत्तमाला वर्णित माघमाहात्म्य* (१९०४), *श्रीदत्तमाहात्म्य* (१९११) इत्यादी ओवीबद्ध ग्रंथ स्वतंत्रपणे प्रकाशित. त्यांचे शिष्य वामनराव गुळवणी ह्यांनी त्यांच्या समग्र साहित्याचे *शिक्षात्रय* (१९५०), *स्तोत्रादिसंग्रह* (१९५२) इत्यादी बारा खंड (१९५०–५५) प्रसिद्ध केले आहेत. ह्यांची कविता काहीशी पंडिती वळणाची दिसते. *सटीक संस्कृत दत्तपुराण* व मराठी गुरुचरित्राचा समश्लोकी संस्कृत अनुवाद असलेली *श्री गुरुसंहिता*, त्यांच्या संस्कृत रचनेचे उदाहरण म्हणून उल्लेखनीय.

वसंत वऱ्हाडपांडे, हरिश्चंद्र थोरात

**टेंभुर्णीकर, केशव लक्ष्मण :** (ज. १८९१, भिंगार, जि. अहमदनगर, – मृ. ४ ऑगस्ट, १९४३). कवी. संगमनेर येथे हायस्कूल-शिक्षक. अहमदनगर येथे बालकवींच्या सहवासात काव्यरचनेची प्रेरणा. ह्यांची कविता 'काव्यरत्नावली'तून प्रसिद्ध झाली असून ती *बकुळीची फुले* (१९२२) व *रत्नहार, सर पहिला* (१९२४) ह्या संग्रहातून आढळते. *बकुलपुष्पमाला – २ रजनीस अथवा बालकवीस बाष्पांजली* हे १५० साक्यांचे दीर्घ काव्य बालकवींच्या स्मृतीला अभिवादन करण्यासाठी रचले गेले आहे. *पुरुषार्थशतक* (१९२७) हे समर्थ रामदासांच्या 'मनाच्या श्लोका'च्या धाटणीचे १०८ श्लोकांचे काव्य व कडेगावचे सद्गुरु श्रीनारायण महाराज ह्यांच्या स्तवनपर कवनांची *श्रीनारायणस्तव* (१९३१), ही रचना ही त्यांची अन्य निर्मिती. केशवसुत आणि बालकवी ह्यांच्या कवितेचे संस्कार बाह्य रचनाशैलीवर झालेले दिसतात.

उषा टाकळकर, वसंत वऱ्हाडपांडे

**टोपे, विनायक राजाराम :** (ज. १८४२ – मृ. १९०४). बुद्धिबळ या खेळासंबंधी लिहिणारे लेखक. वास्तव्य पुणे येथे. बुद्धिबळ या खेळाविषयी शास्त्रशुद्ध माहिती देणारे पुस्तक मराठी भाषेत नाही, ती उणीव भरून काढावी या हेतूने, *बुद्धिबलक्रीडा* (१८९३) हा ग्रंथ टोपे ह्यांनी प्रसिद्ध केला. टोपे ह्यांच्या या पुस्तकाने प्रथमच या खेळाविषयी सविस्तर माहिती मिळते. ह्या ग्रंथाचे दोन भाग आहेत.

पहिल्या भागात खेळाची मूलतत्त्वे, पारिभाषिक संज्ञांचे स्पष्टीकरण, खेळाचे सर्वसाधारण नियम, निरनिराळे डाव व त्यांचे प्रकार इत्यादी गोष्टी स्पष्ट केल्या असून, दुसऱ्या भागात २५० डावांची माहिती दिली आहे.

वसंत वऱ्हाडपांडे, उषा दाबळकर

**ठेंगे, गोविंद मल्लिनाथ :** (ज. २६ जून, १८७२–मृ. २१ ऑक्टोबर, १९३३). निबंधलेखक. मूळचे गोव्यातील. पुढे मुंबईस स्थायिक. विल्सन कॉलेजमधून बी.ए. झाल्यावर सेक्रेटरीएटमध्ये नोकरी.

मासिक 'मनोरंजना'च्या काशीनाथपंत मित्रांच्या प्रेरणेने ठेंगे लेखन करू लागले. हरिभाऊ आपटे ह्यांची 'करमणूक' व डी. काशीनाथ कंपनीचे 'नवयुग' यातून त्यांचे लेखन प्रसिद्ध होत असे. ट्राईनच्या पुस्तकाच्या आधारे लिहिलेली *सुखाचा शोध* ही लेखमाला व *रोमन वीरपुरुषांच्या कथा* हे त्यांचे साहित्य 'मनोरंजना'तून प्रसिद्ध. *हिंदचे दादाभाई नौरोजी यांचे आत्मचरित्र* (१९१५) हे ह्यांचे भाषांतरित पुस्तकही उल्लेखनीय आहे.

मंजिरी बेडेकर, वसंत वऱ्हाडपांडे

**ठोंबरे, त्र्यंबक बापूजी :** ० बालकवी ० कलापि : (ज. १३ ऑगस्ट, १८९०, धरणगाव, खानदेश–मृ. अपघाती, ५ मे, १९१८, भादली, जि. जळगाव). कवी. इंग्रजी पाचवीपर्यंत शिक्षण. एरंडोल, नाशिक येथे संस्कृत ग्रंथांचे व बडोद्यास इंग्रजीचे अध्ययन. १९१४ च्या जूनमध्ये पुण्याच्या मिशन लॅंग्वेज स्कूलचे प्रमुख शिक्षक म्हणून नियुक्ती. १९०७ साली जळगाव येथील कविसंमेलनाच्या वेळी संमेलनाध्यक्ष, कर्नल डॉ. कीर्तिकर ह्यांनी बालकवींच्या कवितेने मोहित होऊन त्यांचा 'बालकवी' ही पदवी देऊन गौरव केला. ह्याचवेळी रे. ना. वा. टिळकांशी बालकवींचा परिचय झाला. त्यांच्या व्यक्तित्वाच्या व कवित्वाच्या विकासात रे. टिळकांच्या सहवासाचा बराच वाटा आहे.

'*बालमुकुंद*' (१९०३) ही बालकवींची पहिली कविता. ही त्यांनी नवापूर मुक्कामी लिहिली. या काळात त्यांनी काही जुन्या वळणाच्या कविताही लिहिल्या. त्या 'काव्यरत्नावली'तून प्रसिद्ध झाल्या. केशवसुत व टिळक या अर्वाचीन कवींची कविता त्यांच्या काव्यशक्तीला नवे वळण लावण्यास कारणीभूत झाली. शिक्षणासाठी पुढे ते रे. टिळकांकडे नगरला गेले. तेथील काव्यशास्त्र विनोदयुक्त वातावरणात बालकवींच्या मूळच्या काव्यशक्तीला खूपच चालना मिळाली.

१९११ मध्ये बालकवी पुण्याला आले. तेथे त्यांची रा. ग. गडकरी यांच्याशी मैत्री जमली. या उभयतांनी केशवरावांच्या स्मृतिदाखल 'तुतारी मंडळ' स्थापण्याचा उपक्रम केला. गोविंदाग्रजांचा सहवास तेव्हा त्यांना लाभला. त्यावेळी केसरीतून 'कलापि' या टोपणनावाने त्यांनी काही काव्यलेखन केले. त्यानंतरच्या आपल्या अठ्ठावीस वर्षांच्या अल्पायुष्यात कोणत्याही संप्रदायाचे अनुयायित्व न पत्करता त्यांच्या मनस्वी प्रतिभेने जो काव्यनिर्मिती केली, ती नावीन्यपूर्ण व चित्तवेधक आहे. आधुनिक कवींत निसर्गाशी तद्रूप होणारा व आपल्या सुकुमार सहजशैलीने काव्यनिर्मिती करणारा, अन्य कवी मराठीत तरी आधुनिक काळात आजवर झालेला नाही.

*बालकवींची कविता* (१९२३) ह्या नावे बालकवींच्या कवितांचे पहिले संकलन एकनाथ यादव निफाडकर ह्यांनी केले. त्यानंतर गो. गो. अधिकारी व भा. ल. पाटणकर ह्यांनी बालकवींची कविता प्रसिद्ध केली. बालकवींच्या प्रसिद्ध व अप्रसिद्ध अशा समग्र कवितांचे संकलन व संपादन *समग्र बालकवी* (१९६६) ह्या नावाने त्यांच्या पत्नी पार्वतीबाई ठोंबरे ह्यांनी केले आहे.

कृ. ब. निकुम्ब, मदन कुलकर्णी

संदर्भ : (१) रमेश तेंडुलकर, 'बालकवींची कविता', 'नवाकाळ', सप्टेंबर १९५५. (२) यं. वि. सरदेशमुख, 'पंखातला काळोख', 'सत्यकथा', फेब्रुवारी १९६२. (३) मराठे कु. बा. 'बालकवी'.

**ठोसर, सदाशिव नारायण :** ० अश्विनीकुमार : (ज. १८८२ – मृ. १७ मार्च, १९५२). कवी नाट्यसमीक्षक व नाटककार. शिक्षण बी.ए., एलएल.बी. प्रारंभी वास्तव्य व वकिली पुण्यामध्ये. नंतर मुंबई महानगरपालिकेत नोकरी.

ठोसरांनी *समाजशासनकाव्य* (१९१२) लिहिले असले, तरी ते विशेष प्रसिद्ध आहेत ते त्यांच्या *नाट्यकलारुक्कुठार* या कठोर नाट्य-टीकेसाठी. श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांच्या 'गुप्तमंजुष' या नाटकावर, ग. स. मराठे ह्यांच्या सहकार्याने, ठोसरांनी 'ज्ञानप्रकाश' मधून 'अश्विनीकुमार' हे टोपणनाव घेऊन टीका केली व कोल्हटकरांच्या नाटकांतील क्लिष्टता, गुंतागुंतीचे कथानक, कृत्रिम संवाद, कोटिबाजपणा इत्यादी दोषांवर हल्ला चढविला. ही टीका *अश्विनीकुमारप्रणीत श्रीमद्-भरताचार्य मासादिक नाट्यकलारुक्कुठार* या शीर्षकाखाली १९०८ मध्ये पुस्तकरूपाने प्रसिद्ध झाली. ह्या टीकेचे वैशिष्ट्य म्हणजे ती रूढ टीकेच्या रूपाने प्रगट न होता नाटकाचे रूप घेऊनच प्रगट झाली आहे. 'गुप्तमंजुष'वरील ह्या नाट्यविडंबनात्मक टीकेनंतर त्याच प्रकारच्या टीका त्यांनी *नाट्यकलारुक्कुठार मात्रा वळसा नं. २* (१९२६) व *नाट्यकलारुक्कुठार मात्रा वळसा नं. ३* (१९२७) या शीर्षकाखाली लिहिल्या असून, त्यांतून नाट्याचार्य खाडिलकरांच्या अनुक्रमे 'सं. मेनका' व 'सं. द्रौपदी' या नाटकांतील दोषांचे दिग्दर्शन केले आहे.

*लीलावती* (१९११) व *प्रेमाभास* (१९१६) ही ठोसरांची नाटके. *लीलावती* हे नाटक कार्नेल ह्या फ्रेंच नाटककाराच्या 'सिड'वरून लिहिले असून 'प्रेमाभास'चे संविधानक, श्री. कृ. कोल्हटकरांच्या मते, 'सॉरोज् ऑफ सॅटान' ह्या इंग्रजी कादंबरीवरून घेतले आहे. *प्रेमाचे रत्न की रत्नाचे प्रेम* (१९१३), *कवडीचुंबक* (१९३८) ही त्यांची मोलियरच्या प्रहसनांच्या आधारे लिहिलेली प्रहसनेही प्रसिद्ध झाली आहेत.

हरिश्चंद्र थोरात, वसंत वऱ्हाडपांडे

**डुकले, माधव चंद्रोबा :** ० माधव चंद्रोबा : (ज. १८२५, कळंगुट, गोवा – मृ. १३ डिसेंबर, १८८६). सुप्रसिद्ध *सर्वसंग्रह* या मासिक-पुस्तकाचे कर्ते, प्राचीन मराठी कवितेचे प्रकाशक. कौटुंबिक प्रतिकुलतेमुळे कारकुनाची नोकरी पत्करली. इंदूर, कराची येथे त्या निमित्ताने वास्तव्य. परंतु नोकरी सोडून मुंबई येथे औषधविक्रीचा व फोटोग्राफीचा व्यवसाय सुरू केला. डॉ. भाऊ दाजी ह्यांच्या सहवासामुळे मराठी संतकाव्याची गोडी मनात निर्माण झाली. प्राचीन मराठी काव्य नष्ट होऊ नये म्हणून त्याचे प्रकाशन करण्यासाठी त्यांनी *सर्वसंग्रह* (१८६०) हे मासिक सुरू केले. काव्याचे चरण, शब्द न तोडता अखंड लिहिण्याची व छापण्याची पद्धती बदलून माधव चंद्रोबा ह्यांनी शब्द तोडून स्वतंत्रपणे देण्याची व आवश्यक तेथे विरामचिन्हे देण्याची पद्धती नव्यानेच सुरू केली. कवितेच्या अन्वया-सह, कठीण शब्दांच्या व अर्थांच्या टीपा देऊन ती छापणे ही माधव चंद्रोबा ह्यांची संपादन-पद्धती होती. या कार्यात त्यांनी परशुरामपंत तात्या गोडबोले ह्यांचे साह्य घेतले होते. *सर्वसंग्रह* मासिक पदरमोड करून माधव चंद्रोबा ह्यांनी सात-आठ वर्षे चालविले. या काळात त्यांनी मोरोपंतांचे समग्र आर्याभारत व आनंदतनय, वामन पंडित, तुकाराम, रामदास, मुक्तेश्वर वगैरे प्राचीन कवींची बरीच कविता प्रसिद्ध केली. याशिवाय *शब्दरत्नाकर* नावाचा संस्कृत–मराठी कोशही त्यांनी सुमारे नऊ वर्षांच्या परिश्रमाने तयार केला होता. तो १८७० साली प्रसिद्ध झाला. ह्या सर्व कामात माधव चंद्रोबांना त्यांचे बंधू डॉ. अनंत चंद्रोबा ह्यांचे बरेच साह्य लाभले.

कृ. भि. कुलकर्णी, वसंत वऱ्हाडपांडे

**डेव्हिड, केपन :** (ज. १६ ऑगस्ट, १७९३, मुंबई – मृ. १७ डिसेंबर, १८६१). भाषांतरकार. शिक्षण इंग्लंडमध्ये. ईस्ट इंडिया कंपनीच्या लष्करात नोकरी. इ. स. १८१० ते १८१७, वास्तव्य मुंबई व कोकण या भागात.

मराठी भाषा नव्यानेच शिकणाऱ्यांसाठी उपयोगी पडेल असा शब्दकोश करण्याची कॅप्टन केपन डेव्हिड ह्यांची योजना होती. पण मुंबई सरकारकडून आवश्यक त्या सवलती न मिळाल्याने ती योजना त्यांना सोडून द्यावी लागली. त्यांचे वाङ्मयविषयक काम म्हणजे ग्रांट डफ ह्याने लिहिलेल्या 'हिस्ट्री ऑफ द मराठाज्' ह्या इंग्रजी ग्रंथाचे बाबा साने ह्यांच्या सहकार्याने मराठीत भाषांतर केले व ते *मराठ्यांची बखर* (१८२९), या नावाने प्रसिद्ध केले. त्या काळातील इतर पुस्तकांच्या तुलनेने हे भाषांतर चांगले झाले आहे.

**डोंगरे, पुरुषोत्तम भास्कर :** (ज. १८५३ – मृ. १५ डिसेंबर, १९०८). नाटककार व कवी. मूळ गाव अलिबाग. शिक्षण पुणे येथे. नंतर अलिबाग येथे सरकारी नोकरी.

ह्यांनी *जरठोद्वाह* (१८९०), *भीमसिंग-पद्मिनी* (१८८९) ही दोन गद्य नाटके व *चंद्रसेना* (१८९६), *चंद्रहास* (१९०३) व *सैरंध्री* ही तीन संगीत नाटके लिहिली आहेत. गद्य नाटके रंगभूमीवर आली नाहीत. त्यांचे *चंद्रसेना* हे नाटक 'स्वदेशहितचिंतक नाटक मंडळी'ने रंगभूमीवर आणले. किर्लोस्कर मंडळीही *चंद्रसेना*चे प्रयोग करीत असे. रंगभूमीवरील तत्कालीन लोकप्रिय नाटक म्हणून *चंद्रसेना*चा उल्लेख होतो. *जरठोद्वाह* या नाटकातून जरठकुमारी विवाहामुळे तरुण मुलींची कशी अनुकंपनीय अवस्था होते त्याचे वर्णन केले आहे.

'विविधज्ञानविस्तार', 'काव्यरत्नावली' या नियतकालिकांतून ह्यांच्या कविता प्रसिद्ध झाल्या आहेत. त्यांच्या कविता पंडिती वळणाच्या आहेत.

वसंत वऱ्हाडपांडे, मंजिरी बेडेकर

**डोंगरे, महादेव गणेश :** (ज. १८८२ – मृ. ९ एप्रिल, १९३९). इतिहासविषयक साधनग्रंथांचे कर्ते व चिरोलच्या 'इंडियन अनरेस्ट' या ग्रंथाचे भाषांतरकार. शिक्षण बी.एस्सी., एल्.सी.ई. आरंभी कोल्हापूरच्या राजाराम कॉलेजात शास्त्रविषयाचे अध्यापक व नंतर ब्राह्मणेतर चळवळीचे प्रचारक.

लो. टिळकांनी खटला केल्यामुळे प्रसिद्धी पावलेला ब्रिटिश पत्रकार चिरोल ह्याच्या, 'इंडियन अनरेस्ट'चे डोंगरे ह्यांनी मराठीत भाषांतर केले आहे. *भोसले कुळाचा वंशवृक्ष* (१९०५) व *श्रीसिद्धान्तविजय अथवा मराठ्यांच्या इतिहासाच्या साधनांत नवीन भर* (१९०६), हे त्यांचे संपादित ग्रंथ. *श्रीसिद्धान्तविजय* या संस्कृत ग्रंथात भोसले कुळाचे क्षत्रियत्व सिद्ध करून त्यांना वेदोक्त कर्मांचा अधिकार आहे, हे साधार स्पष्ट करताना जो शास्त्राधार प्रगट करण्यात आला त्याचे विवरण आढळते. ह्याचे भाषांतरही श्री. डोंगरे ह्यांनी केले आहे.

उषा टाकळकर, वसंत वऱ्हाडपांडे

**डोंगरे, रामचंद्र बळवंत :** (ज. १३ डिसेंबर, १८५९, ग्वाल्हेर – मृ. १९२८). ज्ञानेश्वरांच्या 'अनुभवामृता'चे टीकाकार. ग्वाल्हेर येथे अर्थखात्यात 'मिलिटरी ऑडिटर' म्हणून नोकरी. सद्गुरू आत्माराम महाराज ऊर्फ ज्ञानेश्वरीबोवा श्रीगोंदेकर ह्यांच्यापासून ग्रंथलेखनाची प्रेरणा घेऊन, आत्माराम महाराजांनी 'अनुभवामृता'वर दिलेल्या प्रवचनांच्या व कीर्तनांच्या आधारे डोंगरेबुवांनी लिहिलेली टीका, *अनुभवामृत : अमृतवाहिनी* (१९२८) ह्या नावाने प्रसिद्ध आहे. आत्माराम महाराज या ग्रंथाचे विवेचन सोपपत्तिक, साधार, विद्वत्तापूर्ण रीतीने करीत. डोंगरे ह्यांनी महाराजांनी सोप्या मराठीत विस्तारपूर्वक टीका लिहावी अशी त्यांना विनंती केली. पण महाराजांनी ओवीवार टिपणे करून देऊन हे जबाबदारीचे काम त्यांच्यावरच सोपविले. ह्या टिपणांच्या आधारे ग्रंथातील प्रतिपादित विषयाचे स्पष्टीकरण डोंगरे ह्यांनी प्रस्तुत अमृतवाहिनी टीकेत केले आहे.

वसंत वऱ्हाडपांडे, उषा टाकळकर

**डोंगरे, वासुदेव नारायण :** (ज. १८५३ – मृ. १९०५, पुणे). नाटककार. हे उत्तम गवई व नटही होते. मुंबईच्या विल्सन हायस्कूलमधून मॅट्रिक झाले. हे सुप्रसिद्ध अण्णासाहेब किर्लोस्करांचे समकालीन होते. किर्लोस्करांनी १८८० साली संगीत नाटक रंगभूमीवर आणताच, १८८१ साली डोंगरे ह्यांनी संगीत मंडळी काढली व त्या मंडळीद्वारा *शाकुंतल*, *इंद्रसभा*, *रत्नावली* (१८८३), *मालतीमाधव* (१८८५), *वेणीसंहार* (१८९०), *मृच्छकटिक* ही नाटके मूळ संस्कृतातून संक्षेप करून मराठीत आणली. ही नाटके संगीतमय होती. 'इंद्रसभा' हे नाटक त्यातील नृत्यगायनामुळे लोकप्रिय ठरले. *रंगी नायकीण* (१८८५), हे त्यांचे प्रहसन स्वतंत्र असून वेश्यागायनाच्या दुर्व्यसनाचे चित्र त्यात दाखविले आहे.

मंजिरी बेडेकर, वसंत वऱ्हाडपांडे

**डोंगरे, शंकर गोपाळ :** (ज. १८८२, नाशिक – मृ. २० मार्च, १९५०). व्यायाम या विषयाचे लेखक आणि भाषांतरकार. शिक्षण बी.ए. व अकौंटन्सी परीक्षेपर्यंत. बडोदा येथे डेप्युटी एज्युकेशनल इन्स्पेक्टर.

बडोदा येथील एक व्यायामप्रेमी सरदार आबासाहेब मुजुमदार ह्यांच्या 'व्यायाम' मासिकात सतत २५ वर्षे व्यायाम ह्याच विषयावर लेखन. 'व्यायाम-ज्ञानकोश' रचनेच्या कार्यातही ह्यांचा बराच वाटा होता. सर वॉल्टर स्कॉट ह्यांच्या 'ऐव्हान्हो' या कादंबरीचे *शिलेदारी इंग्लंड* हे रूपांतर (१९३०), *कसा होतो व कसा झालो* हे आत्मचरित्र व *गुरुवर्य माळमट दादा देवधर ह्यांचे चरित्र* ही ह्यांची अन्य पुस्तके.

ग. दे. खानोलकर, वसंत वऱ्हाडपांडे

**ढवळे, त्र्यंबक गोविंद :** (ज. २६ फेब्रुवारी, १९०४, पन्हाळा, जि. कोल्हापूर – मृ. १० जानेवारी, १९६०, पुणे). ज्योतिर्गणित व खगोलशास्त्र या विषयांचे लेखक. शिक्षण, बी.ए. (कोल्हापूर). पुणे येथील भारत सरकारच्या हवामान खात्यात नोकरी.

*विश्वाची रचना आणि उत्क्रांती* (१९३२), *नक्षत्रदर्शन* (१९५५), *ज्योतिर्वैभव* (१९५६), *राहू केतू आणि ग्रहणे* (१९६०) ही त्यांची प्रसिद्ध झालेली ग्रंथसंपदा. सर्वसामान्य वाचकाला खगोलशास्त्राची गोडी लागावी यासाठी ही पुस्तके लिहिली असल्याने ती सुबोध झाली आहेत.

प्र. नी. नवरे, वसंत वऱ्हाडपांडे

**ढालवाणी, कासमभाई महमद :** (ज. १८३७, अहमदनगर – मृ. १५ ऑगस्ट, १९०५). यांचे घराणे मूळचे दमणचे. पुढे अहमदनगरास स्थायिक. कासमभाईंनी प्रथम कुराणाचा अभ्यास केला. नंतर ते मिशनच्या शाळेत रामकृष्ण विनायक मोडक यांच्या हाताखाली मराठी शिकू लागले. मराठी शिक्षणानंतर नव्यानेच स्थापन झालेल्या सरकारी इंग्रजी शाळेत कासमभाई जाऊ लागले. पुढे त्यांनी ख्रिस्ती धर्माची दीक्षा घेतली (१८५६).

कासमभाईंनी काही दिवस सरकारी नोकरी केली. पण नंतर त्यांनी धर्मसेवेस स्वतःला वाहून घेतले. पुढे ते १८७५ मध्ये साताऱ्यास आले. तेथेच पुढली तीस वर्षे त्यांनी वाङ्मयसेवा व कीर्तने करण्यात घालविली.

कासमभाईंची उल्लेखनीय वाङ्मयीन सेवा म्हटली म्हणजे, त्यांनी तयार केलेला बायबल या धर्मग्रंथाचा शब्दकोश. १८७२ मध्ये त्यांनी या कोशाचे काम हाती घेतले आणि १८८५ मध्ये तो प्रकाशित केला. १८८२ पर्यंत त्यांनी याचे काम एकट्याने केले आणि हेन्री जेम्स ब्रूस

या अमेरिकन मिशनरींनी सहकार्य देऊन त्यांच्याकडून तो पुरा करवून घेतला. यातले नकाशे, चित्रे वगैरे इंग्लंडकडून–अमेरिकेतून मागविली होती. ब्रूस यांच्या ज्योतिःशास्त्र व शरीरशास्त्र या विषयांवरील ग्रंथाच्या भाषांतरास कासमाईंचे साहाय्य लाभले होते. शिवाय सातारा येथे ब्रूस यांच्या कोलंबियन प्रेसमधून निघालेल्या पत्रकांपैकी अनेक कासमभाईंच्या हातातून गेली. काही पत्रके त्यांनी स्वतः लिहिली होती.

त्यांचे काही लिखाण अप्रकाशित राहिले. त्यांत कुराणचे मराठी भाषांतर व त्यावरील टीका, तसेच बायबलमधल्या *स्तोत्रसंहिता* या काव्यग्रंथावरील टीका (अपूर्ण) हे आहेत.

**वाङ्मय :** (१) शस्त्रसंबंधी कोश (१९८५), दुसरी आवृत्ती (१९१२). (२) महमदी धर्माविषयी माहिती (१८९२). (३) गृहकृत्य (१८९९). (४) महमदी धर्माची परीक्षा (१८६४).

भास्कर जाधव

**तर्खडकर, दादोबा पांडुरंग :** (ज. ९ मे, १८१४, मुंबई – मृ. १७ ऑक्टोबर, १८८२, मुंबई). अव्वल इंग्रजीतील मराठी व्याकरणकार, धर्मसुधारक, ग्रंथकार आणि भाष्यकार. 'बॉम्बे नेटिव्ह एज्युकेशन सोसायटी'च्या शाळेत त्यांनी माध्यमिक शिक्षण पूर्ण केले. मराठी-प्रमाणेच गुजराती व फार्सी भाषेवरही त्यांचे प्रभुत्व होते. सरकारी नोकरीत शिक्षक, अधीक्षक, उपजिल्हाधिकारी व सेवानिवृत्तीनंतर काही काळ ओरिएंटल ट्रान्सलेटर म्हणून त्यांनी काम पाहिले.

अव्वल इंग्रजी राजवटीतील अव्वल दर्जाच्या मराठी ग्रंथकारांपैकी एक, या दृष्टीने त्यांना अग्रमान दिला जातो. 'दादोबाचे साहित्य हे मौलिक, रसपूर्ण आणि विचारप्रवर्तक असल्याचे अनुभवाला येते. त्यांची शैलीही रसप्रसंगानुसार आर्ष आणि आर्जवी, प्रसन्न आणि प्रौढ आहे'–असे लोकहितवादी म्हणतात. निबंधकार म्हणून जरी दादोबांचा सहसा निर्देश केला जात नसला तरी त्यांच्या व्याकरणविषयक ग्रंथांच्या प्रस्तावना, 'यमुना पर्यटन' या बाबा पदमजींच्या ग्रंथाला जोडलेला पुनर्विवाहविषयक लेख, 'विधेच्या लाभापायी' हे उपयुक्त ज्ञानप्रसारक सभेतील अध्यक्षीय भाषण व *यशोदा पांडुरंगी*च्या प्रारंभी केलेले परीक्षण हे सारे साहित्य निबंधरूपच होय.

संस्कृत/इंग्रजी भाषेच्या व्याकरणाचे अध्ययन करून आणि मराठी भाषेच्या रूपविचाराची स्वतंत्र प्रज्ञेने व्यवस्था लावून, *मराठी भाषेचे व्याकरण* (१८३६) त्यांनी सिद्ध केले. या व्याकरणाच्या अनेक आवृत्त्या निघाल्या (सातवी आवृत्ती – १८८१). विद्यार्थ्यांसाठी शालोपयोगी *लघुव्याकरण*ही (१८६५) त्यांनी लिहिले. *यशोदा पांडुरंगी* ही मोरोपंतांच्या केकावलीवर त्यांची गद्यटीका (१८६५) विशेष प्रसिद्ध आहे. त्यांचे १८४६ पर्यंतचे आत्मचरित्र (१९४७, संपा., अ. का. प्रियोळकर) महत्त्वाचे आहे. तत्कालीन धार्मिक, सामाजिक, राजकीय व शैक्षणिक जीवनाचे प्रतिबिंब यात दिसते. प्रांजळ निवेदन हा या आत्मचरित्राचा खास विशेष. *मराठी नकाशाचे पुस्तक* (१८३६), *इंग्रजी व्याकरणाची पूर्वपीठिका* (१८६०), *धर्मविवेचन* (१८६८), *पारमहंसिक ब्राह्मधर्म* (१८८०) आणि *शिशुबोध* (१८८४) अशी विविध प्रकारची त्यांची ग्रंथरचना आहे.

ग्रंथलेखनाप्रमाणेच समाजसुधारणेचे त्यांनी कार्य केले. दुर्गाराम मनसाराम मेहेता यांनी सुरतला स्थापन केलेली, मानवधर्म सभा (१८४४) तसेच परमहंससभा (सु. १८४८) या धर्मसुधारक संस्थामागे त्यांची प्रमुख प्रेरणा होती. मराठी ज्ञानप्रसारक सभा, मुंबई विद्यापीठ, पुनर्विवाहोत्तेजक सभा इ. संस्थांच्या कार्यात त्यांचा सहभाग होता. मुंबई येथे ते निधन पावले.

कमलेश

**तांबे, भास्कर रामचंद्र :** (ज. २७ ऑक्टोबर, १८७३ – मृ. ७ डिसेंबर, १९४१). प्रसिद्ध मराठी कवी. 'सौंदर्यवादी' आधुनिक कवी म्हणून विशेष प्रसिद्ध. जन्म मध्य भारतात मुंगावली (आता मध्य प्रदेशातील गुना जिल्ह्यात) येथे. शिक्षण झाशी व देवास येथे. मॅट्रिक प्रथम श्रेणीत उत्तीर्ण (अलाहाबाद विद्यापीठ). परंतु आर्थिक प्रतिकूलतेमुळे पुढील शिक्षण त्यांना घेता आले नाही. १९०१ पासून मध्यप्रदेशातच अनेक वेगवेगळ्या ठिकाणी युवराज शिक्षक (देवास), पिपलोदा (रतलाम) येथे दिवाण (१९११ – १४), प्रतापगड (राजस्थान) येथे पोलीस सुपरिंटेंडेंट, न्यायाधीश (१९१५–२०) तसेच शिक्षणखात्यात परीक्षा-विभागाचे रजिस्ट्रार. अशी प्रतिष्ठेची आणि जबाबदारीची विविध पदे तांबे यांनी उत्तम प्रकारे सांभाळली. १९३७ मध्ये ग्वाल्हेर संस्थानचे ते 'राजकवी' झाले.

काव्यास विशेष अनुकूल नसणाऱ्या व्यवसायातही तांबे यांचा काव्यलेखनाचा छंद कायम राहिला. इंग्रजी स्वच्छंदतावादी टेनिसन – ब्राऊनिंग हे कवी, जयदेव हा संस्कृत कवी आणि रवींद्रनाथ टागोर यासारख्यांच्या काव्याचे संस्कार त्यांच्यावर वेळोवेळी होत गेले. परंतु त्यांच्या कवितेचे मुख्य स्वरूप गीतांचे, भावगीतांचे राहिले. आधुनिक मराठीत ब्राऊनिंगच्या धर्तीची नाट्यगीते, (नाट्यात्मक एकभाषित) तांबे यांनीच विशेष कौशल्याने लिहिली ती लोकप्रियही ठरली.

तांबे यांचा लेखनकाल सर्वसाधारणपणे १८९१ ते १९३६ असा असला तरी त्यांची कविता संग्रहरूपाने प्रथम १९२० मध्ये रसिकांपुढे आली; नंतर दुसरा भाग १९२७ साली आणि समग्र कविता १९३५ साली प्रकाशित झाली. तीत एकूण २२५ कविता आहेत. काही हिंदी कवितांचाही त्यांत अंतर्भाव आहे. तीनही संग्रहांस अनुक्रमे प्रा. वा. गो. मायदेव, कवी अज्ञातवासी आणि माधव जूलियन हे कवित्रय संपादक म्हणून लाभले. स्वतः तांबे मात्र आपल्या कवितेच्या प्रसिद्धीबाबत बेफिकीर असत.

तांबे यांची जीवनानुवर्ती कविता केशवसुतादी अर्वाचीन कवितेच्या प्रणेत्यांहून वेगळी आहे. तांबे हे सौंदर्याचे उपासक होते. तांबे या सौंदर्यवादी कवीने संदेश देण्याचा अभिनिवेश बाळगला नाही. स्वतःचे प्रेमसंतृप्त जीवन आणि इतरांच्या प्रेमाबद्दलची आस्था, यांतून त्यांची बहुतेक नाट्यगीते निर्माण झाली आहेत. परमेश्वरावर व प्रेमावर त्यांची दृढ श्रद्धा होती; त्यातून काही 'अनुभवांची' कविता त्यांच्याकडून लिहिली गेली. प्रेमकाव्यातही विवाहोत्तर प्रेमाच्या कविता संख्येने जास्त आहेत. प्रेमकाव्याप्रमाणेच तांबे यांची 'महाप्रस्थान' विषयक गीते विशेष लक्षणीय आहेत. जीवनाच्या वाटेवर संध्या-छाया भिववू लागल्यावर आणि नेत्र पैलतीराचा शोध घेऊ लागल्यावर ज्या ज्या वेळी विविध भावनांचा कल्लोळ तांबे यांच्या मनात उसळला, त्यातून या महाप्रस्थानात्मक गीतांचा जन्म झालेला दिसतो. ही गीते अतिशय हृद्य व आशयघन आहेत. एकूणच एक सौंदर्यवादी आणि स्वतंत्र प्रतिभेचा कवी म्हणून त्यांचे अर्वाचीन कवींमधील स्थान फार वरचे आहे. त्यांनी रूढ केलेला गीतसंप्रदाय हा तांबे संप्रदाय म्हणून ओळखला जातो. तांबे ह्यांना संगीताचे चांगले ज्ञान होते व त्यांच्या अनेक कवितांवर, त्या कोणत्या रागात गायिल्या जाव्यात, ह्यासंबंधीच्या सूचना त्यांनी देऊन ठेवलेल्या आढळतात. तांबे यांचे काव्यविषयीचे गद्यलेखनही लक्षणीय आहे. त्यातून त्यांची 'कलावादी' दृष्टी स्पष्ट होते (कविवर्य तांबे साहित्यविचार–संपा., काळेले–ढवळे १९७४).

१९२६ मध्ये भरलेल्या मध्यभारतीय कविसंमेलनाचे ते अध्यक्ष होते. १९३२ मध्ये कोल्हापूर येथे भरलेल्या महाराष्ट्र साहित्य संमेलनांतर्गत कविसंमेलनाचेही ते अध्यक्ष होते. ग्वाल्हेर येथे ते निधन पावले.

कमलेश

संदर्भ : 'राजकवी तांबे-एक अध्ययन', रा. अ. काळेले.

**तांबवेकर, साळूबाई भ्र. भाऊसाहेब :** (ज. – मृ. ). साळूबाईंचे मूळ नाव गंगा. त्यांच्या वडिलांचे नांव राम अथवा

रामचंद्र असावे. विवाहानंतर त्यांचे नाव साळूबाई व त्यांच्या पतीचे नाव भाऊसाहेब तांबवेकर असे आढळते. त्यांचे वास्तव्य पुण्यातच कसबा पेठेत होते. स्त्रीलेखिकांत त्या पहिल्या कादंबरीकार आहेत, असे अभ्यासकांना वाटते. त्यांनी *चंद्रप्रभा विरहवर्णन* (१८७३) ही आपली पहिली कादंबरी लिहिली. या कादंबरीचे पुरुषवर्गातील समीक्षकांनी वेगवेगळ्या शेऱ्यांनी स्वागत केले. तत्कालीन परिस्थितीत जन्माला आलेल्या कादंबरी लेखनाचा या कादंबरीवर प्रभाव आढळतो. त्यानंतर *हिंदुस्थानातील तारा* (१८९४), ही त्यांची दुसरी कादंबरी प्रकाशित झाली. 'मुक्तामाला' परंपरेच्या अद्‌भुतरम्यतेचाच पगडा या कादंबरीवरही आढळतो. अचाट, अद्‌भुत व अकल्पित प्रसंग यात आढळतात. त्यांच्या या कादंबरीची रचना गद्यपद्यमिश्रित आहे. त्याचप्रमाणे लोकसाहित्यातील अनेक कल्पनाबंधांचा वापर त्यांनी कादंबरीतून केलेला आहे. स्त्रीसुलभ निवेदनशैली हे त्यांचे विशेष जाणवतात.

लता जाधव

**त्रिभुवन, अमृत भागाजी :** (ज. १८९७–मृ. २३ जून, १९४९). अमृतरावांचा जन्म नगर जिल्ह्यात झाला. त्यांचे प्राथमिक शिक्षण राहुरी येथल्या अमेरिकन मराठी मिशनच्या वसतिगृहात व शाळेत झाले. नंतर ते नगरला आले व तेथील मिशन हायस्कूलमध्ये त्यांनी माध्यमिक शिक्षण घेतले. पुढे उच्च शिक्षणाकरिता मुंबईच्या विल्सन कॉलेजात ते दाखल झाले; पण घरच्या गरिबीमुळे त्यांना शिक्षण पुरे करता आले नाही. पुढे ते साताऱ्याला जाऊन शिक्षकाचे काम करू लागले. तेथून ते पुण्याला आले आणि 'कमिशन ऑफिस'मध्ये नोकरीस लागले. दुसऱ्या महायुद्धाच्या काळात ते मध्यपूर्व भागात मेसापोटेमिया वगैरे प्रांतात गेले होते. तिकडून परतल्यावर मुंबईला काही दिवस काम करून त्यांनी वकिलीचा अभ्यास केला. १९२४ च्या सुमारास हायकोर्ट प्लीडरची परीक्षा देऊन ते वकिलीचा व्यवसाय करू लागले.

अमृतरावांनी समाजसेवा व साहित्यसेवा या क्षेत्रांतही चांगले कार्य केले आहे. *महिन्याची सामग्री*, *सुविचारसंग्रह* वगैरे पुस्तके त्यांनी प्रसिद्ध केली आहेत. ते एक चांगले कवीदेखील होते. त्यांच्या कविता १९२६ साली प्रसिद्ध झालेल्या *तिलकानुग्रह* या काव्यसंग्रहात आढळतात. त्यानंतर साठ वर्षांनी म्हणजे १९८६ मध्ये त्यांचा एक छोटासा काव्यसंग्रह *अमृतधारा* या शीर्षकाखाली प्रसिद्ध झाला. त्यातील कवितांतून स्वदेशप्रेम, राष्ट्रसेवेची तळमळ, निसर्गप्रेम, समाजप्रबोधन, ईश्वरनिष्ठा यांमुळे निर्माण होणारा जिव्हाळा व जिवंतपणा वाचकांच्या भावनांना उजाळा व चैतन्य देणारा ठरावा, यात शंका नाही. खिस्ती समाजाला उद्देशून लिहिलेल्या एका दीर्घकाव्यातून सामाजिक परिस्थितीचे मार्मिक विवेचन व राष्ट्रीय कर्तव्याची जाण निर्माण करणारे भाव ते व्यक्त करतात. भारतीय संतांबद्दल आणि त्यातल्या त्यात तुकारामाबद्दल त्यांना विशेष आपुलकी होती.

**वाङ्मय :** (१) खिस्त जयंतीची भेट–मुंबई, १९२१. (२) सुविचार संग्रह–अहमदनगर, १९२९. (३) महिन्याची सामग्री–भाग १–अहमदनगर, १९३९. (४) महिन्याची सामग्री – भाग २–अहमदनगर, १९४१. (५) अमृतधारा (काव्यसंग्रह–संपा. १९८६).

भास्कर जाधव

**० दत्त :** पहा घाटे, दत्तात्रय कोंडो

**दरेकर, गोविंद त्र्यंबक : ० कवी गोविंद :** (ज. ९ फेब्रुवारी, १८७४–मृ. २८ फेब्रुवारी, १९२६). नासिक येथे वास्तव्य. यांना वयाच्या आठव्या-नवव्या वर्षीच आजारपणाने अपंगत्व आले. त्यामुळे ते शिक्षणात मागे पडले. १८९० मध्ये त्यांनी काव्यरचना करण्यास सुरवात केली. त्यांची सुरवातीची रचना मेळ्यातील पदांच्या स्वरूपाची आहे. त्यांनी काही लावण्याही रचलेल्या आढळतात. पण पुढे स्वातंत्र्यवीर सावरकरांच्या सहवासामुळे पारतंत्र्याची चीड आणि देशभक्तीची भावना त्यांच्या काव्यात व्यक्त होऊ लागली. लोकमान्य टिळकांच्या ज्युबिलीच्या निमित्ताने त्यांनी 'टिळकांची भूपाळी' लिहिली. तानाजीच्या पत्नीचा वीरोचित विलाप पाहण्याची प्रतिभा त्यांच्या ठायी होती. 'सुंदर मी होणार' ही करुणार्त भाव व्यक्त करणारी त्यांची शेवटची कविता. त्यांचा काव्यरचनाकाल दोन खंडांत विभागला गेला आहे (१८९०–१९०९ आणि १९१७–२६). कवी विनायक, स्वातंत्र्यवीर सावरकर यांच्या परंपरेतील व राष्ट्रीय कवितेचा प्रवाह समृद्ध करणारे हे कवी होत. यांना यामुळे स्वातंत्र्यशाहीर असे संबोधले जाते.

विजया देव

**संदर्भ :** 'कै. गोविंद त्र्यंबक दरेकर ऊर्फ नासिक येथील स्वातंत्र्यशाहीर कवी गोविंद यांची कविता', संपादक, कृ. ब. महाबळ, सन १९२९.

**० दादा महाराज :** पहा साखरे, विनायक लक्ष्मण

**दामले, कृष्णाजी केशव : ० केशवसुत :** (ज. १५ मार्च, १८६६, मालगुंड, जि. रत्नागिरी–मृ. ७ नोव्हेंबर, १९०५, हुबळी). केशवसुत. आधुनिक मराठी काव्याचे प्रवर्तक, एक श्रेष्ठ कवी. रत्नागिरी जिल्ह्यातील मालगुंड खेड्यात त्यांचा जन्म झाला. सुप्रसिद्ध शास्त्रीय व्याकरणकार मोरो केशव व पुण्याचे सीताराम केशव हे त्यांचे बंधु होत. केशवसुतांचे वडील सरकारी शाळाखात्यात होते. त्यांचे प्राथमिक शिक्षण वडिलांच्या देखरेखीखाली झाले. १८८९ मध्ये ते मॅट्रीकची परीक्षा उत्तीर्ण झाले.

१८८५ मध्ये त्यांनी काव्यलेखनास प्रारंभ केला. केवळ ३९ वर्षांच्या आयुष्यातील, १७ वर्षांत १३२ कविता लिहून मराठी कवितेत मानाचे स्थान मिळविले. काव्यलेखनासाठी 'केशवसुत' हे नाव कवीने स्वतः धारण केले नव्हते, तर त्यापूर्वी 'कुणीतरी', 'एक मित्र', 'जगन्मित्र' अशासारख्या टोपण नावांनी ते कविता लिहीत. मात्र 'काव्यरत्नावली'कारांनी त्यांना 'केशवसुत' हे नाव बहाल करून ते प्रचारात आणले.

केशवसुतांचा मुख्य रचनाकाल १८८५ ते १९०५ हा होय. नागपूर येथे असताना रेव्ह. टिळक व वासुदेव बळवंत पटवर्धन (कवी वसंत) यांचा सहवास त्यांना लाभला. काव्यनिर्मिती हे त्यांचे जीवनध्येयच असल्याने, स्वाभाविकपणेच त्यांनी काव्यरचनेच्या नवनव्या वाटा चोखाळल्या. या प्रयत्नात प्रारंभीच्या संस्कृत काव्याचा आदर्श मागे पडला व पूर्वकालीन मराठी काव्यही प्रभावशून्य ठरले. इंग्रजीतील स्वच्छंदतावादी मनोवृत्तीच्या वर्डस्वर्थ, शेली आणि कीट्‌स् यांसारख्या कवींचे काव्य, त्यांना प्रेरक व अनुकरणीय वाटले. त्या काव्याच्या चिंतन-मननातून केशवसुतांनी आत्मलेखनात्मक स्फुट भावकविता लिहिली व मराठी कवितेला इंग्रजी काव्यातील आत्माविष्काराचे नवे व क्रांतिकारक वळण लावले.

केशवसुतांच्या काव्यात व्यक्तिगत स्नेहसंबंध, कवी व कवित्व, स्त्री-पुरुष प्रेम, निसर्ग, सामाजिक बंडखोरी व गूढ (साक्षात्कारी) अनुभूती अशा विविध विषयांवरील भावानुभावांचा आविष्कार आढळतो. एका दृष्टीने 'स्वच्छंदतावादी' मनोवृत्तीचाच विविध रूपांनी झालेला हा आविष्कार आहे. ह्या मनोवृत्तीचा आविष्कार मराठी काव्यक्षेत्रात निश्चितच क्रांतिकारक ठरला. म्हणूनच केशवसुतांच्या संख्येने अल्प असलेल्या प्रत्येक प्रकारच्या काव्यरचनेला नंतरच्या काळात स्वतंत्र परंपरा लाभू शकली. नवीन काव्याबरोबरच काव्यविषयक नवा दृष्टिकोन व नवी अभिरुची निर्माण करण्याची जबाबदारी नव्या कवींवर पडते. केशवसुतांनी अशा जबाबदारीने लिहिलेल्या कवितांमध्ये *स्फूर्ति*, *कवितेचे प्रयोजन*, *आम्ही कोण* आणि *प्रतिभा* या कविता महत्त्वाच्या आहेत. व्यापक मानवी जीवनाच्या संदर्भात कवी व कवित्व यांच्या कार्याची आदर्शवादी भूमिका केशवसुतांनी मांडलेली असल्यामुळे त्या

भूमिकेत चिरंतन प्रेरकता आणवते. त्यांच्या निसर्गविषयक कवितांवर वर्ड्स्वर्थ व एमर्सन यांच्या विचारांचा परिणाम झालेला दिसतो. *भृंग*, *पुष्पाप्रत*, *फुलपाखरू* या त्यांच्या काही महत्त्वाच्या निसर्गकविता होत.

प्रेमविषयक आत्मनिवेदन करणाऱ्या कविताही केशवसुतांनी लिहिल्या. क्रांतिकारक सामाजिक विचार ओजस्वीपणे व्यक्त करणाऱ्या त्यांच्या प्रसिद्ध कविता म्हणजे *तुतारी*, *नवा शिपाई*, *गोफण केली छान* या होत. त्यांच्या सामाजिक विचारसरणीची मुख्य तत्त्वे स्वातंत्र्य, समता व बंधुभाव तसेच विशाल मानवतावाद ही होत. विशेष म्हणजे पृथ्वीला 'सुरलोकसाम्य' प्राप्त करून देण्याचे एक महान स्वप्न त्यांच्या क्रांतदर्शी प्रतिभेने पाहिले होते. त्याचाही निर्देश त्यांच्या काही कवितांतून आढळतो. गूढ अनुभूती व तिची नावीन्यपूर्ण अभिव्यक्ती असलेली *झपूर्झा* ही त्यांची कविता विशेष गाजली. त्यांच्या अन्य गूढ गुंजनात्मक कवितांत *म्हातारी* व *हरपले श्रेय* यांचा समावेश होतो. शैलीच्या दृष्टीने केशवसुतांच्या काव्यात लालित्य कमी आहे. पण काहीशी राकट आणि रांगडी अभिव्यक्ती त्यांच्या काव्यप्रकृतीशी सुसंगत ठरते.

केशवसुतांनी काव्याच्या बाह्यांगातही परिवर्तन घडवून आणले. काव्याची खरी प्रकृती कथानकाची व वर्णनाची नसून आत्मलेखनाची आहे; असे आत्मलेखन एकेका उत्कट अनुभूतीचे असते व म्हणून ते स्फुट स्वरूपाचे ठरते; अशा स्फुट आविष्कारांसाठी गणवृत्तापेक्षा मात्रावृत्तेच अधिक अनुकूल असतात, हे सर्व त्यांनी दाखवून दिले. इंग्रजी काव्यातील छंदप्रकार त्यांनी मराठीत प्रथम रूढ केला. शिवाय काही मात्रावृत्तेही (नवीन) त्यांनी प्रचलित केली. केशवसुतांचा काव्यसंग्रह त्यांच्या मृत्यूनंतर हरि नारायण आपटे यांनी १९१६ मध्ये प्रकाशित केला. बालकवी, गोविन्दाग्रज, रेंदाळकर, सोनाळकर, काव्यविहारी यासारखे कवी स्वतःला केशवसुतांचे शिष्य म्हणवून घेत. 'तुतारीमंडळ' या नावाने एक मंडळही स्थापन झाले होते.

केशवसुतांनंतरच्या नव्वद-शंभर वर्षांत आधुनिक मराठी काव्यात कितीतरी परिवर्तने व प्रयोग झाले. तथापि केशवसुतांच्या काव्याची प्रेरकता व महत्त्व ही कायमच राहिली किंबहुना दिवसेंदिवस ती वृद्धिंगतच होत आहे. हे भाग्य आधुनिक कवींत केशवसुतांइतके अन्य कोणाच्या वाट्याला आल्याचे आढळत नाही.

कमलेश

संदर्भ : (१) 'केशवसुत आणि त्यांची कविता', न. श. रहाळकर, १९१९. (२) 'केशवसुत : काव्यदर्शन', रा. श्री. जोग-१९४७. (३) 'केशवसुत', म. श्री. पंडित. (४) 'केशवसुतांची कविता', ग. त्र्यं. माडखोलकर, (आधुनिक कविपंचक). (५) 'केशवसुत स्मृतिग्रंथ'. (६) 'केशवसुतांची काव्यदृष्टी', दि. के. बेडेकर. (७) 'केशवसुत गाऊन गेले', संपा. वसंत दावतर.

**दामले, मोरो केशव** : (ज. ७ नोव्हेंबर, १८६८, मालगुंड – मृ. ३० एप्रिल, १९१३). सुप्रसिद्ध मराठी व्याकरणकार व निबंधकार. जन्मगाव रत्नागिरीनजीक मालगुंड. वडील केसो विठ्ठल हे प्राथमिक शिक्षक व पुढे रा. सा. मंडलिक यांच्या वेळणे या गावच्या शेतीचे कारभारी. प्रसिद्ध कवी केशवसुत व पत्रकार सी. के. दामले हे मोरो केशवांचे बंधू. मोरो केशवांचे शालेय शिक्षण दाभोळ, बडोदे व अमरावती येथे तर उच्च शिक्षण पुण्याच्या डेक्कन कॉलेजात झाले. १८९२ मध्ये बी.ए. व १८९४ मध्ये इतिहास व तत्त्वज्ञान हा विषय घेऊन ते मुंबई विश्वविद्यालयाचे एम्.ए. झाले. १८९४ ते १९०७ पर्यंत उज्जैन येथील 'माधव कॉलेजा'त यांनी लॉजिक व फिलॉसफी या विषयांचे अध्यापक म्हणून काम पाहिले. १९०८ साली नागपूर येथील 'सिटी स्कूल'वरील सरकारी जागा पत्करिली. १९१३ साली नागपूरहून पुण्यास येत असताना वाटेत रेल्वेच्या अपघातात त्यांचा अंत झाला.

*शास्त्रीय मराठी व्याकरण* (१९११) हा आपला ९९० पृष्ठांचा ग्रंथ त्यांनी रचला व मराठी व्याकरणकारांत अग्रस्थान मिळविले. १९०४ मध्ये भरलेल्या शुद्धलेखन परिषदेत त्यांनी भाग घेतला होता. त्यांची यासंबंधीची सडेतोड मते *शुद्धलेखन सुधारणा अथवा सरकारी धंदावा* (१९०५) या पुस्तकात वाचावयास मिळतात. 'ग्रंथमाला' या मासिकात ते प्रदीर्घ लेख लिहीत. त्यांतून त्यांची *विचारभ्रमण* आणि *आधुनिक असंतोष* (एडमंड बर्ककृत प्रेझेंट डिसकंटेन्टचे भाषांतर) ही पुस्तके तयार झाली. *न्यायशास्त्र निगमन* (१८९६) व *न्यायशास्त्र पुस्तक दुसरे* (निगमन) (१९०२), ही त्यांची तर्कशास्त्रावरील पुस्तके बडोदे सरकारने प्रसिद्ध केली होती.

कमलेश

**दामले, सीताराम केशव** : (ज. १८७८, खेड, जि. रत्नागिरी – मृ. १९२७, पुणे). वृत्तपत्रकार व कादंबरी लेखक. प्रसिद्ध कवी केशवसुत व व्याकरणकार मोरो केशव दामले यांचे बंधू. मुंबई येथे बी.ए., एल्एल्.बी. काही दिवस फर्ग्युसन कॉलेजमध्ये त्यांनी प्रोफेसर म्हणून काम केले; तर काही दिवस 'ज्ञानप्रकाश'चे संपादक म्हणून. नंतर ते राष्ट्रीय पक्षास मिळाले. लोकमान्य टिळकांच्या आग्रहास्तव 'राष्ट्रमता'ची जबाबदारी सीतारामपंतांनी (१९०८) उचलली. पण हे दैनिक अल्पायुषी (दोन वर्षे) ठरले.

*टॉमस कार्लाईल* (१९०३), *वाचाळरावाचे विचित्र अनुभव* (१९१२), *जग हे विविध आहे* (१९१३), *न्याय की अन्याय* (१९१५), *दोनशे वर्षांपूर्वी* (१९१७), *तुरुंगाचे कोठडीतून* (१९२३), *महात्मा गांधी* (१९२४), *वसईचा रणसंग्राम* (१९२५), *सभा, अध्यक्ष व सभासद* (१९२७), *घरचा कायदा* (१९२७) हे सीतारामपंतांचे वाङ्मय.

*राष्ट्रोदय* नावाचे मासिक ते काढत असत. त्यांचे बरेचसे वाङ्मय चित्रमयजगत' या मासिकात प्रसिद्ध झाले आहे. 'महायुद्धाची स्थित्यंतरे' या सदराखाली 'चित्रमयजगत'मध्ये येणारे त्यांचे लेख, त्या काळी बरेच गाजले.

१९१८ साली पुण्यास *राजकारण* हे साप्ताहिक त्यांनी सुरू केले. असहकारितेच्या चळवळीत या साप्ताहिकाने चांगलीच कामगिरी बजावली. मुळशी सत्याग्रहात त्यांना कारावास भोगावा लागला व ते पत्र बंद पडले. शिक्षेमुळे झालेल्या श्रमांनी त्यांची प्रकृती त्यानंतर दिवसेंदिवस खालावत गेली व अखेर १९२७ साली पंडुरोगाने पुणे येथे ते निवर्तले.

कमलेश

० **दामोदर कवी** : पहा छत्रे, धीरेश्वर सदाशिव
० **दित्ज्यू** : पहा पटवर्धन, माधव त्र्यंबक
० **दिवाकर** : पहा गर्गे, शंकर काशिनाथ

**देव, केशव नारायण ऊर्फ पतितपावनदास** : (ज. वर्धा जिल्ह्यातील निगांव, अदमासे एकोणिसाव्या शतकाच्या अंतिम दशकात). लहानपण गरिबीत व संघर्षातच गेले. त्यांच्या घराण्यात खाजगी औषधोपचाराची परंपरा होती. सर्व जातीधर्मांचे लोक त्यासाठी त्यांच्याकडे येत असत. पण तरीही अस्पृश्यतेची बोच त्यांच्या मनाला डाचत राही.

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांबरोबर महाडच्या चवदार तळ्याच्या सत्याग्रहापासून ते बरोबर होते. नाशिकच्या काळाराम मंदिर सत्याग्रह कमिटीवर अध्यक्ष म्हणून त्यांची निवड झाली होती. डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी धर्मांतराची घोषणा येवला येथे केल्यावर, पतितपावनदास यांनी मुस्लिम धर्माचा स्वीकार केला.

जनजागृती घडविण्यासाठी त्यांनी *पतितपावन* हे पाक्षिक काढले. ते 'बहिष्कृत भारत'मधून लेखन करीत. त्यांनी *संत चोखामेळा* हे ओवीबद्ध चरित्र, *भारत भाग्योदय* (१९३०) हे नाटक, याशिवाय *जातिभेद विचार*, *अस्पृश्यता निवारक सत्याग्रह*, फटका, *अस्पृश्यता निवारक पंचपदी*, *जेल* ऊर्फ *यमपुरी* इ. संग्रह लिहिले.

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या सहवासाने पतितपावनदास यांना वास्तवतेचे एक वेगळेच भान आले होते. त्यांनी आयुष्यभर आपल्या जातिबांधवांच्या उद्धारासाठी संघर्ष केला, लेखणी झिजविली.

लता जाधव

**देशपांडे, गंगाधर केशव ऊर्फ बाबासाहेब :** (ज. ८ जुलै, १८६९, एदलाबाद, पूर्व खानदेश – मृ. ३० मार्च, १९४७, पुणे). इतिहासाभ्यासक, संशोधक. शिक्षण पुणे येथे. मॅट्रिक (१८९२). ११० व्या मराठा फलटणीत व नंतर पोलिस खात्यात नोकरी. शेवटी हिंदुस्थान सरकारच्या गुप्तहेरखात्यात अधिकारी. मराठ्यांचा इतिहास, शिवाजी महाराज, समर्थ रामदास यांचे कार्य; या अभ्यासाला त्यांनी पूर्णपणे वाहून घेतले. *श्री सज्जनगड* (१९४३), हे ह्यांचे एकमेव मराठी पुस्तक. याशिवाय *डिलिव्हरन्स ऑर द एस्केप ऑफ शिवाजी द ग्रेट* (१९२९) आणि *इंडिया ऑज सीन अँण्ड नोन बाय फॉरेनर्स* ही यांची इंग्रजी पुस्तकेही प्रसिद्ध आहेत.

ग. दे. खानोलकर, के. ए. पोतदार

**देशपांडे, गंगाधर बाळकृष्ण :** ० गंगाधरराव देशपांडे : (ज. १२ एप्रिल, १८७० – मृ. ३० ऑगस्ट, १९६०). पुणे व मुंबई येथे कॉलेज-शिक्षण. एलएल.बी. नंतर बेळगावास वकिली.

गंगाधरराव देशपांडे हे कर्नाटकातील कॉंग्रेसचे नेते होते. यांना 'कर्नाटक सिंह' असे संबोधले जात असे. १९०४-०५ पासून पुढील पंधरा वर्षे म्हणजे टिळकांच्या मृत्यूपर्यंत, राष्ट्रीय राजकारणात ते महाराष्ट्र व कर्नाटक या दोन प्रांतांबाबत ते टिळकांचा उजवा हात होते. कर्नाटक आणि महाराष्ट्र या उभयतांतील एक महत्त्वाचा दुवा या दृष्टीनेही देशपांडे यांच्या कर्तृत्वाला महत्त्व आहे. पुढे त्यांनी महात्माजींच्या नेतृत्वाखाली देशकार्य केले. आपल्या या साऱ्या अनुभवांचे चित्रण त्यांनी *माझी जीवनयात्रा* (१९६०) ह्या आठवणीवजा आत्मचरित्रातून केले आहे. या ग्रंथाने टिळकयुग व गांधीयुग या कालातील राजकारणावर चांगला प्रकाश पडतो.

पां. बा. गाडगीळ, के. ए. पोतदार

**देशपांडे, वाग्भट नारायण :** (ज. १८९२ – मृ. ९ मे, १९३६ सातारा). कथाकार व समीक्षक. शिक्षण सातारा, पुणे व मुंबई येथे. बी.ए., एलएल.बी. सातारा येथे वकिलीचा व्यवसाय. अपघाती मृत्यूपूर्वी सहा महिने औंध संस्थानचे दिवाण.

कॉलेजमध्ये असताना त्यांनी लेखनाला सुरुवात केली. गिरजाबाई केळकरांच्या 'पुरुषांचे बंड' ह्या नाटकावरील त्यांचा टीकालेख त्यावेळी बराच गाजला होता. साताऱ्याला 'ऐक्य' नावाचे एक वर्तमानपत्रही त्यांनी काही काळ चालविले. 'कै. हरिभाऊ यांच्या आठवणी व सामाजिक कादंबऱ्या' (१९२४), हा हरि नारायण आपटे ह्यांच्या आठवणी प्रथमच प्रसिद्ध करणारा टीकात्मक निबंध आणि *सुखस्वप्ने* (१९२८) व *दीपावली* (१९३३) हे दोन कथासंग्रह ही त्यांची प्रकाशित पुस्तके. आपल्या टीकात्मक निबंधात त्यांनी हरिभाऊंच्या फक्त सामाजिक कादंबऱ्यांचाच विचार केला आहे. केवळ मनोरंजन हा हरिभाऊंचा लेखनहेतू नसून समाजाला शिक्षण देणे, त्यांच्यासमोर विशिष्ट ध्येय ठेवून त्याला इष्ट वळण लावणे ही हरिभाऊंची भूमिका होती; हे देशपांडे ह्यांनी साधार दाखवून दिले आहे. 'गेल्या पंचवीस वर्षांतील नाटके, त्यांचे गुणदोष व त्यांच्या प्रगतीचे उपाय' (विविध ज्ञान विस्तार, १९२५), हा त्यांचा टीकालेखही उल्लेखनीय आहे.

त्यांच्या वरील दोन कथासंग्रहांत एकूण अकरा गोष्टींचा समावेश आहे. त्यांच्या लेखनावर हरिभाऊंच्या ध्येयदृष्टीचा प्रभाव पडलेला दिसतो. उच्च शिक्षणाने सुविद्य व सुसंस्कृत झालेल्या तत्कालीन मध्यमवर्गीय तरुणांची स्वप्ने व त्यांचा ध्येयवाद यांचे दर्शन त्यांच्या कथांतून घडते.

उषा टाकळकर, अ. अ. वडोदकर

**देशपांडे, वामन नानाजी :** (ज. १८३८, अष्टी, जि. अहमदनगर – मृ. १८८७). कवी. सिन्नर येथे वास्तव्य. त्यांचे मृत्यूनंतर त्यांचे चिरंजीव वे. शा. सं. श्रीधरशास्त्री ह्यांनी इ. सन १९१६ मध्ये वामनरावांचा *काव्यकोश* हा ग्रंथ प्रसिद्ध केला. या ग्रंथात 'भजनमाला', 'श्रीमौनीस्वामी चरित्र', 'श्रीसिद्ध बोधानुवाद', 'स्वरूपज्ञानादर्श' (अपूर्ण), 'श्रीरामगीता टीका', 'श्रुतिस्तुती', 'षट्पदी स्तोत्र', 'निर्गुण परापूजा' या आठ काव्यांचा समावेश आहे.

'भजनमाले'त भक्तिमार्ग स्पष्ट केला आहे. 'श्रीमौनीनाथ चरित्रा'त सत्कर्मांचा कर्ममार्ग सांगितला आहे. 'सिद्धबोधानुवादा'त ज्ञानमार्गाचे प्रतिपादन आहे. 'श्रीरामगीता' हे रामगीतेने प्राकृत भाषांतर आहे. 'श्रुतिस्तवना'त भागवताचे भाषांतर आहे. 'षट्पदी' हे श्रीशंकराचार्यांच्या षट्पदीस्तोत्राचे मराठी भाषांतर असून, 'परापूजे'त उपदेशांचे श्लोकात्मक वर्णन आहे.

मंजिरी बेडेकर, गोविंद भिडे

**देशपांडे, शंकर वामन :** (ज. १० ऑक्टोबर, १९०० – मृ. २५ मे, १९५३). कम्युनिस्ट वृत्तपत्रांचे संपादक व मार्क्सवादी ग्रंथांचे अनुवादक. १९१७ साली मॅट्रिक परीक्षेत पहिले आले होते. बी.ए. होताच गांधीजींच्या असहकार आंदोलनात उडी. १९२१ ते १९२४ मुंबईच्या राष्ट्रीय विद्यालयात अध्यापक. 'नवाकाळ' दैनिकात उपसंपादक (१९२४–२९) व १९२९ पासून कम्युनिस्ट मुखपत्र 'क्रांती'चे संपादक. कामगार वाङ्मयप्रसारक मंडळाची स्थापना (१९३१). १९३४ मध्ये 'युगांतर' या कम्युनिस्ट मुखपत्राची स्थापना. कम्युनिस्ट मुखपत्रांमध्ये सातत्याने लेखन. या पत्रांच्या संपादकवर्गात ते प्रमुख होते.

त्यांनी अनुवादित केलेले *कम्युनिस्ट जाहीरनामा*, *मोल-मजुरी भांडवल* (मार्क्स), *समाजवाद : कल्पनारम्य आणि शास्त्रीय* (अंगल्स), *मार्क्सवादाचे तीन मूलस्रोत आणि तीन घटक* (लेनीन), *लेनिनवादाची मूलतत्त्वे* (स्टॅलिन – १९४४), *समाजविकासाचा मूलभूत नियम* (स्टॅलिन-१९४९), *बोल्शेव्हिक पार्टीचा इतिहास* (१९४३ सोविएत युनियन कम्युनिस्ट), *अंतर्विरोध* (माओ-त्से-तुंग), *आमचा भारत* (रजनी पाम दत्त) इत्यादी विवेचक ग्रंथ व *आई* (मॅक्सिम गोर्की) ही अनुवादित कादंबरी प्रसिद्ध.

याशिवाय त्यांचे *तिरंगी तारस्वाद* व *देशभक्तीची कसोटी* हे दोन स्वतंत्र टीकालेखांचे संग्रह व अनेक पुस्तिका प्रसिद्ध आहेत. मार्क्सवादी प्रमुख प्रमाण ग्रंथांचा सुबोध मराठीत अनुवाद करून, त्यांनी शास्त्रीय-समाजवादी विचारांची सर्वसाधारण वाचकांना ओळख करून दिली. भारतातील आणि महाराष्ट्रातील राजकीय घटनांसंबंधी मार्मिक व शैलीदार विवेचन त्यांच्या वृत्तपत्रीय लेखनातून आढळते.

यांचे प्रमुख ग्रंथ खालीलप्रमाणे :

(१) अनु. सोविएत युनियन कम्युनिस्ट पार्टीचा इतिहास (बोल्शेविक), भाग १ ला, २, ३, ४ १९४९ (आ. २ री– (२) सोविएत संघराज्यातील आर्थिक प्रश्न, १९५२ (३) अनु. सोविएत राज्याची २५ वर्षे (मूळ लेखक एम मितिन) (४) समाज-सत्तावाद, १९४९ (फ्रेडरिक एंगल्सकृत Socialism and Scientific या ग्रंथाचा अनुवाद). (५) देशभक्तीची कसोटी, १९४४–लोकयुद्ध साप्ताहिकात 'लाल दुर्बिणीतून' या सदरात आलेल्या काही राजकीय-निवडक टीकालेखांचा संग्रह. (६) लेनिनवादाची मूलतत्त्वे १९४४ (जोसेफ स्टालिनकृत लेनिनवादाची व्याख्या, मार्क्सची शिकवणूक व लेनिनची शिकवणूक यांचा परस्पर-संबंध, लेनिनने मार्क्सवादात कोणती भर घातली इ. व्याख्याने) (७) समाजविकासाचे मूलभूत नियम, १९४९ (स्तालिनकृत ग्रंथाचा अनुवाद, गत्यात्मक व ऐतिहासिक, भौतिकवाद).

म. ना. लोही

**देशपांडे, सूर्याजी आनंदराव :** (ज. १८२८, मंगेशी, गोवे – मृ. १८८८, पणजी, गोवे). मराठी-पोर्तुगीज कोशाचे कर्ते व व्याकरणकार. बेळगावच्या ऐतिहासिक देशपांडे घराण्यात जन्म. गोव्यातील मंगेशी येथे वास्तव्य. प्रारंभीचे शिक्षण पोर्तुगीज शाळेत. त्यानंतर गोव्यातील वाघ नामक बहुभाषा-पंडिताजवळ अध्ययन. १८४७ पासून मराठीचे अध्यापक व सरकारी दुभाषी.

मराठीच्या अध्ययनास योग्य अशी दोन क्रमिक पुस्तके ह्यांनी लिहिली व गोवे सरकारने ती प्रकाशित केली. *मराठी-पोर्तुगीज व्याकरण* (१८७५), हा ह्यांचा ग्रंथही पोर्तुगीज सरकारने प्रकाशित केला व त्याच वेळी *मराठी-पोर्तुगीज कोश* तयार करण्यास प्रारंभ करून, पंधरा वर्षांच्या परिश्रमाने तो सिद्ध केला. ह्या कोशात कोकणी शब्दांसह ५३,००० शब्दांचा समावेश असून त्याचे दोन भाग आहेत. पहिल्या भागाचे मुद्रण व प्रकाशन गोवे सरकारने केले. ह्या कामगिरीबद्दल सूर्याजीरावांना 'सोसियेदाद द जेओग्राफि' ह्या पंडित सभेने व रॉयल ॲकॅडमी ऑफ सायन्स'ने सन्माननीय सभासदत्व दिले. एका हिंदु विद्वानाचा पोर्तुगीज सरकारने केलेला हा पहिलाच गौरव होय.

ग. दे. खानोलकर, लीना रस्तोगी

**देशमुख, काशीराव बापूजी :** (ज. १८६० – मृ. २६ ऑक्टोबर, १९४३). ज्ञाति-इतिहास आणि समाजशास्त्रीय विषयांचे लेखक. शिरसगाव-बंड येथील वतनदार देशमुख घराण्यात जन्म. नायब तहसीलदार पदावरून १९१४ साली निवृत्त झाल्यानंतर, यांनी उमरावती येथे 'सुबोध ग्रंथमाला' काढली व ग्रंथ लिहून कनिष्ठ वर्गावर होणाऱ्या अन्यायाला वाचा फोडली. ह्यांनी बहुजनसमाजाचा स्वाभिमान जागृत करण्याच्या हेतूने *क्षत्रियांची वेदोक्त भावणी* (१९२०), *क्षत्रिय वैश्यांचा ब्राह्मणांशी सामना* (१९२२), *व्याख्यान रत्नमाला* (१९२३) इत्यादी पुस्तके लिहून ती वरील ग्रंथमालेतून प्रसिद्ध केली. *क्षत्रियांचा इतिहास* (१९२७) हा कोशप्राय ग्रंथ ही यांची अत्यंत महत्त्वाची वाङ्मयीन कामगिरी. ह्याच ग्रंथाची सुधारित आवृत्ती *क्षत्रियांचा इतिहास*, भाग पहिला (१९२९) व भाग दुसरा (१९३०) या नावाने स्वतंत्रपणे प्रसिद्ध झाली. पहिल्या भागात क्षत्रियांचा वेदकालापासूनचा धार्मिक, सामाजिक व राजकीय इतिहास आलेला असून, दुसऱ्या भागात क्षत्रियांतील पोटजातींचे मूळ वंश, गोत्रे, कुळे, कुलाचार, उपनामे, विधी व संस्कार याविषयीची माहिती आली आहे. या ग्रंथाखेरीज *क्षत्रिय कुलवंशप्रदीप* (१९२७), *मराठा क्षत्रियांचा इतिहास* (दु. आ. १९२९), असे त्यांचे आणखीही काही ग्रंथलेखन आहे. हिंदुसमाजव्यवस्थेतील विसंगती जाणून घेऊन त्या जाणिवेतून सुरू झालेल्या सामाजिक संघर्षाचे प्रमाणित प्रतिबिंब देशमुखांच्या लेखनातून पडलेले दिसते. महात्मा फुले, छत्रपती शाहू ही ह्यांची प्रमुख प्रेरणास्थाने.

हरिश्चंद्र थोरात, लीना रस्तोगी

**देशमुख, केशवराव रघुनाथ :** (ज. ९ जानेवारी, १८७७ – मृ. २७ एप्रिल, १९४२, पुणे). ज्ञानेश्वरी प्रवचनकार व संतकाव्याचे अनुवादक. 'लोकहितवादी' गोपाळराव हरी देशमुख यांचे हे नातू. मुंबईच्या विल्सन कॉलेजमधून बी.ए., एम्.ए. (मराठी). 'विष्णुबुवा जोग' ह्या परमभागवत अशा ज्ञानेश्वरभक्ताचा सहवास लाभल्याने पारमार्थिक जीवनाकडे चित्त वेधले. १९१७ पासून ते दररोज घरीच, नित्यनेमाने ज्ञानेश्वरीचे निरूपण करू लागले. नारदभक्तिसूत्रे, हरिपाठ, अनुभवामृत, चांगदेवपासष्टी, तुकारामाचे अभंग ह्यांचेही प्रसंगोपात्त विवेचन ते करीत. त्यांनी 'ज्ञानेश्वरी', 'हरिपाठ', 'चांगदेवपासष्टी', 'नारदभक्तिसूत्रे' ह्यांचे सुलभ अनुवाद केले होते. ते त्यांच्या मृत्यूनंतर त्यांच्या चाहत्यांनी प्रसिद्ध केले. यातील ज्ञानेश्वरीविषयक विवेचनावर आधारलेला *ज्ञानेश्वरीचे सुलभ गद्यरूपांतर* (भाग १ ते ३) हा ग्रंथ १९६१ साली प्रसिद्ध झाला. अमृतानुभवाचे गद्य रूपांतर अद्यापि प्रसिद्ध झालेले नाही.

ग. दे. खानोलकर, लीना रस्तोगी

**देशमुख, (सरदार) गोपाळ हरि : ० लोकहितवादी ० एक** ब्राम्हण : (ज. १८ फेब्रुवारी, १८२३, पुणे – मृ. ९ ऑक्टोबर, १८९२, पुणे). अव्वल इंग्रजी काळात समाजोपयोगी विविध विषयांवर ग्रंथनिर्मिती करणारे एक थोर सुधारणावादी लेखक व विचारवंत. १८४१ ते १८४४ पर्यंत इंग्रजी शिक्षण घेतल्यानंतर 'ट्रान्सलेटर' म्हणून नियुक्ती. त्यानंतर 'सदर अदालती'ची मुन्सफीची परीक्षा उत्तीर्ण झाल्यानंतर १८६२ पासून मुंबई सरकारच्या न्यायखात्यात न्यायाधीश म्हणून अहमदाबाद, नाशिक, सातारा येथे काम केले. 'रावबहादुर' व 'जस्टिस ऑफ पीस' (जे. पी.) या पदव्यांनी सन्मानित. मुंबई विद्यापीठाचे फेलो (१८७८) व मुंबई कायदे कौन्सिलचे सभासद (१८८०). 'फर्स्ट क्लास सरदार' (१८८१) म्हणून मान्यता. लोकहितवादींना ग्रंथसंग्रहाची व वाचनाची विलक्षण आवड होती. इतिहास हा त्यांचा आवडीचा विषय. रेव्ह. जी. आर. ग्लीन ह्यांच्या' हिस्टरी ऑफ द ब्रिटिश एम्पायर इन इंडिया' या पुस्तकाच्या आधारे लिहिलेले *हिंदुस्थानचा इतिहास–पूर्वार्ध* (लेखन, १८४२; प्रकाशन, १८७८) हे त्यांचे पहिले पुस्तक, त्यांनी वयाच्या एकोणिसाव्या वर्षी लिहिले. त्यांना मराठी, संस्कृत, गुजराती, फार्सी, इंग्रजी इत्यादी भाषा चांगल्या अवगत होत्या. इंग्रजी व गुजराती या भाषांत ते सहज लेखन करीत. मुंबईहून निघणाऱ्या 'प्रभाकर' (संपा. भाऊ महाजन) साप्ताहिकात (१२ मार्च, १८४८) 'इंग्लिश लोकांच्या व्यक्तिमात्राच्या गैरसमजुतीविषयी' हा छोटा निबंध 'लोकहितवादी' या टोपण नावाने प्रसिद्ध झाला. पुण्याचे 'ज्ञानप्रकाश साप्ताहिक' हे १२ फेब्रुवारी, १८४९ पासून निघू लागले. त्याचे जनक गोपाळराव हेच होते. हिंदू समाजाच्या सुधारणेविषयी विचार व्यक्त करण्यासाठी १८४८–१८५० ह्या दोन वर्षांच्या काळात, गोपाळरावांनी 'प्रभाकर' साप्ताहिकाचा चांगलाच उपयोग करून घेतला. त्यातून त्यांनी शंभर पत्रे लिहिली. *शतपत्रांचा इत्यर्थ* या पत्रातून या सुधारक विचारांच्या लेखनामागील हेतू त्यांनी स्पष्ट केला. मुळात ही पत्रे शंभर नसून एकशे आठ आहेत. 'संस्कृतविद्या', 'पुनर्विवाह', 'पंडितांची योग्यता', 'खरा धर्म करण्याची आवश्यकता', 'पुनर्विवाह वगैरे सुधारणा' इत्यादी आठ पत्रे पुढे त्यांनी लिहिली. पुढे ही पत्रे आणि 'इंदुप्रकाश', 'ज्ञानप्रकाश' ह्यात १८६५ पर्यंत प्रसिद्ध झालेली पत्रे, अहमदनगर येथील 'वृत्तवैभव'च्या मालकांनी 'लोकहितवादीकृत निबंधसंग्रह (प्रथमांश)' या नावाने १८६६ मध्ये प्रकाशित केली. यात सुमारे १,१०० पृष्ठांचा मजकूर आहे. त्यांच्या भाषण व लेखनामुळे महाराष्ट्र व गुजरात या प्रांतांतील सुधारणाविषयक चळवळींना चालना व प्रेरणा मिळाली. गुजरातेत सुमारे बारा वर्षे त्यांनी वैचारिक उद्बोधनाचे काम केले. मराठीप्रमाणेच त्यांनी गुजराती भाषेतही लेखन केले आहे. गुजरातमधील अनेक सामाजिक व अन्य संस्थांचे ते पदाधिकारी होते. महाराष्ट्र आणि गुजरात यांच्यातील समाजसुधारणाविषयक आंदोलनांना जोडणारा लोकहितवादी हा महत्त्वाचा आरंभीचा दुवा होय.

त्यांनी लहानमोठी अशी छत्तीस पुस्तके लिहिली. त्यांचे (१) इतिहास, (२) चरित्रे, (३) धार्मिक-नैतिक, (४) राज्यशास्त्र-अर्थशास्त्र, (५) समाजचिंतन, (६) संकीर्ण असे स्थूलमानाने सहा भाग पडतात. त्यांतील पुस्तके अशी :–

(१) इतिहास : *भरतखंडपर्व* (हिंदुस्थानचा संक्षिप्त इतिहास, १८५१); (२) *पाणिपतची लढाई* (काशिराज पंडित यांच्या फार्शी ग्रंथाच्या इंग्रजी भाषांतराचा तर्जुमा, १८७७); *ऐतिहासिक गोष्टी भाग १* (१८७७), *भाग २* (१८७८), *भाग ३* (१८८०);

*हिंदुस्थानचा इतिहास* (पूर्वार्ध) (१८७८); *गुजरात देशाचा इतिहास* (१८८१); *लंकेचा इतिहास* (१८८८); *सुराष्ट्र देशाचा ससाक्ष इतिहास* (गुजरातीवरून अनुवादित, १८९१); *उदेपूरचा इतिहास* (कर्नल टॉडच्या 'ॲनल्स ऑफ राजस्थान'चे भाषांतर, १८९३).

(२) **चरित्रे :** *पृथ्वीराज चव्हाण याचा इतिहास* (चंदवरदाई याच्या 'पृथ्वीराज रासो' ह्या काव्याच्या आधारे लिहिलेले, १८८३); *पंडित स्वामी श्रीमद्दयानंद सरस्वती* (१८८३).

(३) **धार्मिक-नैतिक :** *खोटी साक्ष व खोटी शपथ यांचा निषेध* (१८५९); *गीतातत्त्व* (१८७८); *सुभाषित अथवा सुबोध वचने* (संस्कृत ग्रंथांतील सुभाषितांचे भाषांतर, १८७८); *स्वाध्याय*; *प्राचीन आर्यविद्येचा क्रम, विचार आणि परीक्षण* (१८८०); *अश्वलायन गृह्यसूत्र* (अनुवाद, १८८०); *आगमप्रकाश* (मूळ ग्रंथ गुजरातीत लिहिला. त्याचे भाषांतर रघुनाथजी ह्यांनी केले) (१८८४).

(४) **राज्यशास्त्र–अर्थशास्त्र :** *लक्ष्मीज्ञान* (क्रिफटच्या 'ट्रिटाइज ऑन पोलिटिकल इकॉनॉमी' ह्या पुस्तकावरून रूपांतरित, १८४९); *हिंदुस्थानात दरिद्रता येण्याची कारणे आणि त्याचा परिहार व व्यापाराविषयी विचार* (दादाभाई नौरोजी यांच्या 'पॉव्हर्टी इन् इंडिया' ह्या निबंधाच्या आधारे, १८७६); *स्थानिक स्वराज्य व्यवस्था* (१८८३); *ग्रामरचना, त्यातील व्यवस्था आणि त्यांची हल्लीची स्थिती* (१८८३); *स्वदेशी राज्ये व संस्थाने* (१८८३).

(५) **समाजचिंतन :** *जातिभेद* (१७८७); *भिक्षुक* (मुंबई आर्यसमाजात दिलेले व्याख्यान, १८७७); *प्राचीन आर्यविद्या व रीती* (१८७७); *कलियुग* (मुंबई आर्यसमाजातील व्याख्यान, १८७७); *निबंध संग्रह* (शतपत्रे व इतर निबंध, १८६६).

(६) **संकीर्ण :** *होळीविषयी उपदेश* (१८४७); *महाराष्ट्र देशातील कामगार लोकांशी संभाषण* (१८४८;) *सरकारचे चाकर आणि सुखवस्तू हिंदुस्थानातील साहेब लोकांशी संभाषण* (१८५०); *यंत्रज्ञान* ('इन्ट्रोडक्शन टु फिजिकल सायन्सेस' ह्या पुस्तकाचा अनुवाद, १८५०); *पदनामा* (फार्सी पुस्तकाचा अनुवाद, १८५०); *पुष्पवन* (शेख सादीच्या 'गुलिस्ताँ' तील आठव्या अध्यायाचा अनुवाद, १८५१); *शब्दालंकार* (१८५१).

या पुस्तकांखेरीज *विचारलहरी*, *एका दिवसात लिहिलेले पुस्तक*, *हिंदुस्थानातील बालविवाह*, *आत्मचरित्र* अशी काही पुस्तके लिहिल्याचे उल्लेख आढळतात. पण ती हस्तलिखिते उपलब्ध नाहीत. त्यांनी आबालवृद्ध जिज्ञासू स्त्री-पुरुषांच्या उपयोगार्थ 'लोकहितवादी' नावाचे एक डेमी आकाराचे वीस पृष्ठांचे (ऑक्टोबर १८८२) मासिक काढले. त्यामागे ज्ञानप्रसाराचा उद्देश होता. याशिवाय याच नावाचे त्रैमासिक (एप्रिल १८८३) ते चालवत व त्यातून ऐतिहासिक ग्रंथ प्रसिद्ध करीत. १८८७ मध्ये ही त्यांची नियतकालिके बंद पडली. स्वदेशाचा उद्धार, नवीन ज्ञान व गतिमान वैचारिक क्रांतीशिवाय होणार नाही असे त्यांना वाटे. विश्वबंधुत्व आणि मानवतावाद यांचे ते पुरस्कर्ते होते.

लोकहितवादी हे एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धातील, म्हणजे रानडेपूर्व पिढीतील हिंदुस्थानी अर्थशास्त्रज्ञ असून, मराठीतून लेखन करणारे पहिले अर्थशास्त्रज्ञ म्हणावे लागतील. त्यांनी *लक्ष्मीज्ञान* (१८४९) या ग्रंथातून ॲडम स्मिथप्रणित अर्थशास्त्र वाचकांसमोर आणले. ॲडम स्मिथच्या 'श्रमातून संपत्ती निर्माण होते' या विचारसूत्रातून, लोकहितवादींना दारिद्र्य निर्मूलनाची दिशा आकळली. ज्ञानाबरोबर तंत्रज्ञान व नानाविध उद्योग वाढावेत यांची त्यांना तळमळ वाटे. स्वदेशात विद्यावृद्धी होऊन स्वभाषेत नवे नवे ज्ञान प्रसारित झाल्याविना समाजाची प्रगती होणार नाही, जगातील इतर प्रगत राष्ट्रांच्या बरोबरीने स्थान मिळणार नाही, असे त्यांना तीव्रपणे वाटे.

ग. दे. खानोलकर, रमेश धानसे, मदन कुलकर्णी

संदर्भ : (१) 'लोकहितवादीकृत निबंधसंग्रह', संपा. अ. का. प्रियोळकर. (२) डॉ. सरोजनी वैद्य, 'गोपाळराव हरी'. (३) गोविंद तळवलकर, 'लोकहितवादी'. (४) डॉ. निर्मलकुमार फडकुले, 'लोकहितवादी : काल व कर्तृत्व'. (५) प्रा. गोवर्धन पारीख, 'लोकहिवादी'.

**देसाई (कोल्हटकर), गजानन त्र्यंबक :** (ज. १८९९, उमदी, –मृ. १७ सप्टेंबर, १९३०). कादंबरीकार. इंटरपर्यंतचे शिक्षण नागपूर येथे. पुण्याच्या फर्ग्युसन कॉलेजातून बी.ए. (१९२२).

ह्यांच्या *कारकून* (१९२५), *विभक्त की एकत्र* (१९२६) व *परावर्तन* (१९२९) ह्या तीन सामाजिक कादंबऱ्या प्रसिद्ध आहेत. *कारकून*मधून मुंबईतील कारकुनांची दयनीय अवस्था चित्रित करून, त्यातून सुटण्याच्या उपायांचे थोडे दिग्दर्शन ते करतात, तर *विभक्त की एकत्र* या कादंबरीतून भारतातील एकत्र कुटुंबपद्धती आज कितपत श्रेयस्कर आहे यासंबंधी विचार मांडतात. हिंदुधर्मप्रसार व पतित-परावर्तन हा *परावर्तन* या कादंबरीचा विषय आहे. या तिन्ही कादंबऱ्या त्यांनी सामाजिक प्रबोधनाच्या दृष्टीने लिहिलेल्या आहेत.

मीनल निसळ, मंजिरी बेडेकर

**देसाई, वामन गणेश :** (ज. १८७४, पुणे – मृ. २६ मे, १९२८, वांद्रे, मुंबई). आयुर्वेदीय औषधी या विषयाचे लेखक. शिक्षण पुणे व मुंबई येथे. एल्. एम्. ॲण्ड एस्. ही परीक्षा ग्रँट मेडिकल कॉलेजमधून उत्तीर्ण (१८९९). लंडन विश्वविद्यालयाचे बी.एस्सी. व एम्.बी.बी.एस्. वैद्यकीय व्यवसाय.

या व्यवसायातील अनुभवामुळे देशी औषधे व आयुर्वेद ह्यांच्या संशोधनाकडे लक्ष वेधून, देशी औषधींच्या गुणधर्मांचे सूक्ष्म अध्ययन यांनी केले. ह्या अध्ययनातूनच *औषधि-संग्रह* (हिंदुस्थानातील औषधी वनस्पतींची ओळख, त्यांचे गुणधर्म व उपयोग, १९२७) व *भारतीय रसशास्त्र* (एन्शन्ट केमिस्ट्री ऑफ इंडिया–१९२८), ह्या दोन महत्त्वाच्या ग्रंथांची निर्मिती झाली.

मंजिरी बेडेकर, म. ना. लोही

**देसाई, शांताराम अनंत :** (ज. १८६७, कुंभवडे, जि. रत्नागिरी – मृ. ५ मार्च, १९१४, इंदूर). नाटककार व नाट्यसमीक्षक. वसंत शांताराम देसाई यांचे हे वडील.

तत्त्वज्ञान, धर्म, नीती या विषयांचे लेखक. *विद्यार्थी* ह्या धर्म, तत्त्वज्ञानविषयक त्रैमासिकाचे संपादक. प्राथमिक व माध्यमिक शिक्षण कुंभवडे व रत्नागिरी आणि महाविद्यालयीन शिक्षण मुंबई व पुणे येथे. एम्.ए. (१८९३), एलूएल्.बी. (१८९५). इंदूरच्या होळकर कॉलेजात तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक.

ह्यांनी धर्म व तत्त्वज्ञान यांची चर्चा करणारे *विद्यार्थी* हे एक त्रैमासिक काढले होते. ते सात वर्षे (१९०७–१४) चालले. त्यातील सर्व लेख त्यांचे स्वतःचेच असत. भारतीय तत्त्वज्ञान व धर्म ह्यांचा परिचय करून देणारे, मराठीतील पहिलेच नियतकालिक म्हणून हे त्रैमासिक महत्त्वाचे आहे. *युरोपीय नीतिमीमांसेचा संक्षिप्त इतिहास–भाग १* (१९०६), हा 'प्राच्य ज्ञानमार्ग व पाश्चात्त्य ज्ञानमार्ग' 'पदार्थविज्ञानशास्त्र विरुद्ध ख्रिस्ती धर्म' 'ब्राह्मधर्म आणि वैदिक धर्म' ह्या तीन निबंधांचा संग्रह; *वैदिक तत्त्वमीमांसा भाग–पहिला* (शंकराचार्य आणि रामानुजाचार्य, १९०९), *सृष्टीची यांत्रिक उपपत्ती* (१९०७), *वैदिक धर्माचे परमरहस्य* (१९१०), *उपनिषदांतील वचनांचा संग्रह* (बृहदारण्यक उपनिषद्; मूळ संस्कृत नाट्य व गद्य मराठी भाषांतर, १९१०) आणि *तुकारामांच्या*

*अभंगरत्नांचे हार*, (अभंग व त्यांवरील चर्चा आणि तौलनिक चिकित्सा, १९१०) हे त्यांचे सात ग्रंथ प्रसिद्ध आहेत. *अ स्टडी ऑफ इंडियन फिलॉसॉफी* व *वेदान्त ऑफ शंकराचार्य एक्सपाउंडेड अँण्ड विइन्डिकेटेड* हे दोन इंग्रजी ग्रंथही त्यांनी लिहिले आहेत.

गं. दे. खानोलकर, अ. अ. चव्हाणकर

**दोशी, हिराचंद नेमचंद :** (ज. ५ नोव्हेंबर, १८५६, सोलापूर–मृ. २ फेब्रुवारी, १९३७, सोलापूर). जैनधर्मविषयक पहिल्या नियतकालिकाचे संपादक, व्यासंगी अभ्यासक व लेखक. मूळचे गुजरातेतील जैनी. जैन भट्टारक 'राजेंद्रभूषण' यांचा सहवास लाभला. त्यांच्याकडे यांनी जैन धर्मग्रंथांचे सखोल अध्ययन केले. हिंदी, मराठी आणि गुजराती या तिन्ही भाषांतून जैनधर्मविषयक लेखन.

१८८४ पासून 'जैनबोधक' हे मासिक सुरू केले. धर्म, गुरू, ईश्वर याबद्दल खरेखुरे ज्ञान देणाऱ्या या मासिकास पोथिनिष्ठ पुराणमतवाद्यांकडून विरोधही झाला; परंतु त्यांच्या उदार धोरणामुळे पुढे स्थैर्य लाभले. धर्मतत्त्वांचे शास्त्राधारपूर्वक विवेचन करणारे उद्‌बोधक लेख हिराचंदांनी सातत्याने लिहिले. युक्तिवादाने समाजाचे मतपरिवर्तन करीत करीत १८९८ पर्यंत त्यांनी 'जैनबोधका'चे संपादन केले.

त्यांनी संस्कृत व प्राकृत जैनग्रंथांचे मराठी, हिंदी व गुजरातीत अनुवादही केले; व मराठीत स्वतंत्र विवेचनेही लिहिली. *जैनधर्माची माहिती* हे त्यांचे पहिले पुस्तक (१९०१). त्यांचे इंग्रजीतही भाषांतर झाले. 'समंतभद्राच्या', 'रत्नकरंडक श्रावकाचार' ह्या संस्कृत पुस्तकाचा सटीप मराठी अनुवादही त्यांनी केला.

श्री. वा. गो. आपटे ह्यांनी केलेल्या आक्षेपांचे निरसन, (१९१४); *शुद्ध पूजापाठ*, *सल्लेखन*, *जैनमतकथासंग्रह*, *षोडशकारणभावना*, (आ. २, १९०७) *अनित्यकं पंचाशत*, *श्री पार्श्वनाथ तीर्थंकर चरित्र*, *श्रीमहावीर चरित्र*, *क्रियाकोश*, *भजन मालिका* आदी अनेक पुस्तकांचे ते जनक आहेत. ऑक्टोबर १९२३ मध्ये 'सम्यकत्ववर्धक' नामक मासिकही त्यांनी सुरू केले.

उषा टाकळकर, लीना रस्तोगी

**दौंडकर, खंडेराव सावळाराम :** (ज. २५ नोव्हेंबर, १९०५–मृ. १० जानेवारी, १९५९, मुंबई). लघुकथालेखक व संपादक. मुंबईच्या एल्फिन्स्टन हायस्कूलमधून मॅट्रिक (१९२१) झाल्यानंतर सेंट झेविअर्स कॉलेजमधून एम्.ए., १९२९ मध्ये एल्एल्.बी. व्यवसाय वकिलीचा.

दौंडकर 'मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय' व 'मुंबई मराठी साहित्यसंघ' या संस्थांचे आजीव सदस्य होते. १९३९ मध्ये साताऱ्याच्या सरदार पाटणकरांच्या अध्यक्षतेखाली स्थापन झालेल्या 'मराठा लीग'चेही ते चिटणीस होते.

प्रा. वि. ह. कुलकर्णी ह्यांच्या आग्रहाने दौंडकरांचे लेख व कथा, 'विहार', 'विविधवृत्त' या साप्ताहिकांत प्रसिद्ध होऊ लागल्या. पुढे त्यांच्या कथा 'प्रतिभा', 'पारिजात', 'यशवंत', 'सुवर्ण', 'निर्झर' आदी नियतकालिकांत प्रसिद्ध होऊ लागल्या. १९३२ मध्ये सुरू झालेल्या 'प्रतिभा' पाक्षिकाच्या संपादक मंडळात गं. दे. खानोलकर व वि. ह. कुलकर्णी यांच्या जोडीने दौंडकरांचेही नाव होते. १९३५ मध्ये प्रसिद्ध झालेल्या 'अर्वाचीन मराठी साहित्य' ह्या ग्रंथात, मराठी लघुकथेचा आढावा घेणारा त्यांचा लेख छापला गेला. त्यात, पाश्चिमात्य व मराठी लघुकथांचे तंत्र व मंत्र यासंबंधी त्यांनी मांडलेले विचार महत्त्वाचे आहेत. *मोत्यांची कुडी* हा त्यांचा कथासंग्रह याच सुमारास (१९३४) प्रसिद्ध झाला. १९३६ मध्ये सुरू झालेल्या 'ज्योत्स्ना' मासिकाचे संपादनही त्यांनी वा. रा. ढवळे, वि. स. खांडेकर प्रभृतींच्या जोडीने केले. 'मराठा लीग'ने चालविलेल्या 'मराठा मिलिशिया' ह्या संघटनेच्या प्रचारार्थ निघणाऱ्या 'सारथी' साप्ताहिकाचेही संपादक दौंडकरच होते (१९३९–४१). त्यातील 'शापित देवदूत' हा खांडेकरांवरील लेख अतिशय गाजला. दौंडकरांचे लेखन संख्यादृष्ट्या अल्प असले तरी गुणवत्तेच्या दृष्टीने अव्वल दर्जाचे व नवकथेला जवळचे आहे.

वा. रा. ढवळे, लीना रस्तोगी

**द्रवीड, बळवंत त्र्यंबक :** (ज. १८६० – मृ. १९११). पौराणिक ग्रंथांचे भाषांतरकार. मूळ घराणे साताऱ्याचे. ह्यांनी शालेय विद्यार्थ्यांकरिता रामायण-महाभारतादी ग्रंथांची रसाळ भाषांतरे केली. त्यांची पुस्तके पुढीलप्रमाणे :

(१) *रामसुधा* (अध्यात्म रामायणाचा अनुवाद १९०२), (२) *रामकथासुधा* भाग १ व २ (१९०७, १९०८), (३) *भारतामृत* भाग १, २ व ३ (१९०८, १९०९), (४) *महाभारतातील उपदेशपर गोष्टी* (आवृत्ती दुसरी, १९२७), (५) *कौरव-पांडवांचा इतिहास* (१९०६), (६) *गीता व रामगीता यांचा गद्यानुवाद* (१९०७), (७) *धर्मपद अथवा गौतमबुद्धाची सामान्य नीतितत्त्वे* (१९०३).

यांतील *भारतामृत* व *रामकथासुधा* या दोन्ही पुस्तकांस 'डेक्कन व्हर्नाक्युलर सोसायटी'कडून पारितोषिके मिळाली. *भारतामृता*च्या प्रस्तावनेत तत्कालीन वर्णाश्रमव्यवस्था, धर्म, नीति, राजधर्म, शिक्षण, अध्यात्म, युद्धकला, समाजव्यवस्था आदींचा आधुनिक दृष्टिकोनातून विचार मांडलेला आहे. १८९८–१९०३ ह्या कालावधीत 'विद्याविनोद' मासिकाचे संपादनही त्यांनी केले.

नंदिनी कोटलीकर, लीना रस्तोगी

० **धनुर्धारी :** पहा टिकेकर, रामचंद्र विनायक

**धांदरफळे, कृष्णराव रावजी :** ० विष्णुदास : (ज. १८४४, जि. अहमदनगर – मृ. १९१७, श्रीक्षेत्र माहूर, मराठवाडा). वेदशास्त्रांचे अध्ययन पूर्ण झाल्यानंतर त्यांच्या मनात वैराग्य निर्माण झाले. गृहस्थाश्रमी असूनही त्यांनी गृहत्याग केला. काही काळ तीर्थाटन करून त्यांनी श्रीक्षेत्र माहूर येथे दीर्घकाळ तपश्चर्या केली व तेथेच ते स्थिर झाले व येथेच त्यांनी परत गृहजीवनाला प्रारंभ केला, प्रपंच आणि परमार्थ या दोहोंचीही सांगड घातली. पत्नीच्या निधनानंतर त्यांनी नित्यानंद स्वामी यांचेकडून दीक्षा घेतली.

ते पूर्वीपासून काव्यरचना करीत असत. शृंगाररसात्मक असेही काही काव्य त्यांनी लिहिले आहे. त्यात आता याला वैराग्याची जोड मिळाली. भक्तीपर असेही त्यांचे विपुल लेखन आहे. आधुनिक काळातील हा एक श्रेष्ठ संतकवी होय.

विष्णुदासांची कविता त्यांचे भाचे नरहरशास्त्री खरशीकर यांनी संपादित करून ती पुढे प्रसिद्ध केली. तिचा क्रम असा : (१) *श्रीविष्णुदासांची कविता, खंड १* (१९२८), (२) *श्रीविष्णुदासांची कविता, खंड २* (१९३७) या दोन्ही खंडांचे एकत्रीकरण करून ती *विष्णुदासांची कविता* या नावाने १९५७ मध्ये प्रकाशित करण्यात आली. (३) *श्रीविष्णुदासांची कविता भाग २ संकीर्ण खंड* (१९७४) आणि (४) *श्रीविष्णुदासांची कविता भाग ३* (आख्यानपर) १९७९.

रामचंद्रशास्त्री जोशी

**धारूरकर, विठ्ठल दाजी :** (ज. १८५३ – मृ. १९१०). संस्कृत पंडित व भाषांतरकार. रामशास्त्री गोडबोले ह्यांच्याजवळ वेदान्त व व्याकरणाचे आणि वासुदेवशास्त्री अभ्यंकर ह्यांच्यासमवेत साहित्यशास्त्रीय व धर्मशास्त्रीय ग्रंथांचे अध्ययन. यांनी १८९८ मध्ये पंढरपूर येथे स्वतःची संस्कृत पाठशाळा स्थापन केली.

यांच्या *पंढरी महात्म्य* (१९०३) या गद्यग्रंथात पंढरपुरातील तीर्थे व देवस्थाने ह्यांची माहिती स्कंद व पद्मपुराण यांच्या आधारे

दिली असून *उपयुक्त धर्मशास्त्रसंग्रह* (१९०४) व *प्रायश्चित्त व्यवहार प्रकाश अथवा – हिंदुधर्मशास्त्रदर्पण* (१९०८) हे दोन धर्मशास्त्रविषयक ग्रंथही यांनी लिहिले आहेत.

उषा टाकळकर, मदन कुलकर्णी

**धुरंधर, बाळाराम कृष्णनाथ :** (ज. १९ फेब्रुवारी, १८७८, मुंबई – मृ. ९ जून, १९२५, मुंबई). संत तुकारामांच्या चरित्राचे लेखक. मुंबई येथे वकिली. वारकरी संप्रदायाचा स्वीकार (१९१९).

ह्यांचा *संतमुकुटमणि श्रीतुकाराममहाराज यांचे चरित्र* (१९२८) हा ग्रंथ प्रसिद्ध आहे. ह्यासाठी तुकारामवर्णित अनेक स्थळांना यांनी भेटी दिल्या. हे चरित्र तुकाराम-गाथेतील अभंगांच्या आधारे लिहिले आहे. आधुनिक शिक्षण घेतलेल्या एका व्यक्तीने आत्मानुभवाची प्रचीती घेऊन लिहिलेले चरित्र म्हणून हे चरित्र उल्लेखनीय ठरते.

उषा टाकळकर, आरती कुसरे

**नगरकर, बळवंत भाऊ :** (ज. १८५८ – मृ. ऑगस्ट, १९२६). भौतिकशास्त्रविषयक पुस्तकांचे लेखक. 'गृहिणी' (१८८७ – ९०) व 'सुद्दिशान' (१८८५–८६) ह्या मासिकांच्या संपादक मंडळातील एक प्रमुख.

'बालबोधशास्त्रमाले'द्वारा *पाणी* (१८८४) व *हवा* (१८८५) ही दोन पुस्तके यांनी प्रसिद्ध केली. ईश्वरनिर्मित विविध वस्तूंचे गुणधर्म, त्यांची उपयुक्तता इत्यादी महत्त्वाच्या गोष्टींची शास्त्रशुद्ध माहिती यात आहे. मराठी साहित्याच्या प्रारंभिक काळातील शास्त्रविषयक पुस्तके म्हणून ही महत्त्वाची ठरतात.

नगरकरांनी ब्राह्मसमाजाचे प्रधानाचार्य केशवचंद्र सेन यांच्या इंग्रजी ग्रंथाधारे *नवसंहिता अथवा आर्य लोकांचे नियमशास्त्र* (१८८७) हा ग्रंथ तयार केला. संसारात कसे वागावे व नैमित्तिक कृत्यांचे आचरण कसे करावे याविषयी यात उपदेश केला आहे. *कल्चर* (स्थापना–१८८७) हे इंग्रजी नियतकालिकही ह्यांनी, धर्म व सामाजिक सुधारणेच्या हेतूने चालविले होते.

उषा टाकळकर, आरती कुसरे

**नवलकर, गणपत रघुनाथ :** (ज. ४ सप्टेंबर, १८३७, मुंबई – मृ. १९१२). कवी, व्याकरणकार व धर्मोपदेशक.

*नवीन मराठी व्याकरण* (१८९६), *वाक्यवियोग आणि वाक्यसंयोगशास्त्र* (इंग्रजी, १९००), *मराठी नवीन बालव्याकरण* (१९०२) ही त्यांची व्याकरण व भाषाविषयक पुस्तके.

येशू ख्रिस्ताचे समग्र चरित्र सांगणारे *श्रीख्रिस्त विजय* (१९०६) हे अभंगरूप काव्यही त्यांनी लिहिले आहे. याशिवाय नवलकरांचे *नवीन गीत-संग्रह* (१९०४), *पद्यात्मक कोमस नाटक* (१९०६), मिल्टनकृत 'कोमस 'वरून पद्यात्मक, *शंमशोनमल्ल नाटक* (१९०३– मिल्टनच्या 'सॅम्सन ॲगॉनिसस'च्या आधारे) व *सदू कोळी* (१९०३– टेनिसनच्या 'इनॉक आर्डेन'वरून) त्यांनी लिहिल्याचे आढळते.

मंजिरी बेडेकर, मदन कुलकर्णी

**नवाथे, विष्णू गोपाळ :** (ज. १८६७, थळे, जि. कुलाबा – मृ. १९३१). ज्योतिषविषयाचे लेखक.

प्राथमिक शिक्षणानंतर शाळेत नोकरी. *कुंडलीविज्ञान* (१९००) हे नियतकालिक आरंभी मासिक व पुढे पाक्षिक म्हणून चालविले ते १९१३ मध्ये बंद पडल्यानंतर *योगमाला* व *जातक संग्रह* (१९२१) ही नियतकालिके यांनी सुरू केली. १९२५ मध्ये नवाथे यांनी 'श्री महालक्ष्मी ज्योतिर्विद्याश्रमा'ची स्थापना करून 'कुंडलीविज्ञान' हे नियतकालिक पुन्हा सुरू केले.

*ज्योतिर्बोध* (१९००), *वर्णमाला* (१९०५), *साडेसाती* (१९०८), *मंगळाचे खूळ* (१९१३), *उडुदाय प्रदीप* (१९१४), *जैमिनीय पद्धती* (१९१४), *सटीक जातकालंकार* (१९१४, १९४७), *भृगुसंहितांतर्गत योगावली* (१९२७), *जातकशिरोमणि*, खंड १ ला (१९१६, १९३६), *नाडीग्रहफल* (१९१९), *राजकीय वातावरण* (१९३०), *सुलभजातक* भाग १ ते ५, *गुप्तज्योतिष* अथवा (स्वप्न विषयक) *स्वप्नमीमांसा* (१९२५), *मुद्राज्योतिष किंवा पदचर्चनी विद्या* (१९१०, १९२७, १९४७), *मृगशीर्ष* (१९३०) हे नवाथे यांचे ग्रंथ ज्योतिषविषयक क्षेत्रात प्रमाणग्रंथ मानले जातात.

मंजिरी बेडेकर, मदन कुलकर्णी

**नाईक, सुब्राय लक्ष्मण :** (ज. ५ एप्रिल, १८५४, मडगाव – मृ. २ जानेवारी, १९१६). शिक्षण पोर्तुगीज आणि संस्कृतचे जुन्या परिपाठाचे. श्री. सुब्राय नाईक यांच्या नावावर 'भीष्मप्रतिज्ञा' हे १९०३ साली लिहिलेले नाटक आहे. भारतीय संस्कृती व तिची महती आपल्या लेखनाने स्पष्ट करणे ही त्यांची ध्येयवादी दृष्टी ह्या नाटकात दिसते. स्वामी विवेकानंद १८९३ साली गोव्यास गेले असताना मिशनऱ्यांशी झालेल्या चर्चेत श्री. नाईक ह्यांनी दुभाष्याचे काम केले, तेही ह्या ध्येयवादी दृष्टीनेच. १९१० साली नाईकांनी संन्यास घेऊन आपल्या समोरील कार्य *त्रिमितोपन्यास* हे माधव, रामानुज व शंकर इत्यादींचे तत्त्वज्ञान सांगणारे पुस्तक लिहून पुढे चालविले. *गीतारहस्य* हे त्यांचे शेवटचे पुस्तक. त्या पुस्तकात श्री. नाईकांनी लोकमान्यांच्या कर्मयोगाला इतरही मार्गांची जोड द्यावी असे प्रतिपादन केले आहे.

श्री. सुब्राय नाईकांचे नाव इतिहासमान्य होईल ते मात्र त्यांच्या वृत्तपत्रीय कामगिरीमुळे पहिल्यांदा *गोवामित्र* हे मासिक व त्यानंतर त्याचे रूपांतर झालेले 'गोवात्मा' हे साप्ताहिक त्यांनी १८८२ ते १८८९ ह्या सात वर्षांच्या काळात अत्यंत प्रतिकूल परिस्थितीत चालविले. 'गोवात्मा'चे संपादक म्हणून त्यांनी स्वतःच्या नावावर व 'नारदमुनी', 'सत्यवादी' इत्यादी टोपण नावांवर विविध प्रकारचे लेखन केले आहे. स्वातंत्र्यप्रेम, मराठी भाषा, भारतीय अस्मिता व सामाजिक सुधारणा ह्या विषयांवरील प्रभावी लेखनाने त्यांनी गोमांतकीय जनतेवर संस्कार करण्याचे मोठे कार्य केले आहे.

प्रभा पुरोहित

**नाडकर्णी, पुरुषोत्तम गोविंद :** (ज. ८ एप्रिल, १८४४, कसाल, सावंतवाडी – मृ. ११ ऑगस्ट, १९०० सावंतवाडी). विविधज्ञानविस्तार या नियतकालिकाचे संपादक व मालक. १८७० पासून 'विस्तारा'शी संबंध व १८७४ मध्ये मालकी. १८७४ ते १८९८ या कालखंडात प्रतिकूल स्थितीत मासिकाला श्रेष्ठ दर्जाचे वाङ्मयीन स्वरूप ह्यांनीच प्राप्त करून दिले.

'विविधज्ञानविस्तार' हे एकोणिसाव्या शतकाच्या अखेरच्या पदातील वाङ्मयविषयक अभिरुचीला वळण लावणारे मासिक म्हणून प्रसिद्ध आहे. नामांकित ग्रंथांची भाषांतरे करून घेऊन ती 'विस्तारा'तून प्रसिद्ध केली गेली. सतत पंचवीस वर्षे त्यांनी 'विविधज्ञानविस्तार' मासिकाचे संपादन केले व मराठी साहित्याच्या विकासाला व महाराष्ट्राच्या वाङ्मयीन अभिरुचीला वळण लावण्याचे महत्त्वाचे कार्य केले.

उषा टाकळकर, मदन कुलकर्णी

**नाडकर्णी, मंगेश कमलाकर :** (ज. ८ एप्रिल, १८७४, बांदे, सावंतवाडी – मृ. १५ एप्रिल, १९५९). धार्मिक विधिविषयक पुस्तकांचे लेखक व वाङ्मयेतिहासकार. माध्यमिक शिक्षण सावंतवाडी येथे व महाविद्यालयीन शिक्षण एल्फिन्स्टन कॉलेज, मुंबई येथे. बी.ए., एल्एल्.बी. बडोदे संस्थानच्या विविध खात्यांत नोकरी.

धार्मिक विधींच्या वेळी केल्या जाणाऱ्या संस्कृत मंत्रसंस्कारांचा अर्थ व प्रयोजन ह्यांचे सर्वसामान्यांना आकलन व्हावे म्हणून नाडकर्णी ह्यांनी गो. स. सरदेसाई यांच्या सहाय्याने *विवाह-विधिसार* (१९१३) आणि *अन्त्येष्टिविधिसार* (१९१५) ही पुस्तके वेदमंत्रांच्या अर्थासहित तयार केली. याखेरीज *उपनयनविधिसार*, *श्राद्धविधिसार*, *आन्हिक*

*कर्मप्रकाश* इत्यादी पुस्तकेही नाडकर्णी ह्यांनी लिहिली आहेत. याशिवाय त्यांचा *ए शॉर्ट हिस्टरी ऑफ मराठी लिटरेचर* (१९२१) हा प्राचीन काळापासून अर्वाचीन काळापर्यंतचा मराठी वाङ्मयाचा चरित्रपर व विवेचनपर असा इंग्रजी इतिहासग्रंथही प्रसिद्ध आहे.

हरिश्चंद्र थोरात, मदन कुलकर्णी

**नाडकर्णी, रामचंद्र वामन** : (ज. १९०१ – मृ. १९३५). व्यासंगी, चिकित्सक अभ्यासक आणि विनोदी लेखक. प्रतिकूल कौटुंबिक परिस्थितीमुळे उच्च शिक्षणाचा लाभ घेऊ शकले नाहीत. मॅट्रिकची परीक्षा उत्तीर्ण झाल्यानंतर वयाच्या अठराव्या वर्षापासून सरकारी नोकरी. नोकरीखेरीजचा उर्वरित सर्व वेळ त्यांनी विद्याव्यासंगात घालविला. यांनी वैचारिक, संशोधनात्मक लेखनाप्रमाणे काही विनोदात्मक लेखनही केले आहे. पौर्वात्य लेखकाप्रमाणे मोपासाँ, चेकॉव्ह, गार्डिनर, हार्डी, चेस्टरटन् यासारख्या काही पाश्चात्त्य लेखकांचेही संस्कार नाडकर्णी यांच्या लेखनावर झाल्याचे आढळते. त्यांच्या लेखनाचे विषय बहुविध स्वरूपाचे आहेत. त्यांच्या ग्रंथांची नावे पुढीलप्रमाणे : (१) *आजगावकरांचा नामदेव* (लेखांक १ ते ४, १९२०), (२) *सजीवसृष्टीची उत्क्रांती* (१९२५), (३) *रामदासांचा संप्रदाय* (१९२९), (४) *शिवकालीन राज्यघटनेची मूलतत्त्वे* (१९३२), (५) *मराठ्यांच्या उत्तरकालीन मोहिमा* (१९३३), (६) *समर्थचरित्र* (१९३४).

संदर्भ : अर्वाचीन मराठी वाङ्मयसेवक, खंड २, संपा., गं. दे. खानोलकर.

सो. म. कुलकर्णी

**नाडकर्णी, विठ्ठल जिवाजी** : ० शारदाश्रमवासी : (ज. १८८१, सावंतवाडी – मृ. ६ एप्रिल, १९३६, मुंबई). लेखक व विविध नियतकालिकांचे संपादक. शिक्षण मॅट्रिकपर्यंत. ह्यांचे स्फुटलेखन 'शारदाश्रमवासी' ह्या टोपणनावाने 'इंदुप्रकाश', 'मासिक मनोरंजन' या नियतकालिकांतून प्रसिद्ध झाले. 'मनोरंजना'तून १९११ पर्यंत अनेक कथा व लेख प्रकाशित. 'नवयुग'चे संपादन करताना स्वतःचे नाव न घेता यांनी यात अनेक कथा व चरित्रे लिहून प्रसिद्ध केली. दामोदर सावळाराम यंदे यांच्या 'श्री शिवाजी' साप्ताहिकाचे संपादक असताना *पहिल्या महायुद्धाचा इतिहास* व 'विविधवृत्त'चे संपादन करताना *हिंदु मुसलमानांच्या वैरयाचा इतिहास* ह्या लेखमाला ह्यांनी लिहिल्या. 'केशव भिकाजी ढवळे' प्रकाशनाच्या 'धर्मप्रसारमाले'साठी *रामविजय*, *हरिविजय कथामृत* (१९३०), *पांडवप्रताप कथामृत* (१९३१) या धार्मिक ग्रंथांचे गद्यरूपांतर आणि ज्ञानेश्वरांच्या अभंगांचे सार्थ-सटीप विवेचन ही यांची कामगिरीही उल्लेखनीय. वीरकरांच्या 'रहस्यकथामाले'ची व 'यशवंत' मासिकाची प्रेरणाही नाडकर्णींचीच.

याशिवाय *प्रेमविजय* (१९१०) हे पुराणातील प्रेमविवाह कथांचे पुस्तक, रमेशचंद्र दत्तांच्या बंगाली कादंबरीच्या इंग्रजी भाषांतरावरून मराठीत आणलेली *नरेंद्रनाथ* (१९११) ही 'मनोरंजना'तून क्रमशः प्रसिद्ध झालेली कादंबरी, *पाश्चात्त्य नाटकांची संविधानके* (१९२०) ही लेखमाला हे त्यांचे अन्य साहित्य. ह. ना. आपटे ह्यांच्या 'माध्यान्ह' (१९२८) ह्या कादंबरीला जोडलेले आपटे ह्यांचे चरित्रात्मक स्वभावचित्रही ह्यांनीच तयार केले होते. यांनी काही सचित्र, सुबोध कहाण्याही लिहिल्या आहेत (१९३०).

मं. मा. नाडकर्णी, आरती कुसरे

**नातू, काशिनाथ गोविंद** : (ज. १८४०, ब्रह्मावर्त – मृ. २० ऑगस्ट, १८९७, पुणे). नाटककार. मूळ गाव आचरे (जि. रत्नागिरी). मॅट्रिक (१८६४). १८७४ मध्ये वकिलीची परीक्षा उत्तीर्ण.

यांनी 'ज्यूलियस सीझर' या नाटकाचे *विजयसिंग* (१८७२) या नावाने केलेले भाषांतर प्रसिद्ध आहे. हे शब्दशः भाषांतर मात्र नाही. मूळ नाटकावर देशी पेहराव चढविला आहे. या नाटकाला 'दक्षिणा प्राइझ कमिटी'कडून बक्षीस मिळाले होते.

नातू ह्यांनी बायरनच्या 'सीर्डिनेपल्स' ह्या शोकरसप्रधान नाटकाचे व 'सिसेरोचे वार्धक्य' (सिसेरोज् ओल्ड एज) ह्या पुस्तकाचे भाषांतर केले होते. परंतु ही दोन्ही पुस्तके प्रसिद्ध झाली नाहीत. नातू ह्यांनी 'बाबू केशव चंद्र सेन' यांचे चरित्र इंग्रजीत लिहिले असल्याचा उल्लेख आढळतो.

मंजिरी वेडेकर, मदन कुलकर्णी

**नातू, विष्णु रघुनाथ** : (ज. १८६४ – मृ. मार्च, १९१९). चरित्रलेखक. शिक्षण बी.ए., एलएल्.बी. बेळगाव येथील निष्णात कायदेपंडित. मुंबई कायदेमंडळाचे काही काळ सदस्य.

अनेक इंग्रजी ग्रंथांच्या आधारे लिहिलेले *रशिया* (१८८५) हे यांचे रशियाविषयी माहिती देणारे पहिले पुस्तक.

अत्यंत चिकित्सकपणे व ऐतिहासिक साधनांचा उपयोग करून लिहिलेल्या *'आलिजाबहादर' महाराज माधवराव ऊर्फ महादजी शिंदे यांचे चरित्र व कारकीर्द* (१८९४) ह्या यांच्या चरित्रग्रंथात शिंदेबंधूंचे राजकारण आणि मराठ्यांचा पन्नास वर्षांचा इतिहास आला असून अनुषंगाने जोधपूरची स्वारी, दत्ताजीच्या स्वाऱ्या व त्यांचा पानपतशी संबंध, होळकर–शिंदे वैरभाव आणि पुण्यातील अंतर्गत राजकारण यांचे वर्णन आढळते. मराठीतील हा एक उत्कृष्ट ग्रंथ असला तरी नाना फडणविसांना महादजींपेक्षा गौण लेखण्यामुळे तो वादग्रस्त ठरला आहे.

जयंतकुमार त्रंड, उषा टाकळकर

० **नाथ निफाडकर** : पहा निफाडकर, एकनाथ यादव

० **नाथमाधव** : पहा पितळे, द्वारकानाथ माधवराव

० **नाना महाराज** : पहा साखरे, नारायण

**नायडू, घंटय्या** : (ज. १८४९ – मृ. १८८९). कवी. जबलपूरच्या रॉबर्टसन कॉलेजात इंग्रजीचे प्राध्यापक.

हे इंग्रजी व मराठीतून काव्यरचना करीत. मराठीत निर्यमक कविता लिहिण्याचा पहिला उपक्रम त्यांनी केला. *मैना* हे त्यांचे 'मेघदूता'च्या धर्तीवर लिहिलेले निर्यमक खंडकाव्य (आ. दु. १८८२, आ. ति. १८८७) प्रसिद्ध आहे. 'काव्यरत्नावलि'मधून त्यांची स्फुट कविता प्रसिद्ध होत असे. ह्यांनी बुवाबाजी ह्या विषयावर *केसरी मंदील* (१८८४) हे एक गद्य नाटक लिहिले आहे. *चंद्रसेन* ही त्यांची कादंबरी अप्रकाशित आहे.

गं. दे. खानोलकर, म. पां. कुलकर्णी

० **नारायण दाजी** : पहा लाड, नारायण दाजी

० **नारायणसुत** : पहा मुजुमदार, श्रीपाद नारायण

० **नारायणेंद्र सरस्वती** : पहा पारखी, नारो भिकाजी

**नांदापूरकर, नारायण गोविंद** : (ज. १४ सप्टेंबर, १९०१, नांदापूर, ता. कळमनुरी, जि. परभणी – मृ. ९ जून, १९४९, हैद्राबाद). कवी. प्राचीन मराठी वाङ्मयाचे अभ्यासक व संशोधक. निजामी राजवटीत राहूनही ज्यांनी मराठी सारस्वताची मनोभावे सेवा केली; त्यांचे बी.ए. पर्यंत शिक्षण मराठवाड्यात. एम्.ए. (संस्कृत, अलिगड विद्यापीठ); एम्.ए. (मराठी); पीएच्.डी. (नागपूर विद्यापीठ). उस्मानिया विद्यापीठ, हैद्राबाद येथील मराठीचे पहिले प्राध्यापक व मराठी विभागप्रमुख. मराठवाडा साहित्य परिषदेच्या 'प्रतिष्ठान' (१९५२–५३) ह्या मुखपत्राच्या प्रवर्तकांपैकी एक. परळी-वैजनाथ येथे भरलेल्या मराठवाडा साहित्य संमेलनाचे अध्यक्ष (१९५५).

*पारिजातक* (१९२८) हा त्यांचा पहिला काव्यसंग्रह. प्रौढरचना, संयमित भावाविष्कार व सुबोधता ही *पारिजातक* या संग्रहाची

वैशिष्ट्ये. *माय मराठी* (प्रातिनिधिक कविता, १९६५) आणि *असू आणि आसू* ('टिअर्स ॲंड लॉफ्टर्स'चा अनुवाद, १९६५), *फुलारी* (टागोरांच्या 'गार्डनर'चा अनुवाद, १९६०) हे अनुवादित काव्यग्रंथ. त्यांची अप्रकाशित काव्यसंपदा आंध्र प्रदेशातील मराठी साहित्य परिषदेच्या संग्रही आहे.

*मायबोलीची कहाणी* (१९४७) हे त्यांचे मराठी वाङ्मयाचा इतिहास, त्याच्या सांस्कृतिक परंपरांसह कहाणीच्या माध्यमातून प्रगट करणारे पुस्तक.

त्यांचे संशोधनपर लेख व निबंध विविध नियतकालिकांमधून प्रसिद्ध झाले आहेत. *मुक्त-मयूरांची भारते* (१९५६) हा ग्रंथ म्हणजे त्यांचा पीएच्.डी.प्राप्त प्रबंध. मुक्तेश्वर-मोरोपंतांनी 'महाभारता'वर जे देशीकार लेणे चढविले त्याची जडण-घडण, कलाकुसर, त्यातील सामाजिक दर्शन, स्वभाव-परिपोष, संक्षेपविस्तार इत्यादी विषयांचा साधार परामर्श त्यांनी या प्रबंधात घेतला आहे. 'एकनाथी भारुडे' हा त्यांचा लेख मौलिक संशोधनाचा आदर्श ठरेल. प्राचीन मराठी कवितेपैकी समसुतात्मजविरचित *चंद्रहास्यकथा* (१९५५) व जनपंडितकृत *लीलाभागवत* (पूर्वार्ध : १९५६, प्रा. रा. व. माढेकर व न. शे. पोहनेरकर यांच्या सहकार्याने) ह्या दोन काव्यांचे संपादनही केले. लोकगीतांचे संग्राहक म्हणूनही त्यांनी महत्त्वाचे कार्य केले आहे. मराठवाड्यातील सुमारे एक लाख लोकगीते त्यांनी गोळा केली व ती *माहेरचे मराठी* (१९५३), *मराठीचा मोहोर* (१९५६), *मराठी माया* (१९५९) ह्या संग्रहांतून स्वतःच प्रकाशित केली.

डॉ. नांदापूरकरांनी मराठी भाषेचा प्रारंभकाल, कालिदासाचा मराठी वाङ्मयावर झालेला परिणाम, नरेन्द्राचे 'रुक्मिणीस्वयंवर' आदी विषयांवर हिंदीतून आणि वि. स. खांडेकर, श्री. कृ. कोल्हटकर, मराठी कादंबरी आणि बाराव्या व तेराव्या शतकातील मराठी साहित्य या विषयांवर इंग्रजीतून लेखन केले. 'साद', 'सुहासिनी', 'विनायकबुवा टोपरे याची कविता' आदी काव्यसंग्रहांना त्यांनी मार्मिक प्रस्तावनाही लिहिल्या. डॉ. ना. गो. नांदापूरकर ही व्यक्ती म्हणजे मराठवाड्यातील एक साहित्यसंस्थाच होती.

जयंतकुमार बंड

**नित्सुरे, शिवराम रामकृष्ण :** (ज. १८५०, पारनेर, जि. अहमदनगर – मृ. १८७८, रोवले, जि. रत्नागिरी). कवी. मूळगाव कोकणातील आंजर्ले. पुणे येथून मॅट्रिक (१८६८). मुंबई येथील डोंगरीच्या शाळेत शिक्षक (१८६७-७७).

*विद्याधनप्रशंसा* (१८७२) हे ह्यांचे एकमेव कथाकाव्य उपलब्ध आहे. आर्या, दिंड्या, साक्या, पदे, सवाई, कटाव व विविध वृत्तातले श्लोक, अशी दोनशेतीस पद्ये रचून त्यांनी या काव्यात रुचिवैचित्र्य आणले आहे. प्रवाही व प्रासयुक्त रचना हे यांचे वैशिष्ट्य.

उषा टाकळकर, मदन कुलकर्णी

**निपाणीकर, नारायण श्रीनिवास :** (ज. १८७३–मृ. सुमारे १९०७ साली प्लेगने). कवी. मूळचे कर्नाटकातील रहिवासी. मूळगाव निपाणी (जि. बेळगाव). पुढे कोल्हार येथे वास्तव्य. शिक्षण कोल्हापूर येथेच. मॅट्रिक्युलेशन परीक्षा उत्तीर्ण. कोल्हापूर येथेच पोलिटिकल एजंटच्या खात्यात नोकरी.

निपाणीकर यांनी बाळाजी विश्वनाथ पेशवे यांच्यावर एक दीर्घकाव्य लिहिले आहे. ते बेळगाव येथे १९०१ साली प्रसिद्ध केले गेले. या दीर्घकाव्याचे पाच भाग असून रचना विविध वृत्तांत आहे. निपाणीकरांच्या मनात सर्वच पेशव्यांवर, काव्यरचना करावयाची होती. परंतु प्लेगने त्यांचा आकस्मिक मृत्यू घडून आल्यामुळे, त्यांची ही मनीषा पूर्ण होऊ शकली नाही. निपाणीकर यांनी लो. टिळकांच्या चरित्रावरही काव्यलेखन केले असल्याचे सांगण्यात येते. पण ते आजतरी उपलब्ध होऊ शकलेले नाही. थोर व्यक्तींची जीवनचरित्रे समोर ठेवून ती प्रेरणादायक होण्याच्या दृष्टीने निपाणीकरांनी आपल्या चरित्रकाव्यांची रचना केलेली दिसते. वृत्तवैचित्र्य हाही त्यांच्या रचनाबंधाचा एक विशेष.

गो. म. कुलकर्णी

**निफाडकर, एकनाथ यादव :** ० नाथ निफाडकर : (ज. २३ जून, १८८८ – मृ. १९४९). कवी, कादंबरीकार. शालेय शिक्षण धुळे व महाविद्यालयीन शिक्षण पुणे येथे. 'लोकमान्य' व 'वाङ्मय' या मासिकांचे संपादक. पुस्तक–प्रकाशन, वाचन व लेखन हाच व्यवसाय.

रविकिरण मंडळाचे समकालीन कवी. १९११ साली काव्यलेखनाला प्रारंभ. त्यांची स्फुटकविता 'केरळकोकीळ' (नवा), 'विविधज्ञानविस्तार', 'चित्रमयजगत्' इत्यादी नियतकालीकांतून प्रसिद्ध झाली. *मधुमालती* (सामाजिक खंडकाव्य) व *काही स्फुट कविता भाग १* (१९१४), *काव्यानंदमंजूषा* (१९१८) हे स्फुट कवितांचे संग्रह. इंग्रजी कवितेची छाप असलेली रूढ जातिरचना आणि जुन्या छंदातील निफाडकरांची कविता निसर्गसंवादी, सुगम, प्रासादिक असून समकालीन कवितेशी समरूप झालेली आहे.

*मधुमालती* (१९१४) हे सामाजिक, *तारागड* (१९१६) हे तात्त्विक व *सोनपत पानपत अथवा सोक्षमोक्ष* (अपूर्ण, १९२३) आणि अल्लाउद्दीन खिलजी कथेवरील *सतीचा शाप* (१९२४) ही ऐतिहासिक अशी चार खंडकाव्ये प्रसिद्ध आहेत.

*राष्ट्रीय शिक्षणाची फळे* (१९२१) व *म. गांधी सैतान की साधु?* (१९३०) ह्या त्यांच्या कादंबऱ्यांपैकी दुसरीत म. गांधींविषयीच्या प्रतिक्रियांचे दर्शन घडवून ते साधू असल्याचा निर्वाळा दिला आहे. नाथ निफाडकर व सौ. इंदिराबाई निफाडकर ह्यांचा *माहेरचे आखात* (१९३०) हा कथासंग्रहही प्रसिद्ध आहे. *लो. टिळक चरित्र : पूर्वार्ध* (१९२०), *बालकवींची समग्र कविता : भाग १* (१९२३), *बालकवींची मधुगीते व गोदातटीचा गुंजारव* (१९३०) ही ह्यांनी संपादित केलेली पुस्तके.

जयंतकुमार बंड, उषा टाकळकर

० **निरगुडकर, विनायक गोविंद :** पहा लिमये, विनायक गोविंद

० **निरंजन :** पहा बल्लाळ, वसंत सदाशिव

**निरंतर, गंगाधर भाऊराव :** (ज. १५ जून, १९०६, त्र्यंबकेश्वर – मृ. १३ मार्च, १९५९, पुणे). कादंबरीकार, लघुनिबंधकार. पुण्याच्या फर्ग्युसन कॉलेजातून बी.ए. (१९३०) आणि एम.ए. (१९३४). १९४० साली, बी.टी. १९४४ साली फर्ग्युसन कॉलेजात मराठीचे प्राध्यापक.

निरंतरांच्या वाङ्मयीन कारकिर्दीचा प्रारंभ १९३० साली 'प्रगति' साप्ताहिकातील इब्सेनवरील लेखमालेने झाला. हे लेखन पुढे *इब्सेन–चरित्र व ग्रंथपरिचय* (१९४०) या नावाने प्रसिद्ध झाले. तोपर्यंत मराठी लेखक-वाचकांचे लक्ष इब्सेनकडे वेधले गेले नव्हते. नव्या पुरोगामी विचारांच्या प्रभावाचा प्रत्यय निरंतरांच्या प्रारंभिक *सौ. मालती* (१९३४), *जीवनमृत्य* (१९३७) व *अर्धांगी* (१९४०) ह्या कादंबऱ्यांतून येतो. *विवाह आणि नीती* (१९३८) ह्या लेखसंग्रहांत विवाहसंस्थेविषयी तरुण निरंतरांनी केलेले अभ्यसन, मनन व चिंतन यांचा परिचय होतो. त्याच विचारांचा परिपाक पहिल्या तीन आणि *भूकंप* (१९४७) या कादंबऱ्यांतून आढळतो. एक मास्तर व त्यांची तरुण मुले यांची ओळख करून देणाऱ्या *अंधारातील दिवे* (१९३७) ह्या कादंबरीत मालक-मजूर संबंधाचे वस्तुनिष्ठ चित्रण आढळते. शिवाय टॉलस्टॉयच्या 'द कुइत्झर सोनाटा' या कादंबरीचा *गृहिणी* (१९५०) हा अनुवाद प्रसिद्ध आहे. *सौ. मालती* ही फ्लॉबर्टच्या 'मॅडम बोव्हारी' या कादंबरीचे रूपांतर.

लघुनिबंधकार म्हणूनही निरंतरांची प्रसिद्धी आहे. *साखर झोप* (१९३९) आणि *नवी साखर झोप* (१९४८) हे त्यांचे संग्रह प्रसिद्ध आहेत.

निरंतरांनी आणखीही लेखन व संपादन केले. *ग्रंथांच्या सहवासात* (१९४५) हा समीक्षात्मक लेखांचा संग्रह. *मराठी वाङ्मयाचा परामर्श* (१९४८) हा प्राचीन मराठी वाङ्मयाचा इतिहास, *शारदा विहार* (१९४०) हा शारदोपासक संमेलनाच्या अध्यक्षीय भाषणांचा संग्रह, *मधुघट* (१९४५) हा निरनिराळ्या कवितांचे संकलन व संपादन केलेला संग्रह आणि *विचारधारा* (१९४९) हा संपादित निबंधसंग्रह. याशिवाय टॉलस्टायचे *रशियाचे गांधी* (१९३३) नामक चरित्र व *ॲक्चुअरी ग. स. मराठे यांचे चरित्र* (१९४२) ही त्यांची आणखी काही ग्रंथरचना.

हरिश्चंद्र थोरात, म. ना. लोही

○ **निरीक्षक** : पहा लाड, पुरुषोत्तम मंगेश

○ **नीलकंठ** : पहा भवाळकर, नीलकंठ बळवंत

**नीळकंठ, कृष्णराव सदोबा** : (ज. १८५२–मृ. १९०७ शाहीर). कोल्हापूर दरबारात शिंग वाजविण्याचे काम यांच्याकडे होते.

कृष्णरावांनी कलगी पक्षाच्या मैदिक लावण्या व पौराणिक विषयांवरील बरीच कवने लिहिली आहेत.

त्यांची *छत्रपती शककर्ते श्रीशिवाजी महाराज यांचा पोवाडा* (रचना : १८९८) ही एकमेव मुद्रित कृती उपलब्ध आहे. प्रस्तुत पोवाड्याच्या ३४, ३० व २६ चौकी अशा तीन संहिता उपलब्ध आहेत. त्यांपैकी ३४ चौकी संहितेवरून प्रस्तुत पोवाडा छापलेला आहे (संपादक भास्करराव जाधव). देवी भवानीने भोसले घराण्याविषयीचे सांगितलेले भविष्य या व अशाच काही काल्पनिक प्रसंगांचे वर्णन प्रस्तुत पोवाड्यात आढळते. त्यात वीररसाचा उठाव उत्तम साधला आहे.

नंदिनी लोटलीकर, मदन कुळकर्णी

**नेने, बजाबा बाळाजी** : (ज. १८२९, अलिबाग–मृ. १९००, पुणे). नाटककार, कवी. मूळ ठिकाण कोकण. सुरुवातीची बरीच वर्षे कराची (सिंध) येथे वास्तव्य. १८६७ नंतर पुण्यात स्थायिक. सरकारी हायस्कूलमध्ये चित्रकला-शिक्षक. शेवटची काही वर्षे वैद्यकी व्यवसाय.

*सैरंध्री* (१८७२) हे ह्यांचे कीचकवधावर आधारित गद्य-पद्यात्मक पौराणिक नाटक १८६७-६८ सालीच त्यांनी लिहिले होते. मनोरंजनाबरोबर नीतिबोध करण्यासाठी यांनी या नाटकाच्या बारा अंकांत बारा सारतत्त्वे ग्रथित केली आहेत. संस्कृत नाटकाचा आदर्श समोर ठेवून लिहिलेल्या या नाटकात गोमूत्रिकाबंध, कमलबंध इत्यादी शब्दचमत्कृतीयुक्त असे रचनाप्रकारही आढळतात. छंदोबद्ध, वृत्तबद्ध संस्कृत मराठी पंडिती वळणाच्या कवितेशी यांचा चांगला परिचय होता, असे *सैरंध्री*तील कवितेवरून वाटते. रंगभूमीवर आणण्यासाठी अत्यंत बोजड असे हे नाटक रंगभूमीवर आणण्याचा त्यांनी प्रयत्न केला. किर्लोस्करपूर्व कालखंडातील 'बुकिश' नाटकांत *सैरंध्री* हा एक महत्त्वाचा टप्पा मानला जातो.

*गिल्पीन चरित्र* (१८६७), कॉपरच्या काव्यावरून भाषांतरित असे हे आर्याबद्ध काव्य, *हिडिंब वध* (१८७५) हे कीर्तनोपयोगी आख्यान *विश्वसेन अथवा मनोवेधक गोष्टी* (१८८७) ही यांची इतर पुस्तके. त्यांनी लिहिलेल्या *वनस्पति परिभाषा कोशा*चा काही (सचित्र) भाग 'सृष्टिज्ञान' मासिकात प्रसिद्ध झाला असून, त्यांच्या इंग्रजी रोजनिशांतील काही भागांचे मराठी भाषांतर इतिहाससंशोधक शं. गो. चट्टे ह्यांनी 'सह्याद्री' (नोव्हेंबर १९४७ व फेब्रुवारी १९४८) मासिकातून प्रसिद्ध केले आहे.

उषा टाकळकर, जयंतकुमार बंड

**नेने, विष्णू गणेश** : (ज. १५ डिसेंबर, १८६२, वाडेपडेल, जि. रत्नागिरी–मृ. २३ जानेवारी, १९२४). कवी. शिक्षण मॅट्रिक. तत्कालीन बी.बी.सी.आय्. रेल्वे कंपनीत नोकरी.

ह्यांचे *ईशदर्शन*चे (सहा गुच्छ) 'काव्यरत्नावली'त (१८८८ ते १८९०) प्रसिद्ध झाले. त्यातून त्यांच्या ईश्वरनिष्ठेचा व कवित्वशक्तीचा प्रत्यय येतो. ह्याशिवाय *प्रियमाधवमिलन* (१८८५), *प्रियविरहविलाप* (१८८६), *डॉ. काशिनाथ वामन काणे यांचे पद्यात्मक चरित्र* (१८९२), *विष्णुस्तुति* (१८९७), *जीवितस्तोत्र* (आंग्लकवी लाँगफेलोच्या सॉम ऑफ लाईफ कवितेचे रूपांतर), *श्री सद्गुरु काका पुराणिक यांचे आर्याबद्ध चरित्र* (१९३३) यासारखी यांनी अन्य काव्येही लिहिली आहेत. त्यांची एकंदर रचना जुन्या वळणाची, संस्कृतप्रचुर आणि प्रौढ आहे.

उषा टाकळकर, मदन कुळकर्णी

**नेने, विष्णु पांडुरंग** : (ज. ६ ऑक्टोबर, १९०२, पुणे–मृ. २ फेब्रुवारी १९४३, बडोदे). संपादक, शासनपद्धतिविषयक पुस्तकांचे व लघुचरित्रांचे लेखक. बडोद्याचे 'दादूमिया' या टोपणनावाने लिहिणाऱ्या डॉ. वा. वि. नेने यांचे वडील.

शिक्षण बडोदे येथे. मुंबई विद्यापीठाचे बी.ए. 'मासिक मनोरंजना'च्या संपादकीय विभागात काही काळ काम. नंतर बडोदे संस्थानात नोकरी. *भारतीय शासनपद्धती* भाग १ व २ (१९२३), *बडोद्याचा राज्यकारभार* (१९४२) ही ह्यांची सर्वसामान्य वाचकांसाठी लिहिलेली राजशासनविषयक पुस्तके. विद्यार्थ्यांसाठी उद्बोधक अशी लघुचरित्रेही ह्यांनी लिहिली. त्यांपैकी *बालबाबर* (१९२६, मनसुखलाल पोपटांच्या गुजराती पुस्तकाधारे), *विल्यम एवर्ट ग्लॅडस्टन* (१९२७), *सम्राट अशोक* (१९३१) इत्यादी पुस्तके उल्लेखनीय वाटतात. बडोदे संस्थानाधिपती श्री सयाजीराव गायकवाडांचे इंग्रजी चरित्रही यांनी लिहिले आहे.

*अर्वाचीन मराठी साहित्य १८७४ ते १९३३* (१९३५) हा वाङ्मय-समालोचक ग्रंथ यांनी ख्यातनाम लेखकांच्या सहकार्याने व आपल्या साक्षेपी संपादनाने सिद्ध केला. मराठी साहित्येतिहासविषयक एक महत्त्वाचा संदर्भग्रंथ म्हणून तो उल्लेखनीय आहे.

बडोदे संस्थानात मराठी साहित्याचा पुरस्कार करण्याचे महत्कार्य त्यांनी केले. बडोदे संस्थानात 'राजकवी' हे पद निर्माण करण्याची मूळ कल्पनाही नेने यांचीच.

जयंतकुमार बंड, हरिश्चंद्र थोरात

**नेने, हरि नारायण** : (ज. ८ डिसेंबर, १८९२, पाटण, जि. सातारा–मृ. २२ नोव्हेंबर, १९५४). महानुभाव वाङ्मयाचे एक महत्त्वाचे संशोधक व संपादक. शिक्षण पुणे येथे. एम्.ए. (इंग्रजी-संस्कृत) व एम्.ए. (मराठी) एल्.टी. नागपूरच्या पटवर्धन हायस्कूल या सरकारी शाळेत शिक्षक. अमरावतीच्या ट्रेनिंग कॉलेजच्या प्राचार्यपदावरून निवृत्त.

हरिभाऊ नेने प्रसिद्ध आहेत ते विशेषतः महानुभाव साहित्याचे संशोधक व संपादक या नात्याने ना. ब. भवाळकर या संशोधनप्रिय स्नेह्याच्या सहकार्याने त्यांनी *श्रीचक्रधर सिद्धान्तसूत्रे* भाग १ (१९३१) हा ग्रंथ संपादित करून प्रसिद्ध केला. महानुभाव वाङ्मयाच्या संशोधनक्षेत्रातला एक महत्त्वाचा टप्पा म्हणून हा ग्रंथ मोलाचा मानला जातो. महानुभाव सारस्वत १९३६ साली प्रसिद्ध झाले. *दृष्टान्तपाठ* (१९३७) हा या दोघांचा दुसरा संपादित ग्रंथही असाच मौलिक स्वरूपाचा आहे. नेने ह्यांनी एकट्याने केलेले संशोधन व संपादनही विपुल आहे. *श्रीचक्रधरोक्त सूत्रपाठ* आ. दुसरी १९४२ व *लीलाचरित्र* हे त्यांचे महत्त्वाचे संपादित ग्रंथ. *सूत्रपाठ* हा ग्रंथ १९३५ मध्ये केवळ पाठरूपाने व १९४२ मध्ये विस्तृत उपोद्घात व टीपा यासह

प्रसिद्ध झाला. याच कालावधीत *लीळाचरित्रा*चे एकांक, पूर्वार्ध व उत्तरार्ध हे तिन्ही भाग त्यांनी प्रसिद्ध केले. *लीळाचरित्र एकांक* भाग १ व २ (१९४६). हे दोन ग्रंथ म्हणजे एकूण महानुभाव वाङ्मयाचा पायाच असल्याने नेने यांचे हे कार्य अत्यंत महत्त्वाचे आहे. *रत्नमाला-स्तोत्र* व *लक्ष्मणरत्नाकर* (१९३७) हे महानुभावीय संस्कृत ग्रंथही त्यांनी प्रसिद्ध केले आहेत. त्यांच्या स्फुट संशोधनपर लेखांची संख्याही बरीच असून *संशोधनलेखसंग्रहा*च्या दोन भागांत त्यांचा अंतर्भाव झाला आहे (१९५७). याशिवाय यादवकालीन महाराष्ट्राच्या सामाजिक व धार्मिक जीवनासंबंधीचे त्यांचे काही लेख नागपूरच्या 'विहंगम' मासिकातूनही प्रसिद्ध झाले. महानुभावांची 'प्रसादसेवा', 'पूजावसर', 'मूर्तिज्ञान' व 'नामाचे दहा ठाय' ही उपासनाविषयक लहान प्रकरणेही त्यांनी एकत्र प्रसिद्ध केली. *शिक्षणकला व मानसशास्त्र* (१९३२) (गुरुदेव रा. द. रानडे ह्यांच्या प्रस्तावनेसह), *संस्कृत पहिले पुस्तक* (१९२५) आणि *संस्कृत दुसरे पुस्तक* (१९२८) ही त्यांची अन्य प्रकाशित पुस्तके.

शं. गो. तुळपुळे, जयंतकुमार बंड

**नेरूरकर, विठ्ठल कृष्ण :** (ज. १४ डिसेंबर, १८९२, म्हापण, वेंगुर्ले, जि. रत्नागिरी – मृ. १९ मार्च, १९४९). कवी, कथा-कादंबरीकार व नाटककार. सुरुवातीचे शिक्षण सावंतवाडी व मालवण येथे. महाविद्यालयीन शिक्षण कोल्हापूर, पुणे या ठिकाणी. बी.ए., एलएल.बी.चे शिक्षण अपूर्ण ठेवून मुंबईला जाहिरात व्यवसाय. त्यानंतर काही काळ सावंतवाडी येथे शिक्षक. पुढे सावंतवाडी संस्थानच्या शिक्षणखात्यात एज्युकेशन इन्स्पेक्टर.

नेरूरकरांनी *चंद्रगुप्त*, *नवरामुलगा*, *भाग्याच्या आशा*, *हरिश्चंद्र* इ. जवळपास तीस नाटके लिहिली असली तरी, त्यांच्या पहिल्याच नाटकाच्या प्रयोगावर सरकारने बंदी आणल्याने त्यांचे एकही नाटक प्रसिद्ध होऊ शकले नाही.

त्यांनी बरीच खंडकाव्ये लिहिली. *कवीची भेट* हे पहिले दीर्घकाव्य. *भारतभारती*, *राधा-कृष्ण-रहस्य* (१९१८, १९३०), *कॉलेज* *सिंहगडावरून* ह्या संकल्पित महाकाव्याचे *सिंहगड-दर्शन* (१९२३) व *पर्वती* हे दोन भाग, *हिंदवासीयांचे आजचे प्रातःस्मरण*, *हिंदप्रबोधकाचे स्वर्गनिर्याण*, *मधमधाप*, *शिवरायाची द्वारका*, *सृष्टीचे कारागीर* इत्यादी त्यांची दीर्घ-प्रदीर्घ काव्ये आणि *उत्कंठा व इतर कविता* (१९३५) हा स्फुट कवितांचा संग्रह प्रसिद्ध. नेरूरकरांची काव्यरचना सहजस्फूर्त, प्रासादिक व काळाच्या प्रवाहाशी संवाद साधणारी आहे. *राधा-कृष्ण-रहस्य* ह्या काव्याला 'दक्षिणा प्राइझ कमिटी'कडून पारितोषिक मिळाले होते. *शीलाचे मोल* (१९१९) ही यांची पहिली कादंबरी. *तो क्षण* (१९२४), *देशाचे वैभव* (१९२६) ह्या कादंबऱ्या हरिभाऊ आपट्यांचा बोधवादी आदर्श समोर ठेवून लिहिल्या आहेत. *दुधारी सुरी* (१९२३) ही रहस्याचा वेध घेणारी तर *साधना* (१९४१), *नवा नमुना* (१९४५) ह्या ग्रामोद्धाराच्या प्रश्नांचा ऊहापोह करणाऱ्या कादंबऱ्या आहेत. *अकबराचे वेदसाधन* ही त्यांची वेगळ्या धाटाची ऐतिहासिक कादंबरी.

*प्रतिबिंबे* (१९३८), *फोटोचे लग्न व इतर लघुकथा* (१९४४) ह्या कथासंग्रहातील कथांतून तळागाळातील समाजाच्या दुःखाचे चित्रण आढळते. याशिवाय *टॉलस्टॉयचे तत्त्वज्ञान* (१९२४) ही पुस्तिका, अनेक निबंध, लेख व बालवाङ्मय ह्यांनी लिहिले आहे.

उषा टाकळकर, जयंतकुमार बंड

**नेवाळकर, दामोदर विश्वनाथ :** (ज. १८८४ – मृ. १९१९). नाटककार. एके काळी त्यांच्या नाटकांनी मराठी रंगभूमी गाजवली होती. त्यांची चरित्रविषयक माहिती उपलब्ध नाही. नेवाळकर विशेष प्रसिद्ध आहेत ते *दंडधारी* (१९०७) नाटकासाठी. या नाटकात टिळकांच्या मतांचा पुरस्कार असून सुधारकांचा अधिक्षेप आढळतो. १९१० साली ह्या नाटकावर बंदी घालण्यात आली. यांचे *देवी जनता* हे नाटकही जप्त करण्यात आले. *धर्मरहस्य* (१९०९) हे अस्पृश्यताविरोधी व पतितपरावर्तनाचा पुरस्कार करणारे नाटक. *उषा* (१९०८), *श्रीमती* (१९०९), *दंडधारी* (१९०७), *मनोविजय* (१९०८), *तारकमारक* (१९११), *धर्मरहस्य* (१९०९), *कट्टर कर्मयोगी* (१९१३) यांसारखी स्वतंत्र व *संगीत प्रेमगुंफा* (१९०८, ॲज यू लाइक इट), *संगीत विकल्पविमोचन* (१९०८, विंटर्स टेल्), *संगीत समानशासन* (१९१०, मेझर फॉर मेझर) व *संगीत विचाराधन* (१९१३, ऑल इज वेल् दॅट एन्ड्स वेल्) ही शेक्सपियरच्या नाटकावरून केलेली अनुवादित नाटके प्रसिद्ध आहेत. *सं. समानशासन* या नाटकाचा प्रथम प्रयोग १८९७ सालीच नाट्यकला प्रवर्तक संगीत मंडळाने केला होता.

मु. श्री. कानडे, म. ना. लोही

० **नेहमिया गोरे :** पहा गोरे, नीळकंठशास्त्री शिवरामशास्त्री

**पंगू, दत्तात्रय सीताराम :** (ज. ८ सप्टेंबर, १८९८ – मृ. १९ ऑगस्ट, १९५५, बेळगाव). प्राचीन मराठी कवितेचे संशोधक, संपादक व टीकाकार. माध्यमिक व इंटरपर्यंतचे शिक्षण कोल्हापूर येथे. १९२५ साली डेक्कन कॉलेजातून एम्.ए. त्यानंतर कोल्हापूरच्या राजाराम कॉलेजात मराठीचे प्राध्यापक (१९२६–५३). नंतरची दोन वर्षे बेळगावच्या राणी पार्वतीदेवी महाविद्यालयात मराठीचे प्राध्यापक.

पंगूंचे लेखन मुख्यतः प्राचीन पंडित कवी व त्यांचे काव्य ह्यांविषयी आहे. महाविद्यालयीन विद्यार्थ्यांसाठी त्यांनी 'ज्ञानेश्वरी'चे काही अध्याय, मुक्तेश्वरी महाभारत आणि महानुभाव काव्य संपादित केले. संशोधकीय चिकित्सादृष्टी हा त्यांच्या संपादित ग्रंथांचा विशेष. *सामराज* (१९३०) व *प्राचीन मराठी कविपंचक* (१९४४) हे विशेष उल्लेखनीय ग्रंथ. सामराजाच्या 'रुक्मिणीहरण' व 'मुद्गलोपाख्यान' ह्या काव्यग्रंथांचे रसग्रहण व समीक्षण करताना मराठी, संस्कृत आणि पाश्चात्त्य काव्यकल्पनांचा त्यांनी परामर्श घेतला आहे. 'प्राचीन कविपंचका'त कवींच्या काव्यांचे गुणदोष व त्यांचे मराठी कवींत स्थान ह्यांची चर्चा केली आहे. *चक्रधर* (१९३४) ह्या पुस्तकात चक्रधरांचे चरित्र देताना महानुभाव पंथ, महानुभावीय वाङ्मय व तत्त्वज्ञान, महानुभावांच्या लिपी यांची ते माहिती देतात. दामोदर पंडितांचे 'वच्छहरण' (१९२७), मुक्तेश्वरकृत 'वनपर्व' व 'विराटपर्व' (१९४१), नागेशकृत 'सीतास्वयंवर' हे संपादित ग्रंथ प्रसिद्ध करताना पाठशुद्ध संहिता, पाठभेद, शब्दकोश आणि कविविषयक अनेक प्रश्नांचा पूर्वसूरींच्या मतांसह परामर्श घेणाऱ्या प्रस्तावना त्यांनी लिहिल्या आहेत.

*आस्वाद* (१९४३), *पुष्पांजली* (१९४४) व *तुषार* (१९४८) हे टीकालेखनाचे तीन संग्रह. अर्वाचीन मराठी ललितवाङ्मय व तत्संबंधित प्रश्नांची चर्चा, तसेच नाट्य काव्य, कादंबरी, आत्मचरित्र अशा विविध प्रकारच्या गाजलेल्या श्रेष्ठ वाङ्मयकृतींचे परीक्षण असे या लेखसंग्रहांचे स्वरूप आहे.

म. ना. लोही

**पंडित (वसईकर), गणपत पिराजी :** ० गणपत पिराजी : (ज. १८६२ – मृ. २५ ऑक्टोबर, १९४८). सनईवादनासंबंधीच्या पुस्तकाचे लेखक. सनई-वादकाच्या कुळात जन्म. ह्यांची तयार केलेली, *सनईवादन पाठमाला* प्रसिद्ध आहे. तिचे पहिले दोन भाग १९१८ मध्ये व नंतरचे दोन भाग १९२२ मध्ये प्रकाशित झाले. गायकवाड सरकारच्या 'देशी शाळाखात्या'च्या साह्याने ही पाठमाला गणपत

पिराजींनी तयार केली. सनईवादनावरील एकमेव पुस्तक याद्दष्टीने ते महत्त्वाचे आहे.

शरच्चंद्र विष्णु गोखले, रा. बा. बक्षी

**पंडित, बळवंत मनोहर :** (ज. १८६८ – मृ. ५ जानेवारी, १९९३, सोलापूर). कादंबरीकार. राहणारे सोलापूरचे, १८९६ च्या सुमारास प्लेगमुळे स्थलांतर करून काही वर्षे हैद्राबाद येथे वास्तव्य. तेथील 'अंजुमन खिरद अफरोज' या वाङ्मयविषयक संस्थेचे सभासद.

त्यांच्या *सुशील यमुना* (१८९१, आवृत्ती दुसरी), *लक्ष्मी आणि सरस्वती* (१९०१) व *कृष्ण सुंदरी* (१९१३) अशा तीन कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या आहेत. याखेरीज *जयदेवी नाटक*, *माणिकप्रभुचरित्र*, *धर्माजीरावांचे कुटुंब* अशीही काही पुस्तके त्यांनी लिहिली आहेत. त्यांनी आपल्या कादंबऱ्यांच्या कल्पनारम्य कथानकांत ऐतिहासिक आणि तत्कालीन वास्तवाचा कौशल्यपूर्ण उपयोग करून घेतला, हा त्यांच्या कादंबऱ्यांचा महत्त्वाचा विशेष होय. *सुशील यमुना*मध्ये वासुदेव बळवंतांच्या बंडाची, *लक्ष्मी आणि सरस्वती*मध्ये उत्तर पेशवाईतील सवाई माधवरावांच्या वेळच्या राज्यस्थितीची व *कृष्ण सुंदरी*मध्ये हैद्राबादच्या १९०८ च्या पुराची पार्श्वभूमी त्यांनी रेखाटली आहे. त्यांची भाषाशैली सरस आणि प्रसादिक आहे.

हरिश्चंद्र थोरात, के. ए. पोतदार

**पंडित, विष्णु परशुरामशास्त्री :** (ज. १८२७, सातारा – मृ. २९ एप्रिल, १८७६, महाबळेश्वर). ग्रंथकार, वृत्तपत्रकार व समाजसुधारक. सातारा येथे संस्कृत भाषेचे प्रारंभिक शिक्षण. नंतर १२ वर्षे न्याय-व्याकरणादी शास्त्रांचे अध्ययन. १८४८ मध्ये सरकारी शाळाखात्यात शिक्षक व भाषांतरकार म्हणून नोकरी. नोकरीतून मुक्त झाल्यावर १८६४ मध्ये 'इंदुप्रकाश' ह्या त्याकाळच्या प्रसिद्ध सुधारणावादी वर्तमानपत्रात मराठी विभागाचे उपसंपादक.

भाषांतरकार म्हणून काम करीत असताना त्यांनी पाच शालेय ग्रंथ लिहिले. त्यांपैकी दोन कोशग्रंथ आणि दोन भाषांतरात्मक आहेत. याशिवाय इंग्रजीमधून तयार केलेले *संस्कृत तिसरे पुस्तक* (१८६८) त्यांच्या नावावर आहे. स्त्रीजातीच्या उन्नतीची त्यांना तळमळ होती. विशेषतः विधवाविवाहाच्या चळवळीत त्यांनी आपले आयुष्य खर्च केले. *ब्राह्मणकन्याविवाहविचार* (१८६४) हा यांचा सामाजिक विषयावरील पहिला ग्रंथ. त्यात त्यांनी श्रुती, स्मृती व पुराणे यांच्या आधारे प्रौढविवाहाचे समर्थन केले आहे. काशीच्या चौदा पंडितांनी विधवा विवाह खंडनासाठी लिहिलेल्या *पुनर्विवाह निषेध* या ग्रंथाचे खंडन करण्यासाठी त्यांनी *विधवोद्वाहविवेक* (१८६८) हा संस्कृत ग्रंथ लिहिला. त्यांनी व्याख्याने दिली व ती पुस्तकरूपाने प्रसिद्ध झाली आहेत. याशिवाय *स्मृतिशास्त्र* (१८७३), *शूद्रधर्म* (१८७३), *वेदातील सूर्यसावित्रीविवाह* (१८७४), *देवरूच्याविषयी विचार* (१८७४), *स्त्रियांचे अधिकार* (१८७५) इत्यादी त्यांची सुमारे नऊ-दहा पुस्तके आहेत. शंकर पांडुरंग पंडित यांच्या सहकार्याने व मुंबई सरकारच्या आश्रयाने त्यांनी तुकारामाची गाथा दोन भागात प्रसिद्ध केली. चिकित्सक दृष्टीने ग्रंथ संपादित करण्याचा हा मराठी भाषेतील पहिलाच प्रयत्न होय.

कृ. भि. कुलकर्णी, के. ए. पोतदार

**पंडित, शंकर पांडुरंग :** (ज. १८४०, बांबुळी, सावंतवाडी – मृ. १८ मार्च, १८९४, मुंबई). विविध भाषाकोविद संस्कृत-प्राकृत ग्रंथांचे संशोधक, संपादक आणि वेदाभ्यासक. मुंबईचे एल्फिन्स्टन व पुण्याचे डेक्कन या कॉलेजांत उच्च शिक्षण (१८६५). दक्षिण सीनिअर फेलो म्हणून डेक्कन कॉलेजात नेमणूक (डिसेंबर १८६५). १८६८ मध्ये लॅटिन व इंग्रजी घेऊन एम्.ए. उत्तीर्ण. इंग्रजी व संस्कृत भाषांचे काही काळ अध्यापक. 'ओरिएंटल ट्रान्स्लेटर टू द गव्हर्नमेंट ऑफ बॉम्बे' या जागेवर नेमणूक (१८७९). १८८७ नंतर अहमदनगरचे हुजूर डेप्युटी कलेक्टर. १८९० ते १८९४ पोरबंदर संस्थानचे ॲडमिनिस्ट्रेटर.

पंडितांनी, मोरोपंतांचे अतिशय गहन व आर्यागीती वृत्तातील *वृहद्दशम अथवा कृष्णविजय* हे काव्य अत्यंत परिश्रमपूर्वक संपादून प्रसिद्ध केले (१८६३). त्यांचे दुसरे महत्त्वाचे कार्य म्हणजे *तुकारामांचे अभंग* या ग्रंथाचे प्रकाशन. विष्णु परशुरामशास्त्री पंडित यांच्या सह-कार्याने त्यांनी हा गाथा शक्य तितक्या अस्सल स्वरूपात दोन खंडांत प्रसिद्ध केला (१८६९–७३). हा गाथा *शंकर पांडुरंगी*, *इंदुप्रकाश*, *सरकारी* या नावांनीही ओळखला जातो. या दोन्ही ग्रंथांचे संपादन करताना घेतलेल्या भरपूर परिश्रमाने त्यांनी अभ्यासकाची बरीच सोय करून ठेवली आहे. वैदिक वाङ्मयाचा परिचय व्हावा, या उद्देशाने त्यांनी १८७६ साली *वेदार्थयत्न* नामक मासिक सुरू केले. त्यात ऋग्वेद संहितेचे मराठी व इंग्रजी भाषांतर व टीपा दिल्या जात. हे मासिक १८८२ पर्यंत चालले. या बहात्तर अंकांत ऋग्वेद संहितेच्या आठ अष्टकांपैकी निम्मा भाग आला आहे.

गं. दे. खानोलकर, के. ए. पोतदार

**पंडित, हरि माधव :** (ज. २१ डिसेंबर, १८४९, हरिपूर, जि. सांगली – मृ. १५ मार्च, १८९९, नागपूर). निबंधकार, समीक्षक. वयाच्या चौदाव्या वर्षी वडिलांसोबत इंग्रजी शिक्षणासाठी मुंबईस आगमन. एल्फिन्स्टन कॉलेजातून १८७२ पर्यंत बी.ए.पर्यंतचे शिक्षण. डॉ. रामकृष्ण गोपाळ भांडारकर यांच्या प्रयत्नांनी नागपूरच्या सिटी स्कूलचे मुख्याध्यापक. नंतर भोसले इस्टेटीशी संबंध. भोसल्यांचे कारभारी म्हणून काम केले. दोन वर्षे त्यांनी *देशसेवक* हे साप्ताहिक चालविले.

कॉलेजमध्ये असतानाच ते 'विविधज्ञान विस्तारा'त लिहीत होते. वामनराव मावळंकर ह्यांच्या सहकार्याने त्यांनी भवभूतीच्या *श्रीमहावीर-चरित* या वीररसप्रधान नाटकाचे गद्यपद्यात्मक भाषांतर तसेच स्वतंत्रपणे क्षेमेन्द्रकृत *चंडकौशिक* नाटकाचे भाषांतर केले (१८७३ ते १८७६). त्यानंतर *श्रीमन्नारायणराव पेशवे* (१८७७ ते १८८१) हे स्वतंत्र नाटक लिहिले. बखर व कागदपत्रे यांच्या आधारे त्यांनी *नागपूरकर भोसले यांचा इतिहास* (१८७६-७७) लिहिला. त्यानंतर मात्र त्यांनी चर्चात्मक, चरित्रात्मक व समीक्षणात्मक लेखनाकडेच प्राधान्याने आपली लेखणी वळविली. कृष्णशास्त्री चिपळूणकर, सौ. आनंदीबाई जोशी, जनार्दन बाळाजी मोडक व जावजी दादाजी या चार कर्तबगार व्यक्तींची छोटेखानी चरित्रे त्यांनी लिहिली असून *चार चरित्रात्मक लेख* (१९०८) या पुस्तकात ती समाविष्ट आहेत. रामभाऊ गुंजीकरांनी संपादकत्व सोडल्यावर हरिपंत 'विविधज्ञान विस्तारा'चे सपादक (१८७१–९९) होते. आपल्या कारकीर्दीत या मासिकात त्यांनी विपुल लेखन केले. बहुश्रुतता, शोधकता, लेखनकुशलता, हे त्यांचे गुण 'विस्तारा'ची प्रतिष्ठा वाढविण्यास फार उपयोगी पडले.

गं. दे. खानोलकर, के. ए. पोतदार

**पंतप्रतिनिधी, भवानराव श्रीनिवास :** (ज. २४ ऑक्टोबर, १८६८, औंध – मृ. १३ एप्रिल, १९५१, औंध). औंध संस्थानचे अधिपती. साहित्यिक व साहित्यप्रेमी रसिक. मुंबई विद्यापीठाचे बी.ए.

वाङ्मय, संगीत, चित्रकला. इतिहास इत्यादी विषयांचा चांगला व्यासंग. ते स्वतः उत्कृष्ट चित्रकार आणि कीर्तनकारही होते. *सचित्र शिवचरित्र* (१९३०) ह्या चित्रसंग्रहामध्ये त्यांच्या हातची अनेक चित्रे आहेत. *श्रीभवानराव गौरवग्रंथा*मधील (१९३८) त्यांच्या लेख-संग्रहात चित्रकला, धर्म, व्यायाम, शिक्षण, राज्यव्यवहार, इतिहास इत्यादी विविध विषयांचा परामर्ष घेणारे त्यांचे लेख समाविष्ट आहेत.

*नेत्रसंवर्धन व नेत्रव्यायाम* (१९३८) व *आहारचिकित्सा शिक्षक* (१९३२) ही त्यांची अन्य पुस्तके. सूर्यनमस्कारासारख्या व्यायामाचा पुरस्कार करण्यात ते अग्रभागी होते.

इंदूर येथे भरलेल्या मराठी साहित्य संमेलनाचे ते अध्यक्ष होते. या संमेलनाच्या अध्यक्षपदावरून त्यांनी केलेले भाषण विचारप्रवर्तक आहे. पुण्याच्या महाराष्ट्र साहित्य परिषदेची वास्तू ज्या जागेवर उभी आहे ती जागा औंधकरांनी परिषदेला दिली आहे. आपल्या संस्थानात त्यांनी पुरोगामी स्वरूपाच्या काही सुधारणा करण्याचा उपक्रमही केला होता. जुन्या-नव्याचा समन्वय साधणारे एक उपक्रमशील, महाराष्ट्रीय संस्थानिक या नात्यानेही पंतप्रतिनिधींचे नाव आवर्जून घेतले जाते.

मीनल मिसाळ, हरिश्चंद्र थोरात

**पटवर्धन, काशिनाथ नारायण :** ० विनोदी ० नाटकी : (ज. १८७८–मृ. २७ ऑक्टोबर, १९०८, खामगाव). टीकाकार. आरंभी वऱ्हाडातील तेल्हारा येथे अँग्लो व्हर्नाक्युलर शाळेचे हेडमास्तर. नंतर खामगाव येथे नायब तहसीलदार. प्लेगने ऐन उमेदीत मृत्यू.

ह्यांनी 'विनोदी' ह्या नावाने मासिक मनोरंजनात 'विनोदलहरी' लिहिल्या. तथापि 'नाटकी' या नावाने त्यांनी नंतर लिहिलेले *नाटक्याचे तारे* विशेष गाजले. त्यांच्याच 'नाटकी 'वरून गडकऱ्यांनी 'सवाई नाटकी' हे नाव धारण केले होते. 'नाट्यगुरू' (मनोरंजन, नोव्हेंबर, १९०८) हा त्यांचा अखेरचा लेख. ही लेखमाला त्यांच्या मरणोत्तर प्रसिद्ध झाली. *नाटक्याचे तारे* या पुस्तकाची दुसरी आवृत्ती १९१४ सालीच काढावी लागली. पुस्तकाला जोडलेल्या श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांच्या गुणग्राहक, प्रशंसापर प्रस्तावनेवरून पटवर्धनांच्या विनोद बुद्धीची व विनोद निर्मितिक्षमतेची कल्पना येते. ह्या नाट्यविषयक लेखमालेत नटी–सूत्रधारापासून नायक–खलनायकाच्या ठरीवपणावर, नटांच्या व्यसनांवर, ठराविक छापाच्या संतविषयक नाटकांवर, नाटक मंडळ्यांवर, नाटकगृहांवर, त्यांतील विसंगती व हास्यास्पदता अचूक टिपून, उपहासप्रचुर व विनोदपूर्ण टीका केली आहे. पटवर्धनांनी लिहिलेल्या *महाराणा संग्रामसिंह* ह्या नाटकाला १९०८ साली बक्षीस मिळाले होते.

वा. वा. दातार, म. ना. जोशी

**पटवर्धन, (सर) गंगाधरराव गणेश :** (ज. १८६८, बारामती – मृ. ११ डिसेंबर, १९३९). मल्लविद्याविषयक ग्रंथाचे लेखक. १८७५ मध्ये मिरज संस्थानच्या अधिपतींनी त्यांना दत्तक घेतले. कोल्हापूरच्या राजाराम हायस्कूलात शिक्षण. १८८७ सालापासून मिरज संस्थानचे राजे. इमामदिन ह्या प्रख्यात मल्लाकडून त्यांनी कुस्तीचे धडे घेतले. १९१५ साली मुंबई येथे भरलेल्या मराठी साहित्य संमेलनाचे ते अध्यक्ष होते. 'व्यायाम' मासिकातून स्फुट लेखन. *मल्लविद्याशास्त्र* खंड १ व २ (१९०६), *भीमसेनी कुस्ती भाग १* (१९२०) *भाग २* (१९२२) खंडात प्रसिद्ध. पहिल्या खंडाचे इंग्रजीतून भाषांतर झाले आहे.

हरिश्चंद्र थोरात, म. ना. जोशी

**पटवर्धन, पांडुरंग नरसिंह :** (ज. १५ जानेवारी, १८८६ – मृ. ६ जुलै, १९२१). इतिहाससंशोधक. शिक्षण अहमदनगर येथे मॅट्रिकपर्यंत. काही दिवस सरकारी नोकरी. त्यानंतर रावबहादूर पटवर्धन ह्यांचेकडे मुखत्यारी.

ह्यांनी *राष्ट्रहितेच्छु* हे वर्तमानपत्र काही महिने चालविले. त्यांचे इतिहाससंशोधनात्मक सुमारे ७५ स्फुटलेख प्रसिद्ध आहेत. *बुंदेल्यांची बखर* (१९२०) हे त्यांचे संपादित पुस्तक. स्कॉट ह्याने फारशी बखरीचे १७९४ साली इंग्रजी भाषांतर केले होते; त्याचे हे मराठी भाषांतर.

ग. ह. खरे

**पटवर्धन, माधव त्र्यंबक :** ० माधव जूलियन ० दिव्य मा. ज. ० एम्. जूलियन : (ज. २१ जानेवारी, १८९४, बडोदे–मृ. २९ नोव्हेंबर, १९३९, पुणे). कवी, खंडकाव्य निर्माते, कोशकार, छंदोरचनाकार, भाषांतरकार, भाषाशुद्धीचे पुरस्कर्ते व प्रचारक. 'रविकिरण मंडळा 'चे प्रमुख सदस्य. प्राथमिक मराठी शिक्षण आवळस (जि. पुणे) येथे. नंतरचे एम्.ए. (फार्सी) पर्यंतचे शिक्षण बडोदे येथे. काही वर्षे शिक्षक म्हणून काम केल्यानंतर पुण्यात फर्ग्युसन कॉलेज आणि कोल्हापुरात राजाराम कॉलेज येथे फारसीचे प्राध्यापक. पूर्वाश्रमीच्या गंगूताई गरुड (लीलाबाई पटवर्धन) ह्यांच्याशी २९ मे, १९२८ रोजी विवाह. *छंदोरचना* या ग्रंथाला मुंबई विद्यापीठाची डी.लिट्. (१९३९) ही पदवी. या पदवीचा पहिला मान मराठीत मिळविला तो माधवराव पटवर्धन यांनी. जळगाव येथे भरलेल्या महाराष्ट्र साहित्य संमेलनाचे ते अध्यक्षही होते (१९३९). स्वकाळात माधवरावांचे व्यक्तित्व वादळी ठरल्यामुळे त्यांच्या निधनानंतर त्यांच्यावर तीन-चार चरित्रग्रंथ लिहिले गेले आहेत. महाराष्ट्रात त्यांच्या कवितेपेक्षाही त्यांच्या चरित्राची चर्चा अधिक प्रमाणात आहे.

माधवराव पटवर्धनांचे वाङ्मयीन कार्य विविध स्वरूपाचे असून त्यांचे दोन वर्ग करता येतील. एक काव्यरचना व दुसरे काव्येतर लेखन. माधवरावांनी स्फुट व दीर्घ अशी दोन्ही प्रकारची काव्यरचना केली आहे. त्यांची पहिली उपलब्ध कविता १९०६ मधील आहे. तेहतीस वर्षे त्यांचे काव्यलेखन चालू होते. बडोदे येथील वास्तव्यात वि. द. घाटे प्रभृती समवयीन, समवृत्तीच्या स्नेह्यांच्या संगतीत त्यांच्या कवित्वाची वाढ झाली व कविवर्य चंद्रशेखर ह्यांच्या सहवासात त्यांच्यावर इष्ट असा संस्कार घडला. 'काव्यरत्नावली'तील (जुलै, १९१९) *शिशिराची फुले* (स्वप्नरंजन क्र. ११) ही त्यांची पहिली प्रकाशित कविता. पटवर्धनांच्या एकूण स्फुट कविता सुमारे ३७५ आहेत. त्यांपैकी ३५० कविता संग्रहित आहेत. काही थोड्या प्रकाशित पण असंग्रहित आहेत. *गज्जलांजली* (१९३३), *स्वप्नरंजन* (१९३४), *मधुलहरी व इतर कविता* (निधनोत्तर १९४०) हे त्यांच्या स्फुट कवितांचे संग्रह. *स्वप्नरंजन* आणि *मधुलहरी व इतर कविता* या दोन संग्रहात त्यांच्या भावकविता समाविष्ट झाल्या आहेत. पटवर्धनांच्या काव्यलेखनाची प्रमुख प्रेरणा प्रेमानुभूतीच्या आत्मप्रकटीकरणाची आहे. गोविंदाग्रजांनंतर 'प्रेमाचे शाहीर' या पदवीवर माधव जूलियन यांचाच निर्विवादपणे हक्क स्थापन झाला आहे.

१९११ ते १९१८ या प्रारंभिक काळातील त्यांच्या कवितेवर रे. टिळक, गोविंदाग्रज, बालकवी यांचा प्रभाव आहे. मात्र १९१९ पासून त्यांच्या कवितेला वेगळे वळण लागत गेले. वैयक्तिक स्वप्नरंजनातून व स्वतःच्या सुखदुःखाच्या कोषातून बाहेर पडून आयुष्याला नवा आकार देण्याची त्यांची धडपड सुरू झाली.

*गज्जलांजली* या संग्रहातील गझलांच्या द्वारा पटवर्धनांनी मराठी कवितेत एक नवीन वृत्त रूढ केले. ह्या संग्रहातील निदान पाऊणशे गझल प्रीतिभावनेशी निगडित आहेत. मुक्त, धुंद तरीही उच्छृंखल नसलेल्या उत्कट, समर्पणशील प्रीतिभावनेचे मराठी कवितेला व रसिकांना तो वेळपर्यंत अनोखे असे दर्शन त्यांनी या गझलांतून घडवले आहे.

पटवर्धनांची *विरहतरङ्ग* (१९२६), *सुधारक* (१९२८) आणि *नकुलालङ्कार* (१९२९) ही तीन दीर्घकाव्ये प्रसिद्ध आहेत. *तुटलेले दुवे* (१९३८) ह्या काव्यसंग्रहातील सुनितांची माला म्हणजेही एक दीर्घकाव्यच आहे. पटवर्धनांनी उमरखय्यामच्या रुबायांची तीन वेळा तीन प्रकारांनी भाषांतरे केली. एप्रिल, १९२८ ते ऑक्टोबर, १९३१ ह्या सुमारे साडेतीन वर्षांच्या काळात त्यांनी हा योजनाबद्ध प्रकल्प पूर्ण केला. *उमरखय्यामच्या रुबाया* (१९२९) हे उमरखय्यामच्या मूळ पर्शियन रुबायांच्या अनुवादाचे पुस्तक आहे. खय्यामच्या ५२४

रुबायांची निवड करून त्यांनी हे भाषांतर केले. ह्या भाषांतराची टीकाकारांनी योग्य दखल घेतली नाही म्हणून आणि आपल्या भाषांतरविषयक मतांचे प्रात्यक्षिक देण्यासाठी पटवर्धनांनी फिट्झ्जेरल्डने 'Rubaiyat of Omar Khayyam' या नावाने उमरखय्यामच्या रुबायांचे जे रूपांतर प्रसिद्ध केले त्यांचे *द्राक्षकन्या* (१९३१) या नावाने भाषांतर केले. पुढे *मधुलहरी* (१९४०) ह्या नावाने फिट्झ्जेरल्डने संस्कारित केलेल्या चौथ्या आवृत्तीचे त्यांनी भाषांतर केले.

माधव जूलियन यांच्या समग्र कवितांचे संकलन व संपादन प्रा. रा. श्री. जोग, डॉ. द. न. गोखले आणि डॉ. सु. रा. चुनेकर यांनी 'समग्र माधव जूलियन' या नावाने केले आहे (१९७७).

काव्यनिर्मितीबरोबरच माधवराव पटवर्धनांनी काव्यविचारही केला आहे. *काव्यविहार* (१९४७) व *काव्यचिकित्सा* (१९६४) ह्या दोन संग्रहांत त्यांचे साहित्यसमीक्षणात्मक आणि साहित्य विमर्शात्मक काही लेख संकलित केले आहेत. त्यांचे टीकालेखन मुख्यतः आधुनिक कवी आणि कविता ह्यांच्या संबंधात आहे.

*छंदोरचना* (१९३७) हा त्यांचा मौलिक व पांडित्यपूर्ण असा संशोधनात्मक ग्रंथ. एक हजार वृत्ते, दोनशेसाठ जाती व त्रेपन्न छंद एवढ्या पद्यरचनाविषयक तत्त्वांची या ग्रंथात मांडणी करण्यात आली आहे. या ग्रंथाच्या मौलिकतेमुळे मुंबई विद्यापीठाने पटवर्धनांना तत्पूर्वी मराठीत कोणालाही न मिळालेली डी.लिट्. ही पदवी देऊन त्यांचा गौरव केला. १९३३ च्या नाशिक येथील कविसंमेलनाचे ते अध्यक्ष होते. १९३४ मध्ये बडोदे येथे भरलेल्या साहित्यसंमेलनांतर्गत कविशाखेचे ते अध्यक्ष होते. पुढे दोन वर्षांनी (१९३६) ते जळगाव येथे भरलेल्या साहित्यसंमेलनाचे अध्यक्ष होते.

*फार्सी-मराठी-कोश* (१९२५) हे त्यांचे आणखी एक महत्त्वाचे कार्य. ऐतिहासिक साहित्य व कागदपत्रे वाचावयाला प्रत्यक्षपणे उपयोगी ठरावा म्हणून त्यांनी हा कोश तयार केला. अशा प्रकारचा मराठीतील हा पहिलाच कोश होय. जन्मभर फार्सीचे अध्ययन करूनही त्यांनी भाषाशुद्धीच्या चळवळीला सक्रिय पाठिंबा दिला. *भाषाशुद्धी-विवेक* (१९३८) या भाषाशुद्धीवरील त्यांचे लेख व भाषणे ह्यांचा संग्रह. लिपिसुधारणाविषयीचे त्यांचे लेखन १९२१ पासूनच चालू होते.

माधवरावांनी केलेले आणखी महत्त्वाचे कार्य म्हणजे त्यांनी केलेले भा. रा. तांबे यांच्या कवितांचे संकलन-संपादन. उत्कृष्ट संपादनाचा हा एक नमुना मानला जातो. त्यांनी इंग्रजीतूनही काही लेखन केले आहे.

संदर्भ : (१) शंकर केशव कानेटकर, 'स्वप्नभूमी', व्हीनस प्रका., पुणे, १९६५. (२) गं. दे. खानोलकर, 'माधव जूलियन', 'डॉ. माधव त्रि. पटवर्धन', स्वस्तिक पब्लिशिंग हाऊस, मुंबई, १९५१. (३) डॉ. द. न. गोखले, 'डॉ. पटवर्धन ऊर्फ माधव जूलियन', मौज, मुंबई, १९७८. (४) डॉ. सु. रा. चुनेकर, 'माधवराव पटवर्धन', वाङ्मयदर्शन', मौज, मुंबई, १९७३. (५) लीलाबाई पटवर्धन, 'आमची अकरा वर्षे', य. गो. जोशी प्रकाशन, पुणे, १९४५.

सु. रा. चुनेकर, म. ना. लोही, गो. म. कुलकर्णी

**पटवर्धन, रामचंद्र विनायक ऊर्फ बाबासाहेब** : (ज. १८७४– मृ. ४ फेब्रुवारी, १९४९). वेदान्ताचे अभ्यासक, वेदांचे भाषांतरकार व ज्योतिष विषयाचे लेखक. ब्रह्मर्षी विनायक रामचंद्र पटवर्धनांचे चिरंजीव. बी.ए., एलएल्.बी. वकील.

ह्यांनी *श्रुतिबोध* (१९०८-०९) मासिक काही काळ चालविले, त्यातून ऋग्वेदाच्या सात मंडलांतील काही सूक्तांचे भाषांतर प्रसिद्ध झाल्यावर मासिक बंद पडले (१९१५). पुढे संपूर्ण ऋग्वेदाचे भाषांतर (*श्रुतिबोध* खंड १, २, ३; मंडले १–१०) प्रसिद्ध केले (१९४२). त्यांचे प्रतिपादन असे आहे की, 'अनेकात एकत्व पाहणे व एकत्वात अनेकत्व पाहणे' या भारतीय संस्कृतीच्या वैशिष्ट्याचे उगमस्थान, ऋग्वेद हेच आहे.

*ऐतरेय उपनिषद : मूळ व मराठी भाषांतर* (१९१३), *मानवी पूर्वज* (१९१६), *माधवोपाध्यायविरचित आयुर्वेद-प्रकाश* (१९२५), *आकाश ज्योतिष* (१९२३), *भारतीय वेधपद्धती अथवा सूर्यसिद्धांत* (१९३७) ही त्यांची महत्त्वाची पुस्तके. पटवर्धन हे टिळक-पंचांगाचे पुरस्कर्ते होते.

प्र. नी. नवरे, म. ना. लोही

**पटवर्धन, लीलाताई माधवराव** : (ज. १५ ऑगस्ट, १९०८– मृ. ७ मे, १९४९). आठवणी-लेखिका. लीलाताई ह्या कर्ते सुधारक बाबासाहेब गरुड यांच्या कन्या आणि डॉ. माधवराव पटवर्धन (माधव जूलियन) यांच्या पत्नी. जी.ए. (महिला विद्यापीठ).

*आमची अकरा वर्षे* (१९४५) ह्या पुस्तकात लीलाबाईंनी माधवरावांच्या सहजीवनाचा आलेख काढला आहे. माधवरावांच्या अनेकपदरी व्यक्तिमत्त्वाचे पदर हलक्या हाताने उलगडण्याचा प्रयत्न त्यात केला आहे. लीलाबाईंचा विवाह माधवरावांशी १९२८ साली झाला. एकमेकांचे स्वभाव, जीवनाकांक्षा व आयुष्यक्रमणाविषयीचे विचार परिपक्व झाल्यावर विवाह होऊनही आरंभी दोघांत संघर्ष निर्माण झाला. पुढे दोघांनीही एकमेकांना सहानुभूतिपूर्वक समजून घेण्याचा प्रयत्न करीत अखेरच्या काळात सामंजस्याचे, सुख-समाधानाचे वातावरण निर्माण केले. लीलाबाईंनी ह्या साऱ्या जीवनपटाचे दर्शन घडविताना माधवरावांचे जे चित्र रेखाटले ते जिज्ञासूंना, अभ्यासकांना उपयुक्त आहे. प्रांजळ आत्मकथनाच्या दृष्टीने *आमची अकरा वर्षे* हे एक मराठीतील महत्त्वाचे पुस्तक आहे.

शुभदा सबनीस, म. ना. लोही

संदर्भ : डॉ. द. ना. गोखले – (१) 'डॉ. पटवर्धन ऊर्फ माधव जूलियन'. (२) 'एका बरियाचे चरित्र'.

**पटवर्धन, वासुदेव बळवंत** : ० वसंत : (ज. १५ मे, १८७०, सातारा – मृ. २६ ऑक्टोबर, १९२१). कवी व काव्यसमीक्षक. प्राथमिक शिक्षण साताऱ्यास व माध्यमिक उच्च शिक्षण नागपूर येथे. बी.ए. (कलकत्ता विद्यापीठ, १८९३). शिकत असताना केशवसुत आणि रेव्हरंड टिळक यांचेशी मैत्री व सहवास. 'वसंत' या टोपण नावाने कविता-लेखन. पदवीधर होऊन पुण्यास प्रथम न्यू इंग्लिश स्कूलमध्ये शिक्षक व नंतर फर्ग्युसन कॉलेजात इंग्रजीचे प्राध्यापक. नव्या-जुन्या साहित्याचे मर्मज्ञ पंडित.

*काव्य आणि काव्योदय* (१९०९) हा ह्यांचा प्रसिद्ध ग्रंथ. ह्या ग्रंथात त्यांनी काव्याच्या संदर्भात काही प्रश्नांची चर्चा केली आहे. मराठीतील आधुनिक साहित्य तत्त्वविवेचनाला खराखुरा प्रारंभ प्रस्तुत ग्रंथाने झाला, असे म्हटले जाते. काव्योदय आणि भौतिक व मानवी परिस्थिती यातील परस्पर संबंध त्यांनी यातून स्पष्ट केला आहे. मराठीतील काव्यवाङ्मय प्रामुख्याने निवृत्तिपर बनण्याला महाराष्ट्राची अस्थिर राजकीय परिस्थिती कारणीभूत आहे असे त्यांचे मत आहे. या ग्रंथात त्यांनी केलेले प्रतिभेच्या लक्षणांचे वर्णन अत्यंत मार्मिक व सूक्ष्म आहे.

१९१७ साली मुंबई विद्यापीठातर्फे 'महाराष्ट्रातील भक्तिमार्गीय संत, त्यांचे वाङ्मय व कार्य' या विषयावर पटवर्धनांनी इंग्रजीतून सात व्याख्याने 'विल्सन फायलॉलॉजिकल लेक्चर्स' या मालेतून दिली. त्यातील सहा व्याख्यानांचा मराठी अनुवाद 'मासिक मनोरंजन'मध्ये प्रसिद्ध झाला. या व्याख्यानांतून त्यांनी काही नवे विचार मांडले आहेत. *राजनीतीची मूलतत्त्वे* (१८९६) हा हेन्री सिजविकच्या ग्रंथाचा अनुवाद आणि *शिक्षण, शिक्षक व हल्लीचा अभ्यासक्रम* (१९०६) हे स्वतंत्र पुस्तक, ही त्यांची अन्य ग्रंथनिर्मिती. नाट्यछटाकार दिवाकरांना 'नाट्यछटा' हा नवीन वाङ्मयप्रकार लिहिण्याची

प्रेरणा पटवर्धनांनी दिली असून 'नाट्यछटा' हे नावही त्यांनीच सुचविले होते.

श्री. व. पारसनीस, म. ना. लोही

**० पद्दे बापूराव :** पहा कुलकर्णी, श्रीधर कृष्ण

**पडवळ, तुकाराम तात्या :** ० एक हिंदू : (ज. १८३१, वडावरे, जि. रत्नागिरी – मृ. ३ जून, १८९८). *जातिभेदविवेकसार* या प्रसिद्ध ग्रंथाचे कर्ते. संतांच्या अभंग वाङ्मयाचे संकलक व प्रकाशक.

'रॉबर्ट मनी शाळे'त इंग्रजीचे शिक्षण. पेढी स्थापून भागीदार घेऊन व्यापार कल्पकतेने करणारे पहिले हिंदी व्यापारी. १८८० साली ते थिऑसॉफिकल सोसायटीचे सभासद झाले. थिऑसफीबरोबरच हिंदुधर्मशास्त्राचाही त्यांचा सूक्ष्म अभ्यास होता.

त्यांनी 'तत्त्वविवेचक' छापखाना सुरू करून संस्कृत धर्मग्रंथ, वारकरी संतांच्या अभंगगाथा, काही इंग्रजी ग्रंथ असे बरेच ग्रंथ प्रसिद्ध केले. हिंदुधर्मांच्या चिंतनातूनच *जातिभेदविवेकसार* (१८६१) हा त्यांचा ग्रंथ सिद्ध झाला. तो त्यांनी 'एक हिंदू' हे टोपणनाव घेऊन लिहिला. या ग्रंथाच्या १८८४ पर्यंत तीन आवृत्त्या (१८६१, १८६५, १८८४) निघाल्या. वेदोत्तर काळात धर्माधिकारी जे ब्राह्मण त्यांनी केवळ स्वार्थाकडे लक्ष देऊन वर्णांवरून जाती करण्याचा प्रयत्न केला असावा, असे म्हणण्यास शास्त्रात आधार सापडतात; असा निष्कर्ष या ग्रंथात काढण्यात आलेला आहे. *तुकारामबावा आणि त्यांचे शिष्य यांच्या अभंगाची गाथा*, भाग १, भाग २ (१८८१) हे संकलन व *श्रीएकनाथ महाराजांच्या अभंगाची गाथा* (१९०३) हे संपादन ही त्यांची आणखी दोन महत्त्वपूर्ण प्रकाशने.

उषा ढाकळकर, के. ए. पोतदार

**० पतितपावनदास :** पहा देव, केशव नारायण

**० पद्मविहारी :** पहा जोशी, रघुनाथ गणेश

**पदमनजी, बाबा :** ० मुळे, बा. व. : (ज. मे, १८३९, बेळगाव – मृ. २९ ऑगस्ट, १९०६). पहिले मराठी कादंबरीकार, आत्मचरित्रलेखक, कोशकार व संपादक. ह्यांचे शिक्षण ख्रिस्ती शाळांतून झाले. आरंभी ख्रिस्ती शिक्षकांनी हिंदुधर्मावर केलेली टीका बाबांना रुचत नसे. पण नंतर (१८५४) त्यांनी ख्रिस्ती धर्माचा स्वीकार केला. आयुष्य ख्रिस्ती धर्मप्रचारार्थ वेचले.

ह्यांची *यमुनापर्यटन* अथवा *हिंदुस्थानातील विधवांच्या स्थितीचे निरूपण* (१८५७) ही कादंबरी विशेष प्रसिद्ध आहे. मराठीतील पहिली स्वतंत्र सामाजिक कादंबरी म्हणून तिला ऐतिहासिक महत्त्व आहे. मात्र त्यांची भूमिका कादंबरीकाराची नसून ख्रिस्ती धर्मप्रचारकाची व समाजसुधारकाची होती. यमुना ही या कादंबरीची नायिका. ती शेवटी ख्रिस्ती होते व एका ख्रिस्ती गृहस्थाशी तिचा पुनर्विवाह होतो, असे या कादंबरीत दाखविले आहे. मराठीतील ही पहिली वास्तववादी कादंबरी. *अरुणोदय* (१८८८) हे पदमनजींचे आत्मचरित्र. आपल्या मनात घडून आलेल्या धार्मिक क्रांतीची हकीकत त्यांनी येथे प्रांजळपणे सांगितली आहे. *अनुभव-संग्रह भाग १* (१८९४) व *भाग २* (१९०४) यांतूनही त्यांनी आपली जीवनकथा प्रगट केली आहे. त्यांचे आत्मचरित्र म्हणजे तत्कालीन पन्नास वर्षांच्या सामाजिक इतिहासाचे चित्रण होय. वरील पुस्तकांखेरीज त्यांची विविध प्रकारची सुमारे शंभराच्यावर पुस्तके प्रसिद्ध झाली आहेत. *नेपोलियनची शकुनवंती* हे त्यांचे पुस्तक एका इंग्रजी पुस्तकाचे भाषांतर असून ते बाबा पदमनजींच्या वयाच्या सतराव्या वर्षी (१८५६) प्रसिद्ध झाले. *शब्द-रत्नावली* (१८६०), *मराठी-इंग्रजी कोश* (१८६३), *इंग्रजी--मराठी कोश* (१८६३), *संस्कृत-मराठी कोश* (१८९१) हे त्यांचे चार कोशग्रंथ. *शब्द-रत्नावलीत* एकेका शब्दाचे अनेक पर्यायी समानार्थक शब्द आढळतात.

*हिंदुधर्माचे स्वरूप* (भाग १ – १८६३ व भाग २ – १८८४) हा ८३६ पृष्ठांचा त्यांचा ग्रंथ. वेद, दर्शने, धर्मशास्त्रे, पुराणे, जातकर्म, संस्कार, आश्रम, नित्यनैमित्तिक कर्मे, देव-देवते, तीर्थे, यात्रा, भूतपिशाच, देवऋषी, शकुन, मुहूर्त इत्यादी विषयींची बहुविध माहिती या ग्रंथात दिलेली आहे. *हिंदुलोकांच्या सणांविषयी निबंध* (१८५३), *व्यभिचार-निषेधक बोध* (१८५४), *कुटुंबसुधारणा* (१८५५), *निबंधमाला* (१८६०), *शाळांकरिता महाराष्ट्र देशाचा संक्षिप्त इतिहास* (१८६६) ही त्यांची काही अन्य पुस्तके. ख्रिस्ती धर्मप्रचारासाठीही त्यांनी लेखन केले आहे. *ख्रिस्ती लोकांचे कर्तव्यसार* (१८५६), *नव्या करारावरील टीका, भाग–१* (१८७४) व *भाग–२* (१८७७) इत्यादी पुस्तके या संदर्भात उल्लेखनीय. *नव्या करारावरील* त्यांचा ग्रंथ सुमारे १,४०० पृष्ठांचा असून त्यात *नवा करार* व त्यावरील स्पष्टीकरणात्मक व विवरणात्मक टीपा आहेत. कित्येक ठिकाणी वेद, उपनिषदे, गीता, पुराणे, ज्ञानेश्वरी, तुकारामगाथा, दासबोध इत्यादी ग्रंथांतील उतारे समर्थनार्थ व विरोधार्थ दिलेले आहेत. ख्रिस्ती धर्मप्रचारासाठी निघालेल्या 'उषःप्रभा', 'सत्त्वदीपिका', 'सत्यवादी', 'ऐक्यदर्शक पत्रिका' इत्यादी नियतकालिकांचे संपादन व 'ज्ञानोदय' मधून सतत पन्नास वर्षे ख्रिस्तीधर्मप्रचारकाचे कार्य यांनी केले.

म. वा. धोंड, म. ना. लोही

**पदे, शंकर दाजीशास्त्री :** ० पिनाकि ० भ्रमर ० शंकर : (ज. १८६७ – मृ. ३० मार्च, १९०९, प्रयाग). आयुर्वेदावरील ग्रंथांचे संग्राहक व प्रकाशक, लेखक व कादंबरीकार.

ह्यांनी *राजवैद्य* (१८८३) व *आर्यभिषक्* (१८८८) ही दोन वैद्यक विषयांची व *भारतधर्म* अशी तीन मासिके काढली. वैद्यक शास्त्रावरील त्यांनी प्रकाशित केलेल्या अनेक ग्रंथांपैकी *आर्यभिषक् भाग १ ते ८* (१८९१ ते १९००), *वनौषधि गुणादर्श भाग १ ते ७* (१८९३), *चरक संहिता भाग १ ते १४*, *बालरोग चिकित्सासार*, *वाग्भट भाग १-२* इत्यादी ग्रंथ महत्त्वाचे आहेत. 'सद्गुण आणि आदर्श विचारांचे दिग्दर्शन' करण्याच्या हेतूने त्यांनी *सुंदराबाई अथवा साध्वी स्त्री चरित्र* आणि *ऐंद्रजालिक कंकण अथवा मदनचंद्रिका आणि रत्नकांत* (१८८८) ह्या दोन कादंबऱ्याही लिहिल्या आहेत. 'पिनाकी', 'भ्रमर', 'शंकर' या नावांनीही त्यांनी विविध प्रकारचे लेखन केले आहे. वैद्यकक्षेत्रातील त्यांच्या मौलिक कामगिरीबद्दल शारदापीठाच्या शंकराचार्यांनी 'आयुर्वेदमहोपाध्याय' या पदवीने त्यांचा गौरव केला होता.

नंदिनी लोटलीकर, म. ना. लोही

**परळकर, लक्ष्मण विनायक :** (ज. २२ नोव्हेंबर, १८७१, मुंबई – मृ. ७ मे, १९५१). संतवाङ्मयाचे अभ्यासक, अनुवादक आणि चरित्रकार. शिक्षण बी.ए., एलएल्.बी. व्यवसाय सॉलिसिटरचा. दोन वर्षे बंगालमध्ये वास्तव्य.

बंगालातील वास्तव्यात तरुण परळकरांवर ब्राह्मोसमाजाच्या विचारांचा प्रभाव पडला. त्यांनी देवेंद्रनाथांच्या *ब्राह्मधर्म* ह्या बंगाली ग्रंथाचा मराठी अनुवाद केला (१९५०). बंगाली कवी नवीनचंद्र सेन ह्यांच्या ईश्वर गुणवर्णनात्मक चार कवितांचे गद्य अनुवादही केले. यामागील त्यांची भूमिका वाचकांची मने उदार व्हावी, त्यांच्या धार्मिक वृत्तीला योग्य वळण लागावे, ही होती. फटकळपणे, पाखंडमताचे खंडन करून देणारा तुकाराम त्यांना जवळचा वाटल्याने त्यांनी *तुकारामचरित्र* (१९४६) लिहिले. *मराठी संत आणि मराठी राज्याची स्थापना* (१९३१) ह्या ग्रंथात त्यांनी रामदासांचे विचारविश्व तुकारामांपेक्षा प्रतिगामी होते, असे प्रतिपादन केले. बाबू नवीनचंद्र सेन यांच्या

बंगाली कृतीवरून रचलेली *श्रीकृष्णनामामृत अथवा आर्य अनार्यांचे एकीकरण* (१९२६) ही कादंबरी, *लहान गोष्ट* (१९२७) हे चार्लस् डिकन्सच्या 'ओल्ड क्युरिऑसिटी शॉप'चे भाषांतर. *प्रार्थनासमाजाचा परिचय* (१९३०) हा इतिहास, *संशयनिरसन* (१९१२) व *संत तुळसीदास गोस्वामी* (१९५०) ही नाटके, *असतधारा* (१९४३), *हिंदुधर्मप्रदीप* (१९४४) ही त्यांची इतर पुस्तके. याशिवाय 'विविधज्ञानविस्तार', 'नवयुग', 'किर्लोस्कर', 'सुबोधपत्रिका' आदी नियतकालिकांतून त्यांचे धर्मविषयक, बुद्धिनिष्ठ व पुरोगामी विचार मांडणारे लेख प्रसिद्ध झाले आहेत. त्यांचे अन्य ग्रंथलेखन : *महात्मा गांधींची शिकवण* (१९३१), *पार्वतीगीता* (१९४८), *परळकरकृत संसारधर्म* (१९४८), *परळकर ल. वि.–कथागुच्छ* (१९२६), *सती सावित्री* (१९५०).

हरिश्चंद्र थोरात, म. ना. लोही

**परांजपे, गंगाधर बाळकृष्ण :** (ज. १८६८–मृ. १४ सप्टेंबर, १९३०). वैद्यकातील आहार आणि आरोग्यशास्त्रविषयक ग्रंथांचे कर्ते. प्राथमिक शिक्षण मुंबईस व इंग्रजी शिक्षण पुणे येथे. ते बडोद्याचे एल्.एम्. ॲंड एस. होते. ते *नेटिव्ह ओपिनियन* पत्राचे चालक होते. त्यांनी गायकवाड सरकारच्या ग्रंथमालेसाठी *आहार-मीमांसा* (१८९८), व *रोग्याची शुश्रूषा आणि आरोग्यशास्त्र* (१९०१) हे दोन ग्रंथ तयार केले. *आहार-मीमांसा* हा आहारशास्त्राचे विस्ताराने विवेचन करणारा मराठीतला पहिलाच ग्रंथ म्हणून विशेष महत्त्वाचा आहे.

नंदिनी लोटलीकर, के. ए. पोतदार

**परांजपे, नरहर रामचंद्र :** (ज. १८९२–मृ. १९३४). चरित्रलेखक. मध्यप्रांत शाळाखात्यात नोकरी. वास्तव्य अमरावती येथे. बंगाली भाषेचे जाणकार.

ह्यांचा *श्रीभगवान रामकृष्ण परमहंसदेव यांचे चरित्र* हा विस्तृत चरित्रग्रंथ (पहिला भाग, १९२३ व दुसरा भाग, १९२५) प्रसिद्ध आहे. श्रद्धा आणि विवेचकता या दोन्ही दृष्टींनी हा चरित्रग्रंथ चांगला झाला आहे.

म. वि. कविटकर, मीनल निसळ

**परांजपे, यशवंत विठ्ठल :** (ज. ११ सप्टेंबर, १८९२, पुणे–मृ. १७ जुलै, १९५४, पुणे). संतसाहित्याचे एक अभ्यासक. १९३० साली बी.ए. झाल्यावर मिलिटरी अकाऊंट खात्यात नोकरी. वयाच्या ५७ व्या वर्षी सेवानिवृत्त झाल्यावर एम्.ए.ची मराठी व संस्कृत विषय घेऊन परीक्षा उत्तीर्ण. 'योगवासिष्ठाचे मराठी संतकवींवर झालेले परिणाम' हा यांचा डॉक्टरेटसाठी लिहिलेला प्रबंध. परंतु डॉक्टरेट मिळाल्याचे जाहीर होण्यापूर्वीच त्यांचे देहावसान झाले. हाच प्रबंध *योगवासिष्ठ आणि संतवाङ्मय* (१९५५) या नावाने पुढे प्रसिद्ध झाला. 'योगवासिष्ठा'न्तर्गत तत्त्वज्ञानाशी संबधित अशा प्राचीन संतकवितेचा सविस्तर परिचय करून देणारा मराठीतला हा पहिलाच ग्रंथ असल्याने या ग्रंथाचे विशेष महत्त्व आहे.

हरिश्चंद्र थोरात, के. ए. पोतदार

**परांजपे, शिवराम महादेव :** (ज. १७ जून, १८६४, महाड–मृ. २० सप्टेंबर, १९२९, पुणे). नामांकित वक्ता, फर्डा पत्रकार, वक्रोक्तिकुशल नाटककार आणि *काळ* पत्राचे संपादक, *काळकर्ते* इत्यादी नात्यांनी ते प्रसिद्ध आहेत. शिक्षण महाड, रत्नागिरी आणि पुणे येथे. विष्णुशास्त्री चिपळूणकर, आगरकर, लो. टिळक यांसारखी मंडळी त्यांना शिक्षक म्हणून लाभली. एम्.ए. (१८९५)–संस्कृत, 'झाला वेदान्त' विजेते. डेक्कन कॉलेजमधून एम्.ए. झाले. पुढे काही काळ ते पुण्याच्या भावे हायस्कूलच्या महाराष्ट्र कॉलेजमध्ये संस्कृतचे प्राध्यापक होते. पण लवकरच कॉलेजचा राजीनामा देऊन प्रक्षोभक राजकीय अंगाने पुराण सांगण्याचा नवाउपक्रम त्यांनी सुरू केला. १८९८ साली, २५ मार्च रोजी गुढीपाडव्याच्या मुमुहुर्तावर त्यांनी *काळ* पत्र सुरू केले. ब्रिटिश सरकारविरोधी जहाल धोरण सहन न झाल्यामुळे मुंबई सरकारने १९०८ साली *काळ*वर खटला भरला व शिवरामपंतांना एकोणीस महिन्यांची शिक्षा ठोठावली. ते सुटून आल्यावर १९१० साली *काळ*कडून दहा हजार रुपयांचा जामीन मागण्यात आला. या आपत्तीमुळे हे पत्र त्यांना बंद करावे लागले. १९१० ते १९२० या काळात त्यांनी बरेच ग्रंथलेखन केले. लो. टिळकांच्या निधनानंतर त्यांनी म. गांधींचे अनुयायित्व पत्करले. १९२० नंतर त्यांनी गांधीवादाचा व खादीचा स्वीकार केला. १९२० मध्ये त्यांनी *स्वराज्य* साप्ताहिक सुरू केले व त्यात गांधींच्या चळवळीचा पुरस्कार केला. १९२२ मध्ये त्यांच्या ५८ व्या वर्षी त्यांना मुळशी प्रकरणी सहा महिन्यांचा तुरुंगवास पत्करावा लागला. वृद्धापकाळामुळे त्यांनी *स्वराज्य* हे साप्ताहिक व छापखाना शंकरराव देव यांच्या स्वाधीन केला व राजकारणातून आपले अंग काढून घेतले. १९२९ साली बेळगाव येथे भरलेल्या मराठी साहित्य संमेलनाचे ते अध्यक्ष होते. त्यात त्यांनी मराठीचा जोरदार पुरस्कार केला.

शिवरामपंतांच्या साहित्यात निबंध, नाटके, कथाकादंबरी, तर्कसंग्रह, अर्थसंग्रह यासारखे ग्रंथ, मराठ्यांच्या लढायांचा इतिहास यांचा समावेश होतो. यापैकी *काळातील निवडक निबंध : भाग १ ते १०* (१९००–०८) व *साहित्यसंग्रह : भाग १–२* (१९२२, १९२५) हे ग्रंथ विशेष महत्त्वाचे आहेत. त्यांनी बाणभट्टाच्या 'कादंबरी' वरून *संगीत कादंबरी* (१८९७) हे नाटक, *मानाजीराव* (१८९८, मॅक्बेथच्या आधारे), *रामदेवराव* (१९०६), *भीमराव* (१९०७-०८) अशी भाषांतरित नाटके व *पहिला पांडव अथवा महारथी कर्ण* (१९३१), *मीराबाई* (अपूर्ण) ही पौराणिक नाटके लिहिली. त्यांची भाषांतरित नाटके शब्दशः भाषांतरित नसून स्वदेशी पेहराव चढविलेली रूपांतरे आहेत. *तर्कसंग्रह* व *तर्कदीपिका* (१८९९, १९१०) व *तर्कभाषा* (१९०४) ही पुस्तके संस्कृतवरून भाषांतरित केली आहेत. *अर्थसंग्रह* (१९२०) हा ग्रंथ अनेक मीमांसा ग्रंथांतील न्याय, अधिकरणे, पूर्वपक्ष, उत्तरपक्ष आदींचे सोपे व सविस्तर विवेचन करून सिद्ध केलेला आहे. *गोविंदाची गोष्ट* (१९१८) आणि *विंध्याचल* (१९२४) या कादंबऱ्याही उल्लेखनीय असून यातील कथा अद्भुतरम्य, काव्यमय व चटकदार आहेत. फ्रेंच राज्यक्रांतीची वैचारिक पार्श्वभूमी तयार केलेल्या रूसो या तत्त्वज्ञाच्या 'सोशल कॉन्ट्रॅक्ट' या ग्रंथाचे त्यांनी भाषांतर केले आहे. *काळ* पत्र सुरू केल्यापासून त्यांनी दहा वर्षांच्या काळात सुमारे हजार लेख लिहिले. पुढे त्यातील २००–२२५ लेखांची निवड करून *काळातील निवडक निबंधांचे* दहा भाग प्रसिद्ध झाले. *काळ* पत्राच्या जहालपणामुळे त्यांना सरकारने शिक्षा ठोठावली व त्याचवेळी निबंधांचे हे १० खंड जप्त करून टाकले. वाचकांच्या भावनांना आवाहन करण्याची मोठी शक्ती या निबंधांत होती. स्वातंत्र्यलढ्याला ज्यांच्यामुळे अपाय होईल ते सर्वच त्यांच्या उपहासाचे विषय झाले. आपले विचार परिणामकारकपणे ठसविण्यासाठी विनोद, व्याजोक्ती, वक्रोक्ती, व्यंजना व उपहास यांचा त्यांनी पुरेपूर उपयोग करून घेतला आहे. त्यांची विद्वत्ता, बहुश्रुतता, व्यासंग, ज्वलंत देशाभिमान आणि प्रभावी व कल्पनारम्य, काव्यमय शैली यांचा पानोपानी प्रत्यय येतो. महाराष्ट्राच्या राजकीय जागृतीच्या आणि मराठी वृत्तपत्रांच्या इतिहासात त्यांचे स्थान स्वतंत्र आणि अद्वितीय आहे.

उत्कट देशाभिमान, ज्वलंत स्वातंत्र्याकांक्षा, भव्य व उत्तुंग कल्पनाशक्ती आणि वाचकांच्या हृदयाला वेध लावणारी काव्यमयता या गुणांमुळे शिवरामपंतांचे निबंध मनाची पकड घेतल्यावाचून राहत

नाहीत. भावोत्कट आणि वक्रोक्तिकुशल गद्य लेखनाचे एक नवेच पर्व त्यांनी मराठी साहित्यात निर्माण केले.

विष्णुशास्त्री चिपळूणकरांच्या निधनामुळे झालेले दुःख वर्णन करण्यासाठी त्यांनी रचलेली कविता आणि डेक्कन कॉलेजात असताना त्या कॉलेजच्या त्रैमासिकात प्रसिद्ध झालेले *अहल्याबाई* हे खंडकाव्य (१९२४) ही त्यांची अन्य साहित्यनिर्मिती.

बि. ह. कुलकर्णी, के. ए. पोतदार, सुधाकर भोसले

**परांजपे, सदाशिव वासुदेव :** (ज. १८७८ – मृ. २६ ऑक्टोबर, १९३९ ). धंदेशिक्षणविषयक पुस्तकांचे लेखक व रसायनतज्ज्ञ. टोकियो (जपान) येथे औद्योगिक रसायनशास्त्राचे शिक्षण. साबणउत्पादन, रसायनशास्त्र, चित्रकला इत्यादी क्षेत्रांत यांनी कामे केली.

*विविध कलाशतक* (१९०१), *अत्तरे* (१९०८), *कात* (१९१०), *स्त्रियांसाठी घरगुती धंदे* (१९२५–दु. आ.), *वांबूचे फर्निचर* (१९२७), *तंबाखूचे धंदे* (१९३०), *मिठाईचा धंदा* (१९३०) ही यांनी लिहिलेली काही पुस्तके. औद्योगिक क्षेत्रात मराठी तरुणांनी पदार्पण करावे, उद्योग-व्यापार करण्यास प्रवृत्त व्हावे, या इच्छेने अल्प भांडवलावर करता येण्याजोग्या व्यवसायांची शास्त्रीय माहिती देणारी ही पुस्तके आहेत. जपानी बोली व लिपी यांची ओळख करून देणारे *जपानी भाषा* (१९०६) तसेच *हिंदुस्थानी भाषाशिक्षक* (१९१८) हे हिंदीचा परिचय करून देणारे पुस्तकही त्यांनी लिहिले आहे. ज्ञानाच्या दुर्लक्षित क्षेत्रांकडे लक्ष वेधण्याच्या संदर्भात या पुस्तकांचे महत्त्व आहे.

हरिश्चंद्र थोरात, के. ए. पोतदार

**परांजपे, श्रीधर विष्णु :** (ज. २८ ऑगस्ट, १८७१, उमरेड, नागपूर – मृ. १८ नोव्हेंबर, १९५४). मोरोपंतकृत 'केकावलि'चे टीकाकार व मोरोपंतांचे चरित्रकार. समीक्षक भा. श्री. परांजपे यांचे वडील. माध्यमिक व उच्च शिक्षण नागपूर येथील नीलसिटी हायस्कूल आणि मॉरिस व हिस्लॉप कॉलेज येथे. काही काळ त्याच कॉलेजात अध्यापन.

नागपुरातील सुधारणावादी रा. ब. कोल्हटकर, हरि महादेव पंडित, वा. दा. ओक यांच्या सहवासात आल्यानंतर पंडित व ओक यांच्याशी दृढ स्नेहसंबंध जुळून परांजपे हरि महादेव पंडितांच्या 'देशसेवका'त लेख लिहून लागले. तसेच वा. दा. ओक यांच्या 'काव्यसंग्रहा'करिता प्राचीन काव्यावर टीपा लिहून देण्याचे काम त्यांनी स्वीकारले. 'केकावलि' वरील टीकेचे काम अभ्यासपूर्ण व्हावे, या उद्देशाने जुन्या धर्मग्रंथांचा त्यांनी अभ्यास केला. संत रामदास हे त्यांचे परमार्थातले प्रेरक गुरू. १९०२ साली 'श्रीरामदासानुदास' हे नाव धारण करून त्यांनी वर्धा हे आपले कार्यक्षेत्र ठरविले व 'हनुमानगड संस्थे'चा पाया घातला. त्यांचे महत्त्वाचे ग्रंथलेखन म्हणजे *महाराष्ट्र कविवर्य मोरोपंतकृत केकावलि* (१८९७) हा विस्तृत, समावेशक टीका ग्रंथ व *महाराष्ट्र कविवर्य मोरोपंतांचे चरित्र व काव्यविवेचन* (१९२५) हे होय. 'केकावलि' वरील टीका प्रथम 'काव्यसंग्रहा'च्या १८९६ च्या अंकातून (मे ते डिसेंबर) प्रसिद्ध झाली. अर्थनिर्णय, काव्यगुण, व्युत्पत्ती, व्याकरण, छंदशास्त्र, अलंकार, अर्थसादृश्याचे उतारे, पौराणिक उतारे या अनेक गोष्टींचे विस्ताराने स्पष्टीकरण देऊन ही टीका लिहिल्यामुळे ती महत्त्वाची ठरली व विद्वज्जनमान्यही झाली. ते दलितांत धर्मजागृती करणारे व त्यांच्या उद्धारासाठी झटणारे क्रियाशील सुधारकही होते. १८९५ साली पुणे येथे भरलेल्या सामाजिक परिषदेच्या व्यासपीठावरून अज्ञानामुळे धर्मांतरित झालेल्यांना पुन्हा शुद्ध करून हिंदुधर्मात घेण्याविषयीच्या प्रश्नाला त्यांनी वाचा फोडली होती. या कार्याशी प्रामाणिक राहता यावे म्हणून ख्रिस्ती कॉलेजातल्या नोकरीचा त्यांनी राजीनामा दिला. या कार्यासाठी त्यांनी *कीर्तनसुधाधारा* भाग १, २ (१९३७, १९३८) हे ग्रंथ प्रसिद्ध केले. त्यात विपुल आख्याने व कीर्तन पद्धतीबद्दलचे विस्तृत व अद्ययावत विवरणही आहे.

उषा टाकळकर, के. ए. पोतदार

**पवार, शिवराम गणपतराव :** (ज. २९ मे, १८६७ – मृ. १७ सप्टेंबर, १९३९). ज्योतिर्गणित संबंधित विषयांचे ग्रंथकार. खर्डे (ता. राहुरी, जि. अहमदनगर) येथील रहिवासी. शिक्षणखात्यात नोकरी.

ह्यांचे ज्योतिर्गणितविषयक *करणकौमुदी* (पंचांगकर्त्यांसाठी, १९०७), *सूर्येन्दु स्थानमानरीति* (१९३७) इत्यादी तीन-चार पुस्तके व *भूमितीची मूलतत्त्वे* (१९२४) हे ग्रंथ प्रसिद्ध आहेत. *ग्रहगतिसिद्धान्त*, *ग्रहस्थविज्ञानपंचांग कल्पतरू*, *उपरागविज्ञान* इत्यादी ग्रंथही यांनी लिहिले, पण ते अद्यापि अप्रकाशित आहेत.

मीनल निसळ, उषा टाकळकर

**पळसुले, गोपाळ सदाशिव :** (ज. ११ फेब्रुवारी, १८८१, कोल्हापूर – मृ. ३० नोव्हेंबर, १९४६). होमिओपॅथीवरील पुस्तकांचे लेखक. या क्षेत्रातील एक थोर जाणकार. परदेशातून होमिओपॅथीची औषधे न मागवता येथेच तयार करावीत म्हणून त्यांनी पुण्यास या औषधांचा कारखाना व दवाखानाही काढला. आपल्या विचारांना कृतीची जोड दिली.

यांनी *इन्फ्ल्यूएन्झा अथवा शीतज्वर* (होमिओ व जीवन रसायन चिकित्सा, १९१८, १९३५), *जीवन-रसायन चिकित्सा-शास्त्र अर्थात बारा क्षार चिकित्सा पद्धती* (१९२७), *महामारी अथवा कॉलरा आणि होमिओपॅथी चिकित्सा* (१९३५), *बालरोग व त्यांची होमिओपॅथी चिकित्सा* (१९३६) आणि *होमिओपॅथीचा छोटा निघंटु म्हणजेच होमिओपॅथी औषधांचे गुणधर्म* (१९३७) ही पुस्तके लिहिली. यातील *जीवन-रसायन-शास्त्र* हे पुस्तक पाश्चात्त्य ग्रंथाधारे परंतु स्वतंत्र पद्धतीने सुलभ शास्त्रीय भाषेत लिहिले आहे. यात इतर चिकित्साशास्त्रांशी या पॅथीची थोडीफार तुलना केलेली असून बारा क्षारांचे गुणधर्म सांगितले आहेत. हिंदी व कानडीत याचे भाषांतर झाले आहे.

नंदिनी लोटलीकर, आरती कुसरे

**पांगळ, तात्या नेमिनाथ :** (ज. १८८५ – मृ. १७ एप्रिल, १९४७). कादंबरीकार व 'वंदे जिनवरम्' या मासिकाचे संपादक. *तीर्थंकर चरित्रे* (१९०९), *जैनधर्म* (१९२१) यांसारख्या पुस्तकांमधून त्यांनी धर्मविषयक लेखन केले. मुंबईहून आणि मुंबई व पुणे येथून सरस वाङ्मय प्रसारक मंडळीच्या वतीने निघणाऱ्या सरस वाङ्मयमालेमधून त्यांनी विपुल कादंबरीलेखन केले. मराठी वाचकाला कादंबरीवाचनाची गोडी लावण्यात पांगळ यांच्या कादंबरीलेखनाचा महत्त्वाचा वाटा आहे. हिंदी व इंग्रजी कादंबऱ्यांची रूपांतरेही त्यांनी केली. *कट्टा राजनिष्ठ देशभक्त राठोडवीर दुर्गादास* (१९१६), *साठ वर्षांपूर्वी अर्थात् १८५७ चे कानपूर येथील बंड* (१९१७), *लाल गुलाल* (१९२२), *सुलताना रझिया* (१९२३), *ब्रह्महत्या* (१९२४), *परकायाप्रवेश* (१९३०) या त्यांच्या काही उल्लेखनीय कादंबऱ्या. गुंतागुंतीचे रहस्यमय प्रसंग, गुप्तहेरांचे चातुर्य, वीररसयुक्त प्रसंग यामुळे त्यांच्या कादंबऱ्या तत्कालीन अभिरुचीस अनुकूल ठरल्या.

हरिश्चंद्र थोरात, के. ए. पोतदार

**पांगारकर, लक्ष्मण रामचंद्र :** (ज. ३१ जुलै, १८७२, चिपळूण – मृ. १० नोव्हेंबर, १९४१, वर्धा). प्राचीन मराठी वाङ्मयाचे इतिहासकार, संतचरित्रलेखक व *मुमुक्षु* या संतसाहित्य विचाराला वाहिलेल्या नियतकालिकाचे संस्थापक-संपादक. संतसाहित्याचे एक अग्रगण्य भाष्यकार. खंदे लेखक. रसाळ वक्ते.

मूळचे बार्शी तालुक्यातले पांगरीचे. शिक्षण पौड, पंढरपूर व पुणे येथे. बी.ए. (१८९८). न्यू इंग्लिश स्कूलमध्ये असताना, त्यांना लो. टिळक आणि आगरकर शिक्षक म्हणून लाभले होते.

त्यांचा पहिला लेख *मूर्तिपूजा* पुण्याच्या 'जगद्धितेच्छु'त (१८९५) प्रसिद्ध झाला. 'निबंधमालेचे स्वरूप व कार्य' (१९०४) हा त्यांचा दीर्घ निबंध चांगलाच गाजला. तत्पूर्वीच त्यांचा 'मराठी भाषेचे स्वरूप' हा वाङ्मयेतिहासात्मक लेख 'ग्रंथमाला' मासिकातून १८९८ मध्ये प्रसिद्ध झाला होता. १९०७ मध्ये त्यांनी *मुमुक्षु* हे नियतकालिक साप्ताहिक १३ वर्षे व पुढे मासिक म्हणून १२ वर्षे चालविले. ते प्रथम धुळ्याहून व नंतर पुण्याहून निघत असे.

*मोरोपंत-चरित्र आणि काव्यविवेचन* (१९०८) ह्या ग्रंथाने त्यांना विशेष प्रसिद्धी मिळाली. त्यांनी संपादिलेले *मोरोपंती वेचे* तत्पूर्वीच (१९०५) निघाले होते. *तुकाराम चरित्र* (१९१०) हा संशोधनपर ग्रंथ त्यांनी लिहिला. *मुमुक्षु*तून त्यांनी *पारिजातकाची फुले* (१९१३), सार्थ व सटीप *नारदभक्ति सूत्रे* (१९१४), *नवविधा भक्ती* (१९१५), *संतचरित्रमाला* (१९२२), *भक्तिमणिमाला* (१९२३), याशिवाय *एकनाथ चरित्र* (१९१०), *श्रीज्ञानेश्वरचरित्र व ग्रंथविवेचन* (१९१२), *कविवर्य मुक्तेश्वर* (१९२१) असे लहानमोठे अनेक ग्रंथ प्रसिद्ध केले. *समर्थ संजीवनी* (१९२४) हे त्यांचे रामदासी वेच्यांचे पुस्तकही प्रसिद्ध आहे. विशेषतः त्याची प्रदीर्घ प्रस्तावना पांगारकरांच्या रामदासी वाङ्मयाच्या व्यासंगाची साक्ष देते. ते स्वतःचा उल्लेख 'हरिभक्त परायण' या बिरुदाने करीत.

त्यांचे *मुमुक्षु* इतके लोकप्रिय होते की पांगारकर म्हणजे मुमुक्षु आणि मुमुक्षु म्हणजे पांगारकर असे समीकरण झाले होते. *भक्तिमार्गप्रदीप* (१९०४) हा त्यांचा भक्तिपर वेच्यांचा संकलनात्मक ग्रंथ अत्यंत लोकप्रिय ठरला. त्यांच्या हयातीतच त्याच्या अनेक आवृत्त्या निघून दीड-दोन लाख प्रती खपल्या. आयुष्याच्या अखेरीस त्यांनी *मराठी वाङ्मयेतिहास* हा ग्रंथ लिहिला. त्यांची योजना पंचखंडात्मक होती; पण दोनच खंड लिहून झाले. खंड पहिला – १९३२; खंड दुसरा – १९३५. तो इतिहास आरंभापासून रामदासापर्यंतच्या कालाचा आहे. हे इतिहासलेखन त्यांनी उपासनाबुद्धीने केले आहे. *आनंदलहरी* (१९२०) हा त्यांचा एक कवितासंग्रहही प्रसिद्ध आहे. त्यातील बहुतेक कविता धर्मपर आहेत. *चरित्रचंद्र* (१९३८) हे त्यांचे आत्मचरित्र. ते १९३७ साली लिहिले. वाङ्मयलेखनावर संसार चालविणारे त्या काळात तरी ते एकटेच दिसतात. लेखणीप्रमाणे त्यांनी आपली वाणीही कमावली होती. संतकाव्याचा व्यासंग गाढा, पाठांतर दांडगे, वाणी रसाळ, मन सदा संतांच्या भोवती. त्यामुळे त्यांची व्याख्याने, प्रवचने रंगत. त्यांनी संतकाव्याच्या प्रचारार्थ उभे आयुष्य वेचून महाराष्ट्रीय समाजात भक्तीची गोडी निर्माण केली.

शं. गो. तुळपुळे, के. ए. पोतदार

संदर्भ : (१) स. कृ. जोशी, 'भक्तिमार्गाचा भाष्यकार', 'वसंत' (दिवाळी) १९६४. (२) न. र. फाटक, 'ल. रा. पांगारकर', 'महाराष्ट्र साहित्य पत्रिका', एप्रिल-मे-जून १९७२. (३) स. गं. मालशे, 'संतप्रवचनकार पांगारकर', 'ललित', जून १९७३. (४) ग. त्र्यं. माडखोलकर, 'पांगारकरांची वाङ्मयतपस्या व व्यक्तिरेखा'.

**पाटणकर, परशुराम नारायण : ० चेतोहर :** (ज. १८६०, चासकमान, जि. पुणे – मृ. १९२९). संस्कृत पंडित, निबंधकार व कवी. १८८५ साली बी.ए., एम्.ए. (१८९८). काही काळ इंदूर आणि बनारस येथे संस्कृतचे अध्यापन. पुढे देवास राजेसाहेबांचे खासगी चिटणीस व विद्याधिकारी म्हणून काम. १९१८ साली बनारसच्या हिंदू विश्वविद्यालयात 'रिलिजन इन्स्ट्रक्टर' म्हणून नोकरी.

त्यांनी *धर्मसंगवी* (१९२४) हे संस्कृत मासिक काशी येथून चालविले. अभिमन्यु-वधापासून जयद्रथवधापर्यंत भारतीय युद्धातील कथाभागावर आधारित *वीरधर्मदर्पण* हे संस्कृत नाटक लिहिले. शिशुपालवध, रघुवंश, शाकुंतल, किरातार्जुनीय, काव्यादर्श वगैरे संस्कृत ग्रंथांवर विद्यार्थ्यांना उपयुक्त इंग्रजी टिपणीपुस्तके तयार केली. 'मराठी भाषेच्या माहेराचे सिंहावलोकन' (१९०७) या संशोधनात्मक प्रबंधात त्यांनी अनेक प्रांतिक भाषांतून मराठी भाषेशी नाते दाखविणारे शब्द हुडकून शोधक व चिकित्सक बुद्धीने त्यांच्या व्युत्पत्त्या जुळवून दाखवल्या. त्या आधारे मराठीचे उत्तर भारतातून दक्षिणेकडे संक्रमण झाले असावे असे अनुमान ते काढतात. 'काव्यरत्नावली'त त्यांची बरीच कविता प्रसिद्ध झाली. ती जुन्या वळणाची, पण प्रौढ व भावोत्कट आहे. 'चेतोहर' या टोपणनावाने जयदेवकृत *गीतगोविंदा*चे समवृत्त भाषांतर (१८८९), *मल्लारिराज प्रशस्ति* (१९२०) आदी काव्ये त्यांनी केली आहेत.

नंदिनी लोटलीकर, के. एच. पोतदार

**पाटणकर, माधव नारायण :** (ज. १८६२, विटे, ता. खानापूर, जि. सातारा – मृ. १९१६). नाटककार. मराठी सहावीपर्यंतचे शिक्षण व वेदाध्ययन विटे येथे. आण्णासाहेब किर्लोस्करांच्या नाटकामुळे संगीत नाटकाविषयी विशेष प्रेम उत्पन्न झाल्याने आपल्या गायनक्लबाचेच १८८४ मध्ये नाटकमंडळीत रूपांतर केले व बाहेर गावी नाट्यप्रयोग केले.

आपल्या नाटकमंडळीद्वारा इतर नाटककारांच्या नाटकांचे प्रयोग करण्यासाठी परवानगी न घेतल्यामुळे कोर्टामार्फत बंदीहुकूम आल्याने पाटणकरांनी स्वतःच नाटके लिहिली. त्यांनी एकूण २४ नाटके लिहिली. त्यातील *विक्रम-शशिकला* (१८९२) हे पहिलेच नाटक विलक्षण लोकप्रिय ठरले. त्याच्या सात आवृत्त्या निघाल्या. कोणासही म्हणता येतील अशी गद्यरूप पद्ये त्यात आढळतात. त्यांच्या नाटकातील विनोद अश्लीलतेकडे झुकणारा असला तरी बहुजनसमाजावरील अश्लील तमाशांचा प्रभाव कमी करून, त्याला रंगभूमीकडे वळविण्याचे ऐतिहासिक महत्त्वाचे कार्य पाटणकरांच्या नाटकांनी केले आहे, असे मामा वरेरकरांनी 'माझा नाटकी संसार' या पुस्तकात म्हटले आहे. विपुल पदे हे त्यांच्या नाट्यरचनेचे एक वैशिष्ट्य होते (उदा., *विक्रम-शशिकला*–१७८ पदे; *सीमंतिनी*–१२० पदे; *सत्यविजय*–१०९ पदे; *युवतिविजय*–९४ पदे इ.). त्यांचे *भस्मासुर* नाटक, त्यातील दिल्लीदरबार व लॉर्ड कर्झन यांच्या चित्रणामुळे सरकारजमा करण्यात आले होते.

अरविंद वामन कुळकर्णी, के. ए. पोतदार

**पाटणकर, श्रीनिवास कृष्ण :** (ज. ११ नोव्हेंबर, १९१५ – मृ. १९ ऑक्टोबर, १९३६). कवी. महाविद्यालयीन शिक्षण पुणे येथे. पाटणकर हे श्री. म. माटे यांचे विद्यार्थी असल्यामुळे माटे यांच्या ग्रंथलेखनात ते साहाय्य करीत. पाटणकरांच्या *प्राजक्ताची फुले* (१९३७) या काव्यसंग्रहात त्यांच्या भावकवितांबरोबर एक, एक-अंकी प्रहसनही आहे. त्यांच्या कवितांमध्ये तारुण्यसुलभ प्रणयातील उत्कंठा व निराशा यांचे भावपूर्ण चित्रण येते. तर त्यांच्या काही विनोदी कवितांमधून तत्कालीन काव्यक्षेत्रातील अपप्रवृत्तींवर बोट ठेवण्याचा प्रयत्न दिसतो. *शुभमंगल सावधान* हे त्यांचे प्रहसनही याच विषयावर आधारलेले आहे. साहित्यिक व्यक्तिमत्त्व पुरेसे विकसित होण्यापूर्वीच त्यांचे अकाली निधन झाले.

डॉ. नीलिमा गुंडी, गो. म. कुलकर्णी

**पाटील, कृष्णाताई परशुराम :** (ज. १८८५ – मृ. २७ ऑक्टोबर १९२१). कवयित्री. पूर्वाश्रमीच्या वाके. नवव्या वर्षी विवाह व सोळाव्या वर्षी वैधव्य. कथापुराणे, भक्तिपर आणि मराठी संतांची व

श्रीधर-मोरोपंत, महिपती इत्यादींची कविता वाचून काव्यनिर्मितीची प्रेरणा.

*सचित्र सुमनांजली* (१९२२) हा यांच्या ८५ गाण्यांचा संग्रह. १९२४ साली मुंबई विद्या खात्याने हे पुस्तक मुलींच्या शाळांत बक्षिसाकरिता व वाचनालयांकरिता मंजूर केले होते. देवतांची स्तुती, रामायण-भागवतातील प्रसंगांवरील पदे, कटाव इत्यादी रचना व 'मनास बोध' सारखी उपदेशपर कवने, असे या गाण्यांचे तीन विभाग आहेत. कविता प्रासादिक आहे.

उषा टाकळकर, मीनल निसळ

० **पांडुरंगशर्मा** : पहा कुलकर्णी, पांडुरंग ज्ञानेश्वर

**पाध्ये, केशव अप्पा** : (ज. १८७२ – मृ. १ जानेवारी, १९४९). संशोधक, चरित्रकार. शिक्षण बी.ए., एलएल्.बी. मुंबई उच्च न्यायालयात वकिलीचा व्यवसाय. मुंबईत डॉ. आनंदराव नायर यांनी १९२२ साली स्थापन केलेल्या 'बुद्ध सोसायटी'चे चिटणीस. त्या संस्थेच्या 'बुद्ध प्रभा' या इंग्रजी त्रैमासिकाचे संपादक.

*कालिदास-सूक्ति मंजूषा* (१९२७) या पहिल्या ग्रंथात त्यांचे कालिदास वाङ्मयातील निवडक वेच्यांचे संपादन आले आहे. तसेच *हेमाद्रि ऊर्फ हेमाडपंत* (१९३९) हे संशोधनात्मक चरित्र त्यांनी लिहिले. हेमाद्रि ही यादवकालीन राजकीय व सांस्कृतिक इतिहासातील एक महत्त्वाची व्यक्ती असून ती यादवांचा मुख्यमंत्री, मोडी लिपीचा व विशिष्ट पद्धतीच्या मंदिररचनेचा प्रवर्तक होता. हेमाद्रिचा जीवनवृत्तांत, यादव घराणे, तत्कालीन समाजरचना व त्या वेळचे मराठी वाङ्मय ह्यांचे विवेचन या ग्रंथात आढळते. पोर्तुगीज अमदानीत स्वधर्म व अस्मिता यांची जोपासना करणारे *धर्मवीर अंताजी रघुनाथ कावळे ह्यांचे अल्पचरित्र* (१९४३) हे त्यांनी लिहिलेले दुसरे चरित्र. र. गो. कोलंगडे यांच्या सहकार्याने त्यांनी लिहिलेले *त्यागराज भगवान गौतम बुद्ध* (१९४६) हे संशोधनपर दृष्टीने लिहिले गेलेले बुद्धाचे मराठीतील पहिलेच मोठे चरित्र होय.

हरिश्चंद्र थोरात, के. ए. पोतदार

**पाध्ये, दामोदर गणेश** : ० दा. ग. पा. : (ज. १८६५ – मृ. ४ डिसेंबर, १९४२). पत्रकार, निबंधलेखक व कवी. मूळचे पुण्याचे. वास्तव्य मुंबई येथे. मुंबईच्या एल्फिन्स्टन कॉलेजात आरंभी प्राध्यापक व नंतर मुंबई म्युनिसिपालिटीत शिक्षा समितीचे मंत्री. सरकारतर्फे 'रावबहादुर' ही पदवी.

नेमस्त विचाराच्या 'इंदुप्रकाश' या मराठी दैनिकाच्या इंग्रजी विभागाचे संपादक. महाराष्ट्र साहित्य परिषदेचे कार्यकर्ते. लो. टिळकांवरील मृत्युलेख, त्याचप्रमाणे असहकार व अन्य राजकीय चळवळींवरील त्यांचे निबंधवजा वैचारिक लेख प्रसिद्ध झाले आहेत. पत्नीच्या मृत्यूनंतर *दुःखाश्रुमाला* (१९३९) हे काव्य त्यांनी लिहिले.

पां. बा. गाडगीळ, रा. वा. बक्षी

**पाध्ये, पांडुरंग जनार्दन** : (ज. १८४१ – मृ. २२ सप्टेंबर, १९१२, आगाशी). *स्वरव्यंजनव्यवस्था* या पुस्तकाचे कर्ते. यांचे सर्व शिक्षण घरीच झाले. 'स्वरव्यंजनव्यवस्था' हा व्याकरणातलाच एक भाग. अध्ययन करीत असताना, मराठी भाषेत अक्षरघटना व अक्षरवटिका, यांच्याप्रमाणे उच्चार होत नाही, कोठे व्यंजनाचा लोप होतो, तर कोठे अनुल्लेखित व्यंजनाचा व स्वराचा उच्चार होतो, असे पाध्ये ह्यांच्या लक्षात आले. असे न होता लेखन उच्चारानुसार व्हावयास हवे, असे त्यांचे मत होते. संस्कृत व मराठी भाषेत प्रचलित असलेल्या वर्णमालेत (अक्षरमालेत) व उच्चार पद्धतीत जे दोष आहेत, ते विद्वज्जनांपुढे मांडावेत व काही सुधारणाही सुचवाव्यात; या उद्देशाने त्यांनी हे पुस्तक (१९११) लिहिले आहे. वेदविद्येच्या सहा अंगातील 'शिक्षा' (वर्णांच्या उच्चाराचे शास्त्र) या अंगाप्रमाणेच 'लिपिशास्त्र' हे एक सातवे अंग निर्माण न झाल्यामुळे उच्चारानुसार लेखन न होण्याची अनवस्था निर्माण झाली, ती दूर होणे अत्यावश्यक आहे, असे पाध्ये यांचे म्हणणे आहे.

गं. दे. खानोलकर, के. ए. पोतदार

० **पानसे, वेणुबाई** : पहा हर्षे, निर्मला

**पारख, बळवंत खंडूजी** : (ज. २४ नोव्हेंबर, १८५१, ओझर, ता. नाशिक – मृ. २ जून, १९०४, नाशिक). कवी व दुर्मिळ ग्रंथांचे संग्राहक. शिक्षण सहाव्या इयत्तेपर्यंत. प्रथम प्राथमिक शिक्षक, नंतर पोलीस खात्यात नोकरी. शिळामुद्रित व मुद्रित अशा सुमारे पाच हजार ग्रंथांचा संग्रह त्यांच्याजवळ होता.

बळवंतरावांनी गद्यापेक्षा पद्याचे लेखन विपुल केले. या संदर्भात 'बालबोध'कार ओक लिहितात – 'बळवंतरावास इतर वृत्तांपेक्षा कटाव आणि फटके फार चांगले साधत असत, ते त्यांनी शेकडो विषयांवर लिहिले आहेत... असे कटाव अथवा फटके ते बोलता बोलता रचीत असत. ते कानी पडले म्हणजे बळवंतराव हे सध्याच्या काळचे (अनंत) फंदी आहेत, असे श्रोत्यांस वाटत असे' ('बालबोध' मासिक, जुलै, १९०४, पृ. ७४-७५). लोकहितवादी, न्या. माधवराव रानडे ह्यांच्यासारखे थोर विचारवंत नेते त्यांची वाखाणणी करीत.

त्यांची *जयवर्णन* (काव्य – १८८२), *दादाभाई नौरोजी* (कटाव – १८९४), *वेरूळचे लेणे* (कटाव – १९९५), *सनातन भारत धर्म महापरिषद* (१९९६), *दुर्व्यसन निषेधाष्टक* (१८९६), *विष्णुसहस्रनामार्थमंजिरी ओवीबद्ध* (१९००) काव्ये व *ज्ञानेश्वर महाराजांचे चरित्र* (१८८६), *वज्रेश्वरी चरित्र* (१८९८) ही गद्य पुस्तके प्रसिद्ध आहेत. *ज्ञानेश्वर महाराजांचे चरित्र* ग्रंथास 'दक्षिणा प्राईझ कमिटी'चे बक्षीस मिळाले व त्याच्या तीन आवृत्त्या निघाल्या.

गं. दे. खानोलकर, म. पां. कुलकर्णी

**पारखी, नारो भिकाजी** : ० नारायणेंद्र सरस्वती ० मौनीनाथ ० मौनीस्वामी : (ज. १७८४ – मृ. १८७६). संतकवी. पूर्वज नाशिक जिल्ह्यातील सिन्नरचे. वडील पेशवाईत मामलेदार. वयाच्या दहाव्या वर्षी विवाह. पेशवाईत मामलेदार झाले. नाशिक येथे दत्तोपासनेचा अनुग्रह घेतला. पुढे वाई येथे शंकराचार्यांचे ग्रंथ व 'योगवसिष्ठ' यावर प्रवचने दिली. मुंबई येथे वास्तव्यास असताना पत्नीच्या मृत्यूनंतर संन्यास घेतला व नारायणेंद्र सरस्वती हे नाव धारण केले.

ह्यांची सर्व रचना वेदान्तपर आहे. ह्यात *स्वप्नबोध*, *पंचीकरण*, *लघुबोध*, *ज्ञानबिंदू* हे ग्रंथ ओवीबद्ध आहेत. याशिवाय अनेक अभंग-भक्तिज्ञान वैराग्यपद पदे, परमार्थपर आर्या, साक्या, दिंड्या, सवाया, श्लोक इत्यादी सर्व कवित्व *श्रीमौनीचरितामृत* ग्रंथात समग्र दिले आहे. ग्रंथांपैकी *स्वप्नबोध* हा ग्रंथ मोठा असून ह्यात अध्यात्मशास्त्र पूर्व संसारावर आधारित आहे (१७४०). *पंचीकरण* ग्रंथात कोष्टकांचे स्पष्टीकरण केले आहे.

ग. वि. कविटकर, सुलभा हेर्लेकर

**पारखी, पांडुरंग गोविंदशास्त्री** : ० भावगुप्तपद्म : (ज. २४ नोव्हेंबर, १८४४, कडूस, ता. खेड, जि. पुणे – मृ. २९ मार्च, १९११, पुणे). कवी व निबंधकार. पुणे येथे पंडित बाळशास्त्री देव ह्यांच्या संस्कृत पाठशाळेत व्याकरण, व्युत्पत्ती, अलंकार इत्यादी विषयांचे अध्ययन.

पारखी यांची *कृष्णाकुमारी* (१८८४), *बोधामृत* (१८८४), *षड्ऋतुवर्णन* (१८८७) ही काव्ये पुस्तकरूपाने प्रसिद्ध आहेत. *कृष्णकुमारी* हे ऐतिहासिक खंडकाव्य असून *षड्ऋतुवर्णन* संस्कृतातील ऋतुवर्णनांच्या आधारे रचले आहे. *बोधामृत* हे विद्यार्थ्यांस व्यवहारोपयोगी विषयांवर नीतिपर उपदेश करणारे काव्य आहे. *अलंकारार्पण*

हे काव्य 'काव्यरत्नावली'मधून प्रसिद्ध झाले. याशिवाय *श्रीकृष्णलीला*, विविध प्रकारच्या *अन्योक्ति* व *बोधसुधा* अशा काही रचना आणि 'भावगुप्तपद्य' या टोपणनावाने संस्कृतातील काही कूटांच्या धर्तीची रचना त्यांनी केली आहे.

'बाणभट्ट' (१९०५) व 'श्रीहर्ष' (१९११) हे दोन निबंध ऐतिहासिक दृष्टिकोन समोर ठेवून लिहिले आहेत. ताम्रपट, शिलालेख, चिनी प्रवाशांचे ग्रंथ इत्यादी उपलब्ध संशोधनसामग्रीचा त्यांनी प्रस्तुत लेखनास आधार घेतला आहे. 'विविधज्ञानविस्तारा'ने (पृ. ४२ : अं. ८) प्रस्तुत ग्रंथाचा परामर्श घेऊन 'श्रीहर्षा'च्या तुलनेत 'बाणभट्ट' निबंधाचा गौरव केलेला आहे.

याशिवाय पारखी यांचे *मित्रचंद्र* (१८८०), *हंसिका* (१८६६), *कादंबरीसार* (१८९१) असे कथात्मक लेखनही प्रसिद्ध आहे. *मित्रचंद्र* कादंबरीला तत्पूर्वीच्या *मुक्तमाला*, *मंजुघोषा* या कादंबऱ्यांहून निराळे वळण देण्याचा प्रयत्न लेखकाने केलेला आहे. दक्षिणा प्राईझ कमेटीचा पुरस्कार या कादंबरीस प्राप्त झाला होता. *हंसिका*मध्ये बाणभट्टाच्या कादंबरीतील एक कथानक सांगितले आहे. *कादंबरीसारा*मध्ये 'कादंबरी' या बाणभट्टलिखित कथेचे भाषांतर केलेले आहे.

उषा टाकळकर, मदन कुलकर्णी

**पारसनीस, दत्तात्रय बळवंत** : (ज. ७ नोव्हेंबर, १८७०, सातारा–मृ. ३१ मार्च १९२६). ऐतिहासिक कागदपत्रांचे संशोधक, संग्राहक व प्रकाशक. निबंधकार व चरित्रलेखक. शालेय शिक्षण चालू असतानाच त्यांनी १८८७ च्या जानेवारीत *सुभाष्य–चंद्रिका* नावाचे एक मासिक स्वतःच्या संपादकत्वाखाली चालू केले. त्याचे सहा अंक निघाले. त्याच वर्षाच्या ऑक्टोबर महिन्यात *महाराष्ट्र कोकिल* ह्या नावाचे एक नवीन मासिक पुस्तक काढून त्यात *सुभाष्य–चंद्रिका* समाविष्ट केली. हे मासिक दोन वर्षे चालून जून, १८८९ मध्ये बंद पडले. १८९१ च्या जुलैमध्ये *महाराष्ट्र कोकिल*चे पुनरुज्जीवन झाले. चार वर्षे चालल्यानंतर १८९५ अखेर बंद पडले ते कायमचे. ऐतिहासिक ग्रंथलेखन आणि ऐतिहासिक पत्रांचे संशोधन व प्रकाशन असे दुहेरी प्रकारचे कार्य पारसनीसांनी केले आहे.

पारसनीस यांनी 'झांशी संस्थानचा इतिहास' ह्या मथळ्याखाली *महाराष्ट्र कोकिल*मध्ये (१८९१ पासून) लेख लिहिले. राणी लक्ष्मीबाईंचे चिरंजीव दामोदरराव यांच्याशी पत्रव्यवहार करून व प्रत्यक्ष मुलखात फिरून त्या आधारे हे लेख लिहिल्याने त्याला ऐतिहासिक महत्त्व प्राप्त झाले होते. *झाशीच्या महाराणी लक्ष्मीबाईसाहेब ह्यांचे चरित्र* (१८९४) व *मराठ्यांचे पराक्रम बुंदेलखंड प्रकरण* (१८९५) ही दोन पुस्तके प्रसिद्ध आहेत.

मराठ्यांच्या इतिहासलेखनाला अत्यंत उपयुक्त असे २०० रुमाल असलेले 'पेशवे दप्तर' संशोधकांच्या अभ्यासासाठी खुले केले जावे यासाठी 'डेक्कन व्हर्नाक्युलर ट्रान्सलेशन सोसायटी'मार्फत पारसनीसांनी प्रयत्न केले व 'पेशवे दप्तरा'तील इतिहाससंशोधनाला अखेरपर्यंत वाहून घेतले.

पारसनीस 'पेशवे दप्तरा'त काम करू लागले. त्याच वर्षी (नोव्हेंबर, १८९६) त्यांनी *भारतवर्ष* नावाचे मासिक पुस्तक काढले. याचे अनियमितपणे चोवीस अंक निघाले. *भारतवर्ष* बंद पडल्यानंतर (१९००) आठ वर्षांनी (१९०८) *इतिहाससंग्रह* नावाचे मासिक पुस्तक सुरू करून ऐतिहासिक कागदपत्रे व माहिती प्रसिद्ध केली. हे मासिक ७ वर्षे ३ महिने चालून १९१६ साली बंद पडले.

*अयोध्येचे नबाब* (१८९१), *मुसलमानी आमदानीतील मराठे सरदार* (१९००), *महापुरुष ब्रह्मेन्द्रस्वामी धावडशीकर यांचे चरित्र व पत्रव्यवहार* (१९००), *बायजाबाई शिंदे यांचे चरित्र* (१९०२), *दिल्ली अथवा इन्द्रप्रस्थ* (१९०३), *मराठ्यांचे आरमार* (१९०४), *सवाई माधवराव पेशव्यांचा दरबार* (१९०५) ही ह्यांची स्वतंत्र पुस्तके प्रसिद्ध आहेत. याशिवाय रावबहादूर गणेश चिमाजी वाड, पुरुषोत्तम मावजी यांच्याबरोबर संपादित केलेली काही पुस्तकेही आढळतात.

गं. दे. खानोलकर, सौ. कल्पना व्यवहारे

**पालवणकर, काशिनाथ रावजी** : (ज. २१ मे, १८९७, तळे, जि. कुलाबा–मृ. ५ सप्टेंबर, १९५६, मुंबई). संपादक, 'खेळगडी' मासिक. बालवाङ्मयलेखक, वृत्तपत्रसंपादन. शिक्षण मराठी सातवीपर्यंत. आयुष्यात यांनी शिक्षक, कारकून, सहसंपादक, व्यवस्थापक, प्रकाशक व जाहिरात-वितरण-संस्थेचे भागीदार इत्यादी व्यवसाय केले. खानापूरच्या 'लोकमित्र' व साताऱ्याच्या 'भाग्योदय' मासिकाचे काही काळ ते सहसंपादक होते.

इ. स. १९०८ साली त्यांचे बंधु बाळकृष्ण रावजी पालवणकर ह्यांनी महाड (कुलाबा) येथे 'खेळगडी' नावाचे मासिक सुरू केले होते. मध्यंतरी ते बंद पडले. १९२७ पासून ते पुन्हा सुरू झाले. १९२७ पासून आठ वर्षे संपादक म्हणून पांडुरंग महादेव भागवत यांचे व प्रकाशक म्हणून का. रा. पालवणकर यांचे नाव आढळते. पुढे नवव्या वर्षापासून एकविसाव्या वर्षापर्यंत कळकळीने व अत्यंत आवडीने काम करून हे मासिक मुलांमध्ये यांनी लोकप्रिय केले.

पालवणकरांनी या मासिकात अधूनमधून लेखन केले. त्या व्यतिरिक्त त्यांची *नदीकाठच्या गोष्टी* (१९४०), *टेकडीवरच्या गोष्टी* (१९४१), *विस्मारखा* (१९४३), *सोबती* (१९४४), *गच्चीवरच्या गोष्टी* (१९४६) व *इसापनीति* इत्यादी पुस्तके प्रसिद्ध आहेत.

मीना जोशी, सौ. कल्पना व्यवहारे

**पावगी, नारायण भवानराव** : (ज. २५ फेब्रुवारी, १८५४–मृ. ८ डिसेंबर, १९३५, पुणे). प्राचीन भारतीय इतिहासाचे लेखक. शिक्षण बी.ए.पर्यंत. मुंबई सरकारच्या मुलकी खात्यात तीस वर्षे नोकरी. भारतीय संस्कृती व इतिहास ह्यांचा पराकाष्ठेचा अभिमान त्यांच्या इतिहासविषयक ग्रंथलेखनाला प्राधान्याने प्रेरक झाला.

पावगी यांनी *भारतीय साम्राज्य* ह्या शीर्षकाखाली पुढील बावीस पुस्तके रचण्याची योजना आखली : (१) आर्यदेश व तत्संबंधी वृत्तान्त, (२) आर्यलोक व त्यांचे बुद्धिवैभव, (३) आर्येतिहास व भूगोल, (४) आर्यशास्त्र व कला, (५) आर्यशासनपद्धति व शासनसंस्था, (६) आर्यगृहस्थिती, नीति, शौर्य व उन्नती, (७) भरतखण्डातील मुख्य धर्म, (८) भरतखण्डातील जातिवैचित्र्य, (९) भरतखण्डातील नानाविध भाषा, (१०) संस्कृत भाषेचा इतिहास, (११) प्राकृत व मराठी भाषेचा इतिहास, (१२) भरतखण्डातील संस्कृत कविरत्ने, (१३) भरतखण्डातील प्राकृत कविरत्ने, (१४) महाराष्ट्रातील कविरत्ने, (१५) भरतखण्डातील स्त्रीरत्ने, (१६) भरतखंडावरील विदेशीयांच्या स्वाऱ्या, (१७) हिन्दूपदपादशाही, (१८) भरतखण्डातील इस्लामप्रभुत्व, (१९) महाराष्ट्र दिग्विजय, (२०) भरतखण्डातील आंग्ल सत्ता, (२१) भरतखण्डातील जमिनीचे सत्ताप्रकार, (२२) सिंहावलोकन. ह्यांपैकी अकरा पुस्तकेच १९०१ पर्यंत प्रसिद्ध झालीत. ह्या मालेतील पुस्तकांव्यतिरिक्त *सोमरस–सुरा नव्हे* (१९२२), *वेदकालीन भूस्तरशास्त्र अथवा भूगर्भशास्त्राचे वेदमिजनक* (१९२२), *भाषाशास्त्र* (१९०१), *भारतीय नाटकशास्त्र व नाटयकला आणि पौरस्त्य व पाश्चात्त्य रंगभूमि* (१९०२), *आर्यावर्त आर्यांची जन्मभूमि व उत्तर ध्रुवाकडील त्यांच्या वसाहती* (१९२०), *ऋग्वेदांतील सप्तसिंधुचा*

*प्रांत अथवा आर्यावर्तातील आर्यांची जन्मभूमि आणि उत्तरध्रुवाकडील त्यांच्या विस्तीर्ण वसाहती* (१९२१), *आत्मवृत्त* (१९२४) अशी सात पुस्तके प्रकाशित झाली. त्यांपैकी काहींचा इंग्रजीत अनुवाद झाला आहे.

ग. दे. खानोलकर, सौ. कल्पना व्यवहारे

**पावगी, रावजी भवानराव :** (ज. १८५८ – मृ. १० सप्टेंबर, १९२९). प्रवासवर्णनकार व चरित्रलेखक. व्हिक्टोरिया राणीच्या राज्यरोहणाच्या सुवर्णमहोत्सवाच्या निमित्ताने त्यांना ओधपूरच्या महाराजांबरोबर सन १८८७ मध्ये विलायतला जाण्याची संधी मिळाली. या निमित्ताने पावगी यांनी केलेल्या विलायतच्या प्रवासाचे वर्णन प्रथम 'केसरी'-मधून क्रमशः प्रसिद्ध झाले व *विलायतचा प्रवास* (दोन भाग अनुक्रमे १८८९ व १८९२) या नावाने ते ग्रंथनिविष्ट झाले.

वरील प्रवासवर्णनाखेरीज *चार्लस् ब्राडला एम. पी.*, *मिसेस ॲनि बेझंट* (१८९४) हे दोन चरित्रग्रंथ व *तुर्कस्थान* (१८९२) हा इतिहासग्रंथ प्रसिद्ध आहे.

क. मि. कुळकर्णी, सौ. कल्पना व्यवहारे

**पाळंदे, नीलकंठ रामकृष्ण :** ० उदासी ० हरिहरमहाराज : (ज. १८६८ – मृ. १९०८, फलटण). अर्वाचीन कालातील संतकाव्याचे एक प्रतिनिधी. शिक्षण पुणे येथे. मॅट्रिक. दत्तोपासक. १८९६ मध्ये संसारत्याग व वाडी येथे योगाभ्यास. काशी येथील दक्षिणामूर्ती स्वामी ह्यांचे शिष्यत्व.

परमेश्वरसेवेच्या हेतूने अभंग, पदे इत्यादी भक्तिपर रचना. आत्मार्पण, साधन-वैराग्य, संसारोपपत्ती, पूजा, गुरुचरणमहिमा, आत्मनिंदा इत्यादी विषयांवरील ही रचना आहे. कवितेतून 'निका', 'उदासी', 'हरिहर' ह्या नावांनी ते स्वतःचा निर्देश करतात. *श्री हरिहर महाराज उदासी यांची कविता* (मुंबई, १९३१) ह्या नावाने ह्यांची कविता मोरो केशव दामले ह्यांनी संपादित केली आहे.

उषा टाकळकर, मीनल निसळ

**पाळंदे, भास्कर दामोदर :** (ज. १७ सप्टेंबर, १८३२ – मृ. १७ डिसेंबर, १८७४, पुणे). कवी व निबंधकार. पाळंदे यांनी ब्रिटिश सरकारच्या शिक्षण, न्याय, रेव्हेन्यू खात्यात नोकरी केली.

महाविद्यालयात शिकत असता 'उपयुक्त ज्ञानप्रसारक सभा' आणि 'स्टुडंटस् सायन्टिफिक अँड लिटररी सोसायटी' ह्या संस्थांचे ते सदस्य होते. १८५१ मध्ये लंडन शहरी 'हिंदू लोकांकरिता धर्मशाळा बांधण्यापासून नफे' ह्या विषयावरील उत्तम निबंधासाठी ठेवलेले सुवर्णपदक पाळंदे यांनी पटकाविले ('मराठी ज्ञानप्रसारक' हे मासिकही काही काळ त्यांनी संपादिले). त्यातच कालिदासाच्या 'विक्रमोर्वशीय' या नाटकाचे गद्यपद्यात्मक भाषांतर करून त्यांनी प्रसिद्ध केले. तसेच 'मराठी काव्य आणि कविता' ह्या विषयावर लेख लिहिला. 'मुंबई क्वार्टर्ली रिव्ह्यू'मध्ये 'संस्कृतकाव्य' ह्या विषयावरील त्यांचा लेख प्रसिद्ध झाला होता. १८५७-५८ च्या सुमारास प्रसिद्ध झालेल्या परशुरामतात्या गोडबोले ह्यांच्या 'नवनीतास', 'पद्यरचना व कवीचे वर्णन' असे दोन निबंध त्यांनी लिहून जोडले. गोडबोलेकृत 'वृत्तदर्पणा'त वृत्तांची उदाहरणे देण्याकरिता पाळंदे यांच्या काही कविता घेतल्या आहेत.

प्रासंगिक निबंधलेखनाखेरीज *रत्नमाला* (१८६७) हे छंदोबद्ध काव्य व *गीतासुधा* (१८७४) हे गीतेचे भाषांतर त्यांच्या नावावर आहे. जुन्या धाटणीची विविध वृत्तात बांधलेली ही पदे रसाळ आहेत. 'रत्नमाले'च्या १९५३ च्या आवृत्तीत पाळंदे यांच्या काही अप्रकाशित कविता समाविष्ट करण्यात आल्या. *गीतासुधा* हा गीतेच्या अठरा अध्यायांचा साकी वृत्तात केलेला समश्लोकी व सुबोध असा अनुवाद आहे.

कृष्णशास्त्री चिपळूणकर, बाळशास्त्री, डॉ. भाऊ दाजी, लोकहितवादी ह्यांच्याच पिढीतले पण फारसे परिचित नसलेले पाळंदे हेही त्या काळातले व्यासंगी विद्वान आणि कर्तबगार गृहस्थ होते.

उषा टाकळकर, सौ. कल्पना व्यवहारे

**पिंगुळकर (वर्दे), विठ्ठल पुरुषोत्तम :** (ज. १२ जून, १८५८, पिंगुळी, ता. कुडाळ, जि. रत्नागिरी – मृ. १९४६, दासनवमी, पिंगुळी). इतिहासकार. शिक्षण पुण्याच्या ट्रेनिंग कॉलेजची पहिल्या वर्षाची, तशीच मुलकी खात्याची परीक्षा उत्तीर्ण. प्रारंभी शिक्षक, पुढे मुलकी व दिवाणी खात्यात नोकरी.

सावंतवाडी संस्थानचे पोलिटिकल सुपरिंटेंडेंट मि. वेस्ट्रॉप ह्यांनी, त्यांनीच स्थापन केलेल्या वस्तुसंग्रहालयातील वस्तूंची माहिती व इतिहास मिळविण्याची जबाबदारी पिंगुळकरांवर सोपविली. त्यामुळे इतिहासाची आवड निर्माण झाली. पुढे सावंतवाडी संस्थानातील उपलब्ध ऐतिहासिक साधनसामग्री, कागदपत्रे गोळा करून त्यांच्या, तसेच चिरंजीव पुरुषोत्तम भाऊ यांच्या साह्याने इंग्रजी ग्रंथांच्या अभ्यासातून *सावंतवाडी संस्थानचा इतिहास* (१९११) हा ग्रंथ सिद्ध केला. ग्रंथ सर्वांगपरिपूर्ण व्हावा म्हणून त्याला अनेक माहितीपूर्ण परिशिष्टे जोडली आहेत. सावंत घराण्याची समग्र कारकीर्द ह्या ग्रंथात इतिहासरूपाने ग्रथित केली आहे. 'दक्षिणा प्राईझ कमिटी'ने प्रस्तुत ग्रंथाला शंभर रुपयांचे बक्षीस दिले होते.

शेती करताना आलेल्या प्रत्यक्ष अनुभवांच्या आधारे शेतीविषयक नवनवीन प्रयोगांची माहिती देणारे त्यांचे लेख विविध नियतकालिकांमधून प्रसिद्ध झाले आहेत.

म. भा. नाडकर्णी, जयंतकुमार बंड

**पिंपळगावकर, विठ्ठल अनंत :** ० अनंतसुत विठ्ठल ऊर्फ कावडीबाबा : (ज. १७९५–९७ – मृ. १८६३). दत्तोपासक कवी. पिसापिंपळगाव (ता. पारनेर, जिल्हा अहमदनगर) येथील रहिवासी. 'निंबराजसंप्रदाया'चे अनुयायी.

*दत्तप्रबोध* (१९००) हा १४,२३६ ओव्यांचा, ६१ अध्यायांचा ग्रंथ श्रीदत्तात्रेयांच्या आदेशानुसार रचला. ह्याचे ४० अध्याय उज्जयिनी क्षेत्री व उरलेले बडोदा येथे लिहिले. ग्रंथसमाप्ती १८६० मध्ये (चैत्र शु॥ प्रतिपदा, शके १७७२) झाली. दत्तसांप्रदायिकांच्या नित्यपठणातील हा ग्रंथ असून भाषा सोपी, सरळ आहे. यांची स्फुटकविताही (पदे, अष्टके इत्यादी) *दत्तप्रबोध* या ग्रंथात समाविष्ट आहे. हा ग्रंथ आठ भागांत छापला आहे.

उषा टाकळकर, मीनल निसळ

**पितळे, द्वारकानाथ माधवराव :** ० नाथमाधव : (ज. ३ एप्रिल, १८८२, मुंबई – मृ. २९ जून, १९२८, मुंबई). सामाजिक व ऐतिहासिक कादंबरीकार. शालेय शिक्षण मुंबईच्या न्यू हायस्कूलमध्ये, कुलाब्याच्या 'गन कॅरेज फॅक्टरी'त नोकरी. त्या निमित्ताने हिंदुस्थानात आणि परदेशात प्रवास. सिंहगडला शिकारीसाठी गेले असताना कड्यावरून दरीत कोसळल्याने कायमचे पंगुत्व आले (१९०५). 'प्रबोधनकार' ठाकरे आणि 'केरळ कोकिळकार' कृ. ना. आठल्ये यांच्या प्रेरणेने पितळे यांनी आजन्म वाङ्मयसेवाव्रत स्वीकारले. नाथमाधव या टोपण नावाने त्यांनी आपले बहुतेक लेखन प्रसिद्ध केले आहे.

नाथमाधव हे ऐतिहासिक कादंबरीकार म्हणून विशेष प्रसिद्ध असले तरी सुरुवातीला त्यांनी सामाजिक कादंबऱ्यांचे भरपूर लेखन केले. *सायंकाळची करमणूक* (१९०५), *प्रेमवेडा* (१९०८), *जग हे असेच* (१९०८), *हेमचंद्ररोहिणी* (१९०९), *रायकलब अथवा सोनेरी टोळी*, (खंड १ व २, १९१४), *विहगवृंद* (१९१५), *ग्रहदशेचा फेरा* (१९१५), *देशमुखवाडी* (१९१६), *विमलेची ग्रहदशा* (१९१७), *डॉक्टर कादंबरी* (भाग १ ते ३ ; १९१८, १९१९, १९२०),

*सापत्नभाव* (१९२२), *स्वयंसेवक* (१९२५), *नटसम्राट* (१९२५), *हृदयविकार* (१९२८), *शरयू* (१९२८), *भविष्य भचिती* (१९२८) इत्यादी त्यांच्या सामाजिक कादंबऱ्या प्रसिद्ध आहेत.

नाथमाधवांच्या सुरुवातीच्या कादंबऱ्या प्रणयप्रधान व रंजक स्वरूपाच्या होत्या. परंतु डॉ. भांडारकरांच्या उपदेशामुळे त्यांच्या लेखनात बरेच परिवर्तन झाले व सामाजिक प्रश्नांची चर्चा ते आपल्या कादंबऱ्यांतून करू लागले. बालविवाह, जातिभेद, पुनर्विवाह, प्रौढविवाह, स्त्री-शिक्षण, मद्यपाननिषेध इत्यादी तत्कालीन ज्वलंत प्रश्नांचा ऊहापोह त्यांनी आपल्या सामाजिक कादंबऱ्यांमधून केला आहे. त्यांच्या बहुतेक कादंबऱ्यांमधून नवविचारांची वूज राखल्याचे आणि सनातन जीवनमूल्यांची तरफदारी केल्याचे प्रकर्षाने जाणवते. *देशमुखवाडी* व *वीरधवल* ह्या एकेकाळी अत्यंत लोकप्रिय ठरलेल्या त्यांच्या कादंबऱ्या स्वतंत्र नसून रूपांतरित आहेत. रेनॉल्डसच्या 'केनेथ' या कादंबरीच्या आधारे लिहिली गेलेली *वीरधवल* आपल्या अद्भुतरम्यतेमुळे आजही वाचकांना चित्तवेधक वाटल्यापासून राहत नाही.

मात्र सामाजिक कादंबऱ्यांपेक्षाही नाथमाधवांच्या ऐतिहासिक कादंबऱ्या विशेष लोकप्रिय ठरल्या, किंबहुना नाथमाधवांना मराठी वाचक ओळखतो ते मुख्यतः ऐतिहासिक कादंबरीकार म्हणूनच. त्यांच्या ऐतिहासिक कथानिर्मितीला १९०९ मध्ये *तरुण रजपूत सरदार* या कादंबरीने प्रारंभ झाला असला तरी त्यांना प्रथम नाव मिळवून दिले ते *सावळ्या तांडेल* (१९०९) या कादंबरीने. प्रस्तुत कादंबरीतून, नाथमाधवांनी मराठ्यांच्या आरमाराचे चित्रण केले आहे. 'आरमार' हा विषय मराठी कादंबरीला सर्वस्वी नवीन होता. सागरावर सत्ता प्रस्थापित करणाऱ्या शिवाजी महाराजांचे, तसेच साहसप्रिय व स्वामिभक्त अशा सावळ्या तांडेलाचे रेखीव चित्रण प्रस्तुत कादंबरीत नाथमाधवांनी केले आहे.

'देशा वैभव आणतील असली गाईन गाणी नवी' या निर्धाराने त्यांनी मराठी इतिहासाला आपल्या 'स्वराज्यमाले'तून पुनरुज्जीवित केले. त्यांच्या 'स्वराज्यमाले'त *स्वराज्याचा श्रीगणेशा* (१९२१), *स्वराज्याची घटना* (१९२२), *स्वराज्याची स्थापना* (१९२२), *स्वराज्याचा कारभार* (१९२३), *स्वराज्यावरील संकट* (१९२४), *स्वराज्याचे परिवर्तन* (१९२५) व *स्वराज्यातील दुफळी* (१९२८), अशा सात कादंबऱ्यांचा समावेश होतो. 'स्वराज्यमाले'ची अखेर *स्वराज्याची समाप्ती* या कादंबरीने करण्याची त्यांची इच्छा होती. परंतु पुढील १९ कादंबऱ्यांची केवळ टिपणे व आराखडेच ते तयार करू शकले. 'स्वराज्यमाले'त इ. स. १६३९ ते १७०७ पर्यंतचा मराठेशाहीचा इतिहास त्यांनी गुंफिला आहे. टीकाकारांच्या मते, इतिहास आणि काल्पनिक प्रसंग यांचा समसमा संयोग त्यांचा ऐतिहासिक कादंबऱ्यांमध्ये होऊ न शकल्याने आणि अद्भुत व असंभाव्य प्रसंगांना प्रमाणाबाहेर महत्त्व दिल्याने त्यांच्या कादंबऱ्यांच्या ऐतिहासिकत्वावरच गदा आली. कालविपर्यास, भाषाविपर्यास, परिस्थितीविपर्यास, पाल्हाळ, असंभाव्यता, अनावश्यक तपशील इत्यादी दोषांनी त्यांची ऐतिहासिक कादंबरी युक्त असल्याने ती ऐतिहासिक सत्य आणि ऐतिहासिक वास्तव यांच्या कसोटीला उतरू शकत नाही. अशा काही दोषांनी युक्त असूनही नाथमाधवांच्या या ऐतिहासिक स्वरूपाच्या कादंबऱ्यांनी तत्कालीन वाचकांची मने जिंकली होती.

वरील वाङ्मयाखेरीज नाथमाधवांनी काही नाटके व प्रहसने लिहिली आहेत. *मराठ्यांचा आत्मयज्ञ* (१९१७), *लोकसंग्रह* (१९२१), *जातिवंत मराठावीर* (१९१७), *नेताजी पालकर व तरुण मराठावीर आणि राजेन्द्रसिंग* (१९११) ह्या प्रकाशित नाटकांखेरीज *मनोहरकांता*, *भेदशासन*, *कान्होपात्रा* ही त्यांची नाटके अप्रकाशित आहेत. *शिक्षण* (१९०८), *एका रात्रीची मौज* (१९१५), *मोहनतारा* (१९२७) ही त्यांची प्रहसने. अतिरंजित घटना, रहस्य व घोटाळे यांचे मिश्रण म्हणजे फार्स अशी त्यांची समजूत असावी असे या प्रहसनांच्या स्वरूपावरून वाटते.

नीतिपर उपदेश करण्यासाठी त्यांनी 'मास्तरांची दिवाळी', 'संप यशस्वी कोणी केला?' इत्यादी स्फुट गोष्टी आणि तशाच प्रासंगिक कविताही लिहिल्या आहेत.

भालचंद्र फडके, जयंतकुमार बेंद्र

संदर्भ : (१) वासंतीला गुप्ते, 'नाथमाधव : व्यक्ती आणि वाङ्मय'. (२) कुसुमावती देशपांडे, 'मराठी कादंबरी : पहिले शतक'. (३) 'आधुनिक वाङ्मयाचा इतिहास–भाग १ ला', संपा. अ. ना. देशपांडे.

**पुणतांबेकर, श्रीकृष्ण व्यंकटेश** : (ज. १८ नोव्हेंबर, १८९०, राहुरी – मृ. २ फेब्रुवारी, १९५२). राजनीती व नागरिक-नीती या विषयांचे लेखक. शिक्षण पुणे येथे. बी.ए. (मुंबई विद्यापीठ), एम्.ए. (ऑक्सफर्ड विद्यापीठ), बॅरिस्टर, काही काळ मुंबई व अमरावती येथे वकिली. सुरत, मुंबई, बनारस व नागपूर येथे राज्यशास्त्राचे प्राध्यापक.

*नागरिकनीति* (१९३४) हा त्यांचा मराठी भाषेतील एकमेव ग्रंथ. इतिहासाचे तत्त्वज्ञान व इतिहासलेखनशास्त्र ह्यांवर त्यांनी काही स्फुटलेखनही केले आहे. *फाउंडेशन्स ऑफ इंडियन सिव्हिक्स*, *मराठा पॉलिटी* इत्यादी इंग्रजी ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

गं. दे. खानोलकर, मीनल निसळ

**पुरंदरे, कृष्णाजी वासुदेव** : (ज. १८८८ – मृ. ५ डिसेंबर, १९५५). इतिहास-संशोधक. शिक्षण व्हर्नाक्युलर फायनल परीक्षेपर्यंत. प्राथमिक शाळेत शिक्षक (१९०६ – ३२). सरदार घराण्यातील जुने कागदपत्र जमविण्याची आणि त्यांचा अभ्यास करण्याची आवड. रियासतकार सरदेसाई ह्यांच्या मार्गदर्शनाखाली पेशवे दप्तरातील कार्यकर्त्यांच्या गटात समावेश.

ह्यांचे खालील ग्रंथ व दहा-पंधरा लेख प्रसिद्ध झाले आहेत. ते ग्रंथ असे : (१) *शिवचरित्र साहित्य, खंड पहिला* (१९२६), (२) *पुरंदरे दप्तर, भाग पहिला* (१९२९), (३) *पुरंदरे दप्तर, भाग दोन* (१९२९), (४) *पुरंदरे दप्तर, भाग तीन* (१९३४), (५) *पुरंदरे दप्तर, भाग चार* इत्यादी, (६) *शिवचरित्र साहित्य, खंड ७ वा* (संयुक्त प्रकल्प – १९३८), (७) *किल्ले पुरंदर* (१९४०), (८) *चिमाजी आप्पा* (१९४८), (९) *शंकराजी नारायण पंतसचिव* इत्यादी. या सर्व पुस्तकांत *पुरंदरे दप्तर भाग एक* यात आलेली पत्रे विशेष महत्त्वाची आहेत. या खंडाला त्यांची प्रदीर्घ प्रस्तावना जोडलेली आहे. इंग्रजीचे ज्ञान नसून केवळ इतिहासप्रेमापोटी त्यांनी केलेले हे संशोधन कार्य उल्लेखनीय आहे.

ग. ह. खरे, रा. बा. बक्षी

० **पुरुषोत्तमानंद सरस्वती** : पहा धांदरफळे, कृष्णाजी रावजी

० **पूर्णदास** : पहा उपसकर, बाबा

**पृथ्वीगीर हरिगीर** : ० गोस्वामी, पृथ्वीगीर हरिगीर : (ज. १८७६, यवतमाळ, विदर्भ – मृ. १४ मार्च, १९३१). पत्रकार आणि ज्ञाति-इतिहास संशोधक. लोकमान्य टिळकांचे अनुयायी. *हरिकिशोर* या साप्ताहिक वृत्तपत्राचे संपादक. सहकाऱ्यांच्या लेखनामुळे दोन वर्षे सक्तमजुरीचा तुरुंगवास.

*गोसावी व त्यांचा संप्रदाय : भाग पहिला* (१९२६) आणि *भाग दुसरा* (१९३१) हे त्यांचे महत्त्वाचे ग्रंथ. गोसावी संप्रदाय हा शूद्रवर्णीय असल्याची चुकीची माहिती सरकारी दप्तरात होती. वेद-उपनिषदांच्या अभ्यासातून गोसावी हा ब्राह्मण वर्गातील संप्रदाय असल्याचे त्यांनी या ग्रंथातून सिद्ध केले असून ऐतिहासिक व वर्तमान

काळातील ठिकठिकाणच्या कर्तृत्ववान गोसावी घराण्यांचा परामर्शही या ग्रंथातून घेतला आहे.

हरिश्चंद्र थोरात, गोविंद देशपांडे

**पेणकर, योसेफ दाविद** : (ज. ३१ ऑक्टोबर, १८७२–मृ. ६ सप्टेंबर, १९४९). बेने इस्राएली नाटककार व कीर्तनसंहिताकार. शिक्षण मुंबई येथे. मराठीप्रमाणेच उर्दू, हिंदी, गुजरातीतूनही नाट्य-लेखन. *आलम-आरा* (१९३१) ह्या पहिल्या भारतीय बोलपटाचे कथालेखक. 'इस्राएली ग्रंथमाला' ह्या प्रकाशनसंस्थेचे संस्थापक.

पवित्र इस्राएली शास्त्राचा इतिहास ज्ञातिबांधवांना समजावा या हेतूने *मकाबी वीरांचे शौर्य* (१९२१), *राजपुत्र आबाशालोम* (१९२१) व *साध्वी आबीगाएल* ही नाटके आणि *आबाशालोमाचे सिंहासन* (१९१२) व *एस्तेर राणी* (१९२६) ह्या संगीत नाटक-पद्यावली ह्यांचे लेखन केले. *दाविदाख्यान* (१८९९), *योसेफाख्यान* (१८९९), *महाराणी एस्तेरचे बुद्धिचातुर्य* (१९२६) ही पद्यरूप कीर्तनेही त्यांनी लिहिली.

रेचल गडकर, जयंतकुमार बंड

**पेणकर, शालोम सकोजी** : (ज. १८५०, अष्टमी, ता. रोहे, जि. कुलाबा – मृ. १९२०, अष्टमी). बेने इस्राएली गीतकार. शिक्षण मिशनरी शाळेत. ब्रिटिश पलटणीत नोकरी. हिब्रू व हिंदी भाषांवर प्रभुत्व.

ह्यांनी पवित्रशास्त्रातील हिब्रू गीतांच्या चालीवर तशाच अर्थाची मराठी पदे रचली. निरनिराळ्या विषयांवरील त्यांच्या सुमारे ३०० पदांपैकी फक्त काही पदे त्यांच्या मृत्यूनंतर पुस्तकरूपाने प्रसिद्ध झाली. *मंडळ्यांच्या गीतांचे पुस्तक* (१९२२), *हानुक्का, पुरीम व पेसाह या सणांची गीते* (१९२३), *लग्नाच्या गीतांचे पुस्तक* (१९२५) ह्या तीन पुस्तकांतून त्यांची सुमारे पन्नास-पंचावन्न गीते समाविष्ट आहेत. लेखक स्वतः संगीताचे जाणकार असल्याने ही गीते राग-तालांत रचली आहेत. साकी, दिंडी ह्या मराठी छंदांतही त्यांची काही रचना आहे. काही पदे हिंदुस्थानीतही रचली आहेत.

रेचल गडकर, मीनल निसळ

**पेडणेकर, हिराबाई** : (ज. २२ नोव्हेंबर, १८८६, सावंतवाडी – मृ. १८ ऑक्टोबर, १९५१, पालशेत, रत्नागिरी). कवयित्री व पहिली स्त्री-नाटककार. नृत्य, गायन या कलांचा वारसा लाभलेल्या घराण्यात जन्म. पुढे गानमहर्षी भास्करबुवा बखले यांच्याकडे संगीताचे शिक्षण. गुर्जरशास्त्री यांच्याकडून संस्कृत नाट्यशास्त्र, नाट्यवाङ्मय यांच्या सूक्ष्म अभ्यासासाठी मार्गदर्शन. यांना गोविंद बल्लाळ देवल यांच्या प्रेरणेने मराठी नाटकाची गोडी लागली. मराठीत काव्यरचना. ते काव्य 'मासिक मनोरंजना'त प्रसिद्ध होऊ लागले. पुढे गडकरी, बालकवी इत्यादी समकालीन मान्यवर साहित्यिकांशी व किर्लोस्कर, गंधर्व या नाटकमंडळींतील नटांशी हिराबाईंचा घनिष्ठ संबंध आला. नववर्य नानासाहेब जोगळेकर व श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांच्याशीही स्नेह-संबंध जडला. मराठी वाङ्मयातील पहिली स्त्री-नाटककर्ती. यांची *संगीत जयद्रथ – विडंबन* (१९०४) व *संगीत दासिनी* (१९१२) नाटके गाजली. मीराबाई व जयदेवाची पत्नी यांच्या जीवनावरील नाटके त्यांनी लिहिली. पण ती उपेक्षित राहिली, प्रसिद्ध झाली नाहीत.

कृ. मि. कुलकर्णी, ग. वा. करंदीकर

संदर्भ : वऱ्हाडपांडे म. ल. 'भ्रमर परागुनेती', विजय प्रकाशन, नागपूर, १९७३.

**पेंडसे, सीताराम वासुदेव** : (ज. सप्टेंबर, १८८३, केळवे-माहिम, जिल्हा ठाणे – मृ. १९ जून, १९१३). कवी व भाषांतरकार. शिक्षण बी.ए. (१९०६), बडोदा हायस्कूलमध्ये काही काळ शिक्षक. पुढे विलायतेहून परतल्यानंतर बडोदे सरकारात शिक्षणाधिकारी व प्रांताचे नायब सुभे.

ह्यांची *शिशुसंमेलनोत्सव-काव्य* (१९१०), *भीमजयसिंहविवाह* (१९१३) आणि *पद्यसुमनांजली* (१९१७) ही काव्य-पुस्तके प्रसिद्ध असून पहिली दोन प्रासंगिक व तिसरे स्फुट कवितांचे संकलन आहे. रचना जुन्या वळणाची, प्रौढ व आलंकारिक आहे. *संस्कृत वाङ्मयाचा इतिहास* (मॅक्डोनेल यांच्या इंग्रजी ग्रंथाचे भाषांतर, १९१५) हा त्यांचा ग्रंथ सुबोध व मार्मिक भाषांतराचा नमुना म्हणून उल्लेखनीय आहे. *रसतरंगिणी* (१९१०) हे प्राचीन व अर्वाचीन मराठी कवितेतील निवडक वेच्यांचे संपादनही उत्कृष्ट आहे.

उषा टाकळकर, मीनल निसळ

**पै, दत्तात्रय व्यंकटेश** : (ज. १८९९, पारोडे, गोवा – मृ. २५ मे, १९५२). पत्रकार, इतिहास व राजकारणाचे अभ्यासक. मराठी शिक्षण घरीच. पोर्तुगीज शिक्षण मडगाव, पणजी येथे. थोडे इंग्रजी शिक्षण कारवारला.

फोंडे येथील 'कुलेगियु आल्मेद' ह्या राष्ट्रीय शिक्षण संस्थेत दोन वर्षे शिक्षक. नंतर मडगावला मामा सुकेरकरांच्या 'हिंदू' साप्ताहिकाचे १९३० पर्यंत संपादक. मुंबईला 'विविधज्ञानविस्तार'कर्ते मोरमकर यांच्या 'दैनिक लोकमत'चे संपादक. गोवा मुक्तिसंग्रामात सहभाग. बेळगावला काही काळ *विकास* नावाचे साप्ताहिक चालवले. गोव्या-तील धार्मिक, सामाजिक, वाङ्मयीन, राजकीय इत्यादी विविध चळवळींत पुढाकार.

*पोर्तुगीज भाषाप्रवेश* (दोन भाग, १९२३), *गोमंतकाचा भूगोल* (दोन भाग, १९३४), *बालविज्ञानसंयोग* (चार भाग, १९४३ ते १९४७) आणि *गोमंतक व हिंदुस्थान* (१९५०) ही त्यांची शालेय पुस्तके. *मुसलमानी अंमलातील गोमंतक* (१९३७) व स्वातंत्र्य लढ्याच्या चळवळींवरील *जळता गोमंतक* (१९४८) ही त्यांची इतिहासविषयक पुस्तके. त्यांच्या सामाजिक व राजकीय भाषणांचा संग्रहही (१९३१) प्रसिद्ध आहे. *राजकीय पक्ष म्हणजे लोकशाहीचा घात* (१९५८) ह्या पुस्तकात त्यांनी भारतीय लोकशाहीच्या संदर्भा-तील आपले मूलगामी चिंतन मांडले आहे.

बा. द. सातोस्कर, जयंतकुमार बंड

**पै, भगवंत बाळकृष्ण** : (ज. १८६१, होडावडे, सावंतवाडी – मृ. १९१६). सोहिरोबानाथ आंबिये ह्या नाथपंथीय संतकवीच्या कवितेचे संपादक व प्रकाशक. शिक्षण चार इयत्ता. पण घरातील पारमार्थिक वातावरणामुळे झालेल्या संस्कारांनी व्यक्तित्व घडलेले.

*सोहिरोबानाथ आंबियेकृत पदसंग्रह* (१८८४), *सिद्धांतसंहिता* (पूर्वार्ध व उत्तरार्ध, १९०६), *योगिराज सोहिरोबानाथकृत पदसंग्रह* (तीन भाग, १९०७), *योगिराज सोहिरोबानाथकृत पारमार्थिक ओवीबद्ध किरकोळ ग्रंथ* (१. *अद्वयानंद*, २. *पूर्णाक्षरी*, ३. *अक्षयबोध* १९०७), *श्री महदनुभवेश्वरी* (१९१०) इत्यादी काव्यग्रंथ व पदे प्रथम 'योगिराज सोहिरोबानाथ' या त्रैमासिकातून व नंतर स्वतंत्र पुस्तकरूपाने संपादित करून प्रकाशित केले. अर्थनिर्णायक विस्तृत टीपा व गूढ भागाचे आवश्यकतेनुसार स्पष्टीकरण ह्यामुळे पै ह्यांची संपादने प्राचीन मराठी काव्याच्या अभ्यासाच्या दृष्टीने महत्त्वाची आहेत.

उषा टाकळकर, जयंतकुमार बंड

**प्रधान, बजाबा रामचंद्र** : (ज. एप्रिल, १८३८, दापोली, जिल्हा रत्नागिरी–मृ. १८ एप्रिल, १८८६, मुंबई). कवी, कथालेखक व भाषांतर-कार. शिक्षण मॅट्रिकपर्यंत. शिक्षणखात्यात नोकरी. 'मित्रोदय', 'नेटिव ओपिनियन' ह्या नियतकालिकांचे हे लेखक होते. विदर्भातील शिक्षणा-धिकाऱ्यांनी काढलेल्या 'ज्ञानसंग्रह' ह्या नियतकालिकातूनही यांनी लेखन केले. 'विविधज्ञानविस्तारा'तून यांच्या दीर्घकथा प्रकाशित

झाल्या असून 'सद्‌गुणी स्त्री', 'पंधरा दिवसांची गोष्ट', 'झाले ते ठिकच झाले' ह्या कथा उल्लेखनीय आहेत.

*देवसेनी* (१८६७) या काव्याचे कर्ते म्हणून प्रधानांना विशेष प्रसिद्धी लाभली. सुप्रसिद्ध इंग्रज कवी सर वाल्टर स्कॉट ह्यांच्या 'लेडी ऑफ द लेक्' ह्या काव्याच्या आधारे हे २३५ श्लोकांचे काव्य त्यांनी रचले. इंग्रजी वळणाचे मराठीतील पहिले खंडकाव्य म्हणून ते महत्त्वपूर्ण आहे. सुगम व मधुर भाषा आणि सरळ, साधी व प्रसन्न शैली यामुळे ते वेधक झाले आहे. रघुनाथपंडिताच्या 'दमयंतीस्वयंवराख्याना'चाही प्रभाव त्यांच्या रचनेवर जाणवतो. *देवसेनी* म्हणजे मराठी कवितेला लागलेल्या नव्या वळणाचे प्रसादचिन्ह होय, असा अभिप्राय विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी नोंदविलेला आहे.

शेक्सपियरच्या 'कॉमेडी ऑफ एरर्स' या नाटकाचे *भ्रांतिकृत चमत्कार* (१८७८) हे भाषांतर त्यांनी श्रीराम भिकाजी जठार यांच्या सहकार्याने केले आहे. यातील पहिले तीन अंक प्रधानांनी तर शेवटचे दोन अंक जठारांनी भाषांतरित केले आहेत. शेक्सपियरच्या मूळ नाट्यकृतीच्या सत्त्वाला धक्का न लावता तिला मराठी रूप देण्याचे लेखकाचे कौशल्य स्पृहणीय आहे.

कृ. भि. कुलकर्णी, जयंतकुमार बंड

**प्रधान, रामचंद्र गणेश** : (ज. १८७६–मृ. २३ मे, १९४०). राज्यशास्त्रविषयक ग्रंथाचे लेखक, वृत्तपत्रकार. शिक्षण बी.ए., एल्‌एल्.बी. वकिलीचा व्यवसाय. श्यामजी कृष्णवर्मा ह्यांची शिष्यवृत्ती घेऊन इंग्लंडला प्रयाण. यूरोप व जपान येथील प्रवासात तेथील राज्यपद्धतीचे सूक्ष्म निरीक्षण व राज्यशास्त्राचा अभ्यास. १९१६ च्या होमरूल लीगच्या चळवळीत सहभाग. १९२३ साली स्वतंत्र प्रागतिक पक्षातर्फे आणि १९३७ साली राष्ट्रीय कॉंग्रेसतर्फे नासिक मतदारसंघातून कायदेमंडळावर निवड.

प्रधानांनी इंग्लंडमधील प्रमुख वर्तमानपत्रांतून हिंदुस्थानच्या राजकारणाविषयी लेखन केले असून *इंडियाज स्ट्रगल फॉर स्वराज्य* हा त्यांचा इंग्रजी ग्रंथ प्रसिद्ध आहे.

*प्रतिनिधिसत्ताक राज्यपद्धती* (१९२६) हे ह्यांचे जॉन स्टुअर्ट मिलच्या 'रिप्रेझेंटेटिव्ह गव्हर्नमेंट' ह्या ग्रंथाच्या आधारे हिंदुस्थानी राजकारणाचे संदर्भ देऊन लिहिलेले पुस्तक. लोकशाही राज्यपद्धतीच्या विविध पैलूंचा परामर्ष त्यांनी ह्या पुस्तकात घेतला आहे.

'भारतसेवक' हे केवळ राजकीय विषयांना वाहिलेले मासिक १९१६ ते १९२० पर्यंत त्यांनी चालविले. त्यातील महत्त्वाचे लेख *देशसेवा अथवा भारतसेवकातील निवडक लेख* (१९३०) ह्या पुस्तकात संकलित झाले आहेत. *प्लेटो व त्याचे राजकीय विचार* (१९३०) हे यांचे पुस्तकही उल्लेखनीय आहे. मॉरिस मेटरलिंकच्या 'मोना व्हॅना' या नाटकाचे *विमलादेवी* (१९३५) हे गद्य रूपांतरही त्यांनी केले आहे.

हरिश्चंद्र थोरात, जयंतकुमार बंड

**फडके, काशिनाथ विष्णु** : (ज. १८२९–मृ. १९०४). पत्रकार व लेखक. ठाणे येथून प्रसिद्ध होणाऱ्या *अरुणोदय* (१८६४) व *हिंदूपंच* (१८७२) ह्या साप्ताहिकांचे संस्थापक व संपादक.

हे कंपोझिटरपासून सुरुवात करून अरुणोदय छापखाना व साप्ताहिक यांचे मालक बनले. काशिनाथपंतांनी १८६४ च्या सुमारास *अरुणोदय* साप्ताहिक सुरू करून ते चाळीस वर्षे आस्थेने व निर्भीडपणे चालविले. त्यानंतर १८७२ साली *हिंदूपंच* नावाचे विनोदी साप्ताहिक सुरू केले. राजकारण, समाजकारण, शिक्षण, धर्म अशा अनेक विषयांवर खुसखुशीत व मार्मिक, तितकेच खोचक व मिष्किल लेखन करून *हिंदूपंच* लोकप्रिय बनवला. त्यांनी लिहिलेले *सर ऐझ्याक न्यूटन यांचे चरित्र* (१८९०) प्रसिद्ध आहे. *हिंदूपंच*मधून तत्कालीन परिस्थिती व प्रबोधनाच्या विचाराशी बांधलेले व दोलायमान समाजमन ह्यांच्यातील विसंगती टिपून भेदक चित्रण करणारे जे विपुल विनोदी लेखन केले, तीच त्यांची खरी वाङ्मयीन कामगिरी होय.

उषा टाकळकर, म. ना. लोही

**फडके, नारायण लक्ष्मण** : (ज. १८ फेब्रुवारी, १८६०, राजापूर–मृ. सप्टेंबर, १९२०, ठाणे). मिल्स व स्पेन्सर यांच्या ग्रंथांचे अनुवादक. मुंबईच्या एल्फिन्स्टन कॉलेजातून बी.ए. (१८८२). सरकारी शिक्षणखात्यात प्रारंभी शिक्षक व नंतर मुख्याध्यापक. मिल्स व स्पेन्सर यांच्या ग्रंथांचे गाढे अभ्यासक.

हर्बर्ट स्पेन्सर (१८२०–१९०३) ह्याने लिहिलेल्या १८ ग्रंथांचे अनुवाद त्यांनी केले. त्यांपैकी महत्त्वाचे असे : *अज्ञेयमीमांसा–आदितत्त्वे* (१८९६), *ज्ञेयमीमांसा–पूर्वार्ध* (१८९६), *उद्योगसंस्था व धंदेसंस्था, समाजशास्त्राची तत्त्वे : अनुभवजन्यसिद्धान्त व गृहसंस्था* (१९०६), *मानसशास्त्राची तत्त्वे* (१९१२), *मानसशास्त्राची संघटना* (१९१३), *मानसशास्त्राचे विशिष्ट विवरण* (१९१७), *राजकीय संस्था* (१९१८) शिवाय यांनी *स्पेन्सरचरित्र*ही लिहिले आहे. मिलच्या 'लिबर्टी'च्या आधारे १८९२ साली *स्वातंत्र्य* हे पुस्तक, तसेच *मेकॉलेसाहेबांचे चरित्र* (१९०६), *राणीच्या राज्याचा इतिहास* (१९०२), *हास्य व त्याचा शास्त्रीयदृष्ट्या विचार* इत्यादी ग्रंथ लिहिले. यांची ग्रंथसंपत्ती विपुल आहे. तिची यादी खालीलप्रमाणे :

(१) *मानसशास्त्राची तत्त्वे, पुस्तक १ ले*, १९१२ (स्पेन्सरकृत सायकॉलॉजीचे आधारे). (२) *मानसशास्त्राची संघटना*, १९१३ (स्पेन्सरकृत सायकॉलॉजीचे आधारे). (३) *मानसशास्त्राचे विशिष्ट विवरण*, १९१७ (स्पेन्सरकृत सायकॉलॉजीच्या आधारे). (४) *आत्मनीतीची तत्त्वे आणि परोपकार*, १८९४ (स्पेन्सरकृत Ethics of Individual Life and Beneficence चे आधारे). (५) *आत्मनीतीची तत्त्वे*, आ. दुसरी, १९२२. (६) *केवळ ज्ञानवृद्धीने नीती सुधारेल काय?* १८९३. (७) *अज्ञेयमीमांसा-आदितत्त्वे, भाग पहिला*, १८९६ (स्पेन्सरकृत 'फर्स्ट प्रिन्सिपल'मधील The Unknowable च्या आधारे). (८) *ज्ञेयमीमांसा-पूर्वार्ध-आदितत्त्वे, भाग दुसरा*, १८९८ (स्पेन्सरकृत The Knowable चे आधारे). (९) *उत्क्रांती सूत्रे* (सटीक), १८९६. (१०) *धर्म आणि शास्त्र यांचा समेट*, १८९१. (११) *शरीरसौंदर्य*, १८९४ (स्पेन्सरच्या आधारे). (१२) *शास्त्र म्हणजे काय! अथवा शास्त्रसूत्रे* (सटीक), १८९५ (स्पेन्सरच्या ग्रंथातून निवडलेली). (१३) *शिक्षणसूत्रे* (सटीक), १८८५ (स्पेन्सरच्या ग्रंथावरून). (१४) *स्पेन्सरीय सूत्रमाला, पुष्प ४ व ५*, १९०२. (१५) *उद्योगसंस्था व धंदेसंस्था*, १९०९ (स्पेन्सरकृत Principles of Sociology चे आधारे). (१६) *विधिसंस्था व धर्मसंस्था*, १९०९ (स्पेन्सरकृत Principles of Sociology चे आधारे). (१७) *समाजशास्त्राची तत्त्वे–अनुभवजन्य सिद्धान्त व गृहसंस्था*, १९०६ (स्पेन्सरकृत Principles of Sociology चे आधारे). (१८) *मानसशास्त्राची तत्त्वे, भाग पहिला, मूल सिद्धान्त*, १९०५ (स्पेन्सरकृत The Data of Sociology चे आधारे). (१९) *राजकीय संस्था*, १९०७ (स्पेन्सरकृत Politica Institution चे आधारे. (२०) *स्वातंत्र्य*, १८९२ (जॉन स्टुअर्ट मिलच्या 'लिबर्टी' या ग्रंथाच्या आधारे). (२१) *राणीच्या राज्याचा इतिहास*, १९०२ (Justin Macarthy कृत A History of our own time चे आधारे). (२२) *मेकॉलेसाहेबांचे चरित्र*, १९०६ (ट्रेव्हलीनकृत Life and letters of Lord Macawlay). (२३) *स्पेन्सरचरित्र* (ग्रंथमालेत छापलेले प्रकरण). (२४) *हर्बर्ट स्पेन्सर यांचे चरित्र व पत्रे*, १९१५. (२५) *हास्य व त्याचा शास्त्रीयदृष्ट्या विचार*, १८९४ ('शास्त्ररहस्य' या पुस्तकातील ३८ पृष्ठांचा निबंध).

गं. दे. खानोलकर, म. ना. लोही, समता बांदिवडेकर

**फडके, भास्कर विष्णु :** (ज. १८७८, वाडे, ता. देवगड, जिल्हा रत्नागिरी – मृ. १४ एप्रिल, १९१८). कादंबरीकार. स्वामी रामतीर्थांच्या समग्र ग्रंथांचे व स्वामी विवेकानंद चरित्राचे भाषांतरकार. शिक्षण बी.ए. 'काळ' वृत्तपत्राचे सहाय्यक संपादक. पुढे मुंबईच्या 'बिहारी' या राष्ट्रीय पक्षाच्या पत्राचे संपादक. १९०७ साली राजद्रोहाचा खटला व दोन वर्षे कारावास.

फडके हे प्रा. नी. बा. रानडे यांच्या 'इंग्लिश–मराठी डिक्शनरी'च्या कामातील सहकारी होते. त्यांच्या *जेव्हा सूर्योदय होईल* (१९११) व *दिशाभूल* (१९१२) या स्त्रीशिक्षणविषयक दोन सामाजिक कादंबऱ्या प्रसिद्ध आहेत. *स्वामी रामानंदतीर्थ यांचे समग्र ग्रंथ*, भाग १ ते १२ (१९१३–१६) हे यांचे महत्त्वाचे भाषांतरित लेखनकार्य. स्वामींच्या तत्त्वज्ञानाचा मराठी भाषकात परिचय व प्रसार करण्याचे काम या भाषांतराने साधले. स्वामी विवेकानंदांच्या इंग्रजी चरित्राचे ह्यांनी चार भागांत भाषांतर (१९१७) केले आहे.

उषा टाकळकर, सुशीला पाटील

**फडणवीस, वासुदेव वामन :** ० वा. वा. फ. : (ज. ३० जून, १८९५, नागपूर – मृ. २१ मे, १९४९, नागपूर). समीक्षक व पत्रकार. शिक्षण नागपूर येथे. बी.ए. नागपूरच्या नील सिटी हायस्कूलमध्ये शिक्षक.

ह्यांचे लेखन 'वागीश्वरी', 'सावधान', 'प्रतिभा' इत्यादी नियतकालिकांतून प्रसिद्ध झाले आहे. 'यंग पेट्रीयट' व 'नागपूर ऑब्जर्व्हर' या पत्रांतूनही ते लिहीत. मोजकेच पण लक्षवेधक असे यांचे लेखन असे. नागपूरच्या 'वागीश्वरी' मासिकाच्या व 'सावधान' साप्ताहिकाच्या निर्मितीशी त्यांचा संबंध होता. 'वागीश्वरीतील कलात्मक वाङ्मय' ह्या उत्कृष्ट वाङ्मयीन लेखाप्रमाणेच 'विचार विलास' व 'सुशीलेचा देव' ह्या वा. म. जोशी ह्यांच्या पुस्तकांवरील तसेच या. मु. पाठक ह्यांच्या 'शशिमोहन' या खंडकाव्यावरील त्यांचे चिकित्सक समीक्षा लेख उल्लेखनीय आहेत. 'केळकरांचे अद्वितीयत्व', 'लोकमान्यांचे राजकारण' ह्या अभ्यासपूर्ण लेखांप्रमाणेच नागपूर विद्यापीठाचे भूतपूर्व कुलगुरू न्या. भवानीशंकर नियोगी, नागपूरच्या 'महाराष्ट्र'चे संपादक गोपाळराव ओगले, बॅ. मोरोपंत अभ्यंकर, मध्यप्रांताचे एकेकाळचे गृहमंत्री व गव्हर्नर श्रीपाद बळवंत तांबे, त्याचप्रमाणे माधव श्रीहरी अणे इ. राजकारण-समाजकारणात अग्रणी असलेल्या व्यक्तींच्या जीवनकार्याचे सुरेख दर्शन घडविणारे लेखही महत्त्वपूर्ण आहेत. ह्या व्यक्तिविषयक लेखांचे *व्यक्तिविशेष* (१९७८) हे पुस्तक प्रसिद्ध आहे.

'वागीश्वरी'च्या (१९२९–३५) प्रत्येक अंकातील 'वागीश्वरीचा वीणाझंकार' हे राजकीय घटनांवरील भाष्य असलेले सदरही त्यांनी चालविले होते. राष्ट्रवादी दृष्टी व परखड लेखन यामुळे हे सदर लोकप्रिय ठरले. 'सावधान' साप्ताहिकातील ह्यांचे लेखही पु. भा. भावे ह्यांच्या लेखांप्रमाणेच शैलीपूर्ण व राष्ट्रभक्तीने युक्त असत. पु. भा. भावे फडणविसांचा एक श्रेष्ठ शैलीकार लेखक म्हणून उल्लेख करतात.

रा. बा. बक्षी

**फडतरे, रामचंद्र विष्णू :** (ज. १८८८ – मृ. २४ फेब्रुवारी, १९५५). शिकारकथा लेखक. प्रारंभी पुण्यात 'सुधारक', 'राजकारण', 'राष्ट्रहितैशी' ही वृत्तपत्रे काही वर्षे चालविली. पुढे पुणे जिल्ह्यातील पाटस गावी स्थायिक होऊन शेतीचा व्यवसाय स्वीकारला. ते उत्कृष्ट शिकारी होते. शिकारीच्या छंदापायी त्यांनी बरीच भ्रमंती केली व आफ्रिकेसही जाऊन आले.

मराठीत शिकारीसंबंधी सत्य घटनांना व हकीकतींना कथारूप देऊन शिकारकथेला खरीखुरी प्रतिष्ठा फडतरे यांनीच प्रथम प्राप्त करून दिली. *रानोमाळ* (१९४४), *मृगया* (१९४९) व *तिसरी झेप* (१९४७) हे त्यांचे शिकारकथा संग्रह प्रसिद्ध आहेत. शिकारीच्या घटना-प्रसंगातील चित्तथरारकता, शिकाऱ्याच्या मनातील द्वंद्व, भिन्न अनुभव, प्राणी जीवनातील सूक्ष्म बारकावे व शिकारीतील नाट्य टिपण्याचे कौशल्य यांमुळे फडतरे यांच्या शिकारकथा प्रत्ययकारक झाल्या आहेत.

नंदिनी कोटलीकर, इंदुमती शेवडे

**फाटक, गणेश कृष्ण :** ० गोमा गणेश : (ज. १८९५ – मृ. १९३९). नाटककार व कादंबरीकार. आयुष्य दक्षिण महाराष्ट्राच्या संस्थानी मुलखांत गेले. मिरजच्या संस्कृत महाविद्यालयात अनेक शास्त्रांचे अध्ययन. तेथे वऱ्हाडचे पुढारी व साहित्यिक वीर वामनराव जोशी यांच्याशी परिचय. त्यांच्याच प्रोत्साहनाने गणेशशास्त्र्यांनी आपले पहिले नाटक *स्वर्गसाम्राज्य* (१९२९) लिहिले.

त्यांनी इतर वाङ्मयप्रकारही हाताळले. *वीरात्मा* (१९२७), *आर्य धर्माचा जयजयकार* (बुद्धोत्तर कालखंड चित्रित करणारी ऐतिहासिक कादंबरी, १९२७), *अनाथांचा नाथ* (१९२७), *नव्या पतिव्रता* (१९३९), *हद्पार* (१९३८) या कादंबऱ्या आणि *नाट्यछटासंग्रह* (१९२९), *लहान मुलांसाठी गोष्टी* (१९३९), *कविता, नाट्यछटा, एकांकिका यांचा संग्रह* (१९३९) हे लेखन प्रसिद्ध आहे. मात्र नाटककार म्हणून त्यांची विशेष प्रसिद्धी आहे. त्यांची उल्लेखनीय नाटके खालीलप्रमाणे : *पंतांची सून* (१९२८), *स्वर्गसाम्राज्य* (१९२९), *माझी जमीन* (१९३०), *नानांची माया* (१९३०), *स्वर्गसुंदरी* (१९३०), *लाडकी लक्ष्मी* (१९३०), *डेक्कनक्वीन* (१९३२), *व्याही-विहिणी* (१९३२), *मोटारवाला* (१९३४), *सासुरवास* (१९३४), *घरजावई* (१९३५), *स्टेट कॉंग्रेस* (१९३९) इत्यादी. ही नाटके प्रामुख्याने पौराणिक व सामाजिक असून, ती 'नाट्यकला प्रसारक', 'रंगबोधेच्छु', 'रंगदेवता थिएट्रिकल्स', 'देशबंधु', 'प्रभात' इत्यादी नाट्यसंस्थांनी रंगभूमीवर आणली.

सामाजिक नाटकांतून सनातनी विचारसरणीचा पुरस्कार करावयाचा व पौराणिक नाटकातून आदर्शवादी स्त्री-पुरुषांच्या चित्र-रेखाटणातून सनातनी मूल्यांची थोरवी सांगायची, अशी सरळ व लोकरंजक भूमिका स्वीकारल्यामुळे त्यांची नाटके परंपरावादी प्रेक्षकांत लोकप्रिय झाली. चटकदार संवाद व सुबोध पद्यरचना हे यांच्या नाटकांचे गुणविशेष. यांच्या काही नाटकांची कानडी रूपांतरे होऊन ती कानडी रंगभूमीवरही लोकप्रिय झाली.

मु. श्री. कानडे, इंदुमती शेवडे

**० फुलारी :** पहा कुलकर्णी, भगवान रघुनाथ

**फुले, (महात्मा) जोतिराव गोविंदराव :** (ज. १८२७ – मृ. २८ नोव्हेंबर, १८९०). थोर समाजसुधारक, सत्यशोधक समाजाचे संस्थापक. जोतिराव फुले हे महात्मा फुले म्हणून सुपरिचित आहेत. गोऱ्हे उपनामधारक गोविंदराव या माळी ज्ञातीतील गृहस्थांचे हे पुत्र. त्यांचे पूर्वज सातारा जिल्ह्यातील कटगुण येथील वतनदार. परंतु शेटिबा या त्यांच्या पूर्वजाने पुण्यात स्थानांतर केले आणि पेशव्यांच्या दरबारात फुले पुरविण्याचे काम केले, म्हणून त्यांचे मूळ आडनाव लुप्त होऊन ते फुले या नावानेच ओळखले जाऊ लागले.

जोतिराव कुशाग्र बुद्धीचे, उत्साही, निर्भीड आणि देखणे पुरुष होते. त्यांच्या उमेदवारीच्या काळात मुंबई विद्यापीठच अस्तित्वात नसल्याने त्यांना अल्पशिक्षणावर समाधान मानावे लागले. तथापि त्यांचे इंग्रजी चांगले होते. तसेच इंग्रजी ग्रंथांचे वाचनही डोळ्यात भरण्यासारखे होते.

तत्कालीन प्रघातानुसार पंतोजीच्या शाळेत मराठी शिक्षण घेतल्यानंतर (१८३४–३८) लहान वयातच त्यांचा विवाह नायगाव येथील नेवसे पाटलांची कन्या सावित्री हिच्याशी झाला (१८४०). त्यांचे मिशनरी शाळेतील इंग्रजी शिक्षण हे त्यानंतरचे (१८४१ ४७). याच दरम्यान त्यांनी प्रसिद्ध व्यायामशिक्षक लहूजी वस्ताद यांच्याकडे

कसरतीचे धडेही गिरविले. तेव्हा परकीय इंग्रज सरकारला बल प्रयोगाने घालवून देऊन देश स्वतंत्र करावा, असा विचारही त्यांच्या मनात उदित झाला होता. पण लवकरच अशा प्रकारची राजकीय आकांक्षा सोडून ते शूद्रातिशूद्रांच्या अवनतीचा आणि दुःस्थितीचा विचार करू लागले. आपल्या एका ब्राह्मण मित्राच्या लग्नाच्या मिरवणुकीत त्यांना मिळालेली अपमानास्पद वागणूक हे एक निमित्त झाले. पण त्यामुळे फुले अंतर्मुख होऊन विचार करू लागले. ब्राह्मणाच्या सर्वक्षेत्रीय वर्चस्वाचे बल त्यांच्याजवळील विद्येत आहे, अशी त्यांची खात्री पटली. शूद्रातिशूद्र आणि स्त्रिया यांना ब्राह्मणी दास्यातून मुक्त करण्यासाठी त्यांनी प्रयत्न आरंभिले. १८४८ मध्ये शूद्रातिशूद्रांसाठी काढलेली मुलींची शाळा हा त्या प्रयत्नाचाच एक भाग. या शाळे-साठी शिक्षक मिळेना तेव्हा त्यांनी सावित्रीबाईंना शिकवून तयार केले. या त्यांच्या लोकविलक्षण कृत्यामुळे त्यांना सपत्निक गृहत्याग करावा लागला. विशेष म्हणजे त्यांनी तो केला.

१८५१ मध्ये फुल्यांनी आपल्या काही ब्राह्मण सहकाऱ्यांसह चिपळूणकरांच्या वाड्यात तसेच रास्ता पेठेत मुलींच्या शाळांची स्थापना केली. या प्रयत्नाची नोंद इंग्लंडमध्ये खुद्द जॉन स्टुअर्ट मिल याने घेतली होती एवढे सांगितले म्हणजे त्याचे महत्त्व लक्षात येईल. तत्कालीन इंग्रज सरकारवरही त्यांच्या या कार्याचा परिणाम झाल्या-शिवाय राहिला नाही. सरकारी विद्याखात्याने १६ नोव्हेंबर १८५२ मध्ये त्यांचा मे. कँडीच्या अध्यक्षतेखाली शालजोडी देऊन सत्कार केला.

१८५४ मध्ये फुल्यांनी स्कॉटिश मिशनऱ्यांच्या शाळेत अर्धवेळ नोकरी पत्करली. स्कॉटिश व अमेरिकन मिशनऱ्यांच्या सहवासाने त्यांना ख्रिश्चन धर्माच्या मूलतत्त्वांचे पुरेसे ज्ञान तर झालेच – परंतु विशेषतः अमेरिकन लोकसत्ताक राज्यपद्धतीची चांगली माहितीही झाली. १८५५ मध्येच त्यांनी मागासवर्गीय लोकांना सोयीची अशी रात्रीची शाळाही काढली. याच साली त्यांनी आपली वाङ्मयीन (पहिली) कृती लिहिली. ते *तृतीय रत्न* नावाचे नाटक. हे नाटक मराठीतील पहिले स्वतंत्र सामाजिक नाटक मानावे लागते. या नाटकात त्यांच्यावरील मिशनऱ्यांचा प्रभाव स्पष्टपणे दिसून येतो. इ. स. १८६९ मध्ये फुल्यांनी *पवाडा छत्रपती शिवाजी राजे भोसले यांचा* या नावाचा पवाडा मुंबईच्या ओरिएंटल छापखान्यात छापून प्रसिद्ध केला.

वैचारिकतेचा मुद्दा तूर्त बाजूला ठेवला तरी एक वाङ्मयप्रकार या नात्याने फुल्यांनी तुकोबांच्या अभंगांचा कसून अभ्यास करून त्यावर प्रभुत्व मिळवले. आपल्या वाङ्मयकारकिर्दीच्या आरंभापासून अखेरपर्यंत ते अभंगांची अर्थात अखंड रचना करीत राहिलेले दिसून येतात.

*तृतीय रत्न* (१८५५) ते *छत्रपती शिवाजी राजे भोसले यांचा पवाडा* (१८६९) या दोन कृतींमधील तब्बल चवदा वर्षांच्या काला-वधीत फुल्यांनी काही लिहिलेले दिसत नाही. अर्थात या कालात विधवांचे पुनर्विवाह, बालहत्या प्रतिबंधगृहाची स्थापना, स्वतःच्या घरचा पाण्याचा हौद अस्पृश्यांसाठी खुला करणे अशा नानाविध सामा-जिक सुधारणांमध्ये ते गुंतलेले होतेच. दरम्यान शिक्षकी पेशा सोडून ते नव्या कंत्राटी कामाच्या व्यवसायात शिरले. त्यामुळे त्यांचे अनुभवविश्व अधिक व्यापक झाले. शिवाय ब्राह्मणी वर्चस्वाचे नवीन नमुने पहावयास मिळाले आणि शेतकऱ्यांच्या परिस्थितीकडे व प्रश्नांकडे त्यांचे लक्ष वेधले गेले.

१८६९ मध्येच *ब्राह्मणांचे कसब* हे पुस्तकही फुले यांनी प्रसिद्ध केले. ते त्यांनी 'महाराष्ट्र देशातील कुणबी, माळी, मांग, महार' यांस अर्पण केलेले आहे. पूर्वीच्या तीन कृतींमधून सूत्ररूपाने आलेल्या प्रमेयाचा दाहक शैलीने आविष्कार करणारे खळबळजनक पुस्तक *गुलामगिरी* १८७३ मध्ये प्रकाशित झाले. ते फुल्यांनी युनायटेड स्टेट्समधील गुलामांस दास्यत्वापासून मुक्त करण्याच्या कामात औदार्य, निरपेक्षता व परोपकारबुद्धी दाखविणाऱ्या सदाचारी लोकांना अर्पण केलेले आहे.

इ. स. १८७३ मध्येच फुल्यांच्या वाङ्मयीन व वैचारिक स्वरूपा-तल्या मांडणीला प्रत्यक्ष संघटनात्मक चळवळीची जोड मिळाली ती त्यांनी पुढाकार घेऊन केलेल्या 'सत्यशोधक समाजा'च्या स्थापनेने.

१८७३ ते १८८३ अशी दहा वर्षे परत एकदा फुल्यांच्या लेखणीने विश्रांती घेतलेली दिसते. या काळात ते सत्यशोधक समाजाच्या प्रचाराच्या कार्यात गुंतलेले असावेत. दरम्यान (१८७६–८२) या कालखंडात त्यांना पुणे नगरपालिकेचे सदस्यत्वही मिळाले होते. १८८२ मध्ये त्यांनी हंटर यांच्या शिक्षण आयोगापुढे केलेले निवेदन शिक्षणविषयक विचारांमधील एक मैलाचा दगड मानला जातो. *शेतकऱ्यांचा असूड* पुस्तकाचा विषय १८७८ पासून फुल्यांच्या डोक्यात घोळत होता. पुस्तकाच्या स्फोटकतेमुळे व ते छापले तर निर्माण होऊ शकणाऱ्या संभाव्य अब्रूनुकसानीच्या खटल्यामुळे स्वतः नारायणराव लोखंड्यांसारख्या सत्यशोधक सहकाऱ्यांनेही त्याच्या प्रकाशनास पूर्ण प्रतिसाद देण्याचे टाळले. एवढ्यावरून त्याची भेद-कता लक्षात यावी. कदाचित यामुळेच त्याच्या प्रकाशनात (इ. स. १९६७) अडचणी आल्या असाव्यात.

१८८५ मध्ये फुल्यांनी *सत्सार* नामक नियतकालिक चालविण्याचा प्रयत्न केला. त्याचे दोन अंक उपलब्ध होतात. या अंकामधून फुल्यांनी तत्कालीन प्रार्थनासमाजीय स्त्रीसुधारणाविषयी उदासीन असणारे स्वपक्षीय सत्यशोधक यांच्यावर टीका केलेली आहे व पंडिता रमाबाई, ताराबाई शिंदे अशा स्त्रियांचा पक्ष घरलेला आहे.

शेतकऱ्यांच्या वतीने *असूड*मधून फुल्यांनी जणू तक्रारींचा पाढाच वाचला होता. त्याला छेद बसेल असे प्रतिपादन न्या. महादेव गोविंद रानडे यांनी सुरू केले होते. रानडे यांच्या मतांचा प्रतिवाद करून शेतकऱ्यांच्या दारुण दुःस्थितीचे विदारक चित्रण करणारे *इशारा* नावाचे पुस्तक फुल्यांनी १८८५ मध्ये लिहिले.

मृत्यूपूर्वी काही दिवस अगोदर विकलांग अवस्थेत म्हणजे १८८९ मध्ये फुल्यांनी आपला *सार्वजनिक सत्यधर्म* हा शेवटचा ग्रंथ लिहून पूर्ण केला. त्यांच्या मृत्यूनंतर (२८ नोव्हेंबर, १८९०) यांचे दत्तकपुत्र यशवंतराव फुले यांनी तो १८९१ मध्ये प्रसिद्ध केला.

*सार्वजनिक सत्यधर्म* वाचला म्हणजे फुल्यांच्या ब्राह्मणविरोधा-मागची व्यापक मानवतावादी भूमिका लक्षात येते आणि जनतेने त्यांना 'महात्मा' ही पदवी का दिली असावी (११ मे, १८८८) याचाही उलगडा होतो.

फुल्यांना एकूणच वाङ्मयीन व सांस्कृतिक व्यवहारांबद्दल आस्था होती. महर्षी दयानंद सरस्वतींच्या पुण्यामधील मिरवणुकीला त्यांनी दिलेले संरक्षण (१८७५), रमण्यात वाटण्यात येणाऱ्या दक्षिणेचे प्रकाशन अनुदानात रूपांतर करण्यासाठी लोकहितवादी, भवाळकर प्रभृतींनी सरकारला केलेल्या अर्जांचे उत्तरदायित्व स्वतःवर घेऊन त्यांचे ग्रामण्यापासून केलेले संरक्षण आणि मराठी ग्रंथकारसभेच्या न्या. रानडे यांना लिहिलेले साहित्यविषयक पत्र (११ जून, १८८५) या गोष्टी या संदर्भात पुरेशा बोलक्या आहेत.

मराठी साहित्यात विसाव्या शतकाच्या उत्तरार्धात वाढीस लाग-लेल्या दलित व ग्रामीण साहित्याची बीजे फुले यांच्या वाङ्मयात आढळून येतात.

सदानंद मोरे

**फुले, सावित्रीबाई जोतिराव** (ज. ३ जानेवारी, १८३१, नायगाव, जि. सातारा – मृ. १८९७). महात्मा जोतिराव फुले यांच्या पत्नी,

आद्य भारतीय शिक्षिका, सत्यशोधक समाजाच्या कार्यकर्त्या. सातारा जिल्ह्यातील शिरवळजवळील नायगाव या खेड्यात खंडोजी नेवसे-पाटील यांचे पोटी जन्म. नेवसे हे माळी समाजातील एक मातब्बर घराणे मानण्यात येते. इ. स. १८४० मध्ये वयाच्या नवव्या वर्षी सावित्रीबाईंचा विवाह जोतिराव फुले यांच्याशी झाला. सावित्रीबाईंच्या चरित्रामधील अनेक बारीकसारीक तपशील डॉ. मा. गो. माळी यांनी विशेषतः 'झोडगे संग्रहा'तून पुरविले आहेत. त्यानुसार स्वतः जोतिरावांनीच सावित्रीबाईंना शिक्षणातील प्रारंभिक धडे दिले आणि पुढे नॉर्मल स्कूलच्या मिसेस मिचेल यांच्या शाळेत तिसऱ्या वर्षात घातले. मिचेलबाईंनी सावित्रीबाईंना अध्यापन-विद्या शिकवून शिक्षिका होण्यास पात्र केले.

जोतिराव फुल्यांनी १८४८ मध्ये सुरू केलेल्या मुलींच्या शाळेत कोणी शिक्षिका मिळेना. तेव्हा सावित्रीबाईंनी ती जबाबदारी पत्करली व निंदा, उपहास, टवाळी, विरोध यांना तोंड देऊन निभावलीही. त्याचप्रमाणे १८४८ मध्येच दलित वस्तीत उघडलेल्या शाळेतही सावित्रीबाईंनी शिक्षिकेचे काम केले. अशा प्रकारे शूद्रातिशूद्र आणि स्त्रिया यांचे फुले दंपती भाग्यविधाती ठरली. अर्थात त्यासाठी उभयतांना घरच्यांचाही विरोध पत्करून गृहत्याग करावा लागला; तो त्यांनी सोशिकपणाने केलाही.

सावित्रीबाईंचा जोतिरावांच्या सर्वच सुधारणाविषयक उपक्रमात सक्रिय सहभाग होता असे दिसते. त्यात सत्यशोधक समाजाचे कार्य, बालहत्या प्रतिबंधक गृहाची स्थापना, सत्यशोधक पद्धतीने ब्राह्मण पुरोहिताशिवाय विवाहविधी इत्यादींचा समावेश होतो. या गृहातच प्रसूत झालेल्या एका ब्राह्मण विधवेचा मुलगा फुले दांपत्याने दत्तक घेतला. हाच मुलगा डॉ. यशवंतराव फुले म्हणून पुढे प्रसिद्धीस आला. १८७६-७७ साली पडलेल्या दुष्काळातही सावित्रीबाईंनी जोतिरावांबरोबर अन्नछत्र उघडणे यासारखी कामे केली. १८९० मध्ये जोतिरावांचे निधन झाल्यावरही सावित्रीबाईंनी जोतिरावांचे कार्य उमेदीने व उत्साहाने चालू ठेवले. १० मार्च, १८९७ रोजी सावित्रीबाईंनी इहलोक सोडला.

जोतिराव फुल्यांना अनेक कार्यांमध्ये साथ देणाऱ्या सावित्रीबाईंना स्वतःचे असे व्यक्तित्व होते. त्यांनी स्वतंत्रपणे लेखनही केले आहे.

सावित्रीबाईंचे उपलब्ध वाङ्मय पुढीलप्रमाणे आहे : (१) *काव्यफुले*, १८५४ (काव्यसंग्रह). (२) *बावनकशी सुबोध रत्नाकर* (१८९१). (३) *मातुश्री सावित्रीबाईंची भाषणे* (प्रकाशक–शास्त्री महाघर, वत्सल प्रेस, बडोदा, १८९२).

याशिवाय सावित्रीबाईंनी *जोतिबांची भाषणे* संपादित करून पुणे येथे शिला छापावर १८५६ मध्ये प्रकाशित केली.

सदानंद श्रीधर मोरे

संदर्भ : (१) माळी, मा. गो. 'क्रांतिज्योति सावित्रीबाई जोतिराव फुले', आशा प्रकाशन, गारगोटी, १९८७. (२) माळी, मा. गो. (संपा.) 'सावित्रीबाई फुले समग्र वाङ्मय', म. रा. सा. आणि सं. मंडळ, मुंबई, १९८८.

**फेअरबँक, सॅम्युएल बेकन** : (ज. १४ डिसेंबर, १८२२ – मृ. ३१ मे, १८९८). लेखक, भाषांतरकार, संपादक, वैज्ञानिक, गीतकार, कृषिशास्त्रज्ञ आणि वेळप्रसंगी वैद्य, अशी विविध प्रकारची सेवा रेव्ह. डॉ. सॅम्युएल बेकन फेअरबँक यांनी भारतातील आपल्या अर्धशतकाच्या प्रदीर्घ वास्तव्यात केली.

त्यांचा जन्म अमेरिकेच्या कनेक्टिकट परगण्यातल्या स्टॅम्फोर्ड येथे झाला. इलिनॉई महाविद्यालयात आणि अॅन्डोव्हरच्या पाठशाळेत त्यांचे शिक्षण झाले. १८४५ मध्ये जॅक्सनव्हील येथे प्राथमिक दीक्षा घेतल्यावर त्यांनी मराठी शिकायला सुरुवात केली. पुढे २० सप्टेंबर, १८४६ रोजी ते मुंबईस आले व तेथल्या अमेरिकन मराठी मिशनच्या मुद्रणालयाची जबाबदारी त्यांनी पत्करली. मे, १८५५ ते जानेवारी, १८५७ पर्यंत ते अमेरिकेला जाऊन आले. इकडे आल्यानंतर त्यांनी अहमदनगरपासून २५ मैलावरल्या वडाळे गावी मिशनचे ठाणे उघडले. १८७७-७८ च्या दुष्काळात फेअरबँकनी गोरगरिबांची सेवा केली.

१८४६ मध्ये महाराष्ट्रात पाऊल टाकल्यानंतर वर्ष दोन वर्षांतच फेअरबँकनी मराठीत ग्रंथरचना करावयाला आरंभ केला. गणित या विषयावरचे त्यांचे पहिले स्वतंत्र पुस्तक १८४८ मध्ये प्रसिद्ध झाले. याच विषयावर कालांतराने त्यांनी चार पुस्तके लिहिली. याशिवाय शैक्षणिक व धार्मिक विषयांवरही त्यांनी ग्रंथरचना केली आहे. कित्येक इंग्रजी गीते मूळ चालीवरच मराठीत त्यांनी उतरली. अशी काही गीते 'ईश्वरभजनाची गीते' नामक गीतसंग्रहात प्रसिद्ध झाली होती. स्वतंत्र अभंगादी रचनाही त्यांनी केली आहे. बायबलच्या भाषांतर समितीवरही त्यांनी १८५३ पासून वेळोवेळी काम केले. दर रविवारी मुलांसाठी भरणाऱ्या धर्मशिक्षण-शाळांच्या (सन्डे स्कूलच्या) शिक्षकांना मार्गदर्शनपर काहीच नसल्याने त्यांनी 'ज्ञानोदय' नियतकालिकाबरोबर सप्टेंबर १८९२ पासून एक मासिक पुरवणी छापून ही अडचण दूर केली. पुढे या शाळांच्या धड्यांवरल्या टीका – टिप्पणांसह चित्रे, लघुकथा, बोधवचने आणि कविता घालून 'बालशिक्षक' साप्ताहिक ऑगस्ट १८९३ पासून सुरू केले. 'ज्ञानोदय' या नियतकालिकाची संपादकीय सूत्रेही त्यांनी तीनदा हाती घेतली होती पण ती काही महिन्यांपुरतीच!

विविध क्षेत्रांत अविश्रांत श्रम करीत असतानाच त्यांनी मराठी ख्रिस्ती वाङ्मयात मोलाची भर टाकली, हे विशेष होय. 'ज्ञानोदय' या नियतकालिकात त्यांनी विविध विषयांवर विचारप्रवर्तक लेख लिहिले. त्यांनी २०–२५ पुस्तके, पत्रिका वगैरे लिहिल्या आहेत. परंतु त्यांपैकी पुष्कळशी दुर्मिळ झाली आहेत.

त्यांची विद्वत्ता आणि बहुविध देशसेवा, धर्मसेवा लक्षात घेऊन कॅनडातील मॉन्ट्रिअल विद्यापीठाने त्यांना डी.डी. (डॉक्टर ऑफ डिव्हिनिटी) ही बहुमोलाची पदवी १८८६ साली देऊन त्यांच्या गुणांचे चीज केले.

भास्करराव जाधव

**बर्जेस, एबेझर** : (ज. २६ जून, १८०५ – मृ. १ जानेवारी, १८७०). हे अमेरिकन मिशनरी ग्राफ्टन व्हरमॉन्ट येथे जन्मले. १० ऑगस्ट, १८३९ रोजी ते मिशनरी म्हणून सहकुटुंब भारतात आले. त्यांची नेमणूक प्रथम अहमदनगरास झाली. अमेरिकन मराठी मिशनने १८३५ मध्ये नगरास मुलांसाठी शाळा किंवा सेमिनरी उघडली होती. पुढे १८४४ मध्ये या शाळेला जोडूनच एक इंग्रजी शाळा उघडली व तिचे मुख्याध्यापक म्हणून बर्जेस यांची नेमणूक झाली. या अगोदर म्हणजे मार्च, १८४२ मध्ये बायबलच्या मराठी भाषांतराच्या पुनरीक्षण समितीवर काम करण्यासाठी मुंबईच्या बायबल सोसायटीने त्यांना आमंत्रण दिले. त्यावेळी बायबलचा प्रथम खंड म्हणजे जुना करार, यातील काही ग्रंथांचे जॉन डिक्सन व ॲलन ग्रेव्हज यांनी केलेल्या भाषांतराचे पुनरीक्षण चालू होते. या समितीवर बर्जेसनी १८५३ पर्यंत काम केले. त्यांचे बहुतेक कार्य शिक्षणक्षेत्रातच झाले. या मिशनचे मराठी व्याकरणकार म्हणून ते ओळखले जात. त्यांनी या विषयावर ४-५ पुस्तके लिहिली आहेत. त्यात काही शाळेसाठी आणि काही मराठी शिकणाऱ्यांकरिता इंग्रजी भाषेत आहेत.

'ज्ञानोदय पंचांग–१८४७' तयार करण्यातही त्यांनी मदत केली होती. ज्योतिःशास्त्रावरही त्यांनी ग्रंथलेखन केले.

अहमदनगरहून बर्जेस साताऱ्याला बदलून गेले होते. पण वर्षभरातच त्यांच्या पत्नी वारल्या. ते स्वतःदेखील आजारी पडले. तेव्हा आपली तीन आईपोरकी मुले घेऊन ते २८ डिसेंबर, १८५३ रोजी अमेरिकेस परतले.

तिकडे गेल्यावरही त्यांना भारताचे विस्मरण झाले नाही. महत्त्वाच्या पण अत्यंत कठीण अशा 'सूर्यसिद्धान्त' या ग्रंथाचे परिशीलन करून, बारकाईने संशोधन करून त्यांनी तो इंग्रजीत उतरला. तो अमेरिकन ओरिएन्टल सोसायटीने प्रसिद्ध केला (१८६०).

त्यांनी केलेले एकंदर लेखन पुढीलप्रमाणे : (१) *Easy lessons in Reading with English and Marathi Vacabulary*, १८४१, दुसरी आवृत्ती, १८५१. (२) *खगोलविद्या*, मुंबई, १८४६, दुसरी आवृत्ती, १८५७. (३) *मराठी भाषेचे व्याकरण*, मुंबई, १८४८. (४) *इंग्लिश व्याकरण आणि भाषण, सांप्रदायिक वाक्ये इंग्लिश आणि मराठी*, मुंबई, १८५१, दुसरी आवृत्ती, १८५३. (५) *Easy Primer and Vocbulary in Marathi*, मुंबई, १८५१. (६) *Grammer of the Marathi Language*, मुंबई, १८५४. (७) *Translation of the 'Surya Siddhanta'* New Heven, Connecbaet, USA, 1860.

भास्कर जाधव

**बंकटस्वामी (व्यंकटसिंग न्यहालसिंग) :** (ज. १८७७ – मृ. ९ मे, १९४४). वारकरी संप्रदायाचे प्रवचनकार व 'ज्ञानेश्वरी'चे संपादक. आधुनिक वारकरी संत व संत वाङ्मयाचे भाष्यकार. बंटकस्वामी नावाने महाराष्ट्राला परिचित. पूर्वज रजपूत असून मूळचे बुंदेलखंडातील रहिवासी. सुमारे २०० वर्षांपूर्वी व्यापाराच्या निमित्ताने बीड जिल्ह्यात स्थायिक.

इगतपुरीस स्वतःचे दुकान. तेथेच १८९० साली विष्णुबुवा जोगांची भेट व उपदेश ग्रहण. गुरूपदेशानंतर काही काळ तपश्चरण व आळंदीस 'ज्ञानेश्वरी'ची शंभर पारायणे. त्यांचे कीर्तन म्हणजे श्रोत्यांना एक मेजवानीच असे.

१९२० साली विष्णुबुवा वैकुंठवासी झाल्यावर त्यांच्या भागवत-धर्म प्रचाराचे व वारकरीशिक्षणाचे कार्य बंकटस्वामींनी धडाडीने पुढे चालविले. त्यांचे सार्थ सटीक ज्ञानेश्वरी तयार करण्याचे अपुरे राहिलेले कार्य माधवराव देशमुख, सोनोपंत दांडेकर व पांडुरंग शर्मा यांच्या साह्याने पूर्ण करून ती त्यांनी १९२७ साली प्रकाशित केली. स्वामींचे चरित्र व जीवनकार्य यासंबंधीचे 'बंकटस्वामी महाराज यांचे चरित्र' गो. त्र्यं. जोशी यांनी लिहिले आहे (१९६१).

गं. दे. खानोलकर, इंदुमती शेवडे

**बनसोडे, किसन फागोजी :** (ज. १८ फेब्रुवारी, १८७९, नागपूरपासून चोवीस मैल दूर असलेल्या मोहपा, जि. नागपूर येथे– मृ. १० ऑक्टोबर, १९४६, नागपूर). महाराष्ट्रातील त्या काळचे नॉर्मल स्कूलचे पहिले प्रशिक्षित अध्यापक (१८९३), दलितोद्धारक, पत्रकार व कवी. किसन फागोजी बनसोड ऊर्फ बनसोडे पाटील यांचा जन्म दलित कुटुंबातील. नागपूरला त्यांनी १९०१ मध्ये 'सन्मार्गबोधक अस्पृश्य-समाज' या नावाची संस्था स्थापन केली. १९०७ साली नागपूरलाच मुलींची शाळा सुरू केली. बनसोडे यांचे म. गांधी, म. फुले, विठ्ठल रामजी शिंदे, डॉ. बाबासाहेब आंबेडकर प्रभृतींशी जिव्हाळ्याचे संबंध होते. मात्र म. गांधींनी अस्पृश्यांच्या संदर्भात वापरलेली 'हरिजन' ही संज्ञा त्यांना मान्य नव्हती. त्याचप्रमाणे डॉ. आंबेडकरांच्या धर्मांतरालाही त्यांचा विरोध होता.

लोकशिक्षणाचे प्रभावी माध्यम म्हणून त्यांनी मोहपा या गावी १९०१ साली एक मुद्रणसंस्था स्थापन केली आणि *निराश्रित हिंदू नागरिक* (१९१०), *विटाळ विध्वंसक* (१९१३), *मजूर पत्रिका* (१९१८), *चोखामेळा* (१९३१–३६) अशी वर्तमानपत्रे सुरू केली. यांनी *संत चोखामेळा चरित्र* (१९४२), *सत्यशोधक जलसा* व *चोखामेळा दर्शन* ही नाटके लिहिली.

वयाच्या केवळ दहाव्या वर्षी स्वतःवरील अन्यायाच्या प्रतिक्रियेतून पहिले काव्य लिहिले. त्यांची निवडक काव्यरचना *प्रदीप* (१९५९) या संग्रहात समाविष्ट आहे. प्रस्तावनाकार प्रा. भ. श्री. पंडितांच्या मते किसन फागूंच्या कवितेचा विषय म्हणजे अस्पृश्यतेच्या अन्याया-विरुद्धचा लढा होय. *विटाळ विध्वंसक* (१९१३) या लावणीवजा दीर्घकाव्यात तत्कालीन दाहक परिस्थितीचे व दलितांच्या प्रकृति-प्रवृत्तीचे सम्यक पण जळजळीत दर्शन घडते. त्यांच्या कवितेचे स्वरूप बरेचसे शाहिरी आहे. भाषेपेक्षा 'बोली'ला अनुसरणारी, दलितो-द्धारार्थ आर्त टाहो फोडणारी ती कविता आहे. *एका साधूची फजिती, पारतंत्र्य विमोचन अथवा अंत्यज सुधारणेचा मार्ग, सनातन धर्मोचा पंचरंगी तमाशा* (१९३२) हे त्यांचे तमाशे गाजले. *संत चोखामेळा चरित्र गाथा* (१९४२) हा त्यांचा संशोधित व संपादित ग्रंथही उल्लेखनीय. या ग्रंथात चोखोबांचे ७६७ अभंग परिश्रमपूर्वक गोळा करून त्यातल्या निवडक अभंगांचा समावेश केला आहे.

पत्रकार या नात्याने किसन फागोंनी केलेली कामगिरीही महत्त्वाची आहे. *मराठा दीनबंधु* (१९०२), *निराश्रित हिंदू नागरिक* (१९१०), *विटाळ विध्वंसक* (१९१३), *मजूर पत्रिका* (१९१८) व *चोखामेळा* (१९३१) ही त्यांची साप्ताहिक वृत्तपत्रे. दलित स्त्रियांच्या शिक्षणाचा पुरस्कार करणे व दलित समाजात अन्याया-विरुद्ध व सामाजिक न्याय व समता यांसाठी जागृती निर्माण करणे, ह्या हेतूने त्यांनी ही वृत्तपत्रे काढली. या पत्रांखेरीज 'ज्ञानप्रकाश', 'सकाळ', 'सुबोध पत्रिका', 'काळ', 'केसरी', 'मुमुक्षु', 'लोकमान्य', 'महाराष्ट्र' इत्यादी वृत्तपत्रांतूनही त्यांचे स्फुट लेखन प्रसिद्ध झाले आहे.

ज्योती लांजेवार, लता जाधव

संदर्भ : (१) शेंडे, ना. रा. 'दलितोद्धारक गुरुवर्य बनसोडे', १९८१. (२) पानतावणे, गंगाधर, 'विद्रोहाचे पाणी पेटत आहे'.

**बनहट्टी, नारायण दासो :** (ज. १८६२, मिरज – मृ. २३ फेब्रुवारी, १९४७). मूळ घराणे कर्नाटकातील. व्याकरण व संगीत या विषयाचे लेखक व निबंधकार. श्री. ना. बनहट्टी यांचे वडील. राजेंद्र बनहट्टी यांचे आजोबा. जुन्या पिढीतील एक विद्वान. शिक्षण बी.ए. (डेक्कन कॉलेज, पुणे, १८८७). १८८८ साली एल्फिन्स्टन कॉलेजात सुपरिंटेंडेंट व लायब्रेरियन म्हणून नेमणूक. १८९५ मध्ये डेक्कन कॉलेजात असि. प्रोफेसर ऑफ संस्कृत म्हणून नियुक्ती. पुढे सरकारी शिक्षणखात्यात बदली. प्रारंभी उपशिक्षक, पुढे मुख्य शिक्षक म्हणून नेमणूक. संस्कृत-बरोबर प्राकृत, महाराष्ट्री, अपभ्रंश इत्यादी भाषांचा सूक्ष्म अभ्यास.

१९०४ साली 'मराठी भाषेची लेखनशुद्धी' यावर मराठी विद्वानांत जो प्रदीर्घ वाद झाला त्यात नारायण रावांनी 'केसरी' व 'ज्ञानप्रकाश' या नियतकालिकांतून मार्मिक लेख लिहिले. त्यांचे संगीताचे सखोल ज्ञान होते हे त्यांनी लिहिलेल्या *बालसंगीत बोध* (३ भाग) या पुणे गायन समाज मालेतील ग्रंथावरून दिसते (१९०४–०६). वस्तुतः हा प्रौढ संगीतबोध आहे. त्यात तत्पूर्वीचे सर्वभाषीय उपलब्ध ग्रंथ वाचून एकूण गायनवादन विद्येचे शास्त्र संपूर्णपणे मांडले आहे. एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस महाराष्ट्रात प्रगत गायनाच्या पद्धती कोणकोणत्या प्रकारांच्या होत्या, यांचा मागोवा घेणारा हा ग्रंथ आहे.

'देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण समाजातील देवता व दैवते' (१८५६), 'देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण समाजाची पूर्वपीठिका व संबंध (१८५६), 'यरलव यांचा क्रम व शि. म. परांजपे' (१९२९), 'चिंतामणराव वैद्य यांच्या आठवणी' (१९३८) असे काही माहितीपूर्ण निबंध यांनी लिहिले आहेत.

गं. दे. खानोलकर, इंदुमती शेवडे, मृणालिनी शहा

**बरवे, अनंत वामन :** (ज. २८ ऑगस्ट, १८९६ – मृ. २६ ऑक्टोबर, १९२३). नाटककार व रंगभूमीविषयक चळवळीत विशेष लक्ष घालणारे लेखक. बालपण मनमाड येथे. प्रथम नांदगाव व नंतर पुणे येथे मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण. घोडनदी येथे तीन वर्षे शाळेत नोकरी. पुढे अखेरपर्यंत पुणे येथील आर्यभूषण छापखान्यात मुद्रित शोधक.

'राजहंस' (१८८१), 'लोकसेवा' (१८९७) आणि 'नाट्यकला' (१९०४) अशी विविध नियतकालिके काढण्याची यांनी खटपट केली. नाट्यकलेची सर्वांगीण उन्नती व्हावी यासाठी १९०५ मध्ये यांनी पहिले नाट्यसंमेलन भरविले व त्यानंतर नेटाने पंधरा संमेलने भरविली. नाट्यशिक्षणाचे वर्ग उघडून त्यासाठी क्रमिक पुस्तके तयार केली. नाट्यसंमेलनाच्या अध्यक्षांची भाषणे *नाट्यविषयाची सुशिक्षित चर्चा* (१९१३) नावाने प्रकाशित केली. त्यांनी ऐतिहासिक, पौराणिक, समकालीन राजकीय आंदोलनांचे पडसाद उमटविणारी, तसेच आधारित व रूपांतरित अशी एकूण पंधरा नाटके लिहिली. त्यांपैकी *महाराणा प्रतापसिंह* (१८९५) हे नाटक विशेष गाजले. १९१० साली सरकारने ते जप्त केले. त्यांची नाट्यरचना बाळबोध वळणाची, साधी सुबोध आहे. पद्यरचना प्रासादिक व किर्लोस्करी थाटाची आहे. मराठी रंगभूमीच्या उन्नतीचा चौफेर विचार करणारा व त्यासाठी प्रयत्न करणारा निरलस नाट्यसंघटक म्हणून त्यांचे कार्य उल्लेखनीय व अविस्मरणीय आहे.

मु. श्री. कानडे, प्रभा आपटे

**बरवे, विनायक नरहर ऊर्फ काकासाहेब :** (ज. १२ जुलै, १८८८ – मृ. ६ मार्च, १९५४). वृत्तपत्रकार, दलितांचे कैवारी. माध्यमिक शिक्षण घेत असतानाच स्वातंत्र्य चळवळीकडे आकर्षिले गेले. शिक्षण बी.ए., एल्एल्.बी. १९१७ पासून धुळे येथे वकिली व समाजकार्य.

ह्यांची *आचारधर्म* (१९३०) ही पुस्तिका व *नीतिधर्मातील श्रेष्ठ व्रते* (१९३१) हा महात्मा गांधींच्या व्रतविचारांचा अनुवाद, ही पुस्तके प्रसिद्ध आहेत. हरिजन सेवक संघाचे मुखपत्र असलेल्या 'दलितसेवका'चे ते (१९४१ ते १९५२) संपादक होते. त्यांचे बरेचसे लेखन या नियतकालिकातून प्रसिद्ध झाले. 'दलितसेवकातील लेख' (१९५६) आणि 'समाजरचना व विवेकनिष्ठा' ह्या दोन लेखसंग्रहांमध्ये त्यांचे लेख संग्रहित झाले आहेत. या दोन पुस्तकांतील निवडक लेख *मानव धर्मविवेचन* (१९६२, संपादक – देवीदास बागुल) ह्या लेखसंग्रहात समाविष्ट आहेत.

स्वातंत्र्यानंतरच्या त्यांच्या लेखनातून अनेक महत्त्वाच्या प्रश्नांचा समतोल बुद्धीने परामर्श घेतलेला दिसतो. स्वतंत्र विचारशक्ती, बुद्धिवादी दृष्टिकोण आणि त्याला मिळालेली कृतिशीलता व सेवाभावी कार्याची जोड यामुळे त्यांचे वृत्तपत्रीय लेखन महत्त्वाचे ठरते.

हरिश्चंद्र थोरात, प्रभा आपटे

**बरवे, विनायक लक्ष्मण :** ० कवी आनंद : (ज. २६ नोव्हेंबर, १८९६ – मृ. २६ जानेवारी, १९४८, सोनगाव, जि. रत्नागिरी). बी.ए., एल्एल्.बी. ह्या पदवी मुंबई येथून संपादन केल्यानंतर त्यांनी १९२४ पासून चिपळूण येथे वकिली केली. त्यांनी कविता, नाटके, कथा, कादंबरी व लघुनिबंध असे विविध प्रकारचे लेखन केले असून, काव्यलेखनासाठी 'आनंद' हे टोपणनाव धारण केले होते. बरवे यांनी सुमारे तीनशे कविता लिहिल्या असून त्यांपैकी काही कवितांना तत्कालीन मासिकांतून स्थान मिळालेले दिसते. त्यांनी कवितांमध्ये कोकणातील वातावरण व बोली भाषा यांची प्रसंगानुरूप योजना केली आहे. त्यांची व्यक्तिचित्रणे रेखाटण्याची हातोटी हृद्य असून निरीक्षणशैली मार्मिक आहे. प्रादेशिक ठसा असलेल्या त्यांच्या कविता लोकप्रिय ठरल्यामुळे अनेक प्रातिनिधिक काव्यसंग्रहांमध्ये त्या समाविष्ट झालेल्या आढळतात. बरवे यांच्या काव्यरचनांमध्ये अनेक गझलांचाही समावेश आहे. बरवे यांच्या कविता त्यांच्या मृत्यूनंतर संग्रहरूपाने प्रसिद्ध झाल्या आहेत. (*आनंदाची कविता*, संपा., अ. शा. देशपांडे, मुंबई, मराठी ग्रंथ संग्रहालय, मुंबई, १९६९).

बरवे यांचा इंग्रजी साहित्याचा व्यासंग चांगला होता. यांचे *लग्नमंडप* (१९२७) हे तीन अंकी सामाजिक नाटक थोडेफार पाश्चिमात्य धर्तीवर असून ते त्यांनी स्वतःच प्रकाशित केले आहे. या नाटकात प्रौढविवाह, हुंड्याची चाल, स्त्रीशिक्षण अशा विषयांवर विनोदाच्या माध्यमातून टीका केलेली आढळते. हे नाटक रंगभूमीवर सादर झाले होते. बरवे यांनी *माणिक एम्. ए.* (१९३२) हे दोन अंकी नाटक व नभोवाणीसाठी काही श्रुतिकाही लिहिल्या आहेत. त्यांची *कबीर*, *कलामंदिर*, *मिलीण*, *श्रमसाफल्य*, *मंगळसूत्र* इत्यादी नाटके अप्रकाशित आहेत. त्यांच्या *दख्खनशाही अथवा मुक्तजीवन* या अप्रकाशित नाटकाचा प्रयोग शाहूनगरवासी करीत असल्याचे कळते.

बरवे यांच्या कथा 'चित्रमयजगत्'मधून प्रसिद्ध होत असत. *कलमी आंबे* (१९३४), *विजा व मेघ* (१९३५) आणि *कोवळी पोफळें* (१९३५) हे त्यांचे कथासंग्रह असून *मातेश्वरी* (१९२९) ही नवलकथा प्रसिद्ध झालेली आहे. त्यांच्या काही कथा वकिलीतील अनुभवांवर आधारित आहेत. *विजा व मेघ*मध्ये स्फूर्तिदायक अशा ऐतिहासिक कथा आहेत.

बरवे यांच्या *पिसारा* (१९३७) या लघुनिबंधसंग्रहातून त्यांच्या खेळकर शैलीची व सामाजिक जाणिवेची ओळख पटते. [त्यांचा 'झरोके' हा लघुनिबंधसंग्रह प्रसिद्ध होणार अशी जाहिरात त्यांच्या *कोवळी पोफळें* (१९३५) या कथासंग्रहात दिसते.]

*मुचकुंददरी* (१९४०) ही आपली कादंबरी बरवे यांनी 'हिंदुस्थानच्या नष्ट झालेल्या गुराढोरादि ग्रामसमृद्धीस' अर्पण केली आहे. यातील कोकणचे निसर्गचित्रण, सांस्कृतिक जीवनदर्शन व कुळवाड्यांच्या बोलीभाषेचा वापर यांमुळे या कादंबरीला 'प्रादेशिक कादंबरी' म्हणून मान्यता मिळालेली दिसते. थॉमस हार्डीच्या कादंबऱ्या वाचून त्यांना ही कादंबरी लिहिण्याची प्रेरणा झाली.

इ. स. १९३५ च्या सुमारास मराठी साहित्यात प्रादेशिक वातावरणाकडे पाहण्याची जी दृष्टी उदयास आली होती तिचा प्रभाव बरवे यांच्या लेखनावर जाणवतो. त्यांच्या साहित्यात कोकणचा प्रदेश जिवंतपणे साकार होऊन येतो.

पक्षघातामुळे पंगुत्व आलेल्या स्थितीतही बरवे यांचे लेखन शेवटपर्यंत चालू होते.

नीलिमा गुंडी, विनायक गंधे

संदर्भ : 'अर्वाचीन मराठी वाङ्मयसेवक', प्रथम खंड, भाग पहिला, स्वस्तिक प्रकाशन, आवृत्ती २, मुंबई, १९५२, पृ. ५१–५७.

**बर्वे, आनंदराव सखाराम :** (ज. ५ फेब्रुवारी, १८४५ – मृ. २१ मार्च, १८९३). भाषांतरकार. मुंबई विद्यापीठाचे बी.ए. काही काळ मुंबई येथे शिक्षक. त्यानंतर कायद्याची परीक्षा देऊन इंदूर, बडोदा येथे न्यायखात्यात काम. वरिष्ठ न्यायालयाचे न्यायाधीश.

*ठगाची जबानी* (१८८९) हे कॅप्टन मेडोज टेलर ह्यांच्या 'कन्फेशन ऑफ ए ठग' या गाजलेल्या पुस्तकाचे भाषांतर आणि *हिंमत बहाद्दूर* (१८९८) हे शेक्सपियरच्या 'हॅम्लेट' नाटकाचे रूपांतर ही ह्यांची प्रसिद्ध पुस्तके. *ठगाची जबानी* प्रथमतः 'विविधज्ञानविस्तार' मासिकातून क्रमशः प्रसिद्ध झाले. ते अपूर्ण आहे. दोन्ही पुस्तके मुळातील सौंदर्य कायम ठेवण्यात यशस्वी ठरली आहेत.

गं. दे. खानोलकर, मीनल निसळ

**वर्वे, रामकृष्ण वासुदेव :** (ज. १८८०, रोहे – मृ. २० मार्च, १९२०, भिवंडी). भाषांतरकार. मुंबई विद्यापीठातून बी.ए. उत्तीर्ण. ह्यांनी *स्वामी रामतीर्थ ह्यांचे समग्र ग्रंथ*, *स्वामी विवेकानंदांचे चरित्र* (भाग १–४, १९१४) ह्या इंग्रजी पुस्तकांचे मराठीत भाषांतर करण्यात भास्कर विष्णु फडके ह्यांस साह्य केले. 'चिपळूणकर आणि मंडळी'ने प्रसिद्ध केलेल्या *योगवासिष्ठाच्या* (१९१६) पहिल्या खंडाचे मराठी भाषांतरही ह्यांनीच केले आहे. ह्या खंडाला जोडलेल्या उपोद्घातावरून त्यांच्या काव्य व तत्त्वज्ञान ह्या विषयांच्या मार्मिक अभ्यासाचा प्रत्यय येतो.

गं. दे. खानोलकर, मीनल निसळ, मृणालिनी दाह

**वह्राळ, वसंत सदाशिव :** ० निरंजन : (ज. ११ एप्रिल, १९१९, यवतमाळ – मृ. ३१ डिसेंबर, १९५१, नागपूर). कवी. बी.ए., बी.टी. काटोल, यवतमाळ व नागपूर येथे अध्यापक. त्यांचे दोन काव्यसंग्रह प्रकाशित. *स्नेहदीप* (१९५८) हा १९३५ ते १९४५ या काळातील स्फुट कवितांचा संग्रह असून *शशिकला* (१९६०) हे खंडकाव्य आहे. ईश्वरभक्ती, राष्ट्रप्रीती आणि संसाराविषयीची सहानुभूती प्रगट करणारी त्यांची कविता, प्रस्तावनाकार भ. श्री. पंडित म्हणतात त्याप्रमाणे, विविधतेने नटलेली असून, भारतीय तत्त्वज्ञानाचा एक अखंड अंतःप्रवाह त्यांच्यातून झुळझुळताना दिसतो. *शशिकला* हे शशिकला आणि राजीव या प्रेमिकांचे भावजीवन चित्रित करणारे एक सामाजिक कथाकाव्य असून त्यात सामाजिक सुधारणेचा पुरस्कार आहे. भावनोत्कट प्रसंगचित्रण, विविध प्रकरणांसाठी स्वतंत्र वृत्तयोजना आणि प्रसंगानुसार उपयोजिलेली भावगीते, यामुळे सोळा प्रसंगांचे व सुमारे सतराशे ओळींचे हे दीर्घकाव्य अस्वाद्य झाले आहे. याशिवाय वह्राळांनी 'निरंजन' या टोपण नावाने पस्तीस-चाळीस कथा, *राधागीत* हे खंडकाव्य आणि दीडशे-दोनशे स्फुट कविता यांचीही निर्मिती केली आहे, मात्र ही सारी रचना अद्यापि अप्रकाशित आहे.

वसंत वऱ्हाडपांडे

**० वळवंत :** पहा करंदीकर, बळवंत जनार्दन

**वॅलेंटाईन, जेम्स रॅबर्ट :** [ज. १८१३, फॅल्पो (अमेरिका) – मृ. १६ फेब्रुवारी, १८६४]. व्याकरणकार. इ.स. १८४५ ते १८६१ या काळात बनारस कॉलेजचे प्रिन्सिपॉल. संस्कृत भाषा व वाङ्मयाचे उत्तम अध्ययन करून, यांनी हिंदू तत्त्वज्ञानावर अनेक निबंध लिहिले.

हेलिबरी (इंग्लंड) येथील ईस्ट इंडिया कंपनीच्या कॉलिजच्या उपयोगासाठी *अ ग्रामर ऑफ द महरट्ट लँग्वेज* हे व्याकरणाचे पुस्तक दिनांक २० मे, १८३९ रोजी त्यांनी प्रसिद्ध केले. कॅरेकृत व्याकरण व होटनचे बंगाली व्याकरण यांचा त्यांनी यासाठी उपयोग केला. हा ग्रंथ शिळाछाप असून, श्री. वॅलेंटाईन यांनी, त्यातील मराठी शब्दांचे ठसे, मोडी लिपीत लिहिले आहेत. व्यापारी पत्रव्यवहाराचे नमुने, तसेच महसूल व न्याय खात्यात वापरल्या जाणाऱ्या पर्शियन शब्दांवरून मराठी शब्दांचा संग्रह, हेही या व्याकरणग्रंथाचे वैशिष्ट्य आहे.

गं. दे. खानोलकर, गोविंद भिडे

**वांदेकर, दत्तु तुकाराम :** (ज. २२ सप्टेंबर, १९०९, कारवार – मृ. ४ ऑक्टोबर, १९५९, मुंबई). विनोदी लेखक व वृत्तपत्रकार. रांगणेकर चालवीत असलेल्या 'वसुंधरा' साप्ताहिकात प्रारंभी प्रुफरीडर. सूक्ष्म अवलोकन, दीर्घ परिश्रम यांच्या बळावर 'वसुंधरा', 'चित्रा', 'नवयुग' या साप्ताहिकांतून व 'मराठा' दैनिकातून सुमारे तीस वर्षे सतत व विपुल लेखन केले.

'चित्रा' साप्ताहिकातील 'सख्याहरी' या लेखमालेने वांदेकरांनी वाचकांचे लक्ष वेधून घेतले. या लेखमालेने महाराष्ट्रात खळबळ उडवून दिली. पुढे आचार्य अत्र्यांच्या 'नवयुग' साप्ताहिकातून वांदेकर तीच लेखमाला नव्या जोमाने लिहू लागले व तिला अमाप लोकप्रियता लाभली. *सख्याहरी* (१९४०) हे त्या मालेतील निवडक लेखांचे पुस्तक अत्र्यांच्या मर्मग्राही प्रस्तावनेसह प्रकाशित झाले.

वांदेकरांचे बहुतांश लेखन वृत्तपत्रीय व विनोदी असून त्यातील बरेचसे पुस्तकरूपात प्रकाशित. *अतिप्रसंग* (१९४०), *बहुरूपी* (१९४१), *नवी आघाडी* (१९४२), *चोरपावले* (१९४३), *आवळ्या भोपळ्याची मोट* (१९५८), *चिरीमिरी* (१९५९), *प्रेमाचा गुलकंद* (१९५९) हे विनोदी लेखसंग्रह; *नजरबंदी* (१९४४), *आडपडदा* (१९४७) या विनोदी कथा; *तू आणि मी* (१९४४), *चुकामूक* (१९४९) या कादंबऱ्या; *पंचगव्य* (१९५८) हा अत्रे व वांदेकर यांच्या राजकीय विडंबनकाव्याचा संग्रह ही त्यांतील काही उल्लेखनीय पुस्तके. त्यांच्या विनोदाचे विषय विविध व अमर्याद होते. संवाद, प्रहसन, छोटी कवने, चुटके, व्याख्या, उखाणे अशा वेगवेगळ्या स्वरूपात उपरोध, उपहास, विडंबन अशा विविध रूपांनी आपले विनोद विषय यांनी सजवले. कोणत्याही राजकीय पक्षाची बाजू न घेता सर्वसामान्यांच्या दृष्टिकोणातून व भावभावनांतून यांनी समकालीन घडामोडींचा वेध घेतला; यामुळे यांचे लेखन आकर्षक आणि साभिप्राय ठरले.

मं. भा. नाडकर्णी, सुशीला पाटील

**वांबर्डेकर, वासुदेव अनंत :** (ज. ३० मे, १८७४, वेताळ बांबर्डे, सावंतवाडी – मृ. ४ फेब्रुवारी, १९४३, वांद्रे, मुंबई). इतिहाससंशोधक. शिक्षण मॅट्रिकपर्यंत. प्रारंभी पोलिसखात्यात. नंतर मुंबई येथील टाकसाळीत कारकून. जुन्या नाण्यांचा सूक्ष्म अभ्यास. नाणकपरीक्षक असा लौकिक. नाशिकला नोटांच्या छापखान्यात 'सुपरवायझर-कंट्रोलर'.

ह्यांचे इतिहासविषयक शोधनिबंध, भारत इतिहास मंडळाच्या त्रैमासिकातून प्रसिद्ध झाले. 'आजगावची काळनाथ मूर्ती व तिजवरील लेख', 'देवगिरीचा रामदेवराव यादव याचे राज्य कधी गेले, याबद्दलचा श्लोक', 'अली अदिलशहावरील एका आरोपाचे निरसन' आणि नाणेविषयक काही लेख उल्लेखनीय.

*मठगावचा शिलालेख आणि ब्राह्मण सामंत राजवंश* (१९२५) हा यांचा महत्त्वाचा ग्रंथ. मठगावच्या शिलालेखास धरून सावंतवाडी संस्थानचा इतिहास लिहिताना वि. पु. पिंगुळकर यांनी केलेली चुकीची विधाने खोडण्याकरता हा ग्रंथ लिहिला गेला. 'कुडाळदेशकर ब्राह्मण सामंत हेच मूळचे कुडाळचे सत्ताधीश होते. वाडीकर मराठे सावंतांनी त्यांची सत्ता बळकावली.' हे प्रतिपादण्याचा साधार प्रयत्न यात केला आहे.

*भट्टोजी दीक्षित – ज्ञातिविवेक* (१९३९) या ग्रंथात 'लघुसिद्धांतकौमुदी' कर्ते भट्टोजी दीक्षित यांच्या ज्ञातीविषयी जे विपर्यस्त लेखन केले गेले, त्याचा साधार परामर्श वांबर्डेकरांनी घेतला. आपल्याजवळची काही ऐतिहासिक कागदपत्रे त्यांनी *कोकणच्या इतिहासाची साधने*, भाग–१, २ (१९२८-१९२९) या नावाने प्रसिद्ध केली. श्रीमठ दापोली संस्थानचा इतिहास कथन करणारे एक *स्थलवर्णन*ही (१९१४) यांनी लिहिले आहे.

उषा टाकळकर, विमल भालेराव

**वागल, खंडेराव गोपाळराव :** (ज. १८७२, यळगुंड, जि. कोल्हापूर – मृ. १ मार्च, १९३१). कोल्हापूरच्या 'हंटर' पत्राचे संपादक. प्रतिकूल परिस्थितीत शिक्षण. बी.ए., एल्एल्.बी. कोल्हापूर संस्थानातील पहिले एल्एल्.बी. १९०२ ते १९१० पर्यंत मामलेदार. शाहू महाराजांच्या समाजसुधारणा कार्यात सहभाग.

शाहू महाराजांना विनंती करून १९१० साली सरकारी नोकरीतून त्यांनी आपली मुक्तता करून घेतली व वकिली सुरू केली. सत्यशोधक समाजाच्या मतांचा प्रसार सुरू केला. अस्पृश्यतेला वागलांचा कडवा

विरोध होता. ब्राह्मणांचे धार्मिक, सांस्कृतिक वर्चस्व त्यांना नको होते. मराठा जात ही महाराष्ट्राचा मानबिंदू होय असे त्यांचे मत होते. ब्राह्मणेतर समाजातील जुनाट चालीरीतींवर त्यांनी प्रखर टीका केली. स्त्रियांवर होणाऱ्या अन्यायाचीही दखल घेतली. १९२२ साली हरिभाऊ चव्हाण यांनी सुरू केलेले 'हंटर' पत्र आपल्या मतांच्या प्रसारासाठी त्यांनी चालवायला घेतले. खंडेराव यांचे चिरंजीव माधवराव बागल हे 'हंटर'च्या संपादक मंडळात होते. त्यांनी पुढे ब्राह्मणेतर चळवळीत समाजवादाचा प्रवेश घडवून आणला. 'खंडेराव गोपाळराव बागल यांचे निवडक लेख' (१९७४) या ग्रंथाचे संपादन माधवराव बागल यांनी केले.

पां. बा. गाडगीळ, विमल भालेराव

**बापट, गोविंद शंकरशास्त्री** : (ज. ८ फेब्रुवारी, १८४४, गणपतिपुळे, जि. रत्नागिरी – मृ. ६ मार्च, १९०५). भाषांतरकार. प्रारंभी वडिलांजवळ संस्कृतचा आणि नंतर पुण्यास न्याय-व्याकरण शास्त्रांचा अभ्यास. पुणे येथील ट्रेनिंग कॉलेजात अध्ययन. तेरा वर्षे ठाणे, अहमदनगर येथील माध्यमिक शाळांत शास्त्री व नंतर (१८८१–१९०१) मुंबईच्या एल्फिन्स्टन शाळेत अध्यापक.

ह्यांचे पुष्कळसे लेखन भाषांतरित, रूपांतरित अथवा सारांशरूपी आहे. *नोकानयनाचा इतिहास* (१८७२) व *नेपोलियन बोनापार्ट यांचे चरित्र* (१८७८, लॉकहार्टच्या इंग्लिश चरित्राच्या आधारे) ह्या पुस्तकांशिवाय *इलिझाबेथ अथवा सिबिरिया देशातील हद्दपार झालेले कुटुंब* (१८७४) व *पाल आणि व्हर्जिनिया* (१८७५) ही अनुक्रमे इंग्रजी व फ्रेंच कथांच्या आधारे लिहिलेली पुस्तके आणि *हरि आणि त्रिंबक* (१८७५) हे 'सॅनफोर्ड अँड मेर्टन'चे रूपांतर प्रसिद्ध आहे.

*आर्यभूषण* (१८८४) व *व्युत्पत्तिप्रदीप* (१८८५) हे त्यांचे स्वतंत्र ग्रंथ. पहिल्या ग्रंथात आर्यांचे मूलस्थान, आर्यसंस्कृतीचा प्रारंभकाल इत्यादी विवाद्य प्रश्नांचा वैदिक वाङ्मयाच्या आधारे परामर्श घेऊन वैदिक आर्य अनेक बाबतींत पुढारलेले होते, हे स्पष्ट केले आहे. ह्याशिवाय *गद्यरत्नमाला* (१८७६), *सद्वर्तन* (१८८२), *वेणीवेचन* (१८९० 'वेणीसंहार' नाटकाच्या आधारे), *दाशरथिरामचरितामृत* (१८९३, श्रीवाल्मीकिरामायणावरून प्रारंभापासून वनवासगमनापर्यंत), *उदयनचरित* (भाग १ : १८९१, भाग २ ते ४ : १८९२), *नागानंदसार* (१८८८), *पंचतंत्रसार अथवा विष्णुशर्मनीतिकथा* (आवृत्ती दुसरी १८८९) इत्यादी पुस्तके प्रसिद्ध आहेत.

श्रीराम गंगाधर मोडे, अंजली कुलकर्णी

संदर्भ : मं. बा. सरदार, 'अर्वाचीन मराठी गद्याची पूर्वपीठिका', १९७१.

**बापट, धुंडिराज गणेश** : (ज. १५ नोव्हेंबर, १८८२, पाचवड, जि. सातारा – मृ. १३ फेब्रुवारी, १९५६, पुणे). वैदिक वाङ्मयाचे भाषांतरकार व यज्ञप्रधान वैदिक धर्माचे परिचायक व भाष्यकार. यांच्या घराण्यात सात पिढ्यांपासून प्राचीन संस्कृत वेदविद्येच्या अध्ययन–अध्यापनाची आणि अग्निहोत्रव्रताची परंपरा होती. वेदविद्येची अध्ययन–अध्यापन परंपरा जागृत ठेवण्यासाठी पाचवड (जिल्हा सातारा) येथे 'स्वाध्याय-मंदिर' ही संस्था यांनी काढली आणि *स्वाध्याय* हे मासिक १९२० ते १९२२ पर्यंत चालविले. ह्यांनी वैदिक संशोधनमंडळाच्या श्रौतकोशाचे संपादन केले आहे. डॉ. केतकरांच्या महाराष्ट्रीय ज्ञानकोशाच्या प्रस्तावनाखंडातील 'वेदविद्या' विभाग लिहिण्यात यांचा महत्त्वाचा वाटा होता. *वैदिक राष्ट्रधर्म* (१९२९), *आर्यांचे संस्कार* (पूर्वार्ध, १९३६), *हिरण्यकेशी सूत्रोक्त उपनयन प्रयोग* (१९३९), *शुक्ल यजुर्वेद संहितेचे भाषांतर* (१९४०), *ऋग्वेदाच्या ऐतरेय ब्राह्मणांचे भाषांतर* (१९४१) हे ग्रंथ त्यांनी लिहिले. या सर्वच ग्रंथांत शब्दशः भाषांतराबरोबर मूळ कल्पना विशद आणि सुबोध करण्याचा त्यांनी प्रयत्न केला आहे, तो लक्षणीय आहे.

मोडे, श्री. गं., विमल भालेराव

**बापट, नारायण विष्णुशास्त्री** : (ज. १८३२ – मृ. १८९७). भाषांतरकार व निबंधलेखक. 'नीतिदर्पण'कर्ते विष्णुशास्त्री बापट यांचे हे चिरंजीव. संस्कृतचा गाढ व्यासंग. मुंबईच्या सेंट्रल बुक-डेपोचे क्यूरेटर व नंतर बेळगाव येथे शिक्षण-निरीक्षक.

ह्यांनी *दख्खनच्या (दक्षिणेचा) प्राचीन इतिहास* (१८८७) हे डॉ. रा. गो. भांडारकर ह्यांच्या 'द अर्ली हिस्टरी ऑफ डेक्कन' ह्या ग्रंथाचे भाषांतर केले आहे. ह्याशिवाय, *नवशिकांकरिता इंग्लंडचा इतिहास* (मिस् आराबेला बक्ले हिच्या ग्रंथाचे भाषांतर, १८९२), *उन्नती म्हणजे काय व तिची आवश्यकता* (निबंध, १८८७), *संस्कृत विद्येचे पुनरुज्जीवन* – इसवीसनाच्या तिसऱ्या शतकापासून जे संस्कृत विद्येचे पुनरुज्जीवन झाले त्याचा इतिहास (१८८८) अशी पुस्तकेही ह्यांच्या नावावर आढळतात.

गं. दे. खानोलकर, मीनल निसळ

**बापट, प्रभाकर वासुदेव** : (ज. १७ फेब्रुवारी, १९०२ – मृ. २६ जुलै, १९४४, ग्वाल्हेर). समीक्षक. शिक्षण पुणे येथे. एम्.ए. (१९२६). बी.टी. काही काळ अहमदनगर व पुणे येथे शिक्षक. १९३२ पासून ग्वाल्हेर येथे मराठीचे प्राध्यापक.

ह्यांचे काही स्फुटलेख मराठी नियतकालिकांतून प्रसिद्ध झाले असले तरी *मराठी कादंबरी – तंत्र आणि विकास* (१९३८) या समीक्षात्मक ग्रंथाचे सहलेखक म्हणून ते प्रसिद्ध आहेत. प्रा. ना. वा. गोडबोले यांच्या सहकार्याने त्यांनी हा ग्रंथ लिहिला. मराठी कादंबरी वाङ्मयाचे तंत्रात्मक विवेचन करणारा हा पहिला ग्रंथ. *मराठी आख्यानक कविता* (१९४१) हा प्राचीन मराठी पंडिती काव्यातील निवडक उताऱ्यांचे संकलन करणारा त्यांचा संपादित ग्रंथ. ह्या ग्रंथाला जोडलेली प्राचीन मराठी आख्यानक काव्याचे विवेचन करणारी त्यांची प्रदीर्घ प्रस्तावना अभ्यासकांचे दृष्टीने उपयुक्त आहे.

अवधूत महादेव जोशी, अंजली कुलकर्णी

**बापट, विष्णुशास्त्री बापूशास्त्री** : (ज. १८०४ – मृ. १८६५). अव्वल इंग्रजीतील नीतिकथालेखक. संस्कृतपंडित. वडिलांची संस्कृत पाठशाळा होती. १८३७ मध्ये पुणे संस्कृत पाठशाळेत 'असिस्टंट पंडित' म्हणून नियुक्ती. १८३८ मध्ये प्रमुख अध्यापक. शिक्षामंडळीच्या सेवेत असतानाच विष्णुशास्त्र्यांनी *नीतिदर्पण* (१८३७) व *बालोपदेश कथा* (१९३८) अशी दोन पुस्तके लिहिली. *बालोपदेश कथा* हा भाषांतरित ग्रंथ. इंग्रजी भाषेत पंधरा विभागांत असलेल्या या ग्रंथाचे बंगालमधील शिक्षामंडळीच्या पंडितांनी संस्कृतमध्ये भाषांतर केले होते. त्यावरून विष्णुशास्त्र्यांनी मराठीत हे भाषांतर केले. या पुस्तकाच्या दोन भागांपैकी पहिल्यात केवळ उपदेशवजा मजकूर व दुसऱ्यात बालकास हितोपदेशाच्या गोष्टी आहेत.

गं. दे. खानोलकर, विमल भालेराव

**बापट, विष्णुशास्त्री वामन** : (ज. २२ मे, १८७१, पाऊनवल्ली, ता. राजापूर, जि. रत्नागिरी – मृ. २० डिसेंबर, १९३२). प्राचीन वाङ्मयाचे भाषांतरकार.

हैद्राबाद (सिंध) येथील पाठशाळेत १९०३ ते १९१२ पर्यंत शास्त्री म्हणून नोकरी करीत असताना त्यांनी सुमारे ७५ आध्यात्मिक, धार्मिक, पौराणिक ग्रंथांची भाषांतरे विवेचक प्रस्तावनांसह प्रसिद्ध केली. पुणे येथे स्थायिक झाल्यावर *ब्रह्मविद्याग्रंथरत्नमाला* (१९१२) आणि *दर्शनमाला* या दोन माला आणि *आचार्य* (१९१४) नावाचे पाक्षिक सुरू केले. लोकमान्य टिळकांच्या 'गीतारहस्या'तील कर्मयोगसिद्धान्त शांकरमतास सोडून असल्याने त्या ग्रंथाचे बापटांनी खंडन केले.

ईश, केन, कठ इत्यादी अकरा उपनिषदे, बादरायणप्रणीत ब्रह्मसूत्रे (शांकरभाष्यासह) व 'श्रीमद्‌भगवद्‌गीता' यांची म्हणजेच वेदान्त-दर्शनाच्या प्रस्थानत्रयीची त्यांनी भाषांतरे केली. भाषांतराबरोबरच या ग्रंथाचे सुबोध भाष्यात्मक शैलीत विवरण करून त्या त्या ग्रंथातील शांकरप्रणीत अद्वैतमताचे समर्थन व प्रसार हे त्यांनी आपले जीवितध्येय मानले. शंकराचार्य (अपरोक्षानुभूती, आत्मबोध, शतश्लोकी), विद्यारण्य (अनुभूतिप्रकाश, पंचदशी), शंकरानंद (आत्मपुराण), वाल्मिकी (योगवासिष्ठ) इत्यादींच्या अद्वैतवेदान्तविषयक ग्रंथांचे भाष्यशैलीत मराठीत सविस्तर विवरण बापटांनी केले आहे.

*षड्‌दर्शनचिंतनिकारत्नमाला* या मासिकाद्वारे त्यांनी चार्वाक, बौद्ध, जैन (नास्तिक) आणि सांख्य, न्याय इत्यादी दर्शनांचा त्यांच्या खंडनासह साररूप परिचय करून दिला. याखेरीज स्मृति-वाङ्मय (याज्ञवल्क्यस्मृती, मनुस्मृती), पुराण ग्रंथ (हरिवंश, भविष्यपुराण, आनंदरामायण) आणि शंकराचार्यांची स्तोत्रे यांचीही भाषांतरे केली. महाभारताचे सप्तखण्डात्मक सुबोध भाषांतर आणि कथासरित्सागराचे चार खंडांत रसाळ भाषांतर करून संस्कृतातील अद्‌भुतरम्य कथा-वाङ्मय बापटशास्त्री यांनी मराठीत आणले.

गं. दे. खानोलकर, सुशीला पाटील, मृणालिनी शाह

० **बाबाराव** : पहा सावरकर, गणेश दामोदर

० **बालकवी** : पहा ठोंबरे, त्र्यंबक बापूजी

० **बाळकराम** : पहा गडकरी, राम गणेश

० **बाळकृष्ण** : पहा हुपरीकर, बाळशास्त्री अण्णाबुवा

**बिसेल, मेरी एलिझाबेथ** : (ज. १९ एप्रिल, १८२७, मेलन, ओहेओ प्रांत, अमेरिका – मृ. २१ एप्रिल, १९०६). अमेरिकन खिस्ती लेखिका. शिक्षण अमेरिकेत झाले. रे. (डॉ.) लेम्युएल बिसेल ह्या खिश्चन धर्मोपदेशकाशी लग्न. त्याच वर्षी १८५१ साली दोघेही हिंदुस्थानात आली. काही वर्षे शिरूर (जि. पुणे), नंतर १८५७ पासून अहमदनगर ही त्यांनी आपली कार्यक्षेत्रे निश्चित केली.

एलिझाबेथ यांनी स्वतः काही गीते रचून गीतांची पुस्तके तयार केली आहेत. यांची काही गीते व पदे 'सेक्रेड सॉंग' (१८७४) या पुस्तकात अंतर्भूत आहेत. *देवप्रीतीची प्राचीन गोष्ट व दुसरी गायने* (१८७३) हे 'द ओल्ड, ओल्ड स्टोरी, ॲण्ड अदर हाइम्स्'चे भाषांतर असून, *बुलबुल–लेकरांकरिता मंजुळ गायने* (१८७४) यात यांची काही गीते समाविष्ट आहेत. 'उपासनासंगीत' या पुस्तकातही यांची काही गीते आढळतात. *एका आईचे शेवटचे भाषण* (१८७५), *खिस्ती स्त्रियांच्या कर्तव्याविषयी निबंध* (१८८४) ही दोन स्वतंत्र व *शास्त्रात वर्णिलेल्या स्त्रिया* (१८८८) व *नव्या करारात वर्णिलेल्या स्त्रिया* (१८९०) ही भाषांतरित पुस्तके ह्यांनी लिहिल्याचा उल्लेख आढळतो.

गं. दे. खानोलकर, मीनल निगळ

संदर्भ : श्रीनिवास मधुसूदन पिंगे, 'युरोपियनांचा मराठीचा अभ्यास व सेवा,' १९६०.

० **बी** : पहा गुर्जे, नारायण मुरलीधर

० **बी रघुनाथ** : पहा कुलकर्णी, भगवान रघुनाथ

**बुलाखा मोती** : (ज. १८६९, खांडवा, म. प्र. – मृ. १ ऑक्टोबर, १९०३, पोर्टसैद, मध्य आशिया). गद्यलेखक. जन्म मारवाडी कुटुंबात. प्रवेशपरीक्षेपर्यंतचे शिक्षण खांडव्याला. नागपूरच्या हिस्लाप कॉलेजमधून बी.ए. काही दिवस नागपूरला सरकारी हायस्कूलमध्ये नोकरी. नंतर पुण्याच्या न्यू इंग्लिश स्कूलमध्ये अध्यापक व बोर्डिंग सुपरिंटेंडेन्ट.

मातृभाषा मराठी नसतानाही ते मराठी साहित्याचे वाचन, अभ्यास आणि लेखनही करीत. १८९८ मध्ये भाऊ गोविंद सापकर ह्यांच्या 'सुविचार समागम' मासिकाच्या संपादनात ह्यांचा महत्त्वाचा वाटा होता. चंद्रशेखर, केशवसुत ह्या पुढे मान्यता पावलेल्या मराठी कवींच्या कविता आणि प्रो. विजापूरकर, वि. कॉ. ओक, प्रो. भानू, गोविंदराव कानिटकर इत्यादी अनेक विद्वानांचे लेख त्यांनी ह्या मासिकातून प्रसिद्ध करविले. १८९८-९९ च्या अंकातून मराठी वाङ्मयाच्या समालोचनपर 'मराठी भाषेची सद्यःस्थिती' नावाची ह्यांची लेखमाला प्रसिद्ध झाली. ह्या काळात सुशिक्षित पदवीधरांचा एक लेखकवर्ग तयार करण्यात ह्यांनी मोलाचे कार्य केले. एकेश्वरी पंथीय तत्त्वज्ञानाच्या विशेष अभ्यासासाठी युनिटेरियन शिष्यवृत्ती घेऊन मँचिस्टर येथे जात असतानाच, वाटेत पोर्टसैद येथील इस्पितळात त्यांचा मृत्यू झाला.

उषा टाकळकर, वीणा रावळे

**बेलसरे, खंडेराव भिकाजी** : (ज. १८६२, पुणे – मृ. १९१४). शेक्सपियरच्या नाटकांचे विशेष अभ्यासक व भाषांतरकार, लेखक व संपादक. शिक्षण बी.ए.पर्यंत. मुंबईतील 'प्रभाकर' पत्राचे आणि छापखान्याचे मालक व 'इंदुप्रकाश' या वृत्तपत्राच्या संपादक मंडळाचे काही काळ सदस्य.

*तीन गोष्टी* (१८९०) हे यांचे पहिले पुस्तक. यात कौटुंबिक व बोधरंजनपर कथा आहेत. *निबंधमालाकार विष्णुशास्त्री चिपळूणकर यांच्या चरित्राचे व लेखांचे साधारण स्वरूप* (१८९१) हे स्वतंत्र निबंधात्मक पुस्तक व 'शालापत्रक' व 'केसरी' या पत्रांतून प्रसिद्ध झालेल्या चिपळूणकरांच्या लेखांचे संपादित पुस्तक (दोन भाग) प्रसिद्ध. *मुक्ता* (१८९७) हे मणिशंकर गोविंदजीकृत गुजराथी अद्‌भुतकथेचे भाषांतर, *जबावरची गोष्ट* (१८९८) हे एका इंग्रजी ग्रंथाचे भाषांतर, *चिकित्साभ्री* (१९०२) हे मणिशंकर गोविंदजींच्या आर्यवैद्यक विषयावरील ग्रंथाचे भाषांतर, *शालोपयोगी इंग्रजी-मराठी कोश* (१९०४) या पुस्तकांशिवाय त्यांची शेक्सपियराच्या नाटकांची भाषांतरेही प्रसिद्ध आहेत. *तुफान टेम्पेस्ट* (१९०४), *प्रेमाचा कळस* १९०८ (रोमियो ज्युलिएट), *व्हेनिसनगरचा व्यापारी* (१९१०), *पंचम हेनरी चरित* (१९११), *मधुयामिनी स्वप्नदर्शन* (१९१३, मिडसमरनाइट्स ड्रीम), *जूलियस सीझर* (१९१३) ही सहा नाटके, कथानक व गुणदोषविवेचनात्मक टिपणासह, 'शेक्सपियरकृत नाट्य-माला' या संकल्पित योजनेचा भाग म्हणून प्रसिद्ध झाली आहेत. ह्या 'नाट्यमाले'तर्फे भाषांतररूपाने शेक्सपियरची सदतीस नाटके, सुनीते व अन्य काव्ये, त्याचे चरित्र व आख्यायिका आणि नाटककार या नात्याने, त्याने केलेल्या कामगिरीचे विवेचन इत्यादी माहितीचे चाळीस खंड प्रकाशित करण्याचा बेलसरे ह्यांचा संकल्प 'तुफान' (टेम्पेस्ट) नाटकातील प्रसिद्धीपत्रकात प्रसिद्ध केला होता, पण तो त्यांच्या मृत्यूमुळे अपुरा राहिला.

वसिकांत लोखंडे, ग. वा. करंदीकर

**बेहेरे, नारायण केशव** : ० केशवसुत – २ : (ज. ४ जुलै, १८९०, टेंभुर्णी, जि. हुशंगाबाद, म. प्र. – मृ. १९ जानेवारी, १९५८). कवी व कादंबरीकार. उच्च शिक्षण नागपूर येथे. बी.एस्‌सी., एस्.टी. ही पदविका. एम्.ए. (तत्त्वज्ञान) ही पदवी. नागपूर प्रांतात नॉर्मल स्कूल्सचे हेडमास्तर व सुपरिंटेंडेन्ट. 'ससर्पी' या राजकीय कवितेमुळे त्यांना सरकारी नोकरीचे त्यागपत्र द्यावे लागले.

ह्यांचे काव्यलेखन १९१० पासूनच सुरू झाले. 'विरोधाभास' व 'चरणांची नच तू दासी' ह्या कविता अनुक्रमे 'विविधज्ञानविस्तार' (१९११) व 'मनोरंजन' (१९१२) या नियतकालिकांतून प्रसिद्ध होताच बेहेरे कवी म्हणून प्रसिद्ध झाले. त्यानंतर 'लोकमित्र', 'मनोरंजन', 'आनंद', 'खेळगडी', 'नवयुग', 'काव्यरत्नावली', 'चित्रमयजगत्' इत्यादी अनेक नियतकालिकांतून ह्यांच्या कविता

प्रसिद्ध झाल्या. *मोत्यांची माळ* (१९१०) हा त्यांच्या १०७ स्फुट कवितांचा संग्रह. त्यात त्यांच्या राष्ट्रीय कविता, शिशुगीते, संसारी गीते, सृष्टीचे बोल आणि कवीचे तत्त्वज्ञान असे सर गुंफलेले आहेत. *सहस्मरणी* (१९१५) ह्या स्वतंत्र पुस्तकात दिवंगत पतीच्या सहवासातील सुखद क्षणांच्या काव्यस्मृती गुंफलेल्या असून *हिंदुधर्मप्रकाश* (१९४७) ह्या अभंगबद्ध काव्यात हिंदुराष्ट्र या नात्याने स्वदेशविषयीचा त्यांचा आत्मीय भाव प्रकट झालेला आहे. राष्ट्रीय वृत्तीच्या कवितांविषयी ते विशेष प्रसिद्ध आहेत.

*जीवनरहस्य* (१९१५), *पुढ्ळसंसार* (१९१७), *ध्येयाकडे* (१९३४) ह्या सामाजिक; *सीतावनवास* (१९१४) व *अहिल्योद्धार* (१९२९) ह्या पौराणिक; *हिंदु कोण* (१९१९) आणि *शककर्ता शालिवाहन* (१९४३) ह्या ऐतिहासिक, अशा कादंबऱ्याही यांनी लिहिल्या आहेत. *ध्येयाकडे* ही कादंबरी विषय व रचना ह्या दोन्ही दृष्टींनी नावीन्यपूर्ण आहे. त्यातील कालनौकेची कल्पना एच्. जी. वेल्सच्या 'टाईम मशिन'वरून घेतलेली असली तरी ती एक स्वतंत्र निर्मिती आहे. ध्येयात्मक समाजस्थितीच्या एका टप्प्याचे चित्र बेहेरे यांनी यात रंगविलेले असून, त्या निमित्ताने अनेक सामाजिक प्रश्नांची शास्त्रशुद्ध चर्चा केलेली आहे.

*पिझारो* (१९६५) हे बेहेरे यांचे ऐतिहासिक नाटक म्हणजे शेरिडनच्या 'पिझारो'चा अनुवाद होय. यांचा *पोपट पाण* (१९२२) हा सामाजिक व्यंगावर औपरोधिक प्रहार करणाऱ्या लेखनाचा संग्रहही उल्लेखनीय आहे. त्यांचा इतिहासाचा व्यासंग, *सन १८५७* (१९२७) या अठराशे सत्तावन्नसाली इंग्रजी सत्तेविरुद्ध भारताने केलेल्या सशस्त्र उठावाची, ऐतिहासिक सत्याच्या पायावर कारणमीमांसा करणाऱ्या व ईस्ट इंडिया कंपनीच्या अन्यायी वृत्तीवर प्रकाश टाकणाऱ्या इतिहासविषयक ग्रंथावरून व *पहिले बाजीराव पेशवे* (१९३०) ह्या चरित्रावरून दिसून येतो.

उषा टाकळकर, ग. बा. करंदीकर

**बेंडे, श्रीपाद नरसिंह :** (ज. १९०५, झोडगाव, पाथरी, जि. परभणी–मृ. जुलै १९३७). नाटककार. प्राथमिक शिक्षण मराठवाड्यात व प्री मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण पुण्यात. महाराष्ट्र नाटकमंडळीत नट.

१९२० च्या सुमारास चित्रपटांमुळे नाट्यव्यवसाय डबघाईला आला होता. त्या सुमारास बेंडे ह्यांनी 'रेडिओ स्टार्स' ह्या संस्थेच्या सहाय्याने त्यांची *बेबी* (१९३१) व *पांचाली* (१९३३) आणि 'नाट्यमन्वन्तर'च्या सहाय्याने *बुवा* (१९३४) ही नाटके रंगभूमीवर आणली.

*बेबी* हे बेंडे ह्यांचे पहिलेच नाटक. ते खूपच लोकप्रिय ठरले. पदवीशिक्षणाने जीवन दृष्टीत अपरिहार्यपणे होणारे बदल व भांबावलेल्या नवशिक्षितांची मनःस्थिती यांचे या नाटकात चित्रण केले असून स्त्रियांची भूमिका स्त्रियांनी करणे, वास्तववादी व कथानकाला पोषक अशा नेपथ्याची व पार्श्वसंगीताची योजना करणे ह्या गोष्टी रंगभूमीवर आणल्या. *बेबी* ह्या नाटकाचे १०० प्रयोग झाले. सामाजिक बुवाबाजीचे चित्रण करणारे त्यांचे *बुवा* हे नाटकही गाजले. *पांचाली* हे त्यांचे पौराणिक नाटक. याशिवाय *सती शर्मिष्ठा*, *मोन्यांची मोहना*, *शक्ती*, *सौदा*, *आरसा*, *कुंवर* ही नाटके व *अस्तनीतील निखारा* ही कादंबरीही त्यांनी लिहिली असल्याचे कळते. परंतु ही पुस्तके उपलब्ध नाहीत.

शुभदा सबनीस, बीणा रावळे

**बोडस, महादेव राजाराम :** (ज. १८६९–मृ. १९४०). लेखक व टीकाकार. एम्.ए., एल्एल्.बी. (मुंबई विद्यापीठ). मुंबई हायकोर्टात वकील. लो. टिळकांचे अनुयायी व १८९७ व १९०८ सालच्या खटल्यात टिळकांचे कायद्याचे सल्लागार.

बोडसांचे तत्कालीन राजकीय परिस्थितीचे समालोचन करणारे लेख 'चित्रमयजगत्', 'विविधज्ञानविस्तार' इत्यादी मासिकांतून प्रसिद्ध झाले आहेत. लो. टिळकांच्या 'हिंदुधर्माचे स्वरूप लक्षण' ह्या निबंधाचे ह्यांनी पुनर्मुद्रण करून त्याला स्वतःची प्रस्तावना जोडली आहे (१९१८). 'हिंदु' हा शब्द परभाषेतील व हीनत्वद्योतक असल्याने त्याऐवजी 'सनातन' धर्म हा शब्द वापरावा असे त्यांनी प्रस्तावनेतून सुचविले आहे. *श्रीशंकराचार्य व त्यांचा संप्रदाय* (१९२३) हा ग्रंथ म्हणजे 'केसरी'तून प्रसिद्ध झालेल्या 'शंकराचार्यांचे मठ' व 'अद्वैत मीमांसा' या दोन विषयांवरील लेखांचे पुनर्मुद्रण आहे. शंकराचार्य व त्यांचा अद्वैत वेदान्त ह्यांचा लोकांना परिचय व्हावा व जैन–बौद्धांनी केलेली क्रांती कोणती व शंकराचार्यांनी पुनरुद्धार कसा केला ह्याविषयी लोकांना माहिती व्हावी या हेतूने हे लेखन केले आहे. *प्राच्य व पाश्चात्त्य देशांतील ग्रामसंस्था* (१८९३) हे पुस्तक म्हणजे सर हेन्री मेन ह्यांच्या 'व्हिलेज कम्युनिटीज्' या ग्रंथाचे भाषांतर होय. हा ग्रंथ म्हणजे मेन ह्यांच्या सात व्याख्यानांचा संग्रह आहे. बोडसांनी त्याला मेनचे संक्षिप्त चरित्र जोडले असून ६३ पृष्ठांची प्रस्तावनाही लिहिली आहे.

पां. बा. गाडगीळ, रा. बा. वझे

**बोडस, राजारामशास्त्री :** ० गणेशभट्ट : (ज. नोव्हेंबर, १८३७, काशी–मृ. २८ नोव्हेंबर, १८९६). धर्मविषयक ग्रंथांचे कर्ते. व्याकरण, न्याय, ज्योतिष, वेदान्त इत्यादी दर्शनांचे व्यासंगी पंडित. एल्फिन्स्टन कॉलेज, मुंबई येथे दर्शनशास्त्रांचे अध्यापक म्हणून नियुक्ती. १८८७ साली व्हाइसरॉय लॉर्ड डफरीन ह्यांच्याकडून 'महामहोपाध्याय' ही पदवी प्राप्त.

*पातंजलयोगदर्शन* (श्री. रामानन्द सरस्वतीकृत 'योगमणिप्रभा' या टीकेच्या मराठी भाषांतरासहित, १८८७) हा ह्यांचा ग्रंथ प्रसिद्ध आहे. परमपुरुषार्थ जो मोक्ष याची साधने म्हणजे ही दर्शने होत, हा त्यांचा दृष्टिकोन असून 'निदिध्यासरूपी योगमार्गास शक्त्यनुसार लागावे यातच मनुष्यदेहाचे सार्थक आहे' असे राजारामशास्त्र्यांनी प्रस्तावनेत म्हटले आहे. ह्यांचा दुसरा ग्रंथ *वेद प्रामाण्यचन्द्रिका* (१९०२) हा असून तो संस्कृतमध्ये आहे. त्रैवर्णिकांना वेदोक्त मार्गाने व इतरांना पुराणादिमार्गाने परमपुरुषार्थसिद्धी होऊ शकेल, असे मत यात मांडले आहे.

वि. म. भिडेकर, अंजली कुलकर्णी

**बोबडे, श्रीनिवास रामचंद्र :** ० श्रीराम : (ज. ५ नोव्हेंबर, १८८९, चंद्रपूर–मृ. १ ऑक्टोबर, १९३४, नागपूर). कवी. प्राथमिक शिक्षण चंद्रपूर व नंतरचे नागपूर येथे. बी.ए., एल्एल्.बी. वकिलीचा व्यवसाय. संस्कृत व प्राचीन मराठी काव्य, शाहिरी काव्य ह्यांचा विशेष अभ्यास. आधुनिक मराठी व इंग्रजी कवितेचाही त्यांचा व्यासंग होता. 'वागीश्वरी' (१९२९–३४) या नागपूरहून प्रसिद्ध होणाऱ्या वाङ्मयीन स्वरूपाच्या मासिकाचे ते एक संपादक होते.

त्यांची कविता *बोबडे यांची कविता* (१९३७) ह्या संग्रहात समाविष्ट असून ६३ स्फुट कविता व 'शृंगारशतक' या काव्याचे १०१ श्लोक ह्यांचा यात अंतर्भाव आहे. ह्यांतील उत्कृष्ट कविता १९१५ ते १९२५ ह्या दशकात लिहिलेल्या आहेत. आशय आणि अभिव्यक्ती ह्या दोन्ही दृष्टींनी त्यांची कविता स्वतंत्र, पृथगात्म वाटते. इंग्रजी काव्यातील ऐहिकता, संस्कृत कवितेतील सुश्लिष्ट रचनाबंध व शाहिरी वाङ्मयातील निःसंकोच शृंगार यांच्या कवितेतून आढळतो. वैदर्भीय जीवनातील सरंजामी अघळपघळपणा, दिलदार वृत्ती व काहीसा कलंदर स्वभाव त्यांच्या व्यक्तित्वात असल्याने त्यांच्या कवितेतूनही तो व्यक्त होताना दिसतो. 'हिंदुस्थाना', 'आमचा क्षोभ' यांसारख्या कवितांतून उत्कट राष्ट्रीय भावना आविष्कृत करणारी त्यांची कविता, आपल्या

आराध्य देवताविषयी वा विभूतीविषयीही तेवढाच उत्कट भक्तिभाव प्रकट करताना दिसते आणि तीच उत्कटता शृंगाररसाच्या आविष्कारातूनही प्रकट होते. शब्दकळेविषयी व रचनाबंधाविषयी ते कमालीचे चोखंदळ होते; म्हणून त्यांच्या कवितेला एक प्रकारचा अभिजातपणा प्राप्त झाला आहे. 'जाग जाग जाग सखे, उजळल्या दिशा' यासारखी अनुपम गीतरचनाही त्यांनी केलेली आहे. 'शृंगारशतका'तील त्यांची रचना अभिजात संस्कृत काव्याची आठवण व्हावी इतकी भावमधुर व शब्दसुंदर वाटते. ती क्वचित उत्तान वाटत असली तरी अश्लील नाही. त्यांच्यासारखे सुंदर व कलापूर्ण शब्दशिल्प अन्यत्र क्वचित आढळते.

त्यांची कविता 'वागीश्वरी'मधून 'श्रीराम' या टोपण नावाने प्रसिद्ध झालेली आढळते.

राम शेवाळकर, अंजली कुलकर्णी

**ब्लोक, ज्यूल :** (ज. मे १८८०, पॅरिस – मृ. २९ नोव्हेंबर, १९५३, पॅरिस). जन्माने फ्रेंच असलेला मराठी भाषाशास्त्रज्ञ व संस्कृत–प्राकृत वाङ्मयविद्यापंडित. पॅरिस विद्यापीठाचे स्नातक. भारतातील प्रमुख भाषांच्या अध्ययनासाठी १९०६ ते १९०८ या काळात भारतात आगमन. पुणे येथे डॉ. रा. गो. भांडारकर व वि. का. राजवाडे इत्यादी अभ्यासकांच्या भेटी घेऊन त्यांनी मराठी भाषेच्या व्याकरणाविषयी चर्चा केली. भारतातून फ्रान्समध्ये परतल्यानंतर पॅरिसमधील 'स्कूल ऑफ ओरिएंटल लँग्वेजेस' या संस्थेत प्राध्यापक म्हणून नियुक्ती. १९३७ साली त्यांचे गुरू प्रा. सिल्व्हां लेव्ही यांच्या मृत्यूनंतर त्यांच्या जागी प्रा. ब्लोक ह्यांची 'कॉलेज द फ्रान्स'मध्ये नेमणूक झाली. १९५१ मध्ये ते सेवानिवृत्त झाले.

डॉ. ज्यूल ब्लोक ह्यांचा *दि फॉर्मेशन ऑफ मराठी लँग्वेज्* (La formation de la Langue Marathe, 1920) हा प्रमाण मराठी भाषेच्या विकासासंबंधीचा ग्रंथ मराठी भाषाशास्त्रविषयक ग्रंथांत अत्यंत महत्त्वाचा गणला जातो. ह्या ग्रंथाचा डॉ. वा. गो. परांजपे ह्यांनी केलेला 'मराठी भाषेचा विकास' (१९४१) हा अनुवाद प्रसिद्ध आहे. आर्य आणि आर्येतर भाषांचा तौलनिक अभ्यास करणाऱ्या भाषाशास्त्रज्ञांच्या दृष्टीनेही हा ग्रंथ महत्त्वपूर्ण आहे. *दि ग्रॅमॅटिकल स्ट्रक्चर ऑफ द्रविडियन लँग्वेजेस* हा डॉ. ब्लोक ह्यांचा ग्रंथही उल्लेखनीय आहे.

गं. दे. खानोलकर, व. कृ. वऱ्हाडपांडे

० ब्रह्मनिष्ठ वामनबाबा : पहा वैद्य, वामन रावजी

**भडभडे, मोरेश्वर शंकर :** ० शशिकांत पुनर्वसु : (ज. ३० सप्टेंबर, १९१३, एरंडोल, खानदेश – मृ. २३ जुलै, १९५५, पुणे). ललित गद्यलेखक, प्रवासवर्णनकार व कथाकार. माध्यमिक शिक्षण पंढरपूर व पुणे येथे. फर्ग्युसन कॉलेजातून बी.ए. नंतर बी.टी. पुण्याच्या न्यू इंग्लिश स्कूलमध्ये गणित व संस्कृतचे शिक्षक.

कॉलेजात शिकत असल्यापासूनच बालवाङ्मय, लघुनिबंध, प्रवासवर्णन, नाट्यछटा, एकांकिका असे विविध प्रकारचे लेखन यांनी केले. *उल्काफुले* व *अशोक आणि मंजिरी* ही यांची बालवाङ्मयाची दोन पुस्तके प्रसिद्ध असली तरी ते मुख्यतः ज्ञात आहेत ते कथालेखक म्हणूनच. त्यांच्या कथालेखनात *संध्याकाळच्या सावल्या* (१९४४), *शांती* (१९५३), *संधिप्रकाश* (१९५६), *पुष्करिणी* (१९५६) व *गुलमोहर* (१९६१) हे महत्त्वाचे कथासंग्रह.

पुनर्वसूंची वाङ्मयविषयक अभिरुची व जाणीव फडके-खांडेकरांच्या साहित्याने जोपासलेली दिसते. तसेच त्यांनी केलेल्या देशी-परदेशी कथासाहित्याच्या व्यासंगाचा प्रभावही त्यांच्या कथेवर आढळतो. त्यांचे अनुभवविश्व मर्यादित आहे. एका ध्येयवादी शिक्षकाच्या कनिष्ठ मध्यमवर्गीय जीवनातील सच्चे अनुभव टिपून ते मांडण्याचा प्रयत्न त्यांच्या कथेने केला आहे. आपल्या परिमित अनुभवविश्वाच्या चित्र-विचित्र बाजू मनुष्यस्वभावाच्या सूक्ष्म रेखाटनाद्वारे व्यक्त करण्याचा त्यांचा प्रयत्न असतो. त्यांची कथा आधी स्थूल व ढोबळ स्वरूपाची होती. पुढे नवकथेच्या काळात तिचा विकास होत गेला. *शांती* या संग्रहातील कथांतून विविध प्रकारची सूक्ष्म भावस्पंदने टिपलेली आढळतात. स्वाभाविक निवेदनामुळे त्यांच्या कथा रेखीव, तसेच आशयाच्या विविधतेबरोबरच कलात्मकही होत गेलेल्या दिसतात.

पुनर्वसूंची कथा त्यांच्या व्यक्तिमत्त्वाप्रमाणे सौम्य प्रकृतीची आहे. जाणिवांना पोषक अशा अभिव्यक्तीतील सूक्ष्मतेमुळे ती अधिक सहजतेने फुलते. कथाकार म्हणून त्यांच्या श्रेष्ठतेचा प्रत्यय देणाऱ्या कित्येक कथा त्यांनी लिहिल्या आहेत. मात्र जुन्या कथेच्या संस्कारांतून त्यांची कथा मुक्त झालेली दिसत नाही. नवकथेतील चांगल्याचा काही प्रमाणात स्वीकार करण्याचा त्यांचा प्रयत्न जाणवतो. पुनर्वसूंच्या अकाली निधनामुळे त्यांच्या विकसनशील कथेचे पूर्ण विकसित रूप दिसू शकले नाही. पण उपलब्ध कथांतील त्यांच्या अनेक कथा कथालेखक म्हणून त्यांचे स्वतंत्र अस्तित्व सिद्ध करतात.

*ऊन आणि गारवा* (१९५७) हा प्रवासवर्णनपर ललित लेखांचा संग्रह त्यांच्या मृत्यूनंतर प्रसिद्ध झाला. पुनर्वसूंतील कथाकार या प्रवासवर्णनात्मक पुस्तकातूनही प्रकट झाल्यावाचून राहत नाही.

उषा टाकळकर, म. ना. लोही, गो. म. कुलकर्णी

संदर्भ : 'शशिकान्त पुनर्वसु यांचे कथावाङ्मय', 'सत्यकथा' मे १९५४.

**भट, भास्कर वामन :** (ज. २ जानेवारी, १८५६, वाई – मृ. २७ डिसेंबर, १९५२, धुळे). इतिहाससंशोधक व लेखक. प्राथमिक शिक्षण वाई व माध्यमिक शिक्षण मुंबई येथे. डिस्ट्रिक्ट कोर्ट प्लीडरची परीक्षा खासगी रीतीने उत्तीर्ण. धुळे येथे वकिली.

धुळ्याच्या संशोधन मंदिराचे एक संस्थापक. धुळे येथे समर्थभक्त शंकर श्रीकृष्ण देव व इतिहासाचार्य राजवाडे यांच्या सहवासामुळे इतिहास व अर्थशास्त्र या विषयांचे अध्ययन करण्याची प्रेरणा. धुळ्याहून निघणाऱ्या 'प्रभात' मासिकात प्रकाशित झालेली 'वर्णकलह' ही लेखमाला आणि 'जपानच्या कर्तव्याची दिशा' हा लेख लक्षणीय. या साहित्याशिवाय भटांचे एकूण सहा ग्रंथ प्रसिद्ध झाले आहेत. *महाराष्ट्रधर्म अर्थात मराठ्यांच्या इतिहासाचे आत्मिक स्वरूप* (१९२५) या ग्रंथातून 'महाराष्ट्र धर्म' म्हणजे 'श्रुतिस्मृतिप्रणित धर्म; ज्याचे पालन महाराष्ट्रात केले जाते तो धर्म' असे मत त्यांनी मांडले. *श्रीसमर्थ रामदासस्वामी आणि श्रीछत्रपती शिवाजी महाराज यांचा अन्योन्य संबंध* (१९२८) या ग्रंथात रामदास व शिवाजी यांची प्रथम भेट आणि पुढील काळातील त्यांचा परस्परसंबंध यासंबंधी ऐतिहासिक पुराव्यांची छाननी करून विवेचन केले आहे. *शिवाजीची राजनीती* (१९४१) ह्या ग्रंथात स्वराज्याची स्थापना व विस्तार यामागील राजनैतिक तत्त्वांचा ऊहापोह आढळतो. इतिहासाचार्य वि. का. राजवाडे ह्यांच्या कर्तृत्वसंपन्न जीवनाचे दर्शन घडविणारे *राजवाडे चरित्र* (१९४६), *श्रीसमर्थ रामदास व श्रीरामदासी संप्रदाय* (१९५०) आणि *वकिलीच्या व्यवसायातील चार तपे* (१९५१) हे ग्रंथही प्रसिद्ध आहेत. शेवटच्या ग्रंथातून इतिहासकालीन न्यायपद्धती व अर्वाचीन न्यायपद्धती यांचा तौलनिक अभ्यास करण्यात आला आहे.

धुळ्यात ५१ वर्षे वास्तव्य करून, वकिलीचा किचकट व्यवसाय सांभाळून, त्यांनी इतिहासाचार्य कै. विश्वनाथ काशिनाथ राजवाडे यांच्या सान्निध्यात इतिहास संशोधनात्मक लिखाण निबंधरूपाने बऱ्याच

प्रमाणात केले. इतिहासाचार्यांचे मृत्यूनंतर त्यांनी धुळे येथे 'इतिहासाचार्य विश्वनाथ काशिनाथ राजवाडे संशोधन मंडळा'ची स्थापना १९२८ साली करून संस्थेचे कार्य एकनिष्ठेने व आत्मीयतेने २६ वर्षे केले. संस्थेतर्फे २४ मौलिक ग्रंथ संपादिले. *संशोधन* त्रैमासिक चालविले. या संस्थेच्या योगक्षेमार्थ को-ऑपरेटिव्ह ॲक्टच्या कायद्याखाली राजवाडे मंडळ पीपल्स को-ऑपरेटिव्ह बँकेची कल्पना बसवून, ती प्रत्यक्षात आणून बँकेची भरभराट आपल्या डोळ्यांनी पाहिली. संपूर्ण भारतात पहिल्या प्रथम संशोधन कार्यांच्या मदतीसाठी बँक स्थापन करण्याचे महत्त्वपूर्ण, आगळेवेगळे कार्यही त्यांनी केले.

ग. दे. खानोलकर, म. ना. लोही

**भट, यशोदाबाई माधवराव** : (ज. १८८५–मृ. १९४६). कथा-कादंबरीलेखिका. शिक्षण मराठी चौथीपर्यंत. मुंबईचे प्रसिद्ध वकील माधवराव भट ह्यांच्याशी पंधराव्या वर्षी लग्न. जुन्या वळणाच्या एकत्र कुटुंबपद्धतीमुळे त्यांचे पुढील शिक्षण होऊ शकले नाही.

हरिभाऊ आपट्यांनी ह्यांना कथालेखनास प्रोत्साहन दिले व त्यांच्या कथा 'करमणुकी'तून प्रसिद्ध केल्या. ह्यांच्या वेगवेगळ्या विषयांवरील कथा व लेख प्रारंभी 'भगिनीसमाचार', 'इंदुप्रकाश', 'मुमुक्षु', 'विनोद' ह्या नियतकालिकांतून व पुढे 'केसरी', 'नवाकाळ', 'संदेश', 'लोकमान्य' आदी प्रतिष्ठित नियतकालिकांतून प्रसिद्ध झाल्या. 'स्वराज्यविषयी स्त्रिया काय म्हणतात?', 'स्त्रिया व राष्ट्रकार्य', 'स्त्रिया व हिंदु लोक' असे काही लेखही प्रसिद्ध आहेत.' ह्यांच्या *आर्य स्त्री-रत्ने* (१९१७), *ऐतिहासिक स्त्री-रत्ने* (१९२२) ह्या पुस्तकांना दक्षिणा प्राइझ कमेटीची बक्षिसे मिळाली असून *शिक्षणाच्या प्रभावानेच* (१९१५), *मुलांचे बंड* (१९२१) आणि *राजमाता जिजाबाई* (१९२७) अशा तीन कादंबऱ्याही प्रसिद्ध आहेत.

उषा टाकळकर, म. ना. लोही

० **भवानी तलवार** : पहा जवळकर, दिनकर शंकर

**भवाळकर, केशव शिवराम** : (ज. २७ मे, १८३१, जुन्नर, जि. पुणे–मृ. २८ नोव्हेंबर, १९०२, नागपूर). आत्मचरित्रकर्ते. प्राथमिक शिक्षण जुन्नर व नंतरचे मुंबई येथे. नॉर्मल स्कूलची परीक्षा उत्तीर्ण. त्यानंतर शिक्षक, दुय्यम शाळा तपासनीस, नायब तहसीलदार व असिस्टंट कमिशनर इत्यादी जागांवर नोकरी. १८८६ साली निवृत्त.

पुण्यात असताना 'ज्ञानप्रकाश' साप्ताहिकाच्या स्थापनेत व संपादनात यांचा सहभाग होता. मध्यप्रांतातील मुलकी खात्यात असताना (१८६२–८६) यांनी लिहिलेले 'वऱ्हाडी भाषेचे व्याकरण' आणि 'गोंड लोक व गोंडीभाषा' हे निबंध बक्षीसपात्र ठरले. त्यांचे प्रसिद्ध पुस्तक म्हणजे *रावसाहेब केशव शिवराम भवाळकर यांचे आत्मवृत्त* (१९६१–संपादन–भ. श्री. पंडित). १८५० च्या सुमारास प्रसिद्ध असलेल्या बाळशास्त्री जांभेकर, दादोबा पांडुरंग, लोकहितवादी, ज्योतिबा फुले आदी व्यक्तींविषयी बरीच नवी माहिती त्यात असल्याने ते ऐतिहासिक दृष्ट्या महत्त्वाचे आहे.

उषा टाकळकर, म. ना. लोही

**भवाळकर, नीळकंठ बळवंत ऊर्फ बापूसाहेब** : ० आधुनिक ० नीलकंठ जगन्नाथ मुळे, नेवासेकर : (ज. १७ मे, १८७८, पुणे–मृ. २४ नोव्हेंबर, १९४२, नागपूर). कवी, कथाकार, समीक्षक व महानुभावीय ग्रंथांचे संपादक. शिक्षण नागपूर येथे. बी.ए. (ऑनर्स) (१९०१) व कलकत्ता विद्यापीठाची बी.एल्. पदवी (१९१०). काही वर्षे वकिलीचा व्यवसाय व शेवटी प्राध्यापक.

'विविधज्ञानविस्तारा'तून १९०१ साली भवाळकरांचा 'कविता : स्वरूप व अध्ययन' हा प्रदीर्घ काव्यचर्चात्मक लेख व अन्य काही लेख प्रसिद्ध झाले. ह्यांनी कविताही लिहिल्या. त्यांच्या काही कविता स्वतः ते व त्यांचे मित्र अच्युत सीताराम साठे यांनी मिळून प्रसिद्ध केलेल्या *पद्यपत्राकर* (१९०३) या पुस्तकात व *नवकुसुमांजलि* या संग्रहात आढळतात. त्यांनी बऱ्याच कविता 'आधुनिक' या टोपणनावाने प्रसिद्ध केल्यामुळे भवाळकरांचे नाव कवी म्हणून प्रसिद्ध झाले नाही. *मेहेर पिरोज* (१९२७) ही त्यांची कादंबरीही त्यांनी नीलकंठ जगन्नाथ मुळे, नेवासेकर या नावाने प्रसिद्ध केली. 'कार्यप्रवण पुरुषाला स्त्रीच्या बौद्धिक सहकार्याची गरज आहे काय?' या प्रश्नाची मीमांसा या कादंबरीत केलेली आहे. कौटुंबिक–सामाजिक प्रश्नाला हात घालणारी ही कादंबरी त्यांनी टोपणनावाने लिहिल्यामुळे तिचेही श्रेय त्यांच्या पदरात पडू शकले नाही. याशिवाय 'प्राचीन मराठी काव्यावर हिंदीचा परिणाम', 'विचार स्वातंत्र्याची अभिवृद्धी' हे 'महाराष्ट्र' पत्रातील (१९१४) अभ्यासपूर्ण लेख, 'विविधज्ञानविस्तार'च्या पन्नासाव्या वाढदिवसानिमित्त १८६७ ते १९१९ पर्यंतच्या नियतकालिकांचे व त्यांच्या कामगिरीचे समालोचन करणारा 'विविधज्ञानविस्तार आणि मराठी नियतकालिके' (विविधज्ञानविस्तार, मे १९२६) हा व 'तुकारामाचे गुरू केशवचैतन्य यांचे पद्यात्मक चरित्र आणि टिपणे' हा अन्यत्र प्रसिद्ध झालेला व्यासंगपूर्ण लेख, हे त्यांचे महत्त्वाचे समीक्षणात्मक लेखन.

ते १९३० सालानंतर महानुभाव वाङ्मयाच्या संशोधनाकडे वळले 'श्रीचक्रधरसिद्धांतसूत्रे' (१९३१), 'दृष्टांत पाठ' (१९३६) हे दोन प्रमुख महानुभव ग्रंथ त्यांनी ह. ना. नेने यांच्या सहकार्याने संपादून प्रसिद्ध केले व त्यामुळे प्राचीन मराठी गद्याचे वेगळे स्वरूप भाषाशास्त्रीय टीपांसहित अभ्यासकांपुढे आले.

नागपूर विद्यापीठात मराठीची प्राणप्रतिष्ठा करण्याकरिता त्यांनी धडपड केली. एम्.ए.च्या पहिल्या अभ्यासक्रमाचा आराखडा करण्यातही त्यांचा हात होता. नागपुरात वैचारिक (साहित्य) चर्चा व्हावी या उद्देशाने 'मणिमंजूषा' नावाची संस्था काढण्यातही त्यांनी पुढाकार घेतला होता.

आशा सावदेकर, म. ना. लोही

**भांगले, जगन्नाथ धोंडू** : ० जगन्नाथ : (ज. अंदाजे १७७२, वेंगुर्ले–मृ. जुलै, १८९७, बडोदे). कवी व कादंबरीअनुवादक. शिक्षण मॅट्रिकपर्यंत. 'विद्यार्थी मित्र' मासिकाचे व 'प्रभाकर' पत्राचे संपादक.

'वेंगुर्लेवृत्त' ह्या पत्रातून त्यांचे सुरुवातीचे लेखन प्रसिद्ध झाले. वेंगुर्ले येथील 'सुशील' व मुंबईच्या 'मनोरंजन' मासिकातून त्यांचे काही लेख व कविता तसेच 'काव्यरत्नावली'तून काही स्फुट काव्ये प्रसिद्ध. *आनंदाश्रम* (१८९८) व *कृष्णकांताचे मृत्युपत्र* (१९०५) हे बंकिमचंद्रांच्या कादंबऱ्यांचे अनुवाद, *अयोध्येची बेगम* व *दिल्लीवर हल्ला अथवा मरतखंडाच्या परवशतेचा प्रारंभ* (१८९५) ह्या दोन अनुक्रमे बंगाली व गुजरातीवरून भाषांतरित केलेल्या कादंबऱ्या आणि *मि. गोपाळ गणेश आगरकर ह्यांचे* (एक लहानसे) *चरित्र* (१८९७) ही यांची साहित्यसंपदा.

उषा टाकळकर, मीनल निसळ

**भांडारे, एकनाथ गणेश** : (ज. १७ ऑक्टोबर, १८६३, उंब्रज, जुन्नर, जि. पुणे–मृ. २० जून, १९११). कवी व स्फुट गद्यलेखक. वयाच्या एकोणिसाव्या वर्षी रेल्वेखात्यात तारमास्तर. विद्यार्थीदशेपासूनच काव्य करण्याचा नाद. शालेय जीवनातच *कामकंदला* हे गद्यपद्य नाटक लिहिले. रेल्वेतील नोकरी सुटल्यानंतर वृत्तपत्र, नियतकालिकांचे संपादन, लेखन इत्यादी उद्योग केले.

इ. स. १८८३ पासून जगन्नाथ कवीच्या 'करुणविलासा'च्या भाषांतराने काव्यलेखनास सुरुवात. 'काव्यरत्नावली'च्या प्रारंभीच्या काळातील भांडारे हे एक कवी होते. 'मुक्तांजलि' या शीर्षकाखाली एकत्रित केलेल्या बऱ्याच भाषांतरित स्फुट कविता 'रत्नावली'तून प्रसिद्ध झाल्या. शेक्सपियर, वर्ड्स्वर्थ, टेनिसन इत्यादी पाश्चात्त्य

कवींच्या उत्कृष्ट कवितांच्या आधारे त्यांनी काव्यलेखन केले असले तरी ते त्या कवितांचे भाषांतर नव्हे, असे भांडारे यांनी म्हटले आहे. 'धूम पत्रिका' (१८९४), दादाभाई नौरोजी ही प्रासंगिक काव्ये, 'सखीसंस्मृती' (१९०५) सारखे विलापकाव्य, तसेच 'पवनप्रकोप' (१८८७) हे रेल्वे अपघाताच्या विषयावरील त्यांचे कल्पनारम्य काव्यही उल्लेखनीय आहे.

काव्यरचनेबरोबर त्यांनी 'इंदुप्रकाश', 'मासिक मनोरंजन', 'केरळकोकिळ' या नियतकालिकांतून गद्य-लेखनही केले. 'कल्पतरु' व 'हिंदुपंच' ही वृत्तपत्रे चालविली. 'सुवर्णमाला' (१९०० ते १९०३) या नियतकालिकाचे ते संपादक होते. त्यांनी १९०७ मध्ये 'वेळेचे महत्त्व' हा निबंध प्रसिद्ध केला. *अनुरागपत्रिका* (१८९३) ही त्यांनी रहस्यप्रधान पण शोकांत अशी दीर्घकथाही लिहिली आहे. *संतराम-दादा गवंडी* (१९०९) या दत्तसंप्रदायी सत्पुरुषाचे लहानसे चरित्रही भांडारे यांनी प्रसिद्ध केले.

उषा टाकळकर, आरती कुसरे

० **भाऊराव** : पहा वैद्य, श्रीपाद महादेव

**भागवत, अनंत नारायण** : (ज. १८७४, कराड – मृ. १९३४, इंदूर). इतिहास-लेखक, नाटककार, कादंबरीकार. शिक्षण इंदूर व बडोदा येथे. मॅट्रिक अनुत्तीर्ण. ग्वाल्हेर, इंदूर येथे काही काळ नोकरी. काही काळ पुण्यास व नंतर इंदूर येथे वास्तव्य.

पुण्यास असताना यांनी पायी भ्रमंती करून महाराष्ट्रातील विविध ऐतिहासिक स्थळे पाहिली; आख्यायिका, ऐतिहासिक कागदपत्रे इत्यादींचा संग्रह केला. नंतर कित्येक संस्थानांची जुनी दप्तरे धुंडाळून काही इतिहास लिहिले. त्यांपैकी *भोर संस्थानचा इतिहास* (१९०३) व *साताऱ्याच्या पंतप्रतिनिधी घराण्याचा इतिहास : खंड १ व २* (१९२४, १९२९) हे दोनच ग्रंथ प्रसिद्ध झाले.

इंदूर दरबारने त्यांना राजाश्रय दिला. संस्थानच्या प्रचंड दप्तर-खान्यातील कागदपत्रांची छाननी करण्यात सतरा वर्षे घालवून त्यांनी 'होळकरशाहीच्या इतिहासाची साधने' ह्या दशखंडात्मक ग्रंथाचा संकल्प सोडला. पण प्रत्यक्षात *पत्रव्यवहार : पूर्वार्ध–खंड १; शिंदेशाही पत्रव्यवहार : खंड १२* (१९२५) आणि *खंड ३ – भवानीशंकर यांची रोजनिशी* (१९२६) एवढेच भाग प्रसिद्ध झाले. संस्थानी इतिहासाचे संशोधन व लेखन ही त्यांची संस्मरणीय कामगिरी. याखेरीज त्यांची *माधवराज्यारोहण* (१८९३), *माधवनिधन* (१९००) व *राघोजी* (१९०१) ही ऐतिहासिक नाटके; *पितृबंधमोचन* (१८९८) व *झीनत महाल* (१९०८) ह्या ऐतिहासिक कादंबऱ्या आणि *श्रीमंत थोरले सयाजीराव गायकवाड यांचे चरित्र* (१९०९) व *उमाजी नाईक याचे चरित्र* (१९१०) ही पुस्तके प्रसिद्ध आहेत.

म. ना. लोही, उषा टाकळकर

**भागवत, नारायण हरी** : (ज. १९ डिसेंबर, १८४९ – मृ. एप्रिल १९०१). प्रहसनकार, निबंधलेखक व पत्रकार. इंग्रजी शिक्षण पुणे येथे. काही काळ जंगलखात्यात इन्स्पेक्टर व नंतर मुंबईत बी. बी. सी. आय. रेल्वेत सॅनिटरी कमिशनरच्या कचेरीत नोकरी.

त्यांनी प्रहसने, नाटके व निबंध लिहून सुधारकांविरुद्ध सतत टीकेची झोड उठवली. 'स्वदेशमित्र' व 'वार्ताहर' या पत्रांत ते लेखन करीत. 'वार्ताहर'चे तर ते सात वर्षे संपादक होते. त्यांची टीका उपहास, विडंबन, टवाळी यांनी ओतप्रोत भरलेली असे. 'निबंध-माला'कार चिपळूणकरांचे अभिमानी व अनुगामी.

भागवत हे विशेष प्रसिद्ध आहेत ते त्यांच्या *अभिनव तरुणी स्त्रिया प्रहसन* आणि *मोर एल्एल्.बी.* ह्या प्रहसनांमुळे. दोन्हींवर खटले भरण्यात आले. पहिले प्रहसन जप्त करण्यात येऊन लेखक व प्रकाशक यांना दंड करण्यात आला. दुसऱ्या प्रहसनात उच्च शिक्षणाचे व्यर्थत्व टवाळी व ग्राम्य विनोद यांच्या द्वारे सिद्ध करण्याचा प्रयत्न असला तरी तो फारसा आक्षेपार्ह न वाटल्याने फिर्याद मागे घेण्यात आली. ह्या खटल्यांच्या संदर्भात भागवतांनी 'प्रहसन पुस्तकांवरील वावटळ' व 'सभ्यांचे तट व आमच्यातील ठळक भेद' हे दोन लेख प्रसिद्ध केले. त्यांत त्यांनी आपल्या प्रहसन लेखनामागील हेतू स्पष्ट करून स्वसमर्थन केले.

भागवतांनी विपुल लेखन केले. ११ प्रहसने, ५ निबंध, २ चरित्रे व २ धार्मिक ग्रंथ अशी त्यांची एकूण २० पुस्तके प्रसिद्ध आहेत. त्यांतील काही पुस्तके पुढीलप्रमाणे : (१) *श्रीविद्यानेचित्रपदर्शन* (१८८३), (२) *अभिनव तरुणी स्त्रिया* प्रहसन (१८८५), (३) *हुंडा* (१८८३), (४) *फॅशनेबल वाईफ* (१८८०), (५) *मोर एल्एल्.बी.* (आ. ४ थी, १९०३), (६) *भार्याप्रमाद* (१८८८) इत्यादी प्रहसने; 'हिंदुस्थानात दारिद्र्य आढळे आहे ...' (१८७४), 'स्त्रिया साहसी किंवा दुराचारी होण्यास बालविवाह कारण आहे काय?' (१८७०) आदी निबंध; *अक्कलकोटस्थ स्वामीचरित्र* (१८७९) आणि *श्री ज्ञानेश्वर महाराजांचे चरित्र* (१८८४) हे चरित्रग्रंथ आणि *ज्ञानेश्वरीच्या नवव्या अध्यायातील वेचे* व *सार्थ परमामृत* हे धार्मिक स्वरूपाचे ग्रंथ.

गं. दे. खानोलकर, म. ना. लोही

**भागवत, राजाराम रामकृष्ण** : (राजारामशास्त्री भागवत या नावाने प्रसिद्ध). ० रा. रा. भा. ० ब्राह्मण आहे पण हिंदू नव्हे ० एक मराठा ० भगवद्भक्त : (ज. ११ नोव्हेंबर, १८५१, कशेळी, जि. रत्नागिरी – मृ. ४ जानेवारी, १९०८, मुंबई). वैदिक वाङ्मय मराठ्यांचा इतिहास, मराठी भाषा-समाज व संस्कृती या विषयांचे लेखक.

एल्फिन्स्टन हायस्कूलमधून १८६७ साली प्रवेशपरीक्षा उत्तीर्ण. तीन वर्षे ग्रँट मेडिकल कॉलेजमध्ये अध्ययन. त्यानंतर ते सोडून संस्कृतचा शास्त्रशुद्ध अभ्यास. मुंबईतील सेंट झेवियर कॉलेजमध्ये संस्कृतचे प्राध्यापक. त्यांचे स्फुटलेखन प्रामुख्याने 'विविधज्ञानविस्तार' या मासिकातून व 'इंदुप्रकाश', 'वार्ताहर' या पत्रांतून प्रसिद्ध झाले आहे. *हिंदुधर्मविवेचक* हे एक लहानसे मासिक त्यांनी १८८५ साली काढले होते, त्यात त्यांनी हिंदुधर्मासंबंधी अनेक विवेचक लेख लिहिले.

त्यांचे लेखन स्थूलमानाने प्राचीन संस्कृती–संशोधन, वैदिक व पौराणिक वाङ्मय, धर्म, मराठ्यांचा इतिहास, भाषाशास्त्र, व्याकरण–अलंकार, सामाजिक विचार, मराठी भाषा व वाङ्मय या विषयांवर झालेले आहे. मराठी भाषेत पुरातत्त्वविद्याविषयक लेखन करणारे ते जवळजवळ पहिलेच लेखक. पुरातत्त्वविद्या त्याकाळी फारशी प्रगत झाली नव्हती. त्यामुळे त्यांना त्यावेळी पाश्चात्त्य पंडितांचे लेख, संस्कृत व प्राकृत ग्रंथ यांचे साहाय्य घ्यावे लागत असे. त्यांची बरीचशी मदार शब्द-व्युत्पत्ती, भाषांच्या उत्क्रांतीचा ऐतिहासिक, तौलनिक व चिकित्सक विचार यावरच आहे. मानवेतिहास-लेखनाच्या दृष्टीने भाषाभ्यासाला ते फार महत्त्व देत. त्यामुळे त्यांनी भारताबाहेरील देशांतील महत्त्वाच्या भाषांचा अभ्यास केला. ते 'इण्डॉलॉजी'च्या क्षेत्रातील डॉ. भाऊ दाजी लाड व डॉ. रामकृष्ण गोपाळ भांडारकर यांच्या बरोबरीचे महाराष्ट्रीय अभ्यासक होते. वैदिक वाङ्मयावर त्यांनी मराठीत जेवढे लिहिले, तेवढे अन्य कुणीही लिहिलेले नाही. ऋग्वेदाचे त्यांचे अध्ययन अत्यंत सूक्ष्म होते. 'विविध ज्ञानविस्तारा'तून (१८९५, १८९६, १८९७) 'वेदार्थयत्नकारांचे स्मारक' म्हणून त्यांनी जी लेखमाला लिहिली, ती या संदर्भात उल्लेखनीय आहे. १८९८ साली 'ऐतरेय उपनिषदा'चे व १९०० साली 'श्वेताश्वतर उपनिषदा'चे मूळ संस्कृत संहितेसह इंग्रजी व मराठी भाषांतर त्यांनी प्रसिद्ध केले. सर्व उपनिषदांची भाषांतरे करण्याचा त्यांचा संकल्प मात्र अपुरा राहिला.

त्यांचे वेद व धर्मविषयक विपुल लेखन अनेक नियतकालिकांतून विखुरलेले आहे. त्यातील फारच थोडा भाग पुस्तकरूपाने प्रसिद्ध झालेला आहे. *ब्राह्मण व ब्राह्मणी धर्म किंवा वेद व वैदिक धर्म* (१८८९), *मोंगल व मोगली धर्म* (१८९०), *महाराष्ट्र धर्म* (१८९५), *ब्राह्मणी व मठीधर्म* (१८९९) अशी त्यांची अनेक छोटी पुस्तके पाहावयास मिळतात. त्यांच्या धर्मविषयक लेखांचे सार दुर्गा भागवत यांच्या 'राजारामशास्त्री भागवत' या पुस्तकात (पृष्ठ ३६–३८) दिलेले आहे. कोणत्याही पंडिताच्या विचाराचा किंवा मताचा प्रभाव त्यांनी आपल्यावर पडू न देता भारतीय धर्मविषयक वाङ्मयाचा त्यांनी स्वतंत्रानुसार सूक्ष्मपणे अभ्यास केला होता. सामाजिक विषयांवरही त्यांनी विपुल लेखन केले. ते सामाजिक समतेचे पक्के पुरस्कर्ते होते. मराठ्यांचा इतिहास, भाषाशास्त्र ह्या विषयांवरही त्यांनी विपुल लेखन केले आहे. त्यांचे एतद्विषयक अनेक छोटे मोठे लेख 'विविधज्ञानविस्तार' मध्ये प्रकाशित झाले आहेत. त्यातील 'मऱ्हाठ्यांच्या संबंधाने चार उद्‌गार' (१८८७) हा निबंध विशेष महत्त्वाचा आहे. त्यात मराठ्यांचे मूळ, उदय, वाढ, उत्कर्ष, ऱ्हास, गुणावगुण, राजकीय, सामाजिक, धार्मिक कार्यभाग यांचे तात्त्विक, ऐतिहासिक पर्यालोचन आढळते. गोंडी भाषेसंबंधी लिहिणारे ते पहिले भारतीय लेखक होत. 'संस्कृत भाषेची विचिकित्सा', 'प्राकृत भाषेची विचिकित्सा' व मुंबई विद्यापीठाच्या 'धि विल्सन फायलालॉजिकल लेक्चर्स' या मालेत त्यांनी जी इंग्रजीत व्याख्याने दिली यांत त्यांचे भाषाशास्त्रीय विचार आले आहेत. संस्कृत साहित्यशास्त्राचा त्यांनी स्वतंत्रपणे विचार केलेला आढळतो. *अलंकार मीमांसा* (१८९३) या छोट्या पुस्तकात परंपरेला बाजूस सारून त्यांनी स्वतंत्रपणे केलेली रसचर्चा आढळते. *एकनाथचरित्र* (१८९३) हे एकनाथांच्या कार्याचे सामाजिक व धार्मिक दृष्टीने विवेचन करणारे त्यांचे पुस्तक प्रसिद्ध असून स्कॉटच्या 'टेलिस्मन' या कादंबरीचे 'स्वयंवर' हे त्यांचे अपूर्ण भाषांतरही उल्लेखनीय आहे.

गं. दे. खानोलकर, के. ए. पोतदार

संदर्भ : 'राजारामशास्त्री भागवत' दुर्गा भागवत

० **भाजेकर, महादेव बाळकृष्ण :** पहा चितळे, महादेव बाळकृष्ण

**भाटवडेकर, कृष्णशास्त्री धुंडिराज :** (ज. १८२५ – मृ. ८ डिसेंबर, १८८७). भाषांतरकार व खगोलशास्त्रविषयक ग्रंथकार. प्राथमिक शिक्षण तळेगाव येथे व पुढचे शास्त्रीय पद्धतीने पुणे पाठशाळेत. संस्कृत भाषा, वेदान्त याबरोबरच वैद्यक व ज्योतिष शास्त्रांचा अभ्यास. काही काळ अक्कलकोट संस्थानचे कारभारी. १८५९ साली मुंबईच्या एल्फिन्स्टन इन्स्टिट्यूटमध्ये संस्कृतचे अध्यापक म्हणून नेमणूक. डॉ. भाऊ दाजी यांना आयुर्वेद संशोधनातील सहाय्यक. संस्कृतमधील वैद्यक ग्रंथांची त्यांनी मराठीत भाषांतरे केली. *वैद्यामृत* (मोरेश्वर १८५८), *वैद्यावतंस* (१८६०), *बोपदेवशतक* (१८६०), *वैद्यजीवन* (लोलिंबराज, १८६१), *माधवनिदान* (१८६२) *वैद्यसारसंग्रह* (रघुनाथशास्त्री दाते यांच्या सहाय्याने–१८६५), आदी ग्रंथ प्रसिद्ध. संस्कृत भाषेचा अभ्यास करणे सोपे जावे, यासाठी *सुबन्तप्रकाश षड्‌लिंगरूपावली* (१८६७) हा ग्रंथ यांनी लिहिला. *आकाशसौंदर्य* (१८६१) हा यांचा खगोलशास्त्रावरील ग्रंथ. संस्कृतच्या सहाय्याने विविध शास्त्रविषयक मराठी परिभाषा तयार करण्याचे मोलाचे कार्य यांनी स्वकाळात केले.

उषा टाकळकर, के. ए. पोतदार

**भाटवडेकर, भालचंद्र कृष्ण :** (ज. १९ फेब्रुवारी, १८५२, पळस्पे, ता. पनवेल, जि. कुलाबा – मृ. ३ ऑक्टोबर, १९२२, मुंबई). वैद्यक-आरोग्यशास्त्रावरील ग्रंथांचे लेखक.

बालपण पुणे जिल्ह्यातील तळेगाव-दाभाडे येथे. ग्रँट मेडिकल कॉलेजात वैद्यकीय अभ्यास. एल्.एम्. ही वैद्यकीय परीक्षा प्रथम वर्ग, प्रथम क्रमांकात उत्तीर्ण (१८७३). १८७४ मध्ये बडोदे संस्थानात नोकरी. १८८५ पासून मुंबईत स्वतंत्र वैद्यकीय व्यवसाय. देशी भाषेत वैद्यकशास्त्र शिकविण्यासाठी बडोद्याच्या महाराजांनी वैद्यक महाविद्यालय स्थापन केले होते. त्या महाविद्यालयातील विद्यार्थ्यांना वैद्यकशास्त्र मराठीत शिकविण्यासाठी व विद्यार्थ्यांची सोय व्हावी यासाठी त्यांनी *सार्वजनिक आरोग्य किंवा सामाजिक आरोग्य रक्षण मूलतत्त्वे* (१८७९), *वनस्पतिशास्त्राची मूलतत्त्वे* (१८८३), *अबलासंजीवन अथवा आपल्या देशातील स्त्रियांच्या अकाली मृत्यूची कारणे व तन्निवारणार्थ उपाय* (१८८४) हे तीन ग्रंथ लिहिले. भौतिकशास्त्रांचे ज्ञान मराठीतूनच बहुजन समाजापर्यंत पोहोचविल्याशिवाय आपला मागासलेपणा कमी होणार नाही, हे त्यांच्या लक्षात आल्याने व्यावहारिक परिभाषा योजून, त्यांनी या ग्रंथांच्या रूपाने मराठी शास्त्रीय वाङ्मयात मोलाची भर टाकली. मराठी भाषेचे शुद्धलेखन व मोडी लिपी याविषयीच्या चळवळीतही त्यांनी भाग घेतला. पंचांगसुधारणा व तद्विषयक संशोधन या चळवळीचे ते आद्य पुरस्कर्ते होते. 'टिळक पंचांग' हे त्यांच्या कार्याचे एक परीने स्मारकच होय.

उषा टाकळकर, के. ए. पोतदार

**भाटवडेकर, विष्णु कृष्ण :** (ज. १८५७ – मृ. १२ जानेवारी, १९११, मुंबई). हिंदुधर्मशास्त्र विषयाचे अधिकारी. प्राथमिक शिक्षण मुंबईत व नंतरचे सातारा व पुणे येथे. बी.ए. (१८७७), एल्एल्.बी. (१८८०). मुंबई येथे वकिली. कायद्यासंबंधीची एकदोन लहान पुस्तके यांनी मराठीतून लिहिली. बडोद्याच्या सयाजीराव महाराजांच्या सांगण्यावरून मेनचा इंग्रजी ग्रंथ व मूळचे संस्कृत ग्रंथ ह्यांच्या आधारे लिहिलेला *हिंदुधर्मशास्त्र* (१९०५) हा यांचा ग्रंथ प्रसिद्ध आहे.

उषा टाकळकर, मीनल निसळ

**भाटे, गणेश सदाशिव :** (ज. १३ मार्च, १८८०, बेळगाव – मृ. १९२७). इतिहासाभ्यासक आणि वाङ्मयसमीक्षक. शालेय शिक्षण बेळगावी व उच्च शिक्षण मुंबईस. एडिंबरो विद्यापीठाचे एम्.ए. काही काळ बडोदे संस्थान व बिहार प्रांतात सरकारी नोकरी. त्यानंतर पाटणा येथील विद्यापीठात इतिहासाचे प्राध्यापक. *वाचन : त्याचे मार्ग व उद्दिष्ट* (१९१३) हा त्यांचा प्रबंध किंवा 'विविधज्ञानविस्तारा'च्या पन्नाशीच्या आनंदोत्सव स्मारक ग्रंथातील (भाग २, १९२१) 'इतिहास' हा त्यांचा निबंध त्यांच्या डोळस व्यासंगाचा पुरेपूर प्रत्यय देणारा आहे. त्यांची ग्रंथसमीक्षा केवळ गुणदोष दाखविण्यापुरतीच मर्यादित नाही, तर त्या विषयाच्या अनुषंगाने नवा विधायक विचार मांडणारी आहे. या दृष्टीने 'विविधज्ञानविस्तारा'तील त्यांची *आजपासून ५० वर्षांनी* (मार्च १९१४), *गावगाडा* (ऑक्टो. नोव्हें. १९१६) व *मध्ययुगीन भारत* (आक्टो. नोव्हें. १९२१, फेब्रु. १९२२) इत्यादी ग्रंथसमीक्षणे या दृष्टीने अभ्यासनीय आहेत.

उषा टाकळकर, के. ए. पोतदार

**भाटे, गोविंद चिमणाजी :** (ज. १९ सप्टेंबर, १८७०, महाड – मृ. २६ एप्रिल, १९४६). तत्त्वज्ञान, अर्थशास्त्र, सौंदर्यशास्त्र, प्रवासवर्णन, वाङ्मयेतिहास इत्यादी विविध विषयांशी संबंधित पुस्तकांचे लेखक. शिक्षणशास्त्रज्ञ.

शिक्षण पुणे येथे. मुंबई विद्यापीठाचे एम्.ए. (१८९४). डेक्कन एज्युकेशन सोसायटीच्या फर्ग्युसन कॉलेजात पाश्चात्त्य व पौर्वात्य तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक. सांगलीच्या विलिंग्डन कॉलेजचे पहिले प्राचार्य (१९१९).

समाजसुधारणा व राजकारण यांत ते अनुक्रमे गोपाळ गणेश आगरकर व गोपाळ कृष्ण गोखले यांचे अनुयायी होते. सामाजिक

समता, जातिभेदनिर्मूलन, स्त्रीस्वातंत्र्य, विधवाविवाह आदी चळवळींत उक्ती व प्रत्यक्ष कृती यामध्ये यांचा निष्ठापूर्वक सहभाग होता. यांचा 'प्रेममीमांसा' हा पहिला लेख, १८९५ साली हरिभाऊ आपटे यांच्या 'करमणूक' साप्ताहिकात प्रसिद्ध झाला. तेव्हापासून १९०९ पर्यंत 'करमणूक' व 'ज्ञानप्रकाश' यांतून यांनी विपुल स्फुटलेखन केले. पुढे 'ज्ञानप्रकाश'मध्ये ते नियमितपणे लेखन करू लागले. त्यांनी लहानमोठी मिळून (एकवीस मराठी व एक इंग्रजी) अशी बावीस पुस्तके लिहिली. त्यातील बारा पुस्तके प्रवासवर्णनात्मक असून बाकीची पुढीलप्रमाणे आहेत : *अर्थशास्त्राची मूलतत्त्वे व हिंदुस्थानची सद्यःसांपत्तिक स्थिती आणि ती सुधारण्याचे उपाय* (१९१०), *समाजशास्त्रावरील व्याख्याने अथवा हिंदू समाजातील काही चालीरीतींचे समाजशास्त्रदृष्ट्या विवेचन* (१९१४), *कार्लाइल व हिंदू चालीरीती* (१९२०), *तीन तत्त्वज्ञानी : सॉक्रेटीस, जॉर्ज बार्कले, कँट* (१९२१), *कँट व शंकराचार्य* (१९३१), *सर वॉल्टर स्कॉट : चरित्र व वाङ्मयाचे स्वरूप* (१९३२), *ललितकलामीमांसा* (१९२५), *प्रेम की लौकिक!* (कादंबरी, १९२३), *हिस्टरी ऑफ मॉडर्न मराठी लिटरेचर : १८०० ते १९१८* (१९३९), *लघुकथा चतुष्टय* (सर वॉल्टर स्कॉटच्या कादंबऱ्यांच्या आधारे, १९४२), *त्रिमूर्तीस प्रणामांजली* (१९४२), *प्रवासपत्रे* (१९४४).

*अर्थशास्त्राची मूलतत्त्वे* हा भाटे यांचा मराठीत स्वतंत्रपणे लिहिलेला अर्थशास्त्रविषयक पहिला ग्रंथ. इंग्रजी भाषेतील एतद्विषयक अनेक ग्रंथ अभ्यासून त्यांनी हा ५२७ पृष्ठांचा ग्रंथ सिद्ध केला. 'सार्टर रिसार्टस्' या कार्लाईलच्या पुस्तकाने प्रभावित होऊन त्यांनी *कार्लाइल व हिंदू चालीरीती* हे पुस्तक लिहिले. कार्लाईलच्या विचारांबरोबरच त्यांचे समाजसुधारणेचे विचार समजण्याच्या दृष्टीने ते उपयुक्त आहे. *तीन तत्त्वज्ञानी*, *कँट व शंकराचार्य* या पुस्तकांत त्यांच्या तत्त्वज्ञानाचा विचार मांडला आहे. *ललितकलामीमांसा* यात सौंदर्यशास्त्राचा आधुनिक पद्धतीने विचार केलेला आहे. या विषयावरील मराठी भाषेतील हे पहिलेच पुस्तक. 'प्रवासवर्णनकार' म्हणूनही त्यांची मराठी वाङ्मयात विशेष प्रसिद्धी होती. भरपूर माहिती, प्रवास केलेल्या प्रदेशातील लोकस्थिती, सामाजिक स्थिती, उद्योगधंदे, प्रेक्षणीय स्थळे यांची चौकसबुद्धीने केलेली वर्णने या दृष्टीने ही प्रवासवर्णने उपयुक्त व बोधप्रद वाटतात. गडकऱ्यांच्या 'प्रेमसंन्यास' या पहिल्या नाटकाला भाटे यांची प्रस्तावना लाभली आहे.

*प्रेम की लौकिक!* ही एक कादंबरी व सर वॉल्टर स्कॉटच्या कादंबऱ्यांच्या आधारे लिहिलेल्या काही गोष्टी एवढेच त्यांचे ललित लेखन आहे. इचलकरंजीचे अधिपती बाबासाहेब घोरपडे यांच्या प्रोत्साहनाने त्यांचे वास्तव्य ऑगस्ट, १९२९ ते मे, १९३० या काळात लंडन येथे होते. तेथे राहून त्यांनी 'ब्रिटिश म्यूझियम' व 'इंडिया ऑफिस'च्या ग्रंथालयातील संग्रहित व दुर्मिळ मुद्रित मराठी पुस्तकांचे (१९२२ पर्यंत प्रकाशित झालेल्या) वाचन केले व त्यावरून इंग्रजीत *हिस्ट्री ऑफ मॉडर्न मराठी लिटरेचर १८००–१९३८* हा ग्रंथ तयार केला (प्रकाशन : १९३९). इंग्रजीत मराठी वाङ्मयेतिहास लिहून तो सिद्ध करण्याचा हा पहिलाच प्रयत्न असावा.

गं. दे. खानोलकर, के. ए. पोतदार, आरती कुसरे

**भाटे, विठ्ठल बाळकृष्ण :** (ज. १८८६ – मृ. २७ जानेवारी, १९१५). जीवनविज्ञान विषयाचे लेखक. एल्फिन्स्टन कॉलेजमधून बी.ए. पुण्यास फर्ग्युसन कॉलेजात अध्यापन. हुबळी येथे मुख्याध्यापक.

मराठीत जीवनशास्त्रावर सोप्या भाषेत पुस्तके लिहिण्याचा पहिला प्रयत्न भाटे यांनी केला. यांची *जीवनशास्त्राची तत्त्वे* (१८९७), *जनन-मरण मीमांसा* (१९०७), *सजीव सृष्टीतील चमत्कार* (शास्त्ररहस्य ग्रंथात समाविष्ट ५५ पृष्ठांचा निबंध) इत्यादी पुस्तके प्रसिद्ध आहेत.

उषा टाकळकर, मीनल शिवळ

**भातखंडे, विष्णु नारायण :** (ज. १० ऑगस्ट, १८६० – मृ. १९ सप्टेंबर, १९३६). हिंदुस्थानी संगीतक्षेत्रातील एक युगप्रवर्तक थोर संशोधक, संगीत शास्त्रकार, संगीत प्रचारक. मूळचे आडिवारेनागाव (जि. रत्नागिरी) येथील. १८०० पासून मुंबईला वाळकेश्वर विभागात स्थायिक. बी.ए. (१८८५), एलएल्.बी. (१८८७). अनेक उस्ताद व गुरूंच्याकडून विधिवत् संगीत संस्कार ग्रहण केले. भारतभर भ्रमण, संशोधन व अभ्यासपूर्वक श्रवण. १३ वर्षे नोकरी केली. पण सर्व आयुष्य संगीताला वाहिले.

स्वतःच्या काळात प्रचलित असलेले गायन-वादन ऐकताना प्राचीन ग्रंथांत अनुस्यूत झालेले संगीतशास्त्र आणि प्रत्यक्ष गान व्यवहार यांतील स्पष्ट तफावत पाहून पं. भातखंडे यांनी त्या काळी गायिल्या जाणाऱ्या जातिवंत बंदिशी गोळा केल्या, आणि त्यांचे सांगीतिक लेखन करण्यासाठी गो. ल. छत्रे, वि. रा. काळे, बडोद्याचे मौलाबक्ष इत्यादिकांच्या संगीत स्वरलिपीतील दोष काढून टाकून छपाईला सुलभ आणि चाल कळण्यास उपयुक्त अशी स्वतःची स्वरलिपी बनविली. सर्व बंदिशी लिहून काढून त्यांच्या सांगीतिक स्वरूपाच्या आधाराने पंडितजींनी स्वतःचे असे संगीतशास्त्र उभारले आणि रूढीवाद्यांना विश्वास पटावा यासाठी 'चतुर पंडित' या टोपणनावाने १९१० साली *श्रीमल्लक्ष्यसंगीतम्* हा संस्कृत भाषेतील ग्रंथ प्रकाशित केला. पुढे त्यांनी 'विष्णुशर्मा' या टोपणनावाने मराठीत *हिंदुस्थानी संगीत पद्धती* या ग्रंथाचे चार भाग प्रकाशित केले. या सर्वांतून संगीत शास्त्राची नव्याने आमूलाग्र फेरमांडणी करण्याचे आणि प्रचलित संगीत-व्यवहाराशी सांगड घालण्याचे कार्य त्यांनी यशस्वीपणे केले. स्वर-लिपिरचना, रागविचार, आरोह-अवरोह, श्रुतिविचार, थाट पद्धती, वादी-संवादी ऊहापोह इत्यादी विषयांची चर्चा यातून झाली.

पं. भातखंड्यांच्या कार्याची त्रिसूत्री अशी सांगता येईल— (१) प्राचीन संगीत विद्येचे संशोधन, (२) नव्या संगीतशास्त्राची उभारणी आणि (३) नूतन संगीतशास्त्राचा प्रचार व प्रसार. या दृष्टीने त्यांचा कार्यभाग असा– (अ) बडोदे येथील संगीत पाठशाळेच्या पुनरुज्जीवनात सक्रिय सहकार्य (१९१५), (आ) ग्वाल्हेरच्या माधव संगीत विद्यालयाची उभारणी, (इ) लखनौच्या मॉरिस म्यूझिक कॉलेज (नंतर भातखंडे संगीत महाविद्यालय)ची स्थापना व सहभाग (१९२६), (ई) ठिकठिकाणी अ. भा. संगीत परिषदा, संगीत परिषदा, संगीत शिक्षणासाठी सुसूत्र अभ्यासक्रम व पाठ्यपुस्तक निर्मिती वगैरे. पंडितजींनी प्रत्यक्ष संगीत शिक्षणाचेही कार्य केले. पं. वाडीलाल शिवराम नायक, डॉ. श्रीकृष्ण नारायण रातंजनकर इत्यादी त्यांचे शिष्य नावाजलेले आहेत.

पं. भातखंडे यांची ग्रंथसंपदा विपुलतर आहे. १९०९ ते १९३३ मधील त्यांचे प्रकाशित ग्रंथ– (मौलिक) (१) *श्रीमल्लक्ष्यसंगीतम् व अभिनव रागमंजरी* (संस्कृत भाषेत), (२) *हिंदुस्थानी संगीत पद्धती* (४ भाग, मराठीमध्ये-एकूण पृष्ठे सुमारे २,५००), (३) *हिंदुस्थानी संगीत पद्धती, क्रमिक पुस्तक मालिका–भाग १ ते ६* (१८५२, चिजांचा संग्रह व विवेचन), (४) *A short Historical Survey of the Music of Upper India*, (५) *A comparative Study of some of the leading Music systems of the 15th, 16th, 17th, and 18th Centuries*, (६) *लक्षण गीतसंग्रह* (३ भाग), (७) *गीतमालिका* (मासिक अंक, एकूण २३), (८) *पारिजात प्रवेशिका* (पं. अहोबलकृत 'संगीत पारिजात' ग्रंथाच्या स्वराध्यायावरील भाष्य : मराठीत), (९) *रागविबोध*

*मनोशिका* (पं. सोमनाथकृत 'रागविबोध' ग्रंथाच्या स्वराध्यायावरील भाष्य : मराठीत). याशिवाय काही संग्रहस्वरूपाचे ग्रंथ : *पं. रामामात्यकृत स्वरमेलकलानिधी* (संस्कृत), *पं. तुळजेंद्रकृत संगीत सारामृतोद्धार* (संस्कृत), *कविलोचनकृत रागतरंगिणी* (संस्कृत), *काशिनाथशास्त्री अप्पा तुलसीकृत संगीत सुधाकर, संगीत रागचंद्रिका* (हिंदी), *पूर्ण कविकृत नादोदधि* (हिंदी) असे १३ संग्रहरूप ग्रंथ संस्कृतात आणि २ हिंदीत छापून प्रकाशित केले.

श. वि. गोखले, आरती कुसरे, डॉ. श्रीरंग संगोराम

**भानू, चिंतामण गंगाधर :** (ज. २४ जुलै, १८५६, मेणवली – मृ. ३० डिसेंबर, १९२९). इतिहास व भारतीय तत्त्वज्ञान या विषयांचे लेखक आणि भाषांतरकार. चरित्रलेखक आणि कादंबरीकार. नाना फडणीसांच्या कुळात जन्म. पुणे येथे पी. डब्ल्यू. डी. खात्यात काही काळ ओव्हरसीयर. पुढे स्वावलंबनाच्या बळावर एम्.ए. डेक्कन एज्युकेशन सोसायटीचे सुरुवातीपासून आजीव सदस्य आणि १९१८ पासून फर्ग्युसन कॉलेजमध्ये प्राध्यापक. निवृत्तीनंतर यांनी 'तत्त्वज्ञानमंदिरा'ची स्थापना केली.

गीता, ईश, केन, कठ आदी उपनिषदे आणि बादरायणप्रणीत 'चतुःसूत्री' या तत्त्वज्ञानपर ग्रंथांची भाषांतरे हे भानूंचे महत्त्वाचे कार्य. हे करताना त्यांनी केवळ भाषांतरापुरती दृष्टी मर्यादित न ठेवता, शांकरभाष्याचे विवरण करून मराठी वाचकांना त्यांचा परिचय करून दिला आहे. स्वतः शांकरमतवादी अद्वैती असूनही भानूंनी या ग्रंथांच्या प्रस्तावना/उपसंहारात रामानुज, मध्व, वल्लभ इत्यादी प्राचीन आचार्यांच्या व तदनुसारी ज्ञानेश्वर, वामनपंडित या टीकाकारांच्या मतांचा, तसेच आधुनिक आणि ग्रीक, युरोपियन मतांचा परामर्श घेतला आहे. प्रस्तुत भाषांतरे गुरुशिष्य-संवाद शैलीमध्ये लिहिली असून दृष्टांतादी अलंकारांच्या साह्याने कठीण विषय सुगम करून सांगितला आहे.

भानूंची *नाना आणि महादजी यांची तुलना* (केसरी, १८९५) ही लेखमाला त्याचप्रमाणे *नाना फडणीस यांचे अल्पचरित्र* (१८९०) व इतर स्फुट लेख प्रसिद्ध आहेत. त्यावरून त्यांचा मराठी इतिहासाचा जाज्वल्य अभिमान, व्यासंग, चिंतन इत्यादींची ओळख होते. मराठी माणसाला आपल्या पराक्रमी पूर्वजांची ओळख व्हावी व अभिमान वाटावा म्हणून *मराठ्यांच्या इतिहासातील काही गोष्टी* (१८९७) हे छोटे पुस्तक यांनी प्रसिद्ध केले.

भानू हे आंग्लविद्याविभूषित मराठी शिक्षितांच्या पहिल्या पिढीचे प्रतिनिधी होते. हर्बर्ट स्पेन्सरच्या ग्रंथांच्या आधारे *नीतिमीमांसा अथवा नीतिशास्त्राची मूलतत्त्वे* (१८९१) व *नीतिमीमांसा अथवा न्यायतत्त्वे* (१८९२) हे ग्रंथ त्यांनी लिहिले. या ग्रंथातील प्रतिपादन भारतीय दृष्टांत, उदाहरणे इत्यादींच्या आधारे केले आहे.

भानूंनी आयुष्याच्या पूर्वार्धात *रिचर्ड कॉब्डेन* (१८९०) व *डेमॉस्थेनिस* (१८९१) ही दोन चरित्रे स्वदेशप्रीतीचा अंकुर निर्माण करण्याच्या हेतूने लिहिली.

त्यांचे *नाट्यशास्त्र* (१९१७) हे भरतमुनींच्या नाट्यशास्त्राचे भाषांतरही प्रसिद्ध आहे.

*शृंगेरीची लक्ष्मी* (१९२४) ही स्वतंत्र ऐतिहासिक कादंबरी व *हंबीरराव* (१९२८) ही इंग्रजीवरून अनुवादित केलेली कादंबरी यांनी लिहिली आहे.

श्री. गं. मोडे, आरती कुसरे

० **भारताचार्य :** पहा वैद्य, चिंतामण विनायक

**भारदे, शिवराम एकनाथ :** ० भारद्वाज : (ज. ९ मे, १८६२ – मृ. ३ फेब्रुवारी, १९२०). संतसाहित्य-विमर्शक. शिक्षण बी.ए.पर्यंत. अहमदनगरच्या विद्यालयात नोकरी. घराणे हरिदासाचे. स्वतः शिवरामबुवाही कीर्तनकार होते. राजद्रोहाचा त्यांच्यावर संशय घेतला गेल्यामुळे त्यांना शाळा सोडावी लागली. पुढे ते नगरच्या अमेरिकन मिशन शाळेत संस्कृतचे शिक्षक म्हणून काम पाहू लागले.

यांनी 'सुधारक' पत्रात 'भारद्वाज' या टोपण नावाने सन १८९८-९९ मध्ये एक लेखमाला लिहिली. ज्ञानेश्वरीकर्ते ज्ञानदेव व अभंगकर्ते ज्ञानदेव या दोन भिन्न व्यक्ती असल्याचे मत यांनी या लेखमालेतून मांडले. त्यांची ही लेखमाला *ज्ञानदेव व ज्ञानेश्वर* (१९३१) या नावाने प्रसिद्ध आहे.

भारदेंच्या या प्रतिपादनाने त्याकाळी मोठी खळबळ माजली आणि या विषयाचा चिकित्सक अभ्यास करून श्री. मिंगारकर बुवा, ल. र. पांगारकर, प्रि. दांडेकर, डॉ. पेंडसे, डॉ. रा. द. रानडे, गजेंद्रगडकर या विद्वानांनी भारदेंच्या मताचे खंडन करून ज्ञानदेव व ज्ञानेश्वर एकच असे प्रतिपादन केले.

भारदे हे ज्ञानेश्वरीविषयक रूढ व सांप्रदायिक समजुतींना धक्का देणारे चिकित्सक टीकाकार होते. त्यांची मते वादग्रस्त असली तरी ज्ञानदेव व ज्ञानेश्वरविषयक संशोधनास चालना देणारी व अनेक संशोधकांना नवी दृष्टी देणारी ठरली.

भा. पं. बहिरट, आरती कुसरे

० **भालाकार भोपटकर :** पहा भोपटकर, भास्करराव बळवंत

० **भालेंदू :** पहा सुकथनकर, भालचंद्र

**भालेकर, कृष्णराव पांडुरंग :** (ज. १८५०, भांबुर्डे-पुण्याजवळ, आताचे शिवाजीनगर – मृ. ७ मे, १९१०). सत्यशोधक समाजाच्या संस्थापकांमधील तरुण आणि उपक्रमशील कार्यकर्ते, पत्रकार, वक्ते, कवी आणि साहित्यकार.

कृष्णराव भालेकरांचा जन्म पुण्याजवळील भांबुर्डे येथे माळी जातीतील एका शेतकरी कुटुंबात झाला. त्यांचे वडील पांडुरंग राणोजी भालेकर हे पिढीजाद वारकरी असून ज्ञानेश्वरीवर प्रवचने करीत. त्यांच्यामुळे कृष्णरावांना लहानपणापासूनच भजनाचा नाद लागला. तळेगाव ढमढेरे येथे इयत्ता दुसरीपर्यंत शिक्षण घेतल्यावर कृष्णराव पुण्याच्या रविवार पेठेतील मिशन हायस्कूलमध्ये (१८६४–६८) शिकले. १८५६ मध्ये ते भांबुर्ड्यामधील प्रसिद्ध गूढ सत्पुरुष जंगली महाराज यांच्या सहवासात आले. १८६८ मध्ये त्यांनी जंगली महाराजांचा अनुग्रहही घेतला. जंगली महाराज सामाजिक सुधारणाचे पुरस्कर्ते व ब्राह्मण्याचे विरोधक होते. शिवाय ते स्वतः संत तुकारामाचे चहाते असल्याने, वारकरी परंपरेत वाढलेल्या कृष्णरावांना त्यांचा उपदेश घेताना अडचण वाटायचे कारण नव्हते.

इ. स. १८७१ मध्ये कृष्णरावांनी 'हितोपदेशक भजन समाज' काढला आणि स्वरचित अभंग ते गाऊ लागले. ब्राह्मण्यावर टीका आणि ब्राह्मणेतरांना उपदेश असा या अभंगांचा थाट असे. याच काळात महात्मा जोतिराव फुले हेही अभंगांची रचना करीत होते. परंतु भालेकरांना परंपरेतले बारकावे आणि खुब्या अधिक माहीत असल्यामुळे, त्यांच्या अभंगरचनेत फुल्यांच्या अभंगापेक्षा वैविध्य आढळते, याची नोंद घेतली पाहिजे. शिवाय हे अभंग भालेकर व त्यांचे सहकारी पारंपरिक वारकरी चालीमध्ये म्हणत.

भालेकर पुण्यातील ऐन ब्राह्मणवस्त्यांमध्ये बेधडकपणे सभा घेऊन ब्राह्मणांवर हल्ला करीत.

महात्मा फुले आणि भालेकर यांच्यात अगोदरचेच नातेसंबंध असल्याने, सत्यशोधक समाजाच्या कार्यात त्यांनी एकमेकांना सहकार्य करणे स्वाभाविक होते. पण नंतर त्यांच्यात मतभेद होऊन दुरावाही निर्माण झाला. इ. स. १८७७ साली भालेकरांनी *दीनबंधू* हे सत्यशोधक पत्र सुरू केले. ब्राह्मणेतर चळवळीचे हे पहिले पत्र होय. या पत्राद्वारे त्यांनी विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी फुल्यांवर केलेल्या टीकेला

प्रत्युत्तर दिले. स्वतः फुल्यांना वर्तमानपत्र काढण्याची कल्पना मान्य नसल्यामुळे, त्यांनी कालेकर व भय्याबारू या मुंबईच्या सत्यशोधकांनी देऊ केलेला छापखाना परत करण्याचे धोरण अवलंबिले होते. या पार्श्वभूमीवर भालेकरांनी फुल्यांची बाजू धरणे अधिक उठून दिसते. फुले आणि भालेकर यांच्यातील मतभेद पूर्णपणे कधीच मिटले नाहीत. सुशिक्षणगृहाच्या स्थापनेसारख्या बाबींमधून ते व्यक्त होत राहिले.

भालेकरांनी १८८४ मध्ये राजकीय कार्य करण्याच्या उद्देशाने 'दीनबंधू' सार्वजनिक सभा काढली. सत्यशोधक समाजात राजकीय चर्चेला मुभा नसल्याने त्यांना हे कृत्य करावे लागले असावे. या सभेने स्वदेशीचा पुरस्कार केला होता, हे लक्षणीय आहे. या सभेने सक्तीच्या प्राथमिक शिक्षणाचा पुरस्कार केला आहे.

भालेकर हे लोकहितवादी गोपाळ हरि देशमुख, न्या. महादेव गोविंद रानडे यांची मदत घेत असत. १८८५ मध्ये त्यांनी काढलेली सत्यशोधक समाजाच्या झेंड्याची मिरवणूक चांगलीच गाजली.

*दीनबंधू*ला आलेल्या आर्थिक तोट्यामुळे तो बंद करावा लागला. परंतु भालेकरांना वृत्तपत्राचे महत्त्व माहीत असल्याने त्यांनी १८१८ मध्ये *दीनमित्र* हे मासिकपत्र चालू केले. त्यातून त्यांचे श्रीखंडादि अभंग प्रसिद्ध झाले. विशेष म्हणजे त्यांच्या *बळिबा पाटील* या कादंबरीची चार प्रकरणेही या पत्रातून प्रसिद्ध झाली. (एप्रिल, १८८८ ते जुलै, १८८८).

*दीनमित्र* हे मासिक होते. मासिकास त्याच्या स्वतःच्या मर्यादा असतात. तेव्हा *अंबालहरी* नावाने इंग्रजी–मराठी साप्ताहिक पत्र भालेकरांनी सुरू केले. पुढे ही दोन्ही पत्रे बंद पडली.

मुंबईमधील एक सत्यशोधक रामजी संतुजी आवटे यांनी १८९३ मध्ये त्यांच्याच बंद पडलेल्या, 'शेतकऱ्यांचा कैवारी' या पत्राचे पुनरुज्जीवन करण्याचे ठरविले आणि ते भालेकरांकडे सुपूर्त केले. वासुदेव लिंगोजी बिर्जे यांच्या सहकार्याने भालेकरांनी ते दोन वर्षे चालविले.

भालेकर अतिशय कल्पक आणि उपक्रमशील होते. कंत्राटाचा व्यवसाय करीत असताना मुंबईच्या तान्सा तलावाचे पाणी सोडण्याच्या समारंभास आलेल्या गव्हर्नरपुढे उभारलेल्या कमानीवर बहुजनांची ज्ञानतृष्णा भागविण्याची विनंती करणारा इंग्रजी मजकूर लिहिणे, पुण्याला आलेल्या प्रिन्स ऑफ वेल्सपुढे आपणच काढलेल्या फ्री हायस्कूलमधील विद्यार्थ्यांच्या हाती सूचक इंग्रजी फलक देऊन उभे करणे, १८९५ मध्ये पुण्यात भरलेल्या राष्ट्रीय सभेच्या मंडपापुढे शेतकऱ्याचा पुतळा उभा करणे, अशा घटना वानगीदाखल सांगता येतील. नव्या प्रकारच्या गंजिफांचा खेळ, शेतकीची अवजारे अशा विविध क्षेत्रांत कृष्णरावांची कल्पनाशक्ती संचार करी. काही काळ त्यांनी कर्मवीर विठ्ठल रामजी शिंदे यांच्या डिप्रेस्ड क्लासेस मिशनमध्येही काम केले. त्यासाठी त्यांनी वऱ्हाडात अकोला येथे मुक्कामही ठोकला होता. 'दीनमित्र' पत्राचे पुनरुज्जीवन करण्याची त्यांची इच्छा त्यांचे पुत्र मुकुंदराव पाटील यांनी त्यांच्या पश्चात पूर्ण केली. इतकेच नव्हे तर ते पत्र प्रदीर्घ कालपर्यंत चालवूनही दाखवले.

अभंग, पवाडे, लावण्या असे विविध जनछंद भालेकरांनी लीलया पेलले आहेत. *बळिबा पाटील* या त्यांच्या कादंबरीचा उल्लेख याआधी आलेला आहेच. त्यांचे *शाळाधारा* हे छोटेखानी पुस्तक १९०८ मधील हस्तलिखितावरून पुढे १९२२ मध्ये रघुनाथराव बनकर यांनी प्रसिद्ध केले. त्यांच्या भाषणाचा व काही अप्रसिद्ध लेखनाचा समावेश प्रा. सीताराम रायकर यांनी 'कृष्णराव भालेकर समग्र वाङ्मय' या पुस्तकात केलेला आहे. भालेकरांच्या एकूण वाङ्मयाचा विचार करून त्यांचे 'पँफ्लेटिअर' असे त्यांनी वर्णन केले आहे ते यथायोग्य आहे.

सदानंद श्रीधर मोरे

संदर्भ : रायकर, सीताराम (सं.), 'कृष्णराव भालेकर समग्र वाङ्मय', महात्मा फुले समता प्रतिष्ठान प्रकाशन, पुणे–१९.

**भालेराव, श्रीधर गणेश** : ० भारद्वाज २ : (ज. ४ मे, १८९०, बीड, जि. पुणे–मृ. २७ नोव्हेंबर, १९४६, पुणे). भारतीय दर्शनग्रंथांचे विवेचक. शिक्षण पुण्यात. कृषिविषयाचे पदवीधर. संस्कृतचे अभ्यासक. १९१९ मध्ये ते सरकारी शेतकी खात्यात नोकरीस लागले व १९४५ मध्ये निवृत्त झाले.

भालेरावांनी शास्त्रीय परिभाषा, सुप्रजाजननविचार, वैदिक संस्कृती या विषयांची अभ्यासचर्चा व ग्रंथनिर्मिती करणारी मंडळी स्थापन केली. सुमारे पन्नास निबंधपुस्तिका आणि तीन ग्रंथ त्यांनी 'भारद्वाज' ह्या गोत्रनामाने रचले.

'जग हे मुळात निर्गुण ब्रह्मरूप असले तरी दृश्य पार्थिव सृष्टी मिथ्या नसून ती त्या निर्गुण ब्रह्माच्याची आविष्कार स्वरूपे होत. अनंत ब्रह्म आणि सान्त जग, अव्यय ब्रह्म आणि नश्वर सृष्टी ह्यांचे अस्तित्व एकाच स्थळी, एकाच काळी असून त्यांचा संबंध गर्भगर्भिणीसंबंधासारखा असतो' असे सूत्र भालेरावांच्या ग्रंथलेखनाच्या मुळाशी असून, स्वतःच्या मताला ते 'श्रौत मुक्ताद्वैतवेदान्त' म्हणतात. हेच सूत्र त्यांच्या 'वैयक्तिक अमरत्व', 'सुखदुःखविवेक' इ. निबंधांत तर स्पष्ट दिसतेच, पण 'आपोआपी अथवा सृष्टीमधील आत्मयमन' या वैज्ञानिक निबंधातही दिसते. *श्रीमद्भगवद्गीतेचे रचनान्तर* (१९३३), *आइनस्टाइनप्रणीत सापेक्षदर्शन* (१९३६), *पुनर्जन्म विरुद्ध पुनर्जनन* (१९३७) या त्यांच्या ग्रंथांतील विषय अनेक असले तरी विचार-धोरण एकच आहे.

*पुनर्जन्म विरुद्ध पुनर्जनन* हा ग्रंथ पूर्वखंड म्हणून प्रसिद्ध झाला. मरणानंतर व्यक्तीचे संपूर्ण विघटनच होते. म्हणून व्यक्तीला अमरत्व अथवा पुनर्जन्म नाही. परंतु व्यक्ती आपला वंश मागे ठेवते, जनन करते, ते पुनर्जनन मात्र सातत्याने चालते. अशा दृष्टीने पुनर्जन्म अथवा अमरत्व आहे. हे अमरत्व व्यक्तिगत नसून समष्टिगत होय, असा प्रस्तुत ग्रंथाचा विषय आहे.

*श्रीमद्भगवद्गीतेचे रचनान्तर* या ग्रंथात एक समावेशक समन्वयाचे धोरण आहे. गीतेतील योगात एखादे प्रमुख उद्दिष्ट नसून कर्मसंन्यास, कर्म व भक्ती या योगांचा परस्परसंबंध स्पष्ट नाही, हे स्पष्ट करण्यासाठी गीतेच्या श्लोकरचनांची पुनर्रचना केली पाहिजे, असे सांगून भालेरावांनी तसा प्रयत्न केला आहे.

*आइनस्टाइनप्रणीत सापेक्षदर्शन* हा ग्रंथ भालेरावांनी बर्ट्रंड रसेलकृत 'ए. बी. सी. ऑफ रिलेटिव्हिटी'ला अनुसरून लिहिला असून त्यात विज्ञानापेक्षा तत्त्वचर्चेकडे विशेष लक्ष दिलेले दिसते. मराठीमधील या विषयावरील हा पहिलाच ग्रंथ होय.

श्री. वि. गोखले, आरती कुसरे

० **भावगुप्त पद्म** : पहा पारखी, पांडुरंग गोविंदशास्त्री

**भावे, विनायक लक्ष्मण** : (ज. ६ नोव्हेंबर, १८७१, पळस्पे, जि. कुलाबा –मृ. १२ सप्टेंबर, १९२६, खडकी). प्राचीन मराठी साहित्याचे संशोधक व इतिहासकार, संपादक. बालपण, शिक्षण व वास्तव्य ठाणे येथे. शाळेत 'काव्येतिहाससंग्रह'कर्ते जनार्दन बाळाजी मोडक ह्या विद्याव्यासंगी शिक्षकामुळे प्राचीन कवितेची गोडी निर्माण झाली. जुन्या कवींच्या कवितेचे वाचन आणि जुन्या मराठी पुस्तकांचा संग्रह करण्याची आवड. ह्यातूनच ठाणे येथे काही मित्रांच्या सहकार्याने 'मराठी ग्रंथसंग्रहालया'ची स्थापना (१८९३). १८९५ साली बी.एस्सी.

वि. ल. भावे यांचा पहिला वाङ्मयेतिहासविषयक निबंध *महाराष्ट्र सारस्वत* हा. तो 'ग्रंथमाला' मासिकातून १८९८-९९ साली प्रसिद्ध झाला. ९८ पृष्ठांच्या या निबंधात पेशवाई अखेरपर्यंतचा मराठी वाङ्मयाचा इतिहास त्रोटकपणे सांगितला आहे. त्यांच्या प्रस्तावनेत

भाव्यांनी लिहिले होते, "हा निबंध लिहिण्यापूर्वी आपल्या कवींसंबंधी कालानुक्रमाने माहिती सांगणारे एका 'कविचरित्रा'खेरीज दुसरे साधन असल्याचे माहीत नव्हते. त्यातील माहितीही पुष्कळ ठिकाणी चुकीची आहेसे वाटते. करिता, पुन्हा माहिती मिळवून एक लहानसा निबंध लिहावा असे मनात आणिले."

त्यांनी १९०३ साली *महाराष्ट्र कवि* हे मासिक काढले. त्यातून दासोपंतांच्या 'गीतार्णवा'चे काही अध्याय, सामराजाचे 'रुक्मिणी-हरण', नागेशाचे 'सीतास्वयंवर' यासारखे त्यांनी संशोधिलेले काही जुने मराठी ग्रंथ प्रसिद्ध झाले. १९०७ साली *महाराष्ट्र कवि* बंद पडले. ह्याच काळात त्यांच्या हाती महानुभाव ग्रंथांचे बाड आले. पण ते ग्रंथ सांकेतिक लिपीत असल्याने परिश्रमपूर्वक संकेताची किल्ली महानुभाव महंतांच्याकडून युक्तिप्रयुक्तीने हस्तगत केली. मग सांकेतिक लिपीतील पोथ्या चालू लिपीत त्यांनी उतरून घेतल्या. *महाराष्ट्र सारस्वताच्या* द्वितीय आवृत्तीत (१९१९) त्यांनी महानुभाव पंथ आणि त्याचे वाङ्मय यांचा परिचय करून दिला व 'सकळ' आणि 'सुंदरी' ह्या महानुभावीय गुप्त लिप्यांचे संकेतही उलगडून दाखविले. याशिवाय महानुभाव महंतांच्या मदतीने त्यांनी १९२४मध्ये *महानुभावीय महाराष्ट्र ग्रंथावली–कविकाव्यसूची* प्रसिद्ध करून अभ्यासकांची सोय केली. तद्वतच *वच्छाहरण* (१९२४) व *शिशुपालवध* (१९२६) ही दोन महानुभावीय काव्ये प्रसिद्ध केली.

*महाराष्ट्र सारस्वत* हा भावे यांचा सर्वाधिक महत्त्वाचा ग्रंथ. भावे यांच्या तीन तपांच्या परिश्रमांचे परिपक्व फळ म्हणजे हा ग्रंथ. ह्या ग्रंथात प्राचीन मराठी वाङ्मयाचा इतिहास तर आहेच, पण त्यात महाराष्ट्राचा धार्मिक व सांस्कृतिक इतिहासही अप्रत्यक्षपणे आला आहे. मराठ्यांची कविता व मराठ्यांचा इतिहास हे दोन्ही विषय वि. ल. भावे यांच्या आवडीचे होते. म्हणूनच भाव्यांनी ऐतिहासिक कागदपत्रांच्या प्रकाशनासाठी 'मराठी दप्तर' नावाची संस्था काढली. या संस्थेतर्फे त्यांनी दोन 'रुमाल' प्रसिद्ध केले. पहिला रुमाल : *श्रीमंत महाराज भोसले यांची बखर* (१९१७) व दुसरा रुमाल : *सरदार गोखले यांची कैफियत* (१९२२). त्यांनी संपादित केलेला तिसरा रुमाल त्यांच्या पश्चात सरदेसाईंनी प्रसिद्ध केला. याशिवाय त्यांनी अज्ञानदासाचा *अफझलखानाचा पोवाडा* १९२४ साली संपादित करून त्यातील ऐतिहासिक प्रसंगावर *श्री शिवाजी महाराजांचा पहिला पराक्रम* हा ५३ पृष्ठांचा निबंधही लिहून प्रसिद्ध केला.

भावे यांचा आणखी एक महत्त्वाचा ग्रंथ म्हणजे *चक्रवर्ती नेपोलियन* (१९२१-२२). नेपोलियनविषयक अनेक ग्रंथ अभ्यासून त्यांनी हे चरित्र लिहिले. याशिवाय आणखी एक ग्रंथ–*तुकारामबोवांचा अस्सल गाथा* (भाग १ ला, १९१९; भाग २ रा, १९२०) हा त्यांनी संताजी जगनाडे यांच्या वह्यांवरून छापून काढला. असे विविध प्रकारचे साहित्य लिहूनही भाव्यांचे स्मरण महाराष्ट्राला राहील ते मुख्यतः *महाराष्ट्र सारस्वत*कार व *चक्रवर्ती नेपोलियन*चे चरित्रकार या नात्याने.

शं. गो. तुळपुळे, म. ना. लोही

**भावे, विष्णुदास अमृत** : (ज. १८१९ – मृ. ९ ऑगस्ट, १९०१). मराठी रंगभूमीचे जनक. विष्णुदास हे श्रीमंत सांगलीकरांच्या सैन्यातील एक सुभेदार, अमृतराव यांचे धाकटे चिरंजीव. सांगलीचे अधिपती श्रीमंत चिंतामणराव ऊर्फ अप्पासाहेब पटवर्धन यांच्या नोकरीत विष्णुदास होते. कुशाग्र बुद्धीच्या, कल्पक नि हरहुन्नरी विष्णुदासांना कथा-कविता लिहिण्याचा छंद होता. त्याखेरीज शाडूच्या मातीची चित्रे करणे, कळसूत्री बाहुल्या तयार करणे, पौराणिक प्रसंगांची चित्रे काढणे वगैरे कलांत ते प्रवीण होते. इ. स. १८४२ मध्ये कर्नाटक प्रांतातील कानडी 'भागवत' नाटके करणारी एक मंडळी सांगली मुक्कामी आली. तिचे खेळ पाहून श्रीमंत अप्पासाहेबांनी तशा प्रकारची नाटके, त्यांतील दोष वगळून मराठीत निर्माण करण्याची इच्छा विष्णुदासांजवळ व्यक्त केली व या कामी सर्वतोपरी साहाय्य करण्याची तयारी दर्शविली. त्यानुसार विष्णुदासांनी कोणत्याही या प्रकारच्या परंपरेचे पाठबळ नसताना केवळ अंगभूत गुणांच्या आधारे १८४३ मध्ये *सीतास्वयंवर* नावाचे नाटक लिहिले आणि त्याचा यशस्वी प्रयोग करून मराठी नाट्यसृष्टीत एक नवे मन्वंतर सुरू केले. १८४३ ते १८६२ हा विष्णुदासांच्या नाट्यकर्तृत्वाचा कालखंड. *सीतास्वयंवर* या नाटकानंतर दहा–बारा रामावतारी खेळ लिहून ते त्यांनी सांगली संस्थानात श्रीमंतांपुढे प्रस्तुत केले. सूत्रधाराचे मंगलाचरण, सूत्रधार-विदूषक संवाद, गणपती-सरस्वतीचे स्तवन व त्यांचा प्रवेश, अशा दशावतारी थाटात विष्णुदासांच्या नाटकांचा आरंभ होत असे. रामायणातील विषयाप्रमाणेच महाभारतातील कथानकांवरही त्यांनी नाटके लिहिली आणि ती लोकप्रिय करून दाखविली. भाव्यांची पद्ये मराठी आख्यान रचनेशी अधिक जवळ आहेत. विष्णुदासांनी लिहिलेल्या गद्यभागाचे मुद्रण झाले नसले तरी त्यांची पन्नासांहून अधिक नाट्याख्याने *नाट्यकवितासंग्रह* (१८८५) ह्या नावाने प्रसिद्ध झालेली आहेत.

विष्णुदासांच्या नाटकांची आख्याने बहुतांशी पद्यात्मकच आहेत. नाटकातील संवाद स्वयंस्फूर्त असत. त्यांचे लेखन केलेले असे. सर्व पात्रांची पदे म्हणण्याचे कार्य एकट्या सूत्रधाराकडे असे. नाट्यकवितासंग्रहातील अनेक पदांवर रागनिर्देश केलेला आहे. यावरून रागदारी संगीताचा पहिल्यापासूनच रंगभूमीवर प्रवेश झाल्याचे अनुमान करता येते. विष्णुदासांनी कानडी नाटकातील नृत्याचा भाग कमी केला. विष्णुदासी-नाटकांतील संवाद आधीपासून योजून ते पात्रांकडून बसवून घेत असत. ही गोष्ट प्रयोगतंत्राच्या दृष्टीने महत्त्वाचीच मानावी लागेल. नाटकांतील कथावस्तूची निरनिराळ्या भागांत किंवा 'कचेऱ्यां'त केलेली विभागणी विष्णूदासांनी केली. या कचेऱ्या म्हणजे अंकप्रवेशांचे पूर्वरूप होय. विष्णुदासांनी पूर्वीच्या कानडी नाटकात नसलेला 'गणपती-सरस्वती'चा प्रवेश आपल्या नाटकात घातला. पेशवाईच्या अंताबरोबरच मृतप्राय झालेल्या समाजप्रवाहात लोकनाट्य प्रकारांपेक्षा (ललिते, दशावतारी खेळ, तमाशे) अधिक सुव्यवस्थित, संपूर्ण व सुसंकृत प्रेक्षकांच्या अभिरुचीस मानवणारा असा नाटकाचा नमुना तयार केला. स्वतःची स्वतंत्र नाट्यसंघटना स्थापन करून ती सतत वीस वर्षे चालवली आणि महाराष्ट्रभर आपल्या नाटकांचा प्रसार करून सामान्य जनतेत उच्च दर्जाच्या नाटकाबद्दल अभिरुची तर निर्माण केलीच, पण त्याचबरोबर किर्लोस्करांच्या पुढील कालातील संगीत रंगभूमीची पार्श्वभूमी तयार करून दिली. मराठी नाट्यसृष्टीला त्यांनी दिलेल्या योगदानाबद्दल कृतज्ञता म्हणून आपण सांगली ही 'नाट्यपंढरी' मानतो व ज्या साली विष्णुदासांनी आपले पहिले नाटक सादर केले (१८४३) ते साल मराठी रंगभूमीचे जन्मवर्ष म्हणून समजतो. अशा या रंगभूमीच्या जनकाचे सांगली येथे ९ ऑगस्ट, १९०१ रोजी प्लेगने निधन झाले.

कमलेश

संदर्भ : (१) 'भारतीय नाट्यप्रयोग विज्ञान'–अ. म. जोशी, पुणे, १९६५. (२) 'मराठी वाङ्मयाचा इतिहास'–खंड ४ था, संपा. रा. श्री. जोग, पुणे, १९६५. (३) 'मराठी नाट्यकार आणि नाट्यवाङ्मय', बनहट्टी, श्री. ना., पुणे, १९५९. (४) 'आद्य महाराष्ट्र नाटककार' विष्णुदास–विष्णु अमृत भावे यांचे चरित्र', भावे, वा. ग., सांगली, १९४३.

**भिडे, बाळकृष्ण अनंत** : (ज. १८७४ – मृ. २ मे, १९२९). इतिहासकार, कवी व समीक्षक. मूळ गाव किडीम (ता. अलिबाग, जि. रत्नागिरी). प्राथमिक शिक्षण सातारा, माध्यमिक व उच्च शिक्षण

मुंबई येथे. बी.ए. (१९१८), १८९४ ते १८९६ पर्यंत 'प्रभाकर' दैनिकाचे संचालन. दापोली येथे शिक्षक व मुरुड-जंजिरा येथे सर एस्. ए. हायस्कूलचे मुख्याध्यापक. 'काव्येतिहास' (१९०८ ते १९११) आणि 'खेळगडी' मासिकाचे संपादक. ठाणे येथील मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या वार्षिकोत्सवाचे अध्यक्ष (१९२४). भिडे यांचे संस्कृत, इंग्रजी व मराठी भाषेवर सारखेच प्रभुत्व होते. एक परखड टीकाकार म्हणून प्रसिद्ध. 'प्रणयपंढरीचे वारकरी' ही त्यांनी माधव जूलियनांना उपहासाने दिलेली पदवी. रविकिरण मंडळातील कवींच्या काव्यातील भावनातरलत्व व प्रणय त्यांना प्रथमप्रथम आवडत नव्हता. नंतर मात्र त्यांनी त्या कवितेचे मोकळेपणाने कौतुकही केलेले आहे. प्रतिपक्षाची भूमिका ते समजून घेत. पण स्वतःला पटलेल्या सत्याच्या समर्थनार्थ झुंजत असताना ते व्यक्तीची भीड, प्रतिष्ठा ठेवीत नसत. त्यांच्या चिकित्सक, मार्मिक व व्यासंगपूर्ण टीकात्मक लेखांमुळे मराठी समीक्षा डौलदार, प्रौढ व प्रभावी बनण्यास साह्य झाले.

'श्री सरस्वतीमंदिर', 'मासिक मनोरंजन', 'विविधज्ञानविस्तार', 'काव्यरत्नावली', 'रत्नाकर' यांसारख्या दर्जेदार नियतकालिकांतून त्यांचे गद्यपद्य लेखन प्रकाशित झाले. त्यांचे बरेच गद्यलेखन 'बी' या टोपण नावाने प्रसिद्ध झाले आहे. *प्रभुप्रसादन* (१९०७) आणि *फुलांचे झेले* (१९०८) अथवा स्फुट *काव्यसंग्रह* ही त्यांची कवितांची दोन पुस्तके. सर्व मिळून त्यांच्या उपलब्ध कविता १०८ आहेत. त्यांच्या कवितेने एकीकडे पंडिती वळण उचलले आहे, तर दुसरीकडे आधुनिक इंग्रजी वळणही पत्करण्याचा तिचा प्रयत्न दिसतो. त्यांचे 'मराठी कवींचे बोल' (१९०७) हे एक कवितेचे संपादित पुस्तकही प्रसिद्ध आहे. वामन, मुक्तेश्वर, तुकाराम, मोरोपंत यांच्यावरील त्यांचे स्वतंत्र, विस्तृत, विवेचक निबंध प्रसिद्ध आहेत. 'केकावली'वर त्यांनी टीकाटिप्पणी केली आहे. 'ज्ञानेश्वरी'चे संपादनही केले आहे. 'प्राचीन व अर्वाचीन मराठी कवी' यांचा तौलनिक अभ्यासही त्यांनी एका निबंधात केला आहे. १९०४ ते १९०९ या काळात त्यांनी 'काव्यसंग्रह' या मासिकाचे संपादन केले. जुन्या आणि नव्या साहित्य-दृष्टींचा, संशोधन आणि समीक्षा यांचा संयोग त्यात आढळतो. मोरोपंतकृत महाभारताचे शांतिपर्व, अनुशासनपर्व, अश्वमेधपर्व, आश्रमवासिकपर्व, मोसलपर्व, महाप्रास्थानिकपर्व व स्वर्गारोहणपर्व यांचे त्यांनी संपादन केले. अर्थनिर्णायक व विपुल टीपा, माहितीपूर्ण विवेचक प्रस्तावना, वेगवेगळी उपयुक्त परिशिष्टे यांची भरपूर जोड देऊन त्यांनी या आवृत्त्या सिद्ध केल्या. साहित्य गुणांना प्राधान्य देऊन ज्ञानेश्वरीची सार्थ व सटीप आवृत्ती त्यांनी संपादिली. प्राचीन काव्यांच्या अनेक संपादित आवृत्त्या त्यांनी काढल्या. महाराष्ट्र साहित्य परिषदेने त्यांच्याकडे 'मराठी भाषेचा आणि वाङ्मयाचा इतिहास' लिहिण्याचे काम सोपविले होते. पण ते अपुरे राहिलेले असतानाच त्यांचे निधन झाले. *चार वीर मुत्सद्दी* (१९२८) या पुस्तकात ऑलिव्हर क्रॉम्वेल, शिवाजी, जॉर्ज वॉशिंग्टन व नेपोलियन बोनापार्ट यांची चरित्रे आहेत. त्यांचे स्फुट लेखनही विपुल आहे. त्यांचे 'काव्य व काव्योदय', 'श्री तुकाराम चरित्र', 'किरण', 'सुधारक', 'आधुनिक कविपंचक', 'विरहतरंग' वगैरे पुस्तकांवरील परीक्षण लेख अत्यंत मार्मिक व चिकित्सक आहेत. त्या अनुषंगाने त्यांनी महत्त्वाचे वाङ्मयीन प्रश्न उपस्थित करून त्यांची चर्चा आणि विवेचन केलेले आहे.

अर्वाचीन काव्याचा जन्म व विकास होत असताना त्यांनी त्याची समर्थपणे पाठराखण केली व त्याला तात्त्विक अधिष्ठान प्राप्त करून दिले.

सु. रा. चुनेकर, के. ए. पोतदार

**भिडे, माधव गोविंद :** (ज. १८८८–मृ. १९३८). कवी आणि लेखक. वास्तव्य पुण्यास. काही काळ 'मुमुक्षु'चे संपादक. ह्यांची काही स्फुट कविता 'काव्यरत्नावली' व 'मुमुक्षु' या मासिकांतून प्रसिद्ध झाली आहे. 'अभिनव काव्यमाला', भाग चौथा (१९२३) मध्ये यांच्या तेरा कविता समाविष्ट आहेत. *मननामोद भाग १* (१९२०) आणि *भाग २* (१९२१) हे वैचारिक लेखांचे संग्रह. नारायणमहाराज जालवणकरांच्या 'आनंदसागर' (१९३७) व 'शांतिसागर' (१९३८), त्याचप्रमाणे शिवरामस्वामी कल्याणकरांच्या 'भगवद्गीता चंद्रिका' या काव्यग्रंथांचे संपादन यांनी केले असून *साधुश्रेष्ठ तुकोबा ह्यांचे श्लोकचरित्र*ही (१९३८) यांनी लिहिले आहे.

उषा टाकळकर, मीनल मिसळ

**भिडे, रामकृष्ण गोपाळ :** ०अभिराग, ०महाराष्ट्रीय : (ज. ३० डिसेंबर, १८८६, वाई, जि. सातारा – मृ. ८ नोव्हेंबर, १९७६). चरित्रलेखक. सरकारी नोकरी सोडून लो. टिळकांच्या होमरूलचे प्रचारक झाले. 'केसरी'च्या संपादक मंडळात १९२० पासून १९५१ पर्यंत काम केले. हिंदुसभेच्या संघटनाकार्यात सहभागी.

'केसरी'च्या नित्याच्या लिखाणाखेरीज लोकशिक्षण व लोकजागृती करण्याच्या उद्देशाने यांनी अनेक पुस्तके लिहिली. *निकोलाय लेनिन* (१९२२), *नेताजी सुभाषचंद्र बोस* (१९२९), *पं. जवाहरलाल नेहरू* (१९३०), *भारतभूषण मालवीय* (१९३१), *महादजी शिंदे*, *झाशीची स्वातंत्र्यलक्ष्मी* (१९४७), *विठ्ठलभाई पटेल*, *लाला लजपतराय*, *भारतसेवक गोखले*, *स्वराज्यमंत्रद्रष्टे दादाभाई नौरोजी* ह्या देशभक्तांची भिडे ह्यांनी लिहिलेली चरित्रे, त्याचप्रमाणे *चंद्रगुप्त*, *अशोक*, *हर्ष*, *सातवाहन* या प्राचीन ऐतिहासिक पुरुषांची चरित्रे प्रसिद्ध आहेत. *भारतभ्रमण* (१९४४) हे त्यांचे कराची ते आसाम व कुरूक्षेत्र ते कन्याकुमारी अशा चारही दिशांच्या काही ठळक स्थळांचे वर्णन करणारे पुस्तक. विजयनगरचा व हिंदुसभेचा इतिहासही त्यांनी लिहिला आहे.

पां. बा. गाडगीळ, रा. बा. बखी

**भिडे, विद्याधर वामन :** (ज. १८६०–मृ. १९३६). काव्य तसेच कोशरचना असे संमिश्र कर्तृत्व. *राघवीय परीवाह*, *जीवनजागृती*, *मंदारमंजरी*, *काव्यकुसुमावली* हे काव्यसंग्रह. *राघवीय परीवाह* (१९०८) ही काव्यरूप रामकथा आहे. शुद्ध व उच्च नीतिमत्तेचा आदर्श उभा करणे, हा यामागील उद्देश. *जीवनजागृती* (१९१३) यात स्वयंस्फूर्तीने निर्माण झालेली कविता आणि संकल्पपूर्वक रचलेली कविता यांचे मिश्रण आहे. *मंदारमंजरी* (१९२६) हा अठ्ठावीस कवितांचा संग्रह आहे. ही सर्व पद्ये संस्कृतप्रचुर, पौराणिक कथांवर आधारित नीतिबोधयुक्त अशी आहेत.

वि. वा. भिडे तसेच गोविंद वासुदेव कानिटकर व लक्ष्मण गणेशशास्त्री लेले या तिघांनी 'शारदामंडळा'ची स्थापना १९०९ मध्ये केली. आधुनिक पद्यात्मक वाङ्मय लहानलहान पुस्तकांच्याद्वारे संग्रहित करावे म्हणून त्यांनी हे मंडळ काढले.

याखेरीज *मराठी भाषेचे वाक्प्रचार, म्हणी, रसादि* (१९१०), *मराठी भाषेचा सरस्वती कोश*, भाग १–२ (१९३०), *अर्थालंकारांचे निरूपण* (१९२३), *साहित्यकौमुदी* (१९३२) हे यांचे ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

विजया देव

संदर्भ : 'मराठी ग्रंथ सूचि' (१८००–१९३७), संपादक–शं. ग. दाते, पुणे, १९४३.

**भिडे, विष्णु गोपाळ :** (ज. १८३०, भोर, जि. पुणे – मृ. १८७०, कोंढूर). इतिहासकार. हे भोर संस्थानात मामलेदाराच्या जागेपर्यंत चढले. पुण्यात लोकहितवादी, वि. मो. भिडे प्रभृतींच्या बरोबर 'विचारवंतो मंडळी' स्थापन करण्यात त्यांचा पुढाकार होता.

*सातारचे श्रीमंत छत्रपती शिवाजीमहाराज यांचे वंशाच्या व प्रतिनिधी आणि अष्टप्रधान यांचा इतिहास* (१८६६) हा त्यांचा इतिहासग्रंथ. हा ग्रंथ लिहिण्यासाठी त्यांनी अनेक हस्तलिखिते, बखरी, कैफियती, याद्या, हकिकती परिश्रमपूर्वक गोळा करून अभ्यासिल्या व त्या आधारे परंपरागत बखरींच्या भाषेत या ग्रंथाचे लेखन केले. इतिहासाविषयी विशेष आस्था नसलेल्या काळात त्यांचा हा उपक्रम कालदृष्ट्या महत्त्वाचा ठरतो.

हरिश्चंद्र थोरात, के. ए. पोतदार

**भिडे, सदाशिव मोरेश्वर** : (ज. २७ ऑगस्ट, १८५९ – मृ. ४ फेब्रुवारी, १८९९). कवी व स्थलवर्णनकार. सहा इयत्तांपर्यंतचे शिक्षण तासगाव (जि. सांगली) येथे व नंतरचे शिक्षण कोल्हापुरात. व्यवसाय शिक्षकाचा.

ह्यांची कविता प्रामुख्याने 'काव्यरत्नावली'त व क्वचित 'निबंधचंद्रिका', 'शालापत्रक' ह्या मासिकांतून प्रसिद्ध झाली. मराठ्यांच्या इतिहासावरील *बाजीराव* (काव्यरत्नावली, वर्ष, ६, ९, १०, ११) हे सात सर्गांचे खंडकाव्य व *दिल्लीश गर्वहरण*, *राजा शिवाजी* इत्यादी स्फुटकाव्ये प्रसिद्ध आहेत. कवी लोलिंबराजाच्या संस्कृत 'हरिविलासा'चे *हरिविलास* (काव्य. वर्ष, १, ३, ४, ९) हे भाषांतर, *इतिहासोपदेशशतक* (१८९७), *स्वदेशस्थितिकाव्य*, *दत्तस्तव* ही यांची अन्य काव्यरचना. वृत्तबद्ध व परंपरानिष्ठ अशी ही कविता आहे. *श्रीब्रसिंहवाडीचा इतिहास व वर्णन* (१८९१) व *लहान मुलांकरिता नीतिपर गोष्टी* (१८९३) ही यांची गद्य पुस्तकेही प्रसिद्ध आहेत. 'काव्यसंग्रहा'त प्रसिद्ध झालेली अलंकारविषयक माहितीही ह्यांनीच दिलेली आहे.

उषा टाकळकर, मीनल निसळ

**भिडे, सदाशिवशास्त्री गोपाळ** : (ज. ५ डिसेंबर, १८७६, सांगली – मृ. ९ डिसेंबर, १९३९). गीता भाष्यकार व उपनिषदांचे भाषांतरकार. वयाच्या पाचव्या वर्षी देवी आल्याने अंधत्व प्राप्त. तरीही दुसऱ्यांकडून ग्रंथ घेऊन त्यांनी संस्कृत भाषेचा व हरिपूर व इचलकरंजी येथे 'न्याय' व 'वेदान्त' या शास्त्रांचा अभ्यास केला.

यांनी तासगाव येथे संस्कृत पाठशाळा काढून ती बारा वर्षे चालविली. यांनी गीतेवर विस्तृत विवरणात्मक टीका लिहून ती *श्रीमद्‌भगवद्‌गीतार्थ रहस्यदीपिका* (१९२१, १९२८) या नावाने प्रसिद्ध केली. यांनी *उपनिषद्‌रत्न प्रकाश* नावाने ऋग्वेदापासून अथर्ववेदापर्यंतच्या दहा उपनिषदांचे मराठीत भाषांतर केले आहे (रत्ने १ ते १० : १९२९ ते १९३२). त्यांचे हे कार्य लक्षात घेऊन शंकराचार्य डॉ. कुर्तकोटी यांनी यांना 'गीतावाचस्पति' ही पदवी देऊन त्यांचा सन्मान केला.

उषा टाकळकर, के. ए. पोतदार

**भिडे, सरस्वतीबाई विद्याधर** : (ज. १८७२ – मृ. २३ मार्च, १९२७). विद्याधर वामन भिडे यांच्या पत्नी. 'शारदा प्रसादन मंडळा'ने अभिनव काव्यमालेचे पाच भाग प्रसिद्ध केले. त्यातील पाचव्या भागाच्या या संपादिका. हा आधुनिक कवयित्रींच्या काव्याचा पहिलाच संग्रह असल्यामुळे ऐतिहासिकदृष्ट्या महत्त्वाचा. याखेरीज 'मा ओ मेये' या दामोदर मुखोपाध्यायकृत बंगाली उपन्यासावरून यांनी *सरोजिनी* ही कादंबरी लिहिली (१९०९). 'चंपूबाई' इ. या वि. बा. भिडे अकरा गोष्टींच्या संग्रहात सौ. सरस्वती बाई भिडेकृत *भाऊबिजेची ओवाळणी* ही एक कथा आहे (१९२७).

संदर्भ : (१) 'अभिनव काव्यमाला, भा. ५', नवीन किताबखाना, पुणे, १९२२. (२) 'मराठी ग्रंथसूचि (१८००-१९३७)', संपा. शं. ग. दाते, पुणे, १९४३.

उषा टाकळकर, मीनल निसळ, विजया देव

**भुस्कुटे, विनायक महादेव** : (ज. १८८९, जमखिंडी, कर्नाटक – मृ. २२ एप्रिल, १९५४, मुंबई). कथालेखक, मार्क्सवादाचे विवेचक अभ्यासक, चरित्रकार व अनुवादक. प्राथमिक व माध्यमिक शिक्षण जमखिंडी, बार्शी व विजापूर येथे. १९१३ साली 'केसरी' कचेरीत वार्ताहर. लो. टिळकांचे लेखनिक. 'लोकसंग्रह' आणि 'स्वराज्य' साप्ताहिकांत कार्यकारी संपादक.

*मायबापाची करुण कहाणी* (कादंबरी, १९२३), *कार्ल मार्क्स* (चरित्र आणि शिकवण, १९३४), *लेनिन* (चरित्र आणि शिकवण, १९३८), *अभिनव चीनचा जनक डॉ. सन्यत् सेन* (चरित्र, १९४६), *आधुनिक चीन* (१९४७), *दासु* (कादंबरी, १९४६), *जोसेफ स्टालिन* (चरित्र आणि विचार, १९४९) आदी ग्रंथ प्रसिद्ध. डॉ. पट्टाभी सीतारामय्यालिखित काँग्रेसच्या अधिकृत इतिहासग्रंथाचा प्रा. निरंतर यांच्या सहकार्याने त्यांनी अनुवाद केला (१९३५). *दारिद्र्याचा गुन्हा* (हेन्री जॉर्जकृत पुस्तकाचा अनुवाद, १९३५), लेनिनच्या *स्टेट ॲण्ड रेव्होल्युशन*चा अनुवाद (१९४९), मॅक्सीम गॉर्की यांच्या *आई* (१९४५) या कादंबरीचा अनुवाद. *रशियन शेतकरी* (१९५८), *मुळशी सत्याग्रह* (१९६८), *साम्यवाद* (१९७५) याशिवाय *काश्मीर आणि शेख अब्दुल्ला*, *सदाशिवराव भाऊ* (१९४५) ही यांची आणखी काही पुस्तके. *विष्णुशास्त्री चिपळूणकर* यांचे चरित्र, *टॉलस्टॉयची नाटके* यासारखे यांचे काही स्फुट लेखनही प्रसिद्ध आहे.

कम्युनिस्ट कार्यकर्ते म्हणून दीर्घकाळ कारावास भोगावा लागला व त्या कारावासाच्या काळात त्यांनी विपुल लेखन केले. जगप्रसिद्ध कम्युनिस्ट क्रांतिकारक व नेते आणि त्यांची कामगिरी यांचा सुबोध परिचय त्यांनी प्रथम मराठी वाचकांस करून दिला. दलित आणि श्रमिक शेतकऱ्यांच्या जीवनावर कादंबरी लिहिण्याचा उपक्रमही त्यांनीच प्रथम केला.

प्रभाकर वैद्य, के. ए. पोतदार

**भोपटकर, भास्करराव बळवंत** : ० भालाकार भोपटकर : (ज. सप्टेंबर, १८७४, ठाणे – मृ. २७ डिसेंबर, १९४८, पुणे). शिक्षण बी.ए., एलएल्.बी. 'भाला' या साप्ताहिकाचे संपादक. ल. ब. भोपटकरांचे ज्येष्ठ बंधू.

हिंदुधर्माचा जाज्वल्य अभिमान असलेल्या 'भाला'कार भोपटकरांनी 'हिंदूसंघटन आणि बलोपासना' हा उद्देश समोर ठेवून 'भाला' हे साप्ताहिक सुरू केले (१९१०). 'धर्मासाठी मरावे । मरोनी अवघ्यास मारावे । मारता मारता घ्यावे । राज्य आपुले ।।' हे समर्थांचे वचन प्रस्तुत पत्राच्या शिरोभागी असे. १९०५ ते १९१० व १९२५ ते १९३५ अशी पंधरा वर्षे त्यांनी या पत्रातून लेखन केले. सरकारी दडपशाहीमुळे यांना हे पत्र १९१० मध्ये बंद करावे लागले. महात्मा गांधींच्या उदयानंतर टिळकांच्या मतांशी निष्ठा असलेल्या भालाकारांनी १९२५ पासून हे पत्र पुन्हा सुरू केले. 'भाला'मधून प्रसिद्ध झालेल्या त्यांच्या लेखांचे दोन संग्रह प्रथम *भाल्याच्या फेकी* (१९०८) या नावाने प्रसिद्ध झाले. ते दुर्मिळ झाल्यामुळे 'भाल्याची फेक' (१९७८) या नावाने त्यांच्या निवडक लेखांचा संग्रह श्री. पु. गोखले यांनी प्रसिद्ध केला. आपल्या लेखांतून यांनी त्यांच्या धर्मप्रेमाच्या विरोधात असणाऱ्यावर सडकून टीका केली आहे. गांधी, आंबेडकर ह्यांच्याप्रमाणेच वि. दा. सावरकर आणि स्वतःचे कनिष्ठ बंधू ल. ब. भोपटकर हेही यांच्या टीकेचे विषय झाले आहेत. यांच्या वैशिष्ट्यपूर्ण शैलीमुळे 'केसरी', 'मराठा', 'काळ' यांसारख्या समकालीन प्रतिष्ठित पत्रांच्या वातावरणातही 'भाला'ने स्वतःचे स्थान निर्माण केले. भोपटकरांचा विनोद बोचक, उपहास-उपरोधपूर्ण

पण उमदा असे. स्वतःला टिळकांचे 'पट्ट आणि मट्ट' शिष्य म्हणविणारे 'भाला'कार प्रतिपक्षीयांप्रमाणेच स्वतःलाही विनोदाचे लक्ष्य बनवीत. त्यांच्या लेखनातून विनोदाबरोबरच पक्षपातीपणा आणि ओजस्वीपणा प्रगट झालेला दिसतो.

हरिश्चंद्र थोरात, के. ए. पोतदार

**भोपटकर, लक्ष्मण बळवंत ऊर्फ अण्णासाहेब** : (ज. १० मे, १८८० – मृ. २४ एप्रिल, १९६०). ग्रंथकार व पत्रकार. शिक्षण एम्.ए. (तत्त्वज्ञान, १९०४), एल्एल्.बी. (१९०७). वकिलीचा व्यवसाय.

वडील बंधु भास्कर बळवंत भोपटकर तुरुंगात गेल्यावर त्यांच्या 'भाला' पत्राचे लक्ष्मण बळवंत हे संपादक झाले. लाला लजपतराय यांच्या 'माझ्या हद्दपारीची कहाणी' (१९०८) या पुस्तकाचा तसेच बिपिनचंद्र पाल यांच्या व्याख्यानांचा अनुवाद त्यांनी पुस्तकरूपाने प्रसिद्ध केला. पण ही दोन्ही पुस्तके इंग्रज सरकारने जप्त केली. १९१४ साली टिळक सुटून आल्यावर त्यांच्या चळवळीत भोपटकर सामील झाले. असहकार चळवळीच्या आरंभी 'लोकसंग्रह' या दैनिकाचे संपादक असताना त्यांनी गांधींच्या राजकारणास निकराने विरोध केला. हैदराबादच्या निझामशाही विरोधी भागानगर सत्याग्रहात भाग घेऊन तुरुंगवास भोगला (१९३९). ते हिंदुसभेचे पुढारी होते.

व्यायाम व खेळ यावर *कुस्ती* (१९३१), *माझी व्यायाम पद्धती* (१९३०), *दांडपट्टा* (१९३३) व *स्त्रियांचे व्यायाम* (१९३२) अशी चार पुस्तके त्यांनी लिहिली. *कॉंग्रेस व कायदेमंडळे* (१९२३), *स्वराज्याची मीमांसा* (१९१७) व *हिंदू समाजदर्शन* (संपादन, १९३३) ही त्यांची राजकीय विषयांवरील पुस्तके. *नवरत्नांचा हार* (१९२३) या पुस्तकात मराठी वीरांच्या शौर्यकथा असून *मृत्यूच्या मांडीवर* (१९३१) ही वीर व करुण रसयुक्त कादंबरी उल्लेखनीय आहे. कायदा व व्यायाम यावर इंग्रजीतही त्यांनी अनेक पुस्तके लिहिली आहेत.

पां. वा. गाडगीळ, के. ए. पोतदार, मृणालिनी शहा

**भोसेकर, लक्ष्मण पांडुरंग** : (ज. २७ ऑक्टोबर, १८५१, भोसे, जि. सातारा – मृ. १९ जानेवारी, १९२१, रत्नागिरी). कवी. शालेय शिक्षण सातारा आणि कोल्हापूर येथे. इंजिनियरिंग कॉलेजमधील अभ्यासक्रम पूर्ण केला. इंजिनियरिंग खात्यात नोकरी.

त्यांची स्फुटकविता 'काव्यरत्नावली', 'चित्रमयजगत' ह्या नियतकालिकांतून व 'अभिनवकाव्यमाला' (भाग २), 'काव्यकामोद' इत्यादी काव्यग्रंथांतून प्रसिद्ध झाली आहे. कविवर्य रे. ना. वा. टिळक ह्यांच्या प्रोत्साहनाने *मुरली विलाप* (१९०९) हे रूपककाव्य त्यांनी स्वतंत्रपणे प्रसिद्ध केले. त्यानंतर *भामाभ्रमपरिहार* (१९१४) व *गंधर्वराज पुष्पदंत विरचित शिवमहिम्न स्तोत्र-समश्लोकी* (१९१४) ह्या त्यांच्या काव्यकृती प्रसिद्ध झाल्या. लो. टिळकांच्या मृत्यूच्या निमित्ताने रचलेले *स्मशानयात्रा विरहविलाप* हे लहानसे काव्यही उल्लेखनीय आहे. टिळकचरित्राचे रहस्य वर्णन करणारे हे काव्य त्या काळी बरेच लोकप्रिय झाले होते.

उषा टाकळकर, मीनल निसळ

० **भ्रमर** : पहा पदे, शंकर दाजीशास्त्री

० **भ्रमर** : पहा सोमण, कृष्णाजी लक्ष्मण

**मंडलिक, विश्वनाथ नारायण** : (ज. ८ मार्च, १८३३, मुरुड – मृ. ९ जून, १८८९, मुंबई). 'नेटिव्ह ओपिनियन' या पत्राचे एक संपादक व हिंदुधर्मविषयक ग्रंथांचे लेखक. प्राथमिक शिक्षण मुरुड येथे; इंग्रजी शिक्षण रत्नागिरी व मुंबई या ठिकाणी. मुंबई हायकोर्टात वकील (१८६३).

ह्यांनी दादाभाई नौरोजी इत्यादी मित्रांच्या साह्याने 'नेटिव्ह ओपिनियन' (स्था. १८६२) हे इंग्रजी वर्तमानपत्र काढले. १८६६ पासून त्यात मराठी लेखही येत. 'स्टुडंट्स् लिटररी अँण्ड सायंटिफिक सोसायटी' मध्ये डॉ. जॉन टॉड् यांच्या स्टुडंट्स् गाईडच्या आधाराने *सवयी आणि अभ्यास* (१८५७) हे दोन निबंध पुस्तकरूपाने त्यांनी प्रसिद्ध केले. *हिंदू लोकांच्या मध्यंतरीय अवस्थेविषयी विचार* (१८६२) हे त्यांचे निबंध प्रसिद्ध झाले आहेत. मौंट स्टुअर्ट एल्फिन्स्टन यांच्या इंग्रजी ग्रंथावरून *हिंदुस्थानचा इतिहास* (१८६१) हा दोन भाग असलेला ग्रंथ, *देशव्यवहार व्यवस्था या शास्त्राची मूलतत्त्वे* (१८५४) हा, मिसेस मार्सेट हिच्या इंग्रजी ग्रंथावरून (हरि केशवजी पाठारे ह्यांच्या सहकार्याने) लिहिलेला गुरुशिष्य-संवादरूप असा आहे. पंढरपूर व अन्यत्र पाहिलेल्या प्रतींच्या आधारे यांनी *तुकारामाची गाथा* (१८६७) प्रसिद्ध केली.

धर्मशास्त्रप्रतिपादक ग्रंथांचे सार काढून *हिंदूधर्मशास्त्र* (व्यवहार खंड), भाग – १ (१८६७) सुधारित आवृत्ती (१८८३) हा प्रबंध त्यांनी लिहिला. 'याज्ञवल्क्यस्मृति व व्यवहारमयूर' या संस्कृत ग्रंथाचे भाषांतर *हिंदुधर्मशास्त्र भाग–२* (१८८२) या नावाने प्रसिद्ध केले. *मानवधर्मशास्त्र* (१८८६) या ग्रंथामुळे पाश्चात्त्य जगात त्यांना कीर्ती मिळाली.

कृ. भि. कुलकर्णी, म. पां. कुलकर्णी

**मंत्री, पांडुरंग गोपाळ** : (ज. १८४२ – मृ. १८९८). वैद्यक व वनस्पतिशास्त्र या विषयांचे लेखक. शिक्षण ग्रँट मेडिकल कॉलेजातून जी.बी.एस्. ही पदवी. पुण्याला वैद्यक व्यवसाय. ह्यांचे *महामारीच्या रोगावर लोकोपयोगी सूचना* (१८६८) हे लिथकृत इंग्रजी टिपणांवरून तयार केलेले लहानसे पुस्तक व डॉ. टॅनर ह्यांच्या ग्रंथाच्या आधारे लिहिलेला *बालरोगचिकित्सा* (१८७२) हा ग्रंथ प्रसिद्ध आहे. यांतील वैद्यकविषयक परिभाषा प्राचीन संस्कृत वैद्यकग्रंथातून घेतली आहे. याशिवाय *भारतीय वनौषधीसंग्रह व त्यांचे गुणानुदर्शन* (१८६६) हा कोशग्रंथ असून त्यात चरक व सुश्रुताच्या मतांचा परामर्श, वनस्पतीचे प्रचलित नाव, तिचे गुणदोष आणि पारिभाषिक लॅटिन संज्ञांची सूची दिलेली आहे. *उद्भिज्ज सृष्टीतील चमत्कार* (१९०१) हा वनस्पतींच्या अंतर्रचनेचा विचार करणारा ग्रंथही प्रसिद्ध आहे.

हरिश्चंद्र थोरात, मदन कुलकर्णी

० **मंदार** : पहा रेंदाळकर, एकनाथ पांडुरंग

**मनाठकर, सीताराम गणपतराव** : (ज. १७ फेब्रुवारी, १९०२, मनाठ, जि. नांदेड – मृ. मे, १९४९). कवी. माध्यमिक शिक्षण नांदेड येथे. उच्च शिक्षण हैद्राबाद व कलकत्ता या ठिकाणी. एम्.ए. (संस्कृत). हैद्राबाद येथील सिटी हायस्कूलमध्ये शिक्षक.

*जानकी* (१९२९) व *शरयू* (१९३९) ही ह्यांची दोन खंडकाव्ये. ही काव्ये नायिकाप्रधान व शोकान्त आहेत. लहान वयात पोरक्या झालेल्या जानकीच्या जीवनात विवाहानंतर सुखाचे दिवस येतील असे वाटत असतानाच तिच्या चारित्र्याविषयी शंका घेऊन पतीने तिची अवहेलना केली व अखेर तिला घर सोडावे लागले, हे *जानकी* ह्या काव्याचे कथानक असून, *शरयू* काव्यात एका विधवा स्त्रीच्या जीवनाची झालेली परवड वर्णिलेली आहे. रसानुकूल वृत्तयोजना व रेखीव वर्णनशैली ही या काव्यांची वैशिष्ट्ये आहेत.

उषा टाकळकर, वसंत वऱ्हाडपांडे

० **मनोहर बंधु** : पहा उजगरे, भास्कर कृष्ण

० **मधुकर** : पहा सोमण, कृष्णाजी लक्ष्मण

**मराठे, काशिनाथ बाळकृष्ण** : (ज. १८४४, पुणे – मृ. १३ नोव्हेंबर, १९१८, पुणे). निबंधलेखक व भाषांतरकार. पुण्याच्या डेक्कन

कॉलेजातून बी.ए. व मुंबई येथे एलूएल्.बी. उत्तीर्ण. मुंबई सरकारच्या न्यायखात्यात नोकरी. १९०१ साली सबजज्ज पदावरून निवृत्त झाल्यानंतर डेक्कन कॉलेजमध्ये संस्कृतचे मानसेवी अध्यापक.

*वेदांविषयी निबंध* (१८६९) हे ह्यांचे पहिले पुस्तक. मात्र *नावल व नाटक ह्यांविषयी निबंध* (१८७२) या ग्रंथाचे कर्ते म्हणूनच हे विशेष प्रसिद्ध आहेत. मराठीत नव्यानेच निर्माण होऊ लागलेल्या कादंबरी व नाटक ह्या साहित्यप्रकारांची मार्मिक चिकित्सा या ३८ पृष्ठांच्या निबंधातून केलेली आढळते. प्रस्तुत निबंध लेखकाने १६ फेब्रुवारी, १८७२ रोजी ज्ञानप्रसारक सभेपुढे प्रथम वाचला होता. मराठी समीक्षेत वास्तवतावादी दृष्टिकोणाचा पुरस्कार हिरीरीने करणाऱ्या प्रारंभकालीन समीक्षकांत श्री. मराठे यांचा अग्रक्रमाने उल्लेख करावयास हवा.

गं. दे. खानोलकर, व. कृ. वऱ्हाडपांडे

**मराठे, गणेश सदाशिव :** (ज. १ ऑगस्ट, १८८२, नडियाद, गुजरात – मृ. ५ मे, १९४५). विनोदी लेखक व समीक्षक. शालेय व महाविद्यालयीन शिक्षण पुणे येथे. एम्.ए. (गणित, १९०५). १९०९ मध्ये विमा क्षेत्रात प्रवेश. इंग्लंडमधून विमा व्यवसायाचे शिक्षण घेऊन 'कन्सल्टिंग ॲक्च्युअरिस्ट' म्हणून पुणे येथे स्वतंत्र व्यवसाय. 'भद्राय' (१९३१) या मासिकाचे संचालक. प्रसिद्ध कवयित्री संजीवनी मराठे या त्यांच्या कन्या.

मराठे हे *नाट्यकलारुक्कुठार* (१९०८) ह्या टीकात्मक पुस्तकाचे कर्ते म्हणून प्रसिद्ध आहेत. स. ना. ठोसर यांच्या सहकार्याने त्यांनी कोल्हटकरांच्या 'गुप्तमंजूष' ह्या नाटकावरील कोल्हटकरांच्या नाट्यलेखनाचे विडंबन करणारी टीका 'ज्ञानप्रकाशा'तून प्रसिद्ध केली. ठोसर व मराठे यांनी अनुक्रमे पहिल्या व दुसऱ्या अंकावर टीकालेख लिहिले. १९०८ मध्ये श्री. मराठे यांनी ग्रंथरूपाने ही टीका पूर्ण केली. यात काही पात्रे नाटकाचे पुस्तक घेऊन त्यावर मार्मिक व विनोदी संभाषणात्मक टीका करीत असल्याचे दाखविले आहे. समीक्षातंत्राचा अभिनव उपयोग करून मराठे यांनी नाटकातील दोषांवर व्याजोक्ती, नर्मविनोद, विडंबन इत्यादी हत्यारांच्या आधारे ही टीका लिहिलेली असल्यामुळे ती नावीन्यपूर्ण, चित्तवेधक व मार्मिक स्वरूपाची झाली आहे.

*थालिपीठ* (१९२८) हा त्यांच्या विनोदी लेखांचा संग्रह. यात त्यांचे नियतकालिकांतून प्रसिद्ध झालेले 'विलायतविहार', 'सुंठ केसर नटुकले', 'चक्रचक्री' इत्यादी लेख समाविष्ट आहेत. यातील विनोद अनुकरणात्मक नसून अंगभूत असल्याचा अभिप्राय तत्कालीन 'ज्ञानप्रकाश'ने दिला होता. त्यांच्या अन्य लेखांपैकी 'हिंदुधर्म आणि अभ्यावर्तन' ('लोकशिक्षण', जानेवारी, १९३६, संपा., ज. वि. ओक) आणि 'पुरोगामी व मूलग्राही साहित्य' ('सह्याद्रि', ऑगस्ट, १९४०) हे लेख महत्त्वाचे. तथाकथित पुरोगाम्यांच्या उथळ विचारसरणीचे स्वरूप या लेखातून त्यांनी स्पष्ट केले आहे. तथापि मराठे प्रसिद्ध आहेत ते त्यांच्या अन्य लेखनापेक्षा *नाट्यकलारुक्कुठार* टीकेचे कर्ते म्हणूनच.

उषा टाकळकर, आरती कुसरे

**मराठे, नारायणशास्त्री अथवा केवलानंद सरस्वती :** (पूर्ण नाव – नारायण सदाशिव मराठे). (ज. ८ डिसेंबर, १८७७, सुडकोली, ता. रोहे, जि. कुलाबा – मृ. १ मार्च, १९५५). यांचे पूर्वाश्रमीचे नाव नारायणशास्त्री असून, केवलानंद सरस्वती या नावाने प्रसिद्ध. दामोदरशास्त्री लोंढे यांचेकडे यांनी व्युत्पत्तिशास्त्राचा अभ्यास केला. हे श्रीप्रज्ञानंद स्वामींकडे वेदान्त पाठ श्रवणास जात असत. पुढे प्रज्ञानंद स्वामी शके १८२६ मध्ये समाधिस्थ झाल्यावर त्यांचे जागेवर नारायणशास्त्री पाठ सांगू लागले. यांचे अध्यापनकार्य अव्याहत चालू होते. यांनी वाईमध्ये प्राज्ञपाठशाळेची स्थापना केली. तेथे न्याय, व्युत्पत्ति, व्याकरण, वेदान्त यांचे शिक्षण देत. १९३१ मध्ये यांनी संन्यास घेतला. धर्मकोशाची कल्पना यांचीच.

आहिताग्नी राजवाडे यांनी नासदीय सूक्तावर केलेल्या भाष्याचे खंडन यांनी केले असून ते अंमळनेरच्या 'तत्त्वज्ञानमंदिर' मासिकात प्रसिद्ध झाले आहे.

यांचे काही अप्रकाशित ग्रंथ : श्री शंकराचार्यांच्या शारीरभाष्याचे पृथक्करणात्मक वर्गीकरण, ऐतरेय विषयसूचि, तैत्तिरीय मंत्रसूचि, तैत्तिरीय विषयसूचि, सत्याषाढसूत्र विषयसूचि, जैमिनीय मीमांसा संशोधन सूत्रपाठ, जैमिनीय मीमांसासूत्रपद सूचि, जैमिनीय मीमांसाधिकरण शीर्षक सूचि, जैमिनीय मीमांसाकोश, अद्वैतसिद्धी (मराठी भाषांतर), अद्वैत वेदान्तकोश, न्यायसूचि.

धर्मनिर्णय मंडळाचे अध्यक्ष.

दिनकरशास्त्री कानडे, तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांसारखी विद्वान मंडळी यांची शिष्य होते. यांनी बद्रीनाथची पायी यात्रा केली. यांचा स्वभाव करारी होता. यांचे निधन वाई येथे झाले. हे अविवाहित होते. तेथे यांचे स्मारकमंदिर असून तेथे धर्मकोशाचे काम चालते.

पंडित टापरे

संदर्भ : (१) 'मराठी विश्वकोश, खंड ४', पृ. २५८, 'केवलानंद सरस्वती' अशी रंगनाथशास्त्री यांची नोंद आहे. ती पाहणे. (२) 'नवभारत', डिसेंबर, १९७८ व जानेवारी, १९७९ या अंकातील, तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री यांची मुलाखत पाहणे (स्वामी केवलानंद सरस्वती आणि प्राज्ञपाठशाळेची सुधारणेची चळवळ). (३) 'श्रीकेवलानंद अभिनंदन ग्रंथ', प्राज्ञपाठशाळा प्रकाशन, वाई, शके १८७४ (इ. स. १९५२) यामधील तर्कतीर्थांचा लेख.

**मर्ढेकर, बाळ सीताराम :** ० रमेशबाळ : (ज. १ डिसेंबर, १९०९, खानदेश – मृ. २० मार्च, १९५६, दिल्ली). कवी, कादंबरीकार, नाट्यलेखक आणि साहित्य-कला-समीक्षक, मराठीतील नवसाहित्याचे प्रधान प्रवर्तक.

मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण खानदेशात. उच्च शिक्षण फर्ग्युसन कॉलेजात, पुणे येथे. बी.ए. (१९२८). आयु.सी.एस्.साठी लंडन विद्यापीठाच्या 'किंग्ज कॉलेज'मध्ये (१९२९) दाखल. तेथे इंग्रजीखेरीज फ्रेंच व इटालियन भाषांचेही ज्ञान. नवकलेचे भोक्ते. आयु.सी.एस्. न होताच भारतात परत. मर्ढेकरांच्या घराण्यात रामदासी परंपरा असल्याने नवतेबरोबरच परंपरेचेही काही संस्कार त्यांच्या साहित्यात आढळतात.

काही काळ मुंबईच्या 'टाइम्स ऑफ इंडिया'त सहसंपादक. त्यानंतर 'एल्फिन्स्टन', 'कर्नाटक' आणि 'इस्माइल युसुफ' कॉलेजात सहायक व्याख्याते. १९३८ सालापासून मुंबई आणि अन्य रेडिओ केंद्रांवर नोकरी. मुंबई येथे भरलेल्या मराठी साहित्य संमेलनांतर्गत कविसंमेलनाचे अध्यक्ष (१९५०).

शालेय जीवनात 'रमेशबाळ' ह्या टोपण नावाने त्यांनी काही काव्यलेखन केले. *शिशिरागम* (१९३९) हा त्यांचा पहिला कवितासंग्रह आणि *वाङ्मयीन महात्मता* हा पहिला टीकालेखसंग्रह. मर्ढेकरांच्या प्रारंभीच्या बहुतेक कविता पारंपरिक स्वरूपाच्या आहेत. 'शिशिरऋतूच्या पुनरागमे', 'शिशिरागमा'तील नैराश्य व वेदना वैयक्तिक अनुभवातून निर्माण झालेली असली तरी पुढे आपल्या अनुभुतीतील 'अहंता' गाळून तिला सार्वत्रिक रूप देण्यात मर्ढेकर यशस्वी झाले. ह्या स्थित्यंतरामुळे त्यांच्या कवितेचे स्वरूप पूर्णपणे बदलले. ही नवी कविता *काही कविता* (१९४५) या नावाने प्रसिद्ध झाली. प्रारंभकाली मर्ढेकरांच्या नवकाव्याचे योग्य आकलन न झाल्यामुळे मर्ढेकरांना प्रतिकूल टीकेला तोंड द्यावे लागले. अश्लीलतेच्या कायद्याखाली खटलाही भरला गेला (१९४८). त्यातून ते पुढे सहीसलामत सुटले. माणसाचे स्वत्व आणि मनुष्यत्व नाहीसे करून संज्ञेला बधिरता आणणाऱ्या वैज्ञानिक संस्कृतीविषयीची त्यांना वाटलेली खंत

*काही कविता*तून व्यक्त झाली आहे. ह्या कवितेत विसाव्या शतकातील संज्ञायुक्त सुबुद्ध माणसाला भेडसावणारे विविध प्रश्न छेडले गेले आहेत. शैलीचे स्वरूपही तिरकस, नव्या आशयाला अनुरूप असेच आहे. मर्ढेकरांची कविता पारंपरिक परिचित कवितेहून भिन्न असल्यामुळे प्रारंभकालात आकलनाला काहीशी दुर्बोध वाटणे स्वाभाविकच होते. त्यामुळे *काही कविता*पासून त्यांच्या कवितेच्या संदर्भात सुरू झालेले वाद *आणखी काही कविता* (१९५१) ह्या संग्रहाच्या प्रसिद्धीनंतरही अनेक वर्षे चालू राहिले. मर्ढेकरांच्या कवितेने रूढ काव्यसमीक्षेला पुनर्विचार करण्यास भाग पाडले आहे. मर्ढेकरांच्या निधनानंतर त्यांची समग्र कविता *मर्ढेकरांची कविता* (१९५९) या शीर्षकाने प्रसिद्ध झाली.

मर्ढेकरांची कविता वादविषय ठरली असली तरी समकालिनांच्या व पुढील कवींच्या पिढीवर तिचे खोल परिणाम झाले आहेत. काव्यकलाविषयक त्यांच्या प्रगल्भ अशा जाणिवेने मराठी कवितेचे स्वरूप अंतर्बाह्य पालटून टाकले. मराठीच्या काव्यक्षेत्रातील केशवसुतांच्या नंतरचे महत्त्वाचे परिवर्तन मर्ढेकरांच्या कवितेने घडवले आहे. म्हणूनच त्यांना 'दुसरे केशवसुत' म्हटले जाते.

काव्यक्षेत्राप्रमाणेच कलाविषयक समीक्षेच्या क्षेत्रातही मर्ढेकरांनी मौलिक कार्य केले आहे. मर्ढेकरांनी सुरुवातीचे आपले कलास्वरूपशास्त्रविषयक लेखन इंग्रजीतून केले. *आर्टस् ॲण्ड मॅन* (संग्रहित लेख : १९३७), *टू लेक्चर्स ऑन ॲन एस्थेटिक ऑफ लिटरेचर* (१९४१) ह्या इंग्रजी लेखनाप्रमाणेच *वाङ्मयीन महात्मता* (१९४१), *सौंदर्य आणि साहित्य* (१९५५) हे त्यांचे मराठी ग्रंथही महत्त्वाचे आहेत. मर्ढेकरांचे सौंदर्यविषयक विवेचन पाश्चिमात्य विचारवंतांचे एतद्‌विषयक साहित्यविचार पचवून मराठीत अवतरले आहे. त्यांनी मराठीतील कला-साहित्यविचार अ-कलात्म संदर्भांतून सोडवून, शुद्ध कलेच्याच क्षेत्रात आणून ठेवला व साहित्य-कलाविषयक मूलभूत तत्त्वांचा विमर्श अगदी नव्याने करण्यास प्रारंभ केला. 'बालकवी ठोंबरे' यांच्याकडे पाहण्याचा एक नवा दृष्टिकोण मर्ढेकरांनी आपल्या समीक्षेतून दिला.

मराठी वाङ्मयविश्वावर मर्ढेकरांनी केलेल्या सौंदर्यचर्चेचे दूरगामी परिणाम झाले. समीक्षेमध्ये परिभाषेला आणि शब्दांच्या तात्त्विक अर्थनिश्चितीला महत्त्वाचे स्थान असते ह्याची जाणीव तिच्यामुळे झाली. मराठी समीक्षेचा प्रवास नवकालात संदिग्धतेकडून शास्त्रीय स्वरूपाच्या दिशेने प्रवर्तित झाला तो मर्ढेकरांमुळेच.

काव्य आणि समीक्षालेखन करीत असतानाच मर्ढेकरांनी कादंबरी लेखनाचाही प्रयत्न केला. *रात्रीचा दिवस* (१९४२), *तांबडी माती* (१९४३) व *पाणी* (१९४८) अशा त्यांच्या तीन कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या असून व्यक्तींच्या परस्परसंबंधाचे दर्शन अनेकविध पातळ्यांवरून घेण्याचा, तसेच महायुद्धोत्तर कालखंडाच्या व्यक्तीच्या ढासळत्या जीवननिष्ठांचा, व्यक्तिमनातील गुंतागुंतीचा, संघर्षाचा अर्थ शोधण्याचा त्यांचा प्रयत्न त्यांनी या कादंबऱ्यांतून केला आहे. ह्या कादंबऱ्यांनी मराठी कादंबरीला संज्ञाप्रवाही निवेदनपद्धतीचा, एका अभिनवतंत्राचा परिचय करून दिला.

*नटश्रेष्ठ आणि चार संगीतिका* (१९६५) हा त्यांच्या नाट्यलेखनाचा संग्रह. युरोपमधील 'ऑपेरा' ह्या संगीत नाट्य प्रकारावरून प्रेरणा घेऊन व तोच आदर्श पुढे ठेवून मर्ढेकरांनी ह्या संगीतिका नभोवाणीकरिता लिहिल्या होत्या. ह्या वाङ्मयप्रकाराचा त्यांनी सखोल अभ्यास केला होता. 'ऑपेरा'करिता त्यांनी 'संगीतक' असा मराठी पर्याय दिला. *संगम* हे त्यांनी लिहिलेले पहिले संगीतक. त्यानंतर *कर्ण*, *बदकांचे गुपित* आणि *औक्षण* ही तीन संगीतके लिहिली. ह्या तीनही संगीतकासाठी त्यांनी ग्रीक पद्धतीच्या समूहगानाचा उपयोग केला. दुसऱ्या महायुद्धाच्या समाप्तीचे विजयगीत म्हणून *औक्षण* हे संगीतक ध्वनिक्षेपित झाले. *बदकांचे गुपित*मध्ये अपत्यप्राप्तीची अनिवार ओढ असलेल्या दांपत्याची कथा विनोदाचा धागा गुंफून रचली आहे. संगीतक ह्या प्रकारात मर्ढेकरांनी संगीत नाटकापेक्षा वेगळ्या पायावर संगीत व नाट्य ह्यांचा समन्वय घडविला. *नटश्रेष्ठ* हे चार अंकी नाटक आकाशवाणीवरील ध्वनिक्षेपणाच्या हेतूने लिहिलेले असल्यामुळे तंत्रदृष्ट्या ते नभोनाट्यच आहे. मर्ढेकरांच्या स्वभावातील मूलभूत गांभीर्याबरोबरच क्वचित आढळणाऱ्या खेळकरपणाचा आविष्कार ह्या लेखनातून झाला आहे. मर्ढेकरांच्या संगीतिकांमध्ये त्यांच्यातील कवी विशेष प्रभावी ठरला आहे.

आपल्या विविध प्रकारच्या प्रयोगशील व नावीन्यपूर्ण साहित्यनिर्मितीमुळे आणि त्या साहित्याच्या निमित्ताने मराठी साहित्य-समीक्षेला पुनर्विचार करावयास लावल्यामुळे मर्ढेकर हे मराठीतील नवसाहित्याचे युगनिर्माते ठरले. त्यांनी इंग्रजीतूनही काही काव्यलेखन केले आहे.

उषा दाकळकर, हरिश्चंद्र थोरात,
म. ना. लोही, गो. म. कुलकर्णी

संदर्भ : (१) द. भि. कुलकर्णी, 'मर्ढेकरांचे सौंदर्यशास्त्र–पुनःस्थापना' १९८२. (२) दीक्षित कमलाकर, 'मर्ढेकरांचे सौंदर्यशास्त्र पुनर्विचार' (संपादित), १९७६. (३) प्रो. वि. देशपांडे, 'मर्ढेकरांची कविता : एक अभ्यास, १९८०. (४) प्रभाकर पाध्ये, 'मर्ढेकरांची सौंदर्यमीमांसा', १९७०. (५) गंगाधर गाडगीळ, 'खडक आणि पाणी', १९६०. (६) गो. वि. करंदीकर, 'परंपरा आणि नवता', दु. आ. १९८०. (७) वा. ल. कुलकर्णी, 'मराठी कविता : जुनी आणि नवी', १९८०. (८) व्यं. वि. सरदेशमुख, 'अंधारयात्रा', १९६८. (९) 'सत्यकथा' (विशेषांक), मे १९५६. (१०) बेडेकर, दि. के. 'साहित्य : निर्मिती आणि समीक्षा', १९५४. (११) मर्ढेकर विषयक सर्व संदर्भांसाठी 'मर्ढेकरांची कविता : स्वरूप आणि संदर्भ' हा विजया राजाध्यक्ष यांचा द्विविभागात्मक समीक्षा ग्रंथ पाहवा. मौज प्रकाशन, मुंबई, १९९१.

**महाजन, गोविंद विठ्ठल** : ० भाऊ महाजन : (ज. १८१५, पेण, जि. कुलाबा – मृ. ४ जानेवारी, १८९०, नागपूर). पत्रकार व निबंधलेखक. उपनाव कुंटे. आठव्या वर्षी मेहुणे सदाशिव काशिनाथ ऊर्फ बापू छत्रे यांच्याकडे मुंबईला शिक्षणासाठी आगमन. एल्फिन्स्टन कॉलेजात उच्च शिक्षण. इंग्रजी, मराठी, संस्कृत इत्यादी भाषांचा सूक्ष्म अभ्यास. *प्रभाकर* (१८४०) या सुप्रसिद्ध साप्ताहिक पत्राचे संपादक. अव्वल इंग्रजी काळातील एक महत्त्वाचे लेखक व पत्रकार.

समाजात भौतिक ज्ञानाचा प्रसार होऊन त्याची सर्वांगीण सुधारणा व्हावी या हेतूने, भाऊ महाजनांनी *प्रभाकर* (पहिला अंक : २४ ऑक्टोबर, १८४१) हे पत्र काढले. दर रविवारी प्रसिद्ध होणाऱ्या या पत्रातून त्यांनी समाजाच्या प्रगतीला पोषक अशा गोष्टींची निबंधरूपाने चर्चा करण्यास सुरुवात केली. बाळशास्त्री जांभेकर हे त्यांचे सहकारी होते. बाळशास्त्र्यांप्रमाणेच भाऊ महाजनांचे नावही मराठी भाषेत प्रज्ञाप्रधान वाङ्मयाचा पुरस्कार करून, मराठी गद्यरचनेला नवीन वळण लावणारे लेखक म्हणून महत्त्वाचे आहे. राघोबा जनार्दन ह्यांच्या 'दिग्दर्शन' मासिकातूनही ते लिहीत. *प्रभाकर* हे पत्र अठरा वर्षे चालले. 'लोकहितवादी' गोपाळ हरी देशमुख ह्यांची सुप्रसिद्ध 'शतपत्रे' या *प्रभाकर*मधूनच प्रसिद्ध झाली.

*प्रभाकर*प्रमाणेच *धूमकेतू* (६ मे, १८५३) हे साप्ताहिकही त्यांनी काढले होते. 'निबंधमाले'पूर्वीच्या काळात मराठी भाषेत शास्त्रीय ग्रंथलेखनाचा पाया घालणाऱ्या लेखकांत भाऊ महाजनांची गणना होते. भाऊ हे विचारस्वातंत्र्याचे पुरस्कर्ते होते. भिन्न मतांच्या व्यक्तींनाही *धूमकेतू*तून आपले विचार मांडण्याचे स्वातंत्र्य ते देत. 'ज्ञानदर्शन' या त्रैमासिकाद्वारे पाश्चिमात्य देशातील विषय लोकांस माहिती करून देण्याचा त्यांचा हेतू होता. या हेतूनुसार या त्रैमासिकात युरोपखंडाचा अर्वाचीन इतिहास, न्यायशास्त्र, लॉककृत मानुषशास्त्रावरील विचार,

मिळकत संपत्तिशास्त्र, नीतिशास्त्र, रसायनशास्त्र, भूगर्भशास्त्र इत्यादी विषयांवरील लेख आढळतात. 'नेपोलियन बोनापार्टची कथा' हे चरित्र प्रथम यातच प्रसिद्ध झाले.

*शब्दसिद्धी निबंध* (१८४३) ही पुस्तिका त्यांनी बाळशास्त्री जांभेकर व विनायकशास्त्री दिवेकर ह्यांच्या सहकार्याने लिहिली. मराठीतील साडेपाचशे नामविशेषणादिक शब्द मूळ संस्कृत धातूपासून कसे तयार झाले आहेत ते यात दर्शविले आहे. मराठीतील व्युत्पत्ति-विषयक लेखनाचा हा पहिला प्रयत्न होय.

दादोबा पांडुरंग हे भाऊंचे सहाध्यायी होते. त्यांनी स्थापन केलेल्या 'परमहंस' सभेचे भाऊ एक पुरस्कर्ते होते. समाजातील खुळचट व अविवेकी चालीरीतींवर यांनी आपली लेखणी निर्भिडपणे चालविली.

उषा टाकळकर, आरती कुसरे

**महाजनी, विष्णु मोरेश्वर** :(ज. १८५१, पुणे – मृ. १६ फेब्रुवारी, १९२३, अकोला). कवी, नाटककार व समीक्षक. शालेय शिक्षण धुळ्यास. उच्च शिक्षण पुण्याच्या डेक्कन कॉलेजमध्ये. एम्.ए. (१८७३) उत्तीर्ण. प्रो. वर्ड्स्वर्थ, प्रो. ऑक्सनहॅम, प्रो. कीलहॉर्न, प्रो. केरूनाना छत्रे, प्रो. चिंतामणशास्त्री थत्ते, अनंतशास्त्री पेंढारकर इत्यादी प्राध्यापकांचा त्यांच्या व्यक्तिमत्त्वाच्या घडणीत महत्त्वाचा वाटा. महाजनींनी काही काळ *ज्ञानसंग्रह* मासिक चालविले. १८८६ मध्ये एज्युकेशन इन्स्पेक्टर. १९०१ मध्ये शिक्षणखात्याच्या डायरेक्टर पदावरून निवृत्त. पुणे येथे मे, १९०७ च्या मध्ये भरलेल्या पाचव्या साहित्य संमेलनाचे अध्यक्ष. महाराष्ट्र साहित्य परिषदेचे कायमचे अध्यक्ष म्हणून नियुक्ती (१९१३).

'विविधज्ञानविस्तारा'तून प्रसिद्ध झालेली त्यांची पुस्तकपरीक्षणे, अनेक विषयांवरचे निबंध, डेक्कन कॉलेजातील आठवणी हे स्वतंत्र लेखन आणि काव्य व नाटके हे भाषांतरित लेखन प्रसिद्ध आहे. केशवसुतांच्या अर्वाचीन मराठी कवितेची पूर्वपीठिका समजली जाणारी त्यांची स्फुट भाषांतरित कविता १८८२ ते १८८५ च्या दरम्यान 'विविधज्ञानविस्तारा'तून प्रथम प्रसिद्ध झाली. ह्या कवितांचा *कुसुमांजलि* (१८८५) हा संग्रह प्रसिद्ध झाला आहे. वर्ड्स्वर्थ, शेली, कीट्स, कोलरिज, ग्रे, बर्नस्, टेनिसन, लाँगफेलो इत्यादी आंग्लकवींच्या भावकवितांचे समर्पक व प्रासादिक अनुवाद करून जुन्या वळणाची कविता लिहिणाऱ्या मराठी कवींसमोर आत्मलेखनपर कवितेचा एक नवा आदर्श त्यांनी ठेवला. त्यांची भाषांतरित नाटकेही उल्लेखनीय आहेत. 'विंटर्स टेल'चे *मोहविलसित नाटक* (१८८१-८२), 'ऑल वेल दॅट एण्डस् वेल' चे *वल्लभानुनय* (१८८७) व 'सिंबेलाईन'चे *तारा नाटक* (१८८८) ही त्यांची भाषांतरित नाटके. या नाटकांत परदेशी पद्धती बदलून महाराष्ट्रीय रीतिरिवाज घेतले आहेत.

काव्य – नाटकांखेरीज *रामायणकालीन लोकस्थिती निबंध* (१९००), *बंगाल्यातील जमीनदारीची पहिवाट* (१८९६), *ग्रंथसंग्रहालय* (मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय वार्षिक समारंभाचे व्याख्यान, १९०७), *स्वतःचा प्रयत्न प्रकरण १ ले* (स्माइल्सकृत 'सेल्फ हेल्प'च्या पहिल्या भागाचे आधारे) अशी त्यांची काही पुस्तके प्रसिद्ध आहेत. *बंगाल्याची जमीनदारीची वहिवाट* (१८९६) हा ग्रंथ रचण्यास रा. ब. रानडे यांचेकडून त्यांना स्फूर्ती मिळाली.

महाजनींचे टीकालेखन 'विविधज्ञानविस्तारा'तील 'पुस्तक-परीक्षा' या सदरातून प्रसिद्ध झाले. यात काव्ये, नाटके, कादंबऱ्या, चरित्रग्रंथ, प्रवासवृत्ते इत्यादी वाङ्मयप्रकारांबरोबर अर्थशास्त्र, इतिहास, राजकारण, शिक्षणशास्त्र या विषयांवरच्या पुस्तकांवर मार्मिक अभिप्राय आहेत. महाजनींनी दोषदिग्दर्शन करताना गुणग्राहकता तर दाखविलीच परंतु मोलाचे मार्गदर्शनही केले.

जळगाव येथे १९०७ मध्ये पहिले कवि-संमेलन कर्नल कीर्तीकर यांच्या अध्यक्षतेखाली भरले. तेव्हा 'कवी आणि काव्य' या विषयावर महाजनींनी दिलेले व्याख्यान स्मरणीय होते. (काव्यरत्नावली, फेब्रुवारी, १९२३ – प्रास्ताविक) 'डेक्कन कॉलेज' या शीर्षकाखाली त्यांनी कॉलेज जीवनातील गमतीदार अनुभव व्यक्त केले. रावसाहेब रानडे, का. त्रि. तेलंग, वि. ज. कीर्तने ह्यांचेशी लेखकाचा जो संबंध आला त्याची काही संस्मरणे उल्लेखनीय आहेत.

त्यांच्या शैक्षणिक, वाङ्मयीन, सामाजिक कार्याच्या अनुषंगाने त्यांनी निबंधलेखनही केले. उदा., समर्थ विद्यालय, धर्म शिक्षण, गृह शिक्षण, गुरुशिष्यांचा प्राचीन काळी असलेला संबंध, व्यक्तिस्वातंत्र्य व लोकमत इत्यादी निबंध त्या त्या विषयाचा सर्वांगीण परामर्ष घेणारे आहेत.

महाजनींचा पिंड व वैचारिक भूमिका ही जुन्याचा त्याग करून प्रागतिक अशा नव्या मूल्यांचा वेध घेऊ पाहणाऱ्या विशिष्ट कालखंडाने घडविली आहे. विष्णुशास्त्र्यांच्या नंतरच्या पिढीतील साहित्यविषयक जागृती करण्याचे व नव्या पिढीला व्यापक अशी वाङ्मयीन दृष्टी देण्याचे कार्य करण्यात त्यांचा मोठा वाटा होता.

उषा टाकळकर, आरती कुसरे

संदर्भ : 'विष्णु मोरेश्वर महाजनी', १९४३, पुष्पा लिमये.

**महात्मे, सूर्याजी सदाशिव** :(ज. १८३७, गोवा – मृ. १३ डिसेंबर, १८९९, मुंबई). रहस्यमय कादंबऱ्या लिहिणारे लेखक, मुलांच्या मासिकाचे संपादक व ग्रंथप्रकाशक. शिक्षण गोव्याच्या 'लिसेव नासिओनाल' या महाविद्यालयात १८५४ पर्यंत. मराठी, फ्रेंच, संस्कृत, लॅटिन या भाषांमध्ये प्रावीण्य. १८५७-५८ मध्ये मुंबईत सॉलिसिटरच्या फर्ममध्ये नोकरी. 'बाळाजी आणि कंपनी' या नावाने ग्रंथप्रकाशन–विक्रीचा जोडधंदा (१८६१–९९).

माधव चंद्रोबा डुकले, गोविंद नारायण माडगावकर आदी तत्कालीन साहित्यिकांचा आदर्श पुढे ठेवून यांनी लेखन-व्यवसाय केला. ऑगस्ट, १८६१ मध्ये *आनंदलहरी* हे पहिले मुलांचे मासिक सुरू केले. यातील लेख विविधांगी, सुबोध, माहितीपूर्ण, मुलांच्या बुद्धीला चालना देणारे व नीतिपोषक आहेत. त्यात चटकदार गोष्टी, श्लोकरूप कोडी (गुह्यार्थ श्लोक) व जुन्या मराठी वाङ्मयातील उतारे दिले जात. ते मासिक ५-६ महिने चालले.

*वेषधारी पंजाबी* (१८८६) ही पहिली मराठी रहस्यमय कादंबरी यांनी लिहिली. १८८८ मध्ये प्राकृत ग्रंथावरून *विक्रमचरित्र* आणि विद्यार्थ्यांसाठी मोरोपंतांच्या केकावलीची टीकात्मक आवृत्ती तयार केली. १८८९ ते १८९१ पर्यंत त्यांनी 'वामनी ग्रंथ' या मासिकात वामन पंडितांची 'स्फुट रचना' व 'यथार्थ-दीपिका' (१८९१) हा ग्रंथ त्यांच्या चरित्रासह क्रमशः प्रसिद्ध केला.

*युरोपा खाकूच्या शाळेतील मारामारी* (१८७१) हे 'फ्रँको–जर्मन' लढाईवरील भाषांतरित पुस्तक आणि विश्वनाथ नारायण काळे यांच्या सहकार्याने *तंतुवाद्य* हे सतारवादनविषयक पुस्तक (१८७२) त्यांनी लिहिले.

म. वि. गोखले, आरती कुसरे

**महानुभाव, बाळकृष्णशास्त्री** : (ज. १८९७, नागपूर – मृ. १५ सप्टेंबर, १९५३). महानुभाव वाङ्मयाचे संशोधक व अभ्यासक. मूळचे जैन वाणी. प्लेगच्या साथीमुळे वडील विरक्त होऊन मुलासह माहूरला आले आणि मुलाला महानुभाव महंत लक्ष्मराजांच्या पायावर घातले.

महाराजांनी मुलाचे बाळकृष्ण असे नामकरण केले. पेशावरला दत्तराज (लक्षराजांचे शिष्य) यांचेजवळ विद्याभ्यास व महाराष्ट्रातील बेलापूर (जि. अहमदनगर) येथे बैरागीबुवा महंताजवळ महानुभाव तत्त्वज्ञान व आचारधर्मांचे अध्ययन. पुढे सिरसगाव (जि. अमरावती) येथे श्रीविद्वांसबुवा महानुभाव यांच्या विद्यालयात दोन वर्षे संस्कृतचे अध्ययन. पंजाबमधील हरिपूर हजारा विद्यालयातून 'शास्त्री' पदवी (१९२५) संपादन. तेथे अध्यापन करताना ब्रह्मविद्येचा अभ्यास. १९२६ पासून माहूरला वास्तव्य.

महंत मुकुंदराव आराध्य यांनी १९३० मध्ये 'लीळाचरित्रा'तील आख्यायिका हिंदीत अनुवादित करून श्रीचक्रधरविषयक जी अनैतिहासिक भूमिका मांडली, तिचे खंडन बाळकृष्ण शास्त्रींनी 'श्री चक्रधर चरित्र भूमिकापर ऐतिहासिक दृष्टी' हा हिंदी प्रबंध लिहून केले. त्यानंतर 'विहंगम' मासिकातून त्यांनी *महानुभाव पंथावरील आक्षेप व त्यांचे निरसन* ही लेखमाला लिहून राजवाडे, चांदोरकर, जोग, प्रा. पेंडसे, दांडेकर, पाध्ये इत्यादी जुन्या-नव्या आक्षेपकांच्या आक्षेपांचा परामर्श घेतला व त्यांचे साधार खंडन केले. ही लेखमाला पुस्तकरूपाने प्रसिद्ध आहे. विद्याभूषण श्री. कृष्णशास्त्री घुले यांनी 'चक्रधर आणि त्याची सिद्धान्त सूत्रे' यांच्या ज्ञानेश्वरपूर्वकालीनत्वासंबंधी शंका उपस्थित करून प्रतिकूल मत नोंदविले, त्याच्या खंडनार्थ 'वागीश्वरी' मध्ये (सप्टेंबर–नोव्हेंबर जोड अंक) एका विस्तृत लेखाद्वारे बाळकृष्णशास्त्री यांनी घुले शास्त्र्यांना उत्तर दिले.

*पंढरपूरचा विठोबा आणि महानुभाव पंथ* ही पुस्तिका व *महानुभाव पंथ व त्याचे वाङ्मयासंबंधी पंथीयेतर विद्वानांचे अभिप्राय* हे संग्रहित केलेल्या लेखांचे पुस्तक, तसेच *महानुभाव पंथ* (१९४७) या ग्रंथावरून त्यांचे सूक्ष्मवाचन, मनन, पंथाभिमान, वादकौशल्य इत्यादींचे दर्शन घडते.

उषा टाकळकर, आरती कुसरे

**० महाराष्ट्रीय :** पहा चिंचाळकर, परशराम गोविंद

**मांजरेकर, शांताराम विठ्ठल :** ० शांताराम : (ज. १८८४, सत्वास, इंदूर – मृ. २ मार्च, १९४२, छिंदवाडा, मध्य प्रदेश ). बंगाली कादंबऱ्यांचे मराठी अनुवादक. मॅट्रिक (१९०१). पुढील शिक्षणासाठी आग्र्यास वास्तव्य. तीन वर्षे पुण्यात नोकरी व मराठीचा अभ्यास. नंतर छिंदवाड्यास वकिली.

*राजा तोरडमल* (१९०५) ही रमेशचंद्र दत्तांच्या 'बंगविजेता'ची आणि *भयंकर ग्रहदशा* (१९०६) ही जोगेंद्रनाथ चटोपाध्यायांच्या 'चा-कुलीर आत्मकहानी'ची अनुवादित कादंबरी. ह्या दोन्ही मुंबईच्या 'मनोरंजन ग्रंथप्रसारक मंडळी'ने प्रसिद्ध केल्या. पुढे बंकीमचंद्रांच्या *सीताराम* (१९१२) चा ह्यांचा मराठी अनुवाद पाटील-बंर्दे कंपनीने प्रसिद्ध केला.

शांताराम वकील झाले आणि त्यांचे लेखन थांबले. फक्त नागपूरच्या 'वागीश्वरी' मासिकात 'एक रात्र' (रविंद्रनाथांच्या 'एक रात्रि'वरून) आणि 'कर्जाची फेड' (एका जपानी कथेवरून) या दोन कथा प्रसिद्ध झाल्या. कादंबऱ्यांचे अनुवाद करताना मूळ कादंबरीचे सौंदर्य कमी होऊ न देता तिचे रंजनमूल्य यांनी कायम ठेवले.

म. ना. अदवंत, म. ना. लोही

**माकोडे, बळवंतराव कमळाकर :** (ज. १८५५, साजापूर, मध्य प्रदेश – मृ. १६ जून, १९००, मध्य प्रदेश). पंडित-परंपरेतील कवी व साहित्यशास्त्र समालोचक. यांचे शिक्षण फारसे झाले नाही. ग्वाल्हेर संस्थानात ते नाझर अदालत म्हणून नोकरीस होते.

'काव्यरत्नावली'त ह्यांची स्फुटकविता सुरुवातीपासूनच प्रसिद्ध होऊ लागली. ह्यांची कविता जुन्या वळणाची व बोधपर आहे. *सुभाषित पद्यमाला* (१८९१) हे संस्कृत सुभाषितांचे मराठी भाषांतर, *रूपकप्रबोध अथवा नाट्यशिक्षणमाला* (१८९०) आणि *रसप्रबोध* (१८९२) हे दोन साहित्यशास्त्रविषयक विवेचन करणारे मराठीतील प्रारंभीचे ग्रंथ, ही स्वतंत्र ग्रंथनिर्मिती. रावबहादूर साने ह्यांनी 'काव्येतिहाससंग्रहा'तून (१८८०) छापलेल्या 'होळकरांची कैफियत' या बखरीकरिता अर्थनिर्णायक व इतर माहितीविषयक टीपा माकोडे यांनीच लिहिल्या आहेत.

जानेवारी, १९०० मध्ये ह्यांनी *वैदिकधर्म* नावाचे मासिक सुरू केले. पण पहिल्या पाच अंकांच्या प्रकाशनानंतर ह्यांचा मृत्यू झाला. ह्या मासिकाकरिता स्पेन्सरच्या अज्ञेयवादाचे खंडन करणारा एक मार्मिक लेख ह्यांनी लिहिला होता. तो लोकमान्य टिळकांनाही आवडला होता. *वैदिक धर्मविलाप* (१९००), *योगविज्ञान* (१९००), *सार्थ गायत्रीमंत्र* (१८८९) अशी काही छोटी पुस्तकेही यांनी लिहिली आहेत.

उषा टाकळकर, म. ना. लोही

**माजगांवकर, बी. एस्. इझीकेल :** (ज. १८७५, मुंबई – मृ. १९५१, मुंबई). बेने इस्राएली लेखक. शिक्षण मुंबई येथे. बी.ए. (१९०५). मुंबई, जळगाव येथील शाळांतून उपमुख्याध्यापक, मुख्याध्यापक म्हणून काम.

*बेने इस्राएल लेकरांकरिता धर्मपाठ* (१९४६) हे पुस्तक प्रसिद्ध. ह्या पुस्तकात इस्राएली धर्म, त्याच्या आज्ञा, पवित्र दिवस, सण, उपवास, विधी इत्यादींची माहिती दिली आहे. 'हिब्रू'चा अभ्यास करणाऱ्या मराठी भाषिकांसाठी हिब्रू वाचनपाठाची सहा पुस्तकेही त्यांनी तयार केली आहेत.

रेचल गडकर, म. पां. कुलकर्णी

**माटे, गणेश बाबाजी :** (ज. २५ नोव्हेंबर, १८३६, पुणे – मृ. १० नोव्हेंबर, १८९०, सोलापूर). कायदा, वेदान्त व व्यावहारिक विषयांवरील ग्रंथांचे लेखक. मुलकी परीक्षा देऊन कलेक्टर कचेरीत नोकरी. नंतर वकिलीची व मुन्सफीची परीक्षा देऊन पुण्यास वकिली.

त्यांनी कायदाविषयक बरीच पुस्तके लिहिली. वयाच्या एकविसाव्या वर्षी यांची तीन पुस्तके प्रसिद्ध झाली. *न्यायरत्न* (१८६७) हे पुस्तक न्यायाची तात्त्विक व व्यावहारिक चर्चा करणारे व अशा प्रकारचे मराठीतील पहिलेच पुस्तक म्हणून महत्त्वाचे. *ब्रह्मविद्याप्रबोधरत्न* (१८८८) हा परमार्थविषयक ग्रंथ. *मुकुंदराजकृत परमामृत* (१८८९) हा संपादित छोटा ग्रंथ. याशिवाय *अग्निक्रीडा* (१८७१) हे दारूकामासंबंधीचे अभिनव पुस्तक, *कागदाची फौज* (१८७५) कागदावरील नक्षीकामाविषयीचे पुस्तक, अशी काही पुस्तके लिहिली. १८७४ साली देशकल्याणार्थ स्वलिखित कीर्तनांचा संग्रह प्रसिद्ध केला.

नंदिनी लोटलीकर, म. ना. लोही

**माटे, श्रीपाद महादेव :** (ज. २ सप्टेंबर, १८८६, शिरपूर, विदर्भ – मृ. २५ डिसेंबर, १९५७, पुणे). कथालेखक, चरित्रलेखक, संतसाहित्य समालोचक, दलितसेवक व आत्मचरित्रकार. शिक्षण सातारा व पुणे येथे. एम.ए. (इंग्रजी-मराठी–१९१५). अनेक वर्षे शिक्षक. १९३५ पासून १९४६ पर्यंत सर परशुरामभाऊ कॉलेजमध्ये मराठीचे प्राध्यापक. मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष (सांगली, १९४३). आपल्या अध्यक्षीय भाषणात त्यांनी साहित्यिकांनी बहुजनसमाजाभिमुख व्हावे, असा संदेश दिलेला आहे.

माट्यांनी १९१७ ते १९३७ या काळात अस्पृश्यांच्या उन्नतीसाठी व प्रबोधनासाठी काम केले. अस्पृश्यतेचा प्रश्न व पर्यायाने हिंदूंच्या वर्णव्यवस्थेचा प्रश्न हा धार्मिक प्रश्न नसून वांशिक प्रश्न आहे असे प्रा. माटे यांचे मत होते. *अस्पृश्यांचा प्रश्न* (१९३२) ह्या ग्रंथात त्यांनी हेच मत मांडले आहे.

त्यांनी *परशुरामचरित्र व पंचमानव हिंदुसमाज* (१९३५) ह्या ग्रंथात भारतातील वंशव्यवस्था हाच विषय चर्चिला आहे. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र व अतिशूद्र या पाच मानववंशांच्या एकीकरणाचे प्रयत्न त्यावेळच्या समाजशास्त्रज्ञांनी केले आणि त्यातून हिंदुसमाज निर्माण झाला असे त्यांचे या ग्रंथातील प्रतिपादन आहे. हिंदुसमाजाने इहवादाचा स्वीकार करून विज्ञाननिष्ठ बनावे असा आग्रह माट्यांनी 'विज्ञानबोध' (१९४८) या ग्रंथाला लिहिलेल्या प्रस्तावनेत धरला. *सन्त, पन्त व तन्त* (१९५७) हा माट्यांचा गाजलेला आणखी एक ग्रंथ. त्यांनी संतवाङ्मयाचा अनेक दृष्टिकोनातून अभ्यास केला.

मध्यप्रांत शासन साहित्य परिषदेच्या निमंत्रणावरून १९५५ मध्ये नागपूर येथे माट्यांनी *रामदासांचे प्रपंचविज्ञान* ह्या विषयावर व्याख्याने दिली. ही त्याच शीर्षकाखाली १९५६ साली प्रसिद्ध करण्यात आली. मराठी संतांपैकी एकट्या रामदासांनीच इहवादाचा पुरस्कार केलेला असल्याने माट्यांना समर्थ जवळचे वाटत. त्यांनी गीताविषयक जे निबंध लिहिले ते *गीता-तत्त्वविमर्श* (१९५७) या पुस्तकात समाविष्ट आहेत. *रसवंतीची जन्मकथा* (१९४३) ह्या पुस्तकात माट्यांचे काव्यविषयक विवेचन अंतर्भूत आहे.

माट्यांच्या वैचारिक किंवा ललित लेखनातून त्यांच्या समाजाभिमुखतेचा, शब्दप्रभुत्वाचा, कमावलेल्या भाषाशैलीचा जो प्रत्यय येतो त्यामुळे एक शैलीकार म्हणून मराठी साहित्यक्षेत्रात त्यांना मानाचे स्थान प्राप्त झाले आहे. एक सामाजिक घटना म्हणून भाषेचा त्यांनी स्वतंत्रपणे केलेला विचार आणि ग्रामीण बोलींना दिलेले महत्त्व अतिशय उल्लेखनीय आहे.

माट्यांची उल्लेखनीय वाङ्मयीन कामगिरी म्हणजे त्यांनी संपादित केलेले ग्रंथ. 'केसरी'च्या सुवर्णमहोत्सवानिमित्त प्रसिद्ध झालेला *केसरी-प्रबोध* (१९३१), साहित्यसम्राट तात्यासाहेब केळकरांच्या एकसष्टीनिमित्त प्रसिद्ध केलेला *केळकर गौरवग्रंथ* (१९३२), विज्ञानाच्या अनेक शाखांचा सामान्य वाचकांना परिचय करून देणारा *विज्ञानबोध* (१९३५), *महाराष्ट्र सांवत्सरिक* (१९३३, १९३४, १९३७) आणि अखिल भारतीय हिंदुमहासभेच्या अधिवेशनानिमित्त प्रसिद्ध केलेला *हिंदुसमाजदर्शन* (१९३५) इत्यादी ग्रंथांनी मराठी साहित्यात मोलाची भर घातली आहे.

*उपेक्षितांचे अंतरंग* (१९४१) हे यांचे ललितसाहित्य निर्मितीतील एक महत्त्वाचे पुस्तक. ह्या पुस्तकात माट्यांनी अस्पृश्य समाजातील व्यक्तींच्या व त्यांच्या सामाजिक दुःखांच्या व्यथा व वेदनांना वाचा फोडली आहे. तसेच ग्रामीण भागातील लोकजीवनाच्या दुर्दशेचे वस्तुनिष्ठ चित्रण करीत असताना त्यामागील आर्थिक शोषणाच्या कारणाचे दिग्दर्शन करणारा हा मराठीतील पहिलाच ललितलेखक आहे.

माट्यांनी प्रचंड लेखन केले. विविध विषयांवर लिहिले. *साहित्यधारा* (१९४३), *विचारशलाका* (१९५०), *विचारगुंफा* (१९५५), *विवेकमंडन* (१९५६) व *विचारमंथन* (१९६२) हे त्यांच्या स्फुटलेखांचे संग्रह. *पाश्चात्त्य पुरुषश्रेष्ठ* (१९४६), *आदर्श स्त्री-पुरुष* (१९५०), *कर्तबगार स्त्रिया* (१९५०), *थोर शास्त्रज्ञ* (१९५१) ही चरित्रात्मक पुस्तके. याशिवाय *अनामिका* (१९४६), *माणुसकीचा गहिवर* (१९४९), *भावनांचे पाझर* (१९५४), *भावकथा* (१९५७), *मांडवी* (१९५९) हे त्यांच्या अललित साहित्याचे संग्रह. त्यांचे हे सर्वच लेखन त्यांच्या समाजहितैषी वृत्तीतून स्फुरले आहे. त्यांचे *चित्रपट* (१९५७) हे आत्मचरित्रात्मक पुस्तकही याला अपवाद नाही.

प्रभावी भाषाशैली हे जरी माट्यांच्या लेखनाचे वैशिष्ट्य असले तरी भाषाशैलीच्या आहारी ते जात नाहीत. विज्ञानाचे, इहवादाचे, प्रबोधनाचे तत्त्वज्ञान स्वातंत्र्यवीर सावरकरांच्या नंतर माट्यांनीच प्रामुख्याने सांगितले आहे. दलितांच्या व्यथा ललित वाङ्मयातून प्रकट करणारे प्रमुख ललितलेखक म्हणून माट्यांचे नाव घ्यावेच लागेल. आधुनिक मराठी वाङ्मयक्षेत्रातील एक बहुजनाभिमुख क्रियाशील विचारवंत, थोर शैलीकार या नात्याने माटे यांचे कार्य महत्त्वाचे आहे.

प्र. नी. नवरे, म. ना. जोही

संदर्भ : (१) 'माटे : व्यक्ती आणि वाङ्मय' (संकलन : माटे सत्कार समिती). (२) 'महाराष्ट्र साहित्य पत्रिका' (जन्मशताब्दी विशेषांक), जुलै-सप्टेंबर, १९८६. (३) श्री. पु. भागवत, 'श्री. म. माटे', महाराष्ट्र टाइम्स, २६ सप्टेंबर, १९८६. (४) दत्तात्रेय पुंडे, 'श्री. म. माटे यांच्या कथेच्या रूपाचा विचार', महाराष्ट्र टाईम्स, ४ ऑक्टोबर, १९८६. (५) गंगाधर पानतावणे, 'श्री. म. माटे, जीवन व वाङ्मय आणि पूर्वास्पृश्य', महाराष्ट्र टाईम्स, ४ ऑक्टोबर, १९८६.

**माडगावकर, गोविंद नारायण :** (ज. १८१५, माडगाव, गोवा – मृ. १५ मार्च, १८६५, मुंबई). *मुंबईचे वर्णन* या ग्रंथाचे लेखक व निबंधकार. शिक्षण फारसे नाही. तथापि स्वसंपादित पात्रतेच्या बळावर स्कॉटिश चर्चच्या शाळेत शिक्षक. डॉ. भाऊ दाजी, डॉ. नारायण दाजी, ना. दाभोळकर हे यांचे विद्यार्थी. यांच्या सामाजिक, शैक्षणिक व साहित्यिक कामगिरीचा सन्मान करण्यासाठी १८६३ साली चहाते व विद्यार्थी यांनी त्यांना मानपत्र आणि दोन हजारांची थैली दिली. सरकारी अनुदानासाठी येणाऱ्या पुस्तकांची छाननी व निर्णय देणाऱ्या समितीचे सदस्य या नात्यानेही त्यांनी महत्त्वाचे कार्य केले.

*मुंबईचे वर्णन* (१८६३) हे त्यांचे पुस्तक भाषेच्या व वर्णनशैलीच्या दृष्टीने तसेच इतिहास म्हणूनही उत्कृष्ट बठले आहे. एकोणिसाव्या शतकाच्या मध्यातील मुंबईच्या सामाजिक जीवनाचे, संस्थात्मक जीवनाचे, धार्मिक स्थळांचे, थोर व्यक्तींचे रोचक वर्णन त्यात सापडते. याशिवाय त्यांनी अन्य सोळा पुस्तके लिहिली आहेत. इंग्रजी शिक्षणाचा नुकताच प्रारंभ झालेल्या त्या काळाला अनुरूप असे बोधप्रद विषय घेऊन यांनी ह्या पुस्तिका लिहिल्या. *शुचिर्भूतपणा* (१८४९), *कणनिषेधकबोध* (१८५०), *हिंदु लोकांच्या रीती सुधारण्याविषयी बोध* (१८५१), *सृष्टीतील चमत्कार* (१८५१), *दारूपासून अनर्थ* (१८५५), *सुलेखनविद्या* (१८६०) इत्यादी शीर्षकांवरून लेखकाची लोककल्याणाची तळमळ दिसून येते. ह्या निबंधांची भाषा सोपी, अलंकाररहित, मांडणी नीटस, डौलदार आहे. समाजाने ज्ञानी व्हावे, नीतिमान बनावे, शास्त्राभ्यास करावा, राष्ट्रहित पुढे ठेवावे अशा अपेक्षेने, जिव्हाळ्याने केलेले व लोकादरास पात्र झालेले, त्याचप्रमाणे 'ज्ञानप्रसारक सभा' व तिचे 'ज्ञानप्रसारक मासिक' (१८५०–६२) ह्यांच्याशी निगडित असलेल्या एका तळमळीच्या समाजसेवकाचे व समाजशिक्षकाचे हे लेखन उल्लेखनीय आहे.

म. ना. जोही, कृ. भि. कुळकर्णी

संदर्भ : (१) गंगाधर गाडगीळ, 'मुंबईचे वर्णन – साहित्याचे मानदंड'. (२) बा. द. सातोस्कर, 'गोमंतकाच्या मराठी सारस्वताचे शिल्पकार', गोमंतक, २५-५-६९.

**माडगावकर, रामचंद्र विष्णु :** (ज. १८४३ – मृ. २८ एप्रिल, १९१४). मराठी संतवाङ्मयाचे संपादक. 'मुंबई वर्णन'कार माडगावकरांचे हे पुतणे. मुंबईच्या एलफिन्स्टन कॉलेजातून बी.ए. (१८६२). मुंबईच्या ग्रॅहॅम कापड कंपनीत अडत्याची नोकरी. पुढे कंपनीत उच्चाधिकारी. १८९३ साली कंपनीने विलायतेस पाठविले व शेवटपर्यंत ते तिकडेच राहिले.

ह्यांचा काव्यशास्त्राचा सखोल अभ्यास होता. 'वृत्तमंजुषा' या शीर्षकाने ह्यांनी 'विविधज्ञानविस्तार' मासिकातून (वर्ष ३ व ४)

एक लेखमाला प्रसिद्ध केली. नंतर ते संतवाङ्मयाकडे वळले. जुन्या काव्याचे शास्त्रशुद्ध संपादन कसे करावे, याचे यांना पहिले पाठ डॉ. भांडारकरांकडून मिळाले. यांनी *तुकारामाची गाथा* (१८८६) पाठभेदाकडे लक्ष पुरवून व चांगल्या कोशासह प्रसिद्ध केली. त्याला जोडलेले तुकारामाचे चरित्र वाचनीय आहे. 'रामदास स्वामींचे समग्र ग्रंथ' (१८९०) संपादून प्रसिद्ध केल्यानंतर यांचे लक्ष 'ज्ञानेश्वरी'कडे वळले. यांनी तिची शुद्ध प्रत तयार करण्याचा उद्योग आरंभिला. यासाठी यांनी अनेक ठिकाणाहून जुन्यात जुन्या प्रती मिळविल्या. 'ज्ञानदेवकृत भावार्थदीपिका', *ज्ञानदेवी* (१९०७) या नावाने पाठभेद व कठीण शब्दांचा कोश ह्यांसह ज्ञानेश्वरीवरील हा ग्रंथ प्रसिद्ध केला. ह्या ग्रंथाबरोबर ज्ञानदेवीचे व्याकरण व भाषेवर निबंध लिहिण्याचा यांचा संकल्प होता. पण तो सिद्धीस गेला नाही. *ज्ञानदेवी* प्रसिद्ध झाली तरी त्यांना समाधान नव्हते. जुन्या प्रती मिळवून त्यांचा तौलनिक अभ्यास चालूच होता. त्यांना हवी अशी जुन्यात जुनी प्रत पुढे पाटांगण येथून मिळाली. राजवाड्यांची अधिकृत मानली जाणारी प्रत हीसुद्धा पाटांगण येथेच मिळाली. ह्या पोथीतील पाठ एकनाथपूर्वकालीन आहेत, याची खात्री झाल्यावर त्यांनी पारदर्शक कागद मूळ कागदावर ठेवून ती जशीच्या जशी नकलून घेतली. ह्या नवीन संशोधित प्रतीच्या आधारे *ज्ञानदेवी*ची नवीन आवृत्ती काढण्याचे काम त्यांच्या अकाली निधनाने पडून राहिले. मात्र राजवाडे संपादित 'महाराष्ट्र सरकार'ने प्रसिद्ध केलेल्या प्रतीच्या पाठसंशोधनात ह्या प्रतीचा उपयोग करून घेण्यात आला आहे.

ग. दे. खानोलकर, म. ना. लोही

**० माधव जूलियन** : पहा पटवर्धन, माधव त्र्यंबक

**० माधव व्यंकटेश** : पहा लेले, महादेव

**माधवराव (सर) टी** : (ज. १८२८ कुंभकोणम्, तंजावर – मृ. ४ एप्रिल, १८९१). कवी, राजकारणी व विद्वान् कारभारी. तंजावर येथे स्थायिक झालेल्या जुन्या महाराष्ट्रीय घराण्यांपैकी यांचे एक घराणे. यांचे आजोबा, वडील व चुलते त्रावणकोर संस्थानचे मुख्य प्रधान होते. स्वतः माधवरावसुद्धा त्रावणकोर राज्याचे चौदा वर्षे (१८५३ ते १८७२) दिवाण होते. १८७३ साली इंदूरच्या होळकरांनी त्यांना आपला दिवाण नेमले. नंतर ते बडोद्याचे दिवाण झाले. ते राष्ट्रीय वृत्तीचे, राष्ट्रीय सभेच्या, प्रारंभीच्या प्रमुख प्रवर्तकांपैकी एक असून १८८७ मध्ये मद्रास येथे बद्रुद्दिन तय्यबजी यांच्या अध्यक्षतेखाली राष्ट्रीय सभेचे जे द्वितीय अधिवेशन भरले होते, त्याचे हे स्वागताध्यक्ष होते. कवी मोरोपंत यांच्या आर्यांच्या धर्तीवर त्यांनी नीतिबोधपर अनेक आर्या रचल्या आहेत. त्यांची ही कविता सुबोध, प्रासादिक व मधुर आहे, ती दोन भागांत प्रसिद्ध झाली (१८९९). *बालसंगोपन सूचना* (१९०४) या मुळातल्या त्यांच्या इंग्रजी निबंधाचा अनुवाद वि. को. ओक यांनी केला आहे.

नंदिनी खोडलीकर, के. ए. पोतदार

**० माधवसुत** : पहा कुलकर्णी, दामोदर माधव

**मानकर, भुजंगराव रामचंद्र** : (ज. ७ जानेवारी, १८६४ – मृ. १५ नोव्हेंबर, १९४४, मुंबई). मराठी लघुलिपी या विषयावरील पुस्तकाचे कर्ते. शिक्षण मॅट्रिकपर्यंत. परदेशी कंपनीत नोकरी.

इंग्रजी भाषेतील इतिवृत्त लघुलिपीत लिहिण्यात प्रावीण्य संपादन केले असल्याने डॉ. सर भालचंद्र भाटवडेकर ह्यांच्या सूचनेवरून यांनी मराठी लघु लिपी तयार केली. ह्या विषयावरील *लघुलेखनकला* (१८९७) हे यांचे पुस्तक प्रसिद्ध आहे. मराठी लघुलेखनासंबंधीचे पहिलेवहिले पुस्तक म्हणून हे महत्त्वाचे आहे. मराठीप्रमाणेच यांनी गुजराती लघुलिपीही तयार केली.

उषा टाकळकर, रा. वा. बक्षी

**मानकर, सुंदरराव भुजंगराव** : (ज. २७ सप्टेंबर, १९०६ – मृ. १८ एप्रिल, १९४६, मुंबई). नाटककार, वृत्तपत्रकार व लघुकथालेखक. १९३२ मध्ये वृत्तपत्रव्यवसायात प्रवेश. 'वसुंधरा' (१९३५), 'मौज' (१९३९), 'चित्रा' व 'नवयुग' या नियतकालिकांचे उपसंपादक. आकाशवाणीसाठी नाटके व लघुनाटिका यांचे लेखन. 'प्रभु-प्रभाव', 'प्रभु-तरुण' इत्यादी नियतकालिकांतून लेख व लघुकथा प्रकाशित.

इस्राईल झंगविल ह्यांच्या 'We Moderns' ह्या नाटकावर आधारलेले स्त्री-पुरुष संबंधावरील ह्यांचे *काचेचे घर* (१९३६) व *नवे जग* (१९५५) हे स्वतंत्र नाटक प्रसिद्ध. तमाशा या कलेकडे पांढरपेशीय समाजाची पाहण्याची वृत्ती, हा *नवे जग* या नाटकाचा विषय. *घरत या* ही त्यांची कौटुंबिक एकांकिका त्यांच्या विनोदबुद्धीची चुणूक दाखविणारी आहे.

शुभदा सबनीस, रा. वा. बक्षी

**मावजी, पुरुषोत्तम विश्राम** : (ज. १८७९, काठेवाड – मृ. २ जुलै, १९२९). इतिहासाभ्यासक, ऐतिहासिक व कलाविषयक वस्तूंचे संग्राहक. एका सधन भाटिया कुटुंबात जन्म. प्रवेशपरीक्षेनंतर जेम्स मॅकडोनल्ड नावाच्या इंग्रज गृहस्थाजवळ घरीच अभ्यास. इतिहास संशोधन, प्राचीन वस्तूंचा संग्रह यांचा छंद. चित्रकलेच्या प्रचारार्थ मुंबईस 'लक्ष्मी आर्ट प्रिंटिंग प्रेस' काढून 'सुवर्णमाला' नावाचे मासिक यांनी काही काळ चालविले. नाना फडणीसांचे दप्तर आणि पारसनिसांचा ऐतिहासिक वस्तुसंग्रह खरेदी केला. महाराष्ट्राच्या इतिहासाविषयी विशेष आस्था. साताऱ्याचे इतिहाससंशोधक रा. ब. पारसनीस ह्यांच्या सहकार्याने, गणेश चिमणाजी वाड यांनी संकलित केलेली कागदपत्रे संपादित करून, पदरमोड करून यांनी प्रसिद्ध केली. *दक्षिणेतील सरदारांच्या कैफियती, यादी वगैरे* (१९०८), *पत्रव्यवहार, निवाडपत्रे* (१९०९), *सनदपत्रांतील माहिती* (१९१३), *तह व करारमदार (पेशवे दप्तरातील २६ प्रकरणे, १०६ पत्रे)* (१९१४) हे ह्यांचे ग्रंथ, प्रारंभीच्या काळातील संशोधन कार्य म्हणून महत्त्वाचे.

नंदिनी खोडलीकर, म. ना. लोही

**मिचेल, (रे.) जे. मरे** : (ज. १८१४ – मृ. नोव्हेंबर, १९०४). ख्रिस्ती धर्मोपदेशक, तुकारामाचा चाहता व अभ्यासक, बहुभाषाकोविद.

ॲबरडीन विद्यापीठाच्या एम्.ए. व एल्एल्.डी. या पदव्या संपादन करून त्यांनी चर्च ऑफ स्कॉटलंडकडून धर्मोपदेशकाची दीक्षा घेतली. स्कॉटिश मिशनतर्फे धर्मप्रसाराचे काम करण्यासाठी नोव्हेंबर, १८३८ मध्ये यांचे मुंबईस आगमन झाले. कृष्णशास्त्री साठे यांच्या मदतीने त्यांनी मराठी भाषेचा अभ्यास केला. रे. डॉ. स्टिव्हन्सनकडून संस्कृत भाषा शिकले. पुढे त्यांनी बायबलचे मराठी भाषांतर सुधारण्याचे काम हाती घेतले. डॉ. विल्सननी स्थापन केलेल्या शाळेत व पुढे विल्सन कॉलेजमध्ये शिकविण्याचे काम ते करीत. १८४८ साली 'बॉम्बे ट्रॅक्ट ॲंड बुक सोसायटी'चा सहचिटणीस म्हणून नेमणूक. पुणे कॉलेजचे व्हिजिटर म्हणून नेमणूक झाल्यावर त्यांनी कॉलेजचा मराठी, विभाग व संस्कृत कॉलेज चालविले. त्या दोन्ही विभागांतील अभ्यासक्रमात त्यांनी बऱ्याच सुधारणा केल्या. शालेय पुस्तकांची रचना करण्यासाठी नेमलेल्या समितीचे ते एक सभासद होते. तसेच मराठी भाषेत उत्तम ग्रंथ निर्माण व्हावेत व वाङ्मयविकास व्हावा, यासाठी १८५१ साली निर्माण झालेल्या 'दक्षिणा प्राइझ कमिटी'चे ते एक कार्यकर्ते सभासद होते. या कामी त्यांनी मे. कँडी यांच्याबरोबर पुष्कळ श्रम घेतले.

यांच्यावर तुकाराम महाराजांच्या अभंगांचा एवढा प्रभाव पडला होता की, त्यांनी अभंगमय *येशूख्रिस्तमहात्म्य* लिहावयास घेतले.

त्याचे सहा अध्याय (१,८६६ अभंग) ज्ञानोदयाच्या एप्रिल ते ऑगस्ट १८५५ या अंकांत प्रसिद्ध झाले. यांनी महिपतीच्या भक्तलीलामृतातील तुकारामचरित्राचा सारांशाने इंग्रजीत अनुवाद करून त्याला विवेचक प्रस्तावना जोडली. तुकारामाच्या पंचावन्न अभंगांचे इंग्रजीत भाषांतर केले. तसेच ज्ञानेश्वरीतील काही भागाचे इंग्रजी भाषांतर करून छापले, *नारळी पौर्णिमा* (१८५१), *आळंदीची यात्रा* (१८५५), *पंढरपूरची यात्रा* (१८५५), *तुकाराम याची गोष्ट* (१८५६), *कुणब्याशी संभाषण* (१८६३), *खंडोबाची गोष्ट* (१८७७) ही त्यांची आणखी काही मराठी पुस्तके. मोल्सवर्थ, कँडी यांच्याप्रमाणेच यांनी मराठी भाषेची व वाङ्मयाची मोठी सेवा केली. महाराष्ट्रातील आपल्या २५ वर्षांच्या वास्तव्याच्या स्मृती त्यांनी 'इन वेस्टर्न इंडिया' (१८९९) या ग्रंथात नमूद करून ठेवल्या आहेत.

क. भि. कुळकर्णी, के. ए. पोतदार

**(मिसेस) मिचेल, मेरी एल्. :** (ज. १९ एप्रिल, १८२७–मृ. २१ एप्रिल, १९०६). यांचे माहेरचे नाव मिस् बोमंट होते. शिक्षण पुरे केल्यावर अमेरिकेतील ओहायओ संस्थानातल्या मिलन येथे शाळेत शिक्षिका म्हणून कामाला लागल्या. पुढे शाळेचे प्रिन्सिपॉल डॉ. लेमुग़ुल मिचेल यांच्याशी ६ एप्रिल, १८५१ रोजी विवाह. नंतर २७ ऑगस्ट, १८५१ रोजी मिचेल दांपत्य साडेतीन महिन्यांच्या प्रवासानंतर भारतात पोहोचले. मिसेस मिचेलनी प्रवासातच मराठीचा अभ्यास केला. येथे आल्यावर दोघांनीही शिरूर (घोडनदी) येथे मिशनरी कार्य सुरू केले. १८५७ च्या रणधुमाळीत ते जिवाच्या भीतीने नगरला काही दिवस येऊन राहिले होते. १८६२ पासून ते नगरला कार्य करू लागले. नगरच्या मुलींच्या शाळेची सूत्रे १८६७ ते १८८२ मिसेस मिचेल यांच्या हाती होती. याशिवाय त्या स्त्रियांकरिता खास सभा भरवून उपासना चालवीत. या उपासना दुपारी १२ पासून पुढे चालवीत. याशिवाय त्रैमासिक सभाही होत. तसेच इतर धर्मीयांच्या घरी जाऊन त्या स्त्रियांच्या भेटी घेत. त्यांनी मुलांसाठी स्टेशनस्कूल काढले होते. अनेक वर्षे त्यांनी मिशनच्या आंधळ्यापांगळ्यांसाठी आणि विश्रांतीसाठी असलेली धर्मशाळाही अनेक वर्षे चालविली. त्यांच्या पदरी बायबल शिक्षण देणाऱ्या महिला कामावर ठेवलेल्या असत.

मिसेस मिचेल यांनी 'होमिओपॅथिक' उपचारांचा चांगला अभ्यास केलेला होता. त्यांना संगीताची विशेष गोडी होती. त्यांनी काही स्वतंत्र व भाषांतरित काव्यरचना केली आहे. तसेच त्यांची काही मराठी काव्यात्मक पुस्तकेही प्रसिद्ध झाली आहेत. भारतात त्यांची १५ वर्षे सेवा झाली. त्यांना 'मदर मिचेल' असे संबोधित. दिनांक २१ एप्रिल, १९०६ रोजी त्यांना वाई येथे मृत्यू आला. त्यांचे वाङ्मय असे —

वाङ्मय : (१) एका आईचे शेवटचे भाषण (पद्यात्मक), १८७५ BTBS, पृष्ठ ३१, आवृत्ती पहिली. The Mother's last word's चे भाषांतर. (२) ख्रिस्ती स्त्रियांच्या कर्तव्याविषयी निबंध, १८८४, मुंबई, पृ. २१. (३) शास्त्रात वर्णिलेल्या स्त्रिया, भाग–१, १८८८. (४) शास्त्रात वर्णिलेल्या स्त्रिया, भाग–२, १८९०, पृ.८+२५०, (५) बुलबुल (संपादन - मिसेस मिचेल), अहमदनगर, १८७४, दुसरी आवृत्ती, १८८१.

ज्या मिशनरी व्यक्तींनी भारतात येऊन दीर्घकाळ समाजसेवा व मराठी भाषेची सेवा केली त्यांत मिचेल बाईंचा आवर्जून उल्लेख करावयास हवा.

भास्कर जाधव

संदर्भ : अमेरिकन मराठी मिशनचा इतिहास–१८१३–१९१३.

**मित्र, काशिनाथ रघुनाथ :** (ज. २ नोव्हेंबर, १८७१, आजगाव, ता. सावंतवाडी, जि. रत्नागिरी–मृ. २३ जून, १९२०, मुंबई). मूळ आडनाव आजगावकर, परंतु बंगाली भाषेच्या प्रेमात पडल्यामुळे 'मित्र' हे आडनाव त्यांनी धारण केले. *मासिक मनोरंजन* या सुप्रसिद्ध नियतकालिकाचे संस्थापक संपादक, बंगाली कादंबऱ्यांचे अनुवादक.

शिक्षण सहावी इयत्तेपर्यंत. त्या वेळच्या पब्लिक सर्व्हिस कमिशनच्या परीक्षेत उत्तीर्ण. वेंगुर्ले येथील मराठी शाळेत शिक्षक (१८८८). वृत्तपत्र-व्यवसायाच्या ओढीमुळे १८९३ च्या सुमारास ते मुंबईत आले. प्रथम 'प्रभाकर' पत्राचे बातमीदार. 'मासिक मौज' या गुजराती पत्राचा अंक पाहून मराठीत आपणही असाच प्रयत्न करून पाहवा, या निश्चयाने त्यांनी जानेवारी, १८९५ मध्ये *मासिक मनोरंजनाचा* पहिला अंक काढला.

जुन्यानव्याच्या समन्वयातून, काळानुकूल बदल त्या परिस्थितीत वैयक्तिक विकास व सामाजिक प्रगतीस पोषक ठरेल, अशा रीतीने राजकारण, समाजकारण, धर्म याबाबतीत लोकांपुढे काही नवे ठेवून त्यांच्या विचारांना शुद्ध वळण लावणे, हे या मासिकाचे ध्येय होते. मासिक सर्वसामान्य लोकांमध्ये लोकप्रिय व्हावे, यासाठी ललित लेखनाचे माध्यम त्यांनी स्वीकारले. जुनी नवी मराठी कविता, चरित्रे, कथा, विनोदी लेख, शास्त्रीय माहिती, ज्ञानप्रद चुटके असे विविधांगी साहित्य त्यातून प्रसिद्ध होत असे. त्यांनी नवनवे विशेषांक काढण्याचा उपक्रम केला. स्त्रीवर्गाला व नवोदितांना लिहिण्यास प्रोत्साहन दिले. त्यावेळची नवी कविता, काव्यचर्चा, कथा यांना आस्थेने प्राधान्य दिले. मराठी कथेला त्या काळात बांधीव व देखणे व्यक्तिमत्त्व प्राप्त होत होते त्याचे बरेचसे श्रेय या मासिकाकडे जाते.

या मासिकातूनच १९१३-१४ सालापर्यंत वि. सी. गुर्जर, कृ. के. गोखले, श्री. कृ. कोल्हटकर, बा. स. जोशी, वामनसुता, वा. गो. आपटे, गो. गं. लिमये, आनंदीबाई शिर्के, सहकारी कृष्ण असे अनेक कथालेखक व गोविंदाग्रज, बालकवी यांसारखे कवी पुढे आले व नावलौकिकास पावले. *मनोरंजनच्या* संपादनात साहाय्य करणाऱ्यांमध्ये वि. सी. गुर्जर व कवी ए. पां. रेंदाळकर यांनी मासिकासाठी अनेक कथा लिहिल्या. गुर्जर तर अखेरपर्यंत सातत्याने लिहीत राहिले. १९२२-२३ च्या सुमारास *मनोरंजनातून* दिवाकर कृष्णांचा उदय झाला. सौंदर्यदृष्टी ठेवून रसिकपणे आपल्या मासिकाची सजावट करणारे मित्र हे मराठी नियतकालिकाचे पहिले कुशल व कल्पक संपादक ठरतील.

*मनोरंजनमधून* मराठी कथांबरोबरच हिंदी, बंगाली, गुजराती, तामीळ, तेलगू आदी परप्रांतीय भाषांतील कथाही अनुवादित करून देण्याची प्रथा ठेवल्यामुळे वैविध्य वाढले. स्वतः मित्र यांनी बंगालीवरून बऱ्याच कादंबऱ्या अनुवादित केल्या व 'मनोरंजन ग्रंथ प्रसारक माला' या त्यांच्याच स्वतंत्र प्रकाशनाने प्रसिद्ध केल्या. त्यापैकी *धाकटया सूनबाई* (द्वि. आ., १९०२), *प्रियंवदा* (आ. ४., १९१७), *गरीब बिचारी यमुना* (आ. २., १९१४) या यांच्या कादंबऱ्या लोकप्रिय ठरल्या. यांचा *कुसुमगुच्छ* कवितासंग्रह (१९०४) व दोन *घटका मनोरंजन* : मनोरंजनातील कथा भाग १, २, ३ (१९०८, १९०९ व १९२०) असे संपादित ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

उषा टाकळकर, के. ए. पोतदार

संदर्भ : (१) वा. ल. कुलकर्णी, 'मासिक मनोरंजन', वाङ्मयीन दृष्टी आणि दृष्टिकोन. (२) शा. शं. रेगे, 'लोकमित्र का. र.', 'साहित्य' (दिवाळी), १९८३.

**मिरजकर, मुकुंद गणेश :** ० मुकुंदराय : (ज. ४ एप्रिल, १८८२–मृ. १९४१). कवी व संस्कृत ग्रंथांचे भाषांतरकार. शिक्षण कोल्हापूरच्या संस्कृत पाठशाळेत. काव्य, नाटक, कौमुदी, व्याकरण व अलंकार

शास्त्रविषयक ग्रंथांचा अभ्यास. कोल्हापूरच्या जैन संस्कृत पाठशाळेत व पुढे हिंगणे व नंतर न्यू इंग्लिश स्कूलमध्ये शिक्षक. त्यांच्या पहिल्या कविता कोल्हापूरच्या 'समर्थ' पत्रात प्रसिद्ध. पुढे 'काव्यरत्नावली', 'विविधज्ञानविस्तार' व 'केसरी' यांतून त्यांच्या कविता प्रसिद्ध होऊ लागल्या. *सुभाषित–पुष्प-मकरंद* (१९२४) हे संस्कृत सुभाषितांचे भाषांतर व *श्रीलक्ष्मीशतक* (१९२७) हे वेंकटाध्वरी या कवीच्या संस्कृत वेच्यांचे पद्यरूपांतर आहे. *श्रीलघुगीता* (द्वि. आ., १९२४) हे गीतेतील निवडक २०० श्लोकांचे भाषांतर असून रचना प्रौढ व प्रासादिक आहे. संस्कृत ग्रंथांच्या त्यांनी केलेल्या भाषांतरांपैकी *मनुस्मृति* (१९२७), *श्रीमद्‌भागवत, भाग १ व २* (१९१८), *कर्मयोग अथवा श्रीमद्‌भगवद्‌गीता* (१९२७) हे काही महत्त्वाचे ग्रंथ. श्रीगुरुचरित्रातील चरित्रसार *श्रीगुरुकथामृत* (१९१३) या ग्रंथात आहे.

उषा टाकळकर, के. ए. पोतदार

**मिरीकर, (सरदार) नारायण यशवंत ऊर्फ नानासाहेब मिरीकर** : (ज. १८८४ – मृ. २३ सप्टेंबर, १९४१, चांदोरी, जि. नाशिक). इतिहाससंशोधक व ज्ञानदेव वाङ्मयाचे व्यासंगी. नगरजवळील मिरी गावचे जहागिरदार व नगरच्या प्रसिद्ध सरदार घराण्यापैकी. शालेय शिक्षण अहमदनगर येथे (फिरोदिया हायस्कूल). हायकोर्ट प्लीडरची परीक्षा पास होऊन नगर येथे वकिली व्यवसाय करीत. नाथपंथ, महानुभावपंथ तसेच नगरचा इतिहास याच्या संशोधनार्थ ते सबंध नगर जिल्हा पायी हिंडले. १९३४ साली नगरला स्थापन झालेल्या ज्ञानेश्वरी चर्चा मंडळाचे ते क्रियाशील सदस्य होते. ज्ञानेश्वरदर्शन ग्रंथ सिद्धीसाठी पुढाकार. ज्ञानेश्वरी चर्चा मंडळाचे 'ज्ञानदेवी' या पाठशुद्ध प्रतीत (१९४७) ज्या विपुल टीपा दिल्या आहेत, त्यात ज्ञानेश्वरीतील नाथपंथीय अनेक संकेत, ध्वनिते, गूढार्थ उलगडण्याचा प्रयत्न केला आहे. या कामी संपादक धनेश्वर यांना मिरीकरांच्या गाढ अभ्यासाचा व विद्वत्तेचा फार उपयोग झाला. मिरीकरांचा *अहमदनगरचा प्राचीन खरा इतिहास* (१९१६) हा ग्रंथ प्रसिद्ध आहे. या ग्रंथाची सुधारित आवृत्ती १९६८ साली त्यांचे पुतणे रा. गो. मिरीकर यांनी प्रसिद्ध केली. ते संगीताचेही व्यासंगी होते. खाँसाहेब अब्दुल करीमखाँ यांचे शिष्यत्व त्यांना लाभले होते. मिरीकर नाट्यक्षेत्राचेही दर्दी होते. त्यांनी 'धनुर्भंग' नावाचे नाटक लिहिले होते असे सांगण्यात येते. पण ते उपलब्ध नाही. ज्ञानेश्वर विद्यापीठ काढण्याची त्यांची एक योजना होती.

उषा टाकळकर, के. ए. पोतदार

**मिसाळ, पारुजी नारायण** : (ज. १० एप्रिल, १८८८, कुंभार माळवाडी, ता. मालवण, जि. रत्नागिरी – मृ. २७ मे, १९५५). बालवाङ्मयाचे लेखक व संपादक. सबंध हयात मालवणच्या परिसरात घालविली. जन्म लिंगायत समाजातील गुरे वळणाऱ्या जमातीत. परंतु आयुष्यभर त्यांनी वाचन, लेखन, अध्यापन केले. शिक्षण मराठीतून फायनलपर्यंत. इंग्रजी, हिंदी व बंगाली भाषांचा परिश्रमपूर्वक परिचय करून घेतला व कन्नड भाषा शिकून वयाच्या एकसष्टाव्या वर्षी मराठी वाचकांसाठी कानडीचे उजळणी पुस्तक तयार केले. १९२० साली ते देऊळवाडा शाळेत शिक्षक झाले. नाना प्रकारच्या गोष्टी, कविता, चरित्रपर लेख लिहून ते विद्यार्थ्यांची मने रिझवीत. या सर्व लेखांचे छोटे संग्रह व पुस्तके त्यांनी प्रसिद्ध केली, 'बाल सन्मित्रमाला' गुंफली. मुलांची करमणूक करता करता, ते बोधप्रद लिहीत. त्यांच्या पुस्तकांची नावे *नीतिमंजूषा*, *बालबोधकथा*, *बालभूषण*, *सद्‌गुणी*, *सद्‌बोध मकरंद* आदी. *मालवण तालुक्याचा भूगोल* (आ. आठवी, १९३७), *वेंगुर्ले महालाचा भूगोल* (आ. सातवी, १९३७), *अभ्यास* (१९१३), *सन्मित्रदर्शन* (आ. तिसरी, १९२९), *याचे नाव मित्रप्रेम* (१९२८), *शेवटी सत्याचा विजय* (१९२८), *सद्‌वर्तनाची कसोटी* (आ. दुसरी, १९२९), *दिवाळीची देणगी* (१९१३), *नीतिमंजुषा* (१९३०), *गमतीच्या गोष्टी* (१९२९). त्यांनी मुलांकरिता इतरही सतरा पुस्तके लिहिली आहेत.

त्यांनी १९३४ साली *बालसन्मित्र* हे मुलांचे पाक्षिक सुरू केले व त्याकडे पूर्ण लक्ष देता यावे म्हणून पुढल्याच वर्षी नोकरीचा राजीनामा दिला. या पाक्षिकात ते कटाक्षाने बहुविध प्रकारचा मजकूर देत. त्यासाठी ते स्वतः तर लिहीतच, पण पुणे, मुंबई, नागपूरच्या नामवंत लेखकांशी संपर्क ठेवून लेख जमवीत. संपादक म्हणून त्यांची योग्यता मोठी आहे. 'आनंद'कर्ते वासुदेव गोविंद आपटे आणि 'खेळगडी'कार काशीनाथ रावजी पालवणकर या संपादकांबरोबरच त्यांचे नाव घ्यावे लागेल. आयुष्याच्या शेवटच्या क्षणापर्यंत धडपड करून त्यांनी *बालसन्मित्र* चालवला.

भा. रा. भागवत, के. ए. पोतदार

**मुंडले, वासुदेव दामोदर** : (ज. १८८० – मृ. ७ फेब्रुवारी, १९४७). चरित्रकार, पत्रकार. शिक्षण बी.ए.पर्यंत. उपजीविकेसाठी काही काळ एका व्यापारी कंपनीत नोकरी. पण १९०५ साली नोकरी सोडून यांनी *प्रतोद* (साप्ताहिक) सुरू केले. राजद्रोहाच्या आरोपाखाली एक वर्षाचा तुरुंगवास. काही काळ ना. कृ. गद्रे यांच्या 'सरस्वतिमंदिर' नियतकालिकाचे संपादन.

यांनी इतिहासाचार्य राजवाड्यांपासून संशोधनाची प्रेरणा घेऊन 'धनगरी गाणी' गोळा केली व भारत-इतिहाससंशोधन-मंडळाच्या त्रैमासिकात सर्वप्रथम प्रसिद्ध केली. १९२० च्या सुमारास *ब्राह्मणपत्रिका* काढून ब्राह्मण-ब्राह्मणेतर चळवळीवर लेखन करून दोन्ही पक्षांना अंतर्मुख करून ऐक्य साधण्याचा त्यांनी प्रयत्न केला. 'चैतन्योत्पादक ग्रंथमाला' व 'आर्यसंस्कृति-परिचयमाला' यांचे काही काळ संपादन. शिवाय निरनिराळ्या पत्रिकांतून विपुल स्फुटलेखन. 'स्वदेशभक्तीच्या भावनेने उद्दीपित झालेल्या, स्वराज्य–स्वातंत्र्य यांची आकांक्षा धरणाऱ्या महाराष्ट्रीय तरुणांची उच्छृंखलता–विकारवशता कमी करून, त्यास बहुश्रुत विचारवंत, साक्षेपी बनवून इतर देशांतील लोकांनी स्वातंत्र्य देशोद्धाराचे प्रश्न कशा रीतीने सोडविले याचे सापेक्ष ज्ञान करून देण्या'च्या हेतूने सहा चरित्रे लिहून प्रसिद्ध केली. *कावूर ऊर्फ इटलीचा रामदास* (१९०५), *नेपोलियन बोनापार्ट* (१९१५), *प्रिन्स बिस्मार्क* (१९१७), *विल्यम द सायलेंट* – 'स्पॅनिश साम्राज्याच्या जुलुमातून हॉलंड देशाची मुक्तता करणारा वीर व मुत्सद्दी' (१९२४) हे यांतील प्रमुख चरित्रग्रंथ. स्वत्वाची विस्मृती झालेल्या नवशिक्षितांसाठी *बालमनुस्मृति* (१९१३), *आर्यांची चतुर्विध नीति* (१९१९) आणि *भारतमुक्ताहार* (१९१५) ही पुस्तकेही त्यांनी लिहिली. *कार्ल मार्क्स आणि त्याचे कार्य* (१९४५) हे त्यांचे शेवटचे पुस्तक.

श्री. गं. मोडे, म. ना. लोही

**मुजुमदार, गोपाळ गोविंद** : ० साधुदास : (ज. १८८३, सांगली – मृ. ६ एप्रिल, १९४८). कवी व कादंबरीकार. शिक्षण सांगली येथे. पुण्यास काही महिने फर्ग्युसन कॉलेजमध्ये काढल्यानंतर सांगली येथे हायस्कुलात शिक्षक व नंतर सांगली संस्थानाचे मुद्रणालयाधिकारी. १९२९ मध्ये संस्थानचे राजकवी. १९४१ मध्ये कऱ्हाड येथे भरलेल्या दक्षिण महाराष्ट्र साहित्यसंमेलनाचे अध्यक्ष. कवी यशवंतांचे लेखनगुरू.

त्यांच्या विविध स्वरूपाच्या वाङ्मयविषयक कार्यात तीन संपूर्ण महाकाव्ये, स्फुटकाव्यांचे दोन संग्रह, चार ऐतिहासिक कादंबऱ्या,

एक चरित्र, एक बुद्धिबळविषयक ग्रंथ, शालेय विद्यार्थ्यांकरिता दोन मराठी पुस्तके इतका ग्रंथसंभार येतो. त्यांना मुख्यतः मान्यता मिळाली आहे, ती आधुनिक काळात संस्कृत महाकाव्यांची परंपरा मराठीत आणून सोडण्याबद्दल. ते अध्यात्ममार्गी होते.

'साधुदास' या कविनामानेच ते अधिक लोकपरिचित होते. त्यांनी १९०७ मध्येच अनुग्रहपूर्वक रामोपासना स्वीकारली. शीघ्रकवित्वाबद्दलही त्यांची ख्याती आहे. १९१० मध्ये रघुवंशाचे वाचन करीत असताना आपणही आपल्या उपास्यदेवतेवर काव्य लिहावे, अशी त्यांना प्रेरणा झाली. रामवनवासावर *वनविहार* हे काव्य (१९१२) लिहिले. त्यात सतरा सर्ग, सहा ऋतूंचे वर्णन, दिवसातील निरनिराळ्या काळांचे व स्थळांचे वर्णन, निसर्गघटनांचे वर्णन आलेले आहे. संस्कृतमधील पंचमहाकाव्यांचे उदाहरण समोर ठेवून भिन्न भिन्न वृत्तांमधील सर्गबंधाची रचना त्यात केली आहे. या सर्गांमध्ये एकाक्षरी, एकस्वरी, श्लोक, यमकानुप्रासांचे प्रकार आढळतात. त्यानंतर *रणविहार* (१९१६) आणि *गृहविहार* (१९२८) अशी दोन महाकाव्ये त्यांनी रामकथेबरोबरच लिहिली. मराठी काव्यरचनेच्या दृष्टीने त्यांची ही रचना काहीशी क्लिष्ट असली तरी मराठी काव्याच्या इतिहासात ती महत्त्वपूर्ण आहे. त्यांनी १९१८ साली महायुद्धावर एक पोवाडाही लिहिला आहे. त्यांनी संस्थानी राजकारणावर *राजसेवा* (१९१८) नावाचे एक नाटकही लिहिले आहे.

त्यांची स्फुट कविता *निर्माल्यसंग्रहाच्या* दोन भागांत प्रकाशित झाली आहे. भाग १ (१९१८), भाग २ (१९२४). त्यात त्यांच्या स्तोत्रांचा व इतर स्फुट कवितांचा समावेश आहे. त्यांच्या स्तोत्रांतून भावनेचा आविष्कार महाकाव्यापेक्षा अधिक होतो. यातील चार स्तोत्रे म्हणजे शतके झाली आहेत. *सीतेचे स्तोत्र* हे सर्वांत रसाळ उतरले आहे.

मराठेशाहीच्या शेवटचा म्हणजे इ. स. १७६१ पासून १८१८ पर्यंतचा इतिहास १५-१६ कादंबऱ्यांतून सांगण्याची त्यांची मनीषा होती. त्यापैकी तीन खंड पूर्ण झाले. (१) *मराठेशाहीची अखेर–पौर्णिमा, पूर्वरात्र आणि उत्तररात्र*, अनुक्रमे १९३१ व १९३२. (२) *मराठेशाहीचा वद्यपक्ष-प्रतिपदा-पूर्वरात्र व उत्तररात्र*, १९३५ व १९३९. (३) *मराठेशाहीचा वद्यपक्ष-द्वितीया-पूर्वरात्र व उत्तररात्र* हे तीन खंड होत. मात्र या कादंबऱ्यांना विशेष लोकप्रियता लाभली नाही. त्यांच्या *मराठीची सजावट* या शालोपयोगी पुस्तकाचे दोन भाग प्रसिद्ध झाले आहेत (१९२९). *बुद्धिबळाचा मार्गदर्शक* (१९२५) आणि परमार्थातील आपले मार्गदर्शक *कोटणीस महाराज* यांचे चरित्र त्यांनी लिहिले आहे (१९३७).

रा. श्री. जोग, के. ए. पोतदार

**मुजुमदार, (सरदार) चिंतामण नारायण :** (ज. १७ जुलै, १८५८, बडोदे – मृ. २४ मे, १९२६). कादंबरीकार व नाटककार. बडोद्यातील प्रख्यात सरदार घराण्यात जन्म. तेथील 'सहविचारिणी सभे'चे प्रमुख सदस्य. शंकर मोरो रानडे ह्यांच्या सहवासामुळे लेखनाची प्रेरणा. *शेवटचा शूर बाबेर* (१८९७), *लाख्या बारगीर* (१९२०), *गुजराथचा समशेर बहादर* (१९२३), *राणा हमीर* (१९२४) ह्या गुजरात व राजस्थानच्या इतिहासावर आधारलेल्या यांच्या कादंबऱ्या प्रसिद्ध आहेत. *संगीत साहस्य-चमत्कार अथवा भ्रमनिरसन* (१९२४) हे सामाजिक नाटकही प्रसिद्ध आहे. ब्रिटिश राजवटीमुळे स्वत्वविस्मृत झालेल्या समाजात स्वदेश व स्वधर्म ह्यांच्याविषयीचा अभिमान जागृत करणे, हा ह्यांच्या ऐतिहासिक कादंबरीलेखनामागील हेतू होता.

नंदिनी लोटलीकर, रा. बा. बक्षी

**मुजुमदार, शंकर बापूजी :** (ज. १८६२, पुणे – मृ. २८ नोव्हेंबर, १९३८, पुणे). रंगभूमीविषयक माहितीचे संग्राहक व लेखक आणि 'रंगभूमी' मासिकाचे संस्थापक.

कुमारवयापासून सांगलीकर नाटक मंडळींत स्त्रीपात्री नट व अठराव्या वर्षी अण्णासाहेब किर्लोस्करांच्या शाकुंतल नाटकात नायिकेची भूमिका. १८९३ साली किर्लोस्कर कंपनीचे व्यवस्थापक झाले ते १९२४ पर्यंत त्या पदावर होते.

शंकररावांनी किर्लोस्कर नाटकमंडळीतर्फे १९०७ साली 'रंगभूमी' मासिक सुरू केले व ते बारा वर्षे चालविले. 'नाटक' या विषयाला वाहिलेले मराठीतील हे पहिलेच मासिक. ह्या मासिकातून शंकररावांनी *किर्लोस्करपूर्व नट, नाटककार व चालक यांची चरित्रे* (१९०८–१९) परिश्रमपूर्वक लिहून प्रसिद्ध केली. त्यांत विष्णुदास भावे, धोंडोपंत सांगलीकर, नरहरबुवा कोल्हापूरकर, बळवंतराव मराठे, गोपाळराव दाते आदींच्या चरित्रांचा समावेश आहे. *महाराष्ट्रीय नाटककार ह्यांची चरित्रे* हा चरित्रसंग्रह प्रसिद्ध आहे (प्रकाशनवर्ष अनुपलब्ध). त्यांचे गाजलेले व रंगभूमीचे इतिहासकार व अभ्यासक यांना अत्यंत उपयुक्त ठरलेले चरित्र म्हणजे *अण्णासाहेब किर्लोस्कर ह्यांचे चरित्र* (१९०४) तसेच *भारत नाट्यसमाजाची ४ ते ११ पर्यंत संमेलने* (१९३४) हा ग्रंथही महत्त्वाचा आहे. त्यांच्या सिद्धतेसाठी त्यांनी कृ. आ. गुरुजी व अनंत वामन बर्वे यांचे साहाय्य घेतले. ज्या काळात कुलीन स्त्रिया रंगभूमीवर पदार्पण करू लागल्या होत्या त्या काळात *कुलीन स्त्रिया विरुद्ध रंगभूमी* (१९३४) हे पुस्तक त्यांनी लिहिले. शिवाय *जगद्विख्यात नाटककार शेक्सपिअर व त्याची नाटके व भाषांतरे* (१९१४) हे पुस्तक गो. वा. बापट यांच्या मदतीने लिहून प्रसिद्ध केले.

शंकररावांना लेखनाची किती आवड होती याची कल्पना *जगप्रसिद्ध नट गॅरिक यांचे चरित्र* (१९३०) आणि *लंडनरहस्य* (१८९४) या रेनॉल्डसकृत 'मिस्टरीज ऑफ लंडन' या कादंबरीच्या भाषांतरावरून येते. एका मोठ्या नाटकमंडळीच्या व्यवस्थापनाची जबाबदारी पार पाडत असतानाही त्यांनी मराठी नट, नाटककार व रंगभूमी ह्यांविषयी केलेले लेखन 'मराठी रंगभूमीच्या इतिहासा'साठी आधारभूत साहित्य म्हणून महत्त्वाचे आहे.

मं. मा. नाडकर्णी, म. ना. लोही

**मुजुमदार, सखाराम गणेश :** (ज. १८८२, कुंभारघर – मृ. १९३२, ठाणे). निबंधकार, कादंबरीकार व चरित्रकार. शिक्षण मराठी सात इयत्तांपर्यंत. नंतर बडोद्यास छापखान्यात नोकरी. काही काळ विठ्ठलगड आणि पालनपूर संस्थानात कारभारी. संस्थानी नोकरी सुटल्यावर ठाणे येथे ज्योतिषाचा व्यवसाय.

*वारुणी आणि विश्वमोहिता* ही कादंबरी (१८९१), *नशीब आणि उद्योग* हा निर्णयसागरचे पहिले पारितोषिक मिळालेला निबंध (१८९२), *प्रभुरत्नमाला* (१८९६) हे प्रभू घराण्यातील वीर व मुत्सद्दी पुरुषांच्या ऐतिहासिक चरित्रांचे पुस्तक, *सावशेष साम्राज्य* (१८९७) हा संस्थानिक व ब्रिटिश सरकार यांच्या संबंधावर वार्नरकृत 'हिंदुस्थानचे संरक्षित राजे' या पुस्तकाच्या आधारे लिहिलेला टीकाग्रंथ. *हिंदुस्थानातले दुष्काळ* हा निबंध (१९०१), *उदरोजी नाईकचे चरित्र* हा रूपकात्मक निबंध (१८९२) आणि *महाराणी जमनाबाईसाहेब गायकवाड यांचे चरित्र* (१९०५) ही यांची ग्रंथरचना.

याशिवाय 'ज्योतिर्माला' मासिकात 'ज्योतिषातील ग्रहफले' व 'कायस्थमित्र' मासिकात 'सुमेरियन संस्कृति' या त्यांच्या गाजलेल्या लेखमाला प्रसिद्ध झाल्या.

नंदिनी लोटलीकर, म. ना. लोही

**मुजुमदार, श्रीपाद नारायण :** नारायणसूत : (ज. १५ एप्रिल, १८७७, आजरे-कोल्हापूर, –मृ. १४ ऑक्टोबर, १९०७, खजुरिया-इन्दूर).

कवी. १८७१ साली मुंबईच्या विल्सन कॉलेजातून बी.ए. पंढरपुरास व दापोलीच्या मिशनस्कूलमध्ये शिक्षक. सहा वर्षे दापोलीस राहून नंतर ईडूर संस्थानात मुन्सफची नोकरी.

दापोलीस असतानाच ह्यांनी काव्यरचनेस सुरुवात केली. आरंभीची कविता 'काव्यरत्नावली' व 'मनोरंजन' मासिकांतून प्रसिद्ध झाली. *मोहनतारा* (१९०४) व *हंसदूत* (१९०४) ही खंडकाव्ये पुस्तकरूपात तर *छत्रपती शिवाजी महाराज* (सर्ग १२, कडवी ९२७), *सुभद्राविवाह काव्य* (सर्ग १२, गीति ६०१) ही महाकाव्ये अनुक्रमे १९०६ व १९१२ साली 'काव्यरत्नावली'त क्रमशः प्रसिद्ध झाली. याशिवाय त्यांनी 'वीरमती द्रौपदी', 'कपटविपाक', 'वसंत–चंद्रिका', 'विरहिणी किंवा प्रियोपलब्धि', 'दशरथनिधन' इत्यादी स्फुट प्रकरणे रचली आहेत. ह्यांची काव्यरचना दीर्घस्वरूपाची व संस्कृत कवितेच्या धाटणीची आहे.

उषा टाकळकर, म. ना. लोही

**मुळे, कृष्णराव गणेश :** (ज. डिसेंबर, १८६४–मृ. २१ जुलै, १९४४). संगीतशास्त्रावरील ग्रंथकार. बालपण पुण्यातील घारपुरे ह्या संगीतज्ञांच्या आश्रयाखाली गेले. तेथेच प्रवेशपरीक्षेपर्यंतचे शिक्षण. सतार व बीन ही वाद्ये वाजविण्यात कुशल. नंतर ग्वाल्हेर व बडोदा येथे संगीताचे अध्ययन. १९०८ मध्ये मुंबई येथे गिरणीत कारकून. यांनी १९३२ साली दादर येथे 'वीणावादन संगीत विद्यालय' स्थापन केले. ते १९४०-४१ नंतर बंद पडले.

*भारतीय संगीत–भाग १* (१९४०) हा ह्यांचा महत्त्वाचा ग्रंथ. ह्या ग्रंथात भरताच्या 'नाट्यशास्त्र' या प्रसिद्ध संस्कृत ग्रंथातील संगीतविषयाची सविस्तर चर्चा आहे. नाट्यशास्त्रातील संगीताचा परामर्श घेणारे एकमेव लेखक म्हणजे कृष्णराव मुळे. कृष्णरावांचे प्रतिपादन असे की, 'गीतात रस महत्त्वाचा, रस हा शब्द आणि स्वरलय या दोहोतून व्यक्त होतो. म्हणून महत्त्व केवळ स्वरनादांना नव्हे, तर लय आणि शब्दोच्चार ह्यांनाही तेवढेच महत्त्व आहे.' *महाराष्ट्र संगीत* (१९२६), *संगीतिका* (१९३७), *शास्त्रसहित सतारशिक्षण–दोन भाग* (१९२६) ही त्यांची अन्य काही पुस्तके.

बा. वि. गोखले, म. ना. लोही

**मुळे, बा. ब. :** पहा पदमनजी बाबा

**मुळे, भार्गव आत्माराम :** (ज. १८०४, फोंग्रोळी, जि. रायगड–मृ. ७ ऑगस्ट, १९५५ ठाणे येथे). व्यवसाय पोष्टात नोकरी व काही काळ वकिली. भारतात बारा ज्योतिर्लिंगे प्रसिद्ध आहेत. त्यांची माहिती देणारा ग्रंथ यांनी लिहिला त्यात बारा ज्योतिर्लिंगांची ऐतिहासिक, सांस्कृतिक व पर्यटन विषयक उपयुक्त माहिती आहे.

पुस्तकाचे प्रकाशनवर्ष १९४९, याला महामहोपाध्याय कृष्णशास्त्री घुले यांची प्रस्तावना लाभली आहे.

पुस्तकाची ११२ पाने असून त्याचे तीन भाग आहेत. पहिल्या भागात आर्यांच्या वेदकालीन यज्ञात होणाऱ्या प्रार्थना वर्णिल्या आहेत. त्यानंतर दुसऱ्या भागात पौराणिक कालाची माहिती आहे.

तिसऱ्या भागात बारा ज्योतिर्लिंगांची सविस्तर माहिती व काही स्थानांची छायाचित्रे घातली आहेत.

मुळे, सुरेश भार्गव, गो. म. कुलकर्णी

**मुळे, वामन श्रीधरशास्त्री :** पहा अग्निहोत्री, वामन श्रीधरशास्त्री

**मेधावी, रमाबाई विपिन :** ० पंडिता रमाबाई (ज. २३ एप्रिल, १८५८, गंगामूळ, जि. मंगळूर–मृ. ५ एप्रिल, १९२२, केडगाव, जि. पुणे). ख्रिस्ती धर्मशास्त्र व इंग्लंड–अमेरिकेतील लोकस्थितीवर लिहिणाऱ्या ख्रिस्ती लेखिका. संस्कृतपंडिता, धर्मशास्त्रज्ञा, अर्वाचीन कालखंडाच्या आरंभकाळातील एक थोर विदुषी.

वेदशास्त्रसंपन्न अनंतशास्त्री डोंगरे ह्यांच्या कन्या. जन्माने चित्तपावन ब्राह्मण, पण वैधव्यानंतर ख्रिस्ती झालेल्या संस्कृतज्ञ विदुषी. संस्कृत भाषेवरील प्रभुत्वामुळे व व्याख्यानांमुळे कलकत्याच्या ब्राह्मसमाजी पुढाऱ्यांनी 'पंडिता रमाबाई सरस्वती' ही पदवी त्यांना दिली. १८८० साली लग्न व १८८२ मध्ये वैधव्य. युरोप–अमेरिकेत प्रवास (१८८३–८८) व १८८३ मध्ये ख्रिस्ती धर्माची दीक्षा.

*स्त्री-धर्म-नीती* (१८८२) हे ह्यांचे पहिले पुस्तक. अमेरिकेत असताना त्यांनी *हाय कास्ट हिंदू वुमन* (१८८७) हा इंग्रजी ग्रंथ लिहून व व्याख्याने देऊन पाश्चात्त्य समाजापुढे भारतीय स्त्रीची सत्यस्थिती मांडली. त्यांच्या मराठीतून लिहिलेल्या पुस्तकांत *पंडिता रमाबाई यांचा इंग्लंडचा प्रवास* (१८८३) आणि *युनायटेड स्टेट्सची लोकस्थिती आणि प्रवासवृत्त* (१८८९) ही महत्त्वाची पुस्तके. १८८९ साली त्यांनी 'शारदासदन' ही संस्था बालविधवांच्या शिक्षणाकरिता सुरू केली. १८९० च्या नोव्हेंबरात संस्था पुण्यास आणली. संस्था धर्मातीत असली तरी बाई ख्रिस्ती असल्याने हिंदू लोक त्यांच्यावर विश्वास ठेवीत नसत. रमाबाईंच्या ठिकाणी देशाभिमान पुरेपूर होता. स्त्रियांविषयी कणव व कळकळ होती. तरी धर्मांतरामुळे त्यांना कडव्या विरोधाला तोंड द्यावे लागले. पुढे पुणे सोडून केडगावी बाईंनी आपली संस्था नेली (१८९८). तेथे 'मुक्तिसदना'ची नव्याने स्थापना केली; आणि पतित, निराधार, अनाथ स्त्रियांची जबाबदारी त्यांनी उचलली.

अखेरच्या काळात बाईंनी ख्रिस्ती धर्माशी निगडित लेखन केले. *प्रभु येशूचे चरित्र* (१९०६) व *पवित्रशास्त्र : जुना व नवा करार* (१९२४) हे दोन ग्रंथ त्यांनी लिहिले. त्यांनी प्रमाण बायबलग्रंथ मराठी वाचकांना उपलब्ध करून दिला. त्यासाठी अठरा वर्षे अथक परिश्रम केले. जोतिबा फुल्यांनी प्रारंभ केलेल्या आणि धोंडो केशव कर्व्यांनी विकसित केलेल्या स्त्रीशिक्षण व स्त्रीमुक्तीच्या कार्यातील त्या एक महत्त्वाच्या दुवा होत्या.

उषा टाकळकर, म. ना. लोही

संदर्भ : (१) मृणालिनी देसाई, 'अपराजित पंडिता', साधना, १३ सप्टेंबर, १९७५. (२) सरोजिनी वैद्य, 'एका सामाजिक शोकनाट्याची नायिका', मौज, (दिवाळी) १९७०. (३) 'पंडिता रमाबाई'–देवदत्त टिळक (चरित्र).

**मोगरे, गंगाधर रामचंद्र :** (ज. २१ जानेवारी, १८५७, शिरगाव, जि. ठाणे–मृ. ११ जानेवारी, १९१५, मुंबई). कवी. मराठीतील उपहासकाव्याचे जनक. प्राथमिक शिक्षण शिरगावी व मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण मुंबईस. मॅट्रिकनंतर बँकेत नोकरी. १८८६ साली मुंबईच्या 'रॉयल एशियाटिक सोसायटी'च्या ग्रंथालयात कारकून म्हणून नियुक्ती.

ग्रंथालयातील नोकरीमुळे मोगऱ्यांचा काव्याचा व अन्य वाङ्मयाचा अभ्यास होऊन त्यांच्या काव्यशक्तीला चालना मिळाली. अव्वल इंग्रजी आमदनीतील अग्रगण्य मराठी कवी म्हणून मोगरे यांचे नाव प्रामुख्याने घेतले जाते. यांची कविता 'इंदुप्रकाश', 'विविधज्ञानविस्तार', 'मासिक मनोरंजन' ह्या मासिकांतून प्रकाशित झाली. 'महाराष्ट्र जनविलाप' (१८८४). *मोगऱ्याची फुले* (१९०२ ते १९२०) ह्या नावाखाली पाच गुच्छांतून ह्यांची कविता प्रसिद्ध झाली आहे. भाग पहिला (१९०२), भाग दुसरा (१९०४), भाग तिसरा (१९१७), भाग चौथा (१९१९), भाग पाचवा (१९२०). ह्यांची बहुतांश रचना दीर्घ स्वरूपाची, श्लोकबद्ध व आर्यावृत्तात आहे. विलापकाव्ये, उपहासकाव्ये, कथाकाव्ये व स्फुटकाव्ये असे यांच्या काव्यरचनेचे स्वरूप आहे. इंग्रजीतील विलापकाव्यांपासून स्फूर्ती घेऊन रचलेल्या विलापिका हे यांच्या कवितेचे एक प्रमुख वैशिष्ट्य. आर्यभूमीच्या उद्धारार्थ झटलेल्या आनंदीबाई जोशी,

विष्णुशास्त्री चिपळूणकर, विष्णुशास्त्री पंडित आदी मान्यताप्राप्त स्त्रीपुरुष, तुकोजीराव होळकर, जियाजीराव शिंदे आदी राजपुरुष, रिपन, फर्ग्युसन आदी सनदी अधिकारी अशा अनेक व्यक्ती यांच्या विलापिकांचे विषय झाल्या आहेत.

मराठीत प्रथमच मोगरेंनी मोठ्या प्रमाणात उपहासकाव्ये लिहिली. *पदवीचा पाडवा*, *अभिनव धर्मस्थापना* व *मेघाजीची मजलस* ही त्यांची तीन उपहासोक्तीपूर्ण दीर्घकाव्ये. कथाकाव्यांपैकी *अभिनव कादंबरी* (१८८६) हे धुंडीराजकवीच्या मूळ संस्कृत काव्याचे भाषांतर. त्यांची 'आर्यप्रदीप' व 'वाग्युद्ध' ही अनुक्रमे ॲर्नाल्डच्या 'दी लाईट ऑफ एशिया'च्या व होमरच्या 'इलियड'च्या आधारे रचलेली दीर्घकाव्ये; ती मात्र अपूर्णच राहिली. याशिवाय 'आर्यभूपर्यटन' ह्या मोठ्या काव्याचा एक भाग, *हिंदुस्थानवर शिकंदराची स्वारी* एवढाच लिहून झाला. 'जगद्देवचरित्र' व 'वृंदा' ही स्वतंत्र विषयावरील काव्येही अपूर्णच राहिली. ती सर्वच चित्ताकर्षक व भाषासौष्ठवयुक्त आहेत. *विजयिनी-विजयाष्टक* हे व्हिक्टोरिया राणीच्या हीरक जयंतीनिमित्त रचलेले प्रासंगिक काव्य, त्याचप्रमाणे त्यांच्या देशाभिमानी वृत्तीचे दर्शन घडविणारे *सह्याद्री* हे काव्यही उल्लेखनीय आहे.

मोगरे यांची रचना जुन्या परंपरेला अनुसरणारी पण सरळ व सुगम आहे.

उषा टाकळकर, म. ना. लोही

संदर्भ : 'काव्यदीपिका' (टीकालेखसंग्रह) ना. म. भिडे–१९६५.

**मोघे, गोविंद रामचंद्र :** (ज. १८६० – मृ. ९ जानेवारी, १९४५, मुंबई). कवी, फलज्योतिष या विषयाचे ग्रंथकार. वेदाध्ययनाबरोबरच यांनी इंग्रजी शिक्षणही घेतले. मॅट्रिकनंतर रेल्वेत नोकरी.

ह्यांनी लिहिलेली 'ज्ञानेश्वरी'वरील *सुबोधिनी छाया* (१९२६) नावाची पद्यात्मक टीका प्रसिद्ध आहे. *गीतार्थभाषिणी* (१९३२) या दुसऱ्या ग्रंथात गीतेच्या श्लोकांचा विवरणात्मक गद्य अन्वय व अर्थ दिला आहे. *टिळकनिधन दुःखोद्गार* (१९२१), *मातृबोध* (१९२८) ही यांची काव्येही प्रसिद्ध आहेत. *लघुभागवत* व *लघुरामायण* यासारखी बालवाचकांसाठीही काही पुस्तके यांनी लिहिली आहेत. यांचा फलज्योतिष शास्त्रावरील *ज्योतिर्मयूख* (१९११) हा ग्रंथ या क्षेत्रात लोकप्रिय ठरला आहे.

उषा टाकळकर, अंजली वऱ्हाडपांडे

**मोडक, काशिनाथ हरी :** ० माधवानुज : (ज. १६ मार्च, १८७२, पडघवली, जि. कुलाबा – मृ. २ मार्च, १९१६). कवी. प्राथमिक शिक्षण जन्मगावी. पुण्याहून १८९१ ते १८९४, बी. जे. मेडिकल स्कूलमध्ये शिक्षण. १८९४ ते १८९९, सरकारी डॉक्टर. नंतर कल्याण येथे स्वतंत्र वैद्यकीय व्यवसाय.

ह्यांच्या बऱ्याच कविता 'माधवानुज' या नावाने 'करमणूक' पत्रातून प्रसिद्ध झाल्या. त्यांचा कवितासंग्रह *माधवानुज* या नावाने त्यांच्या मृत्यूनंतर (१९२४) प्रसिद्ध झाला. डॉक्टर या नात्याने त्यांना प्लेगपीडित व दुष्काळग्रस्त भागात जावे लागत असे. 'दुष्काळ', 'दगड फोडताना' आदी दहा कवितांतून त्यांनी आपले ह्यासंबंधीचे अनुभव कारुण्यपूर्ण शब्दांत मांडले आहेत. सातारा येथे वास्तव्यास असताना त्यांनी 'सज्जनगड', 'कुबडीतीर्थ' आणि 'भवानी तलवार' ह्या प्रसिद्ध कविता लिहिल्या.

कल्याणला स्वतंत्र व्यवसाय सुरू केल्यानंतर तेथेही प्लेगची साथ आल्याने त्यांना अलाहाबादला थोरल्या बंधूकडे जावे लागले. तेथील वास्तव्यात ते बंगाली भाषा शिकले. त्याचा उपयोग मायकेल मधुसूदन दत्त ह्यांच्या 'मेघनाथवध' व 'वीरांगना' ह्या काव्यांची रूपांतरे मराठीतून करण्यासाठी केला. बंकीमचंद्रांच्या 'कपालकुंडला', 'कृष्णकान्तेर वुईल' (१९००) या कादंबऱ्यांची रूपांतरेही त्यांनी केली. अलाहाबाद येथेच त्यांनी 'दोन ध्वनी', 'त्रिवेणीसंगम', 'विरोधाभास', 'दीपविसर्जन' इत्यादी प्रसिद्ध कविता लिहिल्या. रवींद्रनाथांच्या 'गीतांजली'चा काव्यबद्ध मराठी अनुवाद करून तो 'केसरी'त प्रसिद्ध केला.

केशवसुत व विनायक हे माधवानुजांचे समकालीन स्नेही. केशवसुतांप्रमाणेच त्यांनीही स्फुट विचारात्मक पद्यपंक्ती रचल्या आहेत. केशवसुतांनी 'सुनीत' हा कविताप्रवाह मराठीत रूढ करण्याचा जो प्रयत्न केला, त्याचे अनुकरण करणाऱ्या तत्कालीन कवींपैकी माधवानुज हे प्रमुख होत. बोधपरता हे त्यांच्या कवितेचे महत्त्वाचे वैशिष्ट्य आहे.

माधवानुजांच्या कवितांचा विषयदृष्ट्या विचार केला तर महाराष्ट्रीयांच्या इतिहासाबद्दल अभिमान, पारतंत्र्याविषयी खेद, निसर्गसौंदर्य व तीर्थस्थाने पाहून मनाला वाटणारी प्रसन्नता, दुष्काळ पीडितांबद्दल कळवळा, वैयक्तिक दुःखापेक्षा बहुजनांच्या दुःखाबद्दल खंत आदी प्रवृत्तींमुळे त्यांची कविता भावपूर्ण बनली आहे.

वा. रा. ढवळे, म. ना. लोही

**मोडक, गणेश बळवंत :** (ज. १७ जुलै, १८७० – मृ. १८ फेब्रुवारी, १९५३). वृत्तसंपादक व लेखक. बी.ए. मुंबई येथून निघणाऱ्या 'राष्ट्रमत' ह्या राष्ट्रीय पक्षाच्या वृत्तपत्राचे संपादक. १९१० साली कोल्हापूर दरबारने राजद्रोहाच्या आरोपाखाली खटला भरून सात वर्षे सश्रम तुरुंगवासाची यांना शिक्षा ठोठावली.

ह्यांची *सौराष्ट्र अथवा काठेवाड* (१९०२) आणि *श्रीमद्भागवत दशमस्कंधावरील शिवकल्याणाची ओवीबद्ध टीका* (१९०४) ही दोन पुस्तके उल्लेखनीय आहेत. *सौराष्ट्र* या पुस्तकाद्वारे मोडकांनी मराठी भाषकांना काठेवाडची संस्कृती व साहित्य यांचा सुरस भाषेत परिचय करून दिला आहे. दशमस्कंधावरील 'शिवकल्याणी' टीका प्राप्त करण्यासाठी मोडकांनी खूप शोध घेतला. शेवटी अकोला येथील रामदासी मठात त्यांना ती मिळाली. तिचा लेखनशक १६६१ (इ. स. १७३९) असा होता. ४४,१५३ ओव्यांचा हा संपूर्ण ग्रंथ खंडशः प्रसिद्ध करण्याची त्यांची योजना होती, मात्र ती सफल झाली नाही. *कृष्णजन्म* व *रासपंचाध्यायी* हे दोनच भाग त्यांना प्रसिद्ध करता आले.

गं. दे. खानोलकर, म. ना. लोही

**मोडक, गोविंद अनंत :** (ज. ५ ऑक्टोबर, १८८८ – मृ. १९४८). इतिहासलेखक. पुण्याच्या फर्ग्युसन कॉलेजमधून बी.ए. नंतर तळेगाव व पुणे येथे शिक्षक.

इतिहास हा विषय रंजक व्हावा या उद्देशाने ह्यांनी इतिहास व ऐतिहासिक व्यक्तींविषयी लेखन केले. ह्यांची *मुलांचा महाराष्ट्र* (१९१५, १९१९), *इंग्लंडचा इतिहास* (भाग १ – १९२०, भाग २ – १९२१), *यूरोपचे आधारस्तंभ* (१९३४), *इंग्लंडची शासनपद्धती* इत्यादी पुस्तके प्रसिद्ध आहेत. याखेरीज शालेय विद्यार्थ्यांसाठी यांनी मुद्दाम लिहिलेली, *लहान मुलांचा महाराष्ट्र* (१९२३), *लहान मुलांचा हिंदुस्थान* (१९२३), *मर्दानी झाशीवाली* (१९४४) इत्यादी गोष्टीरूप व चरित्रात्मक पुस्तकेही उल्लेखनीय आहेत. शालेय विद्यार्थ्यांपुढे चांगला आदर्श ठेवावा आणि सर्वसामान्य वाचकांची जिज्ञासा वाढून त्यांच्या ज्ञानात भर पडावी, ही यांची भूमिका होती.

नंदिनी लोटलीकर, अंजली वऱ्हाडपांडे

**मोडक, गोविंद कृष्ण :** (ज. १८७९, पाली, जि. कुलाबा – मृ. १६ सप्टेंबर, १९४९). व्याकरण व भाषा या विषयांचे अभ्यासक. प्राथमिक शिक्षण नाशिक येथे. इंटरनंतर पुणे येथे संस्कृतचे शिक्षक. मराठी व संस्कृत व्याकरणाचे एक विचक्षण अभ्यासक या नात्याने प्रसिद्ध.

*मराठीचे अंतरंगदर्शन* (१९३२) हा ह्यांच्या भाषाचिकित्साविषयीच्या विविध लेखांचा संग्रह प्रसिद्ध आहे. मराठीतील अनेक

शब्दांच्या व्युत्पत्त्या आणि शुद्धलेखन व मोरोपंतांच्या भाषेचे विशेष यांवरील त्यांचे निबंध उल्लेखनीय आहेत. त्यांचे बरेच लेख 'ज्ञानप्रकाश', 'महाराष्ट्र-साहित्यपत्रिका' व 'विविधज्ञानविस्तार' ह्या नियतकालिकांतून प्रसिद्ध झाले आहेत. 'सह्याद्री'मध्ये प्रसिद्ध झालेला शुद्धलेखनविषयक प्रबंध, 'महाराष्ट्र साहित्य पत्रिके'तील 'स्वराघाता'-वरील लेख, 'भारत इतिहास संशोधक मंडळा'च्या त्रैमासिकातील षष्ठी विभक्तीवरचा निबंध, ज्ञानेश्वरीच्या व्याकरणाची पुस्तिका व प्रा. कृ. पां. कुलकर्णी ह्यांच्या 'व्युत्पत्तिकोशा'वरील टीकात्मक लेख हे यांच्या तर्कशुद्ध विवेचनाची व व्यासंगाची साक्ष पटवितात. *स्तोत्रचिंतामणी अथवा शुद्ध, सरस व प्रेमळ संस्कृत (सार्थ) व मराठी स्तोत्रांचा संग्रह* (१९१६); *रामरक्षाप्रभाव अथवा रामरक्षास्तोत्राचे समूळ, सुरस, सविस्तर भाषांतर* (१९२२); *मुलांकरिता मंडपा* (आर्याघटित, १९२६); *संस्कृत वाक्यरचनेचा उपदेशक* (प्रिं. वामन शिवराम आपटे ह्यांच्या 'स्टुडण्ट्स् गाइड टु संस्कृत कॉंपोझिशन'चे मराठी भाषांतर, १९२९); *संस्कृतची ओळख* – पुस्तक पहिले, दुसरे व तिसरे (सर्व १९३६) ही पुस्तके व *श्री ज्ञानेश्वरी–सोळावा अध्याय* (सहसंपादक : श्री. रा. पारसनीस) मूळ ओव्या, अन्वय, अर्थ, टीपा, शब्दकोश, उपोद्घात, पाठविचार, व्याकरण चर्चा इत्यादींसह (१९४५) हे संपादन प्रकाशित झाले आहे. मोडकांच्या चिकित्सक वृत्तीचा यातून चांगला प्रत्यय येतो.

गं. दे. खानोलकर, रा. बा. बर्वे

**मोडक, जनार्दन बाळाजी** : (ज. ३१ डिसेंबर, १८४५, पंचनदी, रत्नागिरी – मृ. १९ मार्च, १८९२, पुणे). संस्कृत आणि मराठी काव्याचे चिकित्सक, संग्राहक व संपादक. शिक्षण पुणे येथे. बी.ए. (१८७०). कॉलेजमध्ये असतानाच मेजर कॅन्डी यांच्या हाताखाली भाषांतरकार म्हणून नियुक्त. त्यानंतर शिक्षणखात्यात नोकरी.

'विविधज्ञानविस्तार' या नियतकालिकाशी त्यांचा संबंध या मासिकाच्या सहाव्या (१८७४) वर्षापासून तो बाविसाव्या (१८९०) वर्षाअखेर होता. या कालावधीत 'लीलावती'चे भाषांतर, ज्योतिष व गणितविषयक अनेक उद्बोधक व मनोरंजक लेख, संस्कृत अलंकारिकांची व कवींची चरित्रे, पुस्तकपरीक्षणे वगैरे अनेक विषयांवर त्यांनी 'विस्तारा'त लिहिले. 'निबंधमाला', 'निबंधचंद्रिका', 'शालापत्रक' आदींतून प्रसिद्ध झालेल्या लेखांतून त्यांचा मराठी कवितेसंबंधीचा व्यासंग प्रकट झाला आहे. या व्यासंगामुळेच 'काव्येतिहाससंग्रह' व नंतर 'काव्यसंग्रह' यांच्या संपादनाची जबाबदारी त्यांच्यावर पडली. ठाण्याचे 'अरुणोदय' आणि मुंबईचे 'इंदुप्रकाश' ह्यांतूनही मोडकांनी लेखन केले.

प्राचीन मराठी हस्तलिखित काव्ये, जुन्या बखरी, जुनी ऐतिहासिक कागदपत्रे हे अप्रसिद्ध साहित्य प्रकाशात आणण्याच्या हेतूने विष्णुशास्त्री चिपळूणकर, काशिनाथ नारायण साने, शंकर तुकाराम शाळीग्राम यांच्या सहकार्याने मोडकांनी १८७८ साली 'काव्येतिहाससंग्रह' हे मासिक सुरू केले. १८८१ साली चिपळूणकरांनी संग्रहाशी असलेला आपला संबंध तोडल्यामुळे मोडकांना मराठी काव्याबरोबरच संस्कृत काव्यविभागाचेही संपादन करावे लागले. हे मासिक १८८८ पर्यंत चालले. त्यात मोडकांनी मुक्तेश्वरकृत 'महाभारत–वनपर्व' (१८७९), 'वामनपंडितकृत प्रकरणे' (१८८२), 'रामदासस्वामीकृत रामायण व इतर काही प्रकरणे' (१८८२), कविवर्य 'मोरोपंतकृत कृष्णविजय-पूर्वार्ध' (१८९१) इत्यादी काव्ये संपादून प्रकाशात आणली. *जगाच्या इतिहासाचे सामान्य निरूपण* (१८७२), *भास्कराचार्य व तत्कृत ज्योतिष* (१८७७) व *वेदांग ज्योतिषाचे मराठी भाषांतर* (१८८५) ही मोडकांची स्वतंत्र पुस्तकेही प्रसिद्ध आहेत.

कृ. भि. कुळकर्णी, म. ना. लोही

**मोडक, बाळाजी प्रभाकर** : (ज. १२ मार्च, १८४७, आचरे, ता. मालवण, जि. रत्नागिरी – मृ. २ डिसेंबर, १९०६, कोल्हापूर). विज्ञानविषयक लेखक. इतिहासकार. इतिहासविषयक तारखांचे जंत्रीकार. या संदर्भात विपुल लेखन करणारे लेखक. माध्यमिक शिक्षण बेळगाव येथे. मॅट्रिक (१८६५). पुणे कॉलेजातून बी.ए. कोल्हापूरच्या राजाराम हायस्कूलमध्ये शिक्षक (१८६९). १८८० मध्ये राजाराम कॉलेज सुरू झाल्यावर प्रथम अधिव्याख्याते म्हणून आणि १८८३ मध्ये प्राध्यापक (प्रोफेसर) म्हणून नेमणूक.

भौतिक शास्त्रांच्या नेमलेल्या अभ्यासक्रमाबाहेरची उच्च दर्जाची पुस्तके मिळवून त्यातील शक्य ते प्रयोग त्यांनी केले आणि रसायनशास्त्रावर टिपणे तयार करून १८७५ मध्ये छापली. तत्पूर्वी *कोल्हापूर प्रांताचे संक्षिप्त वर्णन* (१८७३) अशी एक पुस्तिका त्यांनी प्रसिद्ध केली होती. *निरिंद्रिय रसायनशास्त्र पूर्वार्ध, अर्थानुरूप तत्त्वे* (१८७६) हा त्यांचा पहिला महत्त्वाचा ग्रंथ. तो इंग्रजीवर आधारलेला असला तरी त्यातील विषय स्वतः आत्मसात करून तो बहुतांशी आपल्या भाषेत मांडलेला आहे. *सेंद्रिय रसायनशास्त्र-पूर्वार्ध भाग-२* (१९०६) हा यांचा शेवटचा ग्रंथ. भौतिक शास्त्रीय विषयांवर यांचे एकूण एकतीस ग्रंथ प्रसिद्ध झाले.

त्यांच्या विपुल ग्रंथरचनेपैकी नऊ इंग्रजीवरून अनुवादित, तर बावीस स्वतंत्र अथवा स्वतंत्रप्राय आहेत. त्यांची वर्गवारी अशी : केवळ शालोपयोगी ४ (इतिहास १, भूगोल १, संकीर्ण २), आरोग्यशास्त्रविषयक ३, रसायनविषयक ९, पदार्थविज्ञानविषयक ६. त्यांना मुख्यतः पदार्थविज्ञान, रसायन, खनिजे, औद्योगिक उपयुक्त विषय यांची अधिक ओढ होती. याशिवाय *सेंद्रिय रसायनशास्त्र पूर्वार्ध भाग-१*, *वेज्ञिनवर्ग* आणि *प्राणिशास्त्र* (मूलतत्त्वे) या दोन ग्रंथांची हस्तलिखिते पडून होती. पैकी *प्राणिशास्त्र* हा ग्रंथ त्यांचे ज्येष्ठ पुत्र गणेश बाळाजी यांनी १९२३ मध्ये छापून प्रसिद्ध केला. 'शिल्पकलाविज्ञान' मासिकात त्यांनी कित्येक स्फुट लेख लिहिले. विज्ञानविषयाची गोडी सामान्य लोकांत वाढवावी, या उद्देशाने १८८० पासून शेवटपर्यंत दरवर्षी सप्रयोग मुक्तद्वार एकेका शास्त्रीय विषयावरील व्याख्यानांचे सत्र त्यांनी चालविले. त्याच्या जोडीला शास्त्रीय उपकरणे, यंत्रणा आणि त्यांचा उपयोग दाखविणारी सार्वजनिक प्रदर्शने १८८३ पासून १८९६ पर्यंत त्यांनी स्वतःच्या बळावर भरविली. रसायनशास्त्रविषयक त्यांच्या अध्ययन संशोधनामुळे लंडनच्या रॉयल केमिकल सोसायटीची फेलोशिप त्यांना उत्तरायुष्यात मिळाली. *कोल्हापूर व कर्नाटक प्रांतातील राज्ये व संस्थाने यांचा इतिहास-पूर्वार्ध भाग–१* (१८७७) हा पहिला इतिहाससंग्रह त्यांनी प्रसिद्ध केला. या कामी त्यांना दि. गो. वझे यांचे साह्य होते. या ग्रंथाची पूर्ती पूर्वार्ध भाग–२ (१८८६), उत्तरार्ध भाग–१ (१८८६) व उत्तरार्ध भाग–२ अशा क्रमाने प्रसिद्ध होऊन एक मोठा संदर्भग्रंथ तयार झाला. त्यामध्ये अनेक बखरींचे संगतवार, एकसूत्री प्रसिद्धीकरण होऊ शकले. *हिंदुस्थानातील मुसलमानी राज्यांचा इतिहास*, *दक्षिणेतील मुसलमानी राज्यांचा इतिहास*, तीन भागात (१८९१) आणि *कोल्हापूर राज्याचा इतिहास* दोन भागात (१८९३) आदी अनेक इतिहासग्रंथ त्यांनी तयार केले. त्यांच्या *शक व सन यांची तिथी व तारीखवार जंत्री* (१८८९) ह्या करणग्रंथात इसवी सन, शालिवाहन शक, विक्रम संवत, राजशक, फसली हिजरी साल यांपैकी कोणाही एकामधील महिना, दिवस किंवा वार माहीत असल्यास इतर गणनांमधील महिना, दिवस, वार जाणण्याची कोष्टकरूप सारणी आहे. इतिहासाभ्यासकांच्या दृष्टीने ही जंत्री अत्यंत उपयुक्त आहे.

शा. वि. गोखले, के. ए. पोतदार

**मोडक, महादेव हरी :** (ज. ६ मे, १८६४, पडघवली, जिल्हा कुलाबा – मृ. १२ जानेवारी, १९४५). कवी, अनुवादक व तत्त्वचिंतक. इंग्रजी चौथीपर्यंतचे शिक्षण रोहे व अलिबाग येथे. डेकन कॉलेजातून भाषा विषय घेऊन बी.ए. (१८८८). मुंबईच्या न्यू स्कूलमध्ये शिक्षक. नंतर नऊ वर्षे अहमदनगर येथील सोसायटीच्या हायस्कूलमध्ये मुख्याध्यापक (१८९०), इंदूर संस्थानच्या राजपुत्रांना शिकविण्यासाठी काही काळ अलाहाबाद येथे वास्तव्य.

*शीलनाथ अष्टोतरी*, *वैरागी*, *अद्‌भुत किमयागार*, *सत्याचा महिमा*, *सुतविरह* अशी त्यांची स्फुट काव्ये आहेत. त्यांच्या काही कविता 'मासिक मनोरंजन'मधून प्रसिद्ध झाल्या असल्या तरी बऱ्याच कविता अप्रकाशित राहिल्या. *वैरागी* (श्लो. ४०) ही त्यांची दीर्घ कविता गोल्डस्मिथच्या 'व्हिकार ऑफ वेकफील्ड' या कादंबरीतील हर्मिटचे रूपांतर आहे ते मुळाला धरून व मार्मिक साधले आहे. त्यांच्या गद्यलेखांपैकी *सुख आणि शांति* (१९११) व खडे *तात्त्विक गोल*–भाग १–४ (१९१३) ही दोन पुस्तके महत्त्वाची आहेत. याशिवाय शेक्सपिअरच्या नाट्यकथांचे *नाट्य मकरंद अथवा लॅम्बकृत शेक्सपिअरच्या गोष्टींचे भाषांतर* (१९०६) असे त्यांचे एक पुस्तक आहे. *सुख आणि शांति* हा ग्रंथ सर जॉन लबक यांच्या 'ऑन पीस अँड हॅपिनेस' या ग्रंथाधारे तयार केला आहे. या ग्रंथात त्यांच्या भाषाविलासाचा प्रकर्षाने प्रत्यय येतो. त्यांचे संस्कृत भाषेचे अध्ययन उत्तम असल्यामुळे पुण्यातील चिपळूणकर आणि मंडळीने महाभारताच्या काही भागांच्या सुरस भाषांतरासाठी त्यांचे साहाय्य घेतले. *हरि-वंशपर्वां*चा पूर्वार्ध व उत्तरार्ध यांचे जवळजवळ पूर्ण भाषांतर त्यांच्याच हातचे आहे. विराटपर्व, द्रोणपर्व, भीष्मपर्व व शांतिपर्व यांच्या भाषांतरातही ते साहाय्यक होते. जुन्या पिढीतले एक शैलीकार म्हणून त्यांचा लौकिक होता.

उषा टाकळकर, के. ए. पोतदार

**मोडक, वामन आबाजी :** (ज. २१ सप्टेंबर, १८३५, गव्हे, दापोली – मृ. २८ ऑगस्ट, १८९७, मुंबई). धर्म, तत्त्वज्ञान, इतिहास या विषयांचे लेखक. १८५७ साली मुंबई विद्यापीठाची स्थापना झाल्यावर दोन वर्षांनी त्याच्या विद्यमाने झालेल्या पहिल्या मॅट्रिक परीक्षेत उत्तीर्ण. मुंबई विद्यापीठाच्या १८६२ साली झालेल्या बी.ए. परीक्षेत उत्तीर्ण झालेल्या पदवीधरांच्या पहिल्या तुकडीतील एक. पुणे कॉलेजात (पुढे डेक्कन कॉलेज) दोन वर्षांची फेलोशिप.

त्यांनी इंग्रजी व संस्कृत घेऊन एम्.ए.चा व व्याकरण, साहित्य, वेदान्त आणि न्याय या शास्त्रांचा जुन्या पद्धतीने अभ्यास केला. सरकारी शिक्षणखात्यात – पुणे हायस्कूलमध्ये – नोकरी. मुंबईच्या एल्फिन्स्टन हायस्कूलचे पहिले भारतीय प्राचार्य. त्यांनी *सद्धर्मानुष्ठान* धर्मसंबंधी विषयाचे लहानसे पुस्तक (१८७२), *गीतार्थसार* (१८८५), *हिंदु लोकांत ऐक्याची वृद्धी होण्यास हरकती व त्या दूर होण्याचे उपाय-व्याख्यान* (१८८९), *बालविवाहाच्या संबंधाने हिताहित विचार-व्याख्यान* (१८८९), *बालविवाहाच्या संबंधाने हिताहित विचार-व्याख्यान* (१८८७), *युरोपच्या इतिहासापासून लोकांनी काय शिकावे?* (१८९०), *कीर्तने व आख्याने* (१९०७), *उत्तर नैषधचरित* (१९१२) अशी पुस्तके त्यांच्या नावावर आहेत. पूर्वग्रहांनी दूषित न होता, जुन्या इतिहासाचा मिथ्या अभिमान न बाळगता आणि परंपरेच्या अनुदार बंधनात स्वतःस गुरफटून न घेता, वर्तमानकालीन परिस्थितीची चिंतनपर चिकित्सा करण्याची क्षमता त्यांच्या ठिकाणी होती. १८६७ साली मराठीची मुंबई विद्यापीठाच्या अभ्यासक्रमातून हकालपट्टी झाली होती. तिचा पुनः प्रवेश व्हावा, यासाठी १८९० साली वामनरावांनी मुंबई विद्यापीठात तसा ठराव आणला. पण तो फेटाळला गेला. तथापि, त्यांनी चळवळ चालू ठेवली व तिला न्या. मू. माधवराव रानडे यांच्या चिकाटीने यश येऊन विद्यापीठात मराठी भाषेचा चंचुप्रवेश झाला. मराठी भाषेच्या अभ्यासाच्या दृष्टीने मोडकांचे हे कार्य महत्त्वाचे आहे. 'वामन आबाजी मोडक यांची धर्मपर आणि नीतिपर व्याख्याने' (संपा. रा. भि. जोशी) हे पुस्तक (१९०८) त्या काळातील विधायक वृत्तीच्या विचारी नवशिक्षितातील सामाजिक, धार्मिक, स्वदेशोन्नतिविषयक विचारसरणीची कल्पना देणारे म्हणून उल्लेखनीय आहे.

गं. दे. खानोलकर, के. ए. पोतदार

**मोडक, विनायक त्र्यंबक :** (ज. १८६३ – मृ. मे, १९२४, डोंबिवली). नाटककार व कादंबरीकार. पुणे येथून मॅट्रिक झाल्यावर शिक्षणखात्याच्या कचेरीत कारकून. ह्यांनी शेरीडन ह्या आंग्ल नाटककाराच्या 'द्युएना' या प्रहसनाच्या आधारे *प्रणयविवाह* (१८९३) हे नाटक लिहिले. तत्कालीन प्रसिद्ध नाटककार वासुदेव रंगनाथ शिरवळकर हे मोडकांचे स्नेही. ह्या उभयतांनी एकमेकांच्या सहकार्याने *राणा भीमदेव* (१८९२), *ज्ञानेश्वर महाराज* (१९०४) ही नाटके, *श्री विक्रमादित्य* (१८९०), *मोनयौवना* (१९१२, दु. आ.) ह्या कादंबऱ्या आणि *महादजी शिंद्यांचे चरित्र* (१८९३) ही पुस्तके लिहिली आहेत.

गं. दे. खानोलकर, मृणालिनी शहा

**मोने, मोरेश्वर सखाराम :** (ज. २४ डिसेंबर, १८८५, पनवेल – मृ. १५ एप्रिल, १९४३). व्याकरणविषयक पुस्तकांचे लेखक. प्राथमिक शिक्षण आटोपताच ट्रेनिंग कॉलेजात अध्यापनाचे शिक्षण. हिंगणे येथे शिक्षक.

*मराठी भाषेचे व्याकरणकार व व्याकरण प्रबंधकार* (१९२७) हे ह्यांचे पुस्तक. व्याकरण, व्युत्पत्ती, छंद इत्यादीसंबंधीचे विवेचन यात आढळते. *मराठी साहित्य व व्याकरण* (१९३४) हे ह्यांचे विद्यार्थ्यांसाठी लिहिलेले पुस्तकही प्रसिद्ध आहे.

गं. दे. खानोलकर

**मोरे, नारायण रामचंद्र :** ० अशोक : (ज. ९ एप्रिल, १९०२, नवेदर बेली, अलिबाग). कवी आणि संपादक. शिक्षण रेवदंडा व अलिबाग येथे. मॅट्रिक (१९२०). 'मासिक मनोरंजन'चे प्रथम सहसंपादक व मग कार्यकारी संपादक (१९२५–३२) आणि स्वतःच्या *नवजीवन* व *सुवर्ण* या मासिकांचे संचालक (१९३२). खानापूर येथून प्रसिद्ध होणाऱ्या 'लोकप्रिय' नामक मासिकात 'कवितेस प्रणयपत्रिका' ही त्यांची पहिली कविता प्रसिद्ध. त्यानंतर 'नवयुग', 'उद्यान', 'काव्यरत्नावली', 'चित्रमयजगत्', 'मासिक मनोरंजन', 'महाराष्ट्र साहित्य' वगैरे प्रतिष्ठित मासिकांतून स्फुट कविता प्रसिद्ध झाली. ऐतिहासिक व्यक्ती व प्रसंग ही त्यांच्या काव्यनिर्मितीची प्रेरणास्थाने होती. 'मनोरंजन'चे कार्यकारी संपादक असताना त्यांनी सामाजिक विषयावर स्फुट लेखन केले. तसेच 'अशोक' या टोपणनावाने कथाही लिहिल्या पण त्यांचा भर प्रामुख्याने तिवारी, विरकूड यांच्याप्रमाणेच ऐतिहासिक स्वरूपाच्या स्फुट, पल्लेदार व प्रदीर्घ कविता करण्यावरच होता. त्यांनी वयाच्या एकोणिसाव्या-विसाव्या वर्षी *शिवशार्दूल* (१९२१) व *संग्रामसिंह* (१९२३) अनुक्रमे तानाजी मालुसरे व मुरारबाजी देशपांडे यांच्या पराक्रमाचे वर्णन करणारी दोन खंडकाव्ये लिहिली. छत्रपती शिवाजी महाराजांचे अलौकिक विभूतिमत्व त्यांच्या काव्यप्रतिभेला शालेय जीवनाच्या सुरुवातीपासून सतत प्रेरणा देत आलेले आहे. शिवाजी महाराजांचे काव्यरूप चरित्र कुणी लिहिलेले नाही ही गोष्ट जाणवल्यामुळे वयाच्या पन्नासाव्या वर्षी काव्यमय शिवचरित्राची रचना करण्याला आरंभ केला व चौदा वर्षांच्या सतत परिश्रमानंतर *शिवायन* (१९७१) हे महाकाव्य लिहून

पूर्ण केले. 'चंद्रकान्त' वृत्तातील २९४ सर्गांचे हे महाकाव्य प्रसन्न व प्रभावी अशा वर्णनशैलीने युक्त आहे.

वा. रा. ढवळे, के. ए. पोतदार

० **मोरोबा कान्होबा** : पहा विजयकर, मोरोबा कान्होबा

**मोल्सवर्थ, जेम्स टी.** : (ज. १७९५, सरे, इंग्लंड – मृ. १३ जुलै, १८७२, क्लिफ्टन). कोशकार. सैन्यात नोकरी धरून सन १८१२ मध्ये हिंदुस्थानात आगमन. मराठी व हिंदुस्थानी या भाषांच्या परीक्षा उत्तीर्ण झाल्यावर देशी पायदळामध्ये भाषापंडित (लिंग्विस्ट) म्हणून नेमणूक (१८१४). संस्कृत व पर्शियन भाषांवर प्रावीण्य. सैन्यात कॅप्टन. स्वतःच्या उपयोगासाठी मराठी शब्दांचा संग्रह ते करीत. हे शब्द प्रसिद्ध केल्यास इतर युरोपियन व देशी लोकांनाही त्यांचा उपयोग होईल, असे त्यांना वाटले. म्हणून त्यांनी मराठी–इंग्रजी आणि इंग्रजी–मराठी असे दोन कोश करण्याची आपली इच्छा इ. स. १८२४ मध्ये सरकारला कळविली. १८२६ मध्ये कँडी बंधू कोशरचनेत मदत करण्यासाठी मोल्सवर्थना येऊन मिळाले. त्यांचा *मराठी–इंग्रजी कोश* १८३१ मध्ये निघाला त्यावर प्रथम मोल्सवर्थचे नाव असून मदतनीस म्हणून कँडी बंधूंची नावे आहेत. मुंबई सरकारने एतद्देशीय लोकांसाठी मराठी–मराठी असा *महाराष्ट्र भाषेचा कोश* पंडित मंडळाच्या सहाय्याने दोन भागांत १८२९ मध्ये प्रसिद्ध केला. त्यांमध्येही आपले प्रमुख अंग असल्याचा मोल्सवर्थ यांचा दावा होता.

त्यांनी महाराष्ट्राच्या वेगवेगळ्या विभागांतून शब्द, वाक्प्रचार व म्हणी ब्राह्मणांच्या मदतीने गोळा केल्या. नंतर प्रत्येक शब्दाची व्याकरणातील जाती, व्युत्पत्ती, लिंग याविषयी चर्चा केली व शेवटी विशेष विद्वान ब्राह्मणांच्या मदतीने शब्दार्थांचा निर्णय घेतला गेला. अशा पद्धतीने कोशाची शब्दसंख्या चाळीस हजार झाली. हे अवघड काम पैशासाठी किंवा मोठेपणा मिळावा म्हणून नव्हे, तर ख्रिस्तसंदेशाचा प्रसार व्हावा, या उदात्त हेतूने आपण केल्याचे त्यांनी आपल्या प्रस्तावनेत नमूद केले आहे. या कोशाची सुधारित आवृत्ती तयार करण्यासाठी त्यांना इंग्लंडहून मुद्दाम बोलावण्यात आले. सन १८५१ ते १८५७ पर्यंत महाबळेश्वरी राहून त्यांनी हे काम केले. शब्दसंख्या चाळीस हजारांवरून साठ हजारांवर गेली. दुसऱ्या आवृत्तीला डॉ. विल्सन यांचा मराठी भाषा, तिची वाढ, तिचा अभ्यास करण्याची पद्धती याबाबतचे विचार मांडणारा निबंध जोडलेला आहे. कोशाशिवाय *शालापद्धती* (१८२४) हे शिक्षणविषयक पुस्तक, *पापीविलास शांति* (१८२८) व *ज्ञानमार्गाची सूचना* (१८४९) ही ख्रिस्ती धर्मप्रसारणार्थ दोन छोटी पुस्तके त्यांच्या नावे जमा आहेत.

कृ. भि. कुलकर्णी, के. ए. पोतदार

० **मौनीनाथ** : पहा पारखी, नारो भिकाजी

० **मौनीस्वामी** : पहा पारखी, नारो भिकाजी

**यंदे, दामोदर सावळाराम** : (ज. १८६१ – मृ. २८ नोव्हेंबर, १९४८, पुणे). विख्यात संपादक, प्रकाशक, मुद्रक आणि लेखक. यंदेशेठ या नावाने प्रसिद्ध. निकटवर्तीयांसाठी 'दादा'. यंदे यांचा जन्म अहमदनगर जिल्ह्यातील पारनेर तालुक्यातील एका मराठा कुटुंबात झाला. आजोबा तुकारामबोवा आणि वडील सावळेरामबोवा हे वारकरी होते. त्यामुळे बालपणीच यंदे यांच्यावर भागवत, तुकाराम गाथा यांचे संस्कार झाले.

आजोबांनी १८५७ च्या बंडानंतर पलटणीतील नोकरीतून निवृत्ती पत्करली आणि वडिलांनी पलटणीतील नोकरी सोडली. संपूर्ण कुटुंब नगर सोडून मुंबईला स्थलांतरित झाले. तेथे वडिलांचा मृत्यू लवकरच झाल्यामुळे, यंद्यांनी अडचणींशी झुंज देत कामापुरत्या इंग्रजी शिक्षणापर्यंत मजल मारली. म. ज्योतिराव फुले यांची भाषणे ऐकल्यामुळे आपणही वर्तमानपत्र काढून समाजसेवा करावी असे त्यांच्या मनाने घेतले. रघुनाथ कृष्णराव यांचा छापखाना घेऊन त्यांनी *सुविचारदर्पण* नावाचे साप्ताहिक काढले. पुढे मुंबईमधीलच 'दीनबंधु' पत्राच्या व्यवस्थापक मंडळींमध्ये मतभेद होऊन फूट पडली. त्यांतील रामजी संतुजी आवटे यांनी माधवराव रोकडे आणि यंदे यांना हाताशी धरून 'शेतकऱ्यांचा कैवारी' हे पत्र सुरू केले. यंद्यांनी त्यात दुय्यम संपादकाचे काम केले. 'शेतकऱ्यांचा कैवारी' चांगला चालत असल्याने बडोद्याचे श्रीमंत सयाजीराव महाराज यांनी अगोदर आवट्यांना बोलावून १८८४ मध्ये 'बडोदावत्सल' साप्ताहिक पत्र सुरू केले. १८८५ मध्ये यंदेही बडोद्याला जाऊन आवट्यांना मदत करू लागले. थोड्याच दिवसांत पुरेसा आर्थिक लाभ झाल्यावर 'व्यवहारात कली' शिरला. यंद्यांनी बाजूला होऊन महाराजांच्या संमतीने *श्रीसयाजीविजय* या नावाचे साप्ताहिक पत्र सुरू केले. शंकर मोरो रानडे हे त्याचे मुख्य संपादक.

*सयाजीविजय* चालवीत असतानाच यंद्यांनी प्रकाशन व्यवसायात पाऊल टाकले. अल्पावधीत जमही बसवला. सयाजीराव महाराजांच्या प्रेरणेतून स्थापन झालेल्या सहविचारिणी सभेने सिद्ध केलेल्या पुस्तकांचे प्रकाशन यंदे करू लागले. त्यात गो. स. सरदेसाई यांच्या मुसलमानी रियासतीचाही समावेश होता.

दरम्यान स्वतः यंद्यांनी *देवी वीरमती* नावाची ऐतिहासिक कादंबरी लिहिली. तिच्या मराठीत चार आवृत्त्या तर निघाल्याच परंतु हिंदी आणि गुजराती अनुवादही झाले. इतकेच नव्हे तर तिचे नेवाळकर यांनी संगीत नाटकात रूपांतर केले व बेळगावकर स्त्रीसंगीत मंडळीकडून त्याचे अनेक प्रयोगही झाले. सहविचारिणी सभेच्या विद्यमाने सुरू झालेल्या ग्रंथसंपादक मंडळीने जवळजवळ दीडशे ग्रंथांचे प्रकाशन केले.

दरम्यान मुंबईच्या 'इंदुप्रकाश' छापखान्याचे मालक सखाराम पंडित दिवंगत झाल्यामुळे 'इंदुप्रकाश' पत्र बंद पडले. न्या. रानडे, विष्णुपंत भाटवडेकर, बडोद्याचे दिवाण बापूसाहेब गाडगीळ यांनी यंद्यांनी मुंबईला येऊन 'इंदुप्रकाश'ची जबाबदारी घ्यावी असा आग्रह धरला. स्वतः महाराजांचीही तशी इच्छा होतीच. १८९९ मध्ये यंदे मुंबईला आले व 'इंदुप्रकाश' पत्र आणि छापखाना यांचे त्यांनी पुनरुज्जीवन केले. लवकरच त्यांनी दामोदर गणेश पाध्ये आणि बलवंत रामकृष्ण मनेरीकर यांच्या सहभागाने इंदुविजयनामक कंपनीची स्थापना केली. 'इंदुप्रकाश' हे दैनिक झाले. 'टाईम्स ऑफ इंडिया'च्या एकतर्फी लिखाणाला शह देण्यासाठी फिरोजशहा मेहता यांच्या सल्ल्याने यंद्यांनी *धी इंदु ऑफ बॉम्बे* हे इंग्रजी दैनिकही १९०८ मध्ये चालविले. पुढे लोटवाला–डांगे–जोगळेकर या साम्यवाद्यांकडे छापखाना आणि दोन वर्तमानपत्रे यांची मालकी सोपवून ते नाशकास विश्रांतीसाठी गेले असता, व्यवस्थापनात बरीचशी उलथापालथ होऊन परिणामी 'सयाजीविजय' आणि 'इंदुप्रकाश' ही दोन्ही लाडकी पत्रे यंद्यांना बंद करावी लागली. त्यापुढचा काळ त्यांनी मुद्रण व प्रकाशन व्यवसायात व्यतीत केला. दरम्यान 'ग्रंथसंपादक व ग्रंथप्रकाशक मंडळी'चा मोठा व्याप त्यांनी निर्माण केला. महाभारताचा आणि श्रीभागवतपुराणाचा अनुवाद प्रसिद्ध करणे ही यंद्यांची महत्त्वाकांक्षा होती. आपल्या पंडितमित्रांच्या सहकार्याने त्यांनी ती बरीचशी पूर्णही केली. चिंतामण वैद्यांचे सार्थ (मराठी) महाभारत खंड १–८ यंद्यांनी १९३१–३७ पर्यंत प्रकाशित केले. भागवतपुराणाला जोडून भागवतामधील सुभाषितसंग्रह आणि भारतीय पौराणिक कोश यांचा खंडही त्यांनी प्रसिद्ध केला. कृष्णाजी अर्जुन केळूसकर यांचे शिवचरित्र, चिं. ग. भानूंचा उपनिषत्प्रकाश असे महत्त्वाचे ग्रंथही त्यांनी प्रकाशित केले. त्यांचा कलचमुळी धार्मिक आणि आध्यात्मिक स्वरूपाचे ग्रंथ प्रकाशित करण्याकडे होता. विठ्ठल रामजी शिंद्यांची व्याख्यानेही

त्यांनीच छापली. श्रीमंत सयाजीराव, न्या. रानडे, लो. टिळक अशा थोर व्यक्तींचा विश्वास त्यांनी संपादन केला होता. टिळक राजद्रोहाच्या खटल्यात दोषी ठरून मंडाले येथे शिक्षा भोगण्यास गेलेले असता यंदांनी टिळकांचे कारकून आप्पाजी विष्णु कुलकर्णी यांनी लिहिलेले 'लो. टिळक यांची गेली आठ वर्षे' हे पुस्तक प्रसिद्ध केले, ही गोष्ट पुरेशी बोलकी आहे. सयाजीराव महाराजांचा पुणे येथील गायकवाड वाडा लोकमान्यांना मिळवून देण्यात यंदांचा वाटा होता. तसेच बाबासाहेब आंबेडकर विद्यार्थी असताना त्यांची सयाजीरावांशी ओळख करून देण्यातही ते केळुसकरांबरोबर होते. सयाजीराव महाराजांनी त्यांना 'राजरत्न' पदवीने गौरविले.

ज्ञानप्रसाराच्या उद्देशाने यंदांनी *ज्ञानमंदिर* नावाचे मासिकही चालविले (१९३५-३६).

मुंबईच्या सार्वजनिक जीवनात त्यांचा सक्रिय भाग होता. मराठा ऐक्येच्छु सभेचे ते कार्यकर्ते होते. प्रकाशन व्यवसायाचा एक भाग म्हणून भागभांडवल गोळा करून लिमिटेड कंपनी चालविण्याच्या प्रयोगात यंदांना मोठी तूट आली. आयुष्याचा अखेरचा काल फारसा समाधानकारक गेला नाही. ते पुण्याला स्थायिक झाले व पुणे वास्तव्यातच त्यांचा अंत झाला (२८ नोव्हेंबर, १९४४).

मराठी पत्रकारिता, मुद्रण आणि प्रकाशन या क्षेत्रांत दामोदर सावळाराम यंदे यांनी बजावलेली कामगिरी चिरस्मरणीय ठरेल यात शंका नाही.

सदानंद मोरे

संदर्भ : (१) 'श्रीमद्भागवत कळसरूपी शेवटचा भाग', दामोदर सावळाराम यंदे आणि मंडळी, मुंबई, १९२९. (२) कुलकर्णी, पु. बा. 'निर्णयसागरची अक्षरसाधना; शेठ जावजी दादाजी यांचे चरित्र', निर्णयसागर प्रकाशन, मुंबई, १९६७.

**यार्दी, आप्पाजी बापूजी** : (ज. १८२६ – मृ. १६ जानेवारी, १८९४). नाशिकास चर्च मिशनचे मिशनरी. आप्पाजींचे शिक्षण झाल्यावर त्यांनी १८४५ मध्ये ख्रिस्ती धर्म स्वीकारला. त्यांना सरकारी नोकरी मिळण्याचा योग आला होता, पण ईश्वरविज्ञानाकडे त्यांचा ओढा होता. म्हणून त्यांनी धर्माचा अभ्यास करून ईश्वरसेवा पत्करली. १८५५ मध्ये ते मुंबईला येऊन गिरगावातल्या ख्रिस्ती भक्तगणांची धर्मसेवा करू लागले. पुढे १८६१ मध्ये त्यांना नाशिक येथे आचार्य पदाची दीक्षा देण्यात आली. १८६६ मध्ये ते फिरून मुंबईला आले. तेथे धर्मसेवेबरोबरच समाजसेवेचे कंकण त्यांनी हाती बांधले. निरनिराळ्या मिशनांतल्या भारतीय ख्रिस्ती जनतेला एकत्र आणून एक संघटित ख्रिस्ती समाज बनविण्यासाठी १८७१ मध्ये वेस्टर्न इंडिया नेटिव्ह ख्रिश्चन अलायन्स स्थापण्यात त्यांनी पुढाकार घेतला. बाबा पदमनजी, नारायण शेषाद्री वगैरे इतर मिशनांतले त्यांचे मित्र त्यांना सहकार्य देत होते.

१८८८ मध्ये ते पुण्यास बदलून आले आणि येथल्या आंग्लसंप्रदायी मराठी ख्रिस्ती समाजाची सेवा करू लागले.

जनसेवा आणि ईश्वरसेवा करीत असतानाच आप्पाजी बापूजींनी मराठी वाङ्मयाचीही सेवा केली. प्रथम त्यांनी सामाजिक विषय निवडून बालविवाह, विवाहप्रसंगीच्या अनिष्ट चालीरीती, अनाठायी खर्च, पाठराखणी यांवर 'ज्ञानोदय' या नियतकालिकांतून लेख लिहिले. ते पुढे पुस्तकरूपाने प्रसिद्ध करण्यात आले. इंग्रजी प्रवचनांचा अनुवाद करून त्यांनी *उपदेशप्रकरण* या नावाचा प्रवचनसंग्रह प्रसिद्ध केला. एका इंग्रजी कादंबरीचा मराठी अनुवाद त्यांनी *मालती अथवा दोन गड* या नावाने प्रसिद्ध केला. त्यांची वाङ्मयनिर्मिती अशी –

वाङ्मयनिर्मिती : (१) आमच्या लोकांच्या लग्नासंबंधी रीती व त्यांचे परिणाम (१८७०), (२) भाषांतर–मालती अथवा दोन गड (१८७०), (३) भाषांतर–उपदेश प्रकरण (१८७१), (४) परमेश्वरप्रीत्यर्थ दशमांश (१८७४), (५) भाषांतर–तिमथ्यस व फिलेमोन अथवा एका ख्रिस्ती युवकाची गोष्ट (१८८२), (६) रेव्ह. हरी रामचंद्र ख्रिस्ती यांचे चरित्र (१८८३), (७) भाषांतर–लेंकुरवाळ्या स्त्रियांस बोध (१८५६), (८) भाषांतर–नव्या करारातील इतिहास इत्यादी, दुसरी आवृत्ती १९०७.

भास्कर जाधव

**रड्डी, (पं.) रंगाचार्य बाळकृष्णाचार्य** : ० रंगशर्मा : (ज. १८७०, ग्वाल्हेर – मृ. १९ ऑक्टोबर, १९४४). संस्कृत नाटके व काव्यशास्त्र यांचे टीकाकार व समीक्षक. व्याकरण, धर्मशास्त्र यांच्या अध्ययनाची परंपरा असलेल्या माध्वसंप्रदायी घराण्यात जन्म. सोलापूर व धारवाड येथे अध्यापक, नंतर डेक्कन कॉलेज, पुणे येथे नियुक्ती.

रंगाचार्यांनी मृच्छकटिक, मालविकाग्निमित्र, काव्यादर्श या संस्कृत ग्रंथांवर विस्तृत टीका लिहिल्या. शूद्रक, भास, कालिदास, भवभूती यांच्यावरील चर्चात्मक, रसग्रहणात्मक निबंधही त्यांनी लिहिले. भवभूतीवरील त्यांचा लेख (१९४०) व भासर्वज्ञ या नैयायिकाच्या 'न्यायसार' या ग्रंथाचे अर्थबोधक टीपेसहित भाषांतर (१९२२) प्रसिद्ध. माध्वतत्त्वज्ञानासंबंधी त्यांनी बरेच ग्रंथ लिहिले आहेत. ब्रह्मसूत्रांवरील माध्वभाष्य त्यावरील तत्त्वप्रकाशिकेसह त्यांनी मराठीत भाषांतरित केले आहे.

'श्रीमध्वसिद्धान्तप्रचारिणी शाखासभा' (१९१२) या संस्थेतर्फे पुण्यात सुरू झालेल्या 'श्रीमध्वसिद्धान्तसुधाकर' या मासिकाचे संपादक असताना त्यांनी मध्वाचार्यांच्या अनेक ग्रंथांची भाषांतरे या मासिकातून प्रसिद्ध केली. मराठी व्याकरण परिषदेचे ते अध्यक्ष होते. रघुनाथ पंडिताच्या 'नलदमयंती स्वयंवरा'ख्यानाचे चिकित्सापूर्वक रसग्रहणही त्यांनी केले आहे.

रा. बा. बर्वे, वि. म. बेडेकर

**० रमाकांत नागावकर** : पहा करंदीकर, बळवंत जनार्दन

**रहाळकर, नरहर शंकर** : ० कोणीतरी : (ज. ११ सप्टेंबर, १८७९, मडगाव, खानदेश – मृ. ७ डिसेंबर, १९५७, इंदूर). कवी व टीकाकार. कविवर्य केशवसुतांचे शिष्य व भाष्यकार म्हणून विशेष प्रसिद्ध. प्राथमिक शिक्षण मडगाव आणि नंतरचे पुणे–भुसावळ या ठिकाणी. जबलपूर येथून मॅट्रिक व उज्जैनच्या माधव कॉलेजमधून बी.ए. (१९०४). इंदूर संस्थानात नोकरी.

रहाळकरांची काव्यरचना मुख्यतः १८९८ ते १९०४ या काळात झाली. मडगाव येथे केशवसुत शिक्षक होते. केशवसुतांनी रहाळकरांना काव्यलेखनाला प्रोत्साहन दिले. 'केशवसुत' हे 'कवींचा कवी' असल्याचे उद्गार त्यांनी 'केशवसुतांस' या कवितेतून काढले आहेत. रहाळकरांच्या स्फुट कविता 'उद्यान', 'काव्यरत्नावलि', 'करमणूक', 'प्रभात' या नियतकालिकांत व प्रामुख्याने 'मासिक मनोरंजना'त प्रसिद्ध झाल्या. त्यांच्या स्फुट कवितांचा संग्रह *पुष्पांजलि* (१९२३) या नावाने प्रसिद्ध आहे. का. र. मित्र–संपादित 'कुसुमगुच्छ' (१९०४) या प्रातिनिधिक कवितासंग्रहातही केशवसुत, टिळक, विनायक यांच्याबरोबरीने रहाळकरांच्या कविता आढळतात. त्यांच्या कवितेवर केशवसुतांचा प्रभाव आढळतो.

केशवसुतांच्या कवितांचा संग्रह १९१७ साली प्रसिद्ध होताच *केशवसुत आणि त्यांची कविता* ही लेखमाला त्यांनी 'मनोरंजन' या मासिकात (१९१८) लिहिली व ती पुस्तकरूपाने (१९१९) प्रसिद्ध केली. या लेखमालेतून त्यांनी केशवसुतांच्या व्यक्तिमत्त्वाची, त्यांच्या काव्यस्वरूपाची व काव्यगुणांची ओळख करून दिलेली आहे. केशवसुतांनी रहाळकरांना पाठविलेली खाजगी इंग्रजी पत्रे केशवसुतांच्या काव्यनिर्मितीवर प्रकाश टाकणारी असल्याने महत्त्वाची आहेत.

वरील साहित्याखेरीज *वीरधर्मदर्पण* (१९३२) व *उत्तररामचरित* ही भाषांतरित नाटके, *शाकुंतलसौंदर्य* (१९३६) हा टीकात्मक निबंध इत्यादी साहित्यही प्रसिद्ध आहे. पण रहाळकर मुख्यतः ओळखले जातात ते केशवसुतांचे एक आद्य व रसिक चहाते व केशवसुतांच्या कवितेचे मर्मज्ञ समीक्षक म्हणून.

वा. रा. ढवळे, रा. बा. बर्वी

**राऊत, सखाराम अर्जुन :** ० सखाराम अर्जुन : (ज. १८३९–मृ. १६ एप्रिल, १८८५, मुंबई). वैद्यकशास्त्र व शरीरशास्त्र या विषयावरील ग्रंथांचे लेखक. शिक्षण एल्फिन्स्टन विद्यालय व ग्रँट मेडिकल कॉलेज, मुंबई येथे. हे ग्रँट मेडिकल कॉलेजात वनस्पतिशास्त्राचे प्राध्यापक, व्हॅक्सिनेशन खात्याचे सुपरिटेंडेंट होते. *वैद्यतत्त्व* हा 'प्रिन्सिपल्स ॲण्ड प्रॅक्टीस ऑफ मेडिसिन'च्या आधारे लिहिलेला ग्रंथ (१८६९). त्याचप्रमाणे *देवीच्या रोगाचे स्वरूप आणि त्याच्या शमनाचे व प्रतिबंधाचे उपाय* (१८७६), *विवाहविज्ञान* (वधूवरांची विवाहासंबंधी योग्यता (१८७७), *गर्भविद्या आणि प्रसूतिकरण* (१८७३), *गृहिणी कंठभूषण अथवा स्त्रीविषयक उपयुक्त पाच प्रकरणे* (गर्भिणी, रजस्वला, प्रसूति, बालसंगोपन इ. १८८८) यांसारखी लोकोपयोगी पुस्तके प्रसिद्ध आहेत. एकोणिसाव्या शतकातील एक बुद्धिप्रामाण्यवादी, स्त्रीशिक्षणाचे व स्त्रीस्वातंत्र्याचे पुरस्कर्ते म्हणून डॉ. सखाराम अर्जुन हे प्रसिद्ध होते.

नंदिनी सोटलीकर, रा. बा. बर्वी

० राघवानंद : पहा टिकेकर, रामचंद्र विनायक
० राघोबा जनार्दन : पहा गव्हाणकर, राघोबा जनार्दन

**राजपूरकर, योसेफ येहेजकेल (इझीकेल) :** (ज. १८३४, मुंबई – मृ. १९०५). बेने इस्रायली मराठी धर्मग्रंथांचे लेखक. शिक्षण मुंबई येथे. डेव्हिड ससून बेनीहोलेंट इन्स्टिट्यूटच्या हायस्कूलचे हेडमास्तर.

इस्रायली धर्मांचे पवित्र शास्त्राधारित स्वरूप ज्ञातिबांधवांना समजावे यासाठी अनेक धर्मग्रंथांची मराठीत भाषांतरे केली. *प्रायश्चित्ताच्या दिवशी पापाविषयी कबूल होणे* (१८५८) हे त्यांचे पहिले भाषांतरित पुस्तक. त्यानंतर *इस्राएलांचा लग्नविधी* (१८६२), *धर्मप्रतिपदेची प्रार्थना* (१८६२), *नवसाची सुटका व समुद्रतीरी करावयाची प्रार्थना* (१८६४), *अनतिओखोस राजाचा इतिहास अथवा हानुक्क्याचे सणाची स्थापना* (१८६६) *सद्गुणपत्रे अथवा नीतिशास्त्र–सटीक* (१८७०), *इस्राएलांच्या प्राचीन इतिहासातील गोष्टींचा कालानुक्रम* (१८८०), *इस्राएलांची पंचपोथणे (सणांविषयी)* (१८९०); *इस्राएलांचे तीन उत्सव* (१९०१) इत्यादी ग्रंथांची निर्मिती केली. *इस्राएली धर्माचे खरे स्वरूप* (१८७९) हा त्यांचा ग्रंथ, विशेष उल्लेखनीय असून या ग्रंथात इस्रायली धर्माविषयी सर्वसाधारण विवेचन करून, इस्राएली धर्माची तेरा मूलतत्त्वे अर्थासह स्पष्ट करून त्यावर स्वतंत्रपणे निरूपण केले आहे.

रेचल गडकर, रा. बा. बर्वी

**राजवाडे, कृष्णशास्त्री केशव :** (ज. १८२० – मृ. ६ ऑगस्ट, १९०१, पुणे). कवी, संस्कृत नाटकांचे अनुवादक. शिक्षण पुण्याच्या संस्कृत पाठशाळेत. न्याय, अलंकार, वेदान्त, धर्म ह्यांचे सखोल अध्ययन. त्याच पाठशाळेत उपगुरू (१८४१). सरकारी शिक्षण खात्याच्या कचेरीत भाषांतरकार (१८५६). मराठी ग्रंथकारांच्या दुसऱ्या संमेलनाचे अध्यक्ष (पुणे, १८८५).

*अलंकारविवेक* (१८५३) हा कृष्णशास्त्री राजवाड्यांचा पहिला ग्रंथ प्राकृत कवींच्या रचनेतील अवतरणे उदाहरणादाखल देऊन राजवाड्यांनी ६५ अलंकारांचा विचार या ग्रंथात केला आहे. संस्कृतातील काव्यविचार मराठीत जाणीवपूर्वक आणण्याचा हा पहिलाच प्रयत्न. या ग्रंथाला दक्षिणा प्राइझ कमिटीचे १०० रुपयांचे पारितोषिक मिळाले होते. *मालविकाग्निमित्र* (गद्यपद्य, १८६१, १९०७), *मुद्राराक्षस* (१८६७, १९०७), *अभिज्ञानशाकुंतल* (मूळ संस्कृत व मराठी, १८६९), *विक्रमोर्वशीय* (गद्यपद्य, १८७४) व 'महावीर चरित' (अप्रकाशित) ही त्यांनी संस्कृतातून मराठीत भाषांतरित केलेली नाटके. यांचे *अभिज्ञानशाकुंतला*चे भाषांतर जरी १८६९ मध्ये प्रसिद्ध झाले असले तरी ते १८६० सालीच तयार झाले होते; व ह्या अर्थाने राजवाडे हे 'शाकुंतला'चे पहिले मराठी भाषांतरकार ठरतात. ही सारी भाषांतरे सरस व सुंदर साधली आहेत. *मुद्राराक्षस* व *विक्रमोर्वशीय* ह्या दोन्ही नाटकांच्या भाषांतराबरून मात्र कृष्णशास्त्री चिपळूणकर ह्यांचा हात फिरला होता.

कृष्णशास्त्री राजवाड्यांची स्फुट कविता उपलब्ध नाही. *ऋतुवर्णन* (१८७१) हे वसंत, वर्षा आणि शरद या तीन ऋतूंचे रसालंकारांनीयुक्त असे वर्णन करणारे काव्य व *उत्सव प्रकाश* (१८७४) हे हिंदूंच्या सणाचे आख्यायिकांसह वर्णन करून त्या ओघात गतशतकातील एकूण समाजजीवनाचे चित्र रेखाटणारे काव्य प्रसिद्ध असून या दोन्ही पुस्तकांना दक्षिणा प्राइझ कमिटीची पारितोषिके मिळाली होती.

नंदिनी सोटलीकर, अ. अ. वडोदकर

**राजवाडे, चिंतामण वैजनाथ :** (ज. ३० ऑगस्ट, १८८९ – मृ. ८ मे, १९२०). पाली भाषा व बौद्ध साहित्य ह्या विषयाचे अभ्यासक व लेखक. इतिहाससंशोधक राजवाडे ह्यांचे पुतणे व प्रो. वैजनाथ काशीनाथ राजवाडे ह्यांचे पुत्र. पुण्यास प्रा. धर्मानंद कोसंबी ह्यांच्याजवळ पाली भाषेचा अभ्यास. त्याच विषयात एम्.ए., बडोद्याच्या कॉलेजात पाली व इंग्रजी भाषांचे चार वर्षे अध्यापक.

*हत्थवनगल्लविहारवंस* ह्या लघुपुस्तकाची सटीप आवृत्ती, *मज्झिमनिकाया*च्या आवृत्तीचा मोठा भाग, *पाली रीडर*चा दुसरा भाग आणि *दिघनिकाया*चे नऊशे छापील पृष्ठांचे सटीप भाषांतर ही ह्यांची वाङ्मयीन कामगिरी. *दिघनिकाय* ह्या पाली भाषेतील ग्रंथाचे बडोद्याचे महाराज सयाजीराव गायकवाड ह्यांच्या आज्ञेवरून दोन भागात (पहिला भाग, १९१८ व दुसरा भाग, १९३२) केलेले भाषांतर व संपादन हे ह्यांचे अत्यंत मोलाचे कार्य आहे.

गं. दे. खानोलकर, अ. अ. वडोदकर

**राजवाडे, विश्वनाथ काशीनाथ :** (ज. १२ जुलै, १८६३, पुणे – मृ. ३१ डिसेंबर, १९२६, धुळे). इतिहाससंशोधक व इतिहासमीमांसक. मनस्वी व प्रकांडपंडित. इतिहासाचार्य राजवाडे या नावाने विख्यात. व्याकरणशास्त्र, भाषाशास्त्र, समाजशास्त्र, पुरातत्त्वविद्या इत्यादी विविध ज्ञानशाखांतील पारंगत विद्वान. संस्कृतीचा अनेक अंगांनी विचार करणारा लेखक. १८९० मध्ये पुण्याच्या डेक्कन कॉलेजमधून बी.ए. परीक्षा उत्तीर्ण. फारसी व काही प्रमाणात फ्रेंच भाषेचे अध्ययन. १८८० साली विवाह. पत्नी व अपत्य यांच्या मृत्यूनंतर संसारास पूर्णविराम. पुण्याच्या न्यू इंग्लिश शाळेत काही काळ शिक्षक; पण १८९३ मध्ये राजीनामा. स्वाभिमानी राष्ट्रवादाची समाजाला दीक्षा देण्याच्या हेतूने फकिरी जीवन पत्करून इतिहास, भाषा, संस्कृती इत्यादी विषयांच्या संशोधनास यांनी स्वतःला आमरण वाहून घेतले. इतिहास वस्तुनिष्ठ असावा असा आग्रह. इतिहासाची अस्सल साधने शोधण्याचा, संकलित करण्याचा उपक्रम. भारत इतिहास संशोधन मंडळाची संस्थापना (१८९८).

इतिहासाचार्य राजवाडे ह्यांनी प्लेटोच्या 'रिपब्लिक' या सुप्रसिद्ध ग्रंथाचे मराठी भाषांतर करून ते अंशतः स्वतःच्या *भाषांतर* याच नावाच्या मासिक पत्रातून प्रसिद्ध केले. *भाषांतर* (१८९४-९७) हे मासिक काढण्यामागे त्यांची भूमिका राष्ट्रसेवेची होती. ज्या भौतिक शास्त्राच्या ज्ञानामुळे पाश्चिमात्यांनी पौरस्त्यांवर मात केली ते

ज्ञान संपादन करण्यासाठी भारतीयांनी पुढे सरसावले पाहिजे आणि संन्यासप्रवण मनोवृत्ती टाकून देऊन प्रवृत्तिपर धर्माचा अंगीकार केला पाहिजे ही ती भूमिका होय. या भूमिकेमुळेच अन्य सहकाऱ्यांच्या साह्याने त्यांनी प्लेटो, ॲरिस्टॉटल, बर्क, मिल, सॉक्रेटिस, बेकन इत्यादिकांच्या ग्रंथांचा अनुवाद वरील मासिकातून पूर्ण वा अपूर्ण स्वरूपात प्रसिद्ध केला. त्यांच्या संपूर्ण वाङ्मयनिर्मितीमागेही हीन अस्मितेची दृष्टी असल्याचे आढळते. एकही ओळ इंग्रजीत न लिहिण्याची यांची प्रतिज्ञा यातूनच जन्माला आली. राजवाडे साहित्य-समीक्षक म्हणून प्रसिद्ध नसले, तरी त्यांचा *कादंबरी* हा निबंध (१९०२) मराठी कादंबरीच्या परखड टीकेकरिता प्रसिद्ध आहे.

इ. स. १८९८ पासून १९१७ पर्यंतच्या काळात राजवाडे ह्यांनी *मराठ्यांच्या इतिहासाची साधने* या ग्रंथाचे एकूण चोवीस खंड प्रसिद्ध केले. या सर्व खंडांची पृष्ठसंख्या, प्रस्तावनांसह, सुमारे साडे-सहा हजार एवढी भरते. या साधनग्रंथांतून शहाजी भोसले ह्यांच्या-पासून तो दुसऱ्या बाजीरावापर्यंतच्या कालखंडातील मराठ्यांचा इतिहास आढळतो. त्याचप्रमाणे पुणे ते कटक व तंजावर ते पंजाब पर्यंतच्या प्रदेशांशी मराठ्यांचा जो संबंध आला त्याचा व्यापही प्रकट होतो. या काळातील महत्त्वाच्या व्यक्ती, घराणी, घटना, बखरी, वंशावळ्या, अखबार, लढाया, तह, पौर्वात्य व पाश्चिमात्य इतिहासा-वरील विचार, भागवत धर्म व महाराष्ट्र धर्म, मराठ्यांचे वकील, फारसी–मराठी या भाषांचे संबंध, मराठे–निजाम संबंध, पानिपतचे युद्ध, खर्ड्याची लढाई, तंजावरचा शिलालेख, जेधे शकावली, छत्रपती व पेशवे यांचे संबंध इत्यादी अनेक विषयांसंबंधीची अस्सल कागदपत्रे या खंडांतून आढळतात. ह्या खंडांना राजवाड्यांनी ज्या प्रस्तावना जोडलेल्या आहेत त्या अत्यंत विवेचक आहेत. त्यांची चिकित्सक दृष्टी, बुद्धीचा प्रचंड आवाका, कल्पकता व तर्कपद्धती यांचा जसा आढळ या प्रस्तावनांतून होतो, तसाच त्यांच्या सर्वगामी व्यासंगाचाही आपणाला प्रत्यय येतो. खंड १, ३, ४, ६ व ८ यांच्या प्रस्तावना तर विशेष गाजल्या. त्यांच्या प्रस्तावना *राजवाडे लेख-संग्रह, भाग १ ला, ऐतिहासिक प्रस्तावना* (१९२८) या नावाने ग्रंथरूपाने प्रसिद्ध आहेत.

संपादित व इतिहासाच्या साधनांची जमवाजमव, त्यांची योग्य निवड, त्याचे वाचन व संपादन ह्याबरोबरच त्याचा योग्य वापर करून त्यायोगे अन्वयार्थ मांडण्याचे रॅन्केच्या धर्तीवर कार्य यांनी महाराष्ट्रात आरंभले. ह्या पद्धतीचे येथील हे संस्थापकच मानले जातात.

राजवाडे यांनी संपूर्ण इतिहास लिहिलेला नाही व तो लिहिण्याची वेळ अजून आलेली नाही असे त्यांचे मत होते. पण त्यांनी मराठ्यांच्या इतिहासाचे थोडे निरूपण केले आहे. त्यांच्या प्रस्तावनां-तून बरेचदा रूढ कल्पनांना धक्का देणारे विचार व्यक्त झालेले आहेत. 'महाराष्ट्र धर्म', 'ब्रह्मेंद्रस्वामी धावडशीकर', 'पानिपतचे युद्ध' इत्यादी विषयांवरील त्यांची मते या दृष्टीने उल्लेखनीय वाटतात.

जयराम पिंडे ह्याने रचलेले 'राधामाधवविलासचंपू' (१९२२) हे राजवाडे संपादित संस्कृत–प्राकृत चंपूकाव्यही उल्लेखनीय आहे. छत्रपती शिवाजी महाराजांच्या जन्मदात्याचे, शहाजीराजांचे, काव्यरूप संस्कृत चरित्र म्हणून त्याचे वाङ्मयीन व ऐतिहासिक असे दुहेरी महत्त्व आहे. या काव्याला जोडलेल्या प्रदीर्घ प्रस्तावनेतून राज-वाड्यांनी शहाजी–शिवाजी पितापुत्रांच्या संबंधाची चिकित्सा करून शिवाजीच्या स्वराज्य स्थापनेत शहाजीचा फार मोठा वाटा होता, किंबहुना त्यानेच शिवाजीच्या स्वराज्याचा पाया घातला असा आपला निष्कर्ष व्यक्त केला आहे. राजवाड्यांचा दुसरा महत्त्वाचा संपादित ग्रंथ म्हणजे केशवाचार्यादिकृत *महिकावतीची बखर* (१९२४) हा होय. महिकावतीची ऊर्फ माहीमची ही बखर प्रसिद्ध करून राजवाड्यांनी कोकणच्या इतिहासाचे नवे दालन संशोधकांसाठी मोकळे केले. प्रतापबिंबापासून पोर्तुगीजांच्या राजवटीपर्यंतचा उत्तर कोकणचा इतिहास या बखरीतून आढळतो. निरनिराळ्या दप्तरांतून परिश्रम-पूर्वक विविध बखरी राजवाड्यांनी मिळविल्या व इतिहासाचे साधन-ग्रंथ म्हणून त्या प्रकाशित केल्या. *मराठ्यांच्या इतिहासाची साधने* या ग्रंथाच्या चौथ्या खंडात त्यांनी संशोधिलेल्या अशा अनेक बखरींचा समावेश आहे. नारायण व्यवहार शिक्षा, पेशव्यांची बखर, रमा-स्वयंवर, पेशव्यांची वंशावळ, शिवछत्रपतींसंबंधीची सभासदाची बखर, चित्रगुप्तांची बखर, चिटणीसांची बखर, शिवदिग्विजय, शिवप्रताप, रायरी येथील (१ कलमी) बखर इत्यादींची सविस्तर चर्चा करणारी प्रदीर्घ प्रस्तावना त्यांनी या खंडाला जोडली आहे. वरील ग्रंथांखेरीज त्यांचे इतिहास, वाङ्मय, भाषा इत्यादी अनेक विषयांवरील लेख 'केसरी', 'इतिहाससंग्रह', 'चित्रमयजगत्', 'लोकशिक्षण', 'महा-राष्ट्रधर्म', 'रामदास-रामदासी', 'सरस्वती-मंदिर', 'इतिहास आणि ऐतिहासिक', 'विश्ववृत्त', 'ग्रंथमाला' इत्यादी नियतकालिकांतूनही प्रसिद्ध झाले आहेत. *राजवाडे लेखसंग्रह : भाग २ व ३* (१९२८) मध्ये त्यांचे हे संकीर्ण लेख व निबंध समाविष्ट आहेत. त्यांनी तयार केलेल्या *मेस्तक* पुस्तकाचा उल्लेखही एक महत्त्वाचे कार्य म्हणून करावा लागेल. मराठ्यांच्या इतिहासाची चिकित्सा करताना त्यांनी तत्कालीन पत्रांचे सरकारी व खाजगी असे दोन भाग पाडून, ती मोडीत लिहिण्याची पद्धत, मायने, रेघा, कागदाला पाडावयाच्या घड्या, सुरुवात व शेवट यांची माहिती देण्यासाठी त्यांनी हे *मेस्तक* तयार केले. त्यात सरकारी कागदपत्रांचे अभयपत्र, आज्ञापत्र, इनाम-पत्र, कबुलायत, करीना, तह, महजर वगैरे ७८ प्रकार वर्णिले आहेत. कागदाचे ऐतिहासिक महत्त्व ठरविण्याच्या दृष्टीने ही वर्गवारी मोलाची आहे. मोडी-लिपीचा उगम व विकास यावरही त्यांनी लिहिले आहे. राजवाड्यांचे इतिहाससंशोधन व इतिहासविषयक लेखन केवळ इति-हासाच्या रूढार्थापुरतेच मर्यादित नसून त्यात समाजशास्त्र, उत्क्रांति-वाद, मानसशास्त्र, विज्ञान इत्यादींचाही त्यांनी प्रसंगानुरूप परामर्श घेतला आहे. इतिहासविषयक संशोधनासाठी त्यांनी पुण्यास भारत इतिहास संशोधक मंडळ (१९१०) व अंमळनेर येथे इतिहास संशोधक मंडळ (१९२३) स्थापन केले.

इतिहासविषयक लेखनाव्यतिरिक्त राजवाड्यांचे महत्त्वाचे वाङ्मयीन कार्य म्हणून त्यांचे ज्ञानेश्वरीविषयक संशोधन व रामदास आणि कादंबरी या विषयांवरील तसेच भाषा व व्याकरण यासंबंधी केलेले लेखन नमूद करावे लागेल. राजवाड्यांनी ज्ञानेश्वरीची एकनाथपूर्व-कालीन पोथी मिळवून ती धुळे येथील सत्कार्योत्तेजक सभेच्या द्वारा १९०९ मध्ये प्रसिद्ध केली. एकनाथ-संशोधित ज्ञानेश्वरीच्या प्रतीपेक्षा राजवाडे-प्रत निश्चितच जुनी असल्याने भाषाशास्त्राच्या दृष्टीने अत्यंत महत्त्वाची आहे. या प्रतीला जोडलेली 'ज्ञानेश्वरीतील मराठी भाषेचे व्याकरण' ही प्रदीर्घ प्रस्तावना त्यांच्या चिकित्सक संशोधन दृष्टीचा व सूक्ष्म व्यासंगाचा प्रत्यय देणारी आहे. प्राचीन ग्रंथ संपादित कर-ण्याची शास्त्रीय पद्धतीच जणू राजवाड्यांनी या प्रतीच्या माध्यमातून अभ्यासकांपुढे ठेवली असे म्हटल्यास अतिशयोक्ती होणार नाही. 'श्रीसमर्थ रामदास' हा त्यांचा निबंध रामदासविषयक संशोधनाला प्रेरणा देणारा व महाराष्ट्राच्या समर्थविषयक दृष्टिकोनात क्रांतिकारक परिवर्तन घडवून आणणारा आहे. त्यांचे प्राचीन मराठी साहित्या-संबंधीचे अत्यंत महत्त्वाचे कार्य म्हणजे महानुभव पंथाचे साहित्य ज्या 'सांकेतिक लिपी'च्या कड्याकुलपात बंद होते त्या सांकेतिक लिपीचा त्यांनी पंथाबाहेरील अभ्यासकांसाठी प्रथमच केलेला उलगडा होय. 'कादंबरी' या आधुनिक साहित्यप्रकारावरील त्यांचा निबंधही महत्त्वाचा आहे.

आयुष्याच्या शेवटी राजवाडे मराठीतील धातुपाठाकडे वळले. सुमारे सोळा हजार धातूंच्या नोंदी त्यांनी केल्या. त्यांच्या मृत्यूनंतर त्यांचा *मराठी धातुकोश* (१९३७) प्रसिद्ध झाला. *नामादि शब्द-व्युत्पत्तिकोश* (१९४२) हा त्यांचा ग्रंथही संदर्भग्रंथ म्हणून महत्त्वाचा आहे. राजवाडे हे बहुमुखी प्रतिभेचे संशोधक व चिकित्सक होते. ते इतिहासाचार्य म्हणून प्रसिद्ध असले तरी, ज्ञानकोशकार डॉ. केतकर ह्यांच्या मते इतिहास-संशोधकापेक्षा भाषाशास्त्र-संवर्धक म्हणून त्यांची कामगिरी अधिक मोलाची आहे. त्यांचे सारे संशोधन व लेखन राष्ट्रभक्तीच्या प्रेरणेतून झाले आहे. १९२६ मध्ये पुण्यास भरलेल्या शारदोपासक संमेलनाचे अध्यक्षपद देऊन त्यांच्या कार्याचा गौरव करण्यात आला. त्यांच्या मृत्यूनंतर धुळे येथे 'राजवाडे संशोधन मंदिर' स्थापन करण्यात आले.

भा. क. आपटे, व. कृ. वऱ्हाडपांडे, कल्याण काळे

संदर्भ : (१) 'राजवाडे लेखसंग्रह (प्रस्तावना)', संपा. लक्ष्मणशास्त्री जोशी (साहित्य अकादमी प्रकाशन). (२) श्री. रा. टिकेकर, 'इतिहासाचार्य वि. का. राजवाडे', 'पुरुषार्थ' मे, १९७३. (३) लक्ष्मणशास्त्री जोशी, 'कै. वि. का. राजवाडे जन्मशताब्दी', 'नवभारत', ऑगस्ट, १९६४.

**राजवाडे, वैजनाथ काशिनाथ** : (ज. २७ फेब्रुवारी, १८६०, वरसई, जि. कुलाबा – मृ. १७ डिसेंबर, १९४४). 'निरूक्ता'चे भाषांतरकार. वैदिक वाङ्मयाचे संशोधक आणि आधुनिक मराठी वाङ्मयाचे समीक्षक. माध्यमिक व महाविद्यालयीन शिक्षण पुणे–मुंबई या ठिकाणी. एम्.ए. (१८८६). इतिहासाचार्य राजवाडे ह्यांचे हे ज्येष्ठ बंधू. कराची, पुणे येथे इंग्रजी, संस्कृत या विषयांचे प्राध्यापक. सुरतेच्या एम्. टी. बी. कॉलेजचे प्राचार्य.

*निरूक्ताचे मराठी भाषांतर* (१९३५) हा वैजनाथशास्त्र्यांचा महत्त्वाचा ग्रंथ. वयाच्या शहात्तराव्या वर्षी त्यांनी हा १,४०५ पृष्ठांचा ग्रंथ लिहून प्रसिद्ध केला. काश्यप प्रजापतीच्या 'निघण्टु' नामक ऋग्वेदातील वर्गीकृत शब्दसंग्रहावरील यास्काचार्यांचे भाष्य म्हणजे 'निरूक्त' हा ग्रंथ. राजवाड्यांचे हे संशोधन, अनुवाद आणि विवरण वेद आणि वेदांगे यांच्या अभ्यासाच्या दृष्टीने अत्यंत मोलाचे आहे. प्रि. राजवाडे हे अर्वाचीन मराठी विद्येचे समीक्षक म्हणूनही लक्षणीय ठरतात. वरील ग्रंथाखेरीज त्यांचा केशवसुतांवरील चिकित्सक लेख ('मनोरंजन', जुलै, १९२०), हरिभाऊ आपटे यांच्या 'मी' कादंबरीवरील निबंध ('म. सा. पत्रिका', १९३६), आंग्ल सारस्वताचा इतिहास ('निबंधरत्नमाला', दाभोळकर ग्रंथमाला), डॉ. बेलवलकरांच्या उत्तररामचरिता'च्या मराठी आणि इंग्रजी अनुवादाचे समीक्षण (पुणे, १९२१) हे त्यांचे समीक्षणात्मक लेखनही उल्लेखनीय आहे. आधुनिक आणि प्राचीन या दोन्ही साहित्याबद्दल सारखीच आस्था बाळगणारा एक दुर्मीळ लेखक.

गो. के. भट, रा. बा. बक्षी

**राजवाडे, शंकर रामचंद्र** : (ज. २३ ऑक्टोबर, १८७९ – मृ. २० नोव्हेंबर, १९५२). पाश्चात्त्य व पौर्वात्य तत्त्वज्ञानाचे अभ्यासक, मीमांसक व भाष्यकार. वास्तव्य पुणे. वैदिक धर्माचे पुरस्कर्ते. १९१२ साली डेक्कन कॉलेजातून बी.ए. १९१८–मीमांसा महाविद्यालयाची स्थापना. १९२० – अग्निहोत्री झाले. डेक्कन कॉलेजातील स्वतंत्र बुद्धीचे व वर्तनाचे प्रोफेसर बेन, ग्रीक तत्त्वज्ञ ॲरिस्टॉटल आणि जर्मन विचारवंत नीट्झशे यांचा राजवाड्यांच्या मनावर व विचारांवर बराच प्रभाव पडलेला आहे. त्यांचे ग्रंथ *नीट्झशेचा खिस्तान्तक* व *खिस्तान्तक नीट्झशे* हे आहेत. ऋग्वेदातील *नासदीय सूक्तावर* त्यांनी चतुर्खंडात्मक (१९३१) भाष्य लिहिलेले आहे.

*खिस्तान्तक नीट्झशे* (१९२७) या आपल्या ग्रंथात राजवाडे यांनी नीट्झशेच्या शोकनाट्य मीमांसेच्या निमित्ताने 'कलास्वरूप शास्त्रां'चा म्हणजेच 'एस्थेटिक्स'चा विचार केला आहे. राजवाडे यांच्या संपूर्ण तत्त्वज्ञानाची उभारणी द्वंद्व कल्पनेवरच असल्याने त्यांनी नीट्झशेच्या कलाक्षेत्रीय द्वंद्वाचा विनियोग आपल्या कलास्वरूपविषयक तत्त्वज्ञानात उत्तमप्रकारे करून दाखविला आहे. सवंग कला आणि उत्कट कला, कॉमेडी आणि ट्रॅजेडी, बाजारू संगीत आणि श्रेष्ठ संगीत, बाजारू शैली आणि उदात्त शैली यांतील मूलभूत विरोध व्यक्त करून दुर्बल आणि अवनत कलेवर हल्ला चढविणे, हे नीट्झशेप्रमाणेच राजवाडे यांचेही उद्दिष्ट होते. त्यांनी आपली मीमांसा समकालीन महाराष्ट्रीय कलांना स्वतंत्रपणे लावून दाखविली आहे. अशीच द्वंद्वे त्यांनी धर्म, संस्कृती, चित्रकला, नाट्य यांतही कल्पिली आहेत. नीट्झशेच्या आधाराने त्यांनी कला, संस्कृती आणि धर्म यांचे क्रांतिकारक विवेचन केले. आपल्या 'आत्मचरित्रा'त राजवाड्यांनी त्या काळाचे, व्यक्तींचे व प्रसंगाचे परखड व वेधक वर्णन आणि परीक्षण केले आहे. त्यांचे हे आत्मवृत्त त्यांच्या निधनानंतर १९८० मध्ये प्रकाशित झाले. राजवाडे यांचे इतर ग्रंथलेखन *गीताभाष्य अथवा नीतिशास्त्र* (१९१६), *अग्निहोत्राचे स्वरूप* (१९२०), *नारदीय सूक्तभाष्य* (पूर्वार्ध १९२७, उत्तरार्ध १९३९).

श्री. के. क्षीरसागर, के. ए. पोतदार

० **राजहंस** : पहा वाबीकर, यादव शंकर

**राजोपाध्ये, गोविंद रामचंद्र** : (ज. १३ मे, १८८० – मृ. ३ डिसेंबर, १९५५). ह्यांचे घराणे सातारा येथील छत्रपतींच्या कुलोपाध्यायांचे. बी.ए. (मुंबई विद्यापीठ). शिक्षक. धर्मशास्त्र, इतिहास व प्राचीन मराठी कविता यांचे व्यासंगी.

*समाजशास्त्र अथवा सनातनधर्मप्रणाली* (१९५२), *सामराजकविविरचित मुद्गलाख्यान* (१९३०); *कवि रघुनाथ पंडित व सामराजकृत स्फुट कविता* (१९५२), ही त्यांची पुस्तके काव्यविषयक विवेचन, रसग्रहण, शोधक वृत्ती व रसिक वृत्ती यांची निदर्शक. *पंडितराव राजोपाध्ये घराण्याचा इतिहास* हा त्यांचा ग्रंथ १९६१ साली त्यांच्या मृत्यूनंतर प्रसिद्ध झाला. *सामराज कविविरचित मुद्गलाख्यान* त्यांनी उपोद्घात, अर्थनिर्णायक व इतर टिपांसह संपादून प्रसिद्ध केले. 'रुक्मिणीहरण'कर्ता सामराज व 'मुद्गलाख्यान' कर्ता सामराज एक की दोन ?–असा वाद 'मुमुक्षु'त उपस्थित झाला असता त्यांचा कर्ता एकच, असे निर्णायक मत त्यांनी अभ्यासांती दिले. मराठीचे विख्यात टीकाकार प्रा. द. सी. पंगु यांनी आपल्या 'सामराज' या चर्चात्मक प्रबंधात राजोपाध्ये यांचे मत ग्राह्य असल्याचे नमूद केले आहे.

उषा टाकळकर, के. ए. पोतदार

**राणे, बाबाजी दौलत** : (ज. १८७४, डोंगर, रत्नागिरी – मृ. २२ नोव्हेंबर, १९१३, नागपूर). मूळ कोकणचे. मराठी पाचवी पास. वयाच्या चौदाव्या वर्षी मुंबईत येऊन 'जगदीश्वर' छापखान्यात जुळाऱ्याचे काम करू लागले. तिथे एका हौशी नाट्यसंस्थेच्या नाटकात ते अधूनमधून स्त्रीभूमिका करीत. नंतर 'न्यू व्हिक्टोरिया नाटकमंडळी', 'भवसागरानंदलहरी नाटकमंडळी', 'मुंबईकर नाटकमंडळी' इ. संस्थांतून त्यांनी विविध भूमिका केल्या. राण्यांनी स्वतः स्थापलेल्या 'मुंबईकर नाटकमंडळी'तर्फे (१८९७) त्यांनी 'वीरसेन मंजिरी', 'रूपसेन–रूपवती', 'कुसुमचंपा' इ. नाटके सादर केली. पुढे याच संस्थेचे नाव 'राजापूरकर नाटकमंडळी' असे ठेवण्यात आले. येथे राण्यांनी पगारी विद्वान पदरी ठेवून त्यांच्याकडून नवीन नाटके लिहवून घेतली. ती स्वतःच्या नावावर रंगभूमीवर आणण्याची प्रथा पाडली. ते नाटककार म्हणजे तिनईकर आणि बढावकर हे होत आणि त्यांनी लिहिलेली 'दामाजी', 'पुंडलीक' व 'संत तुकाराम' ही नाटके राण्यांनी रंगमंचावर सादर केली. १९११ मध्ये राण्यांनी आपल्या 'संत तुकाराम' नाटकाचा कोल्हापूर महाराजांच्या अध्यक्षतेखाली प्रथम

प्रयोग केला. ह्या नाटकाने त्यावेळी लोकप्रियतेचा उच्चांक गाठला. बहुजनसमाजाने हे नाटक चांगलेच उचलून धरले. या नाटकात पु. वा. शुक्लांनी, संत तुकारामांची भूमिका केली होती. नागपूर येथे 'संत तुकाराम' या नाटकात जिजाबाईच्या भूमिकेत अभिनय करीत असताना राण्यांना रंगभूमीवर आकस्मिक मृत्यू आला. राण्यांनी पंधरा-वीस वर्षे 'राजापूरकर नाटकमंडळी' चालविली. राण्यांनी आपल्या यशस्वी 'संत तुकाराम' नाटकाची चिरस्मृती म्हणून मुंबई-जवळ कल्याण येथे 'संत तुकाराम नाट्यगृह' बांधले. नट, नाटककार, नाट्यसंस्थानिर्माता, लोकमानसाची अचूक पकड घेणारा नाट्यनिर्माता या नात्याने के. राणे यांनी बजाविलेली कामगिरी लक्षणीय आहे.

कमलेश

संदर्भ : सुमंत जोशी – 'नमन नटवरा'.

० **राधारमण** : पहा लिमये, कृष्णाजी पांडुरंग

**रानडे, नीळकंठ बाबाजी** : (ज. १८७२ – मृ. २१ मे, १९१८). शब्दकोशकार. मुंबईच्या विल्सन कॉलेजात शिक्षण. भावनगर येथील सामळदास कॉलेजात इतिहास व इंग्रजीचे प्राध्यापक.

*दि ट्वेन्टिएथ सेंच्युरी इंग्लिश–मराठी डिक्शनरी* (१९१९) या बृहद् इंग्रजी–मराठी कोशाचे कर्ते म्हणून प्रसिद्ध. १८९२ साली डॉ. ए. जे. मरे यांच्या 'ए न्यू इंग्लिश डिक्शनरी ऑन हिस्टॉरिकल प्रिन्सिपल्स'चे (पुढे या डिक्शनरीचे 'ऑक्सफर्ड' असे नामकरण झाले) पहिले दोन भाग प्रसिद्ध झाले. त्याच धर्तीवर मराठीत सर्वोत्कृष्ट इंग्रजी–मराठी कोश असावा, असे वाटून त्यांनी हे कार्य सुरू केले व अठरा वर्षांच्या परिश्रमानंतर हा प्रचंड कोश सिद्ध केला. या कोशाच्या पहिल्या भागाला लो. टिळक यांनी पुरस्कार लिहिला आहे व त्यात या कोशकाराच्या अभूतपूर्व कार्याचा यथार्थ गौरव केलेला आहे. या कोशाच्या रूपाने भाषाभिवृद्धीचे एक महान कार्य रानडे यांनी पार पाडले.

उषा टाकळकर, के. ए. पोतदार

**रानडे, मनोरमा श्रीधर** : (ज. १३ जानेवारी, १८९६, अहमदनगर – मृ. १३ जानेवारी, १९२६, मुंबई). पूर्वाश्रमीच्या द्वारका हिरगावकर. शिक्षण बी.ए. या रविकिरण मंडळातील समासद–कवयित्री. १९१२ मध्ये यांनी पहिली कविता लिहिली. मनोरमाबाई रानड्यांच्या कविता रविकिरण मंडळाने प्रसिद्ध केलेल्या 'किरण', 'उषा', 'शलाका', 'प्रभा' या पुस्तकांमध्ये, 'अभिनव काव्यमाले'च्या तिसऱ्या व पाचव्या भागात, तसेच क्रमिक पाठ्यपुस्तकांत प्रसिद्ध झाल्या. मनोरंजन, विविधज्ञानविस्तार, लोकमित्र, उद्यान, महाराष्ट्र शारदा या तत्कालीन मासिकांमधूनही त्या वारंवार प्रसिद्ध झाल्या. शिवाय *श्री–मनोरमा* हा कवितासंग्रह (१९३९) त्या व त्यांचे पती श्रीधर बाळकृष्ण रानडे या दोघांच्या कवितांचा आहे. द्वारकाबाई हिवरगावकर हे त्यांचे पूर्वाश्रमीचे नाव. या नावाने अथवा 'गोपिकातनया' या नावानेही त्यांच्या कविता प्रसिद्ध होत.

त्यांची कविता संस्कृतप्रचुर आणि जिव्हाळ्याने ओतप्रोत भरलेली आहे. रविकिरण मंडळाच्या संगोपन – संवर्धनात प्रत्यक्षाप्रत्यक्षपणे मनोरमाबाईंचाही मोठा वाटा आहे.

संदर्भ : (१) 'श्री–मनोरमा' श्रीधर-मनोरमा यांचा कवितासंग्रह, १० एप्रिल, १९३९. (२) 'मराठी-ग्रंथ-सूचि (१८००–१९३७)', संपादक–शं. ग. दाते, पुणे, १९४३.

अनुराधा पोतदार, के. ए. पोतदार, विजया देव

**रानडे, महादेव गोविंद** : (ज. १८ जानेवारी, १८४२ – मृ. १६ जानेवारी, १९०१). भारतातील उदारमतवादी, समाजसुधारक, धर्मसुधारक, राजनीतिज्ञ, इतिहासकार आणि अर्थशास्त्रज्ञ. जन्म निफाड (नाशिक). मराठी व प्राथमिक इंग्रजी शिक्षण कोल्हापूरला झाले आणि माध्यमिक आणि उच्च शिक्षण मुंबईस. धर्मविषयक आस्था, विद्येची आवड आणि राज्यकारभार विषयक कर्तृत्व ह्या गोष्टी आनुवंशिकतेनेच त्यांना मिळाल्या. १८६१ मध्ये बी.ए. (लिट्ल गो) ची परीक्षा ते प्रथम वर्गात उत्तीर्ण. इतिहास आणि अर्थशास्त्र घेऊन पुन्हा बी.ए. (ऑ.) ची परीक्षा त्यांनी दिली. १८६४ मध्ये ते एम्.ए. झाले. मुंबई विद्यापीठाच्या पदवीधरांपैकी रानडे हे पहिले फेलो होते. १८६६ साली पहिल्या वर्गात ते एल्एल्.बी.ची परीक्षा उत्तीर्ण झाले. एकूणच इतिहास, भूगोल, गणित, अर्थशास्त्र, तर्कशास्त्र, इंग्लिश, निबंधलेखन इ. विषयांवर त्यांचे चांगले प्रभुत्व होते. यासाठीच त्यांना 'पदवीधर मुकुटमणी' असे संबोधिले जाते.

ओरिएंटल ट्रान्सलेटरच्या जागी १८६६ च्या जूनमध्ये त्यांची सरकारने नेमणूक केली. मराठी भाषेत जे ग्रंथ त्यावेळी प्रसिद्ध होत होते, त्यांच्यावर अभिप्राय लिहिण्याचे काम ते करीत. साहित्य, इतिहास, समाजशास्त्रीय विषय यासंबंधी त्यांच्या अभिप्रायांत विस्तृत विवेचन केलेले आढळते. १८६८ मध्ये प्राध्यापक (एल्फिन्स्टन कॉलेज, मुंबई), १८७१ पासून न्यायाधीश (पुण्यास न्याय खात्यात) तर १८९३ साली रानड्यांना उच्च न्यायालयात न्यायमूर्तींची जागा मिळाली.

रानडे यांचे दोन विवाह झाले होते. एक वयाच्या बाराव्या वर्षी आणि प्रथम पत्नी वारल्यावर दुसरा विवाह एकतिसाव्या वर्षी रमाबाईंबरोबर ('आमच्या आयुष्यातील काही आठवणी' या आत्मकथेच्या कर्त्या, १९१०). रमाबाईंसमवेत (१८६२–१९२४) त्यांचा प्रपंच सुखासमाधानाचा झाला.

त्यांनी १८६२ मध्ये 'इंदुप्रकाश' या वृत्तपत्राच्या इंग्रजी विभागात समाज सुधारणेची मीमांसा त्यांनी अनेक लेख लिहून केली. कमालीचे अज्ञान, स्त्रियांची दुरावस्था, बालविवाह, तज्जन्य असंख्य अनर्थ अशा अनेक सामाजिक दुष्टांविरुद्ध इंदुप्रकाशात रानडे यांनी झोड उठवून सर्वांगीण सुधारणेचा त्यांनी पुरस्कार केला.

स्वदेशबांधवांच्या धार्मिक उद्धाराचे साधन बनलेल्या प्रार्थना समाजाच्या प्रतिष्ठापनेत रानडे यांचा फार मोठा वाटा होता. महर्षी कर्वे म्हणतात की, '१८७१ नंतरचा बावीस वर्षे पर्यंतचा पुण्याचा इतिहास हा रानडे यांच्या कर्तृत्वाचा इतिहास आहे.' आधुनिक महाराष्ट्राचे जनकत्व, योगी अरविंद रानड्यांकडे देतात तर 'कौटिल्यानंतर झालेला पहिला भारतीय अर्थशास्त्रज्ञ' असे म्हणून कोयाजी त्यांचा गौरव करतात. हायकोर्टाचे जज्ज, प्रार्थना समाजाचे अध्यक्ष, सामाजिक सुधारणेचे अध्वर्यू तर ते होतेच पण त्या शिवाय मार्मिक लेखक, चांगले वक्ते, उत्तम विद्वान, सरळ मनाचे व शांत स्वभावाचे गृहस्थ म्हणून त्यांची विशेष ख्याती होती. भारतीय परंपरा व पाश्चात्त्य सुधारक प्रवृत्ती यांच्या समन्वयांवर रानडे यांनी वारंवार भर दिला होता. विचार व कृती यांचे संधान सांभाळत, भारतीय जीवनाच्या सामाजिक, धार्मिक, आर्थिक व राजकीय अंगाचे दृढीकरण व एकात्मीकरण जलद गतीने व्हावे यासाठी ते प्रयत्नशील राहिले. राष्ट्रीय सभेच्या स्थापनेतही त्यांचा सहभाग होता.

रानड्यांच्या प्रेरणेने सार्वजनिक सभेने केलेले कार्य म्हणजे इंग्लंडच्या संसदेकडे 'जबाबदार राज्यपद्धती'ची मागणी करण्यासाठी पाठवलेला अर्ज. लोकशिक्षण हा या उपक्रमामागील प्रधान हेतू होता.

रानडे यांनी भारताच्या आर्थिक ऱ्हासाची आणि विकासाची शास्त्रशुद्ध मीमांसा दोन व्याख्याने देऊन केली. रानड्यांनी आपल्या देशात औद्योगिक क्रांती व्हावी म्हणून संरक्षक जकातीचे तत्त्व पुरस्कारिले. इंग्रज सरकार भारताच्या आर्थिक विकासाच्या विरुद्ध कसे आहे ही गोष्ट त्यांनी स्पष्ट केली. रानड्यांनी १८९० साली औद्योगिक परिषद स्थापली. कंगाल हिंदुस्थानाला स्वतंत्र अर्थशास्त्र असावे, असे

त्यांनी प्रतिपादले. म्हणूनच त्यांना भारतीय 'अर्थशास्त्राचे जनक' असे संबोधण्यात येते.

रानडे यांनी वाङ्मयीन क्षेत्रात केलेली कामगिरी त्यांच्या इतर क्षेत्रातील कार्यांच्या मानाने अल्प असली, तरी त्या वेळचे पर्यावरण, देशकाल परिस्थिती लक्षात घेता बहुमोल होती असेच म्हणावे लागते. त्यांचे बहुतांशी लेखन इंग्रजीतून होते. रानडे यांना जे लिहावयाचे होते, त्याचे स्वरूप अखिल भारतीय असल्याने व इंग्रजी शिवाय साऱ्या भारतास सामान्य अशी भाषा नसल्याने त्यांनी इंग्रजीचा आश्रय घेतला.

१८९४ पासून पुढील पाच-सहा वर्षे न्या. रानडे यांनी विविध संस्था आणि सभांतून मराठ्यांच्या इतिहासासंबंधी आपले शोधनिबंध वाचले. ते पुढे 'राइझ ऑफ द मराठा पॉवर अँड अदर एसेज' (म. शी. मराठ्यांच्या सत्तेचा उत्कर्ष, १९६४) या पुस्तकात संग्रहित करण्यात आले. या लेखनाला जोडूनच मराठी सत्तेचा विस्तार आणि ऱ्हास यासंबंधीही पुढील दोन खंड लिहिण्याचा त्यांचा मानस होता; परंतु त्यांच्या निधनामुळे (१९०१, मुंबई), तो पूर्ण होऊ शकला नाही. स्वकीयांच्या दृष्टीकोनातून मराठ्यांच्या इतिहासाची वैशिष्ट्ये निःपक्षपातीपणे सादर करणे व यूरोपीय इतिहासकारांच्या लेखनामुळे त्यासंबंधी निर्माण झालेले अपसमज दूर करणे, हा या लेखामागील हेतू होता. या ग्रंथातील विवेचनामुळे संतसाहित्याकडे पाहण्याची नवी दृष्टी महाराष्ट्राला प्राप्त झाली. ना. न्या. म. गो. रानडे यांचे भागवत धर्मावर प्रार्थना समाजात झालेले *पहिले दोन उपदेश* (१८९५), इंडियन प्रेस, मुंबई. *धर्मपर व्याख्याने* (आवृ. २, १९१०), *व्यापारासंबंधी व्याख्याने* (१८७३), *एकनाथी भागवतातील वेचे* (१८९४) ही त्यांच्या इतर ग्रंथांची नावे.

प्रत्यक्ष काव्य कादंबरीसारखी ललित रचना त्यांनी केली नसली तरी ट्रान्सलेटरच्या जागेवरून व दक्षिणा प्राइझ कमिटीचे एक परीक्षक म्हणून ललित वाङ्मयावर अभिप्राय देऊन त्यांनी टीका केली, मार्गदर्शन केले. वाङ्मयाचे अवलोकन करून त्यातील प्रवृत्तीचे दिग्दर्शन करणे व त्यातील इष्टानिष्ट बाबींची चर्चा करून निःपक्षपाताने त्यांचे मूल्यमापन करणे हे त्यांनी दोनदा केले. मराठी वाङ्मय विषयक व्यापक टीकेचा हा इंग्रजी पण पहिला प्रयत्न त्यांनी केला. ही त्यांची कामगिरी अत्यंत महत्त्वाची आहे. 'मराठी वाङ्मयाची अभिवृद्धी : एक टिपण' (A note on the growth of Marathi litarature, 1898) याचे भाषांतर अलिकडेच डॉ. स. गं. मालशे यांनी केले. मराठी संशोधन मंडळाने ते प्रसिद्ध (१९८२) केले आहे.

मराठी साहित्य संमेलनाची गंगोत्री ठरलेल्या पहिल्या मराठी ग्रंथकार संमेलनाचे (११ मे, १८७८) रानडे हे अध्यक्ष होते. मराठीला विद्यापीठाच्या अभ्यासक्रमात स्थान असले तरी ते फार दिवस टिकले नाही. वाङ्मयाच्या व भाषेच्या उन्नतीसाठी म्हणूनच विद्यापीठाच्या अभ्यासक्रमात मराठीला स्थान मिळावे, म्हणून रानडे यांनी फार खटपट केली होती. पण त्यांच्या हयातीत विद्यापीठात मराठीचा पुन्हा प्रवेश झाल्याचे त्यांना पहावयास मिळाले नाही. एकूणच रानडे यांची व्यापक दृष्टी होती.

कमलेश

**रानडे, रमाबाई** : (ज. २५ जानेवारी, १८६२–मृ. २६ एप्रिल, १९२४). न्या. मु. महादेव गोविंद रानडे ह्यांच्या पत्नी. देवराष्ट्रे (कुर्लेकर घराणे), जिल्हा सातारा येथे जन्म. वयाच्या अकराव्या वर्षी रानडे ह्यांच्याशी विवाह. विवाहापूर्वी ह्यांस अक्षरओळख नव्हती, पण पतीच्या मार्गदर्शनाखाली त्यांनी मराठी व संस्कृत भाषांचे ज्ञान चांगल्या प्रकारे संपादन केले व समाजसेवेचे प्राथमिक धडे त्यांच्यापाशीच त्यांनी घेतले. माधवरावांच्या निधनानंतर रमाबाईंनी आपले सारे आयुष्य, पुणे येथे 'सेवासदन' ह्या नावाची संस्था स्थापून स्त्रियांच्या सुधारणुकीच्या व शिक्षणाच्या कामी वेचले. सत्तावीस वर्षे रानडे यांचा सहवास त्यांना लाभला. ह्या काळातील आपल्या आठवणी त्यांनी *आमच्या आयुष्यातील आठवणी* (१९१०) ह्या नावाने प्रसिद्ध केल्या. पत्नीने आपल्या पतीबद्दल लिहिलेला मराठीतील बहुधा हा पहिलाच ग्रंथ होय. 'Ranade : His wif's Reminiscences' या शीर्षकाखाली कुसुमावती देशपांडे ह्यांनी त्याचा इंग्रजी अनुवाद (१९३३) केला आहे. रमाबाईंच्या ह्या 'आठवणी' पासूनच लक्ष्मीबाई टिळक, पार्वतीबाई आठवले, आनंदीबाई कर्वे, लीलाबाई पटवर्धन, राधाबाई आपटे यांनी स्फूर्ती घेऊन तशा प्रकारचे लेखन करून मराठी वाङ्मयात या लेखिकांनी वैशिष्ट्यपूर्ण अशी भर टाकली.

कमलेश

**रानडे, रामचंद्र दत्तात्रय** : (ज. ३ जुलै, १८८६, जमखंडी–मृ. ६ जून, १९५७, निंबाळ). सुप्रसिद्ध तत्त्ववेत्ते. आध्यात्मिक व तत्त्वज्ञानपर ग्रंथांचे जागतिक कीर्तीचे लेखक. डेक्कन कॉलेजात संस्कृतचे शिक्षक. फर्ग्युसन कॉलेजात तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक. भांडारकर इन्स्टिट्यूटच्या संस्थापकांपैकी एक. अलाहाबाद विद्यापीठात तत्त्वज्ञानाचे मुख्य प्राध्यापक (१९२७–४६) व नंतर कुलगुरु.

डॉ. रानड्यांचे बहुतेक लेखन इंग्रजीत आहे. त्यांच्या सातआठ इंग्रजी ग्रंथांचा मराठी अनुवाद प्रा. कृ. वे. गजेंद्रगडकर यांनी केला, तर गीतेवरील ग्रंथाचा 'भगवद्गीता सक्षात्कारदर्शन' (१९५९) हा मराठी अनुवाद श्री. ग. वि. तुळपुळे यांनी केला. *ज्ञानेश्वर वचनामृत*, *संतवचनामृत*, *तुकाराम वचनामृत* (१९२५), *रामदास वचनामृत* व *एकनाथ वचनामृत* हे 'अध्यात्म ग्रंथमालेतील' त्यांचे पाच मराठी ग्रंथ. ही वचनामृते म्हणजे केवळ उतारे नव्हेत. या निवडलेल्या उताऱ्यांना एका सूत्रात गोवून त्या त्या संतांचा साक्षात्कारमार्ग स्पष्ट करून दाखविण्यात आला आहे. विस्तृत प्रस्तावना हे या 'वचनामृतां'चे मोठेच वैशिष्ट्य आहे. परमार्थाचे उज्ज्वल स्वरूप महाराष्ट्रवाङ्मयातून उघड करून सांगणे, हे त्यांच्या या ग्रंथमालेचे प्रयोजन आहे. त्यांच्या मते 'परमार्थाबद्दलच्या निरनिराळ्या भ्रामक कल्पनांचे निरसन करून त्याचे शुद्ध स्वरूप समजावून देणे, हे महाराष्ट्रवाङ्मयाचे पवित्र कर्तव्य आहे. सर्व धर्मांचे एकीकरण करण्याचे सामर्थ्यही महाराष्ट्रवाङ्मयात आहे. ज्ञान, भक्ती व कर्म यांचा त्रिवेणीसंगम जर कोठे झाला असेल, तर तो आमच्या महाराष्ट्रवाङ्मयातच.' *ए कन्स्ट्रक्टिव्ह सर्व्हे ऑफ उपनिषदिक फिलॉसॉफी* (१९२७), *मिस्टिसिझम इन महाराष्ट्र* (१९३०), *फिलॉसॉफिक एसेज* (१९५६), *श्रीमद्भगवद्गीता ॲज ए फिलॉसॉफी ऑफ गॉड रियलायझेशन* (१९५८) हे त्यांचे इंग्रजी ग्रंथ हिंदी व कानडी भाषेतही त्यांचे तत्त्वज्ञानावर ग्रंथ आहेत.

शं. गो. तुळपुळे, के. ए. पोतदार

**रानडे, वामन बाळकृष्ण** : (ज. १२ नोव्हेंबर, १८५४, पंचवटी, नासिक–मृ. २९ ऑगस्ट, १८९९). चरित्रकार, संपादक व विनोदी लेखक. घरीच संस्कृत, मराठी व इंग्रजी भाषेचे अध्ययन केले. 'नासिकवृत्त'चे संपादक.

अल्पवयातच ह्यांनी लिहिलेली बातमीपत्रे 'इंदुप्रकाश'मध्ये प्रकाशित होऊ लागली. 'ज्ञानचक्षु' (पुणे, १८६५) आणि 'हिंदुपंच' (ठाणे, १८७२) या पत्रकातूनही त्यांनी लेखन केले. लोकहितवादी गो. ह. देशमुख यांचे ते लेखनिक राहिल्यामुळे त्यांचा व्यासंग वाढला. मार्मिक भाषा, कल्पनानावीन्य, विषयांची विविधता व विनोदी स्वरूप यामुळे त्यांचे लेखन लोकप्रिय झाले. ठाणे येथील 'सूर्योदय' व सोलापूरचे 'कल्पतरु' या पत्रांचे ते काही काळ संपादक होते. १ मे, १८८४ पासून अखेरपर्यंत त्यांनी 'ज्ञानचक्षु'चे संपादन केले. *सुरेन्द्रनाथ बानर्जी*, *रा. ब. महादेव गोविंद रानडे*, *रा. ब. कृ. ल. नूलकर*,

*म. मो. कुंटे, डॉ. विश्राम घोले, लोकहितवादी, वि. मो. छत्रे, ईश्वरचंद्र विद्यासागर, दादाभाई नौरोजी* (१८९३), *राजा रविवर्मा* यांची, चटकदार चरित्रे त्यांनी लिहिली.

नंदिनी लोटलीकर, के. ए. पोतदार

**रानडे, शंकर मोरो :** (ज. १५ सप्टेंबर, १८५०, वाई – मृ. १६ नोव्हेंबर, १९०३, बडोदे). नाटककार. 'नाट्यकथार्णव'चे संपादक व लेखक. प्राथमिक शिक्षण वाई व उच्च शिक्षण पुणे येथे. बी.ए. (१८७२). इ.स.१८८४ पर्यंत मुंबईस व नंतर बडोदे संस्थानात नोकरी. मध्यंतरी काही काळ 'इंदुप्रकाश' व 'नेटिव्ह ओपिनियन' या वृत्तपत्रांत संपादनाचे काम. बडोद्याच्या 'सद्विचारणी' भाटे सभेचे (१८९०) एक संस्थापक.

'नाट्यकथार्णव' (१८७९–१८८७) या नाट्यविषयक नियतकालिकाचे संपादक या नात्याने ह्यांनी महत्त्वाचे कार्य केले. स्वतःच्या एकट्याच्या बळावर चालविलेल्या या मासिकातून त्यांनी स्वतंत्र व अनुवादित अशी सुमारे वीस नाटके प्रसिद्ध केली. ह्यांनी नाटक ह्या विषयाला सारे जीवन वाहिले होते. *दौलतराव* (१८७९, जॉन ब्राऊन ह्याच्या 'बार्बारोसा'च्या आधारे), *अतिपीडाचरित* (१८८१, शेक्सपिअरकृत 'किंग लिअर'चा अनुवाद), *प्रमाद–प्रमोद अथवा वंचकबुद्धिविलास* (१८८३-८४, मोलियरच्या 'ल एरौंडी'च्या आधारे), *प्रेमगुटिका* (१८८१), *अनुताप शमन* (१८८१-८२), *वीरोत्तंस* (१८८३) ही त्यांची नाटके शब्दशः अनुवाद नसून त्यांनी त्यात 'इकडच्या रीतिरिवाजास अनुकूल असे फेरफार' केलेले आहेत. *संगीत रतिमन्थन* (१८८३) व *संगीत चंडकौशिक* (१८८३) ही संस्कृतच्या आधारे लिहिलेली नाटके. *कर्णवध* हे त्यांचे स्वतंत्र पौराणिक नाटक. *अधिकारदान विवेचना ऊर्फ स्थानिक स्वराज्याविषयी वादावाद* (१८८२) हे लॉर्ड रिपनने लोकांस दिलेल्या स्थानिक स्वराज्याच्या हक्कांच्या निमित्ताने लिहिलेले नाटक, त्याचप्रमाणे गोऱ्या लोकांचा न्याय करण्याविषयी त्याच सुमारास जे इल्बर्ट बिल येऊ पाहत होते त्या घटनेवरील *गौरन्यायमीमांसा ऊर्फ ज्यूरिस्डिक्शन बिल* हे नाटकही उल्लेखनीय आहे. मराठी वाचकांना नाटकाची, विशेषतः पाश्चिमात्य नाट्यवाङ्मयाची त्यांनी गोडी लावली. 'त्यांची नाटके म्हणजे चटकदार, विनोदी, उपरोधपूर्ण संवादाने नटलेल्या प्रसंगांची मालिका' असल्याचे प्रा. श्री. ना. बनहट्टी यांनी नमूद केले आहे. ते उत्कृष्ट नाट्यशिक्षकही होते.

*मथुरा* ही आत्मवृत्तात्मक कादंबरी, त्याचप्रमाणे *शिलादित्य, भा. १* (१८८४) ही आंध्र प्रदेशातील हिंदू राजाच्या कारकीर्दीतील छळाला कंटाळून बंड करावयास निघालेल्या जैन–बौद्ध लोकांविषयीची ऐतिहासिक स्वरूपाची कादंबरीही त्यांनी लिहिली आहे. याखेरीज *बालविवाह आणि धर्म यांचा परस्पराशी संबंध* (१८७४) व *हिंदु लोकांतील विवाह* (१८७४) ही त्यांच्या सुधारणावादी सामाजिक मतांचा पुरस्कार करणारी पुस्तके, *कीर्तनाची पद्ये* (१८९६) व म. गो. रानडे यांच्या स्मरणार्थ *अभिनव कीर्तनत्रयी : कीर्तन १ ले* (१९०३) ह्या त्यांच्या कीर्तनविषयक छंदातून निष्पन्न झालेल्या पुस्तिका ही रानडे ह्यांची अन्य साहित्यनिर्मिती. बडोद्याच्या 'सयाजीविजय' या पत्रातूनही त्यांचे स्फुट लेखन प्रसिद्ध झाले आहे.

मु. श्री. कानडे, के. ए. पोतदार

**० रामजी गणोजी :** पहा चौगुले, रामजी गणोजी

**राशिवडेकर (गुळवणी), अप्पाशास्त्री सदाशिव :** (ज. २१ नोव्हेंबर, १८७४, राशिवडे, जि. कोल्हापूर – मृ. २५ ऑक्टोबर, १९१३, पुणे). महाभारत आणि पुराणे यांचे भाषांतरकार. कोल्हापूर येथे काव्य–व्याकरणादी शास्त्रांचे अध्ययन. पुण्याच्या भावे स्कूलमध्ये संस्कृतचे शिक्षक.

हे 'संस्कृतचंद्रिका' (१८९७) या कलकत्त्याहून प्रसिद्ध होणाऱ्या मासिकाचे संपादक होते. संस्कृतचे क्लिष्ट व पंडिती वळण दूर सारून ते सहजसुंदर, प्रवाही व अकृत्रिम होण्यासाठी यांनी प्रयत्न केले. ह्यांनी 'श्रीभविष्यमहापुराण', 'श्रीविष्णुपुराण' यांची भाषांतरे केली. त्याचप्रमाणे चिपळूणकर आणि मंडळीने प्रसिद्ध केलेल्या महाभारताच्या एक, दोन, सहा व नऊ अशा चार भागांचे भाषांतरही (१९०९–१६) त्यांनी केले आहे.

उषा टाकळकर, के. ए. पोतदार

**रिसबूड, केशव सदाशिव :** ० के. स. रि. : (ज. २६ ऑक्टोबर, १८३८, संगमनेर, जि. नगर – मृ. ४ नोव्हेंबर, १९००). कवी. धुळे येथील ट्रेनिंग स्कूलमध्ये शिक्षक. पुढे जळगाव येथे मुख्याध्यापक. वयाच्या एकेचाळीसाव्या वर्षी अंधत्व. त्याही अवस्थेत ते काव्यरचना करीत.

ह्यांची काही दीर्घ काव्ये व स्फुट कविता प्रसिद्ध आहेत. जळगाव येथे असताना 'काव्यरत्नावली'कार नारायण नरसिंह फडणीस ह्यांच्याशी यांचा स्नेह जुळला व 'काव्यरत्नावली' हे काव्यविषयाला वाहिलेले मासिक काढण्याची प्रेरणा फडणिसांना ह्यांच्यामुळे मिळाली. रिसबूड ह्यांची सुमारे ८६५ पद्ये 'काव्यरत्नावली'तून प्रसिद्ध झाली आहेत. 'केसरीचे अंधत्व' (क्र.१०३) हे स्वतःच्या अंधत्वावरील, त्याचप्रमाणे 'प्रभुलीलाशती' (क्र. १०९) हे मोरोपंतांच्या 'केकावली'च्या धर्तीवरील काव्य हृदयस्पर्शी आहे. *व्यवहारपद्यसहस्र सुभाषिते : आर्या व श्लोक* (१८८४), *प्रभुलीलाशती* (१८८८) व *सुधारकवारणांकुश* (१८९४) ही त्यांची उल्लेखनीय रचना. 'व्यवहारपद्यसहस्र' काव्यात व्यावहारिक नीतीसंबंधी उपदेश करताना त्यांनी व्यावहारिक, पौराणिक व ऐतिहासिक दाखले दिले आहेत. 'सुधारकवारणांकुश' काव्यातून तत्कालीन समाजातल्या सनातनी – सुधारक वर्गातील संघर्षाचे दर्शन घडते. आधुनिक सुधारकांच्या नकली सुधारणांचे खंडन करणे हा या काव्याचा उद्देश आहे. *श्रीशिवछत्रपति* (१८९७), *स्वदेशकल्याणचंद्रिका–पद्यकीर्तनपर कथा* (१८७५), *प्रहेलिकाशतक* (आवृ. २, १९१९) हे त्यांचे अन्य पद्यग्रंथ. ह्यांचे कनिष्ठ बंधू नारो सदाशिव रिसबूड ह्यांची 'वसंतकोकिला' (१८७६) ही अपूर्ण राहिलेली अद्‌भुतरसपूर्ण कादंबरीही त्यांनी पूर्ण करून प्रसिद्ध केली. जरठ–तरुणीविवाहाची अनिष्टता हा या कादंबरीचा विषय आहे.

उषा टाकळकर, के. ए. पोतदार

**० रेठरेकर :** पहा कुलकर्णी, श्रीधर कृष्ण

**रेंदाळकर, एकनाथ पांडुरंग :** ० मंदार : (ज. १ जुलै, १८८७ – मृ. २२ नोव्हेंबर, १९२०, रेंदाळ, जि. कोल्हापूर). कवी आणि संपादक. कागल येथे इंग्रजी चौथ्या इयत्तेत शिकत असताना वडिलांचे निधन; त्यामुळे शिक्षण संपुष्टात आले. परंतु पुढे व्ह. फा. परीक्षेला बसून कोल्हापूर केंद्रात गुणान्वये पहिले आले. कुन्नूर येथे प्राथमिक शिक्षक. पुढे सांगली संस्कृत पाठशाळेत आणि कोल्हापूर येथे पं. बाळशास्त्री हुपरीकर यांच्याकडे समग्र सिद्धान्त कौमुदीचा व काव्य व्युत्पत्तीचा अभ्यास त्यांनी केला. काही काळ 'धर्मविचार' मासिकाचे संपादन व त्यानंतर 'मनोरंजना'चे काही काळ संपादन त्यांनी केले (१९१२ ते १९१४). पुण्याला महर्षी कर्वे यांच्या 'अनाथ महिला आश्रमा'त काही दिवस शिक्षक. नंतर हरी नारायण आपटे यांच्या 'करमणूक' पत्राच्या संपादकीय विभागात काही काळ काम.

'मंदार' या टोपण नावाने कोल्हापूरच्या 'विजयी मराठा' या साप्ताहिकात त्यांच्या कविता प्रसिद्ध होऊ लागल्या. त्यांपैकी अनेक कविता *मंदार मंजिरी* (१९१०) या त्यांच्या कवितासंग्रहात समाविष्ट आहेत. केशवसुत संप्रदायाचे सुरुवातीचे एक प्रमुख कवी म्हणून

रेंदाळकर प्रसिद्ध आहेत. ते केशवसुतांचे निष्ठावंत अनुयायी होते. 'केशवसुतांस' उद्देशून लिहिलेल्या एका कवितेत त्यांनी 'आहे साथ करावयास बसलो राहून मागे तुझ्या' असे उद्गार काढले आहेत. रूढीविरुद्ध लिहिणे, सामाजिक सुधारणांचे स्वागत करणे, आपला दृष्टिकोन विशद करण्यासाठी निसर्गातील उदाहरणांचा आश्रय घेणे, मनातील भावना व विचार यांचा प्रथमपुरुषी आविष्कार करणे, हे सारे केशवसुती कवितेचे विशेष रेंदाळकर यांच्या कवितेत आढळतात. प्लेटॉनिक प्रेमाचा पुरस्कार त्यांच्या कवितेत विशेषत्वाने आढळतो. निर्यमक कवितालेखनाचा स्वकाळात धाडशी ठरणारा उपक्रम त्यांनी प्रारंभिला. त्यासाठी कठोर टीकाप्रहारही त्यांनी सहन केले. 'उघडि नयन रम्य उषा हसत हसत आली' या ओळीने प्रारंभ होणाऱ्या प्रबोधन (उघडि नयन रम्य उषा–१९११) या कवितेने रेंदाळकर यांचे नाव सर्वत्तोमुखी झाले. 'अजुनि चालतोचि वाट' ही त्यांची कविताही अतिशय प्रसिद्ध आहे. त्यांनी लहानमोठी दहा खंडकाव्ये लिहिली. त्यांपैकी *मोहिनी* हे खंडकाव्य स्वभाव परिपोष, प्रसंगवर्णन व प्रवाही भाषा या गुणांमुळे उल्लेखनीय आहे (१९१३).

अनाथ महिला आश्रमात शिक्षक असताना त्यांनी *यमुनागीत* ही दीर्घ कविता लिहिली (१९१५). नदी व प्रिया या दोघींचीही प्रतीती व्हावी अशी रचना या कवितेत त्यांनी केली आहे. त्यांच्या स्फुट कवितांचे दोन खंड अनुक्रमे १९२४ व १९२८ साली त्यांचे एक स्नेही व चाहते वामन जनार्दन कुंटे यांनी प्रसिद्ध केले. त्यांची भाषा सुरुवातीस संस्कृतप्रचुर व समजावयास अवघड होती. परंतु आयुष्याच्या उत्तरार्धात ती साधी व सोपी झालेली आहे. याचा प्रत्यय त्यांच्या 'सारजा' (टेनिसनच्या एनॉक ऑर्डन आधारे) या काव्यावरून येतो. त्यांची काव्यरचना सुश्लिष्ट, जोमदार व अलंकारयुक्त आहे. निर्यमक कवितेचे ते हिरीरीचे पुरस्कर्ते व प्रचारक होते. निर्यमक कवितेची बाजू त्यांनी 'विविधज्ञानविस्तारा'त (१९१२) चांगल्या रीतीने मांडली.

बा. रा. ढवळे, के. ए. पोतदार

संदर्भ : (१) रा. श्री. जोग, 'अर्वाचीन मराठी काव्य'. (२) भ. श्री. पंडित, 'आधुनिक मराठी कविता'. (३) भ. श्री. पंडित, 'उघडि नयन' रेंदाळकरांच्या १०१ निवडक कविता.

**लठ्ठे, अण्णा बाबाजी :** (ज. १८७८, कुरुंदवाड, दक्षिण महाराष्ट्र–मृ. १६ मे, १९४५). दक्षिण महाराष्ट्रातील ब्राह्मणेतर चळवळीचे एक प्रमुख नेते, कुशल प्रशासक, अर्थशास्त्रज्ञ. दक्षिण महाराष्ट्रातील एक जैन समाजातून पुढे आलेले अग्रेसर कायदेपंडित. चरित्रकार, इतिहासलेखक व राज्यघटनाशास्त्रज्ञ. काही काळ बेळगाव येथे वकिली. तत्कालीन संस्थानी राजकारणाचे तज्ज्ञ. इंग्लंडमध्ये भरलेल्या गोलमेज परिषदेत संस्थानिकांचे सल्लागार. पुढे मुंबई राज्याच्या काँग्रेस मंत्रिमंडळात (१९३७–३९) अर्थमंत्री.

शिक्षण सांगली, कोल्हापूर व पुणे येथे. कोल्हापूरच्या राजाराम कॉलेजात इंग्रजीचे काही काळ प्राध्यापक (१९०७–११). त्यानंतर कोल्हापूर संस्थानचे शिक्षण निरीक्षक. पुढे कोल्हापूर संस्थानचे दिवाण. १९२९ मध्ये बेळगाव येथे भरलेल्या मराठी साहित्य संमेलनाचे स्वागताध्यक्ष.

ह्यांची *कोल्हापूरच्या राज्याचा इतिहास* (१९१२) व *हिंदुस्थानातील ब्रिटिश साम्राज्याचा उदय* (१९१४) ही इतिहासविषयक पुस्तके प्रसिद्ध आहेत. यांनी *श्रीमंत छत्रपती शाहू महाराज* (१९२५) हा चरित्रग्रंथ लिहिला. शाहू महाराजांचे इंग्रजी चरित्रही यांनी लिहिले आहे. *जगातील फेडरल राज्यव्यवस्था* (१९३१) व *माझ्या विलायतच्या आठवणी* (१९२९) हे त्यांचे अन्य काही ग्रंथ.

*डेक्कन रयत* हे इंग्रजी साप्ताहिकही यांनी १९१८ ते १९२० या काळात चालविले होते. पुढे यांच्या राजकीय मतांत पालट होऊन ते काँग्रेस पक्षात प्रविष्ट झाले.

पां. बा. गाडगीळ, के. ए. पोतदार, गो. म. कुलकर्णी

संदर्भ : डॉ. य. दि. फडके लिखित, 'लठ्ठे चरित्र'.

**लक्ष्मणराव, कोमाराजू वेंकटेश :** ० के. व्ही. लक्ष्मणराव : (ज. १८७७–मृ. १३ जुलै, १९२३, मद्रास). तेलगु-भाषिक मराठी लेखक, तेलगु-ज्ञानकोशाचे आद्य निर्माते. शालेय व महाविद्यालयीन शिक्षण नागपूर येथे. नागपूरच्या मॉरिस कॉलेजातून बी.ए. व कलकत्ता विद्यापीठातून एम्.ए. (तत्त्वज्ञान) उत्तीर्ण.

ह्यांनी लेखनाला सुरुवात मराठीतून केली. 'सुविचारसमागम' व 'विविधज्ञानविस्तार' या नियतकालिकांतून ह्यांचे लेखन प्रसिद्ध झाले आहे. पंचवटीस्थल निर्णयासंबंधीची ह्यांची महत्त्वपूर्ण लेखमाला ('सुविचारसमागम', अं. २, ३, ५, ६) आणि राजवाडे-संपादित 'राधामाधव विलसचंपू'वरील चिकित्सक परीक्षण लेख, तसेच 'दंडीची अवंतिसुंदरीकथा' हा लेख (विविधज्ञानविस्तार, अनुक्रमे एप्रिल व मे, १९२३ आणि ऑगस्ट, १९२३) ह्यांवरून त्यांच्या गाढ व्यासंगाचे व ऐतिहासिक दृष्टीचे प्रत्यंतर येते. मोरोपंती 'भारता'च्या एक-दोन पर्वांचे संपादनही त्यांनी केले होते. वि. का. राजवाडे ह्यांना ते मराठी साहित्यक्षेत्रातील आदर्श मानीत. १९०६ मध्ये मद्रास येथे त्यांनी आपल्या लेखन-प्रकाशन चळवळीचे केंद्र हलविले. 'आंध्र विज्ञान सर्वस्वम्' या संकल्पित तेलगू ज्ञानकोशाची योजना कार्यान्वित करण्याचा त्यांच्या प्रयत्नातूनच आपल्या मराठीतून ज्ञानकोश तयार करण्याच्या कल्पनेला चालना मिळाली, असे डॉ. श्री. व्यं. केतकर ह्यांनी नमूद केले आहे.

उषा टाकळकर, के. ए. पोतदार

**लागवणकर, गोपाळ शिवराम :** ० गोपाळ शिवराम : (ज. २५ जानेवारी, १८४०, जि. रत्नागिरी–मृ. २५ ऑक्टोबर, १८९०). वैद्यकीय ग्रंथांचे लेखक. घराण्यात वैद्यकीची परंपरा. इंग्रजी शिक्षण मुंबईच्या एल्फिन्स्टन विद्यालय व ग्रँट मेडिकल कॉलेज येथे. एम्.एस. (१८६४) ही वैद्यकातील पदवी. मुंबई येथे असिस्टंट सर्जन व ग्रँट मेडिकल कॉलेजात अध्यापक.

*शस्त्रवैद्यक : सर्जरी* (१८६९) व *न्यायवैद्यक : मेडिकल ज्यूरिसप्रूडन्स* (१८७१) हे ह्यांचे इंग्रजी ग्रंथांच्या आधारे तयार केलेले दोन ग्रंथ प्रसिद्ध आहेत. मराठी भाषेत वैद्यकग्रंथांची भर पडावी या तळमळीतून ह्या ग्रंथांचे लेखन झाले. 'दंभहारक' मासिकातून शरीरसंपत्ती ह्या विषयावर त्यांचे काही निबंध प्रसिद्ध झाले होते.

उषा टाकळकर, अ. अ. वडोदकर

**लाड, नारायण दाजी :** ० नारायण दाजी : (ज. २९ फेब्रुवारी, १८२८–मृ. १६ जुलै, १८७५, मुंबई). मुंबईच्या ग्रँट मेडिकल कॉलेजमधून १८५२ साली वैद्यकशास्त्राची पदवी. वैद्यक कॉलेजात रसायनशास्त्र व औषधिविद्या ह्यांचे प्राध्यापक (१८६१). डॉ. भाऊ दाजी ह्यांचे धाकटे बंधू.

*रसायनशास्त्र : सचित्र* (१८६३) व *औषधिविद्या* (१८६५) हे इंग्रजी ग्रंथांच्या आधारे लिहिलेले दोन ग्रंथ प्रसिद्ध. *औषधिविद्या* या ग्रंथात औषधी, त्यांच्या कृती, औषधांचे वर्णन व त्यांची योजना यांची सविस्तर माहिती आढळते. वनस्पतींच्या संशोधनाची त्यांना आवड होती. या संशोधनावर आधारित त्यांचे अनेक लेख ग्रँट मेडिकल कॉलेज सोसायटीच्या नियतकालिकांतून प्रसिद्ध झाले आहेत.

उषा टाकळकर, मीनल निसळ

**लाड, पुरुषोत्तम मंगेश :** ० चकोर ० चिकित्सक ० निरीक्षक : (ज. २९ मार्च, १९०५, सावंतवाडी–मृ. १४ मार्च, १९५७, दिल्ली).

कवी, साहित्य समीक्षक, संतवाङ्मयाचे अभ्यासक. हिंदुस्तान सरकारच्या सनदी नोकरीत (I.C.S.) दाखल. १९३० साली बॅरिस्टर झाले. १९५४ पासून दिल्लीत 'माहिती व नभोवाणी खात्या'चे सचीव. साहित्यक्षेत्रातील व्यक्तींनी या खात्यात रुजू होण्यास त्यांनी उत्तेजन दिले. नभोवाणी केंद्रावर लाड स्मृतिव्याख्यानमाला आयोजित करण्याची प्रथा आहे.

'चकोर', 'चिकित्सक', 'निरीक्षक' या टोपणनावांनी त्यांनी अनेक समीक्षणात्मक लेख लिहिले. त्यांचे विविध विषयांवरील निबंध *कृत्तिका* (१९४५) व *आकाशगंगा* (१९५७) या पुस्तकांत आढळतात. *मधुपर्क* (१९४३) ह्या या संग्रहाला जोडलेला त्यांचा *मुक्तक आणि भावगीत* हा निबंध महत्त्वपूर्ण आहे. प्रचीती, प्रक्षोभ, प्रसाद, प्रतिभा व प्रयत्न हे पाच 'प्र'कार भावकाव्याचे पंचप्राण आहेत असे त्यांनी ह्या निबंधात मांडले आहे. त्यांनी जुनी-नवी मराठी कविता चांगली अभ्यासली होती. नामदेव, तुकाराम, भा. रा. तांबे व माधव जूलियन हे त्यांचे अत्यंत आवडीचे कवी. तुकाराम हे त्यांचे आराध्य दैवतच. त्यांच्यावरील या श्रद्धेमुळेच त्यांनी 'श्रीतुकारामबावांच्या अभंगांच्या गाथे'चे (१९५५) महाराष्ट्र सरकारसाठी पुनर्संपादन केले. तुकाराम चरित्राचेही पुनर्संशोधन केले. त्याचा संकल्पित उत्तरार्ध मात्र ते अकाली निधनामुळे पूर्ण करू शकले नाहीत.

गं. दे. खानोलकर, के. ए. पोतदार

**० लिमये, अण्णासाहेब :** पहा लिमये, विठ्ठल रामचंद्र

**लिमये, कृष्णाजी गणेश ऊर्फ काकासाहेब :** (ज. १५ ऑगस्ट, १८९२, पंढरपूर–मृ. २८ एप्रिल, १९४८, पुणे). दैनिक 'ज्ञानप्रकाश'चे संपादक आणि मराठी पत्रकार परिषदेचे पहिले अध्यक्ष.

प्राथमिक शिक्षण पंढरपूर व नंतरचे पुणे–मुंबई येथे. एम्.ए., एलएल.बी. १९२६ साली 'ज्ञानप्रकाश'चे संपादक म्हणून नियुक्ती. १९४१ मध्ये या पदावरून निवृत्त. 'सर्वंटस् ऑफ इंडिया' सोसायटीचे सदस्य. मराठी पत्रकार परिषद स्थापन करण्यात पुढाकार. त्या परिषदेच्या मुंबई येथे भरलेल्या पहिल्या अधिवेशनाचे (१९३९) अध्यक्ष. महाराष्ट्र विद्यापीठाच्या निर्मितीसाठी यांनी खूप परिश्रम घेतले. या विषयावर त्यांनी काही लेखनही केले आहे. महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे या संस्थेचे १९४३ ते १९४५ पर्यंत कार्याध्यक्ष.

'ज्ञानप्रकाश' हे नेमस्त पक्षाचे मुखपत्र होते. पण लिमये संपादक झाल्यावर त्यांनी बातम्या देण्याच्या बाबतीत पक्षातीत धोरणाचा अवलंब केला. स्त्रियांचे प्रश्न, ललित साहित्य, नाट्यपरीक्षणे, साहित्यसमीक्षा, परराष्ट्रीय प्रश्न, काव्यशास्त्रविनोद आदी सदरे सुरू करून 'ज्ञानप्रकाश' हे पत्र लोकप्रिय केले.

सोसायटीत मतभेद झाल्यामुळे १९४१ मध्ये त्यांना संपादकपद सोडावे लागले. तथापि त्यानंतरही ते 'ज्ञानप्रकाशा'त स्वतंत्रपणे लेखन करीत असत. लोकप्रिय वक्त्यांच्या भाषणांचे सविस्तर वृत्तान्त देण्याची प्रथा लिमये यांनी 'ज्ञानप्रकाश'मधून प्रथम आरंभिली. लिमये यांचे काही लेखन 'ज्ञानप्रकाशकार लिमये' या पुस्तकात समाविष्ट झाले आहे.

पां. बा. गाडगीळ, के. ए. पोतदार

संदर्भ : 'ज्ञानप्रकाश'कार लिमये (१९९२) संपा. गंगाधर महांबरे.

**लिमये, कृष्णाजी पांडुरंग :** ० राधारमण : (ज. ५ सप्टेंबर, १८७७, पाडले, ता. दापोली, जि. रत्नागिरी – मृ. १ नोव्हेंबर, १९२२, पाडले). जुन्या पंडिती वळणाचे कवी. प्राथमिक शिक्षण पाडले येथे. मॅट्रिक (१८९५) दापोली येथून. त्यानंतर एकवीस वर्षांनी (१९१६) बी.ए. परीक्षा उत्तीर्ण. पाडले व दापोली येथील शाळांतून शिक्षक म्हणून नोकरी.

पत्नीचे नाव राधा, म्हणून 'राधारमण' हे काव्यनाम स्वीकारले. त्यांच्या कवितांचा काही अंश *अभिनव काव्यमाला*, भाग दुसरा (आवृ. दुसरी, १९२२), *काव्यदोहन* (१९०७) व *काव्यकौमुदी* (            ) या प्रातिनिधिक संग्रहांतून आढळतो. त्यांची समग्र कविता *समग्र राधारमण* (१९४९) या संग्रहात समाविष्ट आहे. मराठी व इंग्रजी साहित्याचा चांगला व्यासंग असूनही संस्कृतातील अभिजात काव्याचा त्यांच्यावर विलक्षण प्रभाव होता. भारवी व मोरोपंत हे त्यांचे आवडते कवी. त्यामुळेच राधारमण ह्यांची कविता दीर्घ, कथनात्मक अशी झाली आहे. *कालचक्र* (१८९८) ही कालिदासाच्या 'ऋतुसंहारा'ची आठवण करून देणारी त्यांची कविता, कोकणातील शरत्कालापासून तर वर्षाकालापर्यंतच्या संपूर्ण ऋतुचक्राचे दर्शन घडविते. *फडणीस-काव्य* (१९०५) हे नाना फडणविसांवर रचलेले दशसर्गात्मक खंडकाव्य. राधारमण हे लो. टिळकांचे भक्त होते. त्यांच्या टिळकभक्तीचा प्रत्यय *मोरोपंतांचा ममुदोह* (१९०७) व *आर्यमाताविलाप* (१९०९) या काव्यांवरून येतो. *महाराष्ट्र वीरदर्श* (१९११) या काव्यात मराठ्यांच्या शौर्याचे अत्यंत स्फूर्तिदायक वर्णन आले असून भारवीच्या 'किरातार्जुनीया'च्या पाच सर्गांचे भाषांतरही त्यांनी केले आहे.

वा. रा. ढवळे, के. ए. पोतदार

**लिमये, दत्तात्रय गोपाळ :** (ज. १५ जानेवारी, १८७३, विटे, जि. सातारा – मृ. १७ एप्रिल, १९१५). पत्रकार, महाभारत व भारतीय संस्कृतीवरील ग्रंथांचे लेखक. महाविद्यालयीन शिक्षण पुणे येथे. बी.ए. संस्कृतची आवड, महाभारताचा अभ्यास व भारतीय संस्कृतीवरील श्रद्धा यामुळे राष्ट्रवादी वृत्तपत्रांकडे ओढा. शिवरामपंत परांजपे यांच्या 'काळ' पत्रात काही काळ उपसंपादक व नंतर लो. टिळकांच्या 'केसरी'मध्ये दुय्यम संपादक.

ग्रंथलेखनास प्रारंभ *मोहनेची अंगठी किंवा जशास तसे* (१८९९) या शेक्सपिअरच्या 'मर्चन्ट ऑफ व्हेनिस'वरून लिहिलेल्या नाटकाने झाला. तथापि भारतीयत्वाच्या प्रखर अभिमानामुळे व 'केसरी'-कारांच्या संस्कारामुळे ते भारतीय संस्कृतीचे श्रेष्ठत्व वर्णन करणाऱ्या लेखनाकडे वळले. *भारतीय युद्ध कथा* (१९०७), *सावित्रीचरित्र* (१९१२), *भारतीय उपकथा* (१९१३), *भारतीय स्त्रिया–शकुंतला व दमयंती* (१९१३), *भारतीय श्रेष्ठत्व* (१९२२) ही त्यांची प्रमुख पुस्तके. *भारतीय युद्धकथा* या ग्रंथावरून त्यांचा महाभारताचा व्यासंग स्पष्ट होतो. *भारतीय श्रेष्ठत्व* या ग्रंथाचा पहिला भाग लिहून झाल्यावर (१९१५) ते मृत्यू पावले. त्यानंतर हा ग्रंथ शंकर रामचंद्र बेडेकर यांनी पूर्ण केला. या पहिल्या भागात प्राचीन भारतातील समाज, भारतीय संस्कृतीची प्राचीनता, नीतिमत्ता, कुटुंबव्यवस्था, राज्यव्यवस्था, भाषा व लिपी इत्यादी विषयांचा ऊहापोह करून भारतीय संस्कृती निःसंशयपणे पाश्चात्त्य संस्कृतीपेक्षा श्रेष्ठ असल्याचा निष्कर्ष काढला आहे.

हरिश्चंद्र थोरात, के. ए. पोतदार

**लिमये, विठ्ठल रामचंद्र ऊर्फ अण्णासाहेब :** (ज. १८३८ – मृ. १९१९). वेदान्तपर ग्रंथांचे लेखक. पाटण व पुणे ट्रेनिंग कॉलेजात शिक्षक. पुढे शिक्षणखात्यात अधिकारी. निवृत्तीनंतर नागपूर येथे वास्तव्य.

ह्यांचा *विश्वनिरीक्षण* (१९०५) हा वेदान्तविषयावरील ग्रंथ प्रसिद्ध आहे. दामोदर सावळाराम यंदे ह्यांनी तो प्रकाशित केला होता. 'मनन' नावाचा आणखीही एक ग्रंथ ह्यांनी लिहिला होता असे कळते. मात्र तो अप्रकाशित आहे.

उषा टाकळकर, मदन कुलकर्णी

**लिमये, (नरगुंदकर) विनायक गोविंद :** (ज. १८६० – मृ. १८९७). स्त्रीशिक्षणविषयक बोधपर लघुग्रंथांचे व नाटिकांचे लेखक. समाजमनाचे उद्‌बोधन हा हेतू मनात ठेवून यांनी आपले लेखन केले. *अचला-जानकी चातुर्य* (१८८४), *स्त्रीशिक्षणमाला* (१८८५), *संसारासंबंधी स्त्री-पुरुषांची वागणूक* (१८८५), *सासुरवास-चंद्रिका* (१८८६), *सौभाग्यमंदिर* (१८८९) याशिवाय *कुटुंब-प्रकाश*, *संसारदर्पण* इत्यादी आठ–दहा पुस्तके लिमये यांनी लिहिली.

समाजस्थितीचे चित्र पुढे ठेवणारे *विचारदौर्बल्य*-प्रहसन (१८८५), *सत्यभामा आणि विष्णुपंत* : नाटिका (१८८६), *न्हाणवली व ऋतुशांती* : संवाद (१८८६) असे त्यांचे नाट्यात्मक स्वरूपाचे लेखन आहे.

यांनी इंद्रजालविषयक दोन पुस्तके लिहिल्याचा उल्लेख 'दाते ग्रंथ-सूची'त आढळतो. *एतद्देशीय संस्थानांचा इतिहास किंवा नेटिव राजांचा इतिहास*–भाग १, २ (१८८७, १८८९) हे थोडेसे ऐतिहासिक स्वरूपाचे लेखन व *सेतुबंध-रामेश्वर यात्रावर्णन* (१८८७) हे स्थल व यात्रावृत्त वर्णनपर एक पुस्तकही त्यांनी लिहिले आहे.

उषा टाकळकर, मदन कुलकर्णी

**लिमये, हरि गोविंद :** (ज. १७ ऑक्टोबर, १८७१, पाली, जि. कुलाबा – मृ. १६ फेब्रुवारी, १९१९). इतिहासविवेचक. प्राथमिक शिक्षण पाली व नंतरचे शिक्षण पुणे येथे. एम्.ए. (१८९९). फर्ग्युसन कॉलेजात इतिहासाचे प्राध्यापक. प्रसिद्ध कादंबरीकार हरिभाऊ आपटे यांचे एक निकटवर्ती मित्र. अ. ह. लिमये यांचे वडील. कीर्तने, चिपळूणकर यांचे इतिहासावरील निबंध व 'काव्येतिहाससंग्रह' इत्यादी-मुळे मराठ्यांच्या इतिहासाचा अभ्यास व संशोधन करण्याची प्रेरणा मिळून ते तिकडे वळले. त्यांचे इतिहासविषयक स्फुटलेखन महत्त्वाचे आहे. 'हिंदी सैन्य व कवायती कंपू', 'मराठेशाहीच्या अंताची मीमांसा', 'डेलासचा संघ व मराठी साम्राज्य', 'दिल्ली की आग्रा?', 'अ हिस्ट्री ऑफ मराठी पीपल' (किंकेडच्या पुस्तकाचे परीक्षण) या त्यांच्या लेखांचा समावेश 'कै. प्रो. हरिभाऊ लिमये : जीवन व वाङ्‌मय' (संपा., रा. श्री. शर्मा : १९४८) या पुस्तकात झाला आहे. 'दिल्ली की आग्रा?' या लेखात औरंगजेबचा समकालीन इतिहासकार महंमद हशीम ऊर्फ खाफीखान याचे लिहिणे सत्यास धरून असल्याचे त्यांनी साधार स्पष्ट केले आहे. मराठ्यांचा विश्वसनीय इतिहास हा मराठी साहित्याबरोबर फार्सी, संस्कृत, इंग्रजी, फ्रेंच, डॅनिश, पोर्तुगीज इ. अन्य साहित्य संदर्भ बारकाईने तपासून लिहिला जावा, असे त्यांचे मत होते, ते लक्षणीय आहे.

उषा टाकळकर, के. ए. पोतदार

**लेंभे, विठ्ठल भगवंत :** (ज. २५ मार्च, १८५०, तळेगाव ढमढेरे, जि. पुणे – मृ. १ ऑगस्ट, १९२०, पुणे). कवी. माध्यमिक शिक्षण पुणे येथे. नंतर रेल्वे खात्यात ४२ वर्षे नोकरी. लेंभे यांच्यावर मराठीतील पंडित कवींची छाया आहे. लेंभ्यांनी मोरोपंत, वामन पंडित, रघुनाथ पंडित प्रभृती कवींची कविता वाचली आणि संस्कृत पाठांतरही बरेच केले होते.

लेंभे यांची *मित्रदर्शन* (१८८६) व *सुरतरंगिणी*, *शोकावर्त* (१८९९), *खंडिता* व *आनंदकंद* (अपूर्ण) ही चार, *लेंभे यांची कविता* (१९२४) अशी एकूण पाच खंडकाव्ये प्रसिद्ध झाली आहेत. त्यांची स्फुट कविता 'काव्यरत्नावली', 'मनोरंजन', 'करमणूक' इत्यादी तत्कालीन नियतकालिकांतून प्रसिद्ध झाली. त्यांचे गद्यलेखन पुढीलप्रमाणे : *परिणयोत्सौख्य*–प्रहसन व *कादंबरी नाटक*–गद्यपद्य ('बाणाच्या कादंबरी'चे नाट्यरूपांतर) ही दोन्ही नाटके सातार्‍याच्या 'महाराष्ट्र कोकिळ' (१८८७, १८९५) मासिकात प्रकाशित झाली. त्यांचे संगीत *श्रीयाळ* नाटक (१८८१) त्या काळी लोकप्रिय होते. याशिवाय *संवरी* ही लघुकादंबरी (१८९२), *रजनिनाथ आणि चंद्रिका* हे प्रहसन, शिवचरित्रातील प्रसंगावर एक गद्य नाटक, अशी त्यांची आणखी काही रचना आहे.

संस्कृतच्या धर्तीवर मराठीत त्यांनी कविता निर्माण केली. *शोकावर्त* ही विलापिका त्यांनी पत्नीच्या निधनानंतर रचली. पत्नीवियोगा-मुळे शोकाकुल कवीच्या अंतःकरणाची तळमळ त्यात चांगली व्यक्त झाली आहे. आधुनिक मराठीतील प्रभावी वैलापिक काव्यात *शोकावर्ता*ची गणना होते. *विष्णुनिधन* हे विष्णुशास्त्री चिपळूण-करांच्या मृत्यूवरील व *एकनाथवियोग* हे आपले परमस्नेही कवी एकनाथ गणेश भांडारे ह्यांच्या मृत्यूवरील शोककाव्यही त्यांनी लिहिले आहे.

उषा टाकळकर, के. ए. पोतदार, नीलिमा गुंडी

**लेले, काशिनाथ कृष्ण :** (ज. १५ ऑगस्ट, १८५०, धार – मृ. ३ सप्टेंबर, १९३८, धार, मध्य प्रदेश). इतिहास संशोधक व लेखक. प्राथमिक शिक्षण धार व माध्यमिक शिक्षण इंदूर येथे. मॅट्रिक (१८७०). महाविद्यालयीन शिक्षण पुणे येथे. धार संस्थानच्या शिक्षणखात्यात मुख्याध्यापक. धार संस्थानच्या इतिहासाचे लेखन (१९३४). संस्था-नच्या गॅझेटियरमध्ये नव्या संशोधित इतिहासाची टिपणे देऊन घात-लेली भर ही त्यांची महत्त्वाची कामगिरी. संस्थानिकांच्या रोषामुळे १९०५ ते १९१४ या काळात त्यांना धार सोडावे लागले. पुण्यास स्थापन झालेल्या भारत इतिहास संशोधन मंडळाचे ते सभासद झाले. परमार घराण्याच्या मध्ययुगीन व अर्वाचीन इतिहासात नव्या माहि-तीची भर टाकली. त्यांनी प्रचंड ऐतिहासिक साधनसामुग्री गोळा केली. भोजदेव हा त्यांचा खास संशोधनविषय. राजा भोज व कवी कालिदास समकालीन नव्हते, असा सिद्धांतही त्यांनी मांडला. ऐतिहासिक वस्तुसंग्रह करण्याच्या छंदामुळे त्यांनी आपल्या घराचे रूपांतर पुराणवस्तुसंग्रहालयात केले.

उषा टाकळकर, के. ए. पोतदार

**लेले, काशिनाथ वामन ऊर्फ भाऊशास्त्री :** (ज. १० जुलै, १८६३, वाई – मृ. ९ ऑक्टोबर, १९१८, वाई). सनातन धर्माचे अभ्यासक व प्रवक्ते. वादविवाद कुशल वक्ते. धर्मशास्त्रादी विषयांचे लेखक व धर्मविषयक मासिकांचे चालक.

चुलते कृष्णभटजी यांच्याजवळ बारा वर्षे वेदाध्ययन. पुण्याच्या न्यू इंग्लिश स्कूलमध्ये वयाच्या बाविसाव्या वर्षी दाखल होऊन इंग्रजी भाषेचा यांनी अभ्यास केला. वाईचे प्रज्ञानंद यती आणि मुंबईचे राजारामशास्त्री बोडस या गुरुंजवळ वेदान्त मीमांसादी दर्शने, धर्म-शास्त्रे, पुराणे आदींचा अभ्यास. इ. स. १८९० साली यांनी *मोदवृत्त* साप्ताहिक सुरू केले व ते सात-आठ वर्षे चालविले. या नियतकालिकातील १८९७ साली त्यांनी लिहिलेल्या प्लेगविषयक लेखावरून त्यांच्यावर राजद्रोहाचा खटला भरण्यात आला व त्यांना दीड वर्षांचा सश्रम कारावास भोगावा लागला. १९०३ साली *धर्म* साप्ताहिक काढून नऊ-दहा वर्षे चालविले. *आर्यधर्मदर्पण* (१८९३), *आर्यधर्मरहस्य* व *ज्ञानसाधना* (१९१४) अशी मासिके बरीच वर्षे चालविली. त्यातून आपल्या संस्कृत धर्मग्रंथांची भाषांतरे, मूळ भाष्ये व भाषांतर विवरण त्यांनी प्रसिद्ध केली.

त्यांची ग्रंथरूपाने प्रसिद्ध झालेली महत्त्वाची पुस्तके याप्रमाणे : *योगवासिष्ठ* (१८९६), *मराठी भाषांतरासह रामायण* (१८९८ ते १९००), *मराठी भाषांतरासह महाभारत* (१८९६ ते १९१५), *सभाष्य भगवद्‌गीता* (१९०० ते १९१३), *देवी भागवत* (१९०२), 'ब्रह्मसूत्राणि', 'कठकोपनिषद', 'ईशावास्योपनिषद', 'केनोपनिषद' मूळ भाष्य व मराठी भाषांतर, श्री वाल्मीकि रामायणाचे मराठी

भाषांतर. याशिवाय कथासरित्सागर, विष्णुपुराण, पुरुषसूक्त, श्रीब्रह्मसूत्र, मानवधर्मशास्त्र या ग्रंथांचे भाषांतर केले. 'दासोपंतांची पदे' संपादित केली. लोकमान्य टिळक, भारताचार्य वैद्य, पं. सातवळेकर, कोशकार रानडे आदी मान्यवर ग्रंथकारांच्या ग्रंथांची विस्तृत आणि सडेतोड परीक्षणे केली. सनातन वैदिक धर्माचे रक्षण-संवर्धन व्हावे व त्याचे मूळ तेज प्रकट व्हावे, अशी त्यामागे त्यांची प्रखर ध्येयनिष्ठा होती. सनातन वैदिक धर्माचे आधुनिक काळातील एक कट्टे प्रवक्ते. झुंजार लेखक.

उषा टाकळकर, के. ए. पोतदार, पंडित टापरे

**लेले, गणेश सदाशिवशास्त्री :** (ज. १६ सप्टेंबर, १८२५, त्र्यंबकेश्वर – मृ. २८ एप्रिल, १८९८, लासलगाव, जि. नाशिक). कवी आणि संस्कृत काव्यनाटकांचे भाषांतरकार. प्राथमिक मराठी शिक्षणानंतर संस्कृत पाठशाळेत व्युत्पत्ती व अलंकारशास्त्र यांचा अभ्यास. इंग्रजीचे थोडेफार अध्ययन. १८४०-४१ च्या सुमारास मुंबई सरकारचे प्रमुख शिक्षणाधिकारी. मेजर कँडी यांनी त्यांना मुंबईस आणले व पुढील शिक्षणासाठी एल्फिन्स्टन इन्स्टिट्यूटमध्ये दाखल केले. तेथे बाळशास्त्री जांभेकर, दादाभाई नौरोजी या गुरुवर्यांच्या हाताखाली प्रवेश परीक्षेपर्यंतचा अभ्यास. पण प्रकृति अस्वास्थ्यामुळे मुंबई सोडून नाशिक येथेच ग्रंथाध्ययन व ग्रंथलेखन करीत राहिले.

संस्कृत नाटके व इंग्रजी ग्रंथ यांची भाषांतरे, स्वतंत्र काव्ये व अन्य काही ग्रंथ मिळून त्यांचे पंधरा-सोळा ग्रंथ प्रसिद्ध झाले आहेत. त्यांनी *जानकीपरिणय* (१८६५), *मालविकाग्निमित्र* (१८६७), *कर्पूरमंजरी* (१८६७) व *विद्धशाल भंजिका* (१८६९) या चार संस्कृत नाटकांची भाषांतरे केली. यांपैकी दुसऱ्या व तिसऱ्या नाटकास तत्कालीन 'दक्षिणा प्राइझ कमिटी'ची बक्षिसेही मिळाली. ही भाषांतरे गद्यास गद्य व पद्यात श्लोक, आर्या, क्वचित साक्या, अभंग अशी रचना आढळते. *जानकीपरिणया*चे कथानक अद्भुतरसपरिपूर्ण असून अन्य नाटके शृंगार रसाकडे झुकणारी आहेत. इंग्रजी पुस्तकांची त्यांची मराठी भाषांतरे अशी – *तेलेमेकस् ह्याचा वृत्तांत* पुस्तक १, २ (ले. जॉन टॉक्सवर्थ), *कप्तान कुक साहेब ह्यांच्या जलपर्यटनाचा वृत्तांत* (ले. रेव्ह. बिंगले, १८५३). सरकारच्या मराठी भाषांतरे करवून घेण्याच्या योजनेनुसार ही भाषांतरे केली.

त्यांच्या काव्यरचनेत *श्रीमच्छंकराचार्यविरचित अमरशतक* (१८८१), *महाकवी कालिदास विरचित रघुवंश* (१८८३) ही भाषांतरित, *शिवचरित्र* (१८७३) व *कृष्णकुमारी* (१८८८) ही ऐतिहासिक स्वतंत्र, *शिवस्तुती*, *सीमंतिनीचे आख्यान*, *तुकोजी होळकर* इत्यादी किरकोळ अशा काव्यांचा समावेश होतो. या सर्वांत *रघुवंश* ही भाषांतरित काव्यकृती रसविष्काराच्या दृष्टीने विशेष चांगली साधली आहे. त्यातलाच वृत्तवैचित्र्ययुक्त नववा सर्ग *दशरथमृगया* याचे समश्लोकी भाषांतरही उजवे वाटते. या सर्गाचे स्वतंत्र पुस्तक (१८८३) प्रसिद्ध झाले आहे. *शिवचरित्रा*ची पद्यसंख्या ७६० असून त्याला त्यावेळी दक्षिणा प्राइझ कमिटीने पहिले पारितोषिक दिले होते. याशिवाय, काव्याच्या सगळ्या अंगांच्या लक्षणांचे (उदा. काव्यलक्षण शब्दशक्ती, रसभाव, अलंकार, वृत्त, काव्यदोष इ.) उदाहरणांसहित विस्ताराने निरूपण केलेले प्रश्नोत्तररूप *साहित्यशास्त्र* (१८७२) त्यांनी लिहिले. ते काव्यशास्त्र विषयक ग्रंथ तयार करण्याचा त्यांचा पहिला प्रयत्न म्हणून उल्लेखनीय आहे. *तीर्थयात्रा प्रबंध* (१८८५) हे प्रवासवृत्त त्यांनी सरदार घराण्यातील अण्णासाहेब विंचुरकर यांच्या प्रवासाच्या टाचणांवरून तयार केले, त्यात ब्रह्मावर्ती असलेल्या दुसऱ्या बाजीराव पेशव्यांच्या दिनचर्येचे वर्णन येत असल्यामुळे त्या ग्रंथाला ऐतिहासिक महत्त्व प्राप्त झाले आहे.

उषा टाकळकर, के. ए. पोतदार

**लेले, गंगाधर वामन :** (ज. १० मार्च, १८५९ – मृ. २६ जानेवारी, १९२६, पुणे). वैदिक व पौराणिक ग्रंथांचे भाषांतरकार. डेक्कन कॉलेज, पुणे येथे शिक्षण. बी.ए. (मुंबई विद्यापीठ, १८८७). डेक्कन एज्युकेशन सोसायटीचे आजीव सदस्य व अध्यापक. न्यू इंग्लिश स्कूलचे सुपरिंटेंडेन्ट.

*त्रिसुपर्ण* (सार्थ, सभाष्य – मराठी अर्थ व मूळ मंत्राचे इंग्रजी भाषांतर, १९००) ह्या ह्यांच्या ग्रंथात तैत्तिरीय आरण्यकाच्या नारायणीय उपनिषदातील *त्रिसुपर्ण* पाप-दोष वगैरेंच्या निवारणार्थ असून भोजनकालीच त्याचा पाठ करण्याचा प्रघात का पडला यासंबंधीचे विवरण आढळते. ह्यांची *मत्स्यपुराण* (१९१२) व *लिंगपुराण* (१९१२) ही दोन भाषांतरे प्रसिद्ध आहेत. *प्रस्थानभेद अथवा प्राचीन चवदा विद्यांचे दर्शन* (१९१४) ह्यांचा महत्त्वाचा ग्रंथ असून त्यात वेद, वेदांगे, वेदांची उपांगे, धर्मशास्त्रे, चौदा विद्या व चौसष्ट कला इत्यादींचा परिचय करून दिला आहे. इतिहासाचार्य वि. का. राजवाडे ह्यांच्या 'भाषांतर' (१८९४) मासिकासाठी जॉन स्टुअर्ट मिल ह्यांच्या 'युटिलिटेरियानिझम्' या ग्रंथाचे *जनपदहितवाद* ह्या नावाने भाषांतरही ह्यांनी करून दिले होते.

कुसुममाला कोलारकर, गं. दे. खानोलकर

**लेले, देवीदास भास्कर :** (ज. २८ ऑक्टोबर, १८८१, अंबेजोगाई – मृ. १९५२). थिऑसाफीविषयक पुस्तकांचे अनुवादक. फर्ग्युसन कॉलेज, पुणे येथे शिक्षण. बी.ए., संगमनेरच्या पेटिट हायस्कूलचे मुख्याध्यापक (१९०७–३०).

*मुमुक्षुमार्ग* डॉ. ॲनी बेझंट ह्यांच्या 'द पाथ ऑफ डिसायपलशिप' ह्या व्याख्यानाचा अनुवाद (१९२२), *आनंदाचे साम्राज्य व इतर प्रवचन* (जे. कृष्णमूर्तींच्या 'द किंगडम् ऑफ हॅपिनेस'चा अनुवाद, १९३०) व *थिऑसॉफीवरील सुबोध व्याख्याने* (डॉ. बेझंट ह्यांच्या 'द पॉप्युलर लेक्चर्स ऑन थिऑसॉफी'च्या आधारे) ही थिऑसॉफीवरील आणि *जीवन आणि कला* (१९५१) हा सिलोनी थिऑसॉफिस्ट प्रचारक श्री. सी. जिनराजदास ह्यांच्या लेखांचा अनुवाद ही ह्यांची साहित्यनिर्मिती.

कुसुममाला कोलारकर, उषा टाकळकर

**लेले, महादेव :** ० माधव व्यंकटेश : (ज. १८५८ – मृ. २२ नोव्हेंबर, १९३३, पुणे). संस्कृत नाट्यग्रंथांचे व अन्य भाषांतील ग्रंथांचे भाषांतरकार. शिक्षण पुणे येथे. बी.ए. व इंजिनियरिंगमधली एल्.सी.ई. ही पदवी. नोकरीच्या निमित्ताने भारतातील अनेक संस्थानांत भ्रमंती. विविध भाषांचे जाणकार.

ह्यांनी *मालतीमाधव*, *महावीरचरित*, *उत्तररामचरित*, *मालविकाग्निमित्र*, *विक्रमोर्वशीय*, *शाकुंतल*, *मुद्राराक्षस*, *वेणीसंहार* ह्या प्रसिद्ध संस्कृत नाट्यग्रंथांना *सार व विचार* असे रूप देऊन मराठीत आणले आहे (१९०१–०९). याखेरीज *श्रीमद्भागवत : सार व विचार* (१९२६) हे त्यांचे पुस्तकही प्रसिद्ध आहे. 'अकबर बादशहाचे चरित्र' (१८९८, मूळ लेखक, कर्नल मॅलेसन), *एक नष्टस्मृती, साम्राज्य किंवा विजयानगरच्या साम्राज्याचा इतिहास* (१९१९) ही इंग्रजीवरून केलेली भाषांतरे, त्याचप्रमाणे कल्हणकृत 'राजतरंगिणी' ह्या काश्मीरचा इतिहास कथन करणाऱ्या संस्कृत ग्रंथाचे *राजतरंगिणी* (१९२९) हे भाषांतरही महत्त्वपूर्ण आहे. *सुमनविकास* (१८९०) व *पुष्पवन* (१८९१) ही ह्यांची शेख सादीच्या अनुक्रमे 'बोस्तान' व 'गुलिस्तान' ह्या फारसी ग्रंथांची भाषांतरे. अबुल फजलच्या 'अयने-अकबरी' (पूर्वार्ध व उत्तरार्ध) या मूळ फारसी ग्रंथाचे भाषांतरही ह्यांनी वि. का. राजवाडे ह्यांच्या 'भाषांतर' मासिकातून प्रसिद्ध केले आहे.

कुसुममाला कोलारकर, उषा टाकळकर

**लेले, लक्ष्मण गणेशशास्त्री :** (ज. १८७०–मृ. १८ नोव्हेंबर, १९३२, पुणे). कवी, संस्कृत काव्याचे भाषांतरकर्ते व नाटककार. चिपळूणकरकालीन सुप्रसिद्ध कवी गणेशशास्त्री लेले ह्यांचे चिरंजीव. प्रथम शास्त्री-परंपरेचे व नंतर इंग्रजी विद्येचे अध्ययन. काही काळ 'नासिक-वैभव' पत्राचे संपादक. पुढे न्यू पूना कॉलेज (हल्लीचे स. प. महाविद्यालय) या संस्थेत मराठीचे प्राध्यापक.

यांची स्फुट कविता 'काव्यरत्नावली', 'केसरी', 'विविधज्ञान-विस्तार' इत्यादी. नियतकालिकांतून प्रसिद्ध झाली. *तिलकांजली* (१९२०) ही लो. टिळकांच्या निधनानंतर लिहिलेली ७२ श्लोकांची विलापिका व *महाराष्ट्र-वंदन* (१९२३) हे महाराष्ट्रातील छत्रपती शिवाजी महाराजांपासून ते लो. टिळकांपर्यंतच्या थोर विभूतींना आदरांजली अर्पण करणारे दीर्घ काव्य ही यांची स्वतंत्र रचना. याखेरीज कालि-दासाच्या *मेघदूता*चे समवृत्त मराठी भाषांतर (१९०१), जगन्नाथ पंडिताच्या 'भामिनीविलासा'चे *महाराष्ट्र भामिनी विलास* (१९०३) हे पद्य रूपांतर आणि शंकराचार्य, कालीदासादी कवींच्या संस्कृत कवि-तेचे भाषांतर असलेला *पद्यमंजरी* (१९०२) हा संग्रह ही त्यांची रचनाही प्रसिद्ध आहे. *संगीत विश्वमंगल* (१९२३) व (कालिदासकृत 'कुमारसंभवा'तील शिवपार्वती-विवाहाच्या कथेच्या आधारे रचलेले) *मराठी शाकुंतल* (१९२६) ('शाकुंतला'चे गद्यपद्यात्मक भाषांतर) ही नाटकेही उल्लेखनीय आहेत. *अलंकार-प्रकाश* (१९०५) अलंकार-विषयक ग्रंथ, 'विविधज्ञानविस्तारा'तून व अन्य नियतकालिकांतून लिहिलेली पुस्तकपरीक्षणे व प्रस्तावना हे ह्यांचे समीक्षणात्मक लेखन. *आभिनव काव्यमाला – भाग १* (१९०९) हे मराठी काव्यवेच्यांचे पुस्तकही ह्यांनी संपादित केले आहे. नव्या-जुन्याच्या सीमारेषेवर वावरणारे आधुनिक काळातील एक महत्त्वाचे कवी.

कुसुममाला कोलारकर

**लेले, विनायक गंगाधर :** (ज. १५ मे, १८९७ – मृ. १९६०). ऐतिहासिक विषयांचे चरित्रकार व कथाकार. व्यवसायाने मेकॅनिकल व इलेक्ट्रिकल इंजिनियर. मोगल व मराठे ह्यांच्या इतिहासाचे अभ्यासक.

लेले ह्यांचे *हिंदुसंघटन* (१९२९) हे स्वामी श्रद्धानंदांच्या इंग्रजी ग्रंथाचे भाषांतर प्रसिद्ध झाले असले, तरी ऐतिहासिक चरित्रलेखक व ऐतिहासिक कथाकार म्हणून ते विशेष प्रसिद्ध आहेत. *दुर्दैवी मोहरे : सर्जेराव घाडगा व त्रिंबकजी डेंगळा* यांची चरित्रे (१९३५), *सुरजमल जाट* (१९४४), *जहिरुद्दीन महंमद ऊर्फ बाबुर* (१९५४), *नरवीर बापू गोखले* (१९७०) ही त्यांची चरित्रपर पुस्तके व *नावांचे चातुर्य* (१९४४), *मराठ्यांच्या वीरकथा* (१९४५), *शिवशाहीचा अस्त* (१९४८), *कळस* (१९५०), *मयूर सिंहासन* (१९५४) ही त्यांची ऐतिहासिक कथांची पुस्तके प्रसिद्ध आहेत. ऐतिहासिक सत्याला धक्का न लागू देता आकर्षक लेखनशैलीने युक्त अशी ही पुस्तके आहेत.

कुसुममाला कोलारकर, उषा टाकळकर

**लेले, विसाजी रघुनाथ :** ० स्फुटवक्ता अभियोगी : (ज. १७ ऑगस्ट, १८२७, नाशिक–मृ. ८ नोव्हेंबर, १८९५). सायन पंचांगकर्ते व सायनवादाचे पुरस्कर्ते लेखक. ह्यांचे शिक्षण जुन्या पद्धतीने झाले. प्राथमिक शिक्षणानंतर धातुरूपावली, अमरकोश, उपनिषदे ह्यांचे अध्ययन. ग्वाल्हेरला शिंदे सरकारच्या दप्तरात हिशेबनीस.

केरूनाना छत्रे १८६५ सालापासून 'निरयन–पंचांग' काढीत. त्यांनी सायनमानाचा आश्रय करावा असा लेल्यांचा आग्रह होता, पण तो छत्र्यांनी न मानल्याने सायनमानाचा प्रचार करण्यासाठी विसाजी-पंत लेल्यांनी वृत्तपत्रे व मासिके ह्यांतून लेख लिहिण्यास सुरुवात केली. १८७२ ते १८९५ पर्यंत त्यांनी 'शुभसूचक', 'इंदुप्रकाश' इत्यादी नियतकालिकांतून लेखन केले. मृत्युपूर्वी त्यांनी *सायन–पंचांग* काढ-ण्यास सुरुवात केली होती. त्यांच्या सायनमताचा प्रभाव ज. बा. मोडक, शं. बा. दीक्षित इत्यादी ज्योतिर्गणितज्ञांवरही पडला होता.

उषा टाकळकर, मदन कुलकर्णी

**लोंढे, मोरो गणेश :** (ज. २० नोव्हेंबर, १८५४, बरसई-पेण, जि. कुलाबा–मृ. ११ नोव्हेंबर, १९२०, पेण). कवी, नाटककार व निबंध-लेखक. प्राथमिक शिक्षण पेण येथे. प्रथम शिक्षकाची नोकरी. डेप्युटी इन्स्पेक्टरच्या पदापर्यंत बढती.

लहान वयातच श्रीधरकवीचे 'रामविजय', 'हरिविजय', 'पांडव-प्रताप' इत्यादी काव्यग्रंथ व मोरोपंतांची कविता वाचनात आल्याने त्यांच्यात काव्याविषयी गोडी निर्माण झाली. त्यांची बरीचशी कविता 'काव्यरत्नावली' मासिकातून व क्वचित 'विविधज्ञानविस्तार' व 'मासिक मनोरंजन'मधून प्रसिद्ध झाली आहे. ह्यांची कविता बालो-पयोगी व शालोपयोगी असल्याने मुख्यतः उपदेशपर आहे. *बोधशतक* (१८८२), *संगीतसुधा* (१८८३), *उपदेशमाला* (१८८४) या संग्रहातून व *शतकत्रय* (१८९८) हा तीनशे सुभाषितांचा संग्रह व *हास्यमाला* (१८९९) ह्या पुस्तकांतून ती कविता संकलित करण्यात आली आहे. संस्कारक्षम वयाच्या विद्यार्थ्यांच्या मनावर सुसंस्कार करणे, हे त्यांच्या काव्यनिर्मितीचे उद्दिष्ट होते. उपदेशप्रधान कवितेहून वेगळ्या स्वरूपाची कविताही त्यांनी लिहिली आहे. *यमुना अथवा म्हातारा नवरा व लहान नवरी* (१८९८), *कुसुममाला* (१८९९), *संसार* (१९०१) ह्या कविता, *रायगड काय म्हणतो !* (१९०६) हे खंडकाव्य व 'काव्यरत्नावली'तील 'दुष्काळवर्णन', 'वर्षारंभ', 'सूर्योदय', 'वसंतशतक' इत्यादी कविता यांचा या संदर्भात निर्देश करता येईल. *रायगड* काव्यात रायगडाचे स्थलमाहात्म्य व तेथून दिसणारी सृष्टिशोभा यांचे वर्णन आले आहे. 'विधवेचे सांगणे', *यमुना* यासारख्या कवितांतून स्त्रीच्या दुःसह जीवनाचे चित्रण त्यांनी सहानुभूतीने केले आहे. परंपरागत साकी, दिंडी, आर्या इत्यादी छंदांतील व वृत्तांतील साधी, सोपी, व्याकरणशुद्ध व सुबोध अशी रचना, हे त्यांच्या काव्याचे स्वरूप दिसते.

*गोदावरी अथवा दुर्दैवी सून* (१८९०) हे मध्यमवर्गीय गृहस्थितीचे वास्तव चित्र रेखाटणारे त्यांचे नाटक. कजागसासूच्या छळाला बळी पडलेल्या सुनेची कथा या नाटकात त्यांनी चित्रित केली आहे. त्यांचे अन्य गद्य लेखन म्हणून *मुलांचे प्राथमिक शिक्षण* (१८९३), *नशीब आणि उद्योग* (१८९६), *उद्योग कसा करावा व कोणता करावा !* (१९०२), *आईबापांचा मित्र* (१९११) या निबंधांचा उल्लेख करावा लागेल. त्या वेळच्या समाजस्थितीचे निरीक्षण करून समाजा-मध्ये विचारजागृती निर्माण करणे आणि आपल्या प्रगतीचा मार्ग समाजाने आपणच डोळसपणे ठरवावा या दृष्टिने त्याला मार्गदर्शन करणे हा वरील निबंधलेखनामागील त्यांचा उद्देश स्पष्ट दिसतो. ह्या निबंधांना डेक्कन व्हर्नाक्युलर ट्रान्सलेशन सोसायटी व दक्षिणा प्राइझ कमिटी ह्यांची बक्षिसे मिळाली होती.

म. श्री. पंडित, उषा टाकळकर, कुसुममाला कोलारकर

० **लोकमान्य :** पहा टिळक, बाळ गंगाधर

० **लोकहितवादी :** पहा देशमुख, गोपाळ हरि

**लोटलीकर, सदाशिव बळवंत :** (ज. ५ मे, १८५७, बाणकोट–मृ. २० एप्रिल, १९२२). लोटलीकर घराणे मूळचे गोव्याचे. गौड सारस्वत ब्राह्मण. मूळ आडनाव केणी, पण लोटली येथे राहत अस-ल्याने त्यांना लोटलीकर असे म्हणण्यात येऊ लागले. वयाच्या सहाव्या वर्षी ते शाळेत जाऊ लागले. मराठी व इंग्रजीचे अध्ययन. उत्तम मराठी शिक्षण मिळाले. मेजर कँडी व चेंबर्स सारख्यांनी लिहिलेली नीतिज्ञानाची पुस्तके वाचून मनावर योग्य तो परिणाम झाला. इंग्रजी

शिक्षण अच्युत भास्कर देसाई सारख्या विद्वानाच्या हाताखाली झाले. हे देसाई पुढे बेळगावचे डेप्युटी कलेक्टर आणि सांगली संस्थानचे कारभारी झाले होते.

पुढे जुलै १८७६ मध्ये सदाशिवरावांना शिरूरच्या म्युनिसिपल शाळेत शिक्षकाची नोकरी मिळाली. नंतर १७ डिसेंबर, १८७६ रोजी शिरूर येथे रेव्ह. रामकृष्ण विनायक मोडक यांच्या हस्ते बाप्तिस्मा घेऊन ते खिस्ती झाले.

शिरूर येथे काही काळ शिक्षकाचे काम केल्यावर सदाशिवरावांनी रत्नागिरीला गेल्मन वायलर या अमेरिकन मिशनरीच्या इंग्रजी शाळेत काम पत्करले. याशिवाय या मिशनरीबरोबर भाषांतर करणे व धर्मप्रचार करणे ही कामेही केली.

पुढे ते मुंबईला गेले. १८८० च्या सुमारास त्यांनी दुसऱ्या मिशनात प्रवेश केला; आणि धर्मसेवेला सुरुवात केली. नंतर १८९२ मध्ये त्यांची बदली पुण्यास पंचहौद येथील मिशनात झाली. १८९३ मध्ये त्यांची आचार्य म्हणून दीक्षा झाली. पुढील सर्व आयुष्य त्यांनी धर्मसेवेत घालविले. शहरातल्या सुशिक्षित जनतेत त्यांचे येणे-जाणे असे. प्रार्थनासमाजाच्या सभासदांबरोबरही त्यांच्या धर्मविषयक चर्चा चालत.

त्यांच्या जोडीला नेहमीया ऊर्फ नीळकंठशास्त्री गोरे आणि कधी-कधी आचार्य नारायण विष्णू आठवले हे असत. पंढरपूरच्या प्रार्थनासमाजाचे रघुनाथ करकरे आणि त्यांचे मित्र सखारामपंत तसेच पुण्याच्या प्रार्थनासमाजाचे चिटणीस केशव पांडुरंग गोडबोले आणि प्रचारक शिवरामपंत नारायण गोखले, माधवराव रानडे, महादेवराव मोरेश्वर कुंटे वगैरे अनेक सुशिक्षित आणि विचारवंतांशी या खिस्ती आचार्यांचे मित्रत्वाचे संबंध असत.

याप्रमाणे धर्मसेवा करीत असताना त्यांनी मराठी साहित्याचीही थोडीबहुत सेवा केली. सनातन आंग्लसंप्रदायी मिशनने प्रसिद्ध केलेल्या कित्येक छोट्या पुस्तिकांचे भाषांतर त्यांनी १८८० ते एकोणिसावे शतक उलटेपर्यंत केले. मराठी साहित्याची त्यांना विशेष गोडी होती. त्यांच्या संग्रही अनेक मराठी ग्रंथ होते. १९१२ साली त्यांनी *मराठी भाषेची योग्यता व तिचा आस्थापूर्वक अभ्यास करण्याची आवश्यकता* या विषयावर खिस्ती समाजापुढे व्याख्यान दिले होते व नंतर हिंदु-श्रोतेमंडळासमोरही दिले होते. हे व्याख्यान निबंधरूपाने नंतर १९२१ मध्ये त्याच शीर्षकाखाली प्रसिद्ध झाले होते.

अपोकुफानामक पुस्तकातील भाषांतर–भाषांतरकार (१) स. व. लोटलीकर, चार्लस किंग, देवालयात वाचण्यास नेमलेले पाठ, कोल्हापूर, १८९६.

वाङ्मय : (१) प्रार्थना आणि एनलेसियेतील विधी साक्रमेंत याविषयीची प्रश्नोत्तरावली (भाषांतर), पुणे, १८८०. (२) वाक्यरत्नावली (भाषांतर), पुणे, १८८२. (३) प्रार्थनेचे लहान पुस्तक, पुणे–१८८२, १९५२. (४) पवित्र युखरिस्त्या (भाषांतर), पुणे, १८८५. (५) पवित्र भागीपणासंबंधी गुरुशिष्य संवाद (भाषांतर), मुंबई, १८८६. (६) प्रार्थना, ती करण्याची कारणे व तिची अंगे, पुणे, १८८८. (७) सद्वर्तन आणि प्रसंग, १८९७. (८) विद्या (भाषांतर), १९००. (९) मराठी भाषेची योग्यता आणि तिचा आस्थापूर्वक अभ्यास करण्याची आवश्यकता, पुणे, १९२१.

चरित्र, चर्चा, अभ्यास : Lotalikar S. B. The Dawn of Light, Madras, Christian Literature Society, 1923.

भास्कर जाधव

**लोटलीकर, सीताराम शिवराम :** ० सीता-कान्त : (ज. १७ ऑगस्ट, १८९०, जि. रत्नागिरी – मृ. ११ ऑक्टोबर, १९२६, मुंबई). कादंबरीकार, चरित्रलेखक व आरोग्यविषयक पुस्तकांचे कर्ते. शिक्षण दापोली येथे, जेमतेम सातवीपर्यंत. काही काळ खानापूरच्या 'लोकमित्र' पत्राचे सहसंपादक व नंतर अच्युतराव कोल्हटकरांच्या 'संदेश' या पत्राच्या संपादक मंडळात प्रविष्ट.

समाजाला मार्गदर्शन करणाऱ्या 'राष्ट्रजीवनमाला' व आरोग्यविषयक 'नवजीवनमाला' या दोन पुस्तकमाला त्यांनी काढल्या. *स्वराज्याचा उषःकाल* (१९१८), *मार्ग व मार्गदर्शक* (१९२१) ही 'राष्ट्रजीवनमाले'तील त्यांची महत्त्वाची पुस्तके. *शांताराम* (१९१७), *दडपशाही* (१९२६), *खुनी श्रीमंती* (१९२५), *जळो ते प्रेम* (१९३३) या सामाजिक कादंबऱ्या आणि *महात्मा गांधी* (१९२२), *लाला लाजपतराय* (१९२६), *सरोजिनी नायडू* (१९३२) ही चरित्रे ही त्यांची प्रमुख साहित्यनिर्मिती. *सामर्थ्य, समृद्धि व शांती* (डॉ. मॉर्डेन ह्यांच्या इंग्रजी ग्रंथाच्या आधारे, १९१५), *सामर्थ्य संवर्धन* (आहार-विहार-व्यायाम विषयक, १९१७), *संजीवनी विद्या* (वीर्यसंरक्षण कसे करावे, १९२१), *शक्तिसंरक्षण* (शारीरिक व मानसिक शक्तींचा अपव्यय कसा टाळावा, १९२४), *आत्मोन्नती* (१९२४), *आरोग्य-चिंतामणी* (१९२८) व *मानसचिकित्सा* (१९३१) ही त्यांची अन्य महत्त्वाची पुस्तके

मदन कुलकर्णी, उषा टाकळकर

**लोवलेकर, भालचंद्र राजाराम :** (ज. १९११ – मृ. १९४५). कवी. शिक्षण बी.ए., एल्.एल्.बी.पर्यंत. वास्तव्य इंदूर येथे. त्यांची कविता 'अभिरुची' व अन्य नियतकालिकांतून प्रसिद्ध झाली. *दिवंगत भालचंद्र लोवलेकर यांची कविता* (१९५३) हा त्यांच्या काव्याचा संग्रह प्रसिद्ध आहे.

त्यांची कविता 'गीतधर्मी' प्रवृत्तीची आहे. तांब्यांच्या गीतिकाव्याचा प्रभाव त्यांच्या कवितेवर आढळतो. भाववृत्तीला अनुकूल अशी विविध वृत्तांची योजना त्यांच्या काव्यात आढळते. तारुण्यसुलभ प्रीतीसंबंधाच्या मर्यादित वर्तुळातच ही कविता सातत्याने फिरत राहिलेली असली तरी माळव्यातील व विंध्याचलातील निसर्गाच्या पार्श्वभूमीवर चित्रित केलेल्या सुंदर शब्दचित्रांमुळे ती वेगळी वाटते ?

हरिश्चंद्र थोरात, मदन कुलकर्णी

**वझे, कृष्णाजी विनायक :** (ज. १६ डिसेंबर, १८६९ – मृ. ३१ मार्च, १९२९). शिल्पशास्त्र व धर्मशास्त्र या विषयाचे लेखक. सी.ई. ही इंजिनिअरिंगची परीक्षा उत्तीर्ण.

श्री. वझे यांचा *भारतीय शिल्पशास्त्रसार* (१९२४) हा ग्रंथ प्रसिद्ध आहे. या ग्रंथातील अठरा प्रकरणावर अठरा ग्रंथ लिहावेत, हा यांचा संकल्प होता. यांपैकी *हिंदी शिल्पशास्त्र, भाग–१* (१९२८) हा प्रास्ताविक ग्रंथ पुण्याच्या भारत इतिहास संशोधक मंडळाने प्रसिद्ध केला : *नगररचना शास्त्र* (१९३१) याशिवाय *वास्तुशास्त्र, शिल्पविद्या व धनुर्विद्या व शिल्पशिक्षणाचे महत्त्व* (१९२४) इत्यादी त्यांची पुस्तके प्रसिद्ध आहेत. प्राचीन भारतीय शिल्पशास्त्राची दहा उपशास्त्रे, बत्तीस विद्या व चौसष्ट कलांची भृगुसंहितेनुसार मांडणी करून शिल्पशास्त्राच्या विविध अंगांवर त्यांनी लेख लिहिले. याशिवाय *धर्मशिक्षणाचा ओनामा : हिंदुधर्म* हे सहा खंडात्मक पुस्तक (१९२० ते १९२५), *विद्यार्थ्यांचे धर्म* (१९२३) तसेच *भावी हिंदी स्वराज्य* (१९२४) व *आजच्या स्वराज्य संस्था* इत्यादी ग्रंथही प्रसिद्ध आहेत.

उषा टाकळकर, नीला जोशीराव

**वझे, दिनकर गोविंद :** (ज. १८४८ – मृ. १९०८). कादंबरीकार, पत्रकार व गुजराती ग्रंथांचे अनुवादक. मालवण येथे वास्तव्य. तेथे ते 'पंचानन' हे साप्ताहिक चालवीत.

*कलहपरिणामादर्श* (१८८४) हे त्यांनी लिहिलेले नाटक. दिवाणी न्यायक्षेत्रातील भोळ्या जनतेची फसवणूक व पुढारी तसेच सरकारी

अंमलदार यांचे वर्तन, यांचे चित्रण या नाटकात आहे. प्रसिद्ध गुर्जर लेखक. इच्छाराम सूर्यराव देसाई यांचा 'हिंद अने ब्रिटानिया' या ग्रंथाचा *हिंद आणि ब्रिटानिया – एक राजकीय चित्र* (१८९२) हा मराठी अनुवाद त्यांनी केला. त्यांची प्रसिद्ध साहित्यकृती म्हणजे *लालन बैरागीण* (१८९५) ही कादंबरी. ती त्यांनी मुख्यतः 'भाऊसाहेबांची बखर' या ग्रंथाच्या आधारे लिहिली. ऐतिहासिक वातावरणाच्या साजातील ही एक उठावदार पण व्याजेतिहासिक प्रेमकहाणी आहे. १८९५ ते १९०९ ह्या काळात तिच्या तीन आवृत्त्या निघाल्या, यावरून तिच्या लोकप्रियतेची कल्पना येईल.

*सीता वनवास* पौराणिक कथा (१८९२), *आई आणि मुले*, *राम आणि रावण* अशी अन्य किरकोळ पुस्तकेही त्यांनी लिहिली आहेत.

उषा टाकळकर, सौ. नीला जोशीराव

**वझे, रामकृष्णबुवा नरहर** : (ज. १८७१ ओझरे, जिल्हा सावंतवाडी – मृ. ५ मे, १९४५). गायक व संगीतविषयक पुस्तकाचे कर्ते. गायनाचार्य वझेबुवा एक वर्षाचे असतानाच वडिलांचे निधन झाले. अत्यंत प्रतिकूल परिस्थितीत विधवा आईने संभाळले. जेमतेम चार इयत्तापर्यंत कागल येथे शिक्षण. हिंदुस्थानात अनेक ठिकाणी हिंडून संगीताची कठोर साधना केली व पुढे एक श्रेष्ठ गायक म्हणून कीर्ती व प्रतिष्ठा प्राप्त करून घेतली.

ह्यांनी न. चिं. केळकर यांच्या आग्रहावरून 'सह्याद्री' मासिकातून आपले काही अनुभव व आठवणी प्रसिद्ध केल्या. एका श्रेष्ठ गायकाचे जीवनानुभव कथन करणारे पुस्तक म्हणून ते वाचनीय आहे. *संगीत कलाप्रकाश* (१९४१) हे नोटेशन (स्वरलिपी) चे पुस्तक दोन भागांत (शिष्यांच्या मदतीने) लिहिले. त्याच्या पहिल्या भागात त्यांचे आत्मचरित्र व गवयांची माहिती आढळते. पुस्तकातील साधी सोपी लेखनशैली मनाची पकड घेणारी आहे. *श्रीरामकरुणालहरी* हा छोटा स्फुट स्तोत्रसंग्रह त्यांनी १९३८ मध्ये तयार केला असून, गेयता व छंदोलययुक्त रचना हे त्याच्या स्तोत्राचे वैशिष्ट्य आहे.

शरच्चंद्र विष्णु गोखले, सौ. नीला जोशीराव

**वझे, सदाशिव दिनकर** : (ज. १८७६ – मृ. ऑक्टोबर, १९११, मालवण). कादंबरीकार. 'लालन बैरागीण'कर्ते दिनकरराव वझे यांचे हे चिरंजीव. शिक्षण व वास्तव्य मालवण येथे व तेथेच शाळेत शिक्षक. पुढे त्यांनी १९११साली 'टोपीवाला हायस्कूल' नावाची नवी शाळा मालवणात सुरू केली.

तत्कालीन लोकाभिरुचीला अनुसरून त्यांनी *हळदीघाटचे युद्ध* (१९१०) व *औरंगजेबचा उदयकाल* (१९११) या दोन ऐतिहासिक कादंबऱ्या लिहिल्या. पहिली कादंबरी ही गुजराती 'हळदी घाटनुयुद्ध' (लेखक : इच्छाराम सूर्यराम देसाई) या गुजराती कादंबरीचा अनुवाद असून, राणा प्रतापसिंह ह्याने मोगल सम्राट अकबराशी दिलेल्या लढ्याचा स्फूर्तिदायी इतिहास या कादंबरीत चित्रित केला गेला आहे. दुसरी कादंबरी स्वतंत्र आहे.

उषा टाकळकर, नीला जोशीराव

**वर्तक, श्रीधर विनायक** : (ज. १८८५, पुणे – मृ. १० ऑक्टोबर, १९५०, मुंबई). नाटककार व समीक्षक. शिक्षण नागपूर येथे. मराठी रंगभूमीच्या पडत्या काळात, म्हणजे १९३०–३५ च्या सुमारास तिला सावरण्याचे, तसेच मराठी नाट्यवाङ्मय व रंगभूमी ह्यांना नवे वळण लावण्याचे कार्य करणारे एक प्रयोगशील नाटककार म्हणून वर्तकांचे नाव आवर्जून घेतले जाते. ह्यांची *आंधळ्यांची शाळा*, *लपंडाव* व *तक्षशिला* (१९३३) ही एकाच वर्षातील तीन नाटके. ह्यांपैकी मराठी नाट्यवाङ्मयाच्या इतिहासात *आंधळ्यांची शाळा* हे नाटक विशेष महत्त्वाचे आहे. ब्यर्नसन् (Bjornson) या नॉर्वेजियन नाटककाराच्या 'गाँटलेट' (आव्हान) ह्या नाटकातील विषय आधाराला घेऊन वर्तकांनी या नाटकाची स्वतंत्रपणे उभारणी केली आहे. ही उभारणी करताना त्यांनी मूळ नाटकातील इब्सेनचे नाट्यतंत्रही वापरले आहे. कल्पनारम्यतेपेक्षा वास्तवता आणि सर्वसामान्यांना जिव्हाळ्याचे वाटणारे प्रश्न या गोष्टींना *आंधळ्यांची शाळा*मध्ये अधिक स्थान आहे. लांबलचक भाषणे, संवादातील कृत्रिमता आणि पात्रांची गर्दी टाळून व सहज, स्वाभाविक संभाषण-पद्धती व मोजकीच पात्रे यांची योजना वर्तकांनी आपल्या नाटकांत जाणीवपूर्वक केली. पुरुष स्त्रियाकडून पावित्र्याची अपेक्षा करतात, मग स्त्रियांनीही पुरुषांकडून पावित्र्याची, निष्कलंक चारित्र्याची अपेक्षा का करू नये, हा ब्यर्नसनच्या गाँटलेट नाटकातून उपस्थित केलेला प्रश्न मात्र वर्तकांनी त्या प्रकारे व त्या तीव्रतेने मांडलेला नाही. *तक्षशिलात* हे इब्सेनच्या Hoermoendene Paa Helgeland या विनोदी नाटकाचे भाषांतर, तसेच *लपंडाव* ही स्वतंत्र नाट्यकृती, यांतूनही वैचारिकतेपेक्षा लेखनतंत्रावरच वर्तकांनी विशेष भर दिला आहे.

के. नारायण काळे, केशवराव भोळे, अळतेकर व वर्तक ह्या चौघांनी १ जुलै, १९३३ रोजी 'नाट्यमन्वंतर लिमिटेड' या संस्थेची स्थापना केली; आणि मराठी रंगभूमीला प्रायोगिक दृष्ट्या नवे वळण लावण्याचा प्रयत्न केला. वर्तकांची नाटके हा या प्रयत्नाचाच एक भाग होता. श्री. वर्तक हे सामाजिक सुधारणावादी होते. *तुतारीचे पडसाद* (१९२६) हा केशवसुतांच्या कवितेचे समीक्षण करणारा त्यांचा निबंध या दृष्टीने उल्लेखनीय आहे.

गं. दे. खानोलकर, आशा सावदेकर

**वर्दे (बाळावलीकर), वामन रघुनाथ** : ० शणै गोंयबाब : (ज. १८७७ – मृ. १९४६). कोकणीतून लिहिणारे लेखक व कोकणीचे आग्रही समर्थक. ह्यांचे लेखन प्रामुख्याने शणै गोंयबाब या नावाने प्रसिद्ध झाले आहे. *काही मराठी लेख–पैलो पांटो* (१९४५) हा त्यांच्या मराठी भाषेतील वाङ्मय, इतिहास, भूगोल इत्यादी विषयांवरील संकीर्ण लेखांचा संग्रह. *गोंयकाराचो मुंबैकार* (१९१०) हे विडंबन काव्य, *गोंयकरांची गोंयाभायली वसणूक – पैलें खंड* (१९२८) हे हिंदूंच्या गोव्यातील प्राचीन वसाहतीसंबंधी माहिती देणारे पुस्तक, *कोंकणी भाशेचें जैत* (१९३०) हा चर्चात्मक लेखसंग्रह, मोलियरच्या 'Le Medecin Malgre' Lui या नाटकाच्या आधारे लिहिलेले *मोगाचे लग्न* (आवृत्ती २ री, १९३८) हे पुस्तक, *पुण्यात्मो राम कामती* (१९३९) व *पोषनाचें तपलें* (१९४८) ही यांची अन्य पुस्तके प्रसिद्ध आहेत.

रा. बा. बक्षी

० **वर्दे, विठ्ठल पुरुषोत्तम** : पहा पिंगुळकर, विठ्ठल पुरुषोत्तम

**वर्दे, श्रीपाद महादेव** : (ज. २५ ऑगस्ट, १८८७ – मृ. १८ मे, १९५०). कादंबरीकार; समीक्षक व संपादक. शिक्षण मुंबई येथे. बी.ए., एलएल.बी. वकील. 'उद्यान' (१९१०) मासिकाचे एक प्रवर्तक.

वर्दे ह्यांनी 'उद्यान' मासिकातून स्वतःच्या नावाने तसेच टोपण नावानेही आठ-नऊ वर्षे ललित व ललितेतर असे लेखन केले. 'उद्यान' प्रमाणेच 'विविधवृत्त', 'विहार' 'महाराष्ट्र सारस्वत' (सारस्वत ज्ञातीचे द्वैमासिक), 'वीणा' (मुंबई मराठी साहित्य संघाचे मुखपत्र, १९३७) इत्यादी नियतकालिकांशी लेखक आणि संपादक असा संबंध असल्याने त्यांतूनही त्यांचे साहित्य प्रसिद्ध झाले आहे. या साहित्यात लघुकथा, कादंबरी, समीक्षा, वैचारिक लेख, विनोद इत्यादी विविध प्रकारच्या लेखनाचा अंतर्भाव होतो. 'उद्यान'मधून त्यांची *प्रथमप्रवेश* (स. दा. पाटील यांच्या सहकार्याने, १९११) ही कादंबरी क्रमशः प्रसिद्ध झाली. *पत्ता लागला* (स. दा. पाटील यांच्या सहकार्याने, १९१३), *कलंक रहस्य* (१९२९), *सोनेरी पिंजरा* (१९३८) ह्या 'विविधवृत्ता'तून त्यांच्या क्रमशः प्रसिद्ध झालेल्या

कादंबऱ्या. *प्रथमप्रवेश* ही ऐतिहासिक स्वरूपाची कादंबरी असून, ती सर वॉल्टर स्कॉटच्या एका खंडकाव्यावरून संपादित केली आहे. 'शारदाश्रमवासी' पु. गो. काणेकर ह्यांची तिला प्रस्तावना आहे. *प्रचा लागला* ही कादंबरी एका वेश्येच्या सुशिक्षित मुलीची शोकांतिका असून, *सोनेरी पिंजरा*मधून मराठी साहित्याला अनोखे असे हिंदी संस्थानिकांचे जीवन चित्रित केलेले आढळते. याशिवाय *देशसचिवांचे रहस्य* ही 'विविधवृत्ता'च्या विशेषांकात (१९३२) प्रसिद्ध झालेल्या कादंबरीशीही लेखक म्हणून त्यांचा संबंध होता. प्रस्तुत कादंबरीचे वैशिष्ट्य म्हणजे ह्या कादंबरीच्या लेखनात वर्यांसह वा. म. जोशी, वा. ना. देशपांडे, ना. ह. आपटे, शिवराम वाशीकर, अ. का. प्रियोळकर आणि चं. वि. बावडेकर असे एकूण सात लेखक सहभागी झाले होते. या कादंबरीच्या निमित्ताने सामुदायिक कादंबरी लेखनाचा एक वैशिष्ट्यपूर्ण प्रयोग या लेखकांनी केलेला दिसतो.

'मराठी कवितेचा उषःकाल' किंवा 'मराठी शाहीर' ही 'विविधवृत्ता'त आलेली लेखमाला पुस्तकरूपाने प्रकाशित करताना वर्यांनी आवश्यक तेथे भर घातली. *मराठी शाहीर* (१९३०) हा ग्रंथ म्हणजे त्यांनी मराठी शाहिरी वाङ्मयाचा साकल्याने, निःपक्षपातीपणाने व चिकित्सक रसिकतेने घेतलेला वेध होय. मराठी संस्कृतीचे प्रतिनिधिक चित्र या वाङ्मयातच पाहावयास सापडते अशी त्यांची भूमिका असून प्राचीन व अर्वाचीन मराठी कवितेमधला दुवा म्हणून त्यांनी या वाङ्मयाकडे पाहिले आहे.

म. भा. नाडकर्णी, अ. अ. वडोदकर

**० वसईकर, गणपत पिराजी** : पहा पंडित, गणपत पिराजी

**० वसंत** : पहा पटवर्धन, वासुदेव बळवंत

**० वसंतविहार** : पहा जोशी, शंकर दत्तात्रेय

**वळंगकर, गोपाळबाबा (कोंडीराम)** : (ज. अनुपलब्ध–मृ. १९००). दलित चळवळीतील प्रारंभीचे एक नेते. ते मूळचे महाडजवळील रावढूल या खेडेगावचे रहिवासी. पूर्वाश्रमीच्या महार जातीत जन्म. वयात आल्यावर त्यांनी पलटणीत प्रवेश केला. पलटणीतच त्यांनी नॉर्मलची परीक्षा दिली. रामानंदी पंथाचा त्यांनी स्वीकार केला होता. हिंदुधर्मातील पुराणे व शास्त्रे यांचा त्यांनी सखोल अभ्यास केला होता. पलटणीत असल्याने पुण्यात त्या काळात म. फुलेंची लाईनबाजारात व्याख्याने होत. त्या काळात गोपाळबाबांचा म. फुलेंशी परिचय झाला. म. फुले सतत शास्त्र, पुराण, जातिभेद यांवर बोलत असत. वळंगकर त्यांचे घनिष्ठ अनुयायी बनले. जोतिरावांच्या विचारसरणीचा केवळ त्यांच्यावर परिणामच झाला असे नसून, त्यांनी ती आत्मसातच केली व पुढे पलटणीच्या नोकरीतून १८८६ मध्ये निवृत्त झाल्यावर हवालदार म्हणून पेन्शन घेऊन, ते दापोलीस राहावयास गेले व तिथूनच त्यांच्या चळवळीस प्रारंभ झाला.

सवर्ण हिंदू हे आर्य आणि अस्पृश्य लोक हे अनार्य अशी वळंगकर आणि त्यांच्या सहकाऱ्यांची समजूत होती. म्हणून त्यांनी दापोलीस 'अनार्यदोषपरिहार समाज' स्थापन केला. अस्पृश्यता नष्ट केल्याशिवाय आपल्या ज्ञातिबांधवांची प्रगती होणार नाही, हे जाणून त्यांनी जनजागृतीची मोहीमच हाती घेतली. कीर्तन ह्या माध्यमाद्वारे आणि धर्मग्रंथ व पुराणे यांची उदाहरणे देऊन आपले विचार ते दीनदलितांपर्यंत पोहोचवीत होते. डॉ. आंबेडकरांनी दलितांच्या उद्धारासाठी जे प्रचंड कार्य केले, त्याची सुरुवात मात्र इथून झालेली दिसते. कारण गोपाळबाबा वळंगकर आणि डॉ. आंबेडकरांचे वडील हे घनिष्ठ सहकारी होते, असा पुरावा मिळतो व त्याचप्रमाणे रमाबाई आंबेडकर यांच्या माहेराकडून गोपाळबाबा हे आंबेडकरांचे नातलगही होते, असे *विटाळविध्वंसन*च्या प्रस्तावनेवरून आढळते.

गोपाळबाबा वळंगकर विशेष प्रसिद्ध आहेत ते एका घटनेमुळे व ती ही की, १८९२ मध्ये लष्करात महार पलटणी रद्द झाल्या. त्यामुळे लष्करभरतीही थांबली. वळंगकरबाबांनी न्या. महादेव गोविंद रानडे यांच्या मदतीने सरकारकडे एक मोठा अर्ज करून, आपल्या मागण्यांचे निवेदन सादर करण्याचा प्रयत्न केला, पण त्यांच्याच ज्ञातिबांधवांनी, सेवानिवृत्त सैनिकांनी निवेदनावर सह्या करण्यास नकार दिला व गोपाळबाबांचा हा प्रयत्न तिथे अपूर्ण पडला (१८९३). गोपाळबाबा 'सुधारक' व 'दीनबंधु' या वर्तमानपत्रांतून अस्पृश्यांच्या दुःखाविषयी व हक्काविषयी लेखन करीत असत. अस्पृश्यांच्या चळवळीचे ते आद्य जनकच वाटतात. जातिभेदावर कडाडून टीका करून आपला विशिष्ट दृष्टिकोण स्पष्ट करण्यासाठी त्यांनी *विटाळविध्वंसन* हे पुस्तक लिहिले. (१८८९). कोकणातील महारमंडळींस जो अन्याय सहन करावा लागत होता, त्याची यात चर्चा असून, त्यांच्या दृष्टीने हा अन्याय 'सृष्टिनियमाविरुद्ध, बुद्धिविरुद्ध व सद्धर्माविरुद्ध कसा आहे', याचे प्रतिपादन या पुस्तकात आहे. या पुस्तकाच्या माध्यमातून त्यांनी धर्माधिपती शंकराचार्यांनासुद्धा आव्हान दिलेले दिसते. एवढेच नव्हे तर आपल्या या विनंतिपत्राचा (पुस्तकाचा/*विटाळविध्वंसन*) राष्ट्रीय सभेतही विचार व्हावा, असे मत त्यांनी मांडले आहे.

पुढील काळातील दलितसाहित्याचे जे साद-पडसाद ऐकू येतात त्याची बीजे वळंगकरांच्या लेखनात आढळतात. म. फुलेंच्या सहकार्याने गोपाळबाबा शेवटपर्यंत दलितांच्या हक्कासाठी लढत राहिले. त्यांनी म. फुले यांच्याप्रमाणे काही 'अखंडां'चेही लेखन केले आहे. फुले यांच्यापासूनच त्यांना ही प्रेरणा मिळाली असावी; पण त्यांचा आशय स्वतंत्र आहे. 'कोंडीराम' या नावानेही त्यांनी काही रचना केली आहे. श्री. वळंगकर यांच्या लेखनाचे अद्यापि व्यवस्थित संकलन झालेले नाही.

लता जाधव

**वॅलंटाईन, हेनरी** : (ज. ५ मार्च, १८१३–मृ. ९ नोव्हेंबर, १८६५, मायदेशीच्या परतीच्या प्रवासात). गाव–Schodack–न्यूयॉर्क State अमेरिकेत. वयाच्या बाविसाव्या वर्षी ते भारतात मिशनरी म्हणून धर्मसेवा करायला सपत्निक आले. सतराव्या वर्षी बी.ए. व एकविसाव्या वर्षी एम्.ए. पदवी संपादन करून त्यांनी कार्य करण्याची दीक्षा घेतली. लॅटिन व ग्रीक भाषा त्यांनी आत्मसात केल्या होत्या. हे फार करारी स्वभावाचे, तरतरीत बुद्धीचे आणि झटून काम करणारे होते. मुंबईतल्या अमेरिकन मराठी मिशनचे मिशनरी म्हणून हेनरी व एलिझाबेथ वॅलंटाईन ११ ऑक्टोबर, १८३५ रोजी मुंबई बंदरात उतरले. सुमारे वर्षभर मुंबईत राहून हे जोडपे अहमदनगरला आले; व तेथल्या मिशन कामाची सूत्रे त्यांनी हाती घेतली. मराठी व संस्कृतवर प्रभुत्व मिळवून वॅलंटाईननी वर्षभरातच देवाचे प्रेम या विषयावर एक विचारप्रवर्तक असे प्रवचन शुद्ध मराठीत दिले.

संस्कृत तर त्यांनी आत्मसात केलेच पण एक संस्कृत वर्गदेखील त्यांनी चालविला होता. तरीपण आपल्या मराठी प्रवचनात त्यांनी संस्कृत अगर अन्य भाषेतले शब्द कधी घुसडले नाहीत. अगदी शुद्ध, सुलभ, साधी आणि प्रचारातली मराठी ते बोलत.

नगर प्रांतात असताना त्यांनी विविध क्षेत्रांत केलेली कामगिरी उल्लेखनीय आहे. ईश्वरीज्ञान पाठशाळेत व धर्मसेवकांच्या शाळेत त्यांनी अनेक वर्षे शिक्षण दिले. १८४० मध्ये वॅलंटाईन मराठी बायबलच्या पुनर्निरीक्षण समितीवर आले. बायबलचा दुसरा खंड म्हणजे 'नवा करार' याचे त्यावेळी प्रचलित असलेले भाषांतर त्यांना पसंत नव्हते. त्यात आमूलाग्र फेरबदल करायचा त्यांनी प्रयत्न केला. पण इतर सदस्यांपुढे त्यांचे काही चालेना, तेव्हा *नव्या कराराचा पूर्वार्ध* स्वतंत्रपणे छापून यांनी प्रसिद्ध केला. ते दीर्घोद्योगी होते.

मराठी खिस्ती साहित्यक्षेत्रातल्या त्यांच्या एका विशिष्ट कामगिरी-विषयी उल्लेख करायला हवा. प्रथमतः त्यांनी खिस्ती मंदिरातून मराठी संगीताची हकालपट्टी केली. यातून निर्माण होणारी पोकळी भरून काढण्यासाठी त्यांनी इंग्रजी गीतांची मराठी भाषांतरे इंग्रजी छंदात व चालींवरच तयार करण्याचा एक अभिनव प्रयोग केला. पहिल्याच धडाक्यास शंभरावर गीते तयार होऊन, *देवाचे भजन करण्याची गीते* या शीर्षकाखाली १८४५ मध्ये प्रसिद्ध झाली. कुठल्याही मराठी खिस्ती मंदिरातली अशा गीतांची लोकप्रियता पाहून हा प्रयोग कल्पनेपलीकडे यशस्वी झाला.

आपला शतकोत्तर सुवर्णमहोत्सव साजरा करणारे पहिले मराठी खिस्ती नियतकालिक 'ज्ञानोदय' याचे संस्थापक-संपादक हेनरी बॅलनटाईन होते. १८४२ च्या आरंभी एखादे नियतकालिक काढण्याचा विचार नगरच्या अमेरिकन मिशनरींनी केला. त्याकाळी देशी भाषात आठ–दहा नियतकालिके प्रसिद्ध होत होती. त्यांतून खिस्ती धर्मावर टीका प्रसिद्ध होई. ही टीका बहुधा पाश्चात्य नास्तिकांच्या लिखाणांतून घेतलेली असे. त्यांना तोंड देण्याकरिता एक प्रभावी शस्त्र म्हणून 'ज्ञानोदय' मासिकाचा जन्म झाला.

बॅलंटाईन यांनी 'ज्ञानोदया'चा पहिला अंक जून १८४२ मध्ये अहमदनगर येथे प्रसिद्ध केला. तो चतुष्पत्री आकाराचा असून त्याची पृष्ठे वीस होती.

१८४२ ते १८४५ आणि १८५८ ते १८६५ अशी दहा वर्षे बॅलनटाईन यांनी 'ज्ञानोदया'ची संपादकीय सूत्रे सांभाळून त्याला नावारूपाला आणले.

याशिवाय त्यांनी इतरही छोटीमोठी ग्रंथरचना मराठीत केली आहे. १८४६ मध्ये *जगन्नाथाविषयी* ही पुस्तिका प्रसिद्ध झाली. 'हल्ली या देवाचे संक्षेपे वर्णन करून त्याच्या चित्रासुद्धा एक लहान पुस्तक छापिले आहे... व त्याची किंमत पाव आणा ठेवली आहे.' असे याविषयी १५ जुलै, १८४६ रोजी 'ज्ञानोदया'त म्हटले आहे. १८४७ मध्ये प्रथमच प्रसिद्ध झालेले मराठी पंचांग, याचा काही भाग त्यांनी तयार करून दिला होता. सुशिक्षित तरुणांचे कर्तव्य या विषयावर अहमदनगरातल्या वक्तृत्वोत्तेजक मंडळीपुढे त्यांनी एकदा व्याख्यान दिले होते. ते १८५५ मध्ये विद्याभ्यास केलेल्या तरुणांस व्याख्यान या शीर्षकाखाली प्रसिद्ध झाले. त्यानंतर त्यांनी खास मुलांकरिता इंग्रजी छंदातल्या ६४ गीतांचे मराठी भाषांतर इंग्रजी चालींवरच तयार केले. ते *लेकरांची गायने* या शीर्षकाखाली १८६२ मध्ये संगीत प्रसिद्ध झाले.

बॅलंटाईन सुमारे वीस वर्षे नगर मिशनचे सचिव आणि कोशाध्यक्ष म्हणून काम पाहत होते. अनेक उच्च वर्णीयांच्या धर्मांतर प्रसंगी उसळलेल्या दंगलीला त्यांना तोंड द्यावे लागले होते.

अशा रीतीने भारतात ३१ वर्षे सेवा करीत असताना त्यांची प्रकृती ढासळली. तेव्हा सर्व जबाबदाऱ्यांतून मुक्त होऊन बॅलंटाईन ४ सप्टेंबर, १८६५ रोजी सपत्निक अमेरिकेस निघाले. पण ईश्वरी सूत्र निराळेच होते. पोर्तुगालजवळ जहाज आले तेव्हा ९ नोव्हेंबर, १८६५ रोजी त्यांना मृत्यू आला. जहाजातच दुसऱ्या दिवशी त्यांना जलसमाधी देण्यात आली.

भास्कर जाधव

**वाङ्मय :** (१) देवाचे भजन करण्याची गीते, मुंबई, १८४५. (२) *जगन्नाथाविषयी*, मुंबई, १८४६. (३) *भिरभिराले धर्म*, मुंबई, १८५१. (४) *कोंकरचारा*, १८५१. (५) *विद्याभ्यास केलेल्या तरुणांस व्याख्यान*, १८५५. (६) *मतपरीक्षा, भाग २* (भाषांतरित), मुंबई, १८५८. (७) *येसोबा पवार याचा वृत्तांत*, मुंबई, १८५८. (८) *लेकरांची गायने*, मुंबई, १८६२.

संपादित नियतकालिक : ज्ञानोदय-मासिक व पाक्षिक, अहमदनगर व मुंबई. मासिक–जून, १८४२–४४. पाक्षिक–जानेवारी, १८४५ आणि १८५८–६५.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :** नथूजी, तुकाराम, अमेरिकन मराठी मिशनचा शंभर वर्षांचा संक्षिप्त इतिहास १८१३ पासून (?) पर्यंत – स. १९१५, पृष्ठे, ३७–३९. जाधव, भास्कर–'ज्ञानोदय', फेब्रुवारी, १९८४, पृष्ठे १९–२१.

भास्कर जाधव

**वॉइल्डर, रॉयल गोल्ड :** (ज. २७ ऑक्टोबर, १८१६ – मृ. १० ऑक्टोबर, १८८७). या अमेरिकन मिशनरीचा जन्म अमेरिकेतल्या रॉयल्टन (व्हरमॉन्ट) येथे झाला. त्यांचे बालपण व शिक्षण न्यूयॉर्क-मधल्या मेजॅन येथे झाले. १८३५ मध्ये त्यांनी मिडलबरी कॉलेजात प्रवेश केला. रॉयल हे अकरा भावंडांपैकी एक असल्यामुळे शिक्षणाबरोबर फावल्या वेळी त्यांना इतर काम करावे लागे. १८३९ मध्ये ते बी.ए. झाले. नंतर काही दिवस त्यांनी शिक्षकाचे काम केले. पण धर्मसेवेकडे त्यांचा कल असल्याने त्यांनी अॅन्डोव्हर थिऑलॉजिकल सेमिनरीत १८४२ मध्ये नाव दाखल केले आणि तेथली पदवी घेऊन ते बाहेर पडले. परदेशात जाऊन धर्मसेवा करायची त्यांची इच्छा लक्षात घेऊन अमेरिकन मराठी मिशनने त्यांना भारतात पाठविण्याची तयारी दर्शविली.

त्यांनी १८४६ मध्ये अमेरिका सोडली. इकडे येताना चार महिने त्यांनी बोटीवर मराठीचा अभ्यास चालू ठेवला होता. २० सप्टेंबर, १८४६ रोजी ते मुंबई बंदरात सपत्निक उतरले. तेथून ते अहमदनगरला गेले व तेथे शिक्षणकार्य, धर्मसेवा करू लागले. सहा वर्षांच्या सेवेनंतर मिशनने त्यांना कोल्हापूरला नवे मिशन ठाणे उघडायला पाठविले.

त्यांनी ३ डिसेंबर, १८५२ रोजी कोल्हापुरात पदार्पण केले. येथे त्यांच्या संकटपरंपरेला आरंभ झाला. त्यांना हद्दपार करा, अशा आशयाचा अर्ज सरकारकडे गेला. वॉइल्डरला कुणी घर देईना, म्हणून ते तंबूत राहू लागले. त्यांनी पुढे काही दिवस रंकाळा तलावापाशी असलेल्या मिलिटरी कँपात काढले.

त्यावेळी कोल्हापुरात एकच शाळा आणि केवळ बारा विद्यार्थी होते. आसपासच्या प्रांतात तर शाळा नव्हत्याच. वॉइल्डर पतिपत्नींनी मिशन शाळा उघडल्या. त्यात मुले व त्यांचे पालकदेखील येऊन शिकू लागले. त्यावेळी शिवाजी ऊर्फ बाबासाहेब महाराज यांच्या भगिनी आऊबाई व बाळाबाई यांच्या साहाय्याने मिसेस वॉइल्डरनी राजवाड्यातच पहिली मुलींची शाळा उघडली. लवकरच विद्यार्थ्यांची संख्या तीन हजारावर गेली.

वॉइल्डरनी जागा घेऊन मंदिर व बंगला बांधला. चांगले सुतार व गवंडी मिळेनात तेव्हा त्यांनी दोन्ही कामे स्वतःच केली. खाणीतून दगड काढून तर लाकडांना खिळे ठोकण्यापर्यंत सगळी कामे त्यांनी केली.

वॉइल्डर जोडपे १८५७ ते १८६१ पर्यंत प्रकृतीच्या स्वास्थ्यासाठी अमेरिकेला जाऊन आले.

प्रकृती फारच खालावल्यामुळे १८७५ मध्ये वॉइल्डर अमेरिकेस गेले, ते परतलेच नाहीत. वॉइल्डर शिक्षणतज्ञ व उत्तम प्रचारक होते. धर्मसेवेबरोबरच त्यांनी थोडीबहुत वाङ्मयसेवाही केली. बायबल सोसायटीने प्रसिद्ध केलेल्या १८५५ मधील पहिल्या बायबलच्या पुनर्निरीक्षणासाठी जी समिती नेमली होती, तिचे ते सदस्य होते.

**वाङ्मय :** (१) साल्सबेरी मैदानातील धनगर याची गोष्ट, मुंबई, १८४९, १८५२ (भाषांतरित). (२) गवळ्याच्या कन्येची गोष्ट,

मुंबई, १८५० (भाषांतरित). (३) पाचादि भूतदया, मुंबई, १८५३ (भाषांतरित). (४) हिंदुशास्त्रातील पदार्थविज्ञान, मुंबई, १८५५ (स्वतंत्र). (५) ईश्वरी विद्या, मुंबई, १८५६. (६) मात्थीने केलेले शुभवर्तमान यावर टीका, मुंबई, १८५८. (७) मार्कसाने केलेले शुभवर्तमान यावर टीका, मुंबई, १८५८. (८) पवित्र शास्त्रातील मुख्य विषय, मुंबई, १८५७ (भाषांतरित). (९) लूकाने केलेले शुभवर्तमान यावरील टीका, मुंबई, १८७५.,

चरित्र, चर्चा, अभ्यास : सुवार्तामंडळ शतवार्षिकोत्सव समिती, १०० वर्षे १८५२ – १९५२, कोल्हापूर, १९५२. पिंगे, श्री. म. युरोपियनांचा मराठीचा अभ्यास व सेवा (१९६०), (पृष्ठे २७४ – ७७).

भास्कर जाधव

**वाकुळकर, सिमियन बेंजामिन** : (ज. १८४९, अलिबाग, जि. कुलाबा – मृ. १९३०, कलकत्ता). हे बेने इस्रायली लेखक व संपादक. समाजातील अशिक्षित लोक व स्त्रीवर्ग यांना डोळ्यापुढे ठेवून ह्यांनी लेखन केले. स्त्रीस्वास्थ्यविषयक ज्ञान आणि नीती यासंबंधी विवेचन करणारे *नीतुपदेशक* हे मासिक (१८८५ – १९०४) त्यांनी काढले होते.

मुंबई सरकारच्या मराठी पाठ्यपुस्तकांतील कवितांच्या दोषपूर्ण निवडीबद्दल शासनाचे लक्ष वेधून घेण्यासाठी त्यांनी १८८३ साली एक लेख लिहिला. तो लेख 'काव्यदोषविवेचन' नावाने प्रसिद्ध झाला.

*सदुपदेशसंग्रह* (१८८९), *मार्क्स आरेलस राजाची बोधवचने* (१८९३), *मुलास वागविण्याची रीति* (१८८२), *योगसाधना* (सदाचरणावरील निबंध) (१८८३), *अपशब्दनिषेध* (१८९२) इत्यादी विद्यार्थ्यांना सदुपदेश करणारी त्यांची पुस्तके प्रसिद्ध आहेत. आपल्या पत्नीसंबंधी 'रेबेका सिमियन यांचे चरित्र' त्यांनी १९२७ साली लिहून ठेवले.

रेचल गडकर, डॉ. सौ. आशा सावदेकर

**वागळे, शिवराम सीताराम** : (ज. १८५६, वेंगुर्ले, जि. रत्नागिरी – मृ. १४ जून, १९२८). एकोणिसाव्या शतकातील एक वाङ्मयप्रेमी लेखक. 'विविधज्ञानविस्तार'मध्ये ते सातत्याने लिहीत. लॅटिन भाषा घेऊन मुंबई विद्यापीठाची बी.ए. पदवी उत्तीर्ण. न्यायखात्यात नोकरी.

प्रसिद्ध मुसलमान संत कवी शेखमहंमद यांच्या 'योगसंग्राम' ह्या ग्रंथाचे चरित्रासह सटीप संपादन (१८८९) हे वागळे यांचे महत्त्वाचे कार्य. ब्रिटिश इतिहासकार बक्ल यांच्या ग्रंथाचा 'इतिहासशास्त्र' हा अनुवाद 'विविधविस्तारा'तून यांनी प्रसिद्ध केला. 'विविधज्ञानविस्तारा'तील त्यांचा 'शेक्सपिअरकृत हॅम्लेट नाटकाची मराठी भाषांतरे' ही लेखमालाही फार गाजली. (वि. ज्ञा. वि., वर्ष ४६) त्यात त्यांनी 'विकारविलसित' व 'वीरसेन' या नाटकांवर समीक्षणात्मक लिहिले आहे.

'विविधज्ञानविस्तारा'मधून बेकनच्या अनेक निबंधांचा अनुवादही त्यांनी प्रसिद्ध केला आहे. मराठीतील आरंभीच्या नाट्यविषयक तात्त्विक, तांत्रिक चिकित्सेचे स्वरूप समजून घेण्याच्या दृष्टीने ह्यांचे लेखन उपयुक्त आहे.

गं. दे. खानोलकर, आशा सावदेकर

**वाडेगावकर, नारायण दाजीबा** : (ज. १० मार्च, १८७१ – मृ. १२ फेब्रुवारी, १९५०, नागपूर). संस्कृत व्याकरणशास्त्राचे भाष्यकार. १८९३ साली नागपूर प्रांती इ. ए. सी. म्हणून नेमणूक व १९२६ साली निवृत्त. त्यानंतर काशी येथे संस्कृत व्याकरणाचे पुन्हा अध्ययन.

त्यांचे *परिभाषेन्दुशेखर* या ग्रंथाचे विस्तृत विवरण (१९३७) प्रसिद्ध आहे. पाणिनीय सूत्रे, वार्तिके व परिभाषा यांचे उत्तम विवेचन ह्या ग्रंथात आढळते. अनेक उदाहरणे दिल्यामुळे ग्रंथ सोपा झालेला आहे. वाडेगावकरांनी केलेले भट्टोजी दीक्षितांच्या 'प्रौढमनोरमा' या टीकेचे व त्यावरील 'शब्दरत्न' टीकेचे सुबोध भाषांतर त्यांच्या मृत्यूनंतर १९५१ साली प्रसिद्ध झाले. मराठी भाषेत हे ग्रंथ प्रथम आणण्याचे श्रेय वाडेगावकरांना जाते.

गं. दे. खानोलकर, आशा सावदेकर

**वावीकर, यादव शंकर** : ० राजहंस : (ज. १८७१ – मृ. १९५२). निबंधकार. मुंबई युनिव्हर्सिटीची स्कूल फायनल परीक्षा पास. कस्टम कचेरीत नोकरी.

*वाचन* (१९००) ह्या विषयावरचे त्यांचे पहिले पुस्तक असून त्याला डेक्कन व्हर्नाक्युलर सोसायटी व बडोदेसरकार ह्यांची पारितोषिके मिळाली. 'ग्रंथमाला' ह्या मासिकात प्रसिद्ध झालेले दोनशे वर्षांपूर्वी पृथ्वी-प्रदक्षिणा करणाऱ्या एका प्रवाशाचे 'हिंदुस्थानातील प्रवासवृत्त' (डॉ. जॉन फ्रान्सिस गॅमिली ह्या इटालियन प्रवाशाने लिहिलेले) हे प्रकरण, त्या काळच्या हिंदुस्थानातील काही भागाचे विश्वसनीय वृत्त कथन करणारे असल्यामुळे महत्त्वाचे आहे. *धम्मपद* (१९०१) हा त्यांचा भाषांतरित ग्रंथ. 'मराठी वाङ्मयाची दैन्यावस्था' (१९०७) हा त्यांनी लिहिलेला उल्लेखनीय निबंध होय. *नूरजहान अथवा जगदीमी* (१९०५) ही नूरजहानच्या आयुष्याची करुण कहाणी सांगणारी कादंबरी त्यांनी लिहिली. तुकाराम, रामदास ह्यांच्या काव्यांतील बोधपर वेचे निवडून त्यांनी पुस्तके संपादित केली.

त्यांनी १९२२ नंतरच्या काळात मुख्यतः शेती व बागायती ह्या विषयावर विपुल लेखन केले. ह्या विषयावरची त्यांची *मेंढ्या, लोकर, लोंकरीची वस्त्रे, चाऱ्याकरिता गुरांचा हंबरडा, हिरवळकुरण आणि त्याचे फायदे, वृक्षसंवर्धन – झाडांची शेती व उपयोगधंदे, गायी पाळणे कसे फायदेशीर ठरते* ही पुस्तके प्रसिद्ध झाली. ह्याशिवाय सर्वसामान्य जनतेला मार्गदर्शनपर अशा त्यांच्या अनेक पुस्तिका 'ग्रामोद्योग कोश' ह्या योजनेखाली प्रसिद्ध झाल्या.

प्रभा पुरोहित

**० वासुदेवानंद सरस्वती** : पहा टेंबे, वासुदेव गणेश

**वाळवेकर, मोरोपंत विठ्ठल** : मोरोपंतांची माहिती बघताना त्यांच्या जन्म, मृत्यूविषयी व जन्म गावाविषयी फारशी माहिती उपलब्ध होत नाही. त्यांची व जोतिबांची शाळेपासून मैत्री होती व ही मैत्री शेवटपर्यंत होती. मोरोपंत १८७६-७७ नंतर मुंबईत गेले पण तरीही त्यांचा व जोतिबांचा स्नेह टिकून होता. मोरोपंत वाळवेकर *गृहिणी* (?) हे मासिक काढीत. त्याचप्रमाणे ते काही दिवस 'सुबोध पत्रिके'चे संपादक होते. त्यांचा 'सुबोध प्रकाश' हा छापखाना होता.

मोरोपंतांनी दोन महत्त्वाची पुस्तके लिहिली आहेत. *नीलदर्पण* (१८७२). हे मराठी पुस्तक, मूळात हे पुस्तक इंग्रजी होते. त्याचा बंगाली भाषेत अनुवाद झाला व त्यावरून मोरोपंतांनी मराठीत *नीलदर्पण* लिहिले. युरोपियन मळेवाल्यांची जुलुमी वृत्ती व मजुरांचे शोषण हा याचा विषय आहे. त्याचप्रमाणे मोरोपंतांनी *जॉर्ज वॉशिंग्टनचे* मराठीतून चरित्र लिहिले. अनेक इंग्रजी पुस्तकांचे वाचन करून त्याआधारे त्यांनी हे पुस्तक लिहिले. जोतिबा फुले यांना जॉर्ज वॉशिंग्टनचे जे पुस्तक मिळाले ते मोरोपंतांनीच लिहिले असावे असा अंदाज आहे.

मोरोपंतांनी जोतिबांचे अखेरचे पुस्तक *सार्वजनिक सत्यधर्म* मुंबईस नेऊन, जोतिबांच्या मृत्यूनंतर छापले. या पुस्तकाच्या त्यांनी दोन हजार प्रती काढल्या होत्या. वाळवेकरांनी आपले आत्मचरित्र लिहिले होते. पण ते दुर्मिळ आहे. 'पराग' या मासिकातून ते छापले गेले होते.

संदर्भ : 'पुरोगामी सत्यशोधक' – जुलै, ऑगस्ट, सप्टेंबर / १९९१, पृ. ६८ ते ७२ ले. रा. ना. चव्हाण.

लता जाधव

**विजयकर, मोरोबा कान्होबा :** ० मोरोबा कान्होबा : (ज. १८१३–मृ. १८७१). ऐतिहासिक स्वरूपाचे कथालेखक. यांनी मोरोबा कान्होबा या नावाने लेखन केले. १८३० साली विद्याभ्यास संपवून सरकारी नोकरी पत्करली. निरनिराळ्या पदांवर काम केल्यानंतर ठाणे, अहमदनगर व मुंबई येथे न्यायखात्यात काम. १८६९ मध्ये मुंबईच्या स्मॉल कॉज कोर्टाच्या जज्जाच्या जागेवरून निवृत्त. विधवाविवाहाचे सक्रिय पुरस्कर्ते व 'पुनर्विवाहोत्तेजक मंडळी'चे एक सभासद. 'रावबहादुर' हा किताब.

मोरोबांनी पुनर्विवाहाच्या प्रचारार्थ तत्कालीन वृत्तपत्रांतून अनेक छोटे-मोठे लेख लिहिले. *विधवा विवाहाविषयी* (१८७०) ही त्यांची भाषणरूप पुस्तिका. *घाशीराम कोतवाल* (१८६३) हे त्यांचे एकमेव परंतु अतिशय उल्लेखनीय पुस्तक. पेशवाईच्या उत्तरकाळात नाना फडणविसांच्या मर्जीतील एक कोतवाल घाशीराम, ह्याच्या कारकीर्दीवरील संवादात्मक अशा २८ गोष्टी ह्या पुस्तकात आहेत. घाशीराम हा नायक असला तरी त्याच्या निमित्ताने तत्कालीन समाजाच्या अज्ञानाचे काहीसे अतिरंजित असे वर्णन यात आढळते. त्यांनी प्रस्तावनेत इंग्रजीतील 'नावेल्स'च्या धर्तीवर हे पुस्तक लिहिल्याचे म्हटले असले तरी ते कादंबरीप्रमाणे आणि गोष्टीप्रमाणेही नाही. 'आळंदीची यात्रा, सेंटपालचे देऊळ, पापीचा स्तंभ, दुर्भिणीचा इतिहास इत्यादी अनेक विषयांची' माहितीही यात आढळते. ह्यातील विविध प्रकरणांना शास्त्रीय, चरित्रात्मक, बिरबलाच्या चातुर्यकथा, अरबी-फारसी सुरस कथा ह्यांचे स्वरूप प्राप्त झाले आहे. ग्रंथाचे संवादात्मक रूप, चटकदार वर्णने व चुटकेवजा कथा ह्यामुळे हे पुस्तक रंजक झाले आहे. 'मराठी शालापत्रका'च्या (१८६६, फेब्रुवारी) अंकात नीळकंठ जनार्दन कीर्तने ह्यांनी प्रस्तुत पुस्तकावर टीका केली आहे.

अंजली कुलकर्णी, नंदिनी लाटलीकर

**विजापूरकर, विष्णु गोविंद :** (ज. १८६३, कोल्हापूर – मृ. १ ऑगस्ट, १९२६). एम्. ए. अहमदाबाद कॉलेजात फेलो व पुढे काही काळ राजाराम कॉलेज (कोल्हापूर) येथे संस्कृत – इंग्रजीचे प्राध्यापक. विजापूरकरांना प्रचलित शिक्षणव्यवस्थेत रस नव्हता. ते सक्रीय शिक्षणाचे पुरस्कर्ते होते. समाजजागृती हे त्यांचे ध्येय होते.

श्री. विजापूरकरांनी समाजजागृतीच्या उद्देशाने एप्रिल, १८९६ मध्ये *ग्रंथमाला* हे मराठी मासिक, १८९८ मध्ये *समर्थ* या नावाचे इंग्रजी–मराठी साप्ताहिक आणि एप्रिल, १९०६ मध्ये *विश्ववृत्त* (प्रा. वा. म. जोशी यांच्या सहकार्याने) हे मासिक सुरू केले. *विश्ववृत्त* अडीच वर्षे चालले. त्यातील श्रीपाद दामोदर सातवळेकर यांनी लिहिलेला 'वैदिक प्रार्थनांची तेजस्विता' हा लेख आक्षेपार्ह ठरला. त्यामुळे विजापूरकर व वामन मल्हार जोशी यांच्यावर खटला होऊन त्यांना तीन वर्षांची कारावासाची शिक्षा झाली. याच कालखंडात *विश्ववृत्त* बंद पडले. श्री. विजापूरकर तुरुंगातून सुटल्यानंतर त्यांनी आपले जीवन राष्ट्रीय शिक्षण प्रसार कार्यासाठी वाहून घेतले. त्यांनी *ग्रंथमाला* व *विश्ववृत्त* या नियतकालिकांच्या माध्यमातून केलेली मराठी भाषा व वाङ्मयाची सेवा महत्त्वाची आहे.

गं. दे. खानोलकर, सुनंदा कविमंडन

० **विनाकी :** पहा पदे, शंकर दाजीशास्त्री
० **विष्णुदास कवी :** पहा भावे, विष्णु अमृत
० **विष्णुदास माहूरकर :** पहा धांदरफळे, कृष्णाजी रावजी
० **विष्णुबावा ब्रह्मचारी :** पहा गोखले, विष्णु भिकाजी
० **विहंगम :** पहा अंतरकर, बाळकृष्ण लक्ष्मण

**वेलणकर, विनायकशास्त्री बापुजी :** (ज. १८३२–मृ. १९१२). वैदिक धर्माचे विवेचक. स्त्री-शिक्षण, पुनर्विवाह इत्यादी महाराष्ट्रातील सुधारणावादी चळवळींना त्यांचा विरोध होता. स्त्रियांना वेदसंमत स्त्रीधर्माचे विस्मरण होऊ नये म्हणून त्यांनी *वेदोक्त स्त्रीधर्मप्रकाश* (१८८९) ह्या ग्रंथातून वेदग्रंथानुसार स्त्री-विषयक धर्माचे विवेचन केले आहे. *वेदोक्त मानवधर्मसार* (१८८९–१९००) ह्या ग्रंथातून चारी वर्ण व चारी धाम यांचे दर्शन घडविले आहे.

एकोणिसाव्या शतकात महाराष्ट्रात सनातन धर्माभिमानी जुनी मंडळी व इंग्रजी शिक्षणामुळे सुधारणावादी नवविचारांचा पुरस्कार करणारी मंडळी यांच्यातील वैचारिक संघर्षाचे प्रतिबिंब शास्त्रीबुवांच्या ग्रंथांतून आढळते.

गं. दे. खानोलकर, शकुंतला खोत

**वेलदे, रमाकांत यशवंत :** (ज. ७ जून, १९०७–मृ. ७ सप्टेंबर, १९५३, यवतमाळ). साहित्यप्रेमी पत्रकार, लेखक. मूळचे नाशिककर. व्यवसायानिमित्त मुंबई, पुणे इत्यादी अनेक ठिकाणी वास्तव्य. आचार्य अत्रे यांचे काही काळ खाजगी कारभारी. 'नवयुग' मासिक, 'दैनिक सकाळ' पुणे इत्यादी नियतकालिकांमध्ये संपादकीय व व्यवस्थापकीय कामांची जबाबदारी त्यांनी पार पाडली होती. पुढे मुंबईत *जीवन* (१९४१-४२) नावाचे कामशास्त्राला वाहिलेले मासिक काढून त्यात 'शैलजा' या टोपणनावाने त्यांनी काही लेखनही केले. 'नवे जग', 'रति', 'स्वराज्य' इत्यादी नियतकालिकांच्या संपादनातही यांचा सहभाग होता. नाशिक येथे काही काळ त्यांनी एक छापखाना चालविला; वि. वा. शिरवाडकरांची पहिली कादंबरी 'वैष्णव' ही त्यात छापली. त्यांनी *स्वदेश* नामक द्विसाप्ताहिक तसेच *रात्रीच्या रम्यकथा* नामक मासिक काही काळ चालविले. पत्रकारितेच्या बाबतीतला सतत नवा उत्साह त्यांच्यात टिकून होता. परंतु व्यवसायात यशस्वी होण्यासाठी आवश्यक ते तंत्रकौशल्य त्यांना साध्य झाले नाही. यवतमाळ येथे त्यांचे निधन झाले.

कमलेश

संदर्भ : (१) 'बादशहा', 'वाटेवरच्या सावल्या', वि. वा. शिरवाडकर, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, आ. २, १९८१, पृ. १०५–११४. (२) 'मराठी नियतकालिकांची सूची' प्रथम खंड, संपा., शं. ग. दाते आणि इतर, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय, मुंबई, १९६९.

**वैजापूरकर, कृष्णशास्त्री :** (ज. १८१६ – मृ. जुलै, १९०५). इंग्रज लेखकांच्या लेखनकार्यातील सहकारी. धर्मशास्त्र व अलंकारशास्त्र (१८५१) या विषयांवरील परीक्षांत उत्तीर्ण. पुणे व अमरावती येथे काही काळ शिक्षक. ते कृष्णशास्त्री चिपळूणकरांचे सहाध्यायी व 'मालाकार' चिपळूणकरांचे गुरू होते.

मोल्सवर्थ व कँडी यांच्या कोशकार्यातील सहकारी व रे. जे. टेलर या ख्रिस्ती मिशनऱ्यांच्या मराठी लेखनात सहाय्यक म्हणून वैजापूरकरांनी काम केले. महाराष्ट्रातील 'चर्च ऑफ इंग्लंड'च्या अनुयायांसाठी टेलर यांनी रचलेल्या प्रार्थनागीतांच्या रचनेत वैजापूरकरांचा भाग बराच मोठा होता.

गं. दे. खानोलकर, शकुंतला खोत

**वैद्य, गजानन भास्कर :** (ज. जून, १८६७–मृ. २३ मार्च, १९२१). 'थिऑसॉफी' व 'वैदिक धर्म' या विषयांचे लेखक. मुंबईतील 'हिंदू मिशनरी सोसायटी'चे संस्थापक (५ जुलै, १९१७).

वैदिक धर्माचार, विवाह संस्कार, उपनयन संस्कार ह्याविषयी समाजाला माहिती व्हावी म्हणून त्यांनी व्याख्याने दिली व लेखन केले. थिऑसॉफी या पंथाबद्दलच्या आदराने त्यांनी ॲनी बेझंट यांचे अनुयायित्व पत्करले. *विष्णूचे अवतार* (१९०६) हे बेझंट बाईंच्या व्याख्यानाचे भाषांतर, *थिऑसॉफीचे धर्मकार्य* (१९११) व *देहदान-मीमांसा* (१९०७) हे महाभारतावरील प्रवचन ही त्यांची प्रकाशित पुस्तके. *रेखात्मक यथार्थ दर्शन चित्रविद्या* हे चित्रकलेवरील प्राथमिक पुस्तकही त्यांनी लिहिले आहे.

पो. वा. गाडगीळ, शकुंतला खोत

**वैद्य, (भारताचार्य) चिंतामण विनायक :** (ज. १८ ऑक्टोबर, १८६१ – मृ. २० एप्रिल, १९३८). इतिहासकार, कादंबरीकार, भारतीय साहित्य आणि संस्कृतीचे अभ्यासक. महाभारताचे विवेचक व निबंधकार. पुण्याच्या 'वैदिक संशोधन मंडळा'चे संस्थापक.

वैद्यांनी कादंबरी, नाटक, चरित्र व निबंध इत्यादी वाङ्मयप्रकारांतील लेखन केले. 'केसरी'तून प्रसिद्ध झालेल्या 'अबलोन्नती' लेखमालेतून त्यांनी विवाहासंबंधीचे प्रगतिपर विचार मांडले आहेत. पहिल्या लेखांकात सामाजिक सुधारणेच्या प्रयत्नांची हकीकत व सुधारणा यशस्वी करण्याचे मार्ग; दुसऱ्या लेखांकात लग्नाच्या चालीरीतींचा संक्रमणेतिहास आणि लग्नाचे खरे उद्देश व त्यांचे महत्त्व; तिसऱ्यात बालविवाहापासून होणारे दुष्परिणाम आणि चौथ्या लेखांकात बालविवाहाला शास्त्राची संमती नसणे या विषयांची, धर्मशास्त्रविषयक ग्रंथांच्या आधाराने, चिकित्सा केली आहे. *निबंध आणि भाषणे* या पुस्तकातील लेख प्रामुख्याने महाराष्ट्र, मराठी भाषा व मराठी वाङ्मय यासंबंधी आहेत. इतिहासाचार्य राजवाड्यांच्या 'ज्ञानेश्वरीतील मराठी भाषेचे व्याकरण' या ग्रंथाचे विस्तृत परीक्षण करणारे 'ज्ञानेश्वरी-मराठीचे व्याकरण' हा पाच लेखांकांचा निबंध, 'मुक्तेश्वराचे वनपर्व' हा परीक्षणात्मक लेख, 'मराठी भाषा आणि तिच्यावर इतर भाषांचा परिणाम', 'महाराष्ट्र देश, महाराष्ट्र भाषा व महाराष्ट्र वाङ्मय', 'मराठी भाषेचा इतिहास' व 'मराठी गद्यरचना' हे लेख त्यांच्या शोधक व चिकित्सक बुद्धीचे व व्यासंगाचे निदर्शक आहेत.

*श्रीरामचरित्र* व *श्रीकृष्ण चरित्र* (१९१९) ही रसाळ चरित्रे व *मराठा स्वराज्य संस्थापक श्री शिवाजी महाराज* (१९३२) हे शिवाजी महाराजांच्या मूळ स्वलिखित इंग्रजी चरित्राचे मराठी रूपांतर ही त्यांची चरित्रात्मक ग्रंथनिर्मिती. *संयोगिता अर्थात् पतिनिष्ठा* (१९३४) हे ग्वाल्हेरचे माधवराव महाराज शिंदे ह्यांच्या सूचनेवरून लिहिलेले पृथ्वीराज–संयोगिता यांच्या कथानकावरील नाटक. प्रकाशनापूर्वी सुमारे तीस-पस्तीस वर्षे आधीच त्यांनी ते लिहून पूर्ण केले होते. साकी, दिंडी, सुत्रधार, विदूषक इत्यादींनी युक्त असे हे जुन्या वळणाचे नाटक आहे.

*दुर्दैवी रंगू* (१९४८) ही त्यांची एकमेव कादंबरी. या कादंबरीत रंगूबाई नामक बालविधवेच्या दुःखद कहाणी भोवती पेशवेकालीन इतिहासाचा एक कालखंड गुंफला गेला असून, ऐतिहासिक पार्श्वभूमीचे प्रत्ययकारी चित्रण तीत आढळते.

*मध्ययुगीन भारत* आणि *श्रीमहाभारताचे मराठी सुरस भाषांतर* व *ग्रंथाचा उपसंहार* हे ग्रंथही महत्त्वाचे आहेत. एक संदर्भग्रंथ म्हणून *महाभारताचा उपसंहार* (१९१८) उल्लेखनीय आहे. महाभारताचे कर्ते, काल, वर्णाश्रमव्यवस्था, विवाहसंस्था, धर्म, तत्त्वज्ञान, भगवद्गीता विचार इत्यादींच्या बरोबरीनेच सामाजिक, राजकीय व भौगोलिक दृष्टीनेही महाभारताचा अभ्यास, प्रस्तुत ग्रंथातून सादर केला आहे. विष्णुभट गोडसे यांचे 'माझा प्रवास' या नावाचे इतिहासदृष्ट्या महत्त्वाचे एक पुस्तकही वैद्यांनी १९०७ साली प्रसिद्ध केले असून, त्यात १८५७ सालच्या स्वातंत्र्य युद्धाच्या वेळेस एका विद्वान भिक्षुकाने उत्तर हिंदुस्थानात पाहिलेली व ऐकलेली हकीकत मार्मिक रीतीने लिहून ठेवलेली आढळते.

मराठी भाषेच्या उत्पत्तीसंबंधी वैद्यांचा डॉ. पां. दा. गुणे यांच्याशी 'विविध ज्ञान विस्तारा'तून झालेला वाद मराठीतील भाषाशास्त्रीय वाङ्मयात बराच महत्त्वाचा समजला जातो. मराठी भाषेसंबंधीच्या एका मूलगामी प्रश्नाच्या चर्चेला चालना देण्याचे श्रेय या वादाला द्यावे लागते. 'वैद्य–गुणे वाद' या नावाने तो प्रसिद्ध आहे.

मराठीप्रमाणेच वैद्यांनी इंग्रजीतूनही ग्रंथरचना केली. *महाभारत ए क्रिटिसिझम* (१९०५) हा महाभारताचा एक काव्य म्हणून विचार करणारा त्यांचा ग्रंथ. याच्या दुसऱ्या भागात महाभारताचा ऐतिहासिक दृष्टीने विचार केला असून, परिशिष्टात नक्षत्रांचे अंकगणित पुराव्यासह सादर केले आहे. महाभारताचे शेवटचे संस्करण इ. स. पूर्व ३०० ते २०० वर्षे असावे असा त्यांचा निष्कर्ष आहे. *दी रिड्ल ऑफ रामायण* (१९०६) हा रामायणाचा काव्य आणि इतिहास या दृष्टीने विचार करणारा ग्रंथ. *एपिक इंडिया* (१९४०) या त्यांच्या ग्रंथातून रामायण–महाभारतातील सामाजिक, धार्मिक व राजकीय परिस्थितीचा व तत्कालीन वंश, जाती, विवाहसंस्था, चालीरीती, व्यापारउद्योग इत्यादींचा वेध घेतलेला दिसतो. *संक्षिप्त रामायण* व *संक्षिप्त महाभारत* हे त्यांचे संस्कृत ग्रंथही उल्लेखनीय आहेत.

वि. म. बेडेकर, मदन कुलकर्णी

**संदर्भ :** न. र. फाटक, भारताचार्य चि. वि. वैद्य, 'लोकप्रभा', २६ ऑक्टोबर, १९६५.

**वैद्य (वामोरीकर), वामनराव रावजी ऊर्फ ब्रह्मनिष्ठ वामनबाबा :** (ज. १६ ऑगस्ट, १८४८, वामोरी, अहमदनगर – मृ. २५ मार्च, १९०१). शिक्षण मराठी सहावी पास. व्यवसाय वामोरी येथील शाळेतच त्यांनी शिक्षकाची नोकरी पत्करली. काही दिवस अहमदनगर येथे वृत्तवैभव छापखान्यात नकलनवीसाचे काम केले.

त्यांचे धाकटे बंधू रा. वेणीमाधव बडोदे येथील सरदार श्रीमंत घोरपडे ह्यांजकडे खाजगी कारभारी असल्याने ते त्यांच्या समवेत मातुःश्रीसह राहत असत. *श्रीगुरुलीलामृत* ग्रंथाचे लेखन त्यांनी बडोदे मुक्कामीच केले. पण ग्रंथ मात्र त्यांच्या ह्यातीत प्रसिद्ध होऊ शकला नाही. श्री अक्कलकोटकर स्वामी ह्यांचे चरित्र ग्रथित करणारा ५५ अध्यायांचा व सुमारे दहा हजार ओव्यांचा हा ग्रंथ आहे.

ग्रंथाची पहिली आवृत्ती बडोद्यातील जुन्या पिढीतले लेखक श्री. वि. स. लिमगावकर ह्यांनी संशोधिली असून ती १९०४ मध्ये प्रसिद्ध झाली. ह्या ग्रंथास इ. स. १९१४ मध्ये द्वितीयावृत्तीचाही योग लाभला होता.

शेवटी वामनबुवा वामोरीकरांनी संन्यास ग्रहण केला; आणि ते २५ मार्च, १९०१ रोजी समाधिस्थ झाले.

रामचंद्रशास्त्री जोशी

**वैद्य, व्यंकटेश विष्णू :** (ज. २० नोव्हेंबर, १९००, कुकळी, ता. साष्टी, गोवे). नाटक, कादंबरी, चरित्र, काव्य, स्थलवर्णन इत्यादी बहुविध साहित्यप्रकार हाताळणारे लेखक. मराठी व पोर्तुगीज प्राथमिक शिक्षण संपताच वडिलार्जित व्यापारधंद्यात प्रवेश. वयाच्या एकविसाव्या वर्षी लेखनाला प्रारंभ. तेव्हापासून प्रामुख्याने गोमंतकातील नियतकालिकांतून विविध स्वरूपाचे लेखन. १९२९ ते १९३१ या तीन वर्षांत त्यांची छोटी-मोठी नऊ पुस्तके प्रसिद्ध झाली. त्यांत नाटक, कादंबरी, चरित्र, काव्य, स्थलवर्णन वगैरे प्रकारांचा समावेश आहे. लेखन पारंपरिक पद्धतीचे व देशाभिमानाच्या प्रेरणेतून निर्माण झाले आहे. *स्वातंत्र्यवीर* या पुस्तकात प्रामुख्याने शिखांच्या इतिहासातील देशभक्तांची चरित्रे आढळतात. *संगीत स्वार्थत्याग* हे नाटक, *गोमंतक-विजय* ही छत्रपती संभाजीच्या काळावरील साहित्यकृती, *अविचाराचा परिणाम* ही कादंबरी, आणि *कुलदेवी श्री म्हाळसाचा इतिहास* या त्यांच्या साहित्यकृती उल्लेखनीय आहेत.

वसंत वऱ्हाडपांडे

**वैद्य, श्रीपाद महादेव ऊर्फ भाऊराव :** (ज. ८ मे, १८१०, इस्लामपूर – मृ. ८ नोव्हेंबर, १९४५, मुंबई). पारमार्थिक ग्रंथांचे लेखक. पिढीजाद वैद्यकीय व्यवसाय. यांनी *साधुसंतांचा देवयानपंथ-साक्षात्कारयोग* (१९३२), *श्रीदत्तमहाराज चरित्र* (१९३५), *षट्चक्रदर्शन व भेदन* (१९३७), व *प्रणवोपासना* (१९६२) हे चार ग्रंथ लिहिले.

*प्रणवोपासना* या ग्रंथात उपासनेची जननी अहंकारोपासना याचे साधार विवेचन असून *देवयानपंथ* या ग्रंथात साक्षात्कार व तो प्राप्त करण्याचे मार्ग याचे विवेचन आहे.

*श्रीदत्तमहाराज चरित्र* हा महाराजांचे कार्य व शिकवण यासंबंधीचा व *षट्चक्रदर्शन* हा योगशास्त्रातील षट्चक्रे व शरीरशास्त्र यांचे तुलनात्मक विवरण करणारा ग्रंथ होय.

गं. दे. खानोलकर, शकुंतला मोत

**० व्यंकटसिंग न्यहालसिंग :** पहा व्यंकटस्वामी

**० शंकर :** पहा पंदे, शंकर दाजीशास्त्री

**० शणे, गोंयबाब :** पहा वर्दे, वामन रघुनाथ

**शहा, वालचंद नानचंद :** (ज. १८८६ – मृ. १ ऑक्टोबर, १९५५, मोडनिंब, जि. सोलापूर). कादंबरीकार. माध्यमिक शिक्षण पंढरपूर येथे. मॅट्रिक (१९०५) झाल्यानंतर 'डिस्ट्रिक्ट प्लीडर'ची परीक्षा. मोडनिंब येथे तालुका कचेरीत वकिली.

यांच्या *सम्राट अशोक* (१९१४) व *छत्रसाल* (१९१५) ह्या ऐतिहासिक कादंबऱ्या विशेष प्रसिद्ध आहेत. तात्या नेमीनाथ पांगळ, वालचंद कोठारी इत्यादी साहित्यप्रेमी स्नेह्यांनी सोलापूर येथे चालविलेल्या 'सुरस ग्रंथमाले'करिता शहांनी या कादंबऱ्या लिहिल्या. त्या अनुक्रमे भारताच्या प्राचीन इतिहासातील बौद्धधर्मानुयायी सम्राट अशोक व बुंदेलखंडाचा स्वातंत्र्यप्रेमी राजा छत्रसाल ह्यांच्या जीवनाशी संबंधित आहेत. उत्कंठापूर्ण रहस्यमय कथानक, निवेदनातील चातुर्य, ऐतिहासिक वातावरण व व्यक्ती ह्यांचे उत्कृष्ट चित्रण व प्रवाही भाषाशैली ह्यामुळे ह्या कादंबऱ्या त्या काळी विलक्षण लोकप्रिय झाल्या. मराठीतील ऐतिहासिक कादंबरी सामान्यतः मराठ्यांच्या इतिहासाभोवती फिरत असताना वेगळ्या विषयावरील ह्या कादंबऱ्या उल्लेखनीय वाटतात. *अहिंसासम्राट महावीर* (१९४८) ही भगवान महावीरांच्या दिव्य जीवनावरील 'इतिहासाच्या शाईने व कल्पनेच्या कलमाने' रेखाटलेली कादंबरीही ओजस्वी कथानिवेदनामुळे मनाची पकड घेते. ऐतिहासिक वास्तवतेपेक्षा कल्पनारम्यतेकडे झुकणाऱ्या या कादंबऱ्या आहेत.

उषा टाकळकर, अ. अ. वडोदकर

**० शांताराम :** पहा मांजरेकर, शांताराम विठ्ठल

**शापूरकर, आब्राहाम सामसन :** (ज. १८६३ – मृ. ३० एप्रिल, १९२८). बेने इस्राएली लेखक. शिक्षण मिशनरी शाळेत. इंग्रजांच्या पलटणीच्या शाळेत हेडमास्तर.

ह्यांनी इंग्रजी व मराठी भाषांतून ग्रंथलेखन केले. 'इस्राएल' ह्या तत्कालीन पत्रातून धार्मिक सण व उत्सव ह्या विषयावर त्यांनी बरेच स्फुटलेखन केले. *शांती* (१८९३), *मक्काबी वीरांचे शौर्य : कीर्तन* (१८९५), *पवित्र शास्त्राची सत्यता व ईश्वर प्रणीतत्व* (१८९७), *झमोएल येहेजकेल दिवेकर यांचे चरित्र* (१९२७), *मुलांनी करण्याची प्रार्थना* (१९३३) ही पुस्तके प्रसिद्ध आहेत.

रेचल गडकर, अंजली कुलकर्णी

**० शारदाश्रमवासी :** पहा काणेकर, पुरुषोत्तम गोपाळ

**० शारदाश्रमवासी :** पहा नाडकर्णी, विठ्ठल जिवाजी

**शाहू छत्रपती (कोल्हापूरकर) :** (ज. २६ जुलै, १८७४, कोल्हापूर – मृ. ६ मे, १९२२, मुंबई). कोल्हापूर संस्थानचे अधिपती. बहुजनसमाजाच्या व दलितांच्या उत्कर्षासाठी झटणारे, प्रगतिशील विचारसरणीचे राज्यकर्ते. मूळ आडनाव घाटगे. कागलच्या सरदार घराण्यात जन्म. पुढे कोल्हापूरच्या छत्रपती घराण्यास दत्तक. दत्तक गेल्यानंतर शाहू महाराज हे नाव ठेवण्यात आले. १८९४ साली छत्रपती म्हणून अधिकारप्राप्ती.

शाहू महाराजांचे शिक्षण आरंभी कोल्हापुरात व राजकोटमधील राजकुमार महाविद्यालयात आणि नंतर मि. फ्रेजर या आय्.सी.एस्. अधिकाऱ्याजवळ धारवाड येथे झाले. १८८९ ते १८९२ या काळात केशवराव गोखले यांच्याजवळही त्यांनी शिक्षण घेतले. त्यांच्या शैक्षणिक व सांस्कृतिक क्षेत्रातील कार्याचा गौरव करण्यासाठी केंब्रिज विद्यापीठाने त्यांना एल्.एल्.डी.ची सन्मान्य पदवी दिली होती. शिकारीचा व अश्वारोहणाचा विशेष छंद. मागासवर्गीयांना शिक्षण घेता यावे यासाठी खेड्यापाड्यातील विद्यार्थ्यांच्या राहण्यासाठी त्यांनी कोल्हापुरातील वसतिगृहांची स्थापना केली. फुले – आंबेडकरांच्या कार्याला चालना दिली. सामाजिक समतेचा पुरस्कार केला. समाजातील विविध जातींच्या लोकांतील सामाजिक उच्चनीच भावनेची धार बोथट करणे आणि आपापल्या समाजाच्या उद्धारासाठी अशाच प्रकारची वसतिगृहे व शाळा काढणारे कार्यकर्ते तयार करणे हा त्यांचा या कार्यामागे उद्देश होता. स्त्रीशिक्षणासंबंधीही त्यांचे धोरण उदारतेचे होते. सरकारी नोकरीतील विशिष्ट वर्गाचे प्राबल्य कमी व्हावे यासाठी आजपर्यंत उपेक्षित राहिलेल्या जातींतील सुशिक्षित तरुणांना नोकरी देण्याचे त्यांचे धोरण होते. भारतीय कला, संगीत आणि नाटक ह्यांच्या उत्कर्षासाठीही त्यांनी बरेच कार्य केले. हिंदी शास्त्रोक्त संगीताची जपणूक व पुनरुज्जीवन करणे, आणि नवीन गायक तयार करणे ह्या उद्देशाने कोल्हापुरात १८८३ साली स्थापन झालेल्या 'गायनसमाजा'चे ते आश्रयदाते होते. भारतीय मल्लविद्येलाही त्यांनी प्रोत्साहन दिले.

शाहू छत्रपतींनी प्रत्यक्ष साहित्यनिर्मिती केली नसली तरी त्यांनी आपल्या शैक्षणिक व सांस्कृतिक कार्याने संस्थानातील नवसुशिक्षित समाजात पुरोगामी विचारांचे बीजारोपण केले. सत्यशोधक शाळेच्या स्थापनेला, तसेच 'दीनमित्र' साप्ताहिकाचे संपादक मुकुंदराव पाटील यांनी लिहिलेल्या 'कुळकर्णी लीलामृत' (१९१३) या दीर्घ काव्याच्या प्रकाशनाला त्यांनी प्रोत्साहन दिले. महाराष्ट्रातील, विशेषतः कोल्हापुरातील जनतेत त्यांच्या प्रेरणेने जे प्रगतिवादी विचारांचे वारे वाहू लागले, त्याचा प्रभाव तत्कालीन वाङ्मयीन वातावरणावरही पडला. *राजर्षी श्रीशाहूमहाराजांची भाषणे* भाग – १ व २ (संपादक : म. बा. जाधव) या ग्रंथातून त्यांच्या या पुरोगामी विचारसरणीचे दर्शन घडते. अखिल भारतीय अस्पृश्यतानिवारण परिषदेचे ते अध्यक्ष (१९१८) होते.

रा. बा. बक्षी

संदर्भ : कीर, धनंजय, 'राजर्षी शाहू छत्रपती', १९७९, डॉ. य. दि. फडके.

**शिंगणे, मोरो विनायक :** (ज. १० मे, १८५९ – मृ. २२ ऑगस्ट, १९२१, मुंबई). नाटककार व विविध विषयांवरील लेखक. वास्तव्य मुंबई. *सुलभ प्रसूति अर्थात गर्भ-विमोचना संबंधी माहिती* (१८९१), *वित्तैषणा: अर्थशास्त्रीय निबंध* (१९०६), *विवाह : निबंध* (१९१९) ही शिंगण्यांच्या निबंधांची पुस्तके. नव शिक्षितांना व्यवहारोपयोगी ज्ञान देण्याच्या हेतूने शिंगण्यांनी या निबंधांची निर्मिती केली. शेरिडनच्या इंग्रजी प्रहसनावरून रूपांतरित *यशवंत-विजया* नाटिका (१८८७). शुद्ध मनोरंजनाच्या भूमिकेतून लिहिलेली आहे.

*कन्याविक्रय दुष्परिणाम नाटक* (१८९५), *माझे प्रिय पुस्तक अथवा व्यवहारदर्पण* (१९९३), *मुंबईचा वृत्तांत* (१८८९) इत्यादी पुस्तके लिहिण्यास बाळकृष्ण बापू आचार्य या लेखकाला शिंगण्यांनी मोलाचे लेखन सहाय्य केले आहे.

उषा टाकळकर, ज. पु. नाईकवाडे

**शिंदे, ताराबाई :** (ज. १८५० – मृ. १९१०). त्यांचे वडील बापूजी हरी शिंदे हे श्रीमंत मराठा जमीनदार होते. सत्यशोधक समाजाचे ते सभासदही होते. ताराबाई मूळ बुलढाणा (विदर्भ) येथील रहिवासी. त्यांनी *स्त्री-पुरुष-तुलना* (१८८२) हा ग्रंथ लिहिला. स्वतः म. फुले यांनी त्यांच्या या पुस्तकाचे 'शिस्तवार मार्मिक लेखन' म्हणून कौतुक

केले होते. (सत्सार–अंक २. पृ. ३७४) *स्त्री-पुरुष-तुलना* हे एकमेव छोटे पुस्तक त्यांच्या नावावर आहे. पण पुरोगामी विचारांच्या दृष्टीने त्याचे अनन्य साधारण असे महत्त्व आहे. त्यांच्या लिखाणातून रोखठोक स्वरूपाची व समाजाभिमुख दृष्टी आढळते.

आपल्या या पुस्तकातून त्यांनी धर्म, रूढी, परंपरा या नावाखाली पुरुषप्रधान व्यवस्थेने स्त्रियांवर जी बंधने लादली व स्त्रियांचे जे शोषण केले, त्यावर त्या हल्ला चढवताना दिसतात. त्यांच्या लेखनातील महत्त्वाचा सूत्ररूप मुद्दा म्हणजे 'स्त्री-पुरुष निसर्गतःच समान आहेत'. एका ब्राम्हणेतर समाजातील मराठी स्त्रीने १०० वर्षांपूर्वी तर्कशुद्ध मांडणी करून स्त्रियांचा कैवार घ्यावा, हे ऐतिहासिक दृष्ट्याविशेष लक्षणीय वाटते.

ताराबाईंचे हे पुस्तक *स्त्री-पुरुष-तुलना* (१८८२) पुण्यातील प्रार्थना समाजाच्या 'श्री शिवाजी छापखान्यात' छापले गेले होते. यावरून ताराबाईंचा म. फुलेंच्या सत्यशोधक चळवळीशी, सुधारकांशी वैचारिकदृष्ट्या संबंध आला असावा असेही वाटते.

लता जाधव

**शिंदे, दिनकर नानाजी :** ० इंदुकान्त : (ज. १८८२ – मृ. १७ ऑक्टोबर, १९१३). कवी. १९०९ पासून 'काव्यरत्नावली'च्या कविमंडळात समावेश. ह्यांच्या सुमारे ३०० कविता 'काव्यरत्नावली'तून प्रसिद्ध झाल्या. त्यांपैकी 'विधुरविलाप' (७५; वर्ष २०, अंक ८) आणि 'वायुलता अथवा व्हायोलेट' (९७; वर्ष २३; अंक ९) ह्या अनुक्रमे दिंडी व साकी वृत्तांतील दीर्घ कविता विशेष उल्लेखनीय आहेत. 'वायुलता' हे एक निसर्गकाव्य असून त्यात विश्वातील सत्य-शिव-सुंदराचा वायुलता कुसुमाच्या रूपाने कवीला जो साक्षात्कार झाला होता त्याचे सुरेख भावचित्र आढळते.

उषा टाकळकर, प्रभा पुरोहित

**शिंदे, (जनरल) नानासाहेब गणपतराव :** (ज. ३ मार्च, १८७५, पेडावे, ता. चिपळूण – मृ. १६ जून, १९५२). कवि. वास्तव्य बडोदा येथे. बडोदा लष्करातून जनरल म्हणून निवृत्त. यामुळे यांचा निर्देश करताना 'जनरल शिंदे' असा केला जातो. १९३४ साली बडोदा येथे भरलेल्या मराठी साहित्य संमेलनाचे स्वागताध्यक्ष. लष्करतज्ञ या विषयावर मराठीत लेखन करणाऱ्यांमध्ये अग्रगण्य.

*शिस्त* (१९१८) हे सयाजीराव महाराज गायकवाड यांच्या सूचनेवरून लिहिलेले पुस्तक. त्याचप्रमाणे *हिंदुस्थानच्या लष्करी इतिहास आणि दोस्त राष्ट्रांच्या फौजा* (१९१९), *सुविचार रत्नमाला* (पद्य) (१९२०), *फौज खात्याचे नियम* भाग १ व भाग २ (१९२६), *मराठ्यांच्या प्रसिद्ध लढाया* (१९२२) हे लष्करी विषयावरील दोन ग्रंथ, ही यांची साहित्य निर्मिती. हिंदुस्थानच्या लष्करी इतिहासाविषयी लिहिताना पूर्वार्धात वैदिक कालापासून मुसलमान, मराठे, शीख, इंग्रज व संस्थानिक ह्यांच्या आणि उत्तरार्धात इंग्रज, फ्रेंच, इटालियन, रशियन, जर्मन इत्यादी युरोपियन राष्ट्रांच्या फौजांची माहिती दिली आहे.

खालील स्वरूपाचे आणखी काही महत्त्वाचे लेखन जनरल नानासाहेब शिंदे यांनी केले आहे : (१) *एका शिपायाचे आत्मवृत्त* (१९३५). (२) *जनरल शिंदे यांचा लेखसंग्रह* भाग – १ (१९३५). भाग – २ (१९३७), भाग – ३ (१९४३). (३) *मी युरोपात काय पाहिले?* (१९३९). (४) *दसपटीचे शिंदे, मोकाशी* इनामदार यांचा इतिहास (१९४०). (५) *एका शिपायाचे आत्मवृत्त* भाग – २ (१९४६).

शिंदे यांनी लष्कराला उपयुक्त ठरणारे हिंदी व इंग्रजी भाषेतही काही लेखन केले आहे.

हे बडोद्याच्या महाराष्ट्र समाज या संस्थेचे अध्यक्ष होते. अखिल महाराष्ट्र शारीरिक शिक्षण परिषदेचे (अधिवेशन नववे) ते अध्यक्ष होते.

दि. वि. गोखले, रा. बा. बक्षी

**शिंदे, (महर्षी) विठ्ठल रामजी :** (ज. २३ एप्रिल, १८७३ – मृ. २ जानेवारी, १९४४). समाजसुधारक, अस्पृश्यता निवारणाचे पुरस्कर्ते, सामाजिक समतावादी राजकारणी, निरनिराळ्या धर्मांतील तत्त्वांचे व तदनुषंगिक ऐतिहासिक, भाषिक, समाजशास्त्रीय विषयांचे संशोधक आणि ध्येयवादी विद्वान, भक्तिमार्गी ज्ञानयोगी म्हणून प्रसिद्ध. कर्नाटकातील जमखंडी येथे जन्म. कानडी व मराठी संस्कृतीच्या संमिश्र वातावरणात त्यांचे बालपण गेले. १८९२ साली मॅट्रिक. १८९८ साली बी.ए. झाले (पुणे). त्याच वर्षी ब्राह्म समाजाचे भावंड असलेल्या प्रार्थना समाजाची त्यांनी दीक्षा घेतली. ब्राह्मधर्म प्रसाराचे कार्य करण्यासाठी प्रचारक म्हणून त्यांची तयारी व्हावी यासाठी, कलकत्ता येथील ब्राह्मसमाजाने त्यांची १९०१ साली ऑक्सफर्ड येथील मँचेस्टर कॉलेजमध्ये, धर्म शिक्षणासाठी निवड करून इंग्लंडला पाठविले. तेथे दोन वर्षांच्या वास्तव्यात त्यांनी जगातील अनेक धर्मांचा खोल व तौलनिक अभ्यास केला. युरोपातील अनेक देशांना त्यांनी भेटी दिल्या. इंग्लंडहून परत येताना, ॲमस्टरडॅम येथील धर्मपरिषदेमध्ये त्यांनी 'हिंदुस्थानातील उदारधर्म', हा प्रबंध वाचला.

त्यांनी १९०३ मध्ये मुंबई प्रार्थना समाजाचे धर्म प्रचारक म्हणून जीवितकार्याला प्रारंभ केला. १८ ऑक्टोबर, १९०६ रोजी मुंबई येथे 'भारतीय निराश्रित साहाय्यकारी मंडळी'ची (डिप्रेस्ड क्लासेस मिशन सोसायटी ऑफ इंडिया) त्यांनी स्थापन केली. त्यामध्ये अस्पृश्यांच्या मुलांसाठी शाळा काढणे, त्यांच्यासाठी वसतिगृहे उघडणे, अस्पृश्यवस्तीत शिवणकामाचे वर्ग चालविणे, त्यांच्या प्रबोधनासाठी व्याख्याने, कीर्तने आयोजित करणे इ. गोष्टींचा समावेश होता. या सर्व गोष्टी त्यांनी कृतीत आणल्या. १९१७ मध्ये डॉ. अनिबेझंट यांच्या अध्यक्षतेखाली भरलेल्या राष्ट्रीय काँग्रेसच्या अधिवेशनात, 'काँग्रेसने यापुढे हरिजनोद्धाराचे सामाजिक सुधारणेचे कार्य हाती घ्यावयाचे आहे', हा ठराव विठ्ठल रामजी शिंदे यांच्या प्रेरणेमुळे करण्यात आला. १९२० मध्ये 'बहुजन पक्ष' स्थापन करून त्यांनी मुंबई कायदे कौन्सिलच्या निवडणुकीतही भाग घेतला. १९२३ पासून कलकत्ता येथील ब्राह्म समाजाचे निष्ठवंत प्रचारक म्हणून त्यांनी कार्य केले. १९२६ मध्ये त्यांनी पुण्यात 'कौटुंबिक उपासना मंडळा'ची स्थापना केली. महात्मा गांधींनी प्रवर्तित केलेल्या 'कायदेभंगा'च्या चळवळीतही त्यांनी १९२८ च्या सुमारास भाग घेऊन, खेडोपाडी दौरे काढले. शेतकऱ्यांमध्ये जागृती करण्याचा प्रयत्न केला. यासाठी १९३० साली त्यांना सहा महिन्यांचा कारावासही भोगावा लागला. अस्पृश्यता निवारणाच्या कार्यानिमित्त वाई येथे आले असताना, ४ एप्रिल, १९३३ रोजी त्यांनी वाईत 'प्रार्थना मंदिर' स्थापन केले. पुढे २७ मे, १९३७ रोजी त्यांनी वाईमध्ये ब्राह्म समाजाचीही स्थापना केली.

अस्पृश्यता निवारणाचे कार्य त्यांनी धर्माचे कार्य म्हणून मनोमन पत्करले होते व ते आयुष्याच्या अखेरपर्यंत लेखन, व्याख्याने, संशोधन, शिक्षण, राजकारण, संस्थात्मक उभारणी इ. मार्गांनी करीत राहिले. 'आधी केले मग सांगितले', ही त्यांची कार्यपद्धती असल्यामुळे सन १९०६ ते १९२६ पर्यंत लोक त्यांना 'कर्मवीर' या उपाधीने गौरवित. प्रार्थना समाज व ब्राह्मसमाजाचा अवघड व दुर्घट प्रचार ऋषितुल्या वृत्तीने पत्करला असल्यामुळे, लोक त्यांना 'महर्षी' म्हणू लागले. याच सुमारास 'ज्ञान प्रकाश' इत्यादी वृत्तपत्रातून त्यांचा 'महर्षी' म्हणून उल्लेख होऊ लागला.

आपल्या ध्येयाच्या पूर्ततेसाठी त्यांनी खूप चिंतन, मनन आणि लेखन व संशोधन केले. त्यास त्यांनी ग्रांथिक रूप दिले. इतरांनीही त्यांच्या लेखनास ग्रंथरूपाने समाजापुढे आणले आहे. त्यातून (१) *विठ्ठल रामजी शिंदे यांचे लेख, व्याख्याने व उपदेश* (१९१२), (२) *भारतीय अस्पृश्यतेचा प्रश्न* (१९३३), (३) *मराठ मोळा*

मराठा कवी व कवयित्री यांच्या कवितांचा संपादित संग्रह (१९३९), (४) *माझ्या आठवणी व अनुभव* पूर्वार्ध (१९४०), (५) *माझ्या आठवणी व अनुभव* भाग–२ (१९४४), (६) *माझ्या आठवणी व अनुभव* भाग–१, २ व ३ (पुनर्मुद्रण, १९५८), (७) *शिंदे लेखसंग्रह*, हा मा. प. मंगुडकर संपादित ग्रंथ (१९६३), (८) *महर्षी विठ्ठल रामजी शिंदे यांची रोजनिशी* (१९७९) ही डॉ. गो. मा. पवार यांनी संपादित केली आहे. ही ग्रंथ संपदा संपन्न झाली आहे. अध्यात्म, भाषाशास्त्र, समाजशास्त्र, तत्त्वज्ञान, इतिहास संशोधन, सामाजिक सुधारणा इ. बाबतही त्यांनी संशोधनपर लेखन केलेले आहे. त्यांच्या या वाङ्मयीन कार्याचीही पावती त्यांना १९३५ मधील बडोदे येथील मराठी साहित्य संमेलनातील 'तत्त्वज्ञान व समाजशास्त्र' या शाखा संमेलनाच्या अध्यक्ष पदाने मिळाली.

शिवाजीराव चव्हाण, कमलेश

संदर्भ : 'महर्षी विठ्ठल रामजी शिंदे : शोध व बोध', (दलित मित्र रा. ना. चव्हाण यांच्या लेखांचा संग्रह) संपादिका, सौ. वैशाली चव्हाण (२००१).

**शिरगोपीकर, गोविंद रामचंद्र :** (ज. १८८५, कवठे-गुलंद, जि. कोल्हापूर – मृ. १९५६). नाटककार. 'आनंद संगीत मंडळी' या नाट्यसंस्थेचे संस्थापक व चालक.

बोलपटाच्या आक्रमणामुळे मराठी नाट्यव्यवसायाला आलेली ओहोटी थांबवून प्रेक्षकांना पुन्हा नाटकांकडे वळविण्याचे यशस्वी प्रयत्न करणारे एक नाटककार म्हणून, नानासाहेब शिरगोपीकर प्रसिद्ध आहेत. १९२३ साली लहान मुलांची 'आनंद संगीत मंडळी' काढून *रासक्रीडा*, *संगीत बालक्रीडा* (१९२६), *गोकुळचा चोर* (१९३३), *बाल शिवाजी* (१९४२), *गोव्याचा राणा* (१९५४) यांसारखी नाटके लिहून त्यांनी रंगभूमीवर आणली. अश्रयावत् सामुग्री व चमत्कृतिजनक नेपथ्य, या वैशिष्ट्यांप्रमाणेच सरकते पडदे, ट्रिक सीन्स, ट्रान्स्फर सीन्स, रेकॉर्डिंग इत्यादी गोष्टींचा वापर करून बहुजनसमाजाला त्यांनी नाटकांकडे आकर्षित केले. *गोकुळचा चोर* या नाटकाचे तर तीन हजार प्रयोग झाले. *सिंहाचा छावा* (५०० प्रयोग), *वत्सला-हरण* (५०० प्रयोग), *सोन्याची द्वारका* (२०० प्रयोग) ही त्यांच्या नाट्यसंस्थेची अन्य यशस्वी नाटके. नाटकाला चित्रपटाच्या आकर्षणास तोंड देता यावे म्हणून नाटकास मधूनमधून चित्रपटाचे तुकडे जोडण्याची युक्ती शिरगोपीकरांनी यशस्वीपणे वापरली.

शुभदा सबनीस, ज. धु. नाईकवाडे

**शिरवळकर, वासुदेव रंगनाथ :** (ज. १८६५, शिरवळ, जि. पुणे – मृ. १९२२). नाटककार. शिक्षण पुणे येथील भावे स्कूलमध्ये व नंतर तेथेच शिक्षक.

शिरवळकरांनी सुप्रसिद्ध नट गणपतराव जोशी ह्यांच्या 'शाहू नगरवासी नाटक मंडळी'साठी नाटके लिहिली. त्यांची नाटके ऐतिहासिक, व्याज-ऐतिहासिक व संतचरित्रपर अशी आहेत. *राणा भीमदेव* (१८९२) हे त्यांचे अतिशय गाजलेले नाटक. शेरिडनच्या 'पिझारो'वरून विनायक त्रिंबक मोडक ह्यांच्या साह्याने ते रूपांतरित केले आहे. *अस्मानी सुलतानी अथवा पानपतचा मुकाबला* (१८९५), *श्री तुकाराम* (१९०१), *श्री एकनाथ* (१९०३), *श्री नामदेव* (१९०४), *पद्मारत्न अथवा दिव्य राजनिष्ठा* (१९१३) ही त्यांची स्वतंत्र नाटके.

त्यांच्या लेखनावर तत्कालीन उर्दू व पारशी नाटकांचा प्रभाव पडल्याचे दिसते. पात्रे व प्रसंग ह्यांची रेलचेल आणि योगायोग, पात्रांचा कुठेही व केव्हाही होणारा मुक्तसंचार, वेषांतर इत्यादींबरोबरच आवेशपूर्ण संवादशैली आणि रसनिर्मितीसाठी केलेला भडक व कृत्रिम अशा उपायांचा अवलंब ही त्यांच्या नाट्यरचनेची वैशिष्ट्ये आहेत. शिरवळकरांच्या *राणा भीमदेव* ह्या नाटकातील पल्लेदार व वक्तृत्वपूर्ण भाषेमुळेच मराठी रंगभूमीवर 'राणा भीमदेवी थाटाची भाषणे', हा शब्दप्रयोग रूढ झाला. राष्ट्रीय भावना व धार्मिक श्रद्धा यांना आवाहन करणारी *राणा भीमदेव* व *श्री तुकाराम* ही शिरवळकरांची नाटके त्या काळात अत्यंत लोकप्रिय ठरली होती.

अरविंद वामन कुळकर्णी, ज. धु. नाईकवाडे

**शेषाद्री, नारायण (डॉ.) :** (ज. १८२४ – मृ. २१ जुलै, १८८१). शेषाद्रींचे घराणे मूळचे निजामाच्या राज्यातील गंगाखेड गावचे. नारायणरावांचे वडील त्या संस्थानातील एक इनामदार होते आणि गंगाखेडजवळ त्यांनी एक मठ स्थापन केला होता.

नारायणरावांनी १८३३ मध्ये आपले गाव सोडले व पुण्यास 'फ्री चर्च इन्स्टिट्यूशन' नामक शाळेत इंग्रजी शिक्षणास प्रारंभ केला. पुण्यातला अभ्यासक्रम पुरा करून नारायणराव मुंबईला गेले व डॉ. जॉन विल्सन यांच्या शाळेत दाखल झाले. येथील शिक्षणक्रम पुरा करून त्यांनी धर्मांतर केले; व १८४३ मध्ये ते ख्रिस्ती झाले. पुढे ईश्वरविज्ञानविषयक शिक्षण घेतल्यावर त्यांनी १८५१ मध्ये प्रचारक म्हणून सनद मिळवली. येथून पुढे त्यांनी ख्रिस्त संदेशाचा प्रचार करण्याचे व्रत घेतले. मुंबईतल्या रस्त्यांवरही ते प्रवचने देत.

मार्च, १८५९ पासून नारायणरावांनी *प्रभोदय* या नांवाचे मासिक सुरू केले होते. याचा उद्देश 'ईश्वराचे नाव व उपयुक्त विद्या' प्रसृत करणे हा होता. यातून इंग्रजी व मराठी या दोन्ही भाषांतून लेख येत. हे जेमतेम चार वर्षे चालले असावे. कारण याचे जानेवारी, १८६३ पर्यंतचे अंक उपलब्ध आहेत.

पुढे १८६२ च्या मे महिन्यात नारायणराव शेषाद्री इंद्रापूरला गेले व तेथे त्यांनी मिशन ठाणे उघडले. त्याच्या पुढल्या वर्षी ते जालना येथे गेले; व तेथून तीन मैलांवर त्यांनी 'बेथेल' नावाची ख्रिस्ती वसाहत उभी केली. यासाठी ते विलायतला गेले होते व तेथे त्यांनी निधी जमा केला. १८८० मध्ये ते फिरून स्कॉटलंडला व अमेरिकेस जाऊन आले. १८९१ मध्ये तिसऱ्यांदा अमेरिकेस गेले. तेथून ते स्कॉटलंडला माघारी यायला निघाले पण वाटेतच त्यांना मृत्यू आला.

विविध क्षेत्रांत अविश्रांत श्रम करीत असतानाच नारायणरावांनी मराठी ख्रिस्ती वाङ्मयात मोलाची भर टाकली हे विशेष होय. 'ज्ञानोदय' या नियतकालिकात त्यांनी विविध विषयांवर विचारप्रवर्तक लेख लिहिले. त्यांनी २०–२५ पुस्तके, पत्रिका वगैरे लिहिल्या आहेत. परंतु त्या आता दुर्मिळ झाल्या आहेत.

त्यांनी केलेले लेखन पुढीलप्रमाणे : (१) *ख्रिस्ती शास्त्र ईश्वरदत्त ह्याविषयी इतिहासावरून घेतलेली प्रमाणे*, मुंबई, १८५७. (२) *बाळा सुंदराबाई ठाकूर*, मुंबई, १८५६. (३) *पाप, त्याचा दोष व अनर्थ*, मुंबई, १८५७. (४) *रशियन गुलाम एरिक*, मुंबई, १८५८. (५) *जलदगति प्रवासी*, मुंबई, १८५८. संपादन : 'प्रभोदय' (मासिक) मुंबई, १८५९–६३. (६) भाषांतर—*फुलमणी आणि करुणा ह्यांचा वृत्तांत* (१८५९). तसेच त्यांनी (७) *रामनवमी* (१८५६). (८) *गणेशचतुर्थी* (१८५६). (९) *गोकुळअष्टमी* (१८५६). (१०) *प्राचीन मूर्तिपूजक धर्म व ख्रिस्ती धर्म ह्याविषयी* (१८६२); *खऱ्या धर्माची कसोटी* (१८६८) यासारख्या काही पुस्तिकाही लिहिल्या आहेत.

भास्कर जाधव

**संत, नारायण माधव :** (ज. २३ मे, १९०९, नवसारी – मृ. २३ जून, १९४६, बेळगाव). लघु-निबंधकार व कवी. शिक्षण पुणे व मुंबई येथे. बी.ए., बी.टी. संगीत, क्रिकेट व साहित्य यांची आवड. कवयित्री इंदिरा संत यांचे पती. प्रारंभी शिक्षक नंतर बेळगाव ट्रेनिंग कॉलेजचे प्राध्यापक (१९४२). तेथेच १९४६ पर्यंत प्राचार्य.

*सहचार* (१९४०) या कविता-संग्रहात त्यांच्या व इंदिराबाई संतांच्या एकत्रित कविता आहेत. संतांची कविता प्रामुख्याने प्रेमविषयक व निसर्गविषयक आहे. काव्याच्या निर्मितीप्रक्रियेवर त्यांनी सुनीत रचना केली आहे. त्यांची कविता भावपूर्ण व रसरशीत शब्दकळेने युक्त आहे.

*उघडे लिफाफे* (१९४४) हा त्यांचा एकमेव लघुनिबंधसंग्रह. प्रा. संतांनी लघुनिबंधाचे नितळ, प्रांजळ, सौंदर्यवादी स्वरूप दाखवून दिले. त्यांचा लघुनिबंध आत्मनिवेदनासाठी अवतरताना दिसतो. भावनाशालित्वाने संपन्न असलेली रसिकता हा त्यांच्या व्यक्तित्वाचा मुख्य वेधक विशेष आहे. 'एक खेदजनक विचार', 'घराचे व्यक्तिमत्त्व', 'आजारीपणाचं सुख', 'ही खट्याळ पुस्तके' इत्यादी लघुनिबंध या संदर्भात उल्लेखनीय आहेत.

आनंद यादव, सुलभा हेर्लेकर

० **सखाराम अर्जुन** : पहा राऊत, सखाराम अर्जुन

**सरदेसाई, (रियासतकार) गोविंद सखाराम** : (ज. १७ मे, १८६५, गोविल, जि. रत्नागिरी – मृ. २९ नोव्हेंबर, १९५९, कामशेत, जि. पुणे). इतिहासकार व इतिहाससंशोधक. प्राथमिक शिक्षण वरवळ व शिपोशी येथे आणि मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण रत्नागिरी येथे. पुण्यात फर्ग्युसन कॉलेजमध्ये प्रथमवर्ष पूर्ण करून ते पुढील शिक्षणासाठी मुंबईस गेले. तेथे एल्फिन्स्टन कॉलेजमधून ते इ. स. १८८८ मध्ये बी.ए. झाले. शालेय शिक्षणात त्यांना त्यांचे मामा बळवंतराव आठल्ये यांची मदत झाली.

पदवी मिळाल्यानंतर सरदेसाई यांना बापूसाहेब आठल्ये यांच्या ओळखीने, बडोदेकर संस्थानिक श्रीमंत सयाजीराव महाराज यांच्याकडे 'रीडर' म्हणून इ. स. १८८९ च्या सुरुवातीला काम मिळाले. महाराजांना वर्तमानपत्रे, पत्रे, पुस्तके इत्यादी वाचून दाखविण्याचे काम त्यांना करावे लागत असे. वर्षभरातच युवराज फत्तेसिंहराव यांना शिकविण्याचे काम त्यांच्याकडे सोपविण्यात आले. त्यासाठी ते शिकवावयाच्या विषयांची टिपणे काढीत; अशा टिपणांतूनच पुढे त्यांनी लिहिलेल्या रियासतींचा जन्म झाला. महाराजांना टापटीप, रेखीव आणि व्यवस्थित कामाची आवड होती; तीच शिस्त सरदेसाई यांच्या अंगी बाणली. 'ट्यूटर' म्हणून काढलेल्या इतिहासाची टिपणे अधिक विस्तारून इ. स. १८९८ मध्ये *मुसलमानी रियासत* या नावाने प्रसिद्ध झाली. याबरोबरच त्यांनी मॅकिव्हली यांच्या 'दि प्रिन्स' आणि प्रो. सीली यांच्या 'एक्सपान्शन ऑफ इंग्लंड' या ग्रंथांचे भाषांतर केले. हे दोन्ही ग्रंथ 'सयाजी महाराज ग्रंथमाला' या मालेतून प्रसिद्ध झाले.

सरदेसाई यांना सयाजीराव महाराजांबरोबर भारताचा तसेच इंग्लंड आणि युरोपातील देशांचा प्रवास करण्याची संधी मिळाली. अशा प्रवासामुळे सरदेसाईंना जगातील अनेक समाज लोकरीती, स्वभाव, इतिहास, परंपरा इत्यादी समजून घेण्याची अपूर्व संधी मिळाली. त्यामुळे विचारात प्रगल्भता आली. राजवाड्यातील नोकरीबरोबर त्यांनी इतिहासाचा अभ्यास व लेखन चालूच ठेवले होते. 'हिंदुस्थानचा अर्वाचीन इतिहास' या मालेतील *मुसलमानी रियासत पूर्वार्ध*, *मराठी रियासत पूर्वार्ध*, *मध्यविभाग* तसेच *ब्रिटिश रियासतीचा पूर्वार्ध* असे ग्रंथ लिहून प्रसिद्ध केले. इ. स. १९२५ मध्ये त्यांनी महाराजांच्या नोकरीतून निवृत्ती घेतली. आणि नंतरचे सर्व आयुष्य पुणे–मुंबई मार्गावरील कामशेत येथे इंद्रायणी नदीच्या काठी आपल्या निवासस्थानी इतिहासलेखनाच्या तपश्चर्येत व्यतीत केले. रियासतीचे पुढचे सर्व लेखन येथेच पूर्ण झाले. आयुष्याच्या उत्तरकालात पेशवे दप्तरातील कागदपत्र अभ्यासून व त्यांचे संपादन करून त्यांचे एकूण ४५ खंड त्यांनी प्रसिद्ध केले. इतिहासकार आणि संशोधक अशा दोन प्रवृत्तींचा संगम त्यांचे ठिकाणी आढळतो.

*हिंदुस्थानचा अर्वाचीन इतिहास*, भाग १ व २ हे त्यांनी १८९८ मध्ये प्रसिद्ध केले. यातील सर्व निवेदनात राजकीय घडामोडींना प्राधान्य असून राज्यव्यवस्था, लोकस्थिती, आनुवंशिकता, हिंदु–मुसलमानी संस्कृतीचे एकमेकांवर झालेले परिणाम, तसेच युद्धकला व स्थापत्य यांची त्रोटक चर्चा आहे. या पुस्तकाच्या चार आवृत्त्या निघाल्या. रियासतींच्या एकंदर बारा खंडांपैकी दोन मुसलमानी, दोन ब्रिटिश व आठ मराठ्यांच्या आमदानीवर आहेत. यात इसवी सनाच्या अकराव्या शतकापासून तो १८५८ पर्यंतचा कालखंड व्यापलेला आहे.

सरदेसाईंचे आणखी विशेष कार्य म्हणजे त्यांच्या मराठ्यांच्या आमदानीवरील रियासती होत. (१) *मराठी रियासत पूर्वार्ध* (शिवपूर्वकाल ते १७०७ – औरंगजेबाचा मृत्यु) (१९०२). (२) *मराठी रियासत – मध्यविभाग* (४ खंड, १७०७ ते १७७४, सवाई माधवरावांचा जन्म) (१९२० ते १९२५). (३) *मराठी रियासत – उत्तर विभाग* (३ खंड, १७७४ ते १८४८ पर्यंतचा म्हणजे सातारकर छत्रपतींचे राज्य खालसा झाले तेथपर्यंतचा काल) (१९२९-१९३२) अशी या मराठी रियासतीची विभागणी आहे.

*ब्रिटिश रियासतीचे दोन खंड – पूर्वार्ध* (१९०८) यात इ. स. ६०० ते १७५७ पर्यंतचा कालखंड असून, उत्तरार्धात (१९३९) इ.स. १७५७ ते १८५८ पर्यंतच्या कालखंडाचा इतिहास आलेला आहे.

सरदेसाई यांच्या इंग्रजी ग्रंथांपैकी *मेन करंटस् ऑफ मराठा हिस्ट्री* हा ग्रंथ म्हणजे मराठ्यांच्या इतिहासाचे सार आहे. त्याच्या दोन आवृत्त्या निघाल्या. *न्यू हिस्ट्री ऑफ दि मराठाज* (१९४८, पहिली आवृत्ती; १९६८, दुसरी आवृत्ती) ह्या ग्रंथाच्याही दोन आवृत्त्या निघाल्या. त्याचे तीन खंड असून त्यात मराठ्यांचा समग्र इतिहास दिलेला आहे. या ग्रंथांची हिंदीत भाषांतरे झालेली आहेत. 'पूना रेसिडेन्सी कॉरस्पॉण्डन्स'चे, २, ६, ७, १२ व १३ हे खंड सरदेसाई यांनी संपादिले. सर यदुनाथ सरकार यांच्याबरोबर त्यांनी हे पाच खंड संपादित केले. याशिवाय 'ऐतिहासिक पत्रबोध' व 'ऐतिहासिक घराण्यांच्या वंशावळी', सरदेसाई यांनी इतरांच्या सहकार्याने संपादिल्या. तसेच त्यांनी विद्यार्थ्यांसाठी शालोपयोगी *भारतवर्ष*, *शालोपयोगी महाराष्ट्राचा इतिहास*, *महाराष्ट्राच्या इतिहासाच्या सोप्या गोष्टी*, *हिंदुस्थानचा प्राथमिक इतिहास* इत्यादी अनेक ग्रंथ लिहिले. 'काव्येतिहास संग्रहा'तील पत्रे, यादया, 'भारतवर्ष' व 'इतिहास संग्रहा'तील महत्त्वाच्या कागदपत्रांचे संपादनही केले. परमानंदाच्या 'अनुपुराणा'चे संपादन करून त्यांनी गायकवाड ओरिएंटल सेरीजमध्ये प्रकाशित केले. त्यांचे *शककर्ता शिवाजी* (१९३५), *शहाजीराजे भोसले* (१९३५), *नानासाहेब पेशवे* (१९२६) व *राजा शिवाजी* (१९५८), *स्थिरबुद्धी राजाराम* (१९३६), *उग्रप्रकृती संभाजी* (१९३५) हे मराठ्यांच्या इतिहासातील प्रमुख व्यक्तींच्या जीवनकार्याचे विवेचन करणारे चरित्रग्रंथही या संदर्भात उल्लेखनीय आहेत.

रियासतकारांना पुढील मानसन्मान मिळाले. रावसाहेब–१९३२, रावबहादूर–१९३७, पद्मभूषण–१९५७, साडेतीन वस्त्रे (सातारा) – नोव्हेंबर, १९३४; बहुमानात्मक पदवी व सुवर्ण पदक–'इतिहास मार्तंड' – धुळे, जानेवारी, १९४६; मानपत्र – बडोदेकरांकडून मार्च, १९४७; भारतीय इतिहास परिषद – अध्यक्ष – जयपूर, १९५१; सन्माननीय डॉक्टरेट (डी.लिट्.) – पुणे विद्यापीठ, १९५१; भोरकरांकडील महावस्त्रे – १९५२.

*माझी संसार यात्रा* हे त्यांचे आत्मचरित्र, *सयाजीराव महाराजांच्या आठवणींचे पुस्तक* व आपल्या दिवंगत मुलाच्या निवडक

पत्रांचा संग्रह – *श्यामकांताची पत्रे* (१९२४) हे त्यांनी प्रसिद्ध केले आहे.

मा. कृ. आपटे, सुलभा हर्लेकर, म. भा. भागे

संदर्भ : (१) न. र. फाटक, 'मनोहर', नोव्हेंबर, १९४८. (२) ना. म. इनामदार, 'मनोहर', मे, १९६५.

**सरदेसाई, श्रीनिवास भिकाजी :** (ज. १८६१ – मृ. १८ जून, १९४२). कादंबरीलेखक व पत्रकार. पुण्यास 'फॉरिस्ट्री' कोर्स पूर्ण केल्यानंतर जंगलखात्यात नोकरी. काही काळ 'पुणेवैभव' साप्ताहिकाचे संपादक. शिक्षक, प्राध्यापक इत्यादी नोकऱ्या केल्यानंतर व्यापारी पत्रकारितेचा स्वतंत्र व्यवसाय.

सरदेसाई हे 'नाट्यकथार्णव' मासिक व 'राष्ट्रमत' साप्ताहिक ह्यांचे संपादक होते. भाषांतरित कादंबऱ्यांच्या प्रकाशनासाठी *कादंबरी कलाप* (१८८४–८७) नावाचे मासिक काढले. त्याचे सरदेसाई व गो. ब. देवल (नाटककार) हे दोन वर्षे संपादक होते. ह्या मासिकासाठी त्यांनी देवलांच्या सहकार्याने रेनॉल्डस्‌च्या 'मिस्ट्रीज ऑफ लंडन' वरून *लंडन-रहस्य* (पूर्वार्ध, १८९४) ही कादंबरी लिहिली. ह्या दोन्ही कादंबऱ्या पुस्तकरूपाने स्वतंत्रपणे प्रसिद्ध झाल्या आहेत. *लंडन-रहस्य* ही कादंबरी पूर्वार्ध उत्तरार्ध मिळून १,७५० पृष्ठांची आहे.

*लंडन-रहस्य* या कादंबरीत लंडन शहरातील दुर्गुण-दुराचारी व सद्‌गुण-सदाचारी अशी जी भिन्न चित्रे आहेत त्यांचे दर्शन घडवून, सद्‌गुणाचाच जय झालेला दाखविला आहे, तो कादंबरीच्या वाचनाने काही चांगला बोध मनावर ठसविला जावा या हेतूने. *कुवलयपूरची राणी कुमुद्वती* ही कादंबरीही आधारित असून मध्ययुगीन काळातील काल्पनिक कथानक त्यात चित्रित केले आहे. भाषाभिशुद्धी व अभिरुचि-पोषण ह्या दृष्टीने त्या काळाच्या संदर्भात हे कादंबरीलेखन महत्त्वाचे आहे. *पाणी : गुणधर्म* (१८९२) हे एक विद्यार्थ्यांना उपयुक्त असे पुस्तकही सरदेसाईंनी लिहिले आहे.

उषा टाकळकर, सुलभा हर्लेकर

**सरवटे, विष्णू सोमनाथ :** (ज. १८३८, धुरंवाड, ता. चिपळूण, जि. रत्नागिरी–मृ. १९००). कवी. शिक्षणासाठी कोकण सोडून पुण्यास आगमन. शिक्षण नॉर्मलस्कूलपर्यंत. १८७३ ते १८९२ पर्यंत इंदूर संस्थानात नोकरी. एज्युकेशनल इन्स्पेक्टर पदावरून निवृत्त. या काळात प्राथमिक शिक्षणास उपयुक्त अशी *वर्णबोध* व *बोधसुधा* ही पुस्तके त्यांनी लिहिली.

त्यांनी १८६३ पासून १८८६ पर्यंतच्या काळात लिहिलेल्या कवि-तांचा *वाग्विहार* (१८८७) हा संग्रह प्रसिद्ध आहे. यात प्रेमविषयक, ईश्वरविषयक, वात्सल्यपर, वर्णनात्मक, ऐतिहासिक, स्वदेशविषयक व 'प्रेमालाप' ह्या स्वतंत्र शीर्षकाखाली दिलेली प्रेमविषयक कविता, अशी बहुविध स्वरूपाची कविता आहे. अन्योक्ती, दृष्टांतावली, स्फुटे व काही स्वतंत्र सदरेही आढळतात.

सरवटे ह्यांच्या कवितांत वृत्तवैचित्र्य आहे. काही कवितांना राग-रागिण्यांच्या चाली दिल्या आहेत. काही कवितांच्या वर्णनांचा थाट शाहिरी वळणाचा आहे.

उषा टाकळकर, सुलभा हर्लेकर

० **सवाई नाटकी :** पहा गडकरी, राम गणेश

० **सहकारी कृष्ण :** पहा एकबोटे, कृष्णाजी अनंत

**सहस्रबुद्धे, इंदिरा गंगाधर :** (ज. १ जून, १८९४, पुणे – मृ. १२ जून, १९५९, मुंबई). कादंबरीकार. पूर्वाश्रमीच्या मराठे. शालेय शिक्षण पुणे येथे. मॅट्रिक. बृहन्मुंबईतील वांद्रे नगरपालिकेच्या प्राथमिक विभागाच्या इंग्रजी शाळेत शिक्षिका व मुख्याध्यापिका. प्रारंभी 'मासिक मनोरंजन', 'नवयुग', 'उद्यान' या नियतकालिकां-मधून ललित व वैचारिक स्वरूपाचे लेखन केले. पती गंगाधर नीळकंठ सहस्रबुद्धे यांच्या समाजसेवेत निष्ठापूर्ण सहभाग. डॉ. आंबेडकरांसोबत महाडच्या चवदार तळ्याच्या व नंतर काळाराम मंदिराच्या प्रवेश सत्याग्रहात सहभाग.

स्त्रियांच्या प्रश्नांचा पुरस्कार करणाऱ्या तीन कादंबऱ्या त्यांनी लिहिल्या. *गोदावरी* ('मधुमीनाक्षी' या तामिळ कादंबरीचे रूपांतर, १९१७), *केवळ ध्येयासाठी* (ग्रँट ॲलन यांच्या 'दी वूमन हू डिड्' या कादंबरीचे रूपांतर, १९२४), आणि *बाळूताई! धडा घे* (१९३१) ही स्वतंत्र कादंबरी.

*बाळूताई! धडा घे* या कादंबरीतून त्यांनी कोणत्याच प्रकारचे हक्क नसल्यामुळे आपल्या समाजातील विवाहित स्त्रियांच्या वाट्यास येणाऱ्या असहाय्यतेची जाणीव करून दिली असून, मानवी जीवनात सौख्याच्या दृष्टीने लग्न हे आवश्यक व महत्त्वाचे मानून, स्त्रिलाही पुरुषाप्रमाणे विचार, विकार, भावना आहेत; तिला स्वतंत्र व्यक्तिमत्त्व आहे; स्त्रीचे स्वातंत्र्य तिला प्राप्त झाले पाहिजे; अशा प्रकारचा विचार मांडला आहे.

मं. भा. नाडकर्णी, सुलभा हर्लेकर

**सहस्रबुद्धे, बळवंत रामचंद्र :** (ज. १८४८ – मृ. ५ सप्टेंबर, १९०७). शास्त्रीय ग्रंथांचे भाषांतरकार. मराठीतून शास्त्रविषयाचा अभ्यास करता यावा म्हणून एच्. एफ्. ब्लॅनफर्ड ह्यांच्या 'फिजिकल जॉग्राफी' या ग्रंथावरून *भूतलविद्येची मूलतत्त्वे* (१८९१) हा भाषांतरित ग्रंथ तयार केला. त्याला 'दक्षिण प्राइझ कमिटी'चा पुरस्कार मिळाला. ग्रंथाचे शेवटी परिभाषाकोश जोडला आहे. भारतातील संगीतकलेची प्राचीन परंपरा व तिचा विकास ह्यांचा आढावा घेणारे *आमचे संगीत शास्त्र* (१८९३) हे त्यांचे छोटे पुस्तकही प्रसिद्ध आहे.

उषा टाकळकर, सुलभा हर्लेकर

**सहस्रबुद्धे, वासुदेव गणेश :** (ज. १८५४ - मृ. १९०२). भाषांतर-कार. वास्तव्य मुंबई. ह्यांचे *शिक्षणमीमांसा* (१८८९) व *नीति-शास्त्राची मूलतत्त्वे* (१८९५) ही दोन पुस्तके प्रसिद्ध असून, ती अनुक्रमे हर्बर्ट स्पेन्सर ह्यांच्या 'एज्युकेशन' व चार्लस ब्रे ह्या विदुषीच्या 'एलिमेंट्स् ऑफ मोरॅलिटी' ह्या इंग्रजी ग्रंथांची भाषांतरे आहेत. पहिल्या ग्रंथात स्पेन्सरने शिक्षण ह्या विषयाचा सर्वांगीण व व्यापक दृष्टिकोणातून केलेला विचार केला असून, भाषांतर-काराने आवश्यक तेथे योग्य तो फेरबदल केला आहे. 'दक्षिणा प्राइझ कमिटी'ने या ग्रंथाला बक्षीस दिले होते. देशकालपरिस्थिती विचारात घेऊन समाजाला उपयुक्त होतील या हेतूने ही भाषांतरे लेखकाने केली आहेत.

उषा टाकळकर, सुलभा हर्लेकर

० **स्वामी सच्चिदानंद :** पहा जोशी, महादेव मल्हार

**साखरे (जोशी), नारायण ऊर्फ नानामहाराज :** (ज. १८२८– मृ. १६ सप्टेंबर, १९०३). ज्ञानेश्वरीचे अभ्यासक व साक्षात्कारी संत म्हणून प्रसिद्ध. नानामहाराजांनी आपले सारे आयुष्य ज्ञानेश्वरीच्या अध्ययन-अध्यापनात व्यतीत केले. साखरेबाबांच्या (रामचंद्र जोशी) शिष्यपरंपरेमुळे नानामहाराजांनाही साखरेबुवा असे संबोधले जाऊ लागले. १८९९ साली 'ज्ञानेश्वर एक नसून दोन आहेत' या श्री. भारदे यांनी उपस्थित केलेल्या वादाचे खंडन करणारी लेखमाला नाना-महाराजांनी लिहिली व ती लो. टिळकांनी 'केसरी'तून प्रसिद्ध केली.

नानामहाराजांनी स्वतः ग्रंथलेखन केले नाही. त्यांचे चिरंजीव विनायक महाराज यांनी नानामहाराजकृत ज्ञानेश्वरीचा अर्थ लिहून घेतला व सन १९०५ मध्ये 'सार्थ ज्ञानेश्वरी'ची प्रत प्रसिद्ध केली. एकनाथ सांप्रदायिकांत ती लोकप्रिय असून अभ्यासकांनाही उपयुक्त आहे.

नानामहाराज साखरे यांच्या संग्रही असलेल्या अभंगांच्या वह्यांवर योग्य ते संस्कार करून, पुण्याचे आवटे यांनी 'गाथापंचक' हा ग्रंथ १९०८ साली प्रसिद्ध केला.

भा. पं. बहिरट, मदन कुलकर्णी

**साखरे, विनायक नारायण ऊर्फ दादामहाराज :** (ज. १८६७ – मृ. जून, १९४०, आळंदी). ज्ञानेश्वर वाङ्मयाचे प्रसिद्ध अभ्यासक, श्री. नानामहाराज साखरे याचे चिरंजीव. ह्यांचा ज्ञानेश्वर वाङ्मयाचा अभ्यास वडिलांच्या मार्गदर्शनाखाली झाला. आत्मानुभवी विद्वान स्वप्रकाशानंद, दक्षिणामूर्ती व द्रविडशास्त्री यांच्या मार्गदर्शनाखाली त्यांनी प्राचीन संस्कृत साहित्याचा अभ्यास केला.

*ज्ञानेश्वरविरचित अमृतानुभव* (१९०७), *सार्थ चांगदेवपासष्टी* (१९१५), *श्री ज्ञानेश्वर महाराजांची गाथा* (भाषांतर) (१९३४), *श्री तुकोबारायांची सार्थ बाळक्रीडा* (१९३४), *सार्थ ज्ञानेश्वरी भाषांतर* (१९३६) या व्यतिरिक्त *निळोबांच्या सार्थ गोळणी*, *विचारसागररहस्य* (निश्चलदासकृत हिंदी 'विचारसागरा'चे मराठी भाषांतर), *वृत्तिप्रभाकर*, *अद्वैतमकरंद* इत्यादी ग्रंथांचे संपादन दादामहाराज साखरे यांनी केले. वैदिक वाङ्मय व संतवाङ्मय ह्यांचा समन्वय करून हे अर्थ लावण्याचे कार्य त्यांनी केले. साखरे यांचे ज्ञानेश्वरविषयक लेखन आजही अभ्यासकांच्या दृष्टीने महत्त्वाचे आहे.

सलग तीन तपे त्यांनी ज्ञानदेवांचे ग्रंथ व वैदिक ग्रंथ यांचा प्रचार-प्रसार केला.

ग. वि. कविटकर, मदन कुलकर्णी

**साठे, अच्युत सीताराम :** (ज. अंदाजे १८७५, मालथर, जि. रत्नागिरी – मृ. १२ जुलै, १९२९, नागपूर). कवी व लेखक. शिक्षण एम.ए., एल्एल्. बी. (आर्वी–नागपूर). प्रारंभी पुणे महाराष्ट्र कॉलेजात अध्यापक. नंतर डिस्ट्रिक्ट जज्ज म्हणून न्यायखात्यात नोकरी. ह्यांचे स्फुट लेखन. 'विविधज्ञानविस्तार', 'ग्रंथमाला' इत्यादी नियतकालिकांतून प्रसिद्ध झाले.

प्राचीन कवितेच्या संपादनाचे महत्त्वपूर्ण कार्य ह्यांनी केले. *दयाळनाथांची कविता* (१९१३) व *श्रीदेवनाथमहाराजांची कविता* (१९१५) या ग्रंथांमधून 'दयाळनाथ' (१७८८–१८३६) आणि 'देवनाथ' (१७५४–१८२१) या दोन वैदर्भीय संत कवींची रसाळ कवने संपादून प्रसिद्ध केली. प्रस्तुत संपादनामुळे, पैठणकर एकनाथांच्या परंपरेतील भक्तिपर कविता व परंपरा या विषयीची बरीच नवीन माहिती, पुढे आली. विवेचक टीपा, कठीण शब्दांचे कोश, यामुळे हे ग्रंथ अभ्यासपूर्ण झाले आहेत.

उषा टाकळकर, गोविंद भिडे

**साठे, नागोराव गोविंद : ० ब्रह्मानंदाश्रम स्वामी :** (ज. २४ जानेवारी, १८४४, जमखिंडी – मृ. १७ मार्च, १९१७, शिरसी, ता. करीमनगर). कवी. सामान्य शिक्षणानंतर अनेक व्यवसाय केले. १९०२ मध्ये वानप्रस्थाश्रम व नंतर (१९०८) संन्यासाश्रमाचा स्वीकार.

ह्यांनी *ज्ञानचक्षु* (रचना, १९०५), *देहवर्णनप्रकाश* (रचना, १९०५-०६), *लवुभक्तविजय* (रचना, १९०६ – ०८) व *सुबोधप्रकरण* हे अध्यात्मविषयक ग्रंथ लिहिले आहेत. ह्यांपैकी *लवुभक्तविजय* (१९३५) हा संतचरित्रपर ग्रंथ फक्त प्रसिद्ध झाला आहे.

उषा टाकळकर

**साठे, लक्ष्मण गणेश :** (ज. २२ ऑक्टोबर, १८७८, पुणे – मृ. ९ डिसेंबर, १९४१, मुंबई). रसायनशास्त्रविषयक लेखक. शिक्षण रसायनशास्त्र विषयात एम.ए. प्रथम जुनागढ व अजमेर येथील कॉलेजात अध्यापक, नंतर जयपूर संस्थानातील शाळेत प्रमुख अध्यापक.

*रसायनशास्त्राची मूलतत्त्वे* (१९०६) हे पुस्तक प्रसिद्ध केल्यानंतर *राष्ट्रीय शिक्षणाचा ओनामा* (१९२३), *रसायनशास्त्र प्रवेश* (१९२५), *सृष्टशक्तिशास्त्र* (१९३१) ही पुस्तके प्रकाशित.

त्यांनी स्वतः तयार केलेली 'रासायनिक परिभाषा' महाराष्ट्र साहित्य पत्रिकेत १९१५ मध्ये प्रसिद्ध होऊन ती बरीच मान्यता पावली.

प्रारंभ कालीन परिभाषाविषयक प्रयत्न म्हणून साठे यांचे कार्य महत्त्वाचे आहे.

उषा टाकळकर, गोविंद भिडे

**साठे, विष्णु दत्तात्रय :** (ज. १७ डिसेंबर, १९१६ – मृ. ५ मार्च, १९५४, पुणे). नाट्यवाङ्मयाचे अभ्यासक व समीक्षक. शिक्षण एम.ए.पर्यंत. 'नाट्यसंविधानक : तंत्र आणि विकास' ह्या प्रबंधाचे लेखनही त्यांनी पूर्ण केले. परंतु प्रबंध पदवीसाठी सादर करण्यापूर्वीच त्यांचे निधन झाले.

*मराठी नाट्यकथा* (१९४८, सौभद्र ते कुलवधूपर्यंत) हे त्यांचे पुस्तक प्रसिद्ध आहे. मराठी नाट्यवाङ्मयाचा इतिहास स्थूलमानाने मुलांच्या समोर मांडावा या भूमिकेतून त्यांनी निवडक प्रसिद्ध नाटकांच्या नाट्यकथा या पुस्तकात दिलेल्या आहेत व तसे करताना मुळातील घटना-प्रसंग-संवाद शक्यतो मुळाबरहुकूम ठेवण्याचा कटाक्षाने प्रयत्न केला आहे.

*नाट्यप्रवेश – भाग १ ते ३* (१९४९-५०) या पुस्तकात नाटकाचे दृश्य – श्राव्य स्वरूप लक्षात घेऊन, काही महत्त्वाच्या नाटकांतील निवडक प्रवेश एकत्र केलेले आढळतात.

*मराठी नाट्यरचना : तंत्र आणि विकास* (१९५५) हा साठे यांचा अपूर्ण प्रबंध प्रा. अ. के. भागवत, प्रा. ग. प्र. प्रधान आणि डॉ. अशोक केळकर ह्या संपादक मंडळाने आवश्यक त्या संस्कारासह प्रकाशित केला आहे. प्रस्तुत प्रबंधातून सन १८४३ ते १९५० या कालखंडातील नाट्यकृतींचा साहित्यसंहिता आणि प्रयोगक्षमता या दृष्टीने विचार केल्यानंतर मराठी नाट्यसृष्टी संविधानकप्रधान असल्याचा निष्कर्ष लेखकाने मांडला आहे. नाट्यसमीक्षा या विषयावरील एक महत्त्वपूर्ण व उपयुक्त संदर्भग्रंथ म्हणून हा प्रबंध उल्लेखनीय आहे.

शुभदा शेळके, मदन कुलकर्णी

**० साधुदास :** पहा मुजुमदार, गोपाळ गोविंद

**साने, पांडुरंग सदाशिव (साने गुरुजी) :** (ज. २४ डिसेंबर, १८९९, पालगड, जि. रत्नागिरी – मृत्युस्वीकार ११ जून, १९५०, मुंबई). कवी, बालसाहित्यलेखक, कादंबरीकार, संपादक, पत्रवाङ्मय-लेखक, लोकसाहित्यसंकलक, राष्ट्रसेवक, अनुवादकार. मराठी, संस्कृत व वेदान्त हे विषय घेऊन एम.ए. (१९२४). 'विद्यार्थी' मासिकाचे संपादन प्रारंभ (१९२८), गोपाळ कृष्ण गोखले (१९२५) व इतिहासाचार्य राजवाडे (१९२८) यांचे चरित्रलेखन. अंमळनेर येथे शिक्षक (१९३०). मिठाचा सत्याग्रह, पंढरपूरचे विठ्ठल मंदिर आंदोलन व स्वातंत्र्यविषयक चळवळीत सहभाग (एकूण पाच वेळा तुरुंगवास). *साधना* या साप्ताहिकाचे संस्थापक (१९४८) व 'आंतरभारती' कल्पनेचे पुरस्कर्ते.

विद्यार्थीदशेपासून ते काव्यलेखन करीत. *पत्री* (१९३५) हा त्यांचा प्रसिद्ध काव्यसंग्रह. त्यातील राष्ट्रवादी भूमिकेमुळे हा कवितासंग्रह ब्रिटिश सरकारने जप्त केला होता. 'सत्याग्रही' हे राष्ट्रीय स्वरूपाचे (अपूर्ण) खंडकाव्य त्यांनी लिहिले आहे (अप्रकाशित). 'कुरल' या तमिळ ग्रंथाचा मराठी अनुवाद (१९४८) त्रिचनापल्लीच्या तुरुंगात असताना त्यांनी केला. गुरुजींचे बहुतेक काव्य, कादंबऱ्या व इतर साहित्य तुरुंगवासातच जन्माला आले आहे. १९३२ साली धुळ्याच्या तुरुंगात असताना, तुरुंगात झालेली आचार्य विनोबा भावे यांची गीतेवरची प्रवचने ऐकून ती त्यांनी लिहून काढली.

साने गुरुजी विशेष प्रसिद्ध आहेत ते *श्यामची आई* (१९३५) ह्या कादंबरीचे जनक म्हणून. आचार्य अत्रे यांनी या कादंबरीच्या आधारे तयार केलेल्या बोलपटाला उत्कृष्ट बोलपटाचा राष्ट्रीय पुरस्कार लाभला होता. त्यातील 'श्याम' ही व्यक्तिरेखा गुरुजींनी स्वतःवरून रेखाटली आहे. स्वार्थत्याग, बंधुभाव, समता या गुणांवर त्यांनी या कादंबरीत विशेष भर दिला. *धडपडणारी मुले* (१९३७), *श्याम* (१९३७), *जीवनकलह* (१९३८), *पुनर्जन्म* (१९३९), *आस्तिक* (१९४०), *क्रांती* (१९४०), *सती* (१९४०), *गोड शेवट* (१९४३), *रामाचा शेला* (१९४४) इत्यादी कादंबऱ्यांतून त्यांनी समाजहितकारक विचारांचा पाठपुरावा केलेला आहे. साहित्याच्या संस्कारसामर्थ्यावर त्यांचा दृढ विश्वास होता. त्यांनी *गोड गोष्टी*चे दहा भाग (१९४१–४४) व *आवडत्या गोष्टीं*चे सहा भाग (१९४७–५०) लिहून प्रसिद्ध केले. मनोरंजनाबरोबरच मानवी जीवनमूल्यांचा बालमनावर ठसा उमटविणे हाच या लेखनामागे त्यांचा हेतू होता. सोपी, ओघवती शैली हे त्यांच्या या सर्वच लेखनाचे एक वैशिष्ट्य आहे.

*गोड निबंध* व *भारतीय संस्कृती* (१९३७) ह्यासारख्या निबंधात्मक ग्रंथांतून त्यांची रसाळ शैली, उच्च विचारसरणी, उत्कट जिव्हाळा व समाजहिताची तळमळ यांचे दर्शन घडते. *कला म्हणजे काय?* (१९४३) हा टॉलस्टॉयच्या (व्हॉट इज आर्ट?) या ग्रंथाचा अनुवाद साने गुरुजींनी केला. *सुंदरपत्रे* (१९५०) हा जिव्हाळा व तन्मयता यांनी युक्त असलेला काव्यमय पत्रांचा संग्रह हृद्य आहे. याखेरीज साने गुरुजींनी *आपले घर* (१९३९), *निळा पक्षी* (१९४०, मॉरिस मेटरलिंकचा अनुवाद) तसेच *सोन्या मारुती* (१९४४) व *मंगलप्रभात* (१९४९) ह्याही नाट्यकलाकृती त्यांनी लिहिल्या. एकूणच लहानमुलांपासून प्रौढांपर्यंत लिहिलेल्या त्यांच्या सर्व प्रकारच्या साहित्यातून, त्यांच्या मानवतावादी समाजसेवकाचे व्यक्तिमत्त्व उत्कटतेने व्यक्त होताना दिसते. साने गुरुजींची लेखनसंपदा विपुल तर आहेच, पण ती विविधांगीही आहे. साने गुरुजींनी लोकसाहित्याचेही बरेच संकलन केले आहे.

राजा मंगळवेढेकर, वर्षा रेगे

संदर्भ : (१) 'साने गुरुजी : व्यक्ती आणि वाङ्मय', संपा. य. ए. नांदेडकर. (२) 'गोमंतक' (विशेषांक), २८ डिसेंबर, १९७५. (३) 'साने गुरुजींची जीवनगाथा' – राजा मंगळवेढेकर.

**० सारथी :** पहा सोमण, कृष्णाजी लक्ष्मण

**सारोळकर, दत्तात्रेय गणेश :** (ज. १८९४–मृ. १९३४). मुंबई येथील 'मौज' पत्राचे काही काळ संपादक. नाटककार. मनोहर स्त्रीसंगीत मंडळी व नाट्यकलाप्रसारक मंडळी या संस्थांनी त्यांची नाटके रंगभूमीवर आणली.

सारोळकरांनी सामाजिक, ऐतिहासिक व पौराणिक स्वरूपाची अशी बारा नाटके लिहिली. *संगीत पेशव्यांचा पेशवा* (१९२५), *दर्यादौलत* (१९२९), *दर्यासारंग* (१९२९), *पराक्रमाचा पाया* (१९२९) ही ऐतिहासिक नाटके, *वीर सौभद्र* (१९२९) हे गद्यपद्यात्मक नाटक, तसेच *राजांचा राजा* (१९३०) ही पौराणिक नाटके आणि *जनताजनार्दन* (१९२२), *देहान्त प्रायश्चित* (१९२८), *शुभमंगल* (१९२९), *सम्राटाचा सूड* (१९३०) व *पदवीधर* (१९३२) ही सामाजिक व काही अंशी कल्पनारम्य स्वरूपाची नाटके आहेत. त्यांच्या ऐतिहासिक नाटकांवर गडकऱ्यांच्या 'राजसंन्यास' नाटकाचा विशेष प्रभाव पडलेला दिसतो.

नाटकाखेरीज *रंगेल राजकुमार* (१९२८), *सतीचा हंबरडा* (१९२९), *श्रीमंताची पोर* या तीन कादंबऱ्या, *भारतमातेची श्रेष्ठता अर्थात मिस मेयोच्या असत्य विधानांचे खंडन* (१९२८), *स्वातंत्र्याच्या कहाण्या*, *आमचा समाज व समाजशास्त्र*, *सुधारलेले विवाहशास्त्र* इत्यादी राजकीय, सामाजिक स्वरूपाची वैचारिक पुस्तके. *एकादशी* हा लघुकथासंग्रह, *मराठीची पाइकी* हे संकीर्ण पुस्तक असे विविध लेखन सारोळकरांनी केले.

उमेश तेंडुलकर, वर्षा रेगे

**सावरकर, गणेश दामोदर तथा बाबाराव :** (ज. १३ जून, १८७९, भगूर, जि. नाशिक–मृ. १६ मार्च, १९४५, सांगली). हिंदुत्वपोषक पुस्तकांचे लेखक व प्रकाशक. स्वातंत्र्यवीर सावरकरांचे वडील बंधू.

बाबारावांना घरच्या अडचणींमुळे मॅट्रिकपूर्वीच शिक्षण सोडावे लागले. वृत्तीने धार्मिक. धाकटे बंधू विनायकराव व डॉ. नारायणराव ह्यांचा प्रतिपाळ तर केलाच, पण त्यांच्या देशकार्यातही सहभागी झाले. सशस्त्रक्रांतीचा पुरस्कार करणाऱ्या 'मित्रमेळा' व 'अभिनवभारत' ह्या संस्थांचे ते आधारस्तंभ होते. २ जून, १९०५ रोजी सरकारने कवी गोविंदाच्या राजद्रोही कवितांचे प्रकाशन केल्याच्या आरोपावरून जन्मठेप काळ्यापाण्याची व सर्व मिळकतीच्या जप्तीची शिक्षा (१९०९). १९२२ साली सुटका.

'राष्ट्रमीमांसा व हिंदुस्थानचे राष्ट्रस्वरूप' (१९३४), 'धर्म कशाला हवा?' (१९३८), 'हिंदुत्ववर्धन आणि हिंदुत्वाभिमान' यासारख्या त्यांच्या लिखाणाचे प्रयोजन स्पष्ट होते. 'हिंदुत्व बलवान करणे हाच हिंदुस्थानच्या उद्धाराचा खरा मार्ग' असा विचार त्यांनी *राष्ट्रमीमांसा* ह्या पुस्तकात मांडला. *हिंदुराष्ट्र (१९४२ पूर्वी)* ह्या पुस्तकात हिंदूंचा उज्वल भूतकाळ व त्यांची अर्वाचीन काळातील दुःस्थिती ह्यांचे चित्रण करून, शेवटी प्रखर हिंदुत्ववादाचा पुरस्कार केला आहे. हे पुस्तक सरकारने जप्त केले होते. त्याशिवाय *श्री शिवरायांची आग्र्यावरील गरुडझेप* (१९३९), *खिस्तपरिचय अर्थात खिस्ताचे हिंदुत्व* (१९४६), *वीररत्न मंजुषा* (१९४४) ही त्यांची पुस्तकेही प्रसिद्ध आहेत ··· *खिस्ताचे हिंदुत्व* या पुस्तकात येशू खिस्ताच्या अज्ञात जीवनाचा शोध त्यांनी घेतला असून खिस्त हा मूळचा तामिळ हिंदू ब्राह्मण होता इत्यादी निष्कर्ष मांडले आहेत. *मोपल्यांचे बंड* (१९४७) ह्या कादंबरीवर लेखक म्हणून बाबारावांचे नाव दिलेले असले तरी ती कादंबरी मूळची स्वा. सावरकरांनी लिहिलेली आहे हे आता सर्वज्ञात आहे. परमानंदकृत 'वीर वैरागी'चा अनुवादही यांनी केला आहे (१९३०).

द. न. गोखले, म. ना. लोही

**सावरकर, (रे.) दिनकर शंकर :** (ज. ८ मे, १८६७–मृ. ८ जानेवारी, १९५२). खिश्चनधर्मविषयक पुस्तकांचे लेखक. वास्तव्य पुणे येथे. ह्यांची *खोदीव लेखाची साक्ष अथवा अर्वाचीन कालच्या शोधाकडून जुन्या करारातील इतिहासाचे स्पष्टीकरण* (१९०३), *महावीर कोआपेना* (१९२५), *नवजीवन प्राप्ती : योहान कृत खिस्तचरित्राचे विवरण* (१९३७), *पवित्र धर्मशास्त्रविषयक कोश* (१९४२) इत्यादी मूळ इंग्रजी ग्रंथाच्या सहाय्याने लिहिलेली पुस्तके प्रसिद्ध आहेत. याशिवाय *उपासनादर्श* (१९४०) हा ग्रामीण मंडळींसाठी रचलेल्या उपासनांचा संपादित संग्रह, रे. *फादर नहेम्या (नीलकंठशास्त्री) गोरे यांचे संक्षिप्त चरित्र* (१९४१) हे रे. फा. सी. ई. गार्डनर ह्यांच्या मूळ पुस्तकाच्या आधारे लिहिलेले पुस्तक व *सुभेदाराचा पुत्र* (१८९५) ही खिस्ती धर्म प्रचाराच्या उद्देशाने लिहिलेली कादंबरी हे ह्यांचे अन्य साहित्य.

मीनल निसळ, हरिश्चंद्र थोरात

**सावरकर, नारायण दामोदर : ० जातीहृदय :** (ज. १० मे, १८८९, भगूर, जि. नाशिक–मृ. १९ ऑक्टोबर, १९४९, मुंबई). स्वा. सावरकरांचे बंधू. स्वा. सावरकरांच्या इंग्रजी ग्रंथांचे अनुवादक, इतिहासलेखक, चरित्रलेखक व कादंबरीकार. कलकत्त्याच्या वैद्यकीय

महाविद्यालयाची दंतवैद्याची पदवी. मुंबई येथे दंतवैद्याचा व्यवसाय. होमरूल चळवळीत व अन्य राजकीय चळवळीत भाग व त्यामुळे अनेकवार तुरुंगवास. 'श्रद्धानंद' ह्या सावरकरवादी साप्ताहिकाचे सात वर्षे संपादक.

ह्यांची महत्त्वाची कामगिरी म्हणजे *हिंदुत्व* (१९२५) व *हिंदुपदपादशाही* (१९२८), स्वा. सावरकरांच्या इंग्रजी ग्रंथांचे मूळ मराठी अनुवाद ही होय. सावरकरांच्या हिंदुत्ववादी विचारसरणीचा मराठी वाचकांना परिचय घडविण्याच्या दृष्टीने ही पुस्तके महत्त्वाची आहेत. *सेनापती तात्या टोपे* (१९४०) व *हिंदूंचा विश्वविजयी इतिहास* (१९४४) ही त्यांची पुस्तकेही उल्लेखनीय आहेत. भारताने एकेकाळी सर्व जगावर हिंदूंचे सांस्कृतिक, धार्मिक व राजकीय अधिराज्य कसे गाजविले होते, त्याची माहिती *हिंदूंचा विश्वविजयी इतिहास*मधून कथन केली आहे. 'जातिहृदय' ह्या टोपण नावाने लिहिलेल्या *जाईचा मंडप, खंड १ व २* (१९१३, १९१४) व *मरण की लग्न* (पूर्वार्ध, १९३३) ह्या त्यांच्या दोन कादंबऱ्याही प्रसिद्ध आहेत. *जाईचा मंडप* ही एक विस्तृत सामाजिक कादंबरी असून, तत्कालीन 'भारत गौरव ग्रंथमाला' ह्या प्रकाशन संस्थेने प्रसिद्ध केली आहे.

प्र. ना. मवरे, म. ना. लोही

**सावर्डेकर, बाळकृष्ण वामन तथा गजानन :** (ज. जानेवारी, १८८६, काणकोण, गोवा – मृ. १४ जानेवारी, १९४५). स्वपरिचयात्मक व भाषाविषयात्मक ग्रंथांचे कर्ते. गोव्यातील पोर्तुगीज सरकारच्या शिक्षणखात्यात प्राथमिक शाळेत नोकरी. अध्यापनाबरोबरच गोमंतकातील मराठीच्या शिक्षणक्षेत्रात त्यांनी केलेले कार्य विशेष मोलाचे आहे.

ते मराठी वृत्तपत्रांतून व नियतकालिकांतून तसेच पोर्तुगीजमधूनही लेखन करीत असत. *पर्सनल मॅग्नेटिझम अर्थात वैयक्तिक आकर्षण* (१९१३) हे मानसशास्त्राशी संबंधित विषयावरील पुस्तक पुण्याच्या ज्ञानमित्र पुस्तकमालेतून प्रसिद्ध झाले. वेगळ्याच विषयावरील वैचारिक पुस्तक म्हणून ते महत्त्वाचे आहे.

मडगाव येथे १९३० साली भरलेल्या महाराष्ट्र साहित्य संमेलनाच्या निमित्ताने सावर्डेकर ह्यांचा गोमंतकभूमीचा सर्वांगीण परिचय करून देणारा *गोमंतक-परिचय ग्रंथ*, हा या विषयावरील पहिला मराठी ग्रंथ होय. *गोमंतकाची भाषा* (१९७१) हे त्यांचे तिसरे पुस्तक. या पुस्तकात 'कोकणी ही स्वतंत्र भाषा होऊ शकेल काय ?', 'गोमंतकाची भाषा मराठीच', 'मराठी शिकले पाहिजे' हे महत्त्वाचे ठरणारे तीन लेख आहेत.

उषा टाकळकर, वर्षा रेगे

**सुकथनकर, भालचंद्र ऊर्फ गुलाबराव सीताराम :** ० भालेन्दु : (ज. १२ जून, १८९१ – मृ. ६ एप्रिल, १९४०). कवी व ग्रंथप्रकाशक. लोकमान्यांच्या 'गीतारहस्या'चे इंग्रजी भाषांतरकार.

अर्भकावस्थेत असतानाच वडील वारले. प्रतिपाळ आई आणि ट्रस्टी विष्णू नारायण भातखंडे यांनी केला. शिक्षण एम्.ए. (१९१३), एलएल.बी. (१९१५). व्यवसाय सॉलिसिटर.

इंग्रजी व फ्रेंच भाषांवर प्रभुत्व. लोकमान्यांच्या 'गीतारहस्या'चे इंग्रजी भाषांतर १९३५ साली पूर्ण केले. ह्यांच्या स्वतःच्या कवितांचा संग्रह *इंदुविलास* (१९३८) या नावाने प्रसिद्ध आहे. सोनाळकर ह्या आपल्या मित्राच्या कवितांची इंग्रजी भाषांतरे करून प्रसिद्ध केली. काही फ्रेंच पुस्तकांची भाषांतरे करून ग्रंथप्रकाशनाचा व्यवसाय केला. पं. वि. ना. भातखंडे ह्यांनी लिहिलेली अथवा संपादित केलेली हिंदुस्थानी संगीतावरील पुस्तके ह्यांनीच प्रकाशित केली.

शरच्चंद्र विष्णु गोखले, म. ना. लोही

**सोनाळकर, केशव महादेव :** (ज. ६ जानेवारी, १८८५ – मृ. २१ ऑक्टोबर, १९३८). कवी, नाटककार, निबंधकार. मुलाड (जि. ठाणे) हे मूळ गाव. शिक्षण कायद्याच्या पदवी परीक्षेपर्यंत. जळगाव येथे वास्तव्य.

बालपणापासून काव्यरचनेचा नाद. बालकवींचे मित्र. विविध नियतकालिकांमधून कविता प्रसिद्ध. *कमलपराग* (१९२३) ह्या संग्रहात यांच्या स्फुट कविता समाविष्ट आहेत. मूर्त पार्थिव सौंदर्य आणि अमूर्त आंतरिक सौंदर्य यांतील भेद त्यांच्या कवितांतून व्यक्त होताना दिसतो. प्रेमाचा उदात्त हेतू लक्षात न घेता, त्याला नावे ठेवणाऱ्या अरसिकांवर त्यांनी टीका केली आहे. प्रेमाला ब्रह्माचे स्वरूप कल्पून विश्वबंधुत्वाच्या प्रेमाशी त्याची तुलना करण्याची पद्धती सोनाळकरांच्या काव्यापासूनच पुढे विशेष रूढ झाली. *प्रेमयोग ऊर्फ अंबाहरण* (१९२५) हे त्यांचे पौराणिक नाटक. *अमृततुषार अर्थात आत्म्याचे बोल* (१९२२), *वर्णाश्रमधर्मविषयक धारा अमृततुषार* (१९३१) हे त्यांचे तात्त्विक विषयावरील निबंधसंग्रह. *प्रो. दि. धों. कर्वे ह्यांच्या नास्तिकवादास उत्तर* (१९३६) हे यांचे आणखी एक प्रकाशित पुस्तक.

उषा टाकळकर, जयंतकुमार बंड

**सोमण, कृष्णाजी लक्ष्मण :** ० किरात ० काळदंड ० भ्रमर ० मधुकर ० सारथी : (ज. २ जुलै, १८६५, पुणे – मृ. २१ फेब्रुवारी, १९४५, बेळगाव). कवी, नाटककार, समीक्षक. शिक्षण पुणे येथे. शेतकी विषयाचा डिप्लोमा (१८८८). नोकरी पोलीस खात्यात.

ह्यांनी विविध टोपण नावे धारण करून लेखन केले. 'केसरी'त 'किरात', 'जगद्हितेच्छू'मध्ये 'सारथी', 'काळ'मधून 'काळदंड' ह्या टोपण नावांनी त्यांचे गद्यलेखन. 'शिवाजी', 'सुधारक' ह्या साप्ताहिकांतून 'किरात', 'भ्रमर' ह्या टोपण नावांनी काव्यलेखन प्रसिद्ध. तथापि त्यांचे 'किरात' हे टोपण नावच विशेष प्रसिद्ध आहे. एकूणच 'जगद्हितेच्छू', 'पुणेवैभव', 'केसरी', 'सुधारक' इत्यादी वृत्तपत्रांतून निरनिराळ्या टोपण नावांखाली ते लेख लिहीत असत.

चिपळूणकरांची 'निबंधमाला' व टिळकांचा 'केसरी' ह्यांपासून ह्यांना लेखनाची प्रेरणा मिळाली. लहानपणापासून वडिलांमुळे वाचनाची आवड उत्पन्न झाली.

*सं. सुंदरमाधव* (१९०४), *माझी बहीण* (जेम्स शर्लेच्या 'दि ट्रेटर'च्या आधारे) ही सामाजिक नाटके. *द्रोणसंकोप* (१९०४), *कुरुभंग* (१९२९), *घोषयात्रा* (१९३३) ही पौराणिक नाटके, *दोन रजपूत कन्या*, *पन्हाळगडचा किल्लेदार*, *पानपतचा दुर्दैवी मोहरा*, *राजाराम आणि ताराऊ*, *विजयनगरचा डळमळीत राजमुकुट*, *बुहल्यम टेल*, *सं. राणा जयदेव*, *संशयी जिजाबाई*, *डोकेफिरू*, *महादेवाचे राज्य* इत्यादी ऐतिहासिक नाटके, कालिदासाच्या 'मेघदूता'च्या आधारे लिहिलेले *सं. यक्षप्रमाद* हे ('दक्षिणा प्राइझ कमिटी'चे पारितोषिक मिळालेले) कल्पनारम्य नाटक व भासाच्या संस्कृत नाटकांची मराठी गद्यपद्यात्मक रूपांतरे ही किरातांची विपुल नाट्यसंपदा. भासकवीच्या उपलब्ध तेरा नाटकांची मराठी केलेली रूपांतरे १९२९ मध्ये चित्रशाळेने प्रसिद्ध केली, तसेच महाभारतातील काही ठळक व उद्बोधक प्रसंगांचे बऱ्याच मोठ्या प्रमाणावर केलेले नाट्यरूप चित्रण ही किरातांची उल्लेखनीय वाङ्मयीन कामगिरी. रविंद्रनाथ टागोरांच्या 'मुक्तधारा'चा किरातांनी केलेला गद्यपद्यात्मक अनुवादही प्रसिद्ध आहे.

किरातांची विपुल स्फुट कविता व 'शिवराज्याभिषेक', 'शृंखला', 'हिंदोल तिलक गीत' ही दीर्घकाव्ये विविध नियतकालिकांमधून प्रसिद्ध झाली आहेत. त्यांच्या कविता सुबोध, अनलंकृत आहेत.

'राणा भीमदेव', 'कांचनगडची मोहना' या नाटकांची आणि देवलांच्या नाटकांची समीक्षा, 'संभाजीच्या पश्चात मराठ्यांची स्थिती'

हा निबंध आणि 'तलवारी वा नाहीतर हिसकून घेऊ' हा राजकीय परिस्थितीवरचा त्यांचा लेख हे त्यांचे अन्य उल्लेखनीय साहित्य. 'नाट्यकथार्णव', 'विद्याविनोद', 'मनोरंजन' इत्यादी मासिकांतून त्यांचे नाट्यग्रंथ आणि कविता प्रसिद्ध होत असत, तर त्यांचे निबंध व टीकात्मक लेख 'विविधज्ञानविस्तार', 'नवयुग' इत्यादी मासिकांतून प्रसिद्ध होत. 'डेकन व्हर्नाक्युलर ट्रान्सलेशन सोसायटी', पुणे या संस्थेत ग्रंथपरीक्षणाचे काम त्यांनी अनेक वर्षे केले होते.

कृ. बा. मराठे, जयंतकुमार बंड

० **स्फुटवक्ता अभियोगी** : पहा लेले, विसाजी रघुनाथ

**स्वामी रामय्या व्यंकय्या अय्यावारू** : (ज. १८२९–मृ. १९१२). हैद्राबाद संस्थानात एका वैष्णव कुळात त्यांचा जन्म झाला. गरिबीमुळे यांना शिक्षण घेता आले नाही. पुणे, सातारा इथे काही वर्षे सार्वजनिक बांधकाम खात्यात त्यांनी नोकरी केली. पुढे ते व्यंकू बाळोजी कालेवार यांच्याबरोबर भागीदार म्हणून काम करीत होते. भंडारदऱ्याचा जलाशय, बडोदा येथील सयाजीराव गायकवाडांसाठी बांधलेला 'लक्ष्मी विलास' राजवाडा वगैरेंच्या बांधकामात त्यांचा हातभार होता.

सत्यशोधक समाजाशी त्यांचा जवळचा संबंध होता. १८८७ मध्ये त्यांनी *खिस्ती बंधुजनांस विनंती* नावाची पुस्तिका प्रसिद्ध केली होती. त्यावर म. फुले यांनी एक 'अखंड' लिहून टीका केली होती. पण नंतर फुल्यांची जाहीर माफी मागितल्याने या दोघांतील वाद नष्ट झाला.

स्वामी रामय्या अय्यावारूंनी तेलगु भाषिकांसाठी शाळा, वाचनालये काढली. सत्यशोधक व ब्राह्मणेतर चळवळीतील प्रमुख नेते भास्करराव जाधव यांच्या शालेय जीवनाच्या कालखंडात यांना अय्यावारू यांनी मदत व मार्गदर्शन केले. म. फुलेंच्या 'गुलामगिरी' या पुस्तकाची त्यांनी दुसरी आवृत्ती काढली. १८९१ साली पुण्यात भरलेल्या सत्यशोधक समाजाच्या परिषदेचे ते अध्यक्ष होते. त्यांच्या निधनानंतरही त्यांच्या कुटुंबीयांनी हे कार्य सुरू ठेवले होते.

लता जाधव

**हंस (बीडकर), बाळकृष्ण मल्हार** : (ज. १८३६, बीड, जि. औरंगाबाद–मृ. १८८५, इंदूर). संतसाहित्यविवेचक. शिक्षण धुळे येथे. खानदेशच्या डेप्युटी इन्स्पेक्टरचे शिरस्तेदार. १८७० मध्ये इंदूरला वकिलीची परीक्षा देऊन वकिली सुरू केली. इंदूरला १८८५ मध्ये निघालेल्या 'सनातन धर्मदक्षिणी सभे'च्या संस्थापक सदस्यांपैकी एक.

विद्याखात्याच्या क्रमिक पुस्तकातील शब्द व अर्थ देणारा *रत्नकोश* (१८६९) हा पहिला शालेय शब्दकोश प्रसिद्ध. २७ श्लोकांचे *यशवंतस्तोत्र* (१८६९) आणि गंगेचे सविस्तर वर्णन केलेले *भागीरथी* (१८७३) ही काव्ये लिहिली. 'मराठी व्याकरणावरील निबंधा'वर हंसांनी 'शालापत्रका'त पत्रे लिहिली. १८८५ मध्ये पुण्यास भरलेल्या मराठी ग्रंथकार मंडळीच्या पहिल्या सभेस पत्र लिहून व्याकरण व कोश ह्यावरील ग्रंथ मराठीत हवेत, अशी सूचना केली होती.

हंसांनी एकनाथ, रामदास ह्यांच्यावर टीकात्मक ग्रंथ लिहिले. त्यांपैकी एकनाथांवरील ग्रंथ अप्रकाशित राहिला तर रामदासांवरील ग्रंथ जळून नष्ट झाला. *तुकाराम* (१८८०), *मोरोपंत* (१८८२), *ज्ञानदेव* (१८८३), *वामन पंडित* (१८८४) हे चार ग्रंथ प्रकाशित झाले. चरित्र व काव्यविवेचन अशी या पुस्तकांची मांडणी आहे. मराठीतील संतांच्या आणि पंतांच्या काव्यांची सहृदय पण परखड चिकित्सा करण्याचा पाया हंस यांनी घातला.

वि. रा. करंदीकर, मदन कुलकर्णी

**हडप, विठ्ठल वामन** : ० केयूरक : (ज. २७ सप्टेंबर, १८९९, कोटकामते, ता. देवगड, जि. रत्नागिरी–मृ. १२ मार्च, १९६०). ऐतिहासिक कादंबरीलेखनाबद्दल विशेष प्रसिद्ध. यांनी चरितार्थासाठी लेखन हाच व्यवसाय स्वीकारला.

हडपांनी कादंबरीलेखनास सुरुवात वयाच्या पंधरा-सोळाव्या वर्षापासून केली. *झाकली मूठ* (१९१७) ही यांची पहिली प्रकाशित कादंबरी. त्यानंतर त्यांच्या *निरभ्र चंद्र* (१९२०), *बहकलेली तरुणी* (१९२४), *इष्काचा प्याला* (१९२५), *मास्तरीण काकू* (१९३३) इत्यादी सवंग सामाजिक कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या. ह्या कादंबऱ्यांतून पांढरपेशा समाजातील स्वैराचाराचे भडक चित्रण करताना नीतिबोधाचा पुरस्कार करण्याचा त्यांचा इरादा होता. त्यानंतरच्या *विमाचरी* (१९४६ दुसरी आ.), *माझा संसार*, *भविष्यकाळ*, *गौरीशंकर* (१९२८), *दुलारी* (१९३३), *लग्नलांछन* इत्यादी सामाजिक कादंबऱ्यांतून शृंगाराचा भर काहीसा ओसरला असून नवमतवादावर ते प्रखर हल्ला चढविताना दिसतात. टीकाकारांच्या प्रतिकूल व प्रखर टीकेमुळे हडपांनी पेशवाईचा इतिहास हा आपल्या कादंबऱ्यांचा विषय म्हणून निवडला. नाथमाधवांच्या ऐतिहासिक कादंबरीपासून स्फूर्ती घेऊन त्यांनी 'कादंबरीमय पेशवाई' ही तेरा कादंबऱ्यांची माला यशस्वीपणे पूर्ण केली व हडप लोकप्रिय झाले.

*पेशवाईचे पुण्याहवाचन* (१९२६) हे या मालेतील त्यांचे पहिले पुष्प (१९२६). या ऐतिहासिक नवलकथांच्या मालेतील *पेशवाईचे मन्वंतर* (१९३४) हे त्यांचे शेवटचे पुष्प. प्रमुख ऐतिहासिक घटनेभोवती तिला उठाव देण्यासाठी अनेक काल्पनिक पात्रे व लहानसहान घटना कल्पून त्यांचे अद्‌भुतरम्य वर्णन करण्याकडे त्यांचा कल दिसतो. हडपांनी 'कादंबरीमय शिवशाही', 'कादंबरीमय मराठेशाही' व गांधीयुगाच्या आरंभापासून गांधीजींच्या वधाच्या खटल्याच्या निकालापर्यंतच्या कालावधीतील सहा कादंबऱ्यांची 'कादंबरीमय आंग्लशाही' ह्या कादंबरीमालांचेही लेखन केले आहे.

हडपांच्या जीवनदृष्टीत १९३६ नंतर बदल होऊन त्यांना साम्यवादाबद्दल आकर्षण वाटू लागले. या बदलाचे प्रत्यंतर त्यांच्या *आजचा प्रश्न* (१९४५), *उगवत्या सूर्याचा कालोख* (१९४४), *गोदाराणी* (१९४७), *अन्नदाता उपाशी* (१९४७) इत्यादी कादंबऱ्यांतून येते. ग्रामीण जीवनाचे वस्तुनिष्ठ व विश्लेषणात्मक चित्रण करण्याच्या हेतूने त्यांनी या कादंबऱ्या लिहिल्या. १९४७ नंतर हडप गांधीवादाकडे वळल्याचे दृश्य *काँग्रेसचा महायज्ञ* (१९४८) व *कादंबरीमय आंग्लशाही* या पुस्तकांवरून दिसून येते. साम्यवादाविषयीच्या आकर्षणातूनच त्यांचे अनुवादित साहित्य निर्माण झाले आहे. *आई* (१९४१) व *बापलेक* (१९४७) ह्या अनुक्रमे गॉर्कीच्या 'मदर' व तुर्जिनेव्हच्या 'फादर अँड सन्स' या कादंबऱ्यांचे अनुवाद, त्याचप्रमाणे गॉर्कीच्याच 'माय चाइल्डहूड'चे *माझे बालपण* हे भाषांतर या दृष्टीने उल्लेखनीय आहेत. *नंदनवन* (१९२६), *वैकुंठीचाराणा* (१९३४), *सोपासाच्या आणि इतर गोष्टी* (१९३७) हे कथासंग्रह; श्रीकृष्ण जन्माच्या कथेच्या माध्यमातून म. गांधींच्या अहिंसावादी राजकारणाचे पडसाद उमटविणारे *सं. देवकी* (१९३२) तसेच *लोकसेवेचा श्रीनामा* ही नाटके; *चिरंजीव* (१९३६) ही पौराणिक कादंबरी; *मौलाना महंमद अली* (१९२३), *चित्रपट महर्षी* (१९५९) व *वीरबाला झोया* (१९५९) ही चरित्रे इत्यादी विविध प्रकारचे साहित्य त्यांनी लिहिले आहे. ह्यांनी सुमारे अर्धशतकाच्या अवधीत केलेल्या साहित्यातून त्यांची उत्क्रांतीशील वृत्ती व बदलत्या काळाशी स्वतःला सुसंगत राखण्याची तळमळ स्पष्ट होते.

हरिश्चंद्र थोरात, जयंतकुमार बंड

**हतवळणे, शंकर रामचंद्र** : (ज. ११ फेब्रुवारी, १८५०, पुणे–मृ. २७ फेब्रुवारी, १९०५, शिरोळे, सातारा). ग्रंथकार, मराठी

शुद्धलेखनविषयक चळवळीचे पुरस्कर्ते. माध्यमिक शिक्षणानंतर मुंबई सरकारच्या शिक्षणखात्यात नोकरी.

हेन्री थॉमस् बकल (१८२१ – ६२) ह्या इंग्लिश लेखकाच्या 'हिस्ट्री ऑफ सिविलायझेशन इन इंग्लंड' (खंड १, १८५७; खंड २, १८६१) ह्या ग्रंथापासून प्रेरणा घेऊन व त्याचा आदर्श पुढे ठेवून *सृष्टपदार्थनियम आणि सुधारणा* (१८८९) हे पुस्तक यांनी लिहिले. शिक्षक व पालकांची मने धर्म व नीतिशास्त्राच्या संदर्भात सुसंस्कृत करण्याच्या उद्देशाने त्यांनी *सुशिक्षित स्त्री* (१८९०) व *गृहशिक्षण* (१८९८) या पुस्तकांची रचना केली. *मराठी भाषेची लेखनपद्धति* (१९०४), *हिंदुस्तानात एक भाषा होईल किंवा नाही?* (१८९४) व *सार्थ प्राकृतप्रकाश* (१९००) ह्या पुस्तकांवरून त्यांचा भाषा व व्याकरण याकडे पाहण्याचा साक्षेपी दृष्टिकोण स्पष्ट होतो. त्यांचे 'स्व-चरित्र' त्यांच्या नातवाने १९७९ साली प्रसिद्ध केले. त्यात एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धातील सामाजिक व सांस्कृतिक जीवन, स्वतःचे त्यासंबंधीचे विचार व अनुभव, त्यांनी स्वतः केलेले सार्वजनिक कार्य वगैरेंचे प्रामाणिकपणे कथन आले आहे. *न्यायप्रकाश* ह्या नावाचे मासिकही त्यांनी काढले होते (१९७६ – ८०).

मुंबई, मद्रास, कलकत्ता येथील हायकोर्टांचे निवाडे मराठीतून प्रसिद्ध करणे, हा या मासिकाचा हेतू होता.

ग. दे. खानोलकर, जयंतकुमार बंड

**हरकुडे, नाईक माणिक मनोहर : ० माणिक प्रभू ० माणिक ० माणिक बाबा ० माणिक सद्‌गुरुनाथ :** (ज. १२ डिसेंबर, १८१७, लाडवंती, म्हैसूर – मृ. २९ नोव्हेंबर, १८६५, माणिकनगर, हुमणाबाद). संतकवी. शिक्षण मामाच्या घरी. पण शिक्षणाऐवजी स्वच्छंदीपणाची, एकांतवासाची त्यांना आवड होती. ते परमार्थसाधनेकडे वळले. काही काळ एकांतवास, नंतर तीर्थाटनात १२ वर्षे घालवून त्यांनी आपल्या 'सकलमतस्थापित संप्रदाया'चा प्रसार करण्यासाठी हुमणाबादजवळ एका निर्जनस्थानी आपल्या पीठाची स्थापना केली. तिथे आजचे माणिकनगर उभारले गेले. माणिकप्रभूंचे अलौकिकत्व जन्मसिद्ध असल्याचा अनुभव घेतल्यामुळे लोक त्यांना 'चतुर्थदत्तावतार' समजतात. त्यांच्या कवितेत, रेवगी येथील रेवणसिद्ध हे त्यांचे गुरू असल्याचा उल्लेख आढळतो. 'सकलमत' स्थापना करून सर्व जातींच्या व सर्व पंथांच्या लोकांचा एकोपा घडवून आणणे, हेच त्यांचे ध्येय होते. "'प्रवृत्ती-निवृत्ती' हे दोन्ही मार्ग विरोधी नसून दोन्ही पूर्णपणे साधता येतात" असा त्यांचा उपदेश असे. साधनेचा, उपासनेचा ते आग्रह धरीत नाहीत. सर्वांच्या अंतर्यामी अनुस्यूत असलेल्या परमेश्वराचे विभूतिमत्त्व पटले म्हणजे झाले, असे त्यांना वाटे. आपल्या भक्तिसंप्रदायाच्या प्रसारार्थ त्यांनी *आत्मरूपप्रतीति* (१९११) व *श्रीज्ञानमार्तंड : पूर्वार्ध-उत्तरार्ध* (१९२७) असे दोन वेदान्तग्रंथ, *मल्हारीमहात्म्य* (१९१७), *हनुमंतजन्म*, *संगमेश्वरमहात्म्य* ही ओवीबद्ध काव्ये, अशी काही ग्रंथरचनाही केली आहे. मराठीप्रमाणेच हिंदी, उर्दू, कानडी या भाषांतूनही त्यांनी पदरचना केली आहे.

उषा टाकळकर, के. ए. पोतदार

संदर्भ : 'मराठवाड्यातील अर्वाचीन मराठी वाङ्मय', चि. नी. जोशी.

**० हरिहर महाराज :** पहा पाळंदे, नीलकंठ रामकृष्ण

**० हरी माधव समर्थ :** पहा चोणकर, रामकृष्ण माधव

**हर्षे, निर्मला : ० पानसे, वेणूबाई :** (ज. २ मे, १९०२ – मृ. ९ फेब्रुवारी, १९५०, पुणे). चरित्र-लेखिका. डॉ. रा. ग. हर्षे यांच्या पत्नी. यांनी आपले लेखन कु. वेणूबाई पानसे या पूर्वाश्रमीच्या नावाने केले. शिक्षण फर्ग्युसन कॉलेज, पुणे येथे. बी.ए. इंग्लिश ऑनर्स, एम्.ए. मराठी व इंग्रजी घेऊन. १९२४ पासून मुंबई शिक्षण खात्यात नोकरी.

वेणूबाईंचे वडील प्रा. ना. स. पानसे हे हरिभाऊ आपटे यांचे स्नेही होते. या मित्रकन्येने हरिभाऊंचे चरित्र लिहावे असे हरिभाऊंच्या पत्नी रमाबाई यांना वाटे. त्यातून वेणूबाईंनी *हरि नारायण आपटे* (चरित्र आणि वाङ्मयविवेचन) हे पुस्तक १९३१ मध्ये लिहिले. प्रस्तुत पुस्तकातील बहुतांश प्रकरणे व पृष्ठे चरित्रनायकाच्या व्यक्तिमत्त्व आणि चरित्रकथनास वाहिलेली आहेत. केवळ तीन प्रकरणांमधून कादंबरी वाङ्मयाबरोबर हरिभाऊंच्या काव्य, नाटक, भाषणे, कथा, भाषांतरे इत्यादी वाङ्मयाचाही परिचय व परामर्ष आलेला आहे. ह. ना. आपटे यांचे एक अधिकृत व विश्वसनीय चरित्र या दृष्टीने हे चरित्र महत्त्वाचे आहे.

रा. श्री. जोग, मदन कुलकर्णी

**हवालदार (काणे), गणेश रामकृष्ण :** (ज. १८७२, – मृ. १४ ऑगस्ट, १९५२, मुंबई). भाषांतरकार व चरित्रलेखक. शिक्षण बी.ए. (१८९५), एल्‌एल्.बी. (१९०२). मुंबई हायकोर्टाच्या अपील शाखेचे मुख्य शिरस्तेदार.

*होमरकृत इलियडचे कविताबद्ध मराठी भाषांतर* त्यांनी दोन भागांत (१९१३) प्रसिद्ध केले. हे भाषांतर सोपे, सरळ, ओघवते व प्रासादिक आहे. मराठी वाचकांना एका जगद्‌विख्यात महाकाव्याचा त्यांनी याद्वारे प्रथमच परिचय करून दिला. होमरकवी व त्याचे महाकाव्य ह्या संदर्भात या काव्याला जोडलेली विवेचक प्रस्तावनाही अभ्यसनीय आहे.

*निर्जनग्राम* (गोल्डस्मिथच्या 'डेझर्टेड व्हिलेज'चे भाषांतर, १९३३), *नैषधसार* (श्रीहर्षाच्या 'नैषधीय चरिता'चे पद्यात्मक सार, १९३८), *महाकवी कालिदासकृत मेघदूताचे सटीक समवृत्त, समश्लोकी व सयमक मराठी भाषांतर* (१९५०) अशी त्यांची अन्य भाषांतरित काव्ये.

यांचा *रावसाहेब विश्वनाथ नारायण मंडलिक यांचे चरित्र, भाग १, २* (१९२७) हा चरित्रग्रंथ महत्त्वाचा आहे. श्रीयुत मंडलिक ही तत्कालीन सांस्कृतिक जीवनातील एक महत्त्वाची व्यक्ती होती. त्यांनी 'नेटीव्ह ओपिनियन' हे इंग्रजी साप्ताहिक (१८६४) सुरू केले होते. रावसाहेबांवरील हे चरित्र त्यांचे कार्यव्यास जीवन व त्यांचा काळ यांचा वेध घेणारे असले, तरी चरित्रनायकाप्रती अत्यादरभावनेमुळे प्रस्तुत ग्रंथाला गौरवग्रंथाचे स्वरूप आले आहे.

उपरोल्लेखित ग्रंथनिर्मितीशिवाय *भारतामृत* (व्यासांचे महाभारत आणि मोरोपंती आर्याभारत ह्यांचा तुलनात्मक विचार, १९३७), *रामायणामृत* (संक्षिप्त गद्य रामायण, १९४०), *शेक्सपियरच्या नाटकांतील सौंदर्यस्थळे* (१९४४), *कल्हणकृत राजतरंगिणीतील सौंदर्यस्थळे* (१९५०) हे व असे आणखी काही ग्रंथ यांनी लिहिले आहेत. *कल्हणकृत राजतरंगिणीतील सौंदर्यस्थळे* या ग्रंथाला शंकरजी नारायण पारितोषिक प्राप्त झाले होते.

उषा टाकळकर, मदन कुलकर्णी

**हळबे, लक्ष्मण मोरेश्वर :** (ज. १८३१ – मृ. मे, १९०४, वाई). मराठी कादंबरीच्या आद्यपर्वातील एक महत्त्वाचे कादंबरीलेखक. घराणे रत्नागिरी जिल्ह्यातील लांजे महालातील मठ ह्या गावचे. वयाच्या अठराव्या वर्षी मुंबईस आले. वास्तव्य वाई येथे. ह्यांचे संस्कृतचे अध्ययन चांगले होते.

लक्ष्मणशास्त्री यांनी मार्च १८५४ मध्ये *चंद्रिका* नावाचे एक मासिक पुस्तक काढले. डिसेंबर, १८५७ मध्ये ते बंद पडले. १८६२ मध्ये यांनी मुंबईत 'इंदुप्रकाश' छापखाना काढला. याच नावाचे इंग्रजी – मराठी साप्ताहिक वर्तमानपत्रही सुरू केले. या कार्यात

केशवशास्त्री गाडगीळ व फिरोजशहा मेहेरजी ह्या मित्रांचे सहकार्य त्यांना लाभले. *इंदुप्रकाश*चे इंग्रजी विभागाचे संपादन न्या. माधवराव रानडे यांनी चार महिने केले होते. मराठी विभागाचे संपादन जनार्दन सखाराम गाडगीळ करीत. वॅ. वासुदेव कृष्ण धैर्यवान व विष्णुशास्त्री पंडित हे मराठी विभागासाठी लेखन करीत. १८६४ पासून विष्णुशास्त्री पंडितांनी विद्याखात्याची सरकारी नोकरी सोडून *इंदुप्रकाश*चे संपादकत्व स्वीकारले.

याच काळात *मुक्तमाला* (१८६१), *रत्नप्रभा* (१८७८) ह्या दोन कादंबऱ्या त्यांनी लिहिल्या व प्रसिद्ध केल्या. त्यांचे ग्रंथलेखन व सार्वजनिक कार्य लक्षात घेऊन, १८७० साली बडोद्याचे राजे खंडेराव गायकवाड ह्यांनी त्यांस वंशपरंपरा रु. १,२०० चे वर्षासन, 'शास्त्री' ही पदवी व महावस्त्रे देऊन त्यांचा गौरव केला. लोकांमध्ये स्व-भाषेची गोडी निर्माण व्हावी या उद्देशाने हळबेशास्त्र्यांनी काल्पनिक, मनोरंजक व करमणूक प्रधान कादंबऱ्या लिहिल्या. क्वचित 'रत्नप्रभा'सारख्या गोष्टीत विधवा-विवाहाच्या समस्येला त्यांनी स्पर्श केलेला असला तरी त्यांची कथासृष्टी ही अद्‌भुतरम्यतेवरच आधारित आहे. हळबे यांच्या कादंबरीलेखनाचा आदर्श अनेकांनी पुढे ठेवला, त्यामुळे मराठी कादंबरीचा हरिभाऊ-पूर्व कालखंड हा *मुक्तमाला* कादंबरीच्या प्रभावाचा म्हणून ओळखला जातो. हळबेशास्त्र्यांची *मुक्तमाला* ही अद्‌भुत रसप्रधान कादंबरी आधुनिक मराठीतील पहिली स्वतंत्र कादंबरी म्हणून गणली जाते.

उषा हस्तक, मदन कुलकर्णी

**हिंगणेकर, गोविंद रामचंद्र :** (ज. १८९१ – मृ. २० एप्रिल, १९३१). कवी व वृत्तपत्रलेखक. पुणे येथील 'ज्ञानप्रकाश' दैनिकाच्या संपादकीय विभागात नोकरी. त्यांची अफझुलखानवधावरील विविधवृत्तात लिहिलेली *दख्खनचा वीर* (१९२१) व बाजीप्रभूंच्या बलिदानावरील *पावनखिंड* (१९२७) ही ऐतिहासिक खंडकाव्ये प्रसिद्ध आहेत. *काव्यकुंज* (१९२४) हा त्यांचा स्फुट कवितांचा संग्रह आणि *गमावलेले स्वराज्य व मिळवावयाचे स्वराज्य* (१९२६) ही त्यांची दीर्घ कविता उपलब्ध आहे.

*काव्यकुंजा*तील स्फुट कवितेत सामाजिक विषमता, अज्ञान, दांभिकता इत्यादींवर टीका करून त्यांनी आपल्या उदारमतवादाचे दर्शन घडविले आहे. महात्मा गांधी, खादी, असहकार इत्यादींच्या स्पष्ट उल्लेखामुळे स्वातंत्र्यप्राप्तीच्या चळवळीचेही प्रतिबिंब तीत स्पष्टपणे उमटलेले आहे. मातृभूमीच्या पारतंत्र्याची खंत त्यांच्या *काव्यकुंज* व *गमावलेले स्वराज्य व मिळवावयाचे स्वराज्य* ह्या काव्यसंग्रहांतूनही व्यक्त झालेली आहे.

हरिश्चंद्र थोरात, मदन कुलकर्णी

**हिवरगावकर, बळवंत रामचंद्र :** (ज. १८९१, कर्जत – मृ. ११ जानेवारी, १९२९, अहमदनगर). संस्कृत साहित्याचे अनुवादक. मूळ उपनाव दंडवते. शिक्षण अहमदनगर व बडोदा या ठिकाणी. इंटर अनुत्तीर्ण. अहमदनगरच्या मिशन हायस्कूलमध्ये शिक्षक. १९०० पासून पुण्यात वास्तव्य.

*भासकवीच्या समग्र नाटकांची गद्यपद्यात्मक भाषांतरे* (प्रथम खंड–१९२६, दुसरा–१९३१) आणि *कौटिलीय अर्थशास्त्र* (भाषांतर, प्रथम खंड–१९ , दुसरा–१९२९) हे यांचे ग्रंथ प्रसिद्ध आहेत. मूळ संस्कृत ग्रंथांचा मराठीतील हा प्रथम अनुवाद होय. ह्याशिवाय *राजधर्म* (महाभारतांतर्गत 'शांतिपर्व', अ. १२२ चे मराठी भाषांतर); टागोरांच्या 'साधना' या ग्रंथाचे मराठी रूपांतर व 'कला' या निबंधाचा मराठी सारांश; त्यांच्याच 'मालाकार' या कथेचे व 'चित्रा' या नृत्यनाट्याचे मराठी रूपांतर; टागोरांच्या 'नॅशनॅलिझम' या ग्रंथाधारे लिहिलेला *राष्ट्रभावना* हा चार लहान-मोठ्या खंडांचा ग्रंथ आणि संस्कृतातील 'कामंदकीय नीतिसार' या राजनीतिशास्त्राच्या ग्रंथाचे इंग्रजी भाषांतर हे अप्रकाशित साहित्यही त्यांनी लिहिले आहे.

गो. के. भट, मदन कुलकर्णी

**हुपरीकर, बाळशास्त्री अण्णाबुवा :** ० बाळकृष्ण : (ज. १८६४ – मृ. ७ ऑगस्ट, १९२४). ज्ञानेश्वरांपासून चालत आलेल्या गुरुपरंपरेत वाढलेल्या कोल्हापूरस्थ हुपरीकर घराण्यात जन्म. कोल्हापूर येथे राजाराम कॉलेजात संस्कृतचे प्राध्यापक.

*विद्यारण्य व ज्ञानेश्वर यांच्या वेदान्तावरील मतांचे तात्पर्य* (१९०२), *शंकराचार्य व ज्ञानेश्वर* (कोल्हापूरच्या 'ग्रंथमाले'तून प्रकाशित, १९०३) हे ग्रंथ त्यांच्या तौलनिक अभ्यासाची साक्ष देतात.

बाळशास्त्र्यांच्या हर्बर्ट स्पेन्सर या आंग्ल तत्त्वज्ञाच्या ग्रंथांचाही सूक्ष्म व तौलनिक अभ्यास होता. *अज्ञेयमीमांसा व आर्यवेदान्त* (कोल्हापूरच्या 'ग्रंथमाला' मासिकातून प्रकाशित), *शंकराचार्य व स्पेन्सर* ('धर्मविचार' मासिकातून क्रमशः प्रसिद्ध) ह्या दोन ग्रंथांत त्यांनी स्पेन्सरच्या अज्ञेयवादाचे सप्रमाण खंडन केले आहे. लो. टिळकांच्या 'गीतारहस्य अथवा कर्मयोगशास्त्र' या ग्रंथाच्या परीक्षणाच्या निमित्ताने *श्रीमद् भगवद्‌गीता अथवा ज्ञानयोगशास्त्र* (१९१६) हा ग्रंथ त्यांनी लिहिला. लोकमान्यांनी आपल्या ग्रंथात 'गीता ही पूर्णपणे कर्मयोगपरच आहे' हा जो सिद्धांत मांडला होता, त्याचा प्रतिवाद हुपरीकर शास्त्र्यांनी या ग्रंथातून केलेला आहे. 'ज्ञानदेवी'बरोबरच 'अमृतानुभवा'चाही त्यांचा विशेष अभ्यास होता.

गं. दे. खानोलकर, रवींद्र शोभणे

**हेर्लेकर, काशीबाई शामराव :** (ज. १८७४ – मृ. १६ ऑगस्ट, १९३६, मुंबई). बालसाहित्यलेखिका व कथालेखिका. शांताबाई हेर्लेकरांच्या मातोश्री. शिक्षण बडोदे व पुण्याच्या हुजूरपागेत. १८९५ साली स्कूल फायनल परीक्षेत उत्तीर्ण. पुढे बडोदे संस्थानच्या शाळा खात्यात मुख्याध्यापिका.

काशीबाईंनी बडोद्याच्या 'सयाजी-विजय' व मुंबईच्या 'इंदुप्रकाश' या पत्रांतून लेखन केले. मध्यमवर्गीयांच्या सांसारिक जीवनावरील त्यांच्या अनेक कथा 'मनोरंजन' व त्यावेळच्या अन्य नियतकालिकांतून प्रसिद्ध झाल्या. त्यांनी बालकांसाठी अनेक कथा, गीते लिहिली आहेत. *साळू* (१८९९), *संसारातल्या गोष्टी* (१९००) आणि *वाङ्मय आणि स्त्रिया* (१९०९) ही यांची तीनच पुस्तके प्रसिद्ध आहेत. *संसारातल्या गोष्टी* ह्या पुस्तकात प्रौढ मुली व तरुण स्त्रिया ह्यांना गृहशिक्षणाच्या दृष्टीने उपयुक्त संसारोपयोगी गोष्टी कथारूपात मांडल्या आहेत. काशीबाईंनी आत्मचरित्रही लिहून ठेवले होते, पण ते अप्रकाशित आहे. स्त्रीच्या सर्वांगीण उन्नतीचा जागरूकतेने व स्वतंत्रपणे विचार करणाऱ्या पहिल्या पिढीतील लेखिका म्हणून त्यांचे स्थान महत्त्वाचे आहे.

उषा टाकळकर, म. ना. लोही

**ह्यूम, रॉबर्ट विल्सन :** (ज. १० नोव्हेंबर, १८१०, अमेरिकेतील स्टॅम्फोर्ड–न्यूयॉर्क – मृ. २६ नोव्हेंबर, १८५४, मायदेशी परतताना समुद्रप्रवासात मृत्यू). शिक्षण संपल्यावर १८३८ मध्ये त्यांची दीक्षा झाली व ते १८३९ साली भारतात आले. मराठी शिकून मराठीतही प्रवचने देऊ लागले. सारे आयुष्य त्यांनी मुंबईतच घालविले. मुंबईत त्यांनी एक इंग्रजी माध्यमिक शाळा काढून ती चालविली होती. 'बॉम्बे ट्रॅक्ट ॲण्ड बुक सोसायटी'चे ते १८४५ ते १८५४ पर्यंत सेक्रेटरी होते. त्यांच्या कारकिर्दीत संस्थेची प्रकाशने व्यवस्थित मुद्रित होऊन ती सुंदर, सचित्र व आकर्षक स्वरूपात बाहेर पडू लागली. त्यांचा खपही वाढला. त्यातल्या चित्रांचे नमुने मिसेस ह्यूम यांच्या मदतीने तयार करण्यात येत. सुरुवातीला दोन प्रकाशने ते साक्षरांना विनामूल्य देत,

कारण वाचकांपर्यंत ग्रंथ व पत्रिका पोहोचविण्याचा हाच एकमेव मार्ग होता. ह्यूमनी ही प्रथा बंद पाडली. संस्थेची प्रकाशने नाममात्र किमतीला विकण्यात येऊ लागली. शहरात एक खोली भाड्याने घेऊन तेथे त्यांनी विक्रिकेंद्र उघडले.

ह्यूम ज्ञानोदय पाक्षिकाचे १८४५ ते १८५४ पर्यंत संपादकही होते. येथपावेतो त्यांचे स्वतंत्र मराठी लेखन होत नसे. त्याला वाव मिळावा, स्वतंत्र मराठी ग्रंथनिर्मिती व्हावी, मराठी लेखकांना प्रोत्साहन यावे म्हणून ह्यूमच्या कारकिर्दीत विविध स्पर्धा आयोजित करण्यात येऊ लागल्या. स्पर्धेच्या नियमात लेखकाची भाषा मराठी असावी पण सोबत केलेल्या लेखनाचे इंग्रजी भाषांतर जोडावे असा नियम होता. तसेच अश्लील भाषा वापरण्यास मनाई होती.

बायबलच्या पहिल्या दहा ग्रंथांच्या भाषांतरालाही त्यांनी हातभार लावला होता. ह्यूमनी थोडीबहुत ग्रंथरचना केली आहे. *नारायण बाबाचा वृत्तांत* हे त्यांचे असेच एक पुस्तक. एका गृहस्थाचा हा वृत्तांत होता. या बाबाला लोक अवतार मानीत. या पुस्तकाच्या सात आवृत्त्या निघून ५७,००० प्रती खपल्या होत्या. ह्यूमनी अशी विविध प्रकारची धर्मसेवा पंधरा वर्षे अखंडपणे अविश्रांत बजावली. कामाचा अतिशय ताण पडल्याने त्यांची प्रकृती फारच खालावली. तेव्हा त्यांना अमेरिकेला परतण्याचा वैद्यकीय सल्ला मिळाला. त्याप्रमाणे ते सहकुटुंब निघाले. पण मायभूमीचे त्यांना दर्शन घडले नाही. त्यांचे जहाज 'केप ऑफ गुड होप'जवळ येत असतानाच समुद्रावरच्या वादळी हवेने त्यांचा आजार बळावला व ते खंगत गेले. शेवटी २६ नोव्हेंबर, १८५४ रोजी त्यांना मृत्यू आला.

वाङ्मय : (१) विचारकथन (भाषांतरित), मुंबई, १८५०. (२) लेकरांकरिता चित्रांचे पुस्तक, मुंबई, १८५०, १८५१–दुसरी आवृत्ती. (३) मूर्तीचा उच्छेद, मुंबई, १८५०. (४) नारायणबाबाचा वृत्तांत, मुंबई, १८५१. (५) 'गुरु'करण्याविषयी, मुंबई, १८५१.

संदर्भ : 'चरित्र, चर्चा अभ्यास', भास्कर जाधव 'ज्ञानोदय' मार्च, १९८५.

भास्कर जाधव

० **श्रीकृष्ण :** पहा चाफेकर, श्रीकृष्ण नीलकंठ

**श्रीखंडे, शंकर चिंतामण :** (ज. ५ नोव्हेंबर, १८८६, कोल्हापूर, वास्तव्यस्थळ कोल्हापूर – मृ. १९३०, सातारा जिल्ह्यातील म्हसवड येथे, अपघाताने). कवी. व्यवसायाने डॉक्टर. १९१४ सालच्या महायुद्धात डॉक्टर म्हणून काम केले. परदेशातून त्यांनी कुटुंबियांना पाठविलेली पत्रे, कविता इत्यादी *वाङ्मयश्रीखंड* या नावाने प्रसिद्ध झाली आहेत (१९३२). यातून त्यांची विनोदबुद्धी, निसर्गप्रेम, काव्यात्म प्रकृती प्रकट होते. त्यांनी संस्कृतमधूनही काही काव्यरचना केली आहे. वैद्यकीय पेशात राहूनही ज्या मंडळींनी मराठी साहित्यसेवेकडे लक्ष पुरविले त्या मंडळीत डॉ. श्रीखंडे यांचा आवर्जून निर्देश करावयास हवा. कोल्हापूरातील विविध वाङ्मयीन उपक्रमांत श्रीखंडे यांचा सक्रिय सहभाग असे. डॉ. माधवराव पटवर्धन (माधव जूलियन) यांच्या कोल्हापूर येथील वास्तव्यात त्यांचा श्रीखंडे यांच्याशी जवळून संबंध आला होता.

गो. म. कुलकर्णी

० **श्रीदादाभाई :** पहा टाकी, संगेश रामचंद्र

० **श्रीनिवास :** पहा कर्नाटकी, श्रीनिवास नारायण

० **श्रीभाई :** पहा टाकी, रामचंद्र शंकर

० **श्रीराम :** पहा बोवडे, श्रीनिवास रामचंद्र

**ज्ञानेश्वरी, बाळाबोवा :** (ज. १६ जून, १८०६ – मृ. ६ मे, १८८८). संतकवी व ग्रंथकार. घराणे बीड जिल्ह्यातील. उपनाव थेटे. ज्ञानेश्वर, परंपरा व भक्ती ह्यामुळे बाळाबोवा ज्ञानेश्वरी म्हणून प्रसिद्ध.

बाळाबोवांचा प्रमुख ग्रंथ *भक्तितत्त्वामृत* (१८८८) हा. प्रारंभी त्यांनी ३,१६५ श्लोकांचे संस्कृत *भक्तितत्त्वामृत* रचून त्यावर स्वतःच ८,४९८ ओव्यांची प्राकृत टीका लिहिली. ग्रंथाचे एकूण ४१ अध्याय आहेत. हा ग्रंथ ज्ञानेश्वरशिष्य सच्चिदानंद व सोपानशिष्य प्रकाशनाथ ह्यांच्या ग्रंथांच्या आधारे रचला आहे. पण ते मूळ आधारभूत ग्रंथ आज उपलब्ध नाहीत. बाळाबोवांची ही प्राकृत टीका त्यांचे शिष्य कृष्णदास माधव पंडित, मुल्हेरकर यांनी लिहून काढली. ह्या ग्रंथात नवविधभक्ती विश्वरूपवर्णन, मानसपूजा, पंढरीमहात्म्य, जीवन्मुक्तवर्णन, शाक्त, शैव, गाणपत्य, वैष्णव ह्या संप्रदायांची साधनापद्धती इत्यादी अनेक विषयांची चर्चा आहे. त्यांची इतर ग्रंथरचना अप्रकाशित आहे.

ग. बि. कविटकर, म. ना. लोही

० **ज्ञानेश्वरीबोवा श्रीगोंदेकर :** पहा केणे, आत्माराम कृष्ण